# राज्यशास्त्रविचार



गांधी जयंती

२ आक्टोबर १९४५

लेखक

नरहर विष्णु गाडगीळ

किंमत ७ रुपये

# भूमिका

राजकारणांत लोक अधिक अधिक भाग घेऊं लागले आहेत. सामान्य नागरिक आपली उदासीनवृत्ति सोडून जेवढा अधिक भाग यांत घेतील तेवढें इष्टच आहे. आणि सर्व सामान्य नागरीकांना राजकारणांतील प्रमुख प्रमुख सिद्धांतांचा परिचय व्हावा हा हेतु मनांत भरून कांहीं लिहावे असें फार दिवस मनांत होते. फुरसत मिळताच हा प्रस्तुत ग्रंथ लिहला आहे. राजकारणाचा विचार तीन ग्रंथांत करण्याचे ठरविले आहे. राज्यशास्त्रविचार, राज्यव्यवहारविचार व विधिविचार, या तीन ग्रंथांची 'मुक्तामाला' गुंफण्याची योजना असून पहिला ग्रंथ लिहून हातावेगळा केला आहे. विचार, वाणी व व्याकरण यांच्यांत परस्परांत जो संबंध आहे तोच वरील तीन ग्रंथांत राहणार आहे. प्रस्तुत ग्रंथांत राज्यविषयक प्रमुख कल्पनांचा तात्त्विकदृष्ट्या विचार केला असून इष्ट राज्यव्यवस्था कोणत्या तत्त्वांवर आधारलेली असावी याचे दिग्दर्शन केले आहे. राज्यव्यवहारविचार यांत प्रत्यक्ष राज्यकारभार करणाऱ्या निरनिराळ्या संस्था व पद्धति त्यांची तुलना, येणारा अनुभव वगैरे गोष्टींचा प्रपंच केला जाईल. विधिविचार यांत कायदा, त्यामागील तत्त्वज्ञान, त्याची निर्मिति, त्याचा न्यायाशीं संबंध वगैरे गोष्टींचा विचार होईल. मनांतील आशय वाणी मार्फत प्रकट होतो; व वाणीचे नियमन व्याकरणानें होते. राज्याचा हेतु राज्याचा व्यवहार करणाऱ्या संस्थांतून प्रकट होतो व त्याचें स्वरूप कायद्यामार्फत, सत्तेचे हुकुमामार्फत जनतेला कळत असते म्हणून या तीन ग्रंथांत या तीन दृष्टीनीं राजकारणाचा परामर्ष घेतला जाईल. ही विभागणी अगदी तर्कशुद्ध नसली तरी विषय समजण्याचे दृष्टीनें सोयीची होईल अशी लेखकाची अपेक्षा आहे.

प्रस्तुत ग्रंथ अनेक ग्रंथांचे साहाय्यानें लिहिला आहे व त्यापैकीं, प्रमुखांचा निर्देश शेवटीं केला आहे. तथापि या ग्रंथांत जी विचारसरणी मांडली आहे, जी मतें प्रतिपादलीं आहेत त्यांची जबाबदारी लेखकावर आहे. कांहीं अलौकिक अगर अद्‌भुतरम्य, अगर नाविन्यपूर्ण असे यांत आहे असा लेखकाचा दावा नाहीं. कांहीं विशिष्ट हेतु मनांत धरून, कांहीं विशिष्ट पद्धतीनें प्रचलित कल्पनांचा उहापोह केला आहे. राज्यशास्त्रावर अधिकारयुक्त भूमिकेवरून ग्रंथ लिहिण्याची योग्यता आपले अंगीं आहे असे लेखकाला वाटत नाहीं. सामान्यजनांनां समजेल अशा सोप्या व सुबोध भाषेंत या शास्त्रांतील कल्पनांचा, तत्त्वांचा परिचय करून देण्याचा हा प्रयत्न आहे. या

ग्रंथाचा उपयोग वाचकांना किती व कसा होईल हे आज सांगतां येणार नाहीं, परंतु लेखकाला मात्र लिहीत असतांना अनेक कारागृहांतील महिनेचे महिने कसे निघून गेले हे कळलेही नाहीं, हे समाधान कांहीं कमी नाहीं. वाचकांना ग्रंथ वाचण्यांत कांहीं मिळाले असे वाटले तर लेखकालाही श्रमाची किंमत मिळाली असे वाटेल.

महाशिवरात्र
२२-२-४४
नाशिक सेंट्रल प्रिझन

न. वि. गाडगीळ

# अधिक दोन शब्द

ग्रंथ प्रसिद्ध करतांना दरम्यान झालेल्या जागतिक घटनांचा शास्त्रीय दृष्टीनें विचार करावा असे वाटले. पण त्यामुळें ग्रंथविस्तार वाढेल व अधिक किंमत ठेवावी लागेल म्हणून तो विचार रहित केला आहे. ग्रंथ छापण्याचें कामीं आपुलकीनें श्रम घेणारे श्री. दाते यांचे आभार मानले पाहिजेत. सूचि करण्याचें कामीं श्री. वसंतराव बाखडे यांनीं फार परिश्रम केले याबद्दल त्यांचेही आभार मानतो.

२।१०।४५

न. वि. गाडगीळ

# अनुक्रमणिका





# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३४ | २५ | दृष्टीनें | दृष्टीनें. |
| २७ | २७ | व्यक्तीला | व्यक्तीचे |
| ५५ | २६ | अप्रतिष्ठित | प्रतिष्ठित |
| | | अनैतिक | नैतिक |
| ७८ | १२ | मनाला | मताला |
| ११९ | ३ | निकर्ष | निकष |
| १२० | ९ | प्राण्याकडे | प्राप्याकडे |
| १२२ | २९ | अस्मीता | अस्मिता |
| २०९ | २० | सरकार | सरकार, |
| | २१ | व्यक्तिसमूह | व्यक्तिसमूह. |
| | २४ | स्वराज्याचे | राज्याचे |
| २१२ | २४ | नसते | बसते |
| २१९ | २० | व्हावयाचे | व्हावयाचे म्हणजे |
| २६६ | १६ | १९२७ | १९२० |
| २७८ | ७ | करणें | करीत |
| पान ३९३ च्या ऐवजी पान २९३ पाहिजे | | | |
| ३०० | ४ | Dieomatic | Diplomatic |
| ३०२ | २९ | वारसाधनखर्च | वारसाधन खर्च |
| ४०४ | १७ | यथार्थचे | यथार्थतेचे |
| ४१८ | ७ | लाभतो | लागतो |
| ४१९ | १ | परगण्यांत | परराज्यांत |
| ४२१ | १७ | प्रमुखत्वाचा | प्रभुत्वाचा |
| ४४३ | २८ | स्वराज्य संमति | स्वराज्य. संमति |
| ४६९ | २ | व्यत्तिगत | व्यक्तिगत |

# कांहीं संदर्भ ग्रंथ


(१) Authority in Modern State — प्रो लास्की
(२) Foundations of Sovereignty — ,,
(३) Liberty in Modern State — ,,
(४) Grammar of Politics — ,,
(५) Democracy in Crisis — ,,
(६) Dangers of Obedience — ,,
(७) Parliamentary Government in England — ,,
(८) Political thought in England — ,,
(९) Stratagy for Victory — ,,
(१०) Public Opinion — वा. लिपमन
(११) Phantom Public — ,,
(१२) Preface to Politics — ,,
(१३) Human Nature in Politics — ग्रॅहॅम वॉलॉस
(१४) The Great Society — ,,
(१५) History of Freedom — ॲक्टन
(१६) Political thought in England — बारकर
(१७) The New State — फॅलेट
(१८) The History of Political theory — प्रो. सबाईन
(१९) Social theory — कोल
(२०) Modern State — मॅकिव्हर
(२१) The Acquisitive Society — टॉने
(२२) Equality — ,,
(२३) Law in Modern State — ड्युग्यू
(२४) History of Political Science — पोलाक
(२५) The State — विल्सन
(२६) Principals of Political Obligation — ग्रीन
(२७) Imperialism — हॉब्सन

आचार्य जावडेकर यांचे ग्रंथ, इत्यादि.

# राज्यशास्त्रविचार

## :समाजसंघटन कां व कशासाठीं:

दर १० मैलाला भाषा बदलते असें म्हणतात; याचा अर्थ भाषेचें ऐन स्वरूप बदलतें असें नव्हे तर उच्चाराची लकब, थोडी वाक्यरचना, कांहीं शब्द बदललेले दिसतात. त्याचप्रमाणें दर पिढीस समाजाचें स्वरूप, तसेंच राजकारणाचें स्वरूप बदलत असतें. परंपरेची भर पडत असते, कांहीं संकेत बदलत असतात. जुने आदर्श जीर्ण होऊन मागें पडतात, नवीन डोकावूं लागतात, लोकव्यवहार स्थूल आणि सूक्ष्म दृष्टीनें सारखा बदलत असतो. समाजांतील विचारवंत व द्रष्टे या गोष्टींची जाणीव ठेऊन समाजहितार्थ परिस्थितीला अनुरूप होईल अशा दृष्टीनें मार्गदर्शन करीत असतात. प्रसंगीं समाजधारणेच्या व शासनाच्या मूलभूत कल्पनासुद्धां बदल पावतात व प्रसंगीं त्यांत बदल, जाणिवेनें घडवून आणावा लागतो. नवीन जग सारखें निर्माण होत असतें. नव्या जगाला नवीन राजकीय तत्त्वज्ञानाची आवश्यकता भासत असते. परिस्थितीप्रमाणें हें तत्त्वज्ञान, व तत्त्वज्ञानाप्रमाणें परिस्थिति बदलत असते व दोघांची योग्य जुळणी होण्यांत प्रगतीचीं बीजें असतात. २५ वर्षांपूर्वी जी राजकीय तत्त्वप्रणाली होती ती बदललेली उघड दिसत आहे. प्राचीन विचारवंतांनीं सांगितलेलीं तत्त्वें, त्यांत गेल्या चारशें वर्षांत झालेला फरक लक्षांत घेऊन कांहीं गोष्टी आधुनिक राजनीतिशास्त्रज्ञांच्या मतें अगदीं सनातन व चिरायु आहेत असें प्रतिपादलें जात होतें. जगाचा गेल्या तीस वर्षांचा इतिहास पाहिला तर ही त्यांची समजूत चुकीची असल्याचें सहज आढळून येईल. एक तर या बाबतींत विचाराचें क्षेत्र वाढलें आहे, अमर्याद झालें आहे. आतां नुसत्या एका राष्ट्राचा विचार करून भागत नाहीं, एका खंडाचा विचार करून भागत नाहीं, सर्व जगाचा विचार करणें भाग पडतें. दुसरें समाज व शासन यासंबंधाचा विचार जितका सोपा वाटत असे तितका तो तसा राहिला नाहीं. राष्ट्र म्हटलें तरी त्यांत एकजिनसीपणा न राहतां अनेक गुंतागुंतीचे प्रश्न उपलब्ध झालेले सर्वत्र दिसून येत आहेत. शासन म्हणजे नुसता राजकीय विचार ही स्थिति आतां राहिली नाहीं. राज्य ( **State** ) म्हणजे व्यक्तिगत नागरिकांचें संघटन येवढाच अर्थ आतां पुरेसा मानणें शक्य नाहीं. नुसतें

संघटन करून भागत नाहीं, तर त्या संघटनांतून उत्पन्न होणाऱ्या भावना, आशा व आदर्श यांना वाव देणाऱ्या व तद्‌निदर्शक व योग्य अशा संस्था निर्माण करणें स्थैर्याच्या व प्रगतीच्या दृष्टीनें अवश्य वाटूं लागलें आहे.

लोकशाही चांगली येवढें म्हणून भागत नाहीं. आधुनिक जगांत लोकशाहीच्या कल्पना सर्वज्ञात आहे. तत्त्वतः राजकीय सत्ता ही कुल अगर संपत्ति यांवर आधारलेली नाहीं हे खरें; तथापि मोठ्या बापाच्या पोटीं जन्मास आल्यानें मिळणारा राजकीय फायदा फारसा कमी झाला आहे अगर संपत्तीचा प्रभाव राजकीय सत्तेवर पडतच नाहीं, असा अनुभव सर्वशः दिसून येत नाहीं. राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्ति नागरिक होणें अवश्य आहे व व्यक्तीमात्रास नागरिकाचे हक्क आहेत व असले पाहिजेत येवढें मात्र बिनतक्रार मानलें जात आहे. राजकारण म्हणजे केवळ मूठभर श्रीमंत अगर विद्वान् यांची मिरास असें उघडपणें व सिद्धान्त म्हणून कोणी आतां प्रतिपादत नाहीं. जनता म्हणजे 'तेली, तांबोळी' म्हणून यःकश्चित् गोष्ट असें बोलून दाखविण्यास कोणी प्रतिष्ठित राजकारणी पुरुष धजत नाहीं. येवढा बदल गेल्या कांहीं वर्षांत झाला आहे. किंबहुना राज्यांतील अखेरी सत्ता अगर प्रभुत्व ( **Soverignty** ) तात्त्विक दृष्टीनें तरी 'आम जनते'कडे आहे येवढें मान्य झालें आहे. वस्तुस्थितींत अनुभव जरी निराळा असला तरी तात्त्विक भूमीवर आम जनतेनें आपल्या प्रभुत्वाचें निशाण कायम केलें आहे येवढें खरें. ही तात्त्विक सत्ता सर्वोपयोगी व्हावी म्हणून तिचें ध्येय निश्चित झालें पाहिजे व हे ध्येय साधनाचे मार्ग कोणते हेंही कळलें पाहिजे. ही सत्ता प्रत्यक्ष कोणाच्या हातांत असावी म्हणजे मान्य केलेलें ध्येय साधेल हाहि प्रश्न कमी महत्त्वाचा नाहीं. या सर्व प्रश्नांचा विचार करणें म्हणूनच अवश्य आहे.

तत्त्वतः जनता राज्याची मालक झाली, व्यक्तीमात्राला राज्यांत मतदानाचा हक्क मिळाला, येवढ्यानें सर्व कार्यभाग होईल, व थोड्या प्रयत्नानें स्वातंत्र्य व समता सर्वत्र नांदेल अशी आशा पूर्वी अनेकांनीं केली ती व्यर्थ ठरली. याही देशांत तोच अनुभव कमीजास्त प्रमाणांत येत आहे. तात्त्विक समता प्रत्यक्ष सृष्टींत समता उत्पन्न करूं शकत नाहीं. बुद्धीला पटलें म्हणजे वागणूकींत समंजसपणा उमटेलच हा सिद्धान्त खरा नाहीं. बुद्धीला पटूनहि अन्य विकारांचा व भावनांचा परिणाम व्यवहारांत झालेला दिसतो. व्यक्तिगत स्वार्थ व वर्गहित यांची शक्ति जबरदस्त आहे व त्यांच्यापुढें अनेक वेळां बुद्धी शरण आलेली आहे, मनोदेवता निःसत्त्व ठरली आहे. म्हणूनच सरकार म्हणजे समाज असें म्हणणें धाडसाचें वाटतें. ज्यांच्या हातांत सत्ता

त्यांना स्वहित अगर वर्गहित म्हणजे सर्व समाजाचें हित वाटतें व तशी त्यांची वागणूक होते असा अनुभव आल्यानें, सरकार म्हणजे समाज अगर सर्व समाजाचें प्रतिबिंब असें म्हणतां येणार नाहीं. याचा अर्थ असा नव्हे कीं, राष्ट्रांतील प्रत्येक पात्र व्यक्तीनें, प्रत्येक नागरिकानें, राष्ट्रांतील प्रत्येक राजकीय हालचालींत व घडामोडींत प्रत्यक्ष भाग घ्यावा व तसें झालें तरच सरकार म्हणजे समाज हें गणित बिनचूक होईल. समाजाचें अंतिम धोरण काय असावें हें ठरविण्याचा हक्क सर्व समाजाचा व तें अंमलांत येतांना जें बुद्धीला पटलें आहे व निश्चित झालें आहे तेंच अन्य विचार बाजूला ठेवून अमलांत आलें पाहिजे. सर्व नागरिक बुद्धिमान् नसतात. असले तरी सर्वांनाच काय पाहिजे आहे व कोणतें योग्य आहे हें कदाचित् सांगतांहि येणार नाहीं. तथापि जें विचारांती सर्वांच्या हिताचें ठरलें, तें घडवून आणण्याची प्रत्यक्ष जबाबदारी जरी मूठभर लोकांची असली, तरी होणारें कार्य सर्वांच्या हिताचेंच होईल. जेथें व्यक्तिस्वार्थ अगर वर्गस्वार्थविरहित असें सरकार जनतेनें निर्णीत केलेल्या ध्येयानुसार वागतें तेथें सरकार व समाज हें एक असें म्हणणें कांहींसें यथार्थ आहे. अन्यत्र नाहीं.

जनता अखेरचा व अंतिम निर्णय जेथें घेते, ज्या राजकीय संघटनेत घेते, त्या संघटनेला लोकशाही हे पद लावतात. अनेक देशांतून अनेक तऱ्हेच्या राजकीय संघटना झाल्या व त्यांत उत्क्रांति होत होत राष्ट्रांतील राजकीय प्रभुत्त्व हें अखिल जनतेचे व अंतिम निर्णय जनतेनें घ्यावा असें स्वरूप आधुनिक जगांत राजकीय संघटनेला प्राप्त झाल्याचें दिसून येत आहे. ज्याला एकदां सत्ता मिळाली तो सहसा ती सोडीत नाहीं हा अनुभव लक्षांत घेतां, हें राजकीय संघटनेचें स्वरूप यापुढें फारसें बदलेल असें वाटत नाहीं. प्रत्यक्ष स्वरूप अनेक रंगी असूं शकेल, पण सूक्ष्म स्वरूप, अगर संघटनेचा आत्मा मात्र वर वर्णन केल्याप्रमाणें राहील असें उघड दिसतें. ही गोष्ट निश्चित मानल्यानंतर लोकशाही जास्तींत जास्त चांगली कशी होईल हें पाहिलें पाहिजे; व हें घडवून आणतांना, लोकशाहीचे संकेत लक्षांत घेऊन, कोणतीं साधनें व कोणत्या संस्था उभारल्या असतां जास्त फायदा होईल याचा विचार केला पाहिजे. प्रत्यक्ष राज्यकारभार अगर प्रत्यक्ष राज्यकारभाराचें यंत्र हें साहजिकच थोड्या लोकांचे हातांत असणार त्यांतील इंगितेंही थोड्या लोकांनाच माहीत असणार; हें लक्षांत घेऊन वरील गोष्टींचा विचार केला पाहिजे. राज्यपद्धति कोणतीहि असो ती चालविणारीं माणसेंच असतात. एकतंत्री राजसत्ता असेल तर तेथील राजा अगर हुकूमशहा हा लायक अगर योग्य असेल तर तेथील कारभार नीट चालेल. एकामागून एक येणारे राजे लायक अगर योग्य मिळणें कठीण. हुकूम-

शाहाला वारस नसतो. त्यानें मिळविलेलें पद जन्मानें नसून कर्तृत्वानें; व तें सर्व त्याजबरोबर संपतें. लोकशाहींत तर कर्तृत्ववान् व योग्य माणसांची जरूर जास्त असते. लायक, दक्ष व कर्तृत्ववान् पुरुषांची परंपरा असेल तर लोकशाही यशस्वी होईल. लोकशाहींत जनता बारीकसारीक गोष्टीकडे लक्ष देत नाहीं. कसें घडून येतें याकडे न पाहतां काय घडतें हें पाहून मत बनवितें, निर्णय देते. लोकशाहीचें स्थूल स्वरूप ठरवितांना अंतिम सत्ता व प्रभुत्त्व हे फार विचार न करणाऱ्या, विशेष ज्ञान नसणाऱ्या, बहु अंशानें उदासीन अशा जनतेकडे आहे ही महत्त्वाची गोष्ट दृष्टी-समोर ठेवली पाहिजे.

अंतिम सत्ता एवंगुणविशिष्ट जनतेकडे आहे व ती तशी ठेवून राज्यव्यवस्था आंखावयाची तर एकंदर समाजधारणा व राज्य यांची मूलभूत तत्त्वें जाणणें अवश्य आहे. मनुष्य राजकीय दृष्ट्या बिनवारसी असा आधुनिक जगांत जन्मत नाहीं. सर्वत्र राज्ये प्रस्थापित असून सरकार सर्वत्र राज्यकारभार चालवीत आहे. जन्मतःच मनुष्यावर विद्यमान सरकारचा अधिकार असतो. शासनसंस्थेच्या आज्ञा मानणें ही मनुष्याला स्वाभाविक गोष्ट वाटते. हजारों वर्षांच्या अनुभवानें मनुष्य एकलकोंडा न राहतां संघप्रिय अगर जमावानें राहणारा झाला आहे. किंबहुना ही प्रवृत्ति त्याचा एक स्वभाव झाला आहे. भुकेप्रमाणें संगत हवी ही एक मनुष्याची नैसर्गिक प्रेरणा झाली आहे. गिरीकुहरांतून रानावनांतून राहणारे यति व संन्यासी वगैरे अपवाद सोडले तर मिसळून राहणें ही सुधारलेल्या व सुसंस्कृत समाजांत मूलभूत गोष्ट झालेली दिसून येते. दोन माणसें एके ठिकाणीं आलीं कीं, अनेक नातीं उत्पन्न होतात. त्यांनीं एकमेकांशीं कसें वागावें हें ठरविणें अवश्य होतें. योग्य वागणूक कोणती हेंहि ठरविणें अपरिहार्य होतें. योग्य रीतीनें व गोडीगुलाबीनें वागण्याची प्रवृत्ति सर्वांत असतेंच असें नाहीं. आणि जेथें समाज मोठा आहे, तेथें निव्वळ असल्या प्रवृत्तीवर विश्वास ठेवून भागणार नाहीं. आधुनिक सुधारलेल्या जगांत समाजांत दररोज घडणाऱ्या हजारों घटना घडत असतात, लाखों व्यवहार होत असतात. तें सर्व कुठल्याहि नियंत्रणाशिवाय केवळ व्यक्तीच्या सद्भावनेवर अगर प्रेरणेवर विसंबून ठेवलें तर कठीण प्रसंग येईल. योग्य कोणतें अयोग्य कोणते हें तरी समाजानें ठरविलें पाहिजे. तसें असल्या-शिवाय व्यक्तीनें वागावयाचें कसें, कोणतें प्रमाण मानावयाचें हें त्यास कळणार नाहीं. प्रमाण ठरविणें हें काम समाज संघटीत झाल्याशिवाय होऊं शकत नाहीं. कांही सामाजिक प्रमाण अगर संकेत नसतील तर प्रत्येक व्यक्ति स्वैरपणें वागेल, व्यक्ति-व्यक्तींतील विरोध वाढतील, समाजधारणा नष्ट होईल, अराजकता माजेल. समा-

जाच्या धारणेसाठीं, समाजाच्या अस्तित्वासाठीं ज्या गोष्टी आवश्यक मानल्या असतील, त्याबाबत समाजानें जें प्रमाण अगर संकेत ठरविले असतील, त्याबाबत व्यक्ति स्वैरपणें अगर स्वतंत्रपणें आपल्या मताप्रमाणें चालूं लागेल तर समाजांत शांतता राहणार नाहीं, सामाजिक जीवन नष्टप्राय होईल. समाज म्हणून राहावयाचें असेल तर व्यक्तीनें कुठें तरी आपल्या स्वैर प्रवृत्तींना मर्यादा घातल्या पाहिजेत व 'चार जणा' प्रमाणें, समाजमर्यादा व संकेत संभाळून वागलें पाहिजे.

व्यक्तीनें वर लिहिल्याप्रमाणें वर्तनावर मर्यादा घालणें म्हणजे स्वातंत्र्य गमविणें असा अर्थ करणें चूक होईल. किंबहुना अशी मर्यादा व्यक्तीच्या स्वातंत्र्यसंरक्षणाची तटबंदी आहे. प्रत्येक मनुष्य सर्वतोपरी परिपूर्ण नाहीं. सर्व मनुष्यें सारखीं सशक्त नाहींत, सारखीं हुषार नाहींत, सारखीं संपन्न नाहींत; या स्थितींत त्यांनीं एकमेकांशीं कसें वागावें यासंबंधीं कांहीं नियम कांहीं मर्यादा असणें अवश्य आहे; व ते नियम व त्या मर्यादा असल्या म्हणजेच व्यक्तीचें स्वातंत्र्य स्पष्ट होतें, किंबहुना त्यांतूनच निर्माण होतें. या नियमांनीं जीवित व वित्त सुरक्षित होतात; त्याचें शिक्षण, त्याचें आरोग्य, त्याचा व्यवसाय, त्याची प्राप्ति, या मर्यादा असल्यामुळें संकल्पित होतात. जीवनांतील गोष्टी स्पष्ट होतात. कांहीं विश्वास, कांहीं भरंवसा त्याला वाटूं लागतो. नियमाभावीं मिळविलेलें जवळ राहील कां ही शंका, दुसरा सशक्त लुबाडील ही भीति, उद्यां काय होईल याची शाश्वति नाहीं ही हुरहुर, या गोष्टी अपरिहार्य आहेत. नियमानें स्वैर वर्तनाला वाटेल तसें वागण्याला मर्यादा बसेल पण त्याबरोबर वरील दोष जातील, स्वातंत्र्य स्पष्ट होईल; व त्यांत निश्चितपणा उत्पन्न होईल. मनाप्रमाणें कुणाहि व्यक्तीला वागतां येणार नाहीं हें खरें, पण हें बंधन समाजांतील सर्व व्यक्तींना असल्यामुळें या सार्वजनिक बंधनांतच स्वातंत्र्य समावलें असतें. हें बंधन व हें स्वातंत्र्य किती व त्यांच्या मर्यादा कोणत्या हें त्या समाजांतील ऐतिहासिक व अन्य परिस्थितीवर अवलंबून राहतें परंपरा व परिस्थिति बाजूस सारून या गोष्टींचा विचार करणें अशास्त्रीय व अशक्यहि आहे.

मूळांतच मनुष्य स्वतंत्र नाहीं. निर्भेळ स्वातंत्र्यांत तो जन्मत सुद्धां नाहीं. कुठें जन्मावें व कोणत्या काळांत जन्मावें हें सुद्धां त्याला ठरवितां येत नाहीं. ज्या समाजांत जन्मतो, ज्या कालांत जन्मतो, त्या समाजाच्या परंपरा व त्या कालाचें विशिष्ट वातावरण मोठ्या प्रमाणांत त्याचें जीवन निश्चित करतात. कांहीं गोष्टी पराक्रमानें, व्यक्तिमत्त्वानें तो बदलील; पण कांहीं त्याच्या आंवाक्याबाहेरच्या असतात. कांहीं बंधनें तो तोडूंच शकत नाहीं. संघशक्तीनें, निश्चयानें, समाजांत मनुष्यांनीं बदल घडवून

आणले आहेत. सामाजिक व राजकीय संस्था, तसेंच एतद्विषयक संकेत अशा रीतीनें बदलतात हें खरें. पण व्यक्ती एकाकी हें फारसें करूं शकत नाहीं. जिवंत कसें राहावयाचें याच्या विवंचनेंत बहुतेक उत्साह, व बरीचशी शक्ति त्याची खर्च होऊन जाते. व्यक्तीगत जीवनापलीकडील प्रदेश पाहणें, व त्यांत रस घेऊन कांहीं कार्य करणें, याला लागणारी फुरसत व अवश्य तें स्वास्थ्य फार थोड्यांच्या वांट्यास येतें. मनुष्यमात्र राजकीय प्राणि आहे हें तत्त्वतः ठीक आहे, पण प्रत्यक्ष व्यवहारांत त्याची उदासीनताच जास्त प्रमाणांत नजरेस येते. बहुतेक माणसें आयुष्याकडे सामाजिक दृष्टीपेक्षां वैयक्तिक दृष्टीनें पाहत असतात. शेजारधर्म ते जाणत नाहींत असें नाहीं, पण त्यांतील रहस्य समजून घेण्याचा प्रयत्न क्वचित् करतात. परंपरा मानून सामान्यतः चालतात. ती योग्य का अयोग्य याचा विचार करण्याच्या भानगडींत फारसें पडत नाहींत. कां व कसें असले प्रश्न विचारून, शंका उत्पन्न करून क्षोभहि उत्पन्न करीत नाहींत: अगर परंपरा व संकेत, बुद्धीच्या साहाय्यानें पारखून त्यांचा स्वीकार करण्याचें त्यांना अवघड वाटतें व म्हणून तें फारसें घडत नाहीं. सरकारी कायदेसुद्धां ते योग्य आहेत म्हणून पाळतात असें नव्हे, तर त्याबद्दल विचारसुद्धां करीत नाहींत. उदासीनता व निरुत्साह यावरच त्यांची ही निष्ठा आधारलेली असते. जेव्हां विरोध करतात त्या वेळीं बुद्धीपेक्षां भावनेचा भाग जास्त असतो. सर्व समाज सर्व व्यवहार ज्यावर अवलंबून आहे, आधारलेला आहे, त्या शासनसंस्थेचा विचार करणें, व व्यक्ति त्यांत कोठें बसते हें पाहणें, हा विचार करणारे व्यापक बुद्धीचे लोक समाजांत फार थोडे. समाजांत मुकाट्यानें ऐकणारे बहुसंख्यांक व त्यांना ऐकावयाला लावणारे मूठभर असें दृश्य सर्वत्र दिसतें. तथापि कांहीं तरी अकल्पित घटना घडल्याशिवाय ही वस्तुस्थिति लक्षांतसुद्धां येत नाहीं व अशाच प्रसंगीं मनुष्य किती व कोठपर्यंत बंधनांत आहे हें स्पष्ट होतें. अन्यथा, असणारें बंधन मनुष्याला तसें वाटतसुद्धां नाहीं.

युद्ध सुरू झाल्याबरोबर महागाई झाली, लोकांना जाणवूं लागली; वास्तविक युद्ध हजारो मैल दूर होते पण परिणाम मात्र सर्वत्र होत होता. जगांतील एका भागांतील घटनेमुळें सर्वत्र परिणाम होतात हें सर्वांना चांगलेंच जाणवलें. अन्नपुरवठा, वस्त्रपुरवठा जागतिक परिस्थितीवर अवलंबून आहे याची जाणीव युद्धाच्या घटनेनें झाली. राजकीय घडामोडीप्रमाणेंच शास्त्रीय शोध, आर्थिक अनर्थ हे सार्वत्रिक परिणाम करीत असतात, व जीवनांत फरक घडवून आणतात. शंभर वर्षांपूर्वींची स्थिति व हल्लींची यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. आधुनिक प्रवासाचीं साधनें क्रांतिकारक

ठरली. शहराशहरांतीलच काय पण देशादेशांतील हजारों मैलांचें अंतर आतां यःकश्चित् वाटतें. खेडोपाडीं वर्तमानपत्रें जाऊं लागलीं असून माणसें पूर्वींपेक्षां जास्त चौकस झाली आहेत. रोगावर इलाज म्हणून मंत्राऐवजीं औषधोपचारावर विश्वास वाढला आहे. आपत्तिप्रसंगीं देव अद्यापिही आठवतो, पण प्रयत्नावरील भर जास्त वाढला आहे. देशांतीलच उत्पादनावर अवलंबून राहण्याची आवश्यकता राहिली नाहीं. आर्थिक व्यवहाराची पेठ जागतिक झाली आहे. जग एक असून विलग वाटत असें पण नवीन शोधामुळें, नवीन अर्थानें तें एक झालें आहे; कारण त्याचे सर्व भाग एकमेकांवर अनेक दृष्टींनी अवलंबून आहेत. अशा प्रचंड व गुंतागुंतीच्या जगांत सर्वत्र अधिकार चालविणाऱ्या शासनसंस्था काय आधारावर जगतात, लोक त्यांना कां मानतात याचें कारण समजून घेणें साहजिक महत्त्वाचें आहे. शासनसंस्था, देशांतील सरकार, सामान्यतः जनतेच्या इच्छा आकांक्षा यांचें सामुदायिक स्वरूप आहे हा असलेला विश्वास या मान्यतेच्या मुळाशीं आहे. राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीची इच्छा अगर त्यापैकीं प्रत्येक भाग या सामुदायिक स्वरूपांत असेल असें नाहीं, पण सामान्यतः लोकांना जी सरकारी दृष्टि असावी, जो सरकारचा हेतु असावा असें वाटतें तितकें तरी या सामुदायिक स्वरूपांत असलें म्हणजे झालें. व्यक्तीची दृष्टि व ही सामुदायिक दृष्टि, सरकारची दृष्टि, यांत संपूर्ण एकता नसली तरी समन्वय सहज होईल अशी परिस्थिति असणें अवश्य आहे. व्यक्तींना आपला विकास करण्याला या संघटनेंत वाव आहे असा विश्वास असला पाहिजे. यांतच सुधारणेचीं व प्रगतीचीं बीजें आहेत. जर शासनसंस्थांवरील हा विश्वास कमी होईल तर प्रगति पण मंदावेल. शासनसंस्थांचें कार्य वरील दृष्टीनें योग्य परिस्थितींत चालणें प्रगतीसाठीं अवश्य आहे. ज्यांच्या हातांत हें शासन आहे जे सरकार म्हणून अधिकार गाजवितात ते, व्यक्तिगत स्वार्थासाठीं समाजाचें हित बाजूस सारतात असा अनुभवही आहे. राष्ट्राराष्ट्रांतील स्पर्धा, वर्गावर्गांतील स्पर्धा, वर्णभेदामुळें उत्पन्न झालेले कलह, या सर्वांमुळें प्रगतीला अडथळाच उत्पन्न होतो. शास्त्रांनीं लावलेल्या शोधापासून मानवी जीवन अधिक सुखी होण्याऐवजीं मानवी संहारालाच ते कारणीभूत झालेले दिसतात. प्रगतीचें संघटन म्हणून, साधनयंत्र म्हणून निर्माण झालेली शासनसंस्था, अगर राज्य ( **State** ) अशीं विपरीत फळें देऊं लागलीं तर त्यांच्यांतच कांहीं दोष आहे असें कांहींना वाटणें साहजिक आहे. मानवी संहाराकडे व कलहाकडे जर ज्ञानाचा व शोधांचा उपयोग होऊं लागला तर ही संस्थासुद्धां अस्तित्त्वांत राहणें कठिण होईल. मानवी समाजाचा व सुधारणेचा जीव भीतीच्या वातावरणांतून निघाला तरच खरी प्रगति शक्य आहे.

आधुनिक जगांत शांतता कशी राहील हा राजकारणांतील मुख्य प्रश्न होऊन बसला आहे. शांतता म्हणजे पुढील युद्धाची तयारी अशी व्याख्या जरी नसली तरी अनुभव मात्र तसा येत आहे. युद्धाशिवाय, कलहाशिवाय, मनुष्याच्या आकांक्षा परिपूर्ण होणें शक्यच नाहीं कां ? शांतता, आकांक्षांना व प्रेरणांना संपूर्ण वाव देण्यास समर्थ आहे इतकें चैतन्य शांततेंत आहे इतका विश्वास व्यक्तींमध्यें उत्पन्न झाला तर पाहिजे आहे. हा विश्वास कसा उत्पन्न होईल हे पाहिलें पाहिजे. मनुष्य हा जन्मापासून सामाजिक वातावरणांत असतो. त्याच्या विचारांचा, वर्तनाचा, आदर्शांचा संदर्भ व योग्य अर्थ लावावयाचा झाल्यास ज्या समाजांत जन्मला त्या समाजांतील शासनसंस्थेच्याच अनुरोधानें लावला पाहिजे. त्याची कोणतीही क्रिया या संस्थेच्या क्षेत्राबाहेर अगर अधिकाराबाहेर तत्त्वतः तरी असूं शकत नाहीं. त्यानें काय बोलावें अगर बोलूं नये, काय लिहावें अगर लिहूं नये, कोठें राहावें अगर राहूं नये, काय व्यवहार करावेत अगर करूं नयेत, कोणाशीं मिसळावें अगर मिसळूं नये, लग्नसंबंध कोणाशीं करावेत अगर करूं नये, हें सर्व कांहीं सूक्ष्म दृष्टीनें शासनसंस्थेच्या अधिकारांतील आहे. अधिकार असलेल्या प्रदेशांत शासनसंस्था दुसऱ्या कोणत्याही संस्थेचा वरचष्मा चालूं देणार नाहीं. विशिष्ट प्रदेशांत राहणाऱ्या समाजाचें राजकीय स्वरूप म्हणजे राज्य; त्याचें स्थूल स्वरूप सरकार व प्रजा असें द्विविध आहे. आपल्या क्षेत्रांत राज्य हे सर्वसत्ताधिकारी आहे. समाजाची सामुदायिक इच्छा कोणती, समाजाला काय पाहिजे तें ठरविण्याचा कायदेशीरदृष्ट्या अंतिम अधिकार या सत्तेचा आहे. समाजांतील अन्य संस्था व संकेत या संस्थेच्या तालावर चालतात. त्यांचें स्वरूपही हीच सत्ता स्थूलमानानें ठरविते. प्रत्यक्ष नियंत्रण व गर्भित परवानगी या मार्गानें व्यवहाराचा पट आंखला जातो. कमानींतील मधल्या दगडावर सर्व कमान आधारलेली असते. तो निसटला तर कमान दोन्हीं बाजूंनें ढासळते. लोकव्यवहारांत राज्यही इतकेंच महत्त्वाचें आहे. ही संस्था नसेल, समाजांत शासन नसेल, तर सर्व समाज कोलमडेल. अधिकारक्षेत्रांतील व्यक्तींच्या भाग्यरेषा ठरविण्याचें कार्य या सत्तेकडे आहे. सुखदुःखाची वांटणी करणारी, आयुष्याला वळण देणारी सर्वतोपरी अधिष्ठात्री देवता म्हणजे राज्य असें म्हणणें अयथार्थ नाहीं.

अधिकारक्षेत्रांतील व्यक्तींच्या आयुष्याचा चित्रपट राज्य हे जरी दिग्दर्शित करीत असलें तरी त्यावरसुद्धां सारखे संस्कार होत असतात. सनातन व निरपेक्ष असें त्याचें स्वरूप रहात नाहीं. समाजांत होणारे अर्थविषयक बदल, धार्मिक परिवर्तनें, भौगोलिक परिस्थितींतील बदल, हे सर्व ह्यावर परिणाम करतात व त्यायोगें त्याचें सूक्ष्म

स्वरूप बदललें. राज्याचें स्थूल स्वरूपही परिस्थितीप्रमाणें बदलत बदलत जातें. राजसत्ता, महाजनसत्ता, लोकसत्ता, याप्रमाणें निरनिराळ्या स्वरूपांत तें दिसून येतें. श्रीमंतांनीं त्याला ताब्यांत ठेवलेलें आहे व गरिबांनींही. कुळांतील वारसा म्हणून त्यावर कोणी हक्क गाजविला आहे तर कोणी प्रचलित धर्मप्रमुख म्हणून. तात्पर्य सूक्ष्म व स्थूल दोन्हीं दृष्टीनें, राज्य यांत फरक झालेला आहे व नित्य होत असतो. त्यांत सनातन गोष्ट एवढीच कीं, राज्यांतील बहुसंख्यांक लोक मूटभर लोकांशी निष्ठावंत असतात. इतिहासही हीच साक्ष देतो. सर्वांचें राज्य व अधिकार मात्र थोड्यांचा; हें कोडें वाटतें व अनेकांनीं अनेक तऱ्हेनें त्याचें उत्तर दिलें आहे. सरकारची म्हणजे राज्यांतील शासनयंत्र चालविणारांची आज्ञा लोक मानतात तें कां? या मान्यतेच्या आज्ञाधारकपणाच्या मुळाशीं काय भूमिका आहे याची मीमांसा तरी काय? शासनकर्ते व शासित यांच्यांतील मनोभूमिका अगर इच्छा यांत सामान्यतः विरोध नसतो, म्हणून ही मान्यता असते असें कांहीं म्हणतात. कांहींच्या मतें जनतेची संमति हाच राज्याचा पाया आहे, संमति म्हणजे बिनतक्रार सरकार जें करील ते मान्य करणें असा अर्थ असेल, तर त्यांतही थोडा अर्थ आहे. उलट हडसूनखडसून, समजूनउमजून ही समति दिलेली आहे व म्हणून राज्य चालतें असा व इतका अर्थ कोणी करील तर तेंही खरें नाहीं, इतिहासांत असें घडलें नाहीं. भीतीमुळें लोक मान्यता देतात हेंही मत यथार्थ नाहीं. एखाद्या विशिष्ट कायद्याचा भंग भीतीनें लोक करीत नाहीत हे जरी खरें असलें तरी राज्यास मिळणारी प्रजेची मान्यता भीतीवर आधारलेली नाहीं. फांशी जाण्याचें भीतीनें मनुष्य खून करणार नाहीं, पण आरोग्यविषयक व शिक्षणविषयक कायदे तो पाळतो ते कांहीं भीतीनें नव्हे. मुलास देवी टोंचून घेतो अगर शाळेंत धाडतो, यांत भीतीचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं; टोंचून घ्यावयाचें, शाळेंत धाडावयाचें ही सवयच झालेली असते. पिढ्यानपिढ्या ही गोष्ट इतकी परिचयाची झालेली असते कीं, तो लोकांचा स्वभावधर्म झालेला असतो. तथापि हा स्वभावधर्म तरी कां होतो हाही प्रश्न महत्त्वाचा आहे. तसेंच अनेक देशांत क्रान्त्या होऊन राज्यांत बदल झाले ते लोकांनीं हा स्वभावधर्म सोडला, विद्यमान सरकारला अवमानिलें, म्हणून झाले. मग निव्वळ स्वभावधर्म म्हणून लोक राज्य मानतात हेंही उत्तर पुरेसें नाहीं. राज्य मानण्यांत शासनयंत्राच्या आज्ञा मानण्यांत स्वहित आहे कल्याण आहे, हे जर निरपवाद खरें असतें तर अनेक देशांतील लोकांनीं बंडें केलीं नसतीं. तीं राज्यें राखिलीं असतीं, मोडलीं नसतीं. किंबहुना विरोध करणारें, बंड करणारें यांना प्रस्तुत राज्यांत विद्यमान शासनांत कल्याण होत नाहीं, त्यांचें हित साधत नाहीं म्हणूनच उठावाची प्रेरणा होत असते.

लोक राज्य कां मानतात सरकारी हुकूम कां पाळतात याची मीमांसा केवळ बुद्धिवादानें होणार नाहीं. मनुष्य प्रत्येक गोष्ट विचार करून करतो असें नाही. अनेक भावना मनुष्यस्वभावांत गुरफटलेल्या असतात. पदार्थांच्या गुणधर्माबद्दल निश्चितपणें सांगतां येतें. कोणत्या परिस्थितींत बदल होईल हेंही निश्चितपणें सांगतां येते. मीठ कुठेंही कुठल्याही काळीं खारटच लागेल. हा त्याचा गुणधर्म निश्चित आहे. मनुष्याबद्दल तो कुठल्या परिस्थितीत कोणत्या वेळीं कसे वागेल हें ठाम सांगणे कठिण; अनुमानें काढतां येतात पण त्यांत संपूर्ण शास्त्रीय निश्चिति कधींही असणार नाही. ज्या कारणाकरिता आज एक गोष्ट करील त्याच कारणाकरिता उद्यां त्याविरुद्ध वागेल. मनाचा आकार विचारानें घडविला तरी भावनेच्या प्रवाहानें तो पार बदलून जातो. मानवी मन हा एक विचित्र बनाव आहे. कोणत्या काळीं कोणत्या कारणासाठी मनुष्य राज्यसत्तेला मानतो हे पाहून या सगळ्या कारणांचा विचार करून मग त्याबाबत कांहीं निश्चित मीमांसा करणे शक्य आहे. इतके करूनसुद्धां ही मीमांसा निरपेक्षपणें खरी मानून कोणी अनुमान काढील तर तेंही चुकणार नाहीं असें नाहीं. प्रसंगानें एखादें कारण जास्त प्रभावी असेल, पण तेंच एकमेव कारण असूं शकणार नाही. मनुष्याचें मनोव्यापार इतके गुंतागुंतीचे असतात कीं, त्यांचा समन्वय त्याचेंच मन करूं जाणें. त्यांतच त्याचें व्यक्तिमत्त्व आहे. अनेक प्रेरणा त्याला होतात, त्यांना अनुसरून तो वागत असतो. कधीं एकान्ती ध्यानस्थ राहील, तर कधीं देवळांत जाऊन भजनमंडळींत सामील होईल. ब्रह्मचारी राहील, लग्न करून मुलांबाळांसुद्धां संसार करील. संपत्ति मिळवून दान करून टाकील, उलट कुणाला पैसुद्धां देणार, नाहीं, कवडी कवडीसाठीं भांडेल. स्वभावतः माणसाला कुतुहल असतें व कांहीं तरी उठाठेवी कराव्याशा वाटतात. बऱ्याच प्रसंगीं त्या योग्यहि असतात. मधुमक्षिकेप्रमाणें जेवढें उत्कृष्ट व चांगलें त्याचा संग्रह करील. उलट जेथें जाईल तेथें गांधीलमाशीप्रमाणें डंखही मारील. आपल्याजवळ आपलें म्हणून कांहीं असावें अशी संग्रहबुद्धी मनुष्यांत असते व जें समाजांत संग्राह्य समजले जाते त्याचा संग्रह करण्याचा तो प्रयत्न करील. मग त्या वस्तूंचें स्वरूप पैसा असो अगर पदार्थविषयक असो. समाज ज्याला मानतो तें तो संग्रहील, जन्मभूमींत वास्तू करून राहावेसें वाटेल. उलट अन्य ठिकाणीं जावें, पराक्रम करावा, नवीन कमाई करावी अशीही प्रेरणा त्याला होते. सर्व व्यवहार गुण्यागोविंदानें व्हावेत, अशांतता नसावी, असें त्याला वाटतें. त्याचबरोबर खळबळ करून उचापती करून कांहीं तरी करावें अशीही प्रेरणा त्याला उत्तेजित करीत असते. या सर्व प्रेरणा तो राहात असलेल्या सामाजिक वातावरणा-

मुळेंच त्याला होतात व हें वातावरण समाजांतील संस्थांमुळे व संकेतामुळें उत्पन्न झालेलें असतें. सत्ता गाजविणें व सत्ता मानणें, दोन्हीं वृत्ति त्यांच्यांत दिसून येतात. परिस्थितीवर ताबा मिळवून समाजांत निदान कांहीं भागावर तरी नेतृत्त्व मिळवावें, प्रभाव गाजवावा असें त्याला वाटतें. उलट संघटनेच्या शिस्तीत वागण्यांतही त्याला आनंद वाटतो. लौकिकाची हाव ही एक मोठी प्रेरणा असते, कार्याच्या सिद्धीपेक्षां त्याच्या बोलबाल्याकडे सामान्यतः त्याचें लक्ष जास्त असतें. प्रतिष्ठेसाठीं तो अनाटायी खर्च करील पण आवश्यक त्या ठिकाणीं करणार नाहीं. कर्ज काढून मेलेल्यांचें दिवस घालील पण जिवंत मुलांना शिक्षण देण्यासाठीं मात्र कांहीं करणार नाहीं. एवंगुणविशिष्ट मनुष्य असल्यामुळें त्याच्या मनाचें व्यापाराबद्दल निश्चित अनुमान काढणें अवघड आहे. राज्य कां मानतो, शासन कां मानतो यांचें उत्तर निरपेक्ष नाहीं व सोपेंही नाहीं.

मनुष्याचें मन विविध भावनांनीं व प्रेरणांनीं भरलेलें हें खरें. अनेक विरोध त्यांत असतात हेंहि खरें. म्हणून त्याच्या प्रेरणा काय राहतील हें तोच जाणें. असें आहे तरी कांहीं गोष्टी सर्वमान्य व सार्वत्रिक असणारच. कांहीं गरजा सर्वांना सामान्य असणार. अन्न, वस्त्र, निवास या गोष्टी मनुष्यमात्रांना अगदीं अवश्य आहेत. त्याचप्रमाणें संभोगप्रवृत्ति. किंबहुना एतद्विषयक गरजा म्हणजे त्याच्या किमान गरजा आहेत. समाज कुठल्याही स्थितींत असो या किमान गरजांत फरक पडणार नाहीं. अन्य गोष्टींबाबत समाजासमाजांत फरक राहील, कालाकालांत फरक राहील. समाजांतील संस्थांच्या अनुरोधानें अन्य बाबतीत बदल होतील. संस्थांत व संकेतांत बदल होतील. मनुष्याच्या प्रेरणा विविध स्वरूपी असतात, नाना विकार त्याच्या मनांत उत्पन्न होतात, त्यांचें सामुदायिक व समन्वित स्वरूप समाज धारणेंत दिसून येतें. विकाराबरोबर मनुष्याच्या ठिकाणीं थोडा विवेकही असतो, थोडा विचारही तो करतो, थोडें ' डोकें राखून 'ही काम करतो. आपण काय केलें याबद्दल तो विचार करील, साध्य व साधन यांची जुळणी करील व आपलें हित ज्यांत जास्त साधेल अशा तऱ्हेनें तो वर्तनक्रम ठेवणेंही शक्य आहे. व याबाबत कांहीं नियम, कांहीं प्रमाणही त्याच्या डोळ्यांपुढें तो ठेवील. हें सर्व मनुष्य विचारशील आहे म्हणून शक्य आहे. अन्य प्राण्यांत आणि मानवांत हाच फरक आहे. इतर प्राणी जी गोष्ट यदृच्छेनें करतात, ती गोष्ट मनुष्य विचार करून करूं शकतो. हें त्याचें विशिष्ट लक्षण असल्यामुळें सामाजिक हित साधणें शक्य आहे. मनुष्य समाजांत राहतो, त्याविना त्यास अस्तित्त्व नाहीं. अशा स्थितींत त्याला समाजांत राहावयाचें

झाल्यास, त्याच्या हितासाठी म्हणून जरी त्यानें कांहीं केलें तरी त्यांत कालांतरानें कां होईना इतरांचें हित साधण्याची शक्यता असेल तरच त्याला तें करतां येणे शक्य आहे. सर्व समाजाविरुद्ध सर्वकाळ राहून समाजांतील आपली जागा तो टिकवूं शकणार नाहीं. कुठे तरी त्याच्या वर्तनाला समाजहिताचा मुलामा तरी असला पाहिजे. समाजहित व त्याचे हित कुठे तरी जुळले पाहिजे. सामाजिक हित म्हणजे विविध माणसे विविध प्रेरणेने काम करतात व व्यक्तिशः हित साधतात त्यांत जेवढी एकता उत्पन्न होते ते होय. जर विरोध उत्पन्न झाला, संघर्ष झाला, प्रत्येकाचा हात दुसऱ्याच्या गळ्यावर पडला, कोणाचे हित कोणाशीही जुळेना, असे झाले तर ते सर्व कार्य समाजविरोधी व विध्वंसक होय. पण जेवढी या विविध व व्यक्तिगत हितांची जुळणी होईल व जी एकता, जे सामुदायिक स्वरूप त्यांतून उत्पन्न होईल, ते समाजाचे हित असे म्हणणे यथार्थ आहे. समाजांतील लाखो माणसे विविध प्रवृत्तींची असतांनासुद्धां हे घडवून आणावयाचे असते, किंबहुना ते घडून येण्याची प्रवृत्तीच त्यांत उत्पन्न झालेली असते. व्यक्तिगत प्रवृत्तींत व प्रेरणेत जेवढा सामाजिक भाव असतो त्यांचाच हा परिणाम होय. समाजात जन्मल्यानें, त्याचे परंपरा किंबहुना समाजाचे अनुवंशिक गुण व्यक्तींत थोड्या तरी प्रमाणांत येतात व ते समाजहिताची जुळवणूक करून घेण्यास बरेच कारणीभूत होतात. या समाजहिताचे स्वरूप अर्थात् देशकाल परिस्थिति व समाजाची परंपरा यावर अवलंबून राहील. जशी प्रगति होते, तशा कल्पना स्पष्ट होतात. सामाजिक हित कसे साधेल, कोणत्या रीतीने साधेल, याचे ज्ञानही अधिक वाढते व अधिक प्रभावी होते. व्यक्तीगत हितांची जुळणी करून सामाजिक हिताचा पाक तयार करावयाचा यांत दक्षता घेणे जरूर असते. व्यक्तीची व समाजाची निकड भागवून, नवीन उद्योग करण्यांत आशा आहे, अर्थ आहे ही श्रद्धा पण कायम राहिली पाहिजे. समाधान साधण्यांतच प्रगतिकारक व उद्योगप्रवण असंतोष राहील असे झाले पाहिजे. स्थिर समाज, चैतन्यरहित समाज, तयार करणे अगर कायम टेवणे, हे सामाजिक हित साधण्याचे ध्येय नाहीं; भूतकालीन परंपरा व भविष्यकालीन पराक्रम यांच्यांत सांगड घालून विद्यमान प्रयत्नांना चालना देण्याचे चैतन्य या सामाजिक हिताचे कल्पनेत असले पाहिजे. सामाजिक हिताची कल्पना निरपेक्ष नाहीं व सनातनही नाहीं. 'नित्य नूतन' आहे, चैतन्यगर्भ आहे. यामुळे चुका होणे शक्य आहे, प्रत्येक प्रसंग बिनचूक निभावून जाईल अगर त्याचे बिनचूक निदान होईल हे अशक्य; प्रगति म्हणजे प्रयोग. अंदाज करावयाचे, चुकावयाचे, आलेला अनुभव लक्षांत घेऊन पुन्हां पाऊल पुढे टाकावयाचे, यांतच प्रगतीचा इतिहास

आहे. भीतीने स्थीर रहाणे, नवीन गोष्टींना भिणें, यांत समाजाचा नाश आहे. बदलत्या जगांत हे चालणार नाहीं. बदल जर अपरिहार्य आहे तर प्रवाहपतित होऊन ढकलले जाण्यापेक्षां विचार करून पाऊल टाकण्यांत शहाणपणा व प्रतिष्ठा दोन्ही आहेत.

सामाजिक हित म्हणजे व्यक्तींच्या सहकार्याचें फळ. हें सहकार्य यदृच्छेनें घडून येण्याऐवजीं जाणीवेनें, योजनेने घडून आलें पाहिजे. समाजांतील दुःख व दारिद्र्य जाऊन सर्वसुखी झालें पाहिजेत असें नुसतें म्हणून थांबतां कामा नये. तें साध्य होण्यासाठीं योजनापूर्ण वर्तनक्रम आंखला पाहिजे. कठीण कार्य असलें तरी तें जरूर आहे. समाजांत सर्व सुखी होतील, सर्वांच्या गरजा भागल्या जातील अशीं साधनें, असे मार्ग, असें संघटन शोधून काढलें पाहिजे. व्यक्तिगत गरजा भागवितांना, समाजहित साधेल ही दृष्टि ठेवली पाहिजे. या निकषावर व्यक्तींच्या गरजा पारखून कायम केल्या पाहिजेत. व्यक्तीव्यक्तींची सुखदुःखें घेऊन हिशेब मांडूं लागलें तर अनर्थ होईल. व्यक्तीचें खरें हित व्यक्ति ही सामाजिक असल्यामुळे समाज हितां-तच साधले जाते; व्यक्तीच्या प्रेरणा विविध व विरोधी असतात पण त्यांच्यांत समन्वय होईल असा विवेक धरून आज आणि उद्यां अशा दोन्ही दृष्टीनें समाजहित नेटाने व निश्चयाने साधतां येते, व हे साधण्यांत विवेकाचा व बुद्धीचा मोठा भाग आहे. ज्या प्रमाणांत हे साधेल त्या प्रमाणांत व्यक्तीच्याही आयुष्यांतील निराशा व निष्फलता कमी होईल, व व्यक्तीमध्ये जे उत्कृष्ट व उत्कट ते विकसित होण्याला पूर्ण वाव मिळेल. समाजविरोधांत व्यक्तीचें धैर्य कसास लागेल कदाचित् सामर्थ्यही वाढेल पण व्यक्तीच्या पूर्ण विकासाला सामाजिक सहकार्याचीच पार्श्वभूमि योग्य आहे. समा-जाच्या व्यापक जीवनांत आपले स्थान आहे, समाजहितांत व्यक्तीला क्षणिक त्याग करावा लागला असे वाटेल, पण चिरकालीन लाभ समाजाला लाभला व त्यांत आपण हातभार लावला हे समाधान केलेल्या त्यागापेक्षां जास्त मौल्यवान् आहे. किंबहुना व्यक्ति व समाज यांच्यांतील संबंध कडी व कोयंड्याप्रमाणे आहेत. पृथकपणे अपूर्ण, समवायाने पूर्ण व सुरक्षित असे त्याचे स्वरूप आहे. व्यक्तीस पूर्णत्वाची ओढ असते म्हणून तिचा विकास समाजहिताचे वातावरणांतच होईल. समाजहित म्हणजे व्यक्तीचे व्यक्तीमत्त्व नियमित करणारी व विकास करणारी अशी दुहेरी शक्ति आहे.

वरील दृष्टि ठेवून विचार केला म्हणजे राज्यसंघटनेचा, शासनसंस्थेचा हेतु काय, साध्य काय असावे हे सहज ठरले जाते. आमजनतेला जास्तीत जास्त प्रमाणांत सामा-जिक हित साधतां येईल अशी ही संघटना होते. समाजांतील वर्तनक्रम जितका सुसं-

गत व समान करतां येईल तितका करणे हे तिचे कार्य होते. व्यक्तीच्या व्यक्तित्त्वाला किती मर्यादा घालवयाच्या, किती नियमन करावयाचे याचे क्षेत्र अनुभवाचे धोरणाने कमीजास्त ठरले जाईल, कांहीं क्षेत्र व्यक्तीच्या आयुष्यांतील इतके खाजगी स्वरूपाचे राहील की, तेथे शासनसंस्थेला प्रवेश करण्याचा अधिकार राहणार नाही सार्वजनिक ठिकाणी व्यक्तिव्यक्तींनी परस्परांशी कसे वागावे याबद्दल कांही नियमन होईल. पण मी घरी कोणाला चहाला बोलवावे, कोणती पदे मनाशी गुणगुणावी, कोणता धर्म माझ्या घरी मी पाळावा वगैरे बाबतीत राज्य ढवळाढवळ करणार नाही. सार्वजनिक शांततेचा भंग होईल, अन्य नागरिकांना उपसर्ग पोहचेल असे कांही, राज्य व्यक्तीला करून देणार नाही. धर्मात ढवळाढवळ करणे समाजहिताचे नाही, हे आधुनिक शासन जाणते. पण धार्मिक स्वातंत्र्याने सार्वजनिक शांतता व सुव्यवस्था याला बाध येणार नाही याची खबरदारी घेतली जाईल. सार्वजनिक उपयोगाच्या व सार्वजनिक आवश्यकतेच्या गोष्टी की, ज्यावर समाजाच्या सोयी व सुखें अवलंबून आहेत, त्यावर नियमन व नियंत्रण करण्याकडे आधुनिक राज्याची प्रवृत्ति वाढत आहे. विजेचे उत्पादन, वाहतुक, पाणीपुरवठा वगैरे बाबी सरकारी अगर सरकारी नियंत्रणाखाली सर्वत्र आलेल्या आहेत. कोणती पिके लावावीत, काय आयात करावी, कोणता माल निर्यात करावा हेही नियंत्रणक्षेत्रात आलेले आहे. तथापि कित्येक गोष्टींचे उत्पादन, खासगी व अनियंत्रित आहे. कपडे कोणत्या फॅशनचे असावेत, शृंगाराच्या वस्तू काय असाव्यात, खाण्याचे पदार्थ काय असावेत इत्यादिकांचे क्षेत्र उत्पादन व उपभोग दोन्ही बाबतीत, राज्यनियंत्रणापासून वाचले आहे. याचा अर्थ इतकाच की शासनतंत्राने, सरकारने, कायद्याने त्यांचे नियंत्रण केले नाही. पण समाजाची जी दुसरी शक्ति—नैतिक शक्ति, नैतिक संकेत—याचे नियंत्रण असते. पण हे नियंत्रण व शासनसंस्थेचे नियंत्रण यात फरक आहे, त्यांचा विचार पुढे होईल. शासनसंस्थेचा हस्तक्षेप व नियंत्रण कसे राहील, त्याचा व्याप किती राहील हे परिस्थितीप्रमाणे ठरले जाते. नदीच्या प्रवाहाचा वेग व विस्तार याचे स्वरूप पात्र व प्रदेश याचे स्वरूपाने निश्चित होत जाते.

एक गोष्ट निश्चित दिसते की, व्यक्तीचे संपूर्ण आयुष्य व सर्व व्यवहार सर्वतः राज्य आपल्या अधिकार क्षेत्रांत आणीत नाही. व्यक्तीच्या जीवनक्षेत्राच्या चतुःसीमा साधारणपणे ते निश्चित करते. या क्षेत्रांत काय लागवड असावी तदंगभूत वस्तूंचे काय करावे, काय व्यवस्था असावी हे व्यक्तिवर सोपविते. पण वस्तुतः तेथेही नियंत्रण असतेच. हे समाजाचे नियंत्रण व त्याचे स्वरूप नैतिक. समाज, जीवनाविषयी

जीवनाचे प्रत्येक पैलूविषयी परंपरा निर्मित असतो. त्या परंपरा व्यक्तीचे जीवनावर परिणाम करतात. कळत न कळत त्याचे नियंत्रण करीत असतात. रस्त्याने नागडे जाऊं नये हा शासनसंस्थेचा निर्बंध झाला. पण प्रेतयात्रेला उत्कृष्ट पोषाख करून जाऊं नये हा सामाजिक निर्बंध झाला व तो मोडला तर सरकार शिक्षा करणार नाही पण समाज तिरस्काराने पाहील. राज्य व समाज यांतील भेद महत्त्वाचा आहे. राज्याची कार्यपद्धति व चाल निराळी, समाजाची निराळी. राज्य, विद्यमान सरकारच्या विद्यमान शासनयंत्राच्यामार्फत कार्यप्रवण होते. राज्य याला आत्मा म्हटले तर प्रचलित शासनयंत्र अगर सरकार हा देह होय. या देहामार्फतच सर्व कर्मे होत असतात. जीर्ण देहाला जसा आत्मा टाकतो व नवीन घेतो, तोच कार्यक्रम राज्य अमलांत आणीत असते. लोकांना नको झाले म्हणजे लोक विद्यमान सरकार संपुष्टांत आणतात, नवीन स्थापतात; जुने वस्त्र टाकून नवे वस्त्र नव्या पसंतीचे घेतात, त्याप्रमाणे ही क्रिया होते. राज्य म्हणजे आम लोकांच्या इच्छेचे, आकांक्षाचे सामुदायिक स्वरूप, संघटीत स्वरूप. लक्षावधि लोक कांही प्रत्येक गोष्ट देशांत कशी व्हावी हे तपशीलवार सांगू शकत नाही इतकी पात्रताही त्यांच्यांत नसते, इतका उत्साहहि नसतो. काय असावे व काय व्हावे याचे सामान्य स्वरूप मोघमपणे फार तर ते सांगू शकतात. रोजगार पाहिजे, घरे पाहिजेत, शिक्षण पाहिजे हे त्यांनी सांगितलं तरी ह्या सर्व गोष्टी कशा, केव्हां कोणत्या क्रमाने घडवून आणावयाच्या हे कांही देशांतील सर्व नागरिक ठरवीत नाहीत. राज्याचे खरे मालक, खरे प्रभु कोणीही असो, व्यवहारांत हे प्रभुत्व, ही सत्ता कायदेशीरपणे जे कायदे करतात त्यांच्या हातीं आहे हे स्पष्ट आहे. राज्यातील सर्व नागरिकांनीं जमावयाचे व कायदे करावयाचे हे हल्लीचे जगांत अशक्य आहे. आधुनिक राज्य, विस्ताराने मोठे, कोट्यावधि नागरिक त्यांत असतात. शिवाय आधुनिक कालात कायदा तयार करणे ही कांही सामान्य क्रिया नाही. त्याचेही एक मोठे शास्त्र, एक मोठे तंत्र झाले आहे. कायदा म्हणजे व्यवहारनियंत्रण अगर नियमन. आधुनिक जगांतील व्यवहार अत्यंत गुंतागुंतीचे. त्यांचे प्रतिबिंब साहजिक कायद्यांत असणार. कायदे करणारे तज्ज्ञ असावेत व असतात हेही रास्त आहे. म्हणून हल्लीच्या जगांत जे कायदे करणारे, ज्यांच्या हातांत कायदे करण्याची सत्ता आहे, आजघडीला ज्यांच्या हातांत आहे, त्या थोड्या लोकांच्या हातांत राज्य हांकण्याचे, राज्याचे कार्य करण्याचे अधिकार असतात. त्यांचे हातांत चालू घडीला, खरी सत्ता, परिणाम करणारी सत्ता असते. त्यांचे हुकूम, त्यांच्या आज्ञा सर्व समाजावर, राज्यांतील सर्व नागरिकांवर बंधनकारक असतात. विश्वस्त व शासनकर्ते असे दोन्ही अधिकार त्यांच्यांत समा-

विष्ट झालेले असतात. जनतेच्या गरजा, आशा व आकांक्षा पाहून, तपासून परिणामकारक कायदे करून त्यांना प्रभावी करणे हे त्यांचे काम आहे. राज्यसंघटनेचा हेतु व कार्य या दोन्हींचे प्रतिबिंब हे थोडे लोक अगर विद्यमान सरकार होत. नुसते प्रतीकच नव्हे तर विद्यमान सरकार हे व्यवहारांत राज्याचे प्रत्यक्ष स्वरूपच होते.

राज्यसंघटनेचा हेतु व विद्यमान सरकार त्याला सफल करतांना देत असलेले स्वरूप यांत फरक राहतो. हेतु प्रत्यक्ष व्यवहारांत सरकारमार्फत कसे स्वरूप धारण करतो ही महत्त्वाची बाब आहे. जगांतील प्रत्येक सरकाचा हेतु उघडपणे चांगलाच असतो. मोगलांचा जुलूम, इंग्रजांचा साम्राज्य चालविण्याचा हेतु, हुकूमशहांचे जाहीर कार्यक्रम सर्व कांही दोषार्ह नाहीत, पण काय घडते हे पाहिले म्हणजे हेतु आणि कृति यामधील विरोध ठळकपणे दृष्टीस येतो. केवळ शासनसंस्थेने कायदा केला आहे म्हणून मानला पाहिजे ही दृष्टि निराळी. वस्तुतः राज्यघटनेचा हेतु ज्या प्रमाणांत प्रत्यक्ष साध्य झाला आहे त्या प्रमाणांत, शासनाबद्दल, राज्याबद्दल, निष्ठावंत राहणे, त्यांस मान्यता देणे हे योग्य आहे. ही राज्यनिष्ठा निरपेक्ष नाही. ही मान्यता फलविन्मुख नाही. निष्कामबुद्धीने निष्ठेचा कर्मयोग आचरणे हा खरा नागरिकधर्म नाही. यांत राजकीय आत्म्याचा नाश आहे. राज्य काय कार्य करते त्याचा नैतिक हेतु साध्य झाला की नाही हे ठरविण्याचे कार्य नागरिकांचे आहे. अपेक्षित आशा व मिळालेली सिद्धि यांतील फरकाची जाणीव जनतेचे जीवनांत वावरत असते. तिचेवर मर्यादेपलीकडे ताण बसला की, स्फोट अपरिहार्य होतो. साधारण जनता प्रत्यक्षाकडेच पाहते. सार्वजनिक आरोग्य सुधारण्यासाठी खर्च कुठे केला, कुठल्या वस्तीतील रस्ते रुंद झाले, शिक्षणासाठी झालेला खर्च कोणत्या वर्गाला उपयोगी पडला, रोजगार वाढविण्यासाठी आयात जकात बसविली, पण फायदा कोणाचा झाला, ही वस्तुस्थिति जनतेचे डोळ्यांपुढे असते. हेतु कितीहि शुद्ध असला, तत्त्वतः कितीहि निर्दोष असला, तरी व्यवहारांत त्याचे स्वरूप काय, तो कितपत साध्य होतो, सरकार किती प्रामाणिकपणे प्रयत्न करीत आहे यावर महत्त्व जास्त दिले जाते; कारण यावरच सरकार मानावयाचे की नाही हे अवलंबून असते. सरकारचे स्थूल व सूक्ष्म असे दोन भाग लो. टिळकांनी कल्पिले होते. स्थूल सरकार म्हणजे विद्यमान सरकार. सूक्ष्म सरकार म्हणजे राज्य. ब्रह्म व माया याप्रमाणे राज्य व स्थूल सरकार यांचा संबंध असतो. माया बदलते नानारूपे धारण करते. ब्रह्म निर्विकल्प निराकार राहते. या दृष्टीने विचार करतां सत्ता ही निर्विकल्प आहे, तटस्थ आहे, ती काय करते, हें महत्त्वाचे आहे. कार्यावरून तिला स्वरूप प्राप्त

होते. करीत असलेल्या कर्मावरून तिची जात ठरते. संस्कारानें तिचा वर्ण निश्चित होतो. ऐनजिनसी ती ब्रह्मप्रमाणें तटस्थ आहे, निर्विकार आहे. व्यक्तींची निष्ठा ध्येयाला आहे, त्या मौलिक हेतूवर आहे. तें साध्य करणारी सत्ता तत्त्वतः तटस्थ असली तरी तिचें जसें स्वरूप व कार्य दिसेल त्यावर व्यक्तीची निष्ठा अवलंबून राहील. केवळ ती सत्ता विद्यमान सरकाराच्या हातीं आहे म्हणून तिला लोक मानणार नाहींत. केवळ ती सत्ता कायदेशीरपणें प्रस्तुत सरकारकडे आहे म्हणूनही ती मानणार नाहींत. मान्यता नैतिकदृष्ट्या इष्ट असली पाहिजे.

राज्य कशासाठीं आहे, यापेक्षां ते काय करीत आहे ही गोष्ट प्रत्येक व्यक्तीला साहजिक अधिक महत्त्वाची वाटते. प्रत्येक व्यक्तीचें महत्त्व सामाजिकदृष्ट्या कमी-जास्त असूं शकेल, तथापि यच्चयावत् व्यक्तींना राज्य काय करते, शासनकार्य त्यांच्या जीवनावर काय परिणाम करते हें पाहण्याचा सारखा अधिकार आहे असें म्हटलें म्हणजे त्या राज्याचें सूक्ष्म स्वरूप लोकसत्तात्मक अगर लोकशाही राहील हें उघड आहे. याचा अर्थ राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीला राज्यकार्याच्या बाबतींत आलेल्या अनु-भवानुसार वागतां येते. कोणीहि एखादी व्यक्ति अगर थोड्या व्यक्ति आपला अनु-भव तेवढाच प्रस्तुत व प्रभावी मानून राज्यकार्य निश्चित करणार नाहींत. एका व्यक्तीस अगर थोड्या व्यक्तींस हा अधिकार दिल्यास अगर असल्यास स्वतःचें हित म्हणजे समाजाचें हित, सार्वजनिक हित असें मानण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. देशांतील सर्व प्रौढ नागरिकांना राज्य काय करतें हें पाहून वागण्याचा अधिकार आहे; कारण राज्य आपल्या उलाढालीनें सर्वांच्या जीवनावर परिणाम करीत असतें. सर्वांचे हितसंबंध ज्यांत गुंतले आहेत त्या घडामोडी करणाऱ्या संघटनेकडे म्हणजे राज्याकडे चिकि-त्सक दृष्टीनें पाहण्याचा अधिकार असणें अगदीं साहजिक आहे, जरूर आहे. राज्य-कार्य कसें चालावें हें सांगण्याची सत्ता सर्वांना पाहिजे. जेव्हां व जेथें ही सत्ता थोड्या लोकांच्या हातीं राहिली, विशिष्ट वर्गाच्या हातीं राहिली, तेव्हां व तेथें तिचा उपयोग स्वार्थी दृष्टीनेंच झालेला आहे असा अनुभव आहे. ज्यांनीं ही सत्ता गमाविली अगर ज्यांच्या पदरीं पडली नाहीं, त्यांना राज्यापासून होणाऱ्या फायद्यांना मुकावें लागलें. सत्ता हेंच सुखाचे साधन आहे. अधिकार ही सुखाच्या दृष्टीनें उत्पादक व संरक्षक अशी दुहेरी शक्ति आहे. हा अधिकार समाजांत थोड्यांना देणें म्हणजे जे बहुसंख्य नागावले गेले, ज्यांना हा अधिकार मिळाला नाहीं, अगर मिळूं दिला नाहीं, त्यांना राज्याविरुद्ध उठाव करण्यास आमंत्रण देण्यासारखेंच आहे. थोड्याचें समाधान हें सर्वांचे समाधान कोठल्याही गणितानें होत नाहीं. सर्वांना सारखें समाधान पाहिजे

असें कोणी म्हणणार नाहीं. पण सर्वांना एक किमान प्रमाणांत समाधान मिळेल, सुख मिळेल अशी व्यवस्था असली पाहिजे हें म्हणणें अगदीं रास्त आहे. अशी व्यवस्था सर्वजण अधिकारांत भागीदार असतील, सत्तेपासून कोणालाही बाजूस टाकले नसेल तरच शक्य आहे. व्यक्तीला त्याच्या हिताच्या संरक्षणार्थ ही सामाजिक सत्ता, हा अधिकार अवश्य आहे.

राज्यकार्य कसें चालें यांत सर्वांचें लक्ष व संबंध असल्यामुळें, त्यांत साहजिकच जबाबदारी उत्पन्न होते. राज्याला असलेली सत्ता निरपवाद नाहीं, निरपेक्ष नाहीं. सत्ता आहे पण त्याबरोबर तिच्या मर्यादाहि आहेत. संरक्षणासाठीं तलवार आहे, कर्तव्यें पार पाडण्यासाठीं म्हणून सत्ता आहे. व्यक्तींना आपला विकास करतां यावा म्हणून राज्य. निदान व्यक्तीला विकास करतां येईल, प्रगति करण्याला वाव आहे अशी तरी परिस्थिति तेथें असली पाहिजे. कागदोपत्रीं राज्य काय स्वरूपी आहे हा प्रश्न नाहीं; व्यवहारांत तें व्यक्तींना कसें वाटतें हा मुख्य प्रश्न आहे. अपेक्षित गोष्टी साध्य करण्याला त्यांत पुरी संधि आहे कां ? हा मुख्य प्रश्न आहे. ही एक कसोटी आहे. सामुदायिक जीवन सुखी व्हावें, संपन्न व्हावें एतदर्थ व्यक्तींना होणाऱ्या प्रेरणांना योग्य वाव मिळावा या हेतूनें शासनाची कार्यप्रणाली असते. प्रत्यक्ष प्रत्येक व्यक्तीला जीवनांतील उत्कृष्ट व भव्य अनुभवावयास शासन अगर राज्य लावतें असें नाहीं. उलट या दृष्टीनें तें कांहींच प्रयत्न अगर परिणाम करीत नाहीं हेंही मानणें चुकीचें आहे, नव्हे धोक्याचें आहे. सार्वजनिक आरोग्याबाबत नियम करून, शारीरिक शिक्षणाबाबत नियम करून, पद्धतशीरपणें जनतेचें आरोग्य व शरीरसंपदा, शासन वाढवूं शकतें. सार्वत्रिक शिक्षण देऊन उत्तम नागरिक तयार करणें हें एक कर्तव्यहि तें मानील व व्यक्तींना 'मुकी बिचारी कुणी हांका' असें प्राणी न ठेवतां, दक्ष, सुशिक्षित, शीलवान् असें नागरिक तयार करून व्यक्तीच्या जीवनांत व सामाजिक जीवनांत आनंद व उच्च वातावरण निर्माण करील. यांत समभागी होणें कीं नाहीं, हें व्यक्ति पाहील; पण सर्वथैव अनुकूल अशी परिस्थिति मात्र उत्पन्न करण्याचे सामर्थ्य राज्यांत आहे, शासनांत आहे. केवळ राज्याचे आदेश अगर निर्णय म्हणून ते योग्य, हें मानणें चूक. अशी स्वयंभू सात्त्विकता त्यांत नाहीं. ज्या कारणाकरितां सत्ता राज्याच्या हातीं आहे तीं कारणें लक्षांत घेऊन त्याचे आदेश तपासले पाहिजेत, त्याचे निर्णय निरिक्षिले पाहिजेत. त्याचे कार्यप्रणालीनें जें घडलें असेल, जें साध्य झालें असेल, तोच त्याचा खरा हेतु मानला पाहिजे. विनायक करण्याचा हेतु असेल, पण जर वानरच प्रत्यक्ष झालेला असेल अगर तत्सम आकाराचा कोणी प्राणि झाला

असेल तर, तोच करण्याचा खरा हेतु आहे असेंच मानलें पाहिजे. व्यक्तीचे हेतु व कार्य यांच्यांतील विरोध ज्या दृष्टीनें पाहतो व शुद्ध हेतु असेल तर कृत्यांतील अप्रियता, अपूर्तता किंचित् क्षम्य मानतो, उदार दृष्टीनें त्याचा विचार करतों; त्या दृष्टीनें राज्याचे हेतु व कृत्य यांच्यांतील विरोधाकडे पाहणें योग्य होणार नाहीं. कृत्याच्या स्वरूपावरूनच त्याचा हेतु हेरला पाहिजे. कृत्यावरून, कार्यावरून जो हेतु स्पष्ट होत असेल तोच खरा मानला पाहिजे. शांततारक्षणाचा हेतु असला पण प्रत्यक्ष कार्यप्रणालीनें, नागरिक स्वातंत्र्य नष्ट झालें तर तेंच नष्ट करण्याचा हेतु आहे, असे मानणें चूक नाहीं.

कार्यप्रणालीवरून राज्याचे हेतु ठरविले पाहिजेत असें म्हटल्यानंतर राज्य याच्या नक्की मर्यादा काय आहेत हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. देशांत असलेल्या सामाजिक व राजकीय संस्था म्हणजे राज्य असें मानणें चूक होईल. राज्य निराळें व विद्यमान सरकार निराळें हा महत्त्वाचा भेद आहे. तथापि दैनंदिन कारभार चालविणारे अधिकारी यांना सोडून राज्याच्या कार्याचा विचार करतां येणार नाहीं. राज्याची मीमांसा करावयाची म्हणजे राज्य-करणाऱ्या सरकारची मीमांसा करावयाची. म्हणजे तें सरकार कोण चालवितें त्या वर्गाची मीमांसा करावयाची. सरकारचें कार्य अगर कृत्य राज्य या संस्थेचें कार्य अगर कृत्य ठरतें. दोन्हीं सूक्ष्म दृष्टीनें पृथक असून स्थूल दृष्टीनें एकच दिसतात. म्हणून सरकारवर परिणाम करणाऱ्या सर्व गोष्टींचा विचार केला पाहिजे. सरकार देशांतील बहुसंख्यांक लोकांच्या इच्छेचें प्रतीकही असूं शकेल. परंतु सर्व समाजाचें सर्वदृष्ट्या तें प्रतीक आहे हें मानणें बरोबर ठरणार नाहीं. अनेकविध व्यापार व अनेक विरोधांनीं भरलेला समाज याचा यथार्थ रीतीनें कोणी एक व्यक्ति अगर वर्ग प्रतिनिधि होऊ शकेल हें कठीण आहे. अनेक स्वरूपी व अनेक छटा असलेली समाजाची संस्कृति एकजिनसी असणार नाहीं. म्हणून राज्य एकमेव प्रतिनिधि, निरपवाद प्रतिनिधि संस्कृतीचें अगर सामुदायिक इच्छेचें होऊं शकत नाहीं. सामुदायिक इच्छेचें एक स्वरूप, एक भाग व आवश्यक भाग इतकें म्हणतां येईल. शरिरांतील अस्थि हा महत्त्वाचा भाग पण तो म्हणजे सचेतन शरीर नव्हे. राज्य हेंहि समाजाचा, त्याच्या इच्छेचा महत्त्वाचा भाग आहे, आवश्यक भाग आहे. पण ते म्हणजे सर्व समाजजीवन हें समीकरण चूक आहे. राज्य म्हणजे समाज इतकें सर्वग्राही स्वरूप अलीकडील कांहीं राज्यपद्धतींत त्याला देण्याचें प्रयत्न चालू आहेत. तथापि तेथेंही ही गोष्ट निरपवादपणें घडून येत आहे असें दिसत नाहीं. राज्याच्या भौगोलिक मर्यादा न जुमानतां समाजांतील कांहीं व्यक्ती

कांहीं बाबतींत वर्तनक्रम ठेवण्याचा अधिकार सांगतात. हिंदी मुसलमान खिलाफतीला निष्ठा दाखवत. धर्म व राष्ट्र यांच्यावरील निष्ठेंत स्पर्धा अगर विरोध उत्पन्न झाल्यास धर्मास जवळ करणारे अनेक गट आहेत. पोपवर निष्ठा ठेवणारे अनेक कॅथॉलिक जगभर पसरलेले आहेत. कॅथॉलिक धर्माच्या मतें धर्मनिष्ठा व राजनिष्ठा यांत विरोध उत्पन्न झाल्यास धर्मनिष्ठा ही श्रेष्ठ. आधुनिक जगांत कांहीं धर्म आंतरराष्ट्रीय असले तरी त्यांचे अनुयायी जेथील नागरिक असतील त्या राज्यसत्तेस मानतात. धर्मसंघटना व राज्यसंघटना ही आतां एक नाहींत. यामुळें अनेक अनुयायांना राज्यसंघटनेस प्रसंगीं नाइलाजानें मान्यता द्यावी लागते. याचा अर्थ राज्य या संघटनेस सर्वतोपरी सर्वशः निष्ठा मागण्याचा नैतिक हक्क आहे असें नव्हे. धार्मिकदृष्ट्या विरोध असूनही राष्ट्रीयदृष्ट्या ते राजसत्तेला विरोध करीत नाहीत. संमति देतात असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. सामान्यतः राज्याबाबत जी कल्पना असेल ती व्यवहारांत खरी ठरेल हाच विश्वास नागरिकांचे निष्ठेच्या मुळाशीं असतो; तथापि अनेक महत्त्वाचे बाबतींत या विश्वासाला धक्काही बसतो.

वर लिहिल्याप्रमाणें राज्य हें समाजांतील सर्व व्यक्तींचें सर्वशः प्रतिनिधि नसलें तरी राज्य करणाऱ्या सरकारच्या इच्छेचें तें प्रतीक असतें व त्या सरकारच्या आज्ञा नागरिक वर्ग पाळतो. या परिस्थितींत आज्ञा पाळणें हें प्रत्येक नागरिकाचें नैतिक कर्तव्य आहे असें म्हणणें बरोबर नाहीं. राज्य म्हणजे विद्यमान सरकार असें व्यवहारांत आढळून येतें; म्हणून व्यवहारांत तें कसें वागतें, त्याचा अनुभव काय येतो, हें प्रत्येकानें मनाशीं ठरवून निष्ठेला नैतिक भावाची जोड द्यावयाची कीं नाहीं हें ठरवावयाचें असतें. सरकारची प्रतिष्ठा मोठी कारण राज्याच्या सिंहासनावर तें विराजमान झालेलें असतें. पण प्रासादशिखरावर बसल्यानें गरुडपद प्राप्त होत नाहीं. देवाचा प्रसाद म्हणून दिलेला जिन्नस कोणी टाकणार नाहीं, पण तो रुचकर असेल तर प्रत्येक भक्त आवडीनें खाईल. शासनाच्या आज्ञा न पटून नागरिक मोडणार नाहीं, पण पटल्यावर त्याच्या वर्तनांतील निष्ठा हीच खरी प्रभावी व चैतन्यगर्भ असते. ज्या मानानें व्यक्तींची मान्यता मनापासून, त्या मानानें व्यक्ति व राज्य यांचे संबंध निकट व त्या मानानें प्रतिनिधित्व यथार्थ. राज्यासंबंधींचीं कर्तव्यें सारासारविचार करून व्यक्तींनीं मानलीं तरच तीं खरीं होत. मान्यता सक्तीवर आधारलेली असेल तर ती फसवी व क्षणभंगूर. मान्यतेंत स्वहित आहे हें व्यक्तीनें विचार करून तिला पटलें पाहिजे. विचारच व्यक्तीनें करावयाचा नाहीं, असा विचार करणे म्हणजे गुन्हा असे जेथे घडले, तेथे व्यक्ति हे सुबुद्ध, कर्तृत्ववान् नागरिक न राहतां

व्यक्तित्व गमावलेले, उदास व निर्जीव अशीं 'मुकी बिचारी हांका,' अशी माणसे होतील. कार्यक्षम, प्रभावी व प्रगतिपर राज्यावर यापेक्षां मोठी आपत्ति नाहीं. व्यक्ति हा राज्यसंघटनेचा एक भाग; याचा अर्थ त्या संघटनेंत तो संपूर्णपणें समरस झाला पाहिजे असा नव्हे. त्यानें विलीन होऊन व्यक्तित्व गमवावें ही विचारसरणी चूक आहे. समाजसंघटनेंत राहून समाजावर, समाजाच्या कार्यावर अभिप्राय देण्याचा त्याला पूर्ण वाव असला पाहिजे. विचारशील नागरिक हाच खरा प्रभावी व प्रागतिक समाजसंघटनेचा व राज्यसंघटनेचा आत्मा आहे. याला अवमानून चालणार नाहीं.

येथपर्यंत निरीक्षिलेली राज्यासंबंधींची विचारसरणी अगदीं व्यवहारांतील व वास्तविक अशी आहे. तथापि राज्यासंबंधींचीं अनेक तत्त्वज्ञानें आहेत. अनेक तऱ्हेनें त्याची मीमांसा पूर्वी लावलेली आहे. राज्य व समाज हे संपूर्णपणें एक अशीही विचारसरणी पूर्वी होती. तिचें स्वरूप असें:—राज्य हें समाजांतील सर्व व्यक्तींच्या बुद्धींचें सामुदायिक स्वरूप म्हणून ही सामुदायिक—बुद्धि ( Social Will ) व व्यक्तीची बुद्धि यांत फरक नाहींच. व्यक्तीला आपण केवळ सामाजिक आहोंत या गोष्टीचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे त्याची बुद्धि सामुदायिक बुद्धीशीं विरोधी असणारच नाहीं. मनुष्यानें योग्य कोणतें अयोग्य कोणतें व त्यापासून होणारे परिणाम लक्षांत घेतले व विचार केला म्हणजे तो योग्य तेंच करील हें उघड आहे. याप्रमाणें त्यानें वर्तन केलें म्हणजे त्याच्या खऱ्या बुद्धीप्रमाणें वर्तन झालें. ही मौलिक बुद्धि प्रत्येक व्यक्तींत असते व ती सामुदायिक बुद्धीचा एक भाग असते. किंबहुना ह्या सामुदायिक बुद्धीचें श्रेष्ठ स्वरूप म्हणजेच राज्य. व्यक्तींनीं क्षणिक दृष्टि सोडली, कोता विचार बाजूला सारला, अविचार अलग केला, व जें सर्व दृष्टीनें योग्य व विवेकपूर्ण आहे असेंच करण्याची इच्छा धरली म्हणजे त्याचा जो सामुदायिक परिणाम होईल, जें श्रेष्ठ स्वरूप त्याला प्राप्त होईल तें राज्याचें स्वरूप होय. व थोडक्यांत राज्य म्हणजे एक उत्कृष्ट ध्येयाचें प्रतिक अगर निवासस्थान. व्यक्ति चुकत चुकत अनुभवानें शहाणें होत होत, शेवटीं त्या ध्येयाशीं समरस होतात व त्यानेच त्यांना पूर्णत्व प्राप्त होते. म्हणजे एका अर्थानें राज्य म्हणजे व्यक्तीचें श्रेष्ठ स्वरूप; व्यक्तींच्या जीवनाचा तें एक भागच होय. या रीतीनें व्यक्ति व राज्य हें एकच मानल्यानंतर राजाज्ञा, शासनाच्या आज्ञा मानणें, त्यास मान्यता देणें हा प्रश्न अगदीं सोपा होतो. राज्य म्हणजे आपणच म्हणून त्याच्या आज्ञा मानावयाच्या म्हणजे आपले आपणच मानावयाचें. आपली इच्छा व राज्येच्छा यांत शोधान्तीं फरक नाहींच; कारण राज्य व आपण याचा सामाजिक संबंधच तत्त्वतः आपण असा मानला आहे कीं, त्यांत

एकताच आहे. सर्व दृष्टींनें विचार करून जे आपण केलें असतें तेंच राज्य करीत आहे मग विरोध कसा असणार? आपल्याच आज्ञेचा आपणच भंग कसा करणार!! व जें मानणार तेंही चांगलेंच आहे म्हणून मानणार. राजाज्ञा चुकीची कशी असेल! सर्वांच्या विवेकांचें स्वरूप म्हणजे राज्य तेव्हां त्यांत चुकीला वावच नाहीं ! राज्य हें निर्दोष व परिपूर्ण आहे. व्यक्तीचें ज्ञान अपूर्ण, दृष्टि मर्यादित, अनुभव अपुरा म्हणून हे सर्व दोष परिहार व्हावेत म्हणून व्यक्तीनें या राज्याच्या सामुदायिक स्वरूपांत विलीन व्हावे, त्याला विरोध न करतां समुद्रांत बिंदु या न्यायानें समरस व्हावे. या बंधनांतच मोक्षाचा अनुभव घ्यावा. सक्ति होत असली तरी ती आपली आपणच करीत आहोंत या भावनेनें व्यक्तीनें वागलें पाहिजे. या मर्यादेंतच स्वातंत्र्य आहे किंबहुना स्वातंत्र्य म्हणजे या मर्यादा अखंड पाळणें असा निष्कर्ष या विचारसरणींतून निघतो.

आपलें आपणच ऐकतों, यांत सेव्यसेवक भाव नाहीं; राज्य म्हणजे आपणच हा दृष्टिकोन खरोखरच चांगला पण वस्तुस्थिति तशी नसते. व्यक्ति व समाज अगर राज्य यांत विचारान्तीं तत्त्वतः विरोध नाहीं. व्यक्तीची इच्छा, तिचेंच श्रेष्ठ स्वरूप म्हणजे राज्य असें म्हणून जर त्याची इच्छा, त्याची विचारशक्ति जागृत व कार्यकारी राहत असेल तर ठीक. परंतु या विचारसरणींत व्यक्तीला विचार करण्याचें कारणच नाहीं असाच सिद्धांत निघतो. राज्य जें आहे व जें करतें तें श्रेष्ठ असें एकदां म्हटल्यानंतर त्याबद्दल विचार करण्याची आवश्यकताच नाहीं असें वाटणें साहजिक आहे; यामुळे व्यक्तीची बुद्धि व इच्छा निर्जीव होतात. वास्तविक राज्य म्हणजे व्यक्तींच्या अनेकविध बुद्धींचे व इच्छांचे समन्वित स्वरूप व त्यांतील चैतन्य जर व्यक्तींत चैतन्य असेल तरच राहणार. त्यांत चैतन्य हवें असेल तर त्याचा पुरवठा व्यक्तींकडूनच झाला पाहिजे. एकदां राज्य निर्माण झालें म्हणजे व्यक्तीचें कार्य संपलें. जें एकदां त्याचें स्वरूप झालें तें सनातन झालें असें मानलें तर आपत्तीच उभी राहील. समाज अगर राज्य ही एक अशी संघटना आहे कीं, प्रत्येक भागाकडून जीवन घेऊन प्रत्येक भागाला तें देत असतें. एका स्वरूपांत येते व दुसऱ्या स्वरूपांत देते; ही क्रिया अखंड चालते. या क्रियेंत जेवढा विवेक, जेवढें चैतन्य असेल त्यावर प्रगति अवलंबून राहणार हें उघड आहे. व्यक्तींच्या इच्छेचा, अनुभवाचा, बुद्धीचा कच्चा माल घेऊन हें संघटन सर्वोपयोगीं असें पक्कें उत्पादन आपल्या कार्यप्रणालीनें करीत असते. ताणा व बाणा घेऊन महावस्त्र सर्व समाजासाठीं तयार होत असते. त्याचा टिकाऊपणा, त्याचें सौंदर्य, त्याचा आकार ह्या सर्व गोष्टी ज्यापासून तें तयार

होतें त्यावरच अवलंबून आहेत. काथ्या विणून शाल तयार होत नाहीं. म्हणून राज्याचें श्रेष्ठत्व व कर्तृत्व व्यक्तींवर आधारलेले आहे. व्यक्तीनें आपला अनुभव, आपल्यांतील जे उत्कृष्ट आहे त्याची अंजली या संघटनेंत दिली पाहिजे. तिचा अनुभव व तिचे उन्नत विचार हें तिनेंच कमवावयाचें असतात. समाजापासून व्यक्ति भिन्न व अभिन्न दोन्हीहि खरे. व्यक्ति मिळालेल्या अनुभवानें विचार करूं लागते. ही तिची वैयक्तिक बाब पण यांतच तिची विधायक शक्ति असते. व्यक्ती-परत्वें अनुभव निराळा व तें जाणण्याचीं साधनें पण निराळीं. व्यक्तीची विचारसृष्टि ही केवळ तिच्याच मालकीची. तिच्या मनांत काय विचार येतील व कसे येतील याची जाणीव फक्त तिलाच. इतरापासून अलिप्त व आत्मनिष्ठ झाली म्हणजे समाज-जीवनांत, राज्यसंघटनेंत जें तिच्याजवळ उत्कृष्ट असेल, जें चांगलें असेल तें ती देऊं शकेल. या अर्थानें व्यक्तीचें स्वराज्य सामाजिक सुराज्याचा पाया आहे.

सामाजिक जीवन व व्यक्तीचें जीवन यांत विरोध नसावा म्हणजे तें सर्वशः एकच असावें असें मात्र नाहीं. भिंत सारख्या आकाराच्या विटांची जरी असली तरी ती पक्की व्हावी, तीची बांधणी मजबूत व्हावी, सुंदरही व्हावी म्हणून मधून मधून कांहीं विटा उभ्या तर कांहीं आडव्या लावून सांधमोड करण्यांत येते. मग समाजरचनेंतसुद्धां थोडें वैचित्र्य, थोडी विविधता कां नसावी ? साच्याप्रमाणें शिक्के-वजा सर्व लोक झालें तर, नाविन्य कुणी सुरू करावयाचें ? विद्यमानाशीं, जें आहे त्याच्याशीं प्रगतीच्या दृष्टीनें कोणी संघर्ष उत्पन्न करावयाचा ? आहे हें उत्कृष्ट म्हटलें म्हणजे चिकित्सावृत्ति गेली. आहे यापेक्षां कांहीं जास्त चांगलें असावें या वाटण्यांत प्रगतीचीं बीजे आहेत. या वाटण्याला वाव मिळाला पाहिजे. वाटण्याच्या तऱ्हा, या प्रेरणा व्यक्तिपरत्वे भिन्न असणारच; आणि तेवढ्यापुरते स्वातंत्र्य व्यक्तींना पाहिजे. या विविध प्रेरणांपासून समन्वित, सामुदायिक अशी जी घटना होईल तींत सर्वांकडून जे जे चांगले असेल ते साहजिकच येणे शक्य आहे. जे आहे, जे विद्य-मान राज्यसंघटन आहे ते उत्कृष्ट व व्यक्तींनीं विचार करूनच जे ठरविले असते तेच हे व त्याचेच उत्कृष्ट स्वरूप असे म्हटले म्हणजे, प्रत्येक व्यक्ति विवेकी व तिचे साध्य व साधने दोन्हीं अगदीं समाजहिताशीं जुळून असतात, असे मानावे लागते. असे न मानले तर कांहीं व्यक्ति कनिष्ठ, समाजहितविरोधी मानाव्या लागतात, व त्यामुळे राज्यसंघटनेचे स्वरूपही तितके उत्कृष्ट, तितके श्रेष्ठ रहात नाहीं, ते निर्दोष रहात नाहीं. त्यांत अपूर्णता येते. आहे व असावे यांत भेद उत्पन्न होतो. असावे तेच आहे असे ही विचारसरणी मानते; व त्यांत व्यक्ति निर्दोष मानाव्या लागतात.

प्रत्यक्ष पाहतां व्यक्ति अशा नाहींत. व्यक्तीचें मनसुद्धां अनेक गोष्टींचा परिणाम असते. त्यांत कांहीं चांगल्या, कांहीं वाईट असतात. रागलोभादिक विकार व्यक्तींत असतात. तिच्या वर्तनांत अनेक प्रकार दिसतात. कारण नसतांनासुद्धां तो रागावतो कधीं अकारण विषण्ण होतो, कधीं आनंदित होतो. मनुष्य एवंगुणविशिष्ट असून तो समाजांत वावरत असतो. तो जुळवून घेत असतो. मनुष्य अगर व्यक्ति निर्दोषही नाहीं व सर्व व्यक्ति सारख्याही नाहींत. किंबहुना त्यांच्यांतील विविधत्व, वैचित्र्य हे गृहीत धरूनच समाजरचनाविषयक तत्त्वज्ञानाला सुरुवात करावी लागते. सर्वच सारखे असले तर संघटनेचा प्रश्न सोपा होतो; सर्वच सारखे आहेत व सारखेच राहतील त्यांच्या इच्छा सर्वशः सारख्या राहतील, असे असेल तर संघटनेच्यासाठीं कौशल्याची, विचारांची जरूरच नाहीं. या परिस्थितींतील व्यक्तीचे संबंध अगदी रेखीव व सनातन, सर्व कांहीं यंत्राप्रमाणे चालेल. व भौतिक शास्त्रांतील कार्यकारण भावांत जेवढी निश्चितता असते तेवढी राहील. अमुक द्रव्यें एके ठिकाणीं आली म्हणजे अमुक पदार्थ तयार होईल हे निश्चितपणे जसे सांगता येत तसे समाजाच्या घडामोडींबाबत सांगता येईल. पण प्रत्यक्ष अनुभव उलट आहे. समाजविषयक घडामोडींबाबत काढलेली अनुमानें निश्चितपणे काढतां येत नाहींत. प्रयोग शाळेंत शास्त्रज्ञानें चूक केली तर त्याचा हात भाजेल, स्फोट झाला तर तो मरेल अगर जखमी होईल. उलट सामाजिक घडामोडींत चुकीचे धोरण ठरल्यास लाखो मरतील, उपाशी राहतील; धोरणाचे परिणाम व्यापक व दूरवरचे; व निश्चितपणें काय होईल हे तज्ज्ञसुद्धां सांगू शकत नाहीं आणि या सर्वांचें कारण जीवनांतल्या प्रयोगशाळेंतील समाजांतील द्रव्यें—व्यक्ति सारख्या नाहींत. सारख्या राहत नाहींत. सारखे परिणाम त्यांच्या मनावर समान परिस्थितीतसुद्धां होतीलच असें नाहीं. दगड, लांकूड याना एकदां आकार दिला म्हणजे टिकतो. मानवी मन आज एक दिसते; उद्यां कसें होईल, दुसऱ्या क्षणाला कसे होईल हें निश्चितपणें कोणी सांगू शकत नाहीं. ज्यास्तींत ज्यास्त येवढें म्हणतां येईल कीं, कांहीं आशा, कांहीं आकांक्षा, कांहीं इच्छा सर्वांनाच उत्पन्न होतात. वैचित्र्य असून, व्यक्ती ही सामाजिक असल्यामुळें कांहीं गोष्टींत सारखेपणा असतो. कांहीं परिस्थितींत, सर्वांच्यावर सारखा परिणामहि होतो. असें असलें तरी प्रत्यक्ष सृष्टींत त्यांच्या इच्छा एक असें म्हणणें चूक आहे. व्यक्तीगत इच्छा पृथक पण जें इच्छीलें त्याचें स्वरूप मात्र एक असें म्हणतां येईल. इच्छिणार निराळे, इच्छा भिन्न, इच्छित वस्तु मात्र समान अशी वस्तुस्थिति दिसते.

अनेकांच्या अनेक इच्छा, पिंडे पिंडे मतिर्भिन्ना अशी वस्तुस्थिति असल्यामुळें,

सर्वांची बुद्धि एक अगर इच्छा एक असणार नाहीं. एकत्र येऊन, समन्वित होऊन, त्यांची जुळणी होऊन एक सामुदायिक बुद्धि अगर इच्छा तयार होईल हें खरें. आधुनिक समाजांतील सनातनी गृहस्थाची बुद्धि निराळी, समाज सुधारकाची निराळी; या दोघांच्या बुद्धींत अगर इच्छेंत साम्य कसें असणार ? दिवसरात्र व्याजाचा हिशोब करणारा सावकार व सायंकाळची भ्रांत असणारे कुळ यांच्या इच्छेंत साम्य कसें असणार ? अधिक नफा कसा मिळेल म्हणून चिंताग्रस्त झालेला मालकवर्ग व भांडवलशाही नष्ट होवो म्हणून घोषणा करणारा भाई यांच्या बुद्धींत कोण साम्य आहे म्हणेल? तथापि समाजांत या सगळ्या विविध बुद्धी अगर इच्छा एकत्र येतात, एकमेकावर परिणाम करतात. प्रत्येकाला काय पाहिजे आहे याचे स्वरूप या घडामोडींत स्पष्ट होतें. पुढें त्यांतून कांहीतरी समन्वित, सामुदायिक उत्पन्न होतें. कांहींतरी सामान्य व सारखे आहे व तें व्यक्तींनीं शोधून त्याच्याशीं जुळेल असें वर्तन करावयाचे असा क्रम नाहीं. हिंदु समाजाची इच्छा, मुस्लीम समाजाची इच्छा म्हणजे त्या त्या समाजांतील व्यक्तींच्या इच्छा त्यांचे समन्वित व सामुदायिक स्वरूप, जें ठळकपणें दिसून येतें तें. ही इच्छा व्यक्तीच्या इच्छेपेक्षां, अलग, स्वतंत्र अगर निरपेक्ष नाहीं; त्यांच्याच इच्छेचें एक विवक्षित स्वरूप; जे पींडीं ते ब्रह्मांडीं. अनेक बटाटे निरनिराळ्या तऱ्हेनें चिरले, व भाजींत एकत्र आले तरी त्या भाजीची चव बटाट्याच्या चवीपेक्षां अगदी निराळी असणार नाहीं. सामुदायिक बुद्धी याचा अर्थ सर्व माणसें एक झाली असे नव्हे. त्यांच्यांत कांहींएक विचार समान झाला. तेवढ्या विचारापुरते ते एक झाले. ही सामुदायिक बुद्धी अगर इच्छा स्वतंत्र अगर निरपेक्ष नसली तरी ती आपला परिणाम व्यक्तीवर करते. विटांची भिंत, विटापासून स्वतंत्र अगर निरपेक्ष अशी कांहीं वस्तु म्हणजे भिंत असें नव्हे. तथापि विटाही आहेत व भिंत ही नुसतीच कल्पना नाहीं, तर वस्तुस्थितींतील सत्य आहे व तें परिणाम करीत असते. भिंत या सत्य गोष्टीचा विटा एकत्र स्थितींत ठेवण्यावर परिणाम होत असतो. आधीं विटा नंतर भिंत व तिच्यामुळें कांहीं विशिष्ट परिणाम. भिंतीपूर्वी असलेली विट व भिंतीतील विट यांतील फरक स्पष्ट आहे. सामुदायिक बुद्धी अगर इच्छा बाळगणारे संघटन, हा समाज पुरुष यालाही व्यक्तीमत्व आहे; व ते व्यक्तीवर परिणाम करून तिचें स्वरूप बदलत असते. व्यक्ति इतरापासून पृथक पण तिच्यावर सामुदायिक बुद्धीचा, इच्छेचा परिणाम होतो. पण ही सामुदायिक बुद्धी म्हणजे कोणी स्वयंभू बुद्धी नव्हे, व्यक्तींच्याच बुद्धीपासून ती उत्पन्न झालेली असते. एकराष्ट्राची कल्पना असो अगर अखंड हिंदुस्थान ही कल्पना असो, तिचा परिणाम हजारो व्यक्तीवर होतो; पण ही

कल्पना म्हणजे कांहीं दैवी घटना नव्हे. हजारों व्यक्तींच्या इच्छांचे हें समन्वित, सामुदायिक स्वरूप आहे. त्यांत येण्यानें व्यक्ति पूर्वीच्या स्वरूपाच्या राहत नाहींत. पण आपलें पृथकपणही गमावत नाहींत.

व्यक्ति पृथक, त्यांच्या इच्छा पृथक, त्यांची बुद्धी पृथक व तें एकत्र येऊन एक सामुदायिक असा भाव अगर बुद्धी निर्माण करतात, या विचारसरणींत व्यक्तीला स्वातंत्र्य कल्पिले आहे. उलट व्यक्तीची खरी बुद्धी अगर इच्छा म्हणजे जी तो दर्शवितो ती नव्हे; पण जी राज्यसंघटनेची, जी उत्कृष्ट मानलेलीच आहे ती सामुदायिक बुद्धी, व्यक्तीची खरी बुद्धी आहे या विचारसरणींत व्यक्तीला कर्तृत्व व स्वातंत्र्य नाममात्र. सामुदायिक बुद्धीविरुद्ध त्याची इच्छा अगर बुद्धी असल्यास ती अविवेकानें तशी झाली आहे; सर्व गोष्टी जर त्याच्यापुढें आल्या तर तो सामुदायिक बुद्धीप्रमाणेंच आपली बुद्धी दर्शवील हें या विचारसरणीचें मुख्य तत्त्व, गृहीतकृत्य असल्यामुळें राज्यसंघटन जें करील त्यांतच त्याचें स्वातंत्र्य आहे, उत्कर्ष आहे असा सिद्धान्त निघतो. म्हणजे हें स्वातंत्र्य व्यक्तीवर लादलें गेलें, सक्तीनें आलें असें होतें. खरें स्वातंत्र्य सक्तीच्या वातावरणांत जीव धरत नाहीं. व्यक्तीला जें वाटतें तें बोलून दाखविण्यांत, व्यक्तीला आपली इच्छा दर्शविण्यास वाव असण्यांतच तिचें व्यक्तित्व आहे. व हे करण्यास जेथे स्वातंत्र्य नाहीं, तेथे खरें व्यक्तित्व पण नाहीं हें उघड आहे. राज्य जे करतें तेच श्रेष्ठ अशी सामुदायिक बुद्धी मानली म्हणजे राज्य जें करील तें व्यक्तीच्या हितार्थच. किंबहुना व्यक्तीनें पूर्ण विचारान्ती जें केलें असतें तेंच तें करतें. फांशीची शिक्षा जरी झाली तरी या विचारसरणींत, व्यक्तीच्याच इच्छेमुळें झाली. कारण व्यक्तीची खरी इच्छा म्हणजे राज्यसंघटनेची इच्छा. सर्व गोष्टीचा योग्य विचार केला असतां तर त्या अपराधी व्यक्तीचें हेंच मत झालें असते. केवढे स्वातंत्र्य या विचारसरणींत व्यक्तीला दिले आहे ! ! परंतु वस्तुथिति अगदीं उलट असते. हे स्वातंत्र्य लादले आहे, यांत सक्ति आहे. व्यक्तीनें स्वतःवर खुषीनें कांहीं संयम घेणे, व दुसऱ्यानें ते लादणे यांत फरक आहे. मी चहा घेणार नाहीं असा नियम करून जेव्हां वर्तन करतो, तेव्हां माझें स्वातंत्र्य मी घालविलें असें मला वाटत नाहीं. कारण चहा न पिता मला जमेल, समाधान वाटेल असें मला वाटत असतें; त्याप्रमाणें न झालें तर मी नियम मोडीन; मला ज्यायोगें बरें वाटेल असें वागेन, त्याप्रमाणें माझ्या इच्छेला मी वाव देईन. मला क्रियास्वातंत्र्य आहे. पण जर कायद्यानें चहापान बंदी झाली, अशी बंदी असणें इष्ट-जरी असले, तरी माझ्या इच्छेप्रमाणें तें मी केलें असें कसें म्हणतां येईल ? यांत सक्ति आहे. यांत

स्वातंत्र्यविरोधी भाव आहे. इष्ट असलें तरी इच्छिलें नाहीं. दुसऱ्याचा अनुभव व्यक्तीवर लादला जातो. व्यक्तीनें इच्छून इष्ट तें करणें व व्यक्तीच्या इच्छा न जुमानतां इष्ट तें त्यास करावयास सक्तीनें लावणें यांतील फरक महत्त्वाचा आहे.

व्यक्तीला सक्तीनें कांहीं गोष्टी राज्य करावयास लावते तेवढ्यावरून सक्तीचा उपयोग चुकीचा असा मात्र त्याचा अर्थ नव्हे. प्रत्येक व्यक्ति इष्ट तेच इच्छील, जे योग्य तेच करण्याची काळजी घेईल, प्रत्येक बाबतींत विवेकानें वागेल हे अशक्य आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक व्यक्तीला केवळ इष्टानिष्टतेचा विचार न करतां वाटेल तसे स्वेच्छेनें वागून दिलें तर समाजजविन अशक्य होईल. समाजच राहणार नाहीं. समाजाच्या विवेकबुद्धीस, सारासार विचारास जें पटतें, ज्याप्रमाणें वर्तन असावें असें समाजास वाटतें, तें होण्यासाठीं, घडून येण्यासाठीं, सक्तीचा उपयोग समाजानें, राज्य संघटनेनें करणें न्याय्य व योग्य आहे. याप्रमाणें समाजानें न्याय्य ठरवून एखादी गोष्ट सक्तीनें केल्यास व्यक्तीला ती न पटली तर व्यक्तीनें विरोध करावा व शासनानें दिलेल्या शिक्षेस तयार व्हावें, तिचा स्वीकार करावा, इतकें स्वातंत्र्यही व्यक्तीला पाहिजे. विचारच करूं नये, जें विद्यमान आहे तें योग्य आहे अशी सहज प्रवृत्ति व्यक्तींत निर्माण व्हावी, व्यक्तीची बुद्धि विचार न केल्यानें पंगू व्हावी, विचार करण्याचेंच विसरून जावें, यापेक्षां व्यक्तीनें समाजविरोधी विचार करावा, तो बोलून दाखवावा, समाजानें, शासनानें प्रायश्चित्त दिलें तर स्वीकारावें ही परिस्थिति समाजाच्या स्थैर्याच्या व प्रगतीच्या दृष्टीनेंहि अधिक योग्य आहे, अधिक हितावह आहे. समाजजीवनांत चांगली भर पडावयाची असेल, त्याची विचारसंपदा वाढावयाची असेल तर हीच गोष्ट अनुरूप आहे. इतिहासांत जेथें जेथें प्रगति झालेली दिसतें तेथें तेथें विद्यमानाशीं व्यक्तींनीं संघर्ष केला, विरोध केला त्यामुळेंच झाली असें दिसून येतें. मोगलाई अंमल वडिलाप्रमाणें शिवाजी मानता तर हिंदवी स्वराज्य झालें नसतें. संस्कृतांत परंपरेप्रमाणें ज्ञानेश्वरांनीं पांडित्य केले असतें तर गीताधर्म जनतेंत आलाच नसता. परंपराधर्माप्रमाणें तुकोबांनीं नांगरच हांकला असता तर जे कार्य त्यांनीं केलें तें करूं शकलें नसतें. विद्यमान व परंपरा यांना विरोध करण्यांत समाजाचा विरोध वा शिक्षा व्यक्तींना सहन करावी लागली व लागते. या संघर्षात, या विरोधांत व्यक्तीला जे श्रेष्ठ, जे सकस, तें समाजाच्या उपयोगी पडतें व या विरोधांतूनच समाजाचा विकास होतो. हा विरोध समान प्रेमामुळें केलेला असतो. कडू औषध देहाला त्रास व्हावा म्हणून वैद्य देत नाहीं तर त्यास आराम वाटावा म्हणून. सर्वांना मंदीरप्रवेश असावा हें सांगण्यांत हिंदुधर्माचे प्रेम मुळाशीं आहे. स्वातंत्र्य

याचा अर्थ इतरांपासून भिन्न रीतीनें वागण्यांतच स्पष्ट होतो. व्यक्ति व समाज यांतील बारीक सारीक बाबतींतील मतभेद क्वचित्‌च संघर्ष निर्माण करतात. पण व्यक्तीला ज्या गोष्टी मौलिक वाटतात व ज्यांत त्याला आपल्या उच्चतर जीवनाचें सार आहे असें वाटते, त्या समाजाच्या इच्छेपुढें त्यानें नमतें घेऊन सोडून द्याव्यात यांत त्याच्या व्यक्तीमत्त्वाचा विनाश आहे, विकास नव्हे. या परिस्थितींत विरोध करून शासन स्वीकारण्यांत व्यक्तींचें श्रेष्ठत्व तर आहेच पण व्यक्तीच्या जीवनांत पण यामुळे महत्त्वाचे परिणाम होत असतात.

व्यक्तीचा विरोध कोठल्या परिस्थितींत समाजाच्या प्रगतीस कारणीभूत होतो हें वर पाहिलें. पण समाजाची खरी इच्छा खरी बुद्धि राज्यसंघटनेंत प्रतिबिंबीत होते, त्यांत सामावलेली असते का? हाहि महत्त्वाचा प्रश्न आहे. राज्यसंघटनेनें कांहीं प्रसंगीं सक्ति करावी हे ठीक. पण समाजाची इच्छा, समाजाची विवेकबुद्धि त्या प्रसंगीं शासनाच्या मागें उभी पाहिजे. जेव्हां जेव्हां राज्यसंस्था अगर संघटन सक्ती करत असते त्या वेळीं सर्व कांहीं विचार करून विवेकानें ठरवून त्याच्या हातून होत असते असा अनुभव नाहीं. राज्यव्यवस्थेंत कांहीं सर्व गोष्टी विचार करून होत नाहींत, योजनापूर्ण व्यवहार होतो असें नाहीं. परंपरेनें कांहीं होतें, कांहीं यदृच्छेनें होतें, कांहीं अनुचित होतें, कांहीं कल्पनातीत होतें; किंबहुना सर्व जगाची वाढ अशाच रीतीनें झालेली आहे. त्यांत अगदींच कांहीं योजना अगर विचार नाहीं असें नाहीं. पण यथा धाता पूर्वमकल्पयत् अशी स्थिति नाहीं. जें झालें आहे त्यांत कांहीं पद्धत मागाहून बळेंच तर्कांना ताण देऊन काढावयाची असेही प्रयत्न होतात. सर्व गोष्टी विचार करून होत नाहींत किंवा सर्वांच्या इच्छेचा प्रथम समन्वय होऊन नंतरही घडत नाहीं. व्यक्ती व्यक्ती विचार करीत असतात, आपल्या इच्छा व भावना प्रकट करीत असतात; या सगळ्या क्रिया चालू असतां, कांहींतरी घडत असते. त्यांत जे योग्य ते निश्चित करणारें असे अखेरच्या अधिकारावर असलेले संघटन म्हणजे राज्य; योग्य अगर अवश्यक हे ठरविण्याचा अखेरचा अधिकार राज्याला आहे हें स्पष्ट आहे. पण हें राज्यानें ठरविले म्हणजे त्यांतील निर्णय, अगर त्या निर्णयांत असलेली इच्छा अगर बुद्धि व व्यक्तीची बुद्धि ही एकच असें मात्र नाहीं. नाना मतांच्या गलबल्यांत निर्णायक मत राज्यसंस्थेनें दिलें म्हणून सर्व मतें व अखेर दिलेलें निर्णायक मत हें एकच असें म्हणतां येणार नाहीं. मी दुकानांत अनेक प्रकारचे कापड पाहिलें व एक प्रकारचे दुकानदारास देण्यास सांगितलें व त्यानें तें दिलें. यांत त्याबद्दल लागणारी किंमत व मिळणारें समाधान याचा हिशोब करून कांहीं सुख, कांहीं समा-

थान शिल्लक उरते म्हणूनच मी तें घेतलें; माझ्या निर्णयांत ही पार्श्वभूमि आहे. या निर्णयांत इच्छा व कार्य यांत संगति आहे. राज्याच्या शासनाच्या निर्णयांत इतका विवेक, इतकी संगति नसते. नाना मतें नाना इच्छा यांतून एकजिनसी, सर्वांना संगतवार असें काढतां येणें कठिण. तथापि घेतलेला निर्णय प्रत्येक व्यक्तीच्या इच्छे-बरहुकूम नसला, प्रत्येक व्यक्तीला फायदेशीर नसला, घेतलेल्या त्या निर्णयांत एक-वाक्यता नसली तरी नाना मतांचा समन्वय असतो. असाध्य गोष्ट साध्य व्हावी म्हणून भिन्न मतें जुळत जुळत हें कार्य होत असते. जे हवे आहे त्याच्या दृश्य स्वरूपा-बाबत याप्रमाणें मतैक्य, अगर एकता होते. राज्य हें सामुदायिक बुद्धीचे, इच्छेचे प्रतिक मानण्यांत राज्याच्या निर्णयांत संपूर्ण एकवाक्यता अगर एकता असते असा अर्थ येत नाहीं; निदान वस्तुस्थिति तशी नसते. राज्यानें युद्ध पुकारण्याचा निर्णय घेतला, तरी तो निर्णय घेणारे जे अधिकारी अगर कार्यकारीमंडळ असेल, त्यांच्या-तील सर्व सभासद एकाच बुद्धीनें विचार करतात असे नाही. त्यांचा उद्देश अगर साध्य एक असते व हा उद्देश समाजाला पटलेला असतो अगर त्याला पटण्याची खात्री निर्णय घेणाऱ्यांना असतें. अर्थात् युद्ध ही बाब अशी आहे कीं, जेथें भावना प्रबल असते व मतभिन्नतेला जागा थोडी असते. पण जे अनेक इतर निर्णय राज्य-सत्ता घेते त्यांत अनेक घटना दिसून येतात. अनेक हितसंबंध असणाऱ्या व्यक्तींच्या इच्छा निरनिराळ्या दिशेनें कार्य करीत असतात; त्यांची दखल घ्यावी लागते. तड-जोडी कराव्या लागतात, लहानमोठ्या दुरुस्त्या सारख्या सुचविल्या जातच असतात, प्राथमिक निर्णयाला मुरड सारखी बसतच असते व भिन्न भिन्न मतांच्या द्रव्यांचा परिपोष होऊन अखेरच्या निर्णयाचे रसायन तयार होत असते. खलबत्त्यांत नानाविध वनस्पति खलल्या जाऊन रसायन होते त्याची चव खलल्या गेलेल्या वनस्पतींपेक्षां निराळी, तिचे अस्तित्व निराळे पण तिच्या स्वरूपांत सूक्ष्म दृष्टीनें सर्व वनस्पतींच्या चवी येतात. वनस्पतींचे पृथक अस्तित्व संपते, तयार झालेल्या रसायनांत त्या विलीन होतात; पण राज्यसत्तेच्या निर्णयांत एवढी एकता नसते व व्यक्तींचे अस्तित्व काय-मच असते व ते राज्यसत्तेला भासतेही!! खलबत्त्यांत घातलेल्या वस्तूत प्रमाण व त्यामागे योजना असते. सर्व गोष्टींचा पूर्णपणे विचार करून राज्यसत्तेचे निर्णय झालेले नसतात. निर्णयापूर्वीच्या घडामोडींत होणाऱ्या नाना मतांच्या व इच्छांच्या संघर्षांत प्रभुत्व मिळावे, समाजनेतृत्व मिळावे म्हणून प्रयत्न होत असतात, किंबहुना त्याचमुळे संघर्ष होतो. सर्व समाजांत एकवाक्यता होऊन निर्णय होतो असे क्वचित्च. अगर झालेला निर्णय अगदी सद्भावनेनें झालेला असतो असेही नाहीं. अशा परि-

स्थितींत तो निर्णय केवळ राज्यसत्तेचा आहे म्हणून तो मानण्याची खास नैतिक जबाबदारी व्यक्तीवर आहे असे म्हणणे योग्य होणार नाहीं. जर त्या निर्णयापासून होणारे परिणाम व्यक्तीला चांगले वाटतील, सद्हेतू सत्कृत्यांत पाहावयास मिळतील तर व्यक्ति त्यांस मान्यता नैतिक दृष्टीनें देईल. निर्णय तत्वतः काय आहे ही कसोटी नसून प्रयत्नांत व फलांत काय दिसते ही कसोटी आहे, खिरीची गोडी खाण्यानेंच कळते.

राज्याच्या मुळाशी काय तत्त्वज्ञान आहे, ते कशासाठी आहे हे त्याचा कारभार कसा चालतो यावरूनच ठरले पाहिजे. राज्याचे प्रत्यक्ष स्वरूप म्हणजे विद्यमान सरकार; हें सरकार म्हणजे ज्यांच्या हातांत निर्णय घेण्याची कायदेशीर सत्ता आहे असें थोडें लोक अगर एक लहान गट. ही सत्ता कशा तऱ्हेनें संघटीत आहे हा विशेष महत्त्वाचा प्रश्न नाहीं. तिचा आशय काय आहे हा महत्त्वाचा प्रश्न आहे. अग्नी चुलींत आहे, कां स्टोव्हवर आहे, कां मोठ्या भट्टींत आहे यापेक्षां त्याचा उपयोग कशासाठीं आहे हें महत्त्वाचें आहे. अन्न तयार करण्याकरितां कां होळी करण्याकरितां या प्रश्नांचे उत्तरावर महत्त्व अवलंबून आहे. पुष्कळ वेळां इच्छीत आशय, संघटनेच्यामुळेंच सिद्ध होत नाहीं. उदबत्ती पेटवून थोड्या लोकांना सुवास मिळेल, पण जर उद्देश खोलींतील थडी जावी असा असेल तर तें साध्य होणार नाहीं. त्यासाठीं हा अग्नी शेगडीच्या स्वरूपांत आणावयास पाहिजे. अग्नीचा उपयोग आशयानुसार केला पाहिजे. राज्यसत्तेचाही विचार याच दृष्टीने व्हावयास पाहिजे. सत्ता म्हणजे विश्वासानें, आशय सिद्धीच्या विश्वासानें दिलेली ठेव आहे. म्हणून ती निरपेक्ष अगर विनशर्त नाहीं. सत्तेचा परिणाम ज्यांच्यावर होतो तें सर्व, ती सहस्राक्षी जनता सत्तेचा उपयोग कसा होतो याकडे पाहते. राजा कालस्य कारणम्; राज्यसत्ता समाजजीवन दिग्दर्शित करीत असते. व्यक्तीच्या जीवनमरणाची साथी असते. म्हणून सत्तेचा उपयोग, योग्य प्रकारें होतो किंवा नाहीं हे पाहणें व्यक्तीचें कर्तव्य ठरतें. हें कर्तव्य व्यक्तींनीं न केलें तर त्यांचेच नुकसान होतें. मागितल्याशिवाय मिळत नाहीं, ठोठावल्याशिवाय प्रवेश नाहीं ओरडल्याशिवाय ऐकलें जात नाहीं असा इतिहासाचा निर्वाळा आहे. व्यक्तींच्या आशा व आकांक्षा जशा सफल होतील त्या प्रमाणांत राज्याबद्दल आपुलकी निर्माण होते. कारभाराशीं व्यक्तींची जितकी समरसता असेल तितकी राज्याबद्दल आपुलकी वाटते, आपणच राज्य आहोंत असें वाटतें. व्यक्तींना वाव मिळावा म्हणून न्याय्य रीतीनें, समताबुद्धीने राज्य-सत्तेचा उपयोग व्हावयास पाहिजे. ही सत्ता वापरणारे, हिचा उपयोग करणारे जें लोक तेंच तिचा आशय ठरवितात. म्हणून राज्यकारभार चालविणारे सरकार कोण, कोणत्या वर्गाचे, कोणत्या लोकांचें आहे, हें कळलें म्हणजे राज्याचें तत्वज्ञान त्याचे सिद्धान्त काय, खऱ्या स्वरूपांत काय आहे हें स्पष्ट होते.

सत्ता चांगली अगर वाईट हें तिच्या उपयोगावरून ठरणार. उपयोग करणारे कोण यांच्यावरून तिचा कसा उपयोग होईल हें समजून येतें. सत्तेला मुख्यत: म्हणजे तिचा तूर्त उपयोग करणाऱ्या विद्यमान शासनाला अगर सरकारला जनता अनेक हेतूनें प्रेरित होऊन मान्यता देत असते. सरकारचें धोरण योग्य वाटतें म्हणून कांहीं मान्यता देतात, कांहीं इतकें उदासीन असतात कीं, सरकारी धोरणाचा विचारच करीत नाहींत, तें योग्य कीं अयोग्य हे पाहातच नाहींत. कांहींना सरकारी धोरण हें घातकी वाटतें व सरकार सत्तेचा दुरुपयोग करतें असें ते मानतात. तथापि नापसंती नेहमींच बंडाला प्रवृत्त करते असें नाहीं. खुद्द जे लोक कारभार हांकतात तें सुद्धां सर्व एकजिनसी, एकप्रकारचे असतात असें नाहीं. त्यांच्यांतसुद्धां मतभिन्नता असते. तथापि निर्णय घ्यावयाचा असतो म्हणून मतांची एकवाक्यता नसली तरी जुळणी करावी लागते. कांहीं तरी कमीजास्त-करून ठरवावें लागतें. जें ठरेल, जो निर्णय होईल, तो सरकारचा निर्णय म्हणजे राज्यसत्तेचा निर्णय व त्याची बजावणी कारभारांत होत जाते. म्हणजे राज्याचा देशांतील कारभार सरकारच्या नांवानें म्हणून चालला असला तरी त्याचा उपक्रम व उपसंहार हे सर्व करणार ठराविक व थोडीं माणसेंच असतात. 'खुल्खुदाका, मुल्ख बादशहाका व अंमल कंपनी सरकारका' असाच न्याय येथें दिसतो. राज्याची प्रतिष्ठा, सरकारची सत्ता, उपभोग मात्र कांहीं व्यक्तींचा. या स्थितींत या व्यक्ति जे करतील ते बरोबर, योग्य अगर यथार्थ असलें पाहिजे असें मानतां येणार नाहीं. तसेंच सर्वसाधारण जनता सरकारी धोरण कर्तव्यबुद्धीनें पाहून, तपासून मान्यता देत असेल असेंही मानतां येणार नाहीं; राज्यांतील नागरिकांना विकासाला वाव द्यावा, त्यांचे जीवन व्यापक व उच्च व्हावें या हेतूनें जर सरकारी कृत्यें होत असतील, सरकारचें धोरण तसें अमलांत येत असेल, तर राज्यनिष्ठेला, मान्यतेला नैतिक आधार आहे. अर्थात् ही गोष्ट अनुभवानेंच ठरणारी असते. सत्तेला अगर सत्तेच्या उपयोगाला नैतिक पाया असला म्हणजे तिचें स्वरूप अर्थात् श्रेष्ठ समजलें जातें. समाजाचें साध्य व हेतु सिद्ध व्हावें म्हणून विद्यमान सरकार जेवढी सत्ता वापरील, तेवढ्यापुरता त्याचा अधिकार योग्य व यथार्थ. सत्ता आहे म्हणून तिचा उपयोग करण्याचा हक्क आहे हें आधुनिक जगांत कोणी न्याय्य मानणार नाहीं. किंबहुना ही विचारसरणी राज्याची मीमांसाही होऊं शकत नाहीं. यावर आधारलेलें राज्य टिकणारही नाहीं. आर्तांचें संरक्षण करण्यासाठीं शस्त्र आहे. तें जवळ आहे म्हणून वापरण्याचा हक्क कोणी सांगूं लागला तर समाज ते मानणार नाहीं. सत्ता-

प्राप्ति म्हणजे तिचा वाटेल तसा उपयोग करण्याची सनद असें म्हणणें गैर आहे. समाजहिताचा नजराणा दिल्याशिवाय सत्तेचा वारसा न्याय्य नाहीं. समाजहितार्थ उपयोग झाला तरच मिळालेली सत्ता अगर असलेली सत्ता वापरण्याचा हक्क आहे असें म्हणणें रास्त होईल. अन्याय्य सत्तेला नैतिक पाठिंबा नाहीं. सत्तेचा उपयोग कसा होतो व तो योग्य होतो कीं नाहीं हें पाहण्याचें काम नागरिकांचें आहे. त्यांच्या मतानेंच सत्तेची प्रतिष्ठा व पुण्याई ठरावयाची असते.

वरील विचारसरणींत व्यक्तींना साहजिकच महत्त्व दिलें आहे. समाजहिताच्या दृष्टीनें सत्तेचा उपयोग योग्य म्हटल्यानंतर समाजहित काय हें ठरवितांना जास्तींत जास्त व्यापकदृष्टि ठेवणें जरूर होते; ज्यास्तींत ज्यास्त व्यक्तींची मतें व कल्पना विचारांत घ्याव्या लागतात. प्रत्येक सज्ञान नागरिकाला समाजहित काय व राज्यसत्तेनें काय करावे, हे सांगण्याचा वाव द्यावा लागतो. प्रत्येक नागरीक या संधीचा फायदा घेईल असें नाहीं, पण कोणाला संधी मिळाली नाहीं असें होणार नाहीं. लोकशाही याचा अर्थ प्रत्येकजण प्रत्येक बाबतींत मत सांगेल, असा नाहीं, तर प्रत्येकाला तसें करण्यास पूर्ण वाव मिळेल. समाजजीवन व्यक्ती जसें प्रयत्नानें घडवून आणू इच्छीतील तसे होईल. पूर्ण वाव असल्यामुळें व्यक्तींना, आपल्या अनुभवाचे सार समाजजीवनाचे उभारणीसाठीं देतां येईल. व्यक्तींत, कांहींतरी करावे, देशाचे प्रत्येक उद्योगांत योग्य भर घालावी, अशी विधायकबुद्धी उत्पन्न होईल, व तिचा परिणाम समाजजीवनावर होऊन, राज्याचे स्वरूप त्याच रंगांत भरले जाईल. व्यक्तींनीं काढलेल्या स्वरावर राज्याचे संगीत गायले जाईल. राज्य म्हणजे व्यक्तींच्याच गुणांचा परीपोष होऊन झालेले स्वरूप. जोंधळे पेरून गव्हाचे पीक येणार नाहीं. राज्यें चांगले असावे आदर्श असावे यासाठीं, व्यक्ती तश्याच पाहिजेत, व ही गोष्ट जाणीव असल्याशिवाय, ज्ञान असल्याशिवाय होणार नाहीं.

या दृष्टीनें विचार केला म्हणजे सामाजिक जीवन, सामुदायिक जीवन उन्नत व्हावे व्यापक व्हावे ह्यासाठीं असलेला संघ म्हणजे राज्य. इतर अनेक संघ असतात तसाच हा. कामगार संघ, अगर जातिविषयक संघ, अगर धर्मविषयक संघ हे सुद्धां सामुदायिक जीवन उन्नत व्हावे याच उद्देशानें अस्तित्वांत आलेले असतात. पण या सर्व संघांत दाखल व्हावे कीं, नाहीं हे व्यक्ति खुषीनें ठरविते. सभासदांवर सक्ती नाहीं. पटत नसेल तर व्यक्ति संघ सोडून देऊं शकते. राज्य हा संघ असा आहे कीं, त्याच्या अधिकार प्रदेशांत जे राहतात त्यांना याचे सभासद व्हावेच लागते; शिवाय या संघाच्या आज्ञा न मानल्यास त्याबाबत सक्ति करण्यांत येतें हे विसरतां येत नाहीं.

तथापि इतर संघांची उपयुक्तता पाहूनच मनुष्य सभासद होतो, तसा येथें उपयुक्तता पाहून तो राज्य चांगलें अगर वाईट ठरवितो. मान्यता खुषीची कीं, सक्तीची हें त्यावरून ठरवितो. नैतिकदृष्टीनें याप्रमाणें राज्य व अन्य संघ यांत साम्य आहे. इष्ट अशा रीतीनें राज्याचा अनुभव व्यक्तींना मिळाला, म्हणजे त्याबद्दलची निष्ठा, मनांत व अंतःकरणांत रुजत खोलवर जाते. राज्य हें आपणापासून पृथक न वाटतां त्याबद्दल आपुलकी उत्पन्न होते, मैत्रीभाव उत्पन्न होतो. आपलें हितसंरक्षण होईल येवढा विश्वास व्यक्तींत उत्पन्न झाला, म्हणजे राज्य व व्यक्ति एकमेकांचे जिवावर न उठतां एकजीव होतात. या विश्वासाचे अभावीं राज्यनिष्ठेचा नैतिक पायाच नाहींसा होतो. हा विश्वास उत्पन्न होणें अत्यंत महत्त्वाचें व मौलिक आहे. राज्याचें क्षेत्रव्यापक, त्याचें नियंत्रण सर्वग्राही, नागरिकांच्या जीवनावर परिणाम करणारी त्याची सत्ता ही सर्व लक्षांत घेतां, त्याबद्दल व्यक्तींमध्यें विश्वास उत्पन्न होणें हें महत्त्वाचें कां, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. याच्याशीं न पटलें तर या संघाला सोडून जातां येत नाहीं. अन्य संघांत सभासद मनाप्रमाणें तो सोडून बाहेर जातात. व्यक्ति व राज्य यांचे संबध हिंदु–लग्नाप्रमाणें आहेत. यांत घटस्फोट नाहीं. लग्नाचे वेळींही कुणी संमती घेऊन तें करीत नाहीं. अगदीं बालविवाह काय, जन्मतांच हा विवाह होतो, ही सोयरीक होते !! सनातन्यांपेक्षांही ही सनातनी पद्धत आहे. हिंदुधर्मांत विवाह हा करार न मानतां एक धार्मिक विधि मानतात व जास्तींत जास्त प्रतिष्ठा त्याला देतात. पत्नी म्हणजे, गृहीणी, मित्र, मंत्री; त्याचप्रमाणें व्यक्ति ही संबध तोडूं शकत नसल्यामुळें, असली पाहिजे. येवढी प्रतिष्ठा व्यक्तीला मिळाली पाहिजे. जीवित व वित्त राज्यामुळें सुरक्षित असतें. व्यक्तीला इतर संघांनीं बहिष्कृत केलें तर व्यक्तीचें बिघडत नाहीं. पण राज्याचे बाबतींत परिस्थिति अगदीं निराळी आहे. राज्याशीं विरोध केल्यास शासनच वाट्यास येतें. राज्यानें केलेल्या अन्यायाविरुद्ध फार तर त्यानेंच निर्माण केलेल्या न्यायालयांत दाद मागतां येईल, पण तेथें अन्याय झाल्यास पुढें मार्ग नाहीं. करवाढ करून व्यक्तीला तें दरीद्री करूं शकतें, शांततासंरक्षणाचें निमित्त करून धर्मांत ढवळाढवळ करूं शकतें, मूर्ख धोरणानें ओढवून घेतल्या युद्धांत नागरिकांचे त्यांच्या इच्छेविरुद्ध बळी देऊं शकतें. भीतिग्रस्त होऊन ज्ञानाचीं साधनें, सभा, वर्तमानपत्रें वगैरे बंद करूं शकतें. जीवित, वित्त, व विकास यांचे संरक्षणाप्रमाणें, त्यांचा नाशही तें करूं शकतें. येवढी प्रचंड सत्ता असल्यामुळें तिच्या सद्हेतूंबद्दल विश्वास व सत्कृत्याबद्दल अनुभव व्यक्तींना आला पाहिजे. अखंड सावधानता असेल तरच स्वातंत्र्य टिकतें. दक्ष शेतकरी नेहमीं आपले

बांध व हद्दीचे चिरे पाहात असतो, व अतिक्रमण होऊं देत नाहीं. येवढी प्रचंड सत्ता काम करीत असतांना ती सन्मार्गानें चालली आहे येवढें तरी पाहण्याची साव-धानता बाळगली पाहिजे. तिच्या भोगवट्यांत तिचा सदुपयोग होईल येवढी तरी किंमत, समाजानें दक्षतेनें वसूल केली पाहिजे.

सत्तेचा सदुपयोग होईल अशी दक्षता घेणें आधुनिक जगांत व्यक्तींना संघटने-शिवाय शक्य नाहीं. राज्याचा विस्तार पूर्वी ग्रीक देशांतील परिस्थितीप्रमाणें एखाद्या नगरायेवढाच असता तर व्यक्तीला दाद लावून घेणें शक्य झालें असतें. विस्तार थोडा असल्यामुळें प्रत्येक व्यक्तीला विद्यमान राज्यकर्ते यांना भेटून अन्याय कानांवर घालणें त्या वेळीं शक्य होई. हल्लीं कोणी एखादी व एकाकी व्यक्ति याप्रमाणें करील पण परिणामकारक कार्य असें होणार नाहीं. तीच गोष्ट अनेक व्यक्तींनीं संघटित होऊन केली, चिकाटी धरली तर कांहीं तरी परिणाम होतो. सरकार त्यांच्या म्हणण्याकडे लक्ष देतें. तथापि, व्यक्तींनीं संघटित होऊन याप्रमाणे करीत राहणें हें सुद्धां या काळांत अवघड आहे. त्यापेक्षां राज्याचें स्थूल स्वरूपच असें असलें पाहिजे कीं, सत्तेचा उप-योग जबाबदाररीतीनेंच व्हावा. हे जबाबदारीचे लगाम कसे घालावे व सत्तेची गति कशी नियंत्रित करावी हें ठरवितांना, आजपर्यंत आलेले अनुभव लक्षांत घेतले पाहि-जेत. मूठभर लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींचें सरकार असल्यास तें सत्तेचा उपयोग जनतेच्या दृष्टीनें जबाबदारीनें करील, हें शक्य नाहीं, तसा अनुभव नाहीं. आपल्या वर्गाचा अगर आपला स्वार्थ म्हणजेच लोकहित, लोकांचें कल्याण असें अधि-कारांत असतांना या लोकांना वाटते. जनता म्हणजे यांचे सगेसोयरे, लोकमत म्हणजे यांचेंच मत अगर यांच्या इशाऱ्यावर वागणारीं वृत्तपत्रें. जनतेचें कल्याण हें यांनीं न ठरवितां, यांच्या व्यतिरिक्त यांच्या वर्गाव्यतिरिक्त, लोकांनीं ठरवावें; असें नसेल, तर सत्तेचा दुरुपयोग जवळजवळ निश्चित. सत्ता ही मद्यासारखी असते. जरा असली कीं, अधिक असावीशी वाटते. उन्मत्त करणारी म्हणून ज्यांच्या जवळ आहे त्यांना सुद्धां धोकाच आहे. सत्तेचा अंश कितीं का असेना, तिचा दुरुपयोग होऊं नये म्हणून संरक्षण असणें अवश्य आहे.

हें संरक्षण म्हणजे अर्थात् व्यक्तींच्या दृष्टीनें राज्यकार्यापासून व्यक्तीचें योग्य समाधान होतें कीं नाहीं, त्याच्या प्रेरणांना योग्य वाव मिळतो कीं नाहीं, हें पाहूनच राज्य योग्य कीं अयोग्य हें तो ठरवितो. या विचारसरणींत व्यक्तिनिष्ठा जास्त आहे. सामाजिक दृष्टि कमी आहे. प्रत्येक व्यक्ति याप्रमाणें विचार करून वागूं लागली तर प्रसंगीं यांतून अराजकताही निर्माण होण्याचा संभव आहे. राज्य म्हणजेच व्यक्तीवर

कांहीं बंधन आणि जर प्रत्येक व्यक्ति राज्य चांगलें कीं वाईट हें प्रत्येक क्षणीं ठरवूं लागली तर एकादे वेळीं बहुसंख्यांक लोक कदाचित् सर्व जनताहि राज्याविरुद्ध असूं शकेल; सामुदायिक जीवन व संरक्षणहि अशक्य होईल. मान्यतेचा पाया, निष्ठेचा गाभाच नाहींसा होईल, भिंत नाहींशी होईल, विटा अलग होतील, बंध तुटेल, मोक्ष मिळेल, स्वातंत्र्यहि मिळेल, पण त्याचक्षणीं तें नकोसें वाटेल!! व्यक्तीचे हितसंरक्षण करण्याकरितां राज्य आहे व तसें होत नसेल तर कां होत नाहीं हें पाहणें दक्ष नागरिक या नात्यानें तिचें कर्तव्य आहे. जर चौकशीअंतीं चूक आढळली तर स्वस्थ बसणें म्हणजे कर्तव्यापासून विन्मुख होणें असाच अर्थ होतो. अपरिहार्य परिस्थितींत, राज्य बदलून टाकणें तिचें नैतिक कर्तव्य ठरतें. ज्या हेतूसाठीं राज्य आहे ते हेतु साध्य होत नाहींत, उलट त्या हेतूंचे अगदीं विरुद्ध राज्याकडून वागणूक होत आहे, अशी विचारांतीं खात्री झाली तर व्यक्तीनें राज्याचा प्रतिकार करणें कर्तव्य ठरतें. उन्हापासून, थंडीपासून संरक्षण करण्याकरितां डोक्यास बांधलेलें मुंडासे निव्वळ ओझेंच झालें अगर त्यांत कोणी ढेकूण अगर विंचू शिरला असला तर तें खात्री करून माणसानें झटकलें पाहिजे; पुन्हां नीट सुखकर होईल असें बांधलें पाहिजे, हें त्याचें कर्तव्य आहे व त्यांत त्याचें हितही आहे. सुखासाठीं, विकासासाठीं राज्य आहे. त्यांत व्यक्ति सामावली, समरस झाली. त्याच कारणाकरितां राज्य जोंपर्यंत हें इष्ट घडून यावें म्हणून प्रयत्न करीत आहे व तशी व्यक्तीला खात्री वाटत आहे, तोंपर्यंत प्रतिकाराचा प्रश्नच नाहीं. त्याचबरोबर व्यक्ति ज्या मार्गानें इष्ट तें घडून येईल असें म्हणेल त्या साधनांनीं इष्ट तें घडून येईल इतकी तरी खात्री व्यक्तीची असली पाहिजे, तर तिनें प्रतिकार करणें योग्य ठरेल. त्याचप्रमाणें साधनांचा उपयोग करतांना राज्याचें ऐन स्वरूप बदललें जाणार नाहीं याची पण खात्री असली पाहिजे. विद्यमान अधिकारीवर्ग काढून टाकून येणारा वर्ग जर पूर्वीसारखाच वर्गनिष्ठपणें वागणार असला तर फरकानें फायदा काय झाला? जनसेवेसाठीं म्हणून भांडून जावयाचें व स्वार्थ संपादनासाठीं राहावयाचें असाही अनुभव येतो. सद्भावनेच्या जोरावर प्रवेश करून सत्ता मिळवावयाची व स्वार्थ साधावयाचा हेंहि दृश्य दिसून येतें. तथापि, हे धोके तरी पत्करले पाहिजेत नाहीं तर गप्प बसलें पाहिजे असा पेंच नेहमींच विचारी नागरिकापुढें असतो. योग्य–अयोग्य हें व्यक्तीनें ठरवून नैतिक जबाबदारी ओळखून वागणें यांतच खरें व प्रभावी नागरिकत्व आहे.

नागरिक या नात्यानें सामुदायिक जीवनांत, समाजांत पूर्णत्व व प्रतिष्ठा मिळावी हें व्यक्तीला वाटणें साहजिक आहे. किंबहुना ही व्यक्तीची अपेक्षा असते. व्यक्ति

समाजांत नागरिक या नात्यानें राहते व कांहीं अपेक्षा करते व त्यांपैकीं कांहीं तरी सफल न झाल्यास तिचें जीवन तिला विफल वाटतें, ती अप्रसन्न राहते. जीवनांत प्रसन्नता यावी, पूर्णता यावी, प्रतिष्ठा यावी, उन्नत जीवन शक्य व्हावें म्हणून तर समाजाची व्यवस्था. या दृष्टीनें समाजावर कांहीं तरी हक्क व्यक्तींचे आहेत व ते नागरिक या नात्यानें आहेत. नागरिकत्व आहे तर इष्ट अपेक्षा परिपूर्तीसाठीं कांहीं तरी हक्क असणें अपरिहार्य आहे. उदरीं जन्म घेतला तर मातेच्या स्तनपानाचा हक्क जन्माबरोबर येतो. हे हक्क ज्या मानानें बजावण्याची संधि मिळेल, त्या मानानें व्यक्ति, राज्य हें बरें कीं वाईट ठरविणार. राज्य हें समाजाचे व्यक्तीचे कल्याणाकरितां, उत्कर्षाकरितां नियंत्रण करणारें साधन मानलें आहे, म्हणून तें साधन कार्यक्षम आहे कीं नाहीं, हें पाहणें अगदीं साहजिक आहे. व्यक्तीचे जे हक्क, जे नागरिकत्वाचे हक्क ते निरपेक्ष नाहींत. हक्क आहेत तशीं व्यक्तींना कर्तव्येंही आहेत. व्यक्ति कर्तव्य करीत असतां, तिचे हक्क मानले जात नाहींत, असें झालें म्हणजे राज्याची प्रतिष्ठा व्यक्ति मानणार नाहीं. राज्याची सत्ता सामाजिक हिताकरितां न खपतां कांहीं लोकांचे हितार्थ तिचा उपयोग होत असेल तर सर्वांसाठीं तसा तिचा उपयोग कां होत नाहीं, असें विचारण्याचा हक्क कचित् नागरिकांना आहे. राज्याची प्रतिष्ठा, व त्याचें नैतिक स्वरूप व्यक्ति स्वतःला किती न्याय मिळतो यावरून ठरविते. न्याय मिळविणें, विषमता जावी म्हणून मागणी करणें हे हक्क नागरिकाचे जन्मसिद्ध आहेत. व्यक्तीला योग विकासाला पूर्ण वाव मिळाला पाहिजे, योग्य तें समाधान तिला मिळालें पाहिजे, एतद्विषयक हक्क जर व्यक्तीला नसले अगर राज्य ते मानत नसलें तर व्यक्ति ही नागरिक नाहीं, गुलाम आहे; व्यक्तीचे दृष्टीनें राज्य निरर्थक आहे.

राज्याची कसोटी व्यक्तीला मिळणाऱ्या न्यायावर, तिचे हक्काचे मान्यतेवर आहे. किंबहुना नागरिकत्वामुळें प्राप्त झालेले ते हक्क राज्याचा पाया आहे. योग्य व प्रतिष्ठित जीवनाला हे हक्क आवश्यक आहेत, म्हणून एका अर्थानें ते नैसर्गिक हक्क आहेत. बालकाला मातेचें दूध मिळणें हा नैसर्गिक हक्क आहे. नागरिकालाहि त्याचे जीवनाचे वृद्धीसाठीं, विकासासाठीं जे हक्क हवे आहेत तेही नैसर्गिकच मानले पाहिजेत. हे व्यक्तीला ज्या प्रमाणांत उपभोगितां येतील, त्या प्रमाणांत तो स्वतःची प्रगति करील व समाजाचीहि उन्नति करील. व्यक्ति सुशिक्षित झाली, चारित्र्यवान् झाली कीं समाजहि उन्नत होत जातो. दिव्यांत तेल अधिक झालें म्हणजे ज्योत अधिक मोठी होते व भोंवतालीं प्रकाशहि वाढतो. समाज म्हणजे व्यक्तिच, त्याच्या वाढीबरोबर समाजाची वाढ. व्यक्तींच्या हक्कांची दखल जर राज्य घेणार नाहीं तर राज्याचा

नैतिक पायाच जाईल. राज्याचें सत्तेचीं मुळें जनतेच्या मनोभूमींत रुजलीं असलीं तरच तें टिकेल. हक्कांचा उपभोग व्यक्तींना वाढत्या प्रमाणांत देऊन, त्यांच्यांत समाधान उत्पन्न करणें यापासून जी मान्यता व निष्ठा राज्याला मिळेल, तीच खरी व टिकाऊ. योग्य जीवनाला आवश्यक म्हणून समाजानें म्हणजे राज्यसत्तेनें, हे हक्क योग्य प्रमाणांत सर्वांना उपभोगितां येतील अशी व्यवस्था करणें हें तिचें कर्तव्य ठरतें.

आवश्यक म्हणून नैसर्गिक असे जे हक्क वर सांगितले त्यांचें स्वरूप निव्वळ वैयक्तिक आहे असें मात्र नाहीं. निःसंशय ते व्यक्तींना नागरिक म्हणून मिळाले पाहिजेत. पण ते केवळ व्यक्तींच्याच निरपेक्ष भोगासाठीं मात्र नाहींत. नागरिकांचें जीवन म्हणजे केवळ त्यांच्या पुरतें, त्याचा परिणाम त्यांचे व्यतिरिक्त कोणावर होत नाहीं असें नाहीं. व्यक्ति ही जन्मतःच सामाजिक आहे. ती काय बोलते, काय खाते, जगांत कशी वागते या सर्वांचे सामाजिक परिणाम होतात. भोवतालचे जीवनावर या गोष्टी परिणाम करीत असतात. व्यक्तींचीं सुखदुःखें क्षुल्लक असतील, केवळ व्यक्तींची म्हणून त्यांना ऐतिहासिक महत्त्व कमीही असेल, पण तीं सत्य असल्यामुळें, त्यांचा परिणाम व्यक्तींचे वागणुकीवर होतो व समाजाच्या भावी जीवनावर संकलित दृष्टीनें त्यांना महत्त्व प्राप्त होतें. व्यक्तीचें सामाजिक स्वरूप या दृष्टीनें लक्षांत घेतां, व्यक्तींचे हक्क कसे उपभोगिले जातात, याला साहजिक महत्त्व प्राप्त होतें. हक्क कांहीं केवळ तात्त्विक अगर लाक्षणिक नाहींत. त्यांचें स्वरूप त्यांना अनुसरून होणाऱ्या क्रियेंतच दिसतें. भाषणस्वातंत्र्य भाषण करण्यांत असतें. संघस्वातंत्र्य संघ करण्यांत असतें. काय भाषण झालें, कशासाठीं संघ झाला या क्रियांना महत्त्व येतें. किंबहुना हक्कांचें स्वरूप क्रियात्मक असतें असें म्हटलें तरी चालेल. हे हक्क अगर ही सत्ता व्यक्तींना समाजाची सुखसंपदा वाढविण्यांत खर्च करावी येवढ्या करतांच आहे व तें करण्यांत जें केवळ व्यक्तीचें हित होईल ती आपली भिदागी, बाकीची समाजसेवा तिनें समजावी. राज्यसत्ता ज्याप्रमाणें समाजहितासाठीं आहे, त्याचप्रमाणें व्यक्तीचीही सत्ता. हे हक्क त्याच हेतूचे सिद्ध्यर्थ आहेत. समाजापासून घेण्याकरितां केवळ व्यक्तींना हक्क नाहींत, समाजासाठीं कार्य करण्याकरितां आहेत. हे व्यक्तिपरत्वें कार्य कमीजास्त होईल, परंतु कार्य करण्याचा हक्क व संधि मिळालीच पाहिजे. कांहीं संधीचा सदुपयोग करतील, अडचणींना न जुमानतां यश प्राप्त करतील; कांहीं हे हक्क, ही संधि मिळूनसुद्धां विशेष असे कांहीं करूं शकणार नाहींत. तथापि, सुराज्याचें लक्षण, उन्नत समाजाचें लक्षण म्हणजे ज्यांत सर्व व्यक्तींना समाजसेवेसाठीं, सामु-

दायिक जीवनाचे उन्नतीसाठीं कार्य करण्यास पूर्ण मुभा आहे, पूर्ण वाव आहे असें मानलें तरी चालेल. व्यक्तींच्या प्रवृत्तींना विधायक, समाजहितोपयोगी काम करण्यास क्षेत्र मिळालें पाहिजे. तसें न झाल्यास, समाजांत स्फोट होणें, राज्यसंघटन तडकणें अपरिहार्य होतें. क्रांतिपूर्वीच्या काळांत अशीच परिस्थिति उत्पन्न होते. व्यक्तींच्या मनांतून उन्नत व उत्कृष्ट भावना उचंबळत असतात, जुनी व जीर्ण मर्यादा त्यांनीं ओलांडलेली असते, जें आहे तें व्यक्तींना अपुरें वाटतें, त्यांच्या जीवनाचा आवेग व आशय यांना विद्यमान समाजसंघटन, राज्यसंघटन सामावूं शकत नाहीं. एक प्रकारें विद्यमान संघटनाला आव्हान दिलेलें असतें; त्यानें व्यापक व्हावें, बदलावें अगर नष्ट व्हावें असा सरळ सवाल टाकलेला असतो. राज्य व्यक्तिविरोधी, नागरिकांचे हित-विरोधी होतें व या परिस्थितींत राज्य व व्यक्ति यांत असलेली मौलिकएकता नाम-शेष होते. या स्थितींत राज्यसत्ता, हितविरोध असलेल्या जनतेवर अवलंबून राहूं शकत नाहीं. जनता नवीन आदर्शाचा, नवीन जीवनाशयाचा आवेग थांबवूं शकत नाहीं. जुनें व जीर्ण कडाडून पडलें, नवें संघटन. नवा समतोल या क्रांतींतून जन्मास येतो.

व्यक्तींच्या हक्कांचे हें स्वरूप लक्षांत घेतलें म्हणजे राज्यसत्तेचें क्षेत्र व मर्यादा यांचें स्वरूपही निश्चित होतें. राज्य म्हणजे सार्वभौम सत्ता. ती कोणाची अंकित नाहीं. तिनें कोठपर्यंत जावें, स्वतःला कोठें मर्यादा घालावी हें तीच ठरविणार. राज्याच्या मर्यादा राज्यानेंच ठरवावयाच्या असतात. राज्य म्हणजे व्यक्तिनिरपेक्ष असें संघटन नाहीं. व्यक्तींच्या इच्छेचें, सत्तेचें सामुदायिक स्वरूप म्हणजे राज्य, हें मानल्यानंतर राज्यसत्तेचें क्षेत्र व तिच्या मर्यादा तिचे हेतु, तिचें ध्येय साध्य होईल अशाच रीतीनें निश्चित झाल्या पाहिजेत. कुठलेंहि सामाजिक संघटन चांगलें अगर वाईट हें केवळ त्याचें ध्येय चांगलें, त्याची तात्त्विक भूमिका चांगली येवढ्यावरून ठरत नसतें, तर संघटनेच्या कार्याचा अनुभव तिच्या सभासदांना जो येईल त्यावरून ठरतें. संघटनेचें श्रेष्ठत्व स्वयंभू नाहीं, अनुभवनिष्ठ आहे. राज्याच्या मर्यादा व क्षेत्र अनुभवानेंच योग्य व यथार्थ ठरलें पाहिजे. राज्य तात्त्विकदृष्ट्या कांहींही असलें तरी प्रत्यक्ष त्याचा कारभार मूठभर लोक चालवितात, परीणामकारक निर्णय तेच घेतात, ही महत्त्वाची गोष्ट दृष्टिआड करून चालणार नाहीं. म्हणून, स्वाभिमानी, कर्तव्यदक्ष, हक्कांबद्दल जागृत असणारे, कणखर मनाचे नागरिक ज्यायोगें मोठ्या प्रमाणांत होतील असें समाजाचें संघटन असलें पाहिजे. अशाच रीतीनें राज्याच्या मर्यादा निश्चित झाल्या पाहिजेत. हें करतांना प्रसंगीं सत्तेचें नियंत्रण एका हातींहि राहील. प्रत्यक्ष कारभारा-वरहि नियंत्रण पडेल. सत्ता ही एक ठेव विश्वस्त या नात्यानें कारभार करणारांना

दिली आहे असें मानल्यावर तिच्या उपयोगाबाबत नैतिक मर्यादा आल्याच. सदरहू सत्तेचा दुरुपयोग होण्याचा प्रतिक्षणीं संभव; म्हणून प्रतिक्षणी कसा उपयोग होत आहे याबद्दल दक्षता घेतली जाईल अशी व्यवस्था अपरिहार्य होते. व्यक्तींना हक्क-संपदा जशी असेल त्याप्रमाणें संघटनेचें स्वरूप राहील हें जसें खरें, तसेंच या हक्क-संपदेचें संरक्षण करण्याची सत्ता पण त्या संघटनेला हवी हेंहि तितकेंच खरें. तथापि, सत्कार्यासाठीं असलेली सत्ता सत्कार्यांचाच नाश करते असाहि अनुभव आहे. सत्तेच्या वचनावर विश्वासून भागत नाहीं. वचन आणि वर्तन यांत तफावत दिसते. व्यक्तींच्या हक्कांची कशी व्यवस्था लागते हेंच सत्तेच्या चांगुलपणाचें गमक आहे. साधीं व सामान्य माणसें विद्यमान सत्ताधीशांच्या कारकीर्दींत किती प्रगति करतात, त्यांचें जीवन किती उन्नत होतें, या गोष्टींवर जे सध्यां सत्ताधीश आहेत त्यांची पात्रता ठरविली पाहिजे. केवळ सत्ताधीश आहेत, अधिकार प्राप्त झाला आहे म्हणून ते लायक आहेत अगर योग्य वर्तन करीत आहेत, समाजहित साधीत आहेत हें म्हणणें अयोग्य आहे.

सत्ता दुरुपयोगिली जाणार नाहीं म्हणून दक्षता घेतली पाहिजे, असें म्हटल्यानंतर समाजांत तशा जाणिवेचीं माणसें पाहिजेत हें उघड होतें. राज्यांतील नागरिक, किंवा सर्वसामान्य मनुष्य हा राजकीयवृत्तीचा आहे, त्याला एतद्विषयक जाणीव आहे, तो जसा सामाजिक प्राणी आहे तसा राजकीय प्राणी आहे असें गृहीत धरलें तरच दक्ष-तेची व्यवस्था शक्य आहे. मनुष्य सामाजिक आहे, तो जन्मल्याबरोबर त्याच्यांत सामा-जिकवृत्ति उत्पन्न होते. आपल्या वर्तनांत या गोष्टींची जाणीव असल्याचें तो दाखवीत असतो. पदोपदीं समाजसंकेत मानत असतो, आपलें जीवन सामुदायिक जीवनाशीं जुळतें करून घेण्याचा त्याचा सामान्यतः उपक्रम असतो. सामाजिक घटनांत तो साह-जिक रस घेतो. कुणी कुठें सोयरीक केली, कुठें ज्ञातिभोजन झालें, या व असल्या गोष्टींत त्याचें चित्त वेधतें. राज्य कसें चाललें आहे, कुठें अधिकारातिक्रम होत आहे याकडे त्याचें लक्ष नसतें. राज्यकारभाराचा संबंध प्रत्यक्ष त्याच्या जीवनाशीं आला व कळे-लसा आला तर तो त्या बाबतींत लक्ष घालण्याचा संभव असतो. राजकारणांत, राज-कीय घडामोडींत व्यक्तिमात्रानें लक्ष घातलें व असें लक्ष घालण्यांत व्यक्तीचें हित आहे याची जाणीव तिला असली तरच लोकमतानुयायी राज्यसत्ता राहील; आवश्यक ती दक्षता घेतली जाईल. विद्यमान जगाकडे पाहिलें तर असें आढळून येतें कीं, राष्ट्रां-तील, आधुनिक राज्यांतील लोकांत मोठ्या प्रमाणांत ही जाणीव दिसून येत नाहीं. समाज आहे याची जाणीव जशी मनुष्यांत सहजप्रवृत्त दिसते तशी ही राज्यविषयक

जाणीव दिसून येत नाहीं. हा भाव त्यांच्या मनांत सहज उत्पन्न होत नाहीं. आपल्या व्यक्तिगत संसारापलीकडे सामान्यतः माणसें पाहात नाहींत. राजकीय प्रवृत्ति कशी आहे, कशी बदलत आहे याकडे लक्ष देत नाहींत; बदलत जाणाऱ्या प्रवृत्तीचा स्वतःच्या जीवनावर होणारा परिणामसुद्धां चिकित्सक बुद्धीनें पाहण्याची तसदी घेत नाहींत. राजकारण ही भानगड आपल्याला नको, असेंच मानण्याची सर्वसामान्य माणसाची प्रवृत्ति असते. राजकारणांतील पुरुष व प्रसंग यांत सामान्य माणसांना गोडी लागत नाहीं. आपण व आपला संसार सुखानें चालावा, त्यांत कटकटी उत्पन्न होऊं नयेत एवढीच त्याची दृष्टि असते.

लोकमतानुयायी राज्यसत्ता यथार्थपणें असावी यासाठीं नागरिकवर्ग राजकीय जाणिवेचा असावा लागतो पण सर्वसामान्य माणसें तशीं नसतात; या परिस्थितींत काय घडतें हें पाहिलें पाहिजे. राजकारणांत लक्ष घालणारे, ज्यांची प्रवृत्ति राजकारणाला अनुकूल आहे, असल्या लोकांच्या हातीं राज्यकारभार जाईल ते राज्यकर्ते व बाकीचे जवळजवळ गुलाम, मुकीं बिचारीं कुणी हाका अशीं माणसें होतील. अशी प्रवृत्ति ज्यांच्यांत आहे तीं माणसें, हे 'सत्पुरुष' ओळखावयाचे तरी कसे हाहि प्रश्न आहे. जन्मानें ही प्रवृत्ति असते असा अनुभव नाहीं. अनुभवानेच हीं माणसें दिसून येणार; म्हणजे अनेकांना संधि देऊन लायक ठरल्यास ठेऊन, नालायक ठरल्यास काढून टाकून, नाना प्रयोग करून, ठेचा खाऊन हा अनुभव सिद्ध होत असतो. याचा अर्थ असा, कीं शासन अगर सरकार लोकमतावर अवलंबून आहे. कारण अधिकारावर असणारे, कारभार करणारे, लोकमताने अनुभवानें शोधून काढले आहेत. पण हें सर्व कसें घडून येतें याची जाणीव, हें सूक्ष्म ज्ञान लोकांना नसतें. वास्तविक व्यक्तीच्या खाजगी गोष्टी, खाजगी संसार हा सर्वस्वीं सामुदायिक जीवनापासून, सार्वजनिक जीवनापासून अलिप्त नसतो, आणि व्यक्तींना जरी आपला खाजगी संसार अलिप्त ठेवावयाचा असेल तरी सुद्धां राजकारणांत उदासीन राहून तें साधणार नाहीं; तर लक्ष घालून, त्यांत भाग घेऊनच साधेल. आधुनिक जगांत राज्य—सत्तेचें कार्यक्षेत्र वाढत आहे, राज्य—सत्ता नुसती वित्त व जीवित यांचें संरक्षण करणारी पहारेकरी सत्ता राहिली नाहीं. नागरिकांच्या जीवनाच्या सर्वांगीण उत्कर्षाची जबाबदारी राज्यसत्तेवर आहे असें मानण्यांत येऊं लागलें आहे व त्यामुळें शिक्षण, आरोग्य, रोजगार, वगैरे नानाविध गोष्टींत राज्यसत्ता हस्तक्षेप करूं लागली आहे. या परिस्थितींत व्यक्तीला आपलें जीवन आपला संसार किती खाजगी ठेवतां येईल हा प्रश्नच आहे. तथापि, तो तसा ठेवावयाचा असल्यास तिनें राजकारणापासून अलिप्त राहून मात्र तें जमणार नाहीं. आधु-

निक राज्ययंत्र म्हणजे साधी रचना नव्हे. आधुनिक राजकारण व शासनतंत्र हीं विविधतापूर्ण व भानगडीचीं आहेत. सर्व नागरिकांनीं मनांत आणलें तरी सर्वांना या गोष्टींचें पूर्ण ज्ञान होणें अशक्य. आयास, अभ्यास, अनुभव यांनींच हें ज्ञान प्राप्त होतें. तथापि, सर्वसामान्य माणसांना स्थूल ज्ञान प्राप्त करून घेणें अवघड नाहीं, किंबहुना प्रत्येक नागरिकाला तें अवश्य आहे. ही किमान लायकी तरी नागरिकाला असली पाहिजे म्हणजे राजसत्तेचा दुरुपयोग होणें असंभवनीय होईल. व्यक्ति व राज्य यांच्यांत तत्त्वत: मौलिक विरोध नाहीं, राज्यापासून व्यक्ति अलिप्त राहू शकत नाहीं. जीवनाचा चित्रपट राज्यच दिग्दर्शित करीत असतें. व्यक्ति होणाऱ्या घटनेवर मत बनवीत असते. ती वैयक्तिक असली तरी सुद्धां त्याचे सार्वजनिक परिणाम होतातच. या सर्व सूक्ष्म ज्ञानाची जाणीव व्यक्तीला झाल्याबरोबर तिला तिची सार्वजनिक प्रतिष्ठा व सामर्थ्य काय आहे, या राज्यसंघटनेत तिचें स्थान कोणते याची यथार्थ कल्पना येते.

लोकांत उपरिनिर्दिष्ट जाणीव असली, हा राज्य-भाव जागृत असला तरी तेवढ्यानें भागतें असें मात्र नाहीं. तसे पाहिले तर व्यक्ति आपले आयुष्यांत क्षणोक्षणीं जो निर्णय घेते, जो वर्तनक्रम ठरविते, त्यांत राजकारणाचा, राज्यसंबंधाचा कांहीं ना कांहीं अंश असतोच. लोक घडामोडी करत असतात, व्यवहार होत असतात या सर्वांचे मुळाशीं एक विश्वास असतो. कांहीं कार्यकारणभाव निश्चित असतात. करार मोडला तर नुकसानी मिळेल, मारहाण केली तर शासन मदतीला धांवून येईल, भोगवट्यास असलेली संपत्ति वाटेल तो उठून लुबाडणार नाहीं, हा जो विश्वास नागरिकांना वाटतो व ज्या आधारावर व्यवहारांत ते वागतात, नाना निर्णय घेतात, तो राज्यामुळें वाटतो. राज्याकडे पाहून म्हणजे राज्य विवक्षित रीतीनें चालेल, व त्या कामीं तें अधिकार गाजवील हे लक्षांत घेऊन नागरिक वागतात. हा विश्वास निर्जीव व नि:सत्त्व न राहतां, प्रभावी व कार्यप्रवण असला पाहिजे व हें घडून यावयाचें म्हणजे राज्यांतील घडामोडींत नागरिकांनीं परिणामकारक भाग घेतला पाहिजे. निदान मोठमोठाले प्रश्न, व्यापक परिणाम करणारे प्रश्न, त्यांच्या सल्ल्यानें, मतानें निर्णित झाले पाहिजेत. आधुनिक राज्ययंत्रांतील विविधता लक्षांत घेतां इतकें तरी व्हावयास पाहिजे. राजकारणी जाणीव पाहिजे व त्याजबरोबर महत्त्वाचे निर्णय घेण्याची संधि पण पाहिजे. निर्णय घेण्याची संधि म्हणजेच एक जबाबदारी उत्पन्न होते. मनुष्यांतील गुण, जबाबदारीचे वातावरणांतच वाढीस लागतात. त्याची नैतिक उन्नति, त्याचा पूर्ण विकास, त्याच्या कृत्याची जबाबदारी त्याचेवर टाकली म्हणजे होते.

ईर्षेनें, हिरीरीनें व सावधानपणें त्याचें वर्तन होतें. संयमांत विकास आहे, मर्यादा राखण्यांत स्वातंत्र्याचा खरा व टिकाऊ उपभोग आहे हें त्याला कळून येतें. ही मर्यादा, हा संयम सामुदायिक जीवनांत यावयाचा म्हणजे व्यक्तींनीं जबाबदाररीतीनें अनुभव घेऊन, त्याचें संकलन करूनच अशीं जबाबदार माणसें व नागरिक उत्पन्न करणें हे आवश्यक आहे व त्यायोगें समाजसंघटनेचा जो मुख्य उद्देश, म्हणजे खरें सामुदायिक हित तो साध्य होईल.

---

# :प्रभुत्व व त्याचें स्वरूप:

आधुनिक राज्य म्हणजे सत्तेच्या दृष्टीनें स्वतंत्र असे संघटन आहे. त्याचे प्रभुत्व [ Sovereignty ] हेंच त्याचें प्रमुख लक्षण आहे. तें कोणाच्ें अंकित नाहीं यांतच त्याचें प्रभुत्त्व सामावलेलें आहे. कोणत्याही बाह्य उपाधि त्याला त्याचे इच्छेविरुद्ध मर्यादा घालूं शकत नाहींत. ज्या प्रदेशांत राज्याची सत्ता आहे तेथें ती अनिर्बंध असते. आपल्या सत्ताक्षेत्रांत इतर कोणाचा अधिकार राज्य चालूं देत नाहीं. जर चालूं दिला तर तें राज्यच नाहीं. कारण राज्याचें मुख्य लक्षण म्हणजे प्रभुत्त्व व त्याला मर्यादा आली. जी शक्ति अगर संघटन अखेरची सत्ता चालविते, प्रभुत्त्व प्रस्थापित करते तेंच मुळीं राज्य. आपल्या अधिकारांतील प्रत्येक व्यक्ति, प्रत्येक संस्था यांनीं कसें वागावें हें तें ठरवितें, तें सर्वांना आज्ञा करतें, पण कुणाची आज्ञा मानीत नाहीं. आज्ञाधारकपणा हें नागरिकांचें लक्षण व सामान्य धर्म, तर आज्ञा देणें व त्या पाळल्या जातील अशी दक्षता घेणें हें राज्याचें मुख्य कार्य व स्वभाव म्हटला तरी चालेल. राज्यानें काय आज्ञा द्याव्यात, काय हुकूम सोडावेत याला कायदेशीर मर्यादा नाहीं. राज्यानें मनांत आणलें व तें करावयास सुरवात केली कीं तें योग्यच आहे, असें प्रथमावलोकनीं मानलें जातें. त्यांत स्वयंभू सात्त्विकता नसेल; पण हेतु उच्च असला म्हणजे कार्यहि उच्चच असेल, इतका संकेत तरी मानला जातो. हा संकेत अगर ही राज्याकडे पाहण्याची दृष्टि एकाएकीं उत्पन्न झाली असें मात्र नाहीं. अनेक कालखंडांतून उत्क्रांत होत होत ही गोष्ट, ही विचारसरणी सिद्ध झालेली आहे. काल सर्वांवर परिणाम करतो, सर्व घटनांचा एकमेव असा तो साक्षी-दार आहे. राज्य या कल्पनेंत व तद्विषयक तत्त्वज्ञानांत कसे बदल होत गेले हेंही पाहणें अगदीं प्रस्तुत आहे. उत्क्रांत होत गेली असल्याकारणानें राज्यसत्तेचें चालू स्वरूप व पुढील भविष्य याबद्दल कांहीं अनुमानहि काढतां येतें. तसेंच राज्याच्या आज्ञा म्हणजे त्या पाळल्याच पाहिजेत हाहि एक विचार राज्यविषयक तत्त्वज्ञानाचा विचार करतांना महत्त्वाचा मानला जातो. काय आज्ञा आहे हें प्रस्तुत नाहीं, राज्याची

आज्ञा आहे ती मानलीच पाहिजे. कारण ती मानणें भाग पाडण्यांत राज्याचें जीवन-तत्त्व सामावलेलें आहे. राज्याची इच्छा विधिरूपानें [ Law ] प्रकट झाल्यानंतरं तिजविरुद्ध जाण्याचा नागरिकाला हक्क नाहीं असें मानणारीपण एक विचारसरणी आहे. राज्य म्हणजे प्रभुत्वपूर्ण आहे हें मानल्यानंतर त्याचे विधि अगर आज्ञा,- मानल्याच पाहिजेत हें अगदीं तर्काला धरून आहे. जर कोणी न मानील तर तेवढ्या पुरतें प्रभुत्व कमी झालें हें उघड आहे. राज्य म्हणजे सामुदायिक इच्छेचें, बुद्धीचें खरे व यथार्थ प्रतिक मानलें म्हणजे राज्याच्या आज्ञा म्हणजे एका अर्थानें प्रजेनेंच केलेल्या आज्ञा असें स्वरूप त्याला सूक्ष्मतः येतें, मग वरील विचारसरणींत फारसें महत्त्व रहात नाहीं.

राज्यविषयक मीमांसेचा एक ऐतिहासिक उत्क्रांतीचे दृष्टीनें विचार करतां येतो. दुसरा विचार राज्याचे जें प्रभुत्व विधिरूपानें, ( Lιw ) कायद्याचे रूपानें जनतेला दिसतें, त्या दृष्टीनें राज्य या संघटनेची ओळख विधि अगर कायदा या मार्फतच जनतेला होते. साखर म्हटल्याबरोबर गोडीची कल्पना तावडतोब मनांत येते, तशीच राज्य म्हटल्याबरोबर कायदा अगर विधि ही कल्पना डोळ्यांसमोर उभी राहते. राज्य-पुरुषाची वाणी म्हणजे विधि असें म्हटलें तरी चालेल. राज्याविषयक मीमांसेचा विचार करतांना आणखी एका दृष्टीनें विचार करावा लागतो व ती दृष्टि म्हणजे राज्य हें एक राजकीय संघटन आहे ही. आधुनिक राज्य हें एक उत्क्रान्त होत आलेलें संघटन असले व त्याच्या आज्ञा सर्व प्रजाजनांनीं मानल्या पाहिजेत हें जरी योग्य असलें तरी या संघटनेत अखेरची आज्ञा कोणी द्यावी, शेवटीं कोणाचें ऐकावें हें निश्चित असणें जरूर आहे. राजकीयदृष्ट्या संघटन कार्यक्षम व्हावयाचें तर सर्व विरोध परिहार करून, सर्व मतांचा समन्वय करून अगर एक निर्णायक मत देऊन तें प्रभावी कर-णारी एक शक्ति अगर एक केंद्र संघटनेंत असलें पाहिजे व त्याची आज्ञा ही राज्याची आज्ञा म्हणून सर्वत्र मानली गेली पाहिजे. या दृष्टीनें विचार करतांना वस्तुतः जो विचार होतो तो राज्य याचा न होतां सत्तेचा होतो. कारण अखेरचा निर्णय देणारी जी सत्ता तीच प्रभावी व परिणामकारक म्हणून जें कार्य सत्ता करते अगर राज्याची सत्ता चालविणारे जे करतात तें राज्यानें केलें असा भास होतो. राज्याचें प्रभुत्व ही एक कल्पना; तिचा आविर्भाव ज्यायोगें होतो ती म्हणजे सत्ता. अर्थ व वाणी यांचा जसा संबंध आहे तसाच हा आहे व प्रसंगीं जसें अर्थाऐवजीं वाणीला, शब्दाला महत्त्व येतें तसेंच येथेंही घडतें. सत्तेला महत्त्व येतें व त्याचमुळें ती कोणत्या कार्याकडे उप-योगिली जात आहे यालाहि महत्त्व येतें. राजकीय संघटनेंत व्यक्तींना कांहीही हक्क

असले तरी सत्तेचा उपयोग कसा व कशासाठीं केला जातो हेंच महत्त्वाचें ठरतें. सत्ता कोणत्या रूपानें अगर मार्गानें काम करील, प्रभावी होईल याला मर्यादा नाहीं. आधुनिक राज्य हें एक सत्तेनें तूर्त धारण केलेलें स्वरूप आहे. सत्तेपासून म्हणजे तिच्या विद्यमान स्वरूपापासून जनतेचा जास्तींत जास्त फायदा व्हावा, तिचे कल्याणाकडे त्या स्वरूपाचा अगर संघटनेचा उपयोग व्हावा हा मुख्य प्रश्न आहे. सत्ता व तिचें संघटनात्मक स्वरूप यांचे संबंध कसे व कोणत्या तात्त्विक भूमिकेवरचे आहेत हें जाणणें अवश्य तर खरें; पण सत्तेचा उपयोग इष्ट हेतुसिद्ध्यर्थ होत आहे कीं नाहीं हें पाहणें जास्त महत्त्वाचें. कवितेचें वृत्त व छंद हे महत्त्वाचे खरे, पण जास्त महत्त्वाचे म्हणजे तिच्यांतील रस व प्रसाद.

आधुनिक राज्य ही एक इतिहासांतील उत्क्रान्त झालेली घटना आहे. तिचें प्रादेशिक स्वरूप व प्रभुत्वपूर्णता हीं दोन्ही लक्षणें उत्क्रान्त होत होत आलेलीं आहेत. राजा म्हणजे पृथ्वीपति. त्याचा भूमीशीं, प्रदेशाशीं संबंध तर असणारच. अनेक राजे व अनेक राज्यें झालीं म्हणजे प्रत्येकाचे अधिकाराला प्रादेशिक मर्यादा आली. निश्चित प्रदेशावरील प्रभुत्व हें मानल्याशिवाय राज्याची पूर्णता होत नाहीं. निश्चित प्रदेश व त्यावरील प्रभुत्व या दोन्ही गोष्टींचा मिलाफ म्हणजे राज्य. युरोपमध्यें एवंगुणविशिष्ट राज्याचा उदय १६ व्या शतकांत झाला. त्यापूर्वीं सर्व युरोपवर तात्त्विकदृष्ट्या सत्ता धर्मगुरु, पोप व रोमन बादशाह यांची होती. प्रभुत्वपूर्ण अशा आधुनिक राज्याची कल्पना त्या वेळीं नव्हती. किंबहुना प्रभुत्व हीहि कल्पना तितकीशी राजकीयदृष्ट्या स्पष्ट झाली नव्हती. रोम साम्राज्याचा विस्तार मोठा. त्यामुळें प्रादेशिक कल्पना व अभिमान बळावणें साहजिक होतें. पोप व रोमचे सम्राट् यांच्या भांडणांत अनेक वर्षें गेलीं व पृथ्वीचें स्वामित्व सम्राटाकडे गेलें तरी वस्तुतः प्रादेशिक अभिमानामुळें तें निरर्थक ठरलें. या प्रादेशिक अभिमानांतून राष्ट्र या भावनेचा विकास झाला व त्याचा परिणाम म्हणून यूरोपमध्यें अनेक स्वतंत्र राष्ट्रें उदयास आलीं. धर्मगुरु पोप हे सनातनी व नवविचार-विन्मुख म्हणून त्यांना धर्मदृष्ट्या विरोध करणारांनीं प्रादेशिक संघटना करून विरोध केला व 'राष्ट्र' या कल्पनेला चालना दिली. धर्माइतकी प्रतिष्ठा राष्ट्र या कल्पनेला मिळूं लागली. धर्म व राष्ट्र यांच्यांत विरोध आल्यास राष्ट्रनिष्ठा श्रेष्ठ मानली जाऊं लागली. राष्ट्र या कल्पनेचा प्रतिनिधी साहजिक राजा हा झाला. धर्माचा प्रतिनिधी पोप व राष्ट्राचा प्रतिनिधी राजा असा विरोध उत्पन्न झाला. अकल्पित व अमर्याद प्रतिष्ठा यामुळें राजाला प्राप्त झाली. राजा सर्वसत्ताधीश झाला. तो म्हणेल तें बरोबर, तेंच योग्य, तेंच परमेश्वरवचन असें झालें.

योग्य व न्याय्य याच्या ज्या कल्पना होत्या त्या मागें पडल्या. काय होतें, काय घडतें हें न पाहतां, कोणीं केलें हें पाहून तें योग्य अगर अयोग्य ठरलें जाऊं लागलें. एकतंत्री काम असलें म्हणजे त्यांत कार्यक्षमता जास्त, विलंब कमी, म्हणून तें अधिक प्रिय होऊं लागलें व त्यामुळें तें योग्य व न्याय्यही ठरूं लागलें, सूक्तासूक्त जें अनुभवानें ठरलेलें असे, ज्यांत कांहीं प्रमाणें कांहीं संकेत मानले जात असत, ते मागे पडले. राजानें केलें म्हणजे तें बरोबर असें समीकरण झालें. जे सत्ताधीश ते न्यायाधीश झाले. पोप अगर धर्मगुरूंचे जाचांतून मुक्त झाले पण राजाचे गुलामगिरींत पडले. राष्ट्र या अभिमानांत राजाची जोखड डोक्यावर घेतली.

युरोपमध्यें तरी याप्रमाणें धर्मविषयक सत्तेला हाणून पाडून ऐहिक सत्तेचें महत्त्व प्रस्थापित करण्याचे क्रियेंत ज्याला प्रभुत्वपूर्ण राज्य म्हणतां येईल. ( **Sovereign State** ) असें निर्माण झालें. धर्मदृष्टीनें सत्ता चालविणारे मागें पडले. सर्व एका धर्माचे म्हणून सर्व एकच सत्तेखालीं, धर्माच्या व राजकीय, हें संघटनेचें स्वरूप नाहींसें झालें. खिस्ती जग म्हणजे एकसत्तेखालील राज्य अशी जी कल्पना होती, व जिला सत्यस्वरूप देण्याचा प्रयत्न कित्येक शतकें चालला होता ती विलयाला गेली. ही सार्वत्रिक सत्ता पोपनें चालवावी, का रोमच्या बादशहानें चालवावी या झगड्यांत तिचा निकाल लागला हें तर वर सांगितलेंच आहे. पण त्याबरोबर धर्मगुरूंच्या सत्तेचाही निकाल लागला व ऐहिक सत्ता राष्ट्रनिष्ठ होऊन प्रबल झाली. राज्याला सुरक्षितता पाहिजे असेल तर त्याचे संघटनेंत कोणी तरी निश्चितपणें अखेरचा अधिकार चालविला पाहिजे, त्याचें सर्वांनीं ऐकलें पाहिजे व त्यानें कोणाचें ताबेदार असतां कामा नये, ही गोष्ट अपरिहार्य झाली. ह्या अखेरचा निर्णय घेणाऱ्याचें न ऐकलें तर समाजांत गोंधळ होणार व त्यानें इतरांचें ऐकलें तर त्याला अवश्य तो अधिकार, निर्णायक व निश्चित अधिकार राहत नाहीं, म्हणून पुन्हां समाजांतील गोंधळ व अराजकता माजणार. या पेंचप्रसंगात्मक परिस्थितींत, ज्याचे हातांत अधिकार आला, तो परिपूर्णपणें आला. राज्य याप्रमाणें प्रभुत्वपूर्ण झालें. प्रभुत्व असेल त्यांच्या आज्ञा निरपवाद रीतीनें पाळल्या जातील तरच राज्य, नाहीं तर कांहीं नाहीं. जर प्रभुत्व कोणीं अमान्य करूं लागला, आज्ञा मोडूं लागला तर राज्याला अपूर्णत्व आलें, किंबहुना राज्याची कल्पना प्रभुत्वाशिवाय करणेंच शक्य नाहीं. साखर म्हणजे गोडी तसेंच राज्य म्हणजे प्रभुत्व व जें कार्य राज्य या संघटनेपासून अपेक्षिलें आहे त्या करतां, हें प्रभुत्व निरपवाद असलें पाहिजे हीही कल्पना स्पष्ट झाली. निरपवाद प्रभुत्व मिळाल्याशिवाय, सार्वत्रिक मान्यता मिळाल्याशिवाय राज्य संरक्षणाचें काम करूं

शकणार नाहीं हाही अनुभव युरोपमधील लोकांना आला. जे अखेरचा अधिकार राज्यसंघटनेंत चालवतील त्यांना तसें करण्याचा कायदेशीर अधिकार देऊन सार्वत्रिक मान्यता मिळविण्याचा प्रयत्नही झाला. पण कायदेशीर अधिकार प्राप्त झाला म्हणजे नैतिक प्रतिष्ठा व पाठबळ मिळतेंच असें नाहीं, हाही अनुभव आला. धर्मभिन्नतेमुळें जोंपर्यंत छळ होई तोंपर्यंत राज्याला सार्वत्रिक मान्यता मिळणें अशक्य होतें. धार्मिक स्वातंत्र्य व मतसहिष्णुता जशी आली त्याबरोबर राज्य हे सर्वांच्या हिताकरितां असलेलें संघटन आहे असें वाटूं लागलें व त्यांत राहाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला याबद्दल कांहीं विशिष्ट भाव वाटूं लागला. राज्य हें संघटन सर्वांचे म्हणून त्यांत कांहीं सर्वांना समान असे हितसंबंध उत्पन्न झाले. जसजसें राज्याचें स्वरूप लोकमतानुयायी झालें, तसतसे समान हितसंबंध व्यापक झाले. राज्याकडे पाहाण्याची दृष्टि धर्मविषयक नसल्यानें, धर्मविषयक भेदभाव अर्थहीन होत गेला. राज्य हें संघटन सर्वांना व्यापून घेणारें, सक्तीनें व्यापून घेणारें असल्यामुळें साहजिकच त्याला श्रेष्ठत्व प्राप्त झालें. प्रत्येकजण मान्यता देत गेल्यानें तें सर्वमान्य व सर्वश्रेष्ठ झालें. प्रभुत्वाबरोबर श्रेष्ठताही आली.

खिस्ती जग जरी राजकीयदृष्ट्या अनेक राष्ट्रांतून विभागले गेलें तरी खिस्ती धर्मगुरु पोप यांनीं जगभर असलेल्या आपल्या अनुयायांवर हक्क व अधिकार सांगणें चालूच ठेवलें होतें. अन्य राष्ट्रांतील आपली प्रजा व त्यांवर आपला अधिकार आहे असें पोपतर्फे सांगण्यांत येई. ब्रिटिश नागरिक ब्रिटनबाहेर आहे म्हणून त्यावरील ब्रिटिश राजाचा अधिकार कमी होत नाहीं, अशीच विचारसरणी पोपतर्फे मांडण्यांत येई. याचा परिणाम येवढाच झाला कीं, निरनिराळ्या राष्ट्रांतील स्वतंत्र व प्रभुत्वपूर्ण राज्यांमधील परस्पर संबंध कसे राहावेत, त्यांचें नियमन कसें व्हावे या प्रश्नाला महत्त्व आलें. एका धर्माचे अनुयायी अनेक राष्ट्रांत होते म्हणून पोपला जें आंतरराष्ट्रीय महत्त्व होतें व ज्याच्या जोरावर तो सत्ता गाजवूं इच्छित होता तें कमी होणें अपरिहार्य झालें. नागरिकांचें संपूर्णपणें प्रातिनिधिक असें राज्य असल्यामुळें साहजिक ते आपल्या प्रजेविषयीं दक्ष झालें. आपले नागरिक दुसऱ्या राज्यांत गेले अगर असले तर त्यांचें नियमन कसें करावें याबाबत निरनिराळ्या राष्ट्रांनीं, राज्यांनीं आपसांत करारमदार करण्यास सुरवात केली. स्वदेशांत व परदेशांत याप्रमाणें संरक्षण करणारें संघटन म्हणून राज्य याची प्रतिष्ठा आणखी वाढली. देशांत निरपवाद प्रभुत्व व परदेशांत पण अधिकाराला विरोध नाहीं अशी स्थिति प्राप्त झाली. राज्याराज्यांत केलेले करार अर्थात् संमतीनें, व केव्हांही रद्द करतां येण्यासारखें असल्या-

मुळें, राज्यावर बाहेरून कोणी अधिकार गाजवितो असें कोणी म्हणणें शक्य नव्हतें व वस्तुस्थितीही तशी नव्हती. राज्य याप्रमाणें अंतरबाह्य प्रभुत्वपूर्ण झालें. ख्रिस्ती जग नाममात्र राहिलें, आंतरराष्ट्रीय जग अस्तित्वांत आलें. आंतरराष्ट्रीय संघटन केवळ खुषीचे पायावर आधारलेलें असें अस्तित्वांत आलें. या संघटनांत येणें अगर सोडून जाणें राष्ट्राच्या मर्जीवरच अवलंबून होतें. या आंतरराष्ट्रीय संघटनाचे अथवा राष्ट्रसंघाचे नियम जरूर होते पण ते मोडणारास दंड करणारी शक्ति नव्हती. या संघटनाची मान्यता केवळ नैतिकदृष्ट्या होती, कायदेशीरपणा त्यांत नव्हता. कारण हें संघटन प्रभुत्वपूर्ण नव्हतें. आज्ञा पाळावयास लावणारी सत्ता त्यांत नव्हती. तथापि, राज्य मात्र यायोगें प्रभुत्वपूर्ण झालें. घरांत आणि बाहेर दोन्ही दृष्टींनीं तें स्वतंत्र व सत्ताधीश झालें. त्याजबरोबर नागरिकांना स्वदेशांत काय हक्क आहेत याची कल्पना राज्यानें केलेल्या कायद्यांनीं आली; परदेशांत त्याचा मान काय आहे त्याची कल्पना त्याला राज्यानें केलेल्या आंतरराष्ट्रीय करारमदारांवरून करतां येऊं लागली.

राज्य हें प्रभुत्वपूर्ण झालें तें कांहीं आगाऊ एतद्विषयक सिद्धांताचा विचार करून नव्हे, तर ऐतिहासिक घटना घडत गेल्या व त्याचा परिणाम म्हणून हें झालें. राज्याला निरपवाद निष्ठा व मान्यता मिळाली तीही ऐतिहासिक कारणांमुळें. सुव्यवस्था व संरक्षण यासाठीं जर राज्याला प्रभुत्वाची आवश्यकता वाटली तर जगांत सुव्यवस्था राहण्याकरितां, शांतता राहण्याकरितां, राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहारांचें परिणामकारक नियंत्रण करण्याकरितां, आंतरराष्ट्रीय संघटनेला प्रभुत्वाची, सार्वत्रिक सत्तेची, आवश्यकता आहे हें सहज मान्य होण्यासारखें आहे. अशा संघटनेची आवश्यकता मान्य केल्यानंतर, तिला यावयाची सार्वत्रिक मान्यता व निष्ठा, संघटित करणें अशक्य नाहीं. एका राज्यांतील मूठभर लोकांनीं ठरवावें व जगभर युद्धाचा वणवा पेटवावा हें मनुष्याच्या प्रगतीला व बुद्धिमत्तेला कमीपणा आणणारें आहे. जेव्हां प्रथम राज्य संघटन प्रभुत्वाचे दृष्टीनें स्पष्ट झालें, त्याचें प्रभुत्व, आंतरराष्ट्रीयदृष्ट्या मान्यता पावलें, त्या वेळीं स्वतंत्र, सत्ताधीश व प्रभुत्वपूर्ण अशा अनेक राज्यांना नियंत्रण करणारी शक्ति नव्हती हें खरें. तथापि, जर राज्य हीसुद्धां एक उत्क्रांत घटना आहे तर आंतराराष्ट्रीय अशी प्रभुत्वपूर्ण, सर्व राज्यांना प्रभावीपणें नियंत्रण करणारी संघटना कां उत्क्रान्त होऊं नये असा प्रश्न साहजिक उपस्थित होतो. अशा संघटनेच्या अभावीं, जगांतील झालेल्या व होत असलेल्या युद्धांनीं किती हाहाःकार उडविला आहे याची जाणीव सर्वांना आहे. राष्ट्रांराष्ट्रांतील प्रश्न ज्यांचें महत्त्व निव्वळ राष्ट्रीय नाहीं असे प्रश्न सोडविण्यासाठीं कांहीं तरी आंतरराष्ट्रीय संघटन असणें जरूर आहे. सर्व राष्ट्रांना

समान, प्रमाणभूत असे कांहीं संकेत व नियम मानवी व्यवहारासाठीं अवश्य झाले आहेत; त्यांचें नियमन करण्यासाठींही अशा संघटनेची जरुरी आहे. पण असें संघटन झालें म्हणजे तें एक प्रकारें राज्याच्या प्रभुत्वाला थोड्या प्रमाणांत तरी मर्यादा घालणारें होणार हेंही तितकेंच खरें. राज्य ज्याप्रमाणें व्यक्तीच्या स्वातंत्र्याला मर्यादा घालतें त्याच कारणाकरितां हें आंतरराष्ट्रीय संघटन अथवा राष्ट्रसंघ, राज्याच्या स्वातंत्र्याला, प्रभुत्वाला मर्यादा घालतें. कारण कांहीं बाबतींत तरी अखेरचा निर्णय राज्य न घेतां हा संघ, हें संघटन घेईल व तेवढ्यापुरतें राज्याचें प्रभुत्व मर्यादित झालें. त्याचप्रमाणें व्यक्तीना दोन निष्ठा प्राप्त होतील, राज्यनिष्ठा अथवा देशभक्ति व आंतरराष्ट्रीय निष्ठा. या दोन्हींत विरोध उत्पन्न झाल्यास श्रेष्ठतर निष्ठा म्हणजे आंतरराष्ट्रीय निष्ठा त्यानें अधिक मानली पाहिजे. देशप्रेमानें अंध न होतां विवेकानें जें अधिक सार्वजनिक हिताचें तें वंद्य व वर्तनीय मानलें पाहिजे.

राज्य प्रभुत्वपूर्ण झालें त्यामुळें आंतरराष्ट्रीय असें काय झालें व व्हावें हें थोडेसें वर पाहिलें. खुद्द राज्यांतच हें प्रभुत्व कसें वर्तू लागलें हें पाहाणें अप्रस्तुत नाहीं. हा इतिहास म्हणजे या प्रभुत्वाला पडलेल्या मर्यादांचाच इतिहास आहे. ज्यांनीं कोणीं अमर्याद व निरपवाद प्रभुत्व गाजविण्याचा पराक्रम केला त्यांना प्रभुत्वालाच मुकावें लागलें असा इतिहासाचा दाखला आहे. राज्य म्हणजे अपौरुष अशी काम करणारी संघटना नव्हे; राज्य म्हणजे माणसें, माणसांच्या मार्फतच त्याचें काम चालणार. राज्याचें काम चालविणारें जें संघटन तें सरकार हें सुद्धां अपौरुष नाहीं. तेंही माणसांचेंच व जेथें जेथें अमर्याद व निरपवाद रीतीनें सत्ता चालविण्याचा प्रयत्न सरकारनें केला आहे तेथें तेथें तो फार वेळ टिकला नाहीं. तें सरकार स्थिर झालें नाहीं, टिकलें नाहीं. राज्याचें प्रभुत्व तत्वतः अमर्याद व निरपवाद, पण व्यवहारांत, अनुभवांत त्याला मर्यादाच पडतात. इंग्लंड, फ्रान्स, रशिया, वगैरे देशांतून जे उठाव प्रचलित राज्यसत्तेविरुद्ध झाले ते सर्व प्रभुत्वाची मर्यादाच दाखवितात. कांहीं सर्वमान्य संकेत व नियम यांना अनुसरून राज्यसत्ता वागेल तरच तिला मान्यता मिळेल, तिचें प्रभुत्व स्वीकारलें जाईल हीच गोष्ट इतिहासांत झालेल्या क्रान्त्या दर्शवितात. राज्यसत्ता वापरणारांनीं ती कशी वापरावी व कोणत्या कारणाकरितां वापरावी हें परिस्थिती आंखून देते. राज्याचें प्रभुत्व परिस्थितीच्या लव्याजम्यानें घेरलेलें असतें. भालदार, चोपदार चालतील त्या गतीवर राजा चालतो, हीच त्यास मर्यादा बसते. भालदार, चोपदार राजाचें ऐकतात तरी; परिस्थितीचें उलट ऐकावें लागतें. परिस्थितीच्या मर्यादा ओलांडल्यास राज्यसत्तेला, प्रभुत्वालाच मुकावें लागतें. म्हणून जबाबदारी ओळखून

परिस्थिती ओळखून प्रभुत्व वापरावें लागतें, सत्तेचा उपयोग करावा लागतो व असें केलें तर तिला स्थिरता आहे, तरच ती टिकते. तत्त्वतः निरपवाद व अमर्याद असलेलें प्रभुत्व अनुभवांत असें मर्यादित व जुळवून घेणारें असतें.

वरील विचारसरणींत जें राज्याचें स्वरूप मानलें आहे तें एकसंधि एकतापूर्ण [ Unitary ]. प्रादेशिकदृष्ट्या राज्याचा विस्तार कितीहि मोठा असो अगर विखुरलेला असो, राज्याचा कारभार एकसंधीपणानें चाललेला असेल तर तें राज्य एकतापूर्ण स्वरूपाचें. उलट अनेक प्रांत अगर प्रदेश कांहीं बाबतींत स्वायत्त, स्वतंत्र व समान व सर्वांच्या हिताच्या बाबतींत एका मध्यवर्ती सत्तेच्या अधिकाराखालीं नियंत्रित असें राज्याचें स्वरूप असेल तर तें संयुक्त राज्य [ Federal ] होय. संयुक्त राज्यांतील अनेक राज्यें अगर प्रांत आपआपल्या अधिकारक्षेत्रांत स्वतंत्र व प्रभुत्वपूर्ण, पण त्याचबरोबर मध्यवर्ती राज्याचा अधिकारहि त्यांना मानावा लागतो. उलट मध्यवर्ती राज्य कांहीं बाबतींत प्रभावी व प्रभुत्वपूर्ण, पण ज्या बाबी घटक राज्यांना दिल्या आहेत अगर त्यांच्या अशा ठरल्या आहेत त्या कामीं सत्ताहीन. या परिस्थितींत असा प्रश्न उपस्थित होतो कीं, राज्य प्रभुत्वपूर्ण आहे कीं नाहीं ? राज्याचे घटनेनें अधिकारांची विभागणी केली त्याप्रमाणें अधिकार चालणार म्हणजे दोन राज्यें झालीं. पण राजकीयदृष्ट्या व आंतरराष्ट्रीयदृष्ट्या राज्य तर एकच मानलें जातें, म्हणजे संयुक्त राज्य व त्याचें तर प्रभुत्व अर्धवट व अनिश्चित. राज्यांत अखेरचा निर्णय देणारी सत्ता पाहिजे व तीच प्रभुत्वपूर्ण असते. मग संयुक्त राज्यांत ही सत्ता कोण वापरतो, कोणामध्यें ती अधिष्ठित असते ? अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें पाहिलीं तर घटनेप्रमाणें कॉंग्रेसचे अधिकार मर्यादित, घटकसंस्थानांचे अधिकार मर्यादित, घटनेंत फेर करण्याचे अधिकारांतसुद्धां मर्यादा. घटकसंस्थांनांना सेनेटमध्यें धाडण्याचें प्रतिनिधित्व कमीजास्त करतांच येत नाहीं, त्रिकालाबाधित तें राहिलें पाहिजे!! खुद्द प्रभुत्वालाच येथें मर्यादा. राज्यसुद्धां घटनेला बदलूं शकत नाहीं!! निदान अशी घटनात्मक व्यवस्था तरी आहे. कॉंग्रेसनें केलेले कायदे घटनेला अनुसरून आहेत का त्यांत अधिकारातिक्रम आहे हें मुख्य कोर्ट ठरविणार. म्हणजे मुख्य कोर्ट हें प्रमुख सत्ताधीश, अखेरचा निर्णय देणारें झालें, पण या कोर्टाचा निकाल घटनेंत जरूर तो फरक करून, निरर्थक करतां येतो. म्हणजे मुख्य कोर्ट ही प्रभु अगर प्रमुख नाहीं. कॉंग्रेस नाहीं, कोर्ट नाहीं, घटकसंस्थानें नाहींत, मग प्रभु कोण, प्रमुख सत्ता कोणाची का या संयुक्त राज्यांत प्रभुत्व नसतेंच ? राज्य प्रभुत्वाशिवाय शक्यच नाहीं हें तर उघड आहे. संयुक्त राज्य प्रभुत्वपूर्ण आहे. घटनेप्रमाणें हें प्रभुत्व विभागलेलें दिसलें

तरी त्याचें संकलित स्वरूप कमी होत नाहीं. मूठभर साखर पसरली तरी प्रत्येक कणांत गोडी असते व गोडी हें सामान्य स्वरूप पसरण्यानें कमी होत नाहीं. अखेर निर्णय देणारी सत्ता असते म्हणून तर कायदे मानले जातात. ही सत्ता घटनेच्या व्यवस्थेप्रमाणें निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळी वापरतात येवढेंच. नाटकांत नायकाचें-हिरोचें काम करणारा बदलला तरी नायकाची भूमिका बदलत नाहीं. त्याचप्रमाणें निर्णायक सत्ता वापणारें पात्र बदलतें, भूमिका मात्र अचल आहे. राज्य, मग तें एकसंधि एकतापूर्ण असो अगर संयुक्त स्वरूपाचें असो, प्रभुत्व हाच त्याचा जीवनाधार अगर आत्मा आहे. प्रभुत्व नसेल तर आपल्या आज्ञा मान्य करून घेण्याचे सामर्थ्य व सत्ता त्यांत नसेल तर राज्य हें राज्य नाहीं, एक निर्जीव संघटन तें होईल.

राज्याच्या प्रभुत्वाचें स्वरूप प्रजेला दिसतें तें विधि अगर कायद्याचे रूपानें. राज्य या संघटनेंत कोणी तरी आज्ञा करणारा पाहिजे, कुणी तरी कायदा करणारा पाहिजे. तो एक असेल, अनेक असतील अगर एकादें मंडळहि असेल. हे सर्व कायम असतील, अगर बदलणारे असतील; मुख्य गोष्ट अशी आहे कीं निर्णायक आज्ञा देणारी व्यवस्था हवी व जो आज्ञा देईल त्याचें ऐकलें जाईल. तत्त्वतः आज्ञा देणारी ही सत्ता निश्चित व निरपवाद आहे. जर ही सत्ता अन्य कोणाला जबाबदार अगर दुय्यम असेल तर ती प्रभुत्वपूर्ण नाहीं म्हणून ती तत्त्वतः निरपवाद सत्ता चालविणारी मानली पाहिजे. त्याचप्रमाणें ही सत्ता निश्चित व एकसंधि पाहिजे नाहीं तर तिचा सार्वत्रिक अधिकार राहाणार नाहीं. कांहींनीं ऐकावें, अगर कांहीं बाबतींत ऐकावें असें झालें तर तिच्यांत अपूर्णत्व येतें, म्हणून तत्त्वतः ती पूर्णच असते व तशी मानली पाहिजे. कारण निर्णायक सत्तेनें केलेली आज्ञा अगर कायदा हा सार्वत्रिक व त्याला सर्वमान्यता असली तर तो कायदा, नाहीं तर त्याला किंमत नाहीं. कायदा अगर विधि म्हणजे प्रभुत्व असलेल्या सत्तेची इच्छा. अमुक करावे अगर करूं नये याप्रमाणें विधिनिषेधाचे रूपानें राज्यांतील प्रभुत्व आज्ञा देत असते व न मानणारास दंड करीत असते. इतरांना आज्ञा करतें पण स्वतः कोणाची आज्ञा मानीत नाहीं, हेंच प्रभुत्वाचें कायद्याचे दृष्टीनें मुख्य लक्षण आहे. कायद्याचें जनक, पण कायद्याचें अंकित तें नाहीं. पाण्यापासून अग्नि झाला पण पाण्याविरुद्ध त्याचा प्रभाव नाहीं तशीच तत्त्वतः येथें स्थिति आहे. प्रभुत्व निरपवाद व अमर्याद म्हणून जें तें इच्छील त्याला अनुसरून आज्ञा देईल, कायदे करील अशी त्याची तात्त्विक भूमिका आहे. कायद्याचे भाषेंत राज्य म्हणजे एक कायदेशीर समाजव्यवस्था कीं, ज्यांत निश्चित व

निरपवाद सत्ता निर्णायक अधिकार गाजविते. तसेंच ही सत्ता अमर्याद असते. तिचा उपयोग योग्य होईल अगर अयोग्य होईल, अन्याय्य रीतीनेंहि होईल; कसा होईल हें येथें केवळ कायद्याचे दृष्टीनें प्रभुत्वाचा विचार करतांना महत्त्वाचें नाहीं. कोण उपयोग करतो, त्याला अधिकार आहे कीं नाहीं हेंच कायद्याचें दृष्टीनें महत्त्वाचें आहे. अधिकारी सत्तेनें दिलेला हुकूम अगर आज्ञा म्हणजे कायदा. नैतिकदृष्ट्या कायदा हीन, अप्रयोजक असेल, पण समर्थाचे येथील श्वानाप्रमाणें त्यास मान दिला पाहिजे, नाहींतर दंड आहे. त्याचप्रमाणें कायद्याचें स्वरूप आज्ञापक असतें. अमुक करावें अगर करूं नये, त्यांत ऐच्छिक असें नाहीं, विनंति नाहीं, हुकूम आहे.

प्रभुत्वाकडे, राज्यसत्तेकडे पाहाणारी वरील दृष्टि एकांगी आहे हें सहज लक्षांत येईल. वकिलाची दृष्टि जशी कायद्याचा अर्थ करतांना संकुचित असते, व काटेकोरपणें शब्दाकडे बघते, तीच परिस्थिती वरील विचारसरणी स्वीकारतांना होते. प्रत्येक कायदा आज्ञापक स्वरूपाचा व त्याची अमान्यता केल्यास दंड हें अक्षरशः अनुभवास येत नाहीं. प्रत्येक कायदेभंगाबद्दल यथार्थ दंड करण्याइतकें अमाप सामर्थ्य राज्यांत असतें हेंही खरें नाहीं. त्याचप्रमाणें प्रत्येक कायद्याचें पालन व्हावें म्हणून सामर्थ्याचा अगर सत्तेचा उपयोग करण्यांत येतो, हेंहि खरें नाहीं. तसेंच कायद्याचें स्वरूप निरपवाद रीतीनें व यथार्थतः आज्ञपकच असतें असेंहि नाहीं आणि याचें कारण म्हणजे समाजांतील व्यक्तींच्या इच्छेचें, बुद्धीचें सामुदायिक स्वरूप राज्य असल्यामुळें, सामान्यतः राज्याच्या इच्छा अगर त्यांचें कायदारूपी स्वरूप समाजांतील व्यक्तींच्या इच्छेचें प्रतिबिंब असतें. ज्या प्रमाणांत हें प्रतिबिंब यथार्थ असतें, त्या प्रमाणांत कायद्यांतील सत्तेचा भाव, त्याचें दंडविषयक स्वरूप कमी. तसेंच तत्त्वतः जरी राज्य-सत्ता अमर्याद असली तरी प्रत्यक्ष तिचें प्रभुत्व मर्यादित झालेलें असतें. जेथें सरकारनें, आपलें प्रभुत्व अमर्यादरीतीनें वापरण्याचा प्रयत्न केला, तेथें तेथें, त्याला मर्यादाच बसल्या, बंधनें उत्पन्न झालीं. लोकांनीं तीं उत्पन्न केलीं, धर्मानें आंखून दिलीं अगर परंपरेनें तीं उभीं केलीं, पण सर्वत्र दिसून आलीं हें खरें. अपराधी ब्राह्मणाला मृत्युदण्ड नाहीं ही धर्माज्ञा राज्याचें अगर राजाचें प्रभुत्व मर्यादित करती झाली. परंपरेनें मुसलमानी सुलतानांना वाकविलें. इंग्लंडमध्यें अमर्याद राज्यसत्तेला लोकांनीं नमविलें. तथापि, तत्त्वतः व कायदेशीर दृष्टीनें राज्य वाटेल तें करूं शकेल, मात्र प्रत्यक्ष ही अमर्याद सत्ता न वापरण्यांतच तिचा उपभोग असतो, व वापरतांच तिचा नाश होतो असा इतिहासाचा दाखला आहे. हें शस्त्र न वापरण्याचे शर्तीवरच जणूं कांहीं राज्यसत्तेला मिळालें आहे.

इंग्लंडमध्यें पार्लमेंटचे सल्ल्यानें राजानें कांहींहि कायदा केला तरी तो तत्त्वतः मानला जाईल. तथापि, पार्लमेंटाधिष्ठित राजा ( King in Parliament ) प्रत्यक्ष व्यवहारांत अमर्याद सत्ता चालवूं शकत नाहीं. मतदानाचा हक्क, संघस्वातंत्र्याचा हक्क पार्लमेंटला काढून घेणें अशक्य आहे. पार्लमेंट सर्वसत्ताधीश आहे, सर्व करूं शकते, फक्त पुरुषाला स्त्री करूं शकत नाहीं, असें विनोदानें त्या सभेचें प्रभुत्व वर्णन केलेलें आहे. पण वस्तुस्थितींत तिच्या प्रभुत्वाला मर्यादा आहेत. उद्यां मजूर-संघ ती बंद करूं म्हणेल तर ती सभाच राहाणार नाही. व्यक्तिस्वातंत्र्याचे हक्क ती निमूर्लन करूं म्हणेल तर ती क्षणभर टिकणार नाहीं. तात्पर्य, कायदेशीर व तत्त्वतः अमर्याद असलेलें प्रभुत्व कोणत्या मर्यादेंत वागतें व तिनें वागलें पाहिजे हें त्या देशाची व त्या त्या पिढींतील तत्कालीन परिस्थिती ठरविते व त्याची जाणीव प्रजेला व राज्या-लाही असते. पार्लमेंटचेंच उदाहरण घेतलें तर तिचें धोरण सारखें बदलत असतें. पोटनिवडणुकींतून सुद्धां दिसून येणारें लोकमत ध्यानांत घेऊन ती आपलें जहाज हांकतें. पार्लमेंट सत्ताधीश खरी, पण तिला लोकमताचा कल पाहून पाऊल टाकावें लागतें. जेथें जेथें लोकमत प्रभावी व संघटित तेथें तेथें राज्य लोकमतानें घेतलेले निर्णय अंम-लांत आणणारी संघटनाच होतें. तत्त्वतः हें प्रभुत्व अमर्याद व कोणाचेंहि न ऐकणारें, पण व्यवहारांत मर्यादित व लोकमतानुवर्ती होतें. आवाज त्यांचा पण आशय मात्र दुसऱ्याचा, लोकमताचा.

घटनेच्या व्यवस्थेप्रमाणें अखेरचा निर्णय घेणारी सत्ता कोणत्या वेळीं कोणती हें ठरलेलें असतें. संयुक्त राज्यांत काय, किंवा एकसंधि व एकतापूर्ण राज्यांत काय ही सत्ता असलीच पाहिजे. तिचें अस्तित्व आहे मग तिचें अधिष्ठान पण असलेंच पाहिजे. तें बदलत असेल म्हणून तें नाहीं असें मात्र नव्हे. कांहीं घटनांतून संपूर्ण अधिकार, प्रभुत्वपूर्ण अधिकार विधिमंडळाला असतात. कांहीं घटनेमध्यें सामान्य कायदे व घटनात्मक कायदे यांत फरक केलेला असतो. ज्या कायद्यांमुळें मूलभूत घटनेंत फरक पडेल ते कायदे पसार करण्याचा एक विशिष्ट विधि असतो. सामान्य कायदे पसार करण्याच्या विधीपेक्षां हा निराळा असतो. अमेरिकेच्या संयुक्त संस्था-नांचे घटनेंत घटनात्मक फेरफार करणारा कायदा पास करण्याचा विधि निराळा व दीर्घसूत्री. तीच गोष्ट बेल्जमचे घटनेंत आहे. किंबहुना जेथें जेथें मूलभूत अशी घटना तयार करून राज्यकारभार सुरू आहे तेथें तेथें सामान्यतः घटनाकात्मक फेरफार करण्याचा विधि निराळा व दीर्घसूत्री असतो. मूलभूत घटनाकायद्यांत नागरिकहक्क असे मूलभूत म्हणून मान्यता पावलेले असतात. त्याचप्रमाणें राज्ययंत्राचे

स्वरूपाचे बाबतही व्यवस्था असते. त्यांत बदल करावयाचा म्हणजे विधिमंडळांत तो प्रथम व्हावयास पाहिजे. नंतर पुन्हा विधिमंडळाची निवडणूक होते अगर तो बदल लोकमताकडे मान्यतेसाठीं पाठविला जातो. नवीन विधिमंडळानें सदरहू बदल पुन्हां पास केला अगर लोकमतानें मान्यता दिली तरच तो बदल घटनेंत होतो. अमेरिकेचे घटनेंत तर याहीपेक्षां दीर्घसूत्रीपणा आहे. घटकसंस्थानांच्या विधिमंडळांतून तो पास व्हावा लागतो. तात्पर्य, बदल करण्याची पद्धत विविध व संकीर्ण असेल पण बदल करण्याची सत्ता सर्वत्र मान्य केलेली आहे. ही सत्ता, हें प्रभुत्व विधिमंडळांत असेल, पार्लमेंटाधिष्ठित राजांत असेल, प्रसंगीं मतदारसंघांत असेल; तें अस्थिर असेल म्हणून तें अस्तित्वांत नाहीं असें मात्र नाहीं. तत्त्वतः तें निश्चित आहे व अमर्याद आहे. व्यवहारांत तें कसें कार्यकारी होतें हें वर आलेंच आहे. कांहींच्या मतें विद्यमान काळीं प्रभुत्व वापरणारें संघटन म्हणजे कायदेशीर प्रभुत्वाचें अधिष्ठान; अन्य शब्दांत विद्य-मान सरकार म्हणजे कायदेशीरदृष्ट्या प्रभुत्वाचें मालक व मतदारसंघ कीं जो सर्व सत्तेचें मूळ आहे तो राजकीय प्रभुत्वाचा मालक. पण प्रभुत्व असें विभागण्याचें कारण नाहीं व तसें करणें चूकही आहे. प्रभुत्व एकच आहे, पाहाण्याचे दृष्टिकोन निराळे आहेत. मतदारसंघसुद्धां घटनेंतील व्यवस्थेला अनुसरूनच प्रभुत्व गाजवितो, म्हणजे त्यांत कायदेशीरपणा आलाच व विद्यमान सरकार कायदेशीर प्रभुत्व गाजवितें तें कांहीं राजकीय प्रभुत्व असल्याशिवाय गाजविणें शक्यच नाहीं. मतदारसंघाचा प्रतिनिधी म्हणून विद्यमान सरकार असतें; तसेंच जनतेचा प्रतिनिधी म्हणून विद्यमान सरकार अधिकार सांगतें. जनतेनें स्वत्वानिवृत्ति केली नाहीं, आपल्या प्रभुत्वाचा कायमचा त्याग केला नाहीं; मर्यादित काल व मर्यादित कारणापुरती ही प्रभुत्वाची देणगी दिलेली असते. या व्यवस्थेंत जनतेचेंहि प्रभुत्व कमी होत नाहीं व विद्यमान सरकारचेंहि प्रभुत्व कमी होत नाहीं व तत्त्वतः तें विभागलेंहि जात नाहीं.

राज्यांत प्रभुत्त्वाचें प्रभावी अधिष्ठान म्हणजे जनता; आधुनिक राज्यांतील घट-नेंतून हें जाहीरपणें मान्यहि करण्यांत आलेलें आहे. राज्यांतील प्रभुत्व जनतेचें आहे, सर्व सत्तेचें मूळ जनता आहे अशीं व अशा अर्थाचीं वाक्यें अनेक देशांचे घटनेंत आहेत. तथापि, हें तत्त्वतः बिनचूक असलें तरी व्यवहारांत काय घडतें तें पाहिलें पाहिजे. आमजनता एकसंधि संघटनेंत येऊन हल्लींचे काळीं दैनंदिन राज्यकारभार हांकूं शकत नाहीं. हल्लींच्या राज्यकारभाराचा व्याप मोठा, त्याचें स्वरूपहि विविध. क्षणाक्षणाला हजारों निर्णय घ्यावे लागतात. या परिस्थितींत सारखें व सतत लोकमत पाहाणें अगर त्याची नोंद घेणें ( **Referendum** ) अशक्य आहे. शिवाय पुष्कळ

वेळां लोक देतात तें मत नसतें व पुष्कळ वेळां दिलेलें मत लोकांचें नसतें ! ! लोकमत अंदाजावयाचें हें मोठें नाजूक काम आहे. भावनाप्रधान जनता प्रसंगीं काय कौल देईल हें कोणी निश्चितपणें सांगू शकत नाहीं. योग्य, अयोग्य हें केवळ या परिस्थितींत संख्याधिक्यानें ठरविलें जातें, हाही आक्षेप अगदींच त्याज्य नाहीं. ५१ टक्के लोकांनीं होय म्हटलें तें योग्य व विरुद्ध ४९ टक्के असलेलें मत कदाचित् योग्य असून अप्रभावी ठरतें. लोकमताऐवजीं तटस्थ व आटोपशीर संख्या असलेल्या संस्थांकडे हें योग्यायोग्य ठरविण्याचें काम घटनेनें दिलें तरी सुध्दां त्यांत आक्षेप घेतां येणार नाहींत असें मात्र नाहीं. अमेरिकेंतील ९ न्यायाधिशांपैकीं ५ म्हणतील तेंच खरें व योग्य असें घडतें व तें नेहमींच इष्ट असतें अगर योग्य असतें असाही अनुभव नाहीं. तथापि, या दोषामुळे लोकमतांत अगर जनतेंत असलेलें प्रभुत्व योग्य रीतीनें स्पष्ट होणार नाहीं येवढेंच. पण तें प्रभुत्व नाहींच असें मात्र होत नाहीं. जनतेतर्फे विद्यमान सरकारनें प्रभुत्व चालविलें म्हणजे जनता त्याला मुकली ही रूसोची विचारसरणी एकांगी आहे व अनुभवाविरुध्द आहे. त्याचप्रमाणें विद्यमान सरकारला जनतेनें मर्यादित प्रभुत्व व मर्यादित कालापर्यंत दिलें म्हणून त्या प्रभुत्वाला कमीपणा येत नाहीं अगर तेवढ्यानें विद्यमान सरकारची प्रतिष्ठा, नैतिक प्रतिष्ठासुध्दां कमी होते असेंहि नाहीं. जनतेचें प्रभुत्व विद्यमान सरकारनें योग्य रीतीनें वापरलें कीं नाहीं याचें गमक म्हणजे समाजांतील एकाद्या वर्गाचे फायद्याकडे त्याचा उपयोग होतो का आमजनतेचे फायद्याकडे होतो हें होय. आमजनतेच्या फायद्याकडे त्याचा उपयोग होत असेल तर तें राजकीयदृष्ट्या चांगलें. पण नुसता उद्देश असून उपयोग नाहीं. अनुभव तसा पाहिजे; जाहीरात उपयोगी नाहीं गुण अनुभवाला आला पाहिजे.

प्रभुत्वाकडे पाहाण्याची केवळ कायदेशीर दृष्टि ही एकांगी असते हें वर आलेंच आहे. राज्यसंघटनेंत विधि अगर कायदा याचें महत्त्व कमी आहे असें मात्र नाहीं. राज्य कायदा करतें. कायदा म्हणजे भाषेला जसें व्याकरण तसें लोकव्यवहाराला कायदा होय. शुद्धाशुद्ध व्याकरण पाहून ठरवितां येतें, तीच गोष्ट सामान्यतः कायद्यासंबंधीं म्हणतां येईल. व्याकरणदृष्ट्या चूक असलेले प्रयोग जसे आर्ष म्हणून मान्यता पावतात, तसेंच प्रसंगीं कायद्याविरुद्ध असलेलें वर्तन अप्रतिष्ठित व अनैतिक ठरतें. भाषेला जितकी व्याकरणाची आवश्यकता तितकीच समाजाला, राज्याला कायद्याची आवश्यकता आहे. आधीं भाषा मग व्याकरण, आधीं लोकव्यवहार, लोककल्याण मग कायदा हा क्रम यथार्थ आहे. म्हणूनच लोकव्यवहाराला सोडून कायदा फारसा जाऊं शकत नाहीं. पाण्याचा ओघ पाहून घाट बांधणें श्रेयस्कर ठरतें, नाहीं तर हास्यपद

स्थिति होते. कायदा अगर विधि याचा पाया अगर पार्श्वभूमी म्हणजे समाजव्यवहार, लोकव्यवहार होय. विद्यमान कायदा लोकव्यवहाराचा व राज्यसत्तेचा, राज्याचा काय संबंध आहे हें दर्शवित असतो. कायदा कोण करतो, यापेक्षां त्यांना कां करावा लागतो हें राजकारणाचे दृष्ट्या जास्त महत्त्वाचें असतें. कारणावर सत्ता असली कीं कार्यावर आलीच. आणि या दृष्टीनें विचार करतां राज्याचें, त्याच्या प्रभुत्वाचें राजकीय स्वरूप महत्त्वाचें ठरतें.

राजकीयदृष्ट्या विचार करूं लागल्याबरोबर एक गोष्ट अत्यंत महत्त्वाची अशी दृष्टीसमोर येते, ती ही कीं, राज्यांत, राज्यसंघटनेंत कुणी तरी सर्वसत्ताधीश पाहिजे कीं ज्याचे सत्तेला मर्यादा नाहीं. राज्याचें अमर्याद प्रभुत्व हें त्याचे ठिकाणीं अधिष्ठित असतें. हें प्रभुत्व तत्त्वतः अमर्याद असलें तरी व्यवहारांत त्याला मर्यादा संभाळाव्या लागतात. प्रभुत्व वापरणारे जे इच्छितील त्यावर समाजांतील अनेक हितसंबंध परिणाम करीत असतात. स्वयंभूपणें सत्ताधीश कांही तरी इच्छितात व करतात असें नसतें. त्यांच्या मनावर नाना गोष्टींचे परिणाम होऊन, मग त्यांचा निर्णय येत असतो. राज्यसत्तेच्या प्रत्येक निर्णयामागें काय काय घडामोडी झाल्या, कोणकोणत्या हितसंबंधांनीं त्यांचें स्वरूप निश्चित केलें हें सांगणें अवघड आहे. तसेंच म्हणावयाचें झाल्यास निर्णयाबाबतचे नक्की प्रभुत्व वस्तुतः कोणीं वापरलें हेंही सांगणें कठीण आहे. तथापि, जें निश्चित आहे तें हें कीं, हें प्रभुत्व आहे व तें वापरलें जात आहे. भोजनानें भूक शमली पण भोजनांत नानाविध पदार्थ होते, अमुकानें भूक शमली असें म्हणणें कठीण. भूक शांत झाली हें तर निश्चित. भूक शमेल इतकें भोजन पाहिजे असें फार तर म्हणतां येईल व मर्यादा घालतां येईल. त्याचप्रमाणें राज्य—सत्ता, एक मर्यादा दाखविते, तिच्या चतुःसीमेंत, समाजांतील व्यक्तींनीं, अन्य हितसंबंधांनीं सत्तेच्या निर्णयावर परिणाम करावा, व त्या मर्यादेंत साधारणपणें राहावें. राज्याचें प्रभुत्व अगर राज्याची सत्ता ही विद्यमान सरकारचे मार्फत वापरली जात असल्यामुळें राज्याचा निर्णय म्हणजे विद्यमान सरकारचा निर्णय हें उघड आहे. विद्यमान सरकारचा निर्णय अगर इच्छा म्हणजे ज्या प्रजेवर, ज्या नागरिकांवर ते अधिकार चालवितें, त्यांनीं मानलेला निर्णय; अर्थात् जो अनेक व्यक्तींच्या व अन्य हितसंबंधांच्या इच्छेचा परिणाम होऊन झालेला असतो. या परिस्थितींत हा निर्णय अगर ही इच्छा बेजबाबदार असूं शकत नाहीं. संघटनेंत अगर घटनेंत व्यवस्था असेल त्याप्रमाणें ज्यांच्या हातीं सत्ता दिली असेल अशा अल्पसंख्य लोकांनीं हा निर्णय घेतलेला असतो. सर्व हितसंबंधांचा विचार करून त्यांचा जो परिणाम त्यांचे मनावर झाला असेल, त्याचा विचार करून

जें मत त्यांचें बनेल तें म्हणजे हा निर्णय होय. तें त्यांना योग्य वाटलें म्हणून केलें. तें कदाचित् समाजाला अयोग्य वाटेल. या निर्णयामागें ज्या गोष्टी त्यांनीं गृहीत धरल्या त्या चुकीच्याहि असतील. अनुभव कदाचित् निराळाही असेल, कदाचित् राज्याच्या मौलिक गोष्टींचाहि त्यांत विपर्यास असेल, हें सर्व शक्य आहे. म्हणून आधुनिक राज्यसंघटनेंतूनच विद्यमान सरकार, हें ठराविक काल अधिकारारूढ राहावें व पुढें राहाणें असल्यास पुन्हां त्यानें जनतेची मान्यता घ्यावी अशी व्यवस्था असते. यामुळें ठराविक काल झाल्याबरोबर ज्यांच्यावर तें राज्य करतें, ज्यांना त्याच्या बऱ्या-वाईट राज्यकारभाराचा अनुभव आलेला असतो, त्यांना, त्या जनतेला योग्य वाटल्यास खांदेपालट करून दुसरीं माणसें अधिकारी सत्तेवर, विद्यमान सरकार म्हणून नेमण्याची संधि मिळते. याचा अर्थ राज्यसत्ता वापरण्याची मिरास कोणालाहि नाहीं. यावत्चंद्रदिवाकरौ अधिकार गाजविण्याचा ताम्रपट अगर मिरासपत्र कोणत्याहि सरकारला नाहीं. निरंतरचा भोगवटा कुणालाही नाही. खंडानें ठराविक काल सत्ता उपभोगण्यास दिली जाते. कुळानें मालकी हक्कास बाध आणणारें कृत्य केल्यास मुदतीची सबब न सांगतां जसें मालक त्यास काढूं शकतो, तसेंच जनता विद्यमान सरकारला सत्सम परिस्थितींत ठराविक काल संपण्यापूर्वीही काढून टाकते. तशी व्यवस्था आधुनिक घटनेंत असते. बिनशर्त व बिनमुदत सत्ता दिली तर ज्यांच्यावर ती गाजविली जाते त्यांचा नाश होतो हा अनुभव आल्यामुळेंच ही ठराविक काल सत्ता देण्याची योजना प्रसृत झाली. सालवार भाडेपट्टा देऊन कुळाला जमीन दिल्यानें कदाचित् तिची मशागत चांगली होत नाहीं, पण कुळ मालकी बळकावून शिरजोर तरी होणार नाहीं येवढी तरी खात्री असते. हाच अनुभव अगर भीति, अगर दक्षता वरील योजनेच्या बुडाशीं आहे.

ठराविक कालानंतर विद्यमान् सरकारनें पुन्हां लोकमताकडून मान्यता मिळवावी व नंतर अधिकारावर राहावें या योजनेंत लोकमत अंदाजण्याच्या पद्धतीला साहजिक महत्त्व येतें. लोकमत हें खरेंखुरें लोकमत पाहिजे. निवडणुकीचें यंत्र जर निर्दोष नसेल, जर त्यांत लांचलुचपत, लबाडी, धाकधपटशा यांना वाव असेल तर ती निवडणूक खरें लोकमत दर्शवीत नाहीं. निवडणुकीची व्यवस्था किंवा लोकमत नोंदण्याची व्यवस्था विद्यमान् सरकार, जें अधिकारारूढ आहे त्याकडेच असणार. या परिस्थितींत, तें सौजन्यानें, समबुद्धीनें वागेलच अशी खात्री नसते. मतें नोंदण्याचा दिवस, वेळां, स्थळें, देखरेख करणारीं माणसें, प्रत्यक्ष मतदानाची पद्धत या सर्वांत स्वतःला सोयीस्कर असे फरक करून लोकमताचा विपर्यासहि करतां येतो. ही

सर्व सत्ता हातांत असतां न्याय्यबुद्धीनें, निःपक्षपातपणें व्यवस्था करणें ही परंपरा सरकारनें मान्य केली पाहिजे व त्याप्रमाणें वर्तन झालें पाहिजे. प्रचारसाधनें, सभा, वर्तमानपत्रें व आजकालच्या युगांतील अत्यंत महत्त्वाचें म्हणजे नभोवाणी हीं सर्व, सर्व पक्षांना सारखीं वापरण्यास मिळालीं पाहिजेत. इतकें होऊनसुद्धां क्षणिक भावनेला बळी पडून गैरसमजाचा परिणाम म्हणून लोकमत खरोखर असेल त्यापेक्षां निराळेंहि अनुभवाला येईल. पण हा धोका कमी करणें शक्य आहे, टाळणें शक्य नाही. लोकमतनोंदणीच्या पद्धतीला जसें महत्त्व आहे त्याजबरोबर आणखी एक गोष्ट या योजनेंत महत्त्वाची असते. जे लोक अगर जो गट अधिकारारूढ झाला असेल तो साधारणपणें असा वागण्याचा प्रयत्न करतो कीं, मतनोंदणीच्या वेळीं लोकमत आपले बाजूस राहील, व आपल्यास पुन्हां काम करण्याची संधि मिळेल. याचा अर्थ असा कीं, अधिकारकालांत हा गट अगर हें सरकार लोकांच्या मताप्रमाणें, त्यांचा कल पाहून, त्यांना नाखूष न करतां, त्यांच्या इच्छेच्या इशाऱ्यानुसार वागतें. म्हणूनच नोंदणीचे वेळीं लोकमत त्याचे बाजूनें पडतें. म्हणजेच सरकारची इच्छा अगर निर्णय हा स्वतः सरकारच न ठरवितां बाह्य गोष्टी ठरवितात; लोकमत प्रभावीपणें तो ठरवितें. घटनेचा दुरुपयोग करून तात्पुरती लोकमताची बाजू आपलेकडे आहे असेंही कांहीं वेळां दाखवितां येतें. कायदेमंडळांत सरकारनियुक्त सभासदांना घटनेवर आपलें मत देण्यास सांगून, तें मत लोकमत आहे असें दाखविण्याचा प्रयत्न या देशांत लोकांच्या परिचयाचा आहे. खुद्द इंग्लंडमध्यें वाटेल त्याला उमराव करून वरिष्ठ सभागृहांत सरकारला आपलें बहुमत करतां येणें शक्य आहे. तथापि, घटनेचा तांत्रिक फायदा घेऊन उभें केलेलें लोकमताचें चित्र हें निर्जीव आहे हें लोक ताबडतोब ओळखतात, या बुजगवण्याला कोणी भीत नाहीं. मातीचीं चित्रें मनुष्याचे आकाराचीं जरी झालीं तरी तीं बोलूं शकत नाहींत व हालचालही करूं शकत नाहींत. पुष्कळ वेळां चित्रकारच फसतो व पस्तावतो असाही अनुभव आहे!! पुन्हां अधिकारावर राहावयाचें असेल तर खरोखरच कांहीं तरी लोकांचे मताप्रमाणें घेतलें पाहिजे, त्यांचा अनुनय केला पाहिजे. तें केलें म्हणजे प्रत्यक्ष निर्णय घेणारी सत्ता जरी विद्यमान सरकार दिसत असलें तरी वस्तुस्थिती अशी दिसते कीं, लोकमत त्या निर्णयाला कारणीभूत असतें, त्याची मूर्ति लोकमत घडवीत असतें. शिल्पकार म्हणून मात्र सरकारचें नांव लागलेलें असतें. मागें राहून काम करणारे हे कारागीर कोण, लोकमत म्हणजे प्रत्यक्ष कोण व कोणत्या परिस्थितींत सरकारवर तें प्रभाव टाकतें हें पाहणें या परिस्थितींत महत्त्वाचें होतें.

राज्यांत व्यक्तीला, त्याच्या विकासाला, त्याच्यांत जें श्रेष्ठ आहे, उत्कट आहे तें अनुभवण्याला पूर्ण वाव पाहिजे, तशी संधि त्यास पाहिजे; अशी परिस्थिती राज्य-संघटनेंत असणें अवश्य आहे व असेल तरच तिजबद्दल निष्ठा त्याचे मनांत उत्पन्न होईल. अशी परिस्थिती असणें ही एक मौलिक गोष्ट आहे. जर प्रचलित सत्ता अगर सरकार राज्यांतील कांहीं लोकांना याप्रमाणें संधि देत असेल व कांहीं लोकांना ती नाकारीत असेल अगर अशक्य करीत असेल तर निष्ठेच्या नैतिक पायावरच तो आघात आहे. किंबहुना ज्यांना वरीलप्रमाणें संधि मिळत नाहीं, ज्यांना याप्रमाणें अन्याय होतो त्यांच्या दृष्टीनें ही परिस्थिती चालूं देणारे सरकार विधियुक्त व सनद-शीर ( Legitimate ) ठरत नाहीं. पुढें जाऊन असें म्हणतां येईल कीं, जें सरकार प्रजे-मध्यें फरक करतें, विषम वागणूक दाखवितें तें सनदशीरसरकार या पदवीला लाय-कच नाहीं. राज्यसंघटनेचा जो मुख्य हेतु व्यक्तीचे दृष्टीनें असतो त्याचा विपर्यास होत असल्यामुळें, व्यक्तीवर कुठल्याहि तऱ्हेचें निष्ठा दाखविण्याचें बंधन उरत नाहीं. म्हणून व्यक्तीचे दृष्टीनें जे महत्त्वाचे व मौलिक हक्क कीं ज्यांच्या उपभोगामुळें राज्याचा हेतु सफल होणें शक्य असतें ते स्पष्ट करणें जरूर होतें. सरकारनें, राज्य चालविणाऱ्या सत्तेनें कोणत्या मर्यादा पाळल्या पाहिजेत म्हणजे त्याचें सनदशीर स्वरूप टिकतें हें कळणें जरूर आहे. या मर्यादा म्हणजेच मूलभूत हक्क. हे हक्क नाग-रिकांना आपल्या दैनंदिन जीवनांत जास्तींत जास्त प्रमाणांत उपभोगितां येतील अशी सारखी तजवीज सरकारनें केली पाहिजे. याप्रमाणें वर्तन करणें हें एक सततचें व सनातन नैतिक बंधन सरकारवर आहे. किंबहुना यावरच सरकारचें अस्तित्व अव-लंबून आहे. ज्या प्रमाणांत हे मौलिक हक्क सरकार मानतें व त्यांच्या उपभोगाला वाव देतें, त्या प्रमाणांत तें मान्यता मिळवतें, त्याचीं कृत्यें योग्य ठरतात. हे हक्क नाकारले अगर ते मर्यादित केले अगर त्याबाबत उदासीन वृत्ति दाखविली तर परि-णामीं सरकार प्रजेची मान्यता व निष्ठा गमवितें निदान सरकारला प्रजेनें निष्ठा दाखवावी असें म्हणण्याचा हक्क तरी राहात नाहीं.

जे मौलिक व महत्त्वाचे हक्क म्हणून वर सांगितले ते सर्व कायद्याचे रूपांत असतात असें नाहीं. कायद्याचे रूपांत ते आले कीं तें नाकारणें सरकारला, प्रचलित सत्तेला कठीण असतें. म्हणून सरकार अशा हक्कांना कायदेशीर स्वरूप देण्यालाच पुष्कळ वेळां विरोध करतें. हा विरोध प्रामाणिकहि असेल; मान्यता देणें व कायदे-शीर स्वरूप देणें सरकारच्या मतें योग्य नसेल व शहाणपणाचें नसेल अशी सरकारची, विद्यमान सत्तेची प्रामाणिक समजूतही असेल. सरकारजवळ सत्ता

असल्यामुळें तें सत्तेच्या जोरावर आपला नकार चालू ठेवील, आपलें म्हणणें सक्तीनें अंमलांत आणील. तथापि, असें सरकारनें केलें म्हणून सरकारचें कृत्य समर्थनीय व सनदशीर ठरतें असें मात्र नाहीं. सरकार चूक आहे, अयोग्य वर्तन करीत आहे, केवळ सत्तेच्या जोरावर वागत आहे, याचा अर्थ इतकाच कीं समाजांतील, त्या राज्यांतील जनता, आपलें सामर्थ्य, आपली सत्ता, आपली पार्थिव सत्ता वापरून विद्यमान सरकारला अधिकारापासून दूर करण्याचें योग्य व प्राप्त कर्तव्य करीत नाही. जनतेचा विरोध यशस्वी झाला कीं सरकारचा नकार संपतो. किंबहुना प्रसंगीं तें सरकारच संपतें व यशस्वी विरोधक नूतन सरकार म्हणून पदारूढ होतात, त्यांच्या नांवांचा डंका वाजूं लागतो. परंतु जनतेचा विरोध येवढ्या तीव्र प्रमाणांत नेहमींच होतो असें नाहीं. आपली सत्ता वापरण्यास जनता साधारणपणें तयार नसते. प्रचलित सत्ता जनतेपैकीं कांहीं तरी भागांच्या हितार्थ खपत असते. तेवढे लोक हमखास सरकारच्या बाजूस उभे असतात. विद्यमान सत्तेचा हृदयपालट नैतिक आवाहनानें व आव्हानानेंहि होईल असें पुष्कळांना पुष्कळ काळ वाटत असतें. सरकारचा नकार नैतिकदृष्ट्या असमर्थनीय असल्यामुळें विरोधकांची प्रतिष्ठा वाढते व कालांतरानें विरोधक सत्ता संपादन करून पदारूढहि होतात. जे सनातन व सनदशीर हक्क आहेत त्यांच्या मागें नैतिक आदर्श असल्यामुळें त्यांना केलेला विरोध चिरकाल टिकत नाहीं. किंबहुना त्यांना विरोध करण्यापासूनच सत्तारूपी लक्ष्मी त्यांच्या पराक्रमावर भाळून त्यांच्याकडे जाते. आवश्यक आदर्श म्हणून मानलेले हक्क सत्ता मिळवून प्रस्थापित हक्क झाल्याचीं अनेक उदाहरणें इतिहासांत आहेत, किंबहुना असें होणें अनिवार्य आहे.

हक्क म्हणून जे वर सांगितले ते कांहीं निव्वळ काल्पनिक, असंबद्ध, अवर्णनीय व मोघम अशा स्वरूपाचे नसतात व नाहींतहि. हे सर्व हक्क म्हणजे मागें सांगितल्याप्रमाणें सरकारच्या सत्तेवर असलेल्या मर्यादा होत. त्यांची जाणीव, त्यांचें अस्तित्व स्पष्ट असतें. विद्यमान सत्ता तें ओळखतें. एक तर हे सर्व हक्क अगर या सर्व मर्यादा राज्याचे घटनेंत नमूद केलेल्या असतात. राज्यसत्तेनें विशिष्ट पद्धतीनें वागलेंच पाहिजे अशी व्यवस्था घटनेंत असते. दुसरे घटनेंत नमूद केलेलें नसेल तरी कांहीं राज्यसंघटनेंत कांहीं गोष्टी राज्यसत्ता करूं शकत नाहीं व तसा अलिखित संकेत असतो. धार्मिक स्वातंत्र्य मर्यादित करावयाचें मनांत आणल्यास व तें करण्याला घटनेची अडचण नसली तरी कित्येक राज्यांतून तें शक्य होत नाहीं. त्याचें कारण परंपरा व अलिखित संकेत, यांचे सामर्थ्य व प्रभाव हें होय. हक्क घटनेंत नाहीं पण प्रत्यक्ष आहे व प्रभावी आहे अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. खुद्द इंग्लंडमध्यें अनेक मौलिक हक्क केवळ परंपरेवर

व अलिखित संकेतावर आधारलेले आहेत पण ते अमान्य करण्याची अगर नाहींसे करण्याची ताकद कुठल्याहि विद्यमान सरकारला नाहीं. तात्पर्य, घटनेंत नमूद केलेले असोत अगर संकेतावर, परंपरेवर आधारलेले असोत, कांहीं हक्क असे प्रत्येक राज्य-संघटनेंत असतात कीं त्यांत विद्यमान सरकार ढवळाढवळ करूं शकत नाहीं. आणि असे जितके हक्क जास्त तितक्या प्रमाणांत प्रचलित सत्ता ते बदलण्यास असमर्थ व असहाय असते. हे सर्व हक्क घटनेंत नमूद असल्यास त्यांना कायदेशीर स्वरूप आलेलेंच असतें, नसल्यास कायद्याचे सामर्थ्याइतकेंच सामर्थ्य व प्रतिष्ठा त्यांच्यांत असते. कांहीं ठिकाणीं कायद्याचे सामान्य व घटनात्मक असे दोन भाग करण्यांत येतात. सामान्य कायदे विद्यमान सरकार सहज बदलूं शकतें पण जे घटनात्मक कायदे आहेत व मूलभूत हक्कांसंबंधीचे सर्व कायदे याच स्वरूपांचे असतात, ते विद्यमान सरकारला बदलावयाचे झाल्यास निराळें तंत्र स्वीकारावे लागतें व त्याची व्यवस्था घटनेंतच केलेली असते. नवीन निवडणूक, लोकमतनोंदणी वगैरे विधि केल्याशिवाय हा फरक होऊं शकत नाहीं. लोकमतानें मानला तर प्रश्नच नाहीं; न मानला तर तो फरक होत नाहीं. मुख्य गोष्ट ही कीं, मौलिक बाबतींत हस्तक्षेप करणें प्रचलित सत्तेला अवघड असतें व जेथें लोकमत दक्ष व संघटित आहे व लोकमतावर लक्ष ठेवून सरकारला वागावें लागतें तेथें तर लोकमताच्या अपेक्षांना धक्का देऊन वागणें सरकारला अधिकच अवघड असतें. लोकमताचे दिग्दर्शनाखालीं त्याला वागावें लागतें. खुद्द इंग्लंडमध्यें कायद्याचे दृष्टीनें विचार करतां पार्लमेंटसह राजा लोकमत बाजूला सारून वाटेल तें करूं शकेल, पण परिणामीं तो शिल्लक राहणार नाहीं; प्रभुत्व गाजविण्यांतच प्रभुत्व घालवून बसेल!! म्हणून होणाऱ्या वर्तनापासून, होणाऱ्या कायद्यापासून ज्यांच्यावर त्याचा परिणाम होणार आहे, त्यांची मान्यता, त्यांची संमति सरकारनें मिळविली पाहिजे, निदान ते बंडाला उद्युक्त होणार नाहींत, इतक्या बेतानें सत्ता वापरली पाहिजे तरच ती वापरतां येईल, किंबहुना याच शर्तीवर ती वापरतां येईल.

राज्य–सत्ता तत्त्वतः जेवढी अमर्याद आहे तेवढी वस्तुतः नाहीं. राज्याच्या प्रभुत्वाच्या मर्यादा ते वापरण्यास सुरवात केल्याबरोबर स्पष्ट होत जातात. प्रभुत्व हें अखेरीस माणसांनीं माणसांवर राज्याचे नांवानें गाजवावयाचें असतें. गाजविणारे व ज्यांच्यावर तें गाजविलें जातें हे दोन्हीहि राज्याचे घटक असतात, समाजाचे सभासद असतात. खुद्द समाजांत नाना तऱ्हेच्या संस्था असतात, त्यांचेहि अनेक लोक सभासद असतात. या संस्था धार्मिक असोत, क्रीडाविषयक असोत, व्यापारी असोत, त्या

आपआपल्या सभासदांवर एकप्रकारें नैतिक परिणाम करितात, येवढेंच नव्हे तर सरकारी धोरणावर प्रसंगीं परिणाम करितात. सार्वजनिक संस्था व विशेषें करून राजकीय व व्यापारी या तर प्रामुख्यानें सरकारी धोरण स्वमताप्रमाणें अनुकूल करून घेण्याचेंच कार्य करीत असतात. परिषदा भरवून, ठराव करून, जें कांहीं या थोड्या व प्रसंगीं अल्पसंख्याक लोकांना वाटतें तेंच राष्ट्रहिताचें आहे व सरकारनें तें मान्य करावें असा प्रयत्न सारखा चाललेला असतो. याशिवाय किती तरी व्यक्ति व संकीर्ण संस्था, राष्ट्रांतील सर्व प्रश्नांवर आपआपल्या उपाययोजना सुचवीत असतात. राजकारणांत सुद्धां वैदू नसतात असें नाहीं. त्यांचीहि जडीबुटी मधून मधून दृष्टीस पडतच असते. तात्पर्य, व्यक्ति व अधिक प्रभावानें सार्वजनिक संस्था, विशिष्ट व सामान्य सरकारी धोरणावर, सरकारी निर्णयावर परिणाम करीत असतात व लोकमताचा प्रभाव पडून सरकारी निर्णय बदलल्याचीं अनेक उदाहरणें सहज देतां येतील. महत्त्वाची गोष्ट ही कीं, हें लोकमत अगर त्याचा प्रभाव म्हणजे राज्याच्या प्रभुत्वाला मर्यादा घालणारी शक्ति आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जें क्षेत्र केवळ सरकारचें, त्याचे अधिकारांत, त्यांत त्यानें कसें वागावें यावरच वरील गोष्टीनें नियंत्रण येतें व तें नियंत्रण सूक्ष्म वाटलें तरी प्रभावी असतें.

कुठलाहि समाज अगदीं एकजिनसी, एकसंधि असत नाहीं. सैन्यांतसुद्धां सैनिकांचा पोशाख एकसारखा असला, त्यांचा कवायतीचा भाव सारखा असला, तरी प्रत्यक्ष लढ्याचे वेळीं सैनिकांत व्यक्तित्व दिसून येतें. लष्कराइतकी शिस्त समाजांत असत नाहीं. समाज हा विविधतापूर्ण असणार; किंबहुना त्यांतच त्याचें स्थैर्य व गौरवहि आहे. समाजांतील सर्व व्यक्तींना जे सर्वसाधारण हवें असतें किंवा जे हितसंबंध सर्वसाधारण आहेत, त्या संबंधींचीं कार्यें सामुदायिक संघटनेमार्फत होणें इष्ट व योग्य असतें म्हणून हें क्षेत्र सरकारचें मानलें जातें. त्याचबरोबर कित्येक गोष्टी अशा असतात कीं, सर्व लोकांचा त्यांत हितसंबंध नसतो, कांहीं लोकांचे हितसंबंध त्यांत निगडित असतात; या बाबींत सरकारला पडण्याचें कारण नाहीं. मात्र या बाबींपासून होणारा परिणाम जर सार्वजनिक स्वरूपाचा असेल तर सरकारला त्यांत पडणें योग्य होईल. कुणी कुठें प्रार्थना म्हणावी हें व्यक्तीनें ठरवावयाचें, पण या प्रार्थनेपासून खुदा प्रसन्न होण्याचे ऐवजीं खून पडून सार्वजनिक शांतता भंग पावूं लागली तर सरकारला त्या बाबतींत हस्तक्षेप करणें योग्य होईल. समाज हें सुद्धां एक दृष्टीनें संयुक्त स्वरूपाचें संघटन आहे. त्यांतील घटकांना मर्यादेंत स्वातंत्र्य व साधारण व समान हितसंबंधांत मध्यवर्ती सत्तेचें म्हणजे सरकारचें नियंत्रण असतें. ज्या व्यक्तिगत

गोष्टी आहेत, ज्यांचा परिणाम सार्वजनिक व्यवहारांवर व नीतिमत्तेवर होत नाहीं, त्या बाबतींत सरकारनें हस्तक्षेप करणें अयोग्य ठरेल. शारदाकायदा मोडून विवाह केल्यास सरकारला शिक्षा देण्याचा अधिकार आहे. तथापि, सनातनधर्ममंडळानें कायद्याविरुद्ध निषेधाचा ठराव केला येवढ्यावरून सर्व मंडळाला सरकारनें शिक्षा करणें योग्य ठरणार नाहीं. खाजगी संस्थांनीं आपल्या सभासदांविरुद्ध कांहीं ठराव केल्यास जोंपर्यंत त्याचा परिणाम सार्वजनिक नाहीं, तोंपर्यंत त्यांतहि हस्तक्षेप करणें सरकारला योग्य नाहीं. खाजगी संस्थांना त्यांच्या सभासदांवरील अधिकारापुरतें एक-प्रकारें प्रभुत्व असतें. अर्थात् हे प्रभुत्व व राज्याचें प्रभुत्व यांत फरक आहे. राज्याला देहदंड करण्याचा अधिकार आहे व तो केवळ राज्यालाच आहे, इतर कोणी करील तर राज्य चालूं देणार नाहीं. खाजगी संस्था, धार्मिक अगर अन्य, गैरवर्तनाबद्दल सभासदांकडून दंड वसूल करतील, त्यांचेवर बहिष्कार टाकतील, त्यांचें सभासदत्व रद्द करतीच व येवढा अधिकार त्यांना असूं देण्यास कांहीं हरकत नाहीं. याही कामांत सरकारनें हस्तक्षेप करणें म्हणजे कारण नसतां लोकक्षोभ ओढवून घेणें आहे. शिवाय हस्तक्षेपापासून इष्टऐवजीं अनिष्ट होण्याचाच संभव जास्त. मर्यादित स्वायत्तता व्यक्तींना व खाजगी संस्थांना देण्यानें राज्याचे प्रभुत्वाला बाध येत नाहीं किंवा त्यास कोणी प्रतिस्पर्धीहि त्यांतून उत्पन्न होत नाहीं. या संस्थांना दिलेली ही स्वायत्तता व सत्ता केवळ सभासदांचे खुषीवर व संमतीवरच अवलंबून राहाणार. वाटेल त्या क्षणीं सभा-सद आपली संमति काढून घेऊन मुक्त होऊं शकतो तशी मुक्तता मात्र राज्यापासून त्याला मिळत नाहीं. समाजाचें संघटन संयुक्त स्वरूपाचें असल्यामुळें कार्यक्षेत्राची विभागणी केल्यानें इष्ट तेच परिणाम सर्वसाधारणपणे होतात.

व्यक्तिगत बाबी व सार्वजनिक बाबी यांत जशी कार्यविभागणी मर्यादा राखून केल्यानें राज्याचे प्रभुत्वाला अगर राज्याचे कार्यक्षमतेला बाध येत नाहीं, त्याच-प्रमाणें खुद्द सार्वजनिक व राज्यविषयक बाबींतहि प्रादेशिक व कार्यस्वरूपी दृष्टीनें विभागणी करून क्षेत्रें वांटून दिलीं तरी कार्यक्षमतेला कमीपणा येतोच असें नाहीं. समाजाचें स्वरूप संयुक्त असतें व त्या दृष्टीनें कार्यविभागणी केल्यानें समाजसंघटने-च्या मौलिक भावाला अनुरूप असेंच तें ठरतें. राज्याच्या सर्व कारभाराच्या तपशिला-सुद्धां अधिकार एकाच ठिकाणाहून अगदीं एकाच गटाचे हातून चालणें अशक्य असतें. समाजहि एकजिनसी, एकसंधि नसतो व जेवढी एकता, एकाग्रता त्याच्या व्यवहारांत वाटते तेवढीहि नसते. या परिस्थितींत अगदीं नाण्याप्रमाणें सर्वत्र सारखा ठोकळेपणाचा कारभार चालणें अशक्य असतें. राज्याचें राजकीय स्वरूप एकतंत्री

असो अगर लोकशाही असो, १०० टक्के केंद्रीकरण कार्यक्षमता वाढविण्याऐवजीं सामान्य परिस्थितींत कमीच करते. कार्याची विभागणी कार्याचे स्वरूपावरून होईल, प्रदेशावरून होईल किंवा भागवार सत्ताधिकारी माणसें नेमून नेतृत्वाचें [ Leadership principle ] तत्त्वावर होईल. तशी विभागणी केल्याशिवाय आधुनिक राज्याचा सर्वांगीण व सर्वव्यापी कारभार चालणार नाहीं व चालत नाहीं. याचें कारण समाजाची संघटनाच मुळीं संयुक्त स्वरूपाची असते व त्यांतील विविधता, व्यक्तिगत स्थान अगर प्रदेशपरत्वें ही जाज्वल्य असल्यामुळें कार्यविभागणी अटळ व अनिवार्य होते. कोणत्या तत्त्वावर करावी हा येथें कमी महत्त्वाचा प्रश्न आहे. कार्यविभागणीनें कार्यक्षमता कमी होतेच असें नाहीं. उलट विभागणी म्हणजे सत्तेची, अधिकाराची विभागणी असल्यामुळें ज्यांच्या हातांत अधिकार जातो, त्यांचेवर जबाबदारीपण जाते. जबाबदारी आली व तिची जाणीव झाली म्हणजे कार्यक्षमता वाढणेंच जास्त शक्य आहे. सांगकामीं माणसें झालीं म्हणजे ते करतात त्यांत त्यांना गोडी नसते. आज्ञा मिळेल, सांगण्यांत येईल तेवढेंच करावयाचें, त्यांत आपुलकी उत्पन्न होत नाहीं. उलट जें करावयाचें आहे तें आपल्या इच्छेप्रमाणें, तें कसें करावयाचें व कोणत्या प्रकारें करावयाचें याचा निर्णय आपण घ्यावयाचा आहे अगर आपल्या सल्लामसलतीला अनुसरून तो घेण्यांत यावयाचा आहे, अशी परिस्थिती असेल त्या वेळीं होणाऱ्या कार्यांत माणसाचें चित्त असतें, अंगचे गुण प्रकट करावे अशी प्रेरणा उत्पन्न होते. कारण आपुलकीचा भाव तेथें उत्पन्न होतो. जनकत्व व जबाबदारी त्याजवर असल्यामुळें मनुष्याच्या विधायक प्रेरणांना तेथें वाव असतो, नव्हे एक प्रकारें त्यांना आव्हानच असतें. चुकाही होण्याचा संभव असतो पण चांगलेंही होण्याचा संभव असतो. स्थानिक संस्था स्वायत्त असल्या तर चुका करतील पण त्याचबरोबर चांगलेंहि कार्य करतील व करतात. मध्यवर्ती मंडळानें सांगितलेल्या कामाची बजावणी करण्यापेक्षां तें काम स्वायत्तता देऊन करून घेतल्यानेंच जास्त चांगलें होतें व होतें असा अनुभवही आहे. कोणत्या बाबतींत स्वायत्तता द्यावी हें अर्थात् सारासार विचार करून ठरविलें पाहिजे. मात्र नियमन, नियंत्रण व मार्गदर्शन हे सगळे अधिकार मध्यवर्ती सत्तेनें ठेवून चालणार नाहीं. ज्या बाबी स्वभावतः स्थानिक स्वरूपाच्या अगर ज्या स्थानिक लोकांवर सोंपविल्यानंतर चांगल्या तऱ्हेनें त्या होतील, अशा बाबतींत मध्यवर्ती सत्तेनें सल्ला द्यावा, टीकाटिप्पणी करावी पण प्रत्यक्ष व तपशीलवार मार्गदर्शन करूं नये हेंच योग्य असतें. ह्यांत अधिकार घालविला असें होत नाहीं, राज्यसत्तेला यांत बाध नाहीं, राज्याचे प्रभुत्वालाहि बाध

नाहीं, उलट असल्या कार्यविभागणीनें, राज्यकारभारांत जनतेला आपुलकी उत्पन्न होते व कार्याची जबाबदारी वाटते व त्यामुळें कार्यक्षमताही वाढते.

प्रादेशिक कार्यविभागणी केल्यानें कार्यक्षमतेची हानि होत नाही हें वर पाहिलें. अन्य रीतींनेहि कार्यविभागणी होऊं शकते. वैद्यवर्गानें कसें वागावें, काय वर्तन ठेवावें वगैरे बाबतींत वैद्यसंघ काढून सदरहू संघ या सर्व गोष्टींचें नियमन करूं शकतो. तीच गोष्ट वकीलवर्गाची. या देशांत या दृष्टीनें अद्यापि विशेष प्रगति झाली नाहीं. पण इंग्लंडमध्यें वैद्य व वकील या धंद्यांचें नियंत्रण त्या त्या धंद्याच्या संघांकडे आहे. सभासदांनीं कसें वागावें याचें प्रमाण ते संघ ठरवितात. संघाच्या घटना असतात. नियामक मंडळें ठराविक कालासाठीं निवडलीं जातात. परीक्षापण सदरहू संघामार्फ-तच होतात. तात्पर्य, हे संघ आपआपल्या धंद्यांतील बाबींसंबंधांत स्वायत्त असतात व सरकार विशिष्ट परिस्थिती उद्‌भवल्याशिवाय त्यांच्या कामांत हस्तक्षेप करीत नाहीं. निरनिराळ्या उद्योगधंद्यांतून याप्रमाणें संघस्वायत्तता वाढत्या प्रमाणावर आहे. हे सर्व संघ म्हणजे स्वराज्याच्या शाळाच आहेत. लोकशाहीचे तत्त्वानुसार त्यांचीं कामें चालतात. संघाच्या सभासदांत सांघिक जबाबदारीची जाणीव उत्पन्न होते. संघाच्या हुकुमाचा ज्यांच्यावर परिणाम होतो, त्यांच्याच मतानें कारभार चालत असल्यामुळें त्यांत आपुलकीची भावना असते; जबाबदारी असते व गौरवही त्यांना वाटतो. तसेंच याप्रकारें कांहीं कार्य अशा संघांकडे सोपविण्यापासून राज्यसत्तेचें नुकसान कांहींच नाहीं.

कार्यांची विभागणी कुठल्याहि तत्त्वाप्रमाणें होवो, एक गोष्ट महत्त्वाची असते व ती म्हणजे किती जरी अधिकार याप्रमाणें कार्याकरतां, राज्यानें दिला तरी त्याचा स्वतःचा अंतिम व अखेरचा अधिकार अबाधित असतो. कोणत्या परिस्थितींत राज्यसत्ता आपला अधिकार चालविते हेंही पाहाणें महत्त्वाचें असतें. केवळ असलेला अधिकार चालवावा व आपल्या कायदेशीर सत्तेचा देखावा दाखवावा असें होण्याचें कारण नाहीं. ज्यांना सत्ता दिली ती त्यांनीं योग्यपणें वापरली नाहीं अगर जें करा-वयास पाहिजे तें ते करीत नाहींत तेव्हां व्यापक हिताचे दृष्टीनें राज्यानें आपला अधिकार गाजविणें केव्हांही योग्य ठरतें. सरकारनें व्यापक हिताचे दृष्टीनें हस्तक्षेप करावा अगर अंतिम अधिकार गाजवावा हें योग्य म्हटल्यानंतर व्यापक हित तरी सरकार कोणत्या दृष्टीनें ठरवितें हाही एक महत्त्वाचा प्रश्न असतो. अनेक दृष्टिकोन, विरोधी विचारप्रवाह, विसंगत अनुभव समाजांत दृष्टीस पडतात, त्या सर्वांतून जास्तींत जास्त जुळणी करून सरकारला आपला मार्ग काढावा लागतो. या तडजोडी-

च्या प्रपंचांत पुष्कळ वेळां हस्तक्षेप अगर अधिकार गाजविण्यापेक्षां तो टाळण्याचाच उद्देश असतो. विरोधात्मक परिस्थितींत एकांगीपणें वागण्यास सरकार टाळतें. याचा अर्थ ज्यांच्यावर तें अवलंबून आहे असें दिसतें, त्यांचा पाठिंबा सरकारास पुरेसा वाटत नाहीं. सत्ता टिकावी व विरोध कमी व्हावा म्हणून सरकार तडजोडीचे चालीनें चालतांना दिसतें. याप्रमाणें हातीं असलेली सत्ता न वापरून टिकविली जाते व ज्यांना नव्या गोष्टी, नवे प्रयोग, कारभाराबाबत, लोकहिताबाबत, करावयाचे असतात त्यांना वाव दिल्याचें श्रेयही मिळतें. अशा रीतीनें विद्यमान सरकार वागूं लागलें तर प्रभुत्वाचे स्वरूपावर काय परिणाम होतो हें पाहाणें विशेष महत्त्वाचें होतें.

राज्यांतील विचारप्रवाह पाहून, लोकमताची नाडी पाहून, त्याचा कानोसा घेत घेत सरकार चालूं लागलें तर प्रभुत्वाची सर्वश्रेष्ठता, सर्वव्यापकता, सर्वसत्ताधिशता यांतील आशयच बदलतो; त्यांचा आधार कायदेशीरपणा न राहातां, नैतिक प्रतिष्ठा ही होते. राज्य याप्रमाणें राजकीयदृष्ट्या विचार केला असतां एक नैतिक घटना अगर एक नैतिक वस्तु ( Entity ) दिसूं लागते व राज्य तसें व्हावें असें वाटत असेल तर तें राज्यांतील प्रजाजनांच्या, नागरिकांच्या संघटित संमतीवर, संघटित मान्यतेवर आधारावयास पाहिजे. संमतीवर आधारलेल्या व त्यामुळें नैतिक प्रतिष्ठा असलेल्या राज्यांत, त्याला नैतिक करणासाठीं विरोध करण्याचा, त्याच्या आज्ञा भंग करण्याचाही अधिकार क्रमप्राप्तपणें जनतेला मिळतो. अर्थात् हा अधिकार निकडीची व अपरिहार्य परिस्थिती झाली तरच योग्य रीतीनें वापरावयाचा असतो हें स्पष्ट आहे. क्षणाक्षणाला, अल्पस्वल्प बाबतींत सुद्धां नागरिक हे नारायणअस्त्र वापरूं लागले तर समाजजीवन अशक्य होईल व त्या अस्त्रांतलें तेज व सामर्थ्यही नामशेष होईल. आज्ञापरिपालन हा नियम व आज्ञाभंग हा अपवाद असेल तर राज्यकारभार चालेल. त्याचबरोबर सरकारची सत्ता, आज्ञा देणारी सत्ता, योग्य रीतीनें जरूर त्या बाबतींत मर्यादित न केली तर राज्याचा हेतु, समाजसंघटनेचा हेतु-प्रगतिकारक लोककल्याण साधणें हाही सफल होणार नाहीं. बंडाची भाषा दैनंदिन स्वरूपाची झाली किंवा अमर्याद प्रभुत्व गाजविण्याची ईर्षा राजसत्तेला झाली कीं समाजाची प्रगति संपली असेंच अनुभवास येतें. म्हणून राज्यसत्तेला अनेक प्रकारानें मर्यादित केलें पाहिजे. अधिकार देणाऱ्या जनतेची मान्यता ठराविक काल झाल्यानंतर विद्यमान सत्तेनें पुन्हां घेतली पाहिजे; तशी मान्यता मिळाली तरच पुढें अधिकार चालावा नाहीं तर विद्यमान गटानें बाजूस व्हावें. तसेंच कांहीं बाबी, मौलिक हक्क, भाषणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य वगैरे या विद्यमान सरकारचे अधिकाराबाहेरच्या

असाव्यात. त्यांत त्याला हस्तक्षेप करण्याचा अधिकार नसावा. जे हक्क उपभोगल्यामुळें नागरिकांना जीवन प्रसन्न वाटेल, सामाजिक जीवनांतील गोडीचा स्वाद त्यांना घेतां येईल, असे सर्व हक्क अबाधित राहिले पाहिजेत, विद्यमान सत्तेला त्यांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार असतां कामा नये. राज्यसत्ता चालविणारें विद्यमान सरकार हें केलेल्या चुकांबद्दल जबाबदार धरलें गेलें पाहिजे. चुका कराव्यात व प्रायश्चित्त मात्र घेण्याची जबाबदारी नसावी, असें झाल्यास सत्तेचा उपयोग अनियंत्रितपणें व बेफामपणेंच होईल हें जास्त शक्य आहे. जेथें राज्यकारभार हांकतांना अधिकारी गैर वागले असतील अगर अधिकारातिक्रम करून वागले असतील, तेथे त्याच्या वर्तनानें ज्यांना इजा झाली अगर नुकसान पोहोंचलें असेल त्यांना, या अपराधी अधिकाऱ्यांना न्यायासनापुढें ओढण्याचा अधिकार व हक्क असला पाहिजे. राज्यानें केलें म्हणूनच जसें योग्य ठरत नाहीं, योग्य केलें असेल तरच योग्य ठरतें, त्याप्रमाणे केवळ अधिकाऱ्यानें केले म्हणून तें योग्य व समर्थनीय ठरतां कामा नये. न्यायाधिशानें तें योग्य ठरविलें पाहिजे. अधिकाऱ्यांच्या अपराधाची चौकशी सामान्य न्यायालयांतच व्हावी. अधिकारी व नागरिक हा फरक न्यायालयांत असतां कामा नये. अधिकाऱ्यानें सरकारच्या हुकुमाची प्रामाणिकपणें बजावणी करीत असतां अनवश्यक इजा केली अगर नुकसान केलें तरीसुद्धां ज्याला इजा झाली अगर नुकसान पोहोंचलें त्याला नुकसानभरपाई मिळाली पाहिजे. अधिकारी प्रामाणिकपणें वागला म्हणून फार तर त्याजकडून ती वसूल न करतां सरकारनें ती दिली पाहिजे येवढें म्हणतां येईल. तात्पर्य, मुख्य व नैतिक हक्कांचे बाबत राज्यसत्तेचा अधिकार मर्यादित केला पाहिजे. तसें झालें म्हणजे राज्य हें एक नैतिक संघटन होऊं शकेल. संमतीवर आधारलेलें व विवेकानें चालविलेलें राज्य आपली सत्ता व सामर्थ्य, लोकांची सत्ता व सामर्थ्य मानतें व त्याच दृष्टीनें त्याचा उपयोग करतें व म्हणूनच तें नैतिक प्रतिष्ठा मिळवितें.

राज्याबरोबरच व्यक्तीचा विचार केला म्हणजे व्यक्तींच्याच उन्नतीवर राज्याची उन्नति अवलंबून आहे हें लक्षांत येतें. उत्तम धागा असला तर वस्त्र उत्तम होईल. प्रत्येक व्यक्तीनें उत्तम, स्वकार्यप्रवीण व दक्ष नागरिक होण्याचें ठरविणें व त्याप्रमाणें झालें म्हणजे सर्व राज्य पण उत्कृष्ट व श्रेष्ठ दर्जाचें होईल. राज्य याप्रमाणें व्हावें असें वाटत असेल तर प्रत्येक नागरिकानें राज्यकारभारांत लक्ष घातलें पाहिजे. किंबहुना असें तो लक्ष न घालील तर तो चांगला नागरिकही होऊं शकत नाहीं. राज्यकारभार सर्वांसाठीं आहे. त्यापासून सर्वांचें हित झालें पाहिजे; सर्वांचे हितसंबंध त्यांत निगडित

आहेत, हें जर सर्वांनीं न जाणलें व सर्वांनीं दक्षता न घेतली तर विद्यमानकाळीं जे अल्पसंख्य लोक अगर जो वर्ग सत्ताधिकारी आहे तो संकुचित दृष्टीनें, स्वार्थी दृष्टीनें, सत्तेचा उपयोग करणें अपरिहार्य आहे. सत्ता बिनविरोधपणें उपभोगिली गेली कीं, ती स्वार्थासाठींच उपभोगिली जाते; वर्गहित, वर्गस्वार्थ यांच्यासाठीं तिचा उपयोग होतो असा इतिहासाचा निर्वाळा आहे. म्हणून सत्तेला मर्यादा पाहिजे व अशा मर्यादा ठेवणें ही एक राज्यशास्त्रांतील मौलिक व महत्त्वाची बाब आहे. त्याच त्या माणसांना अगर गटांना अमर्याद व अप्रतिहतपणें सत्तेचा उपभोग घेऊं देणें म्हणजे अन्य लोक नालायक आहेत व हे कुणी तरी असामान्य विभूति आहेत असा भाव उत्पन्न करण्यासारखें आहे व असा भाव अगर असा मनोगंड समाजांत उत्पन्न करणें म्हणजे समाजाची मानसिक अवहेलना व हानि करणें आहे. प्रत्यक्ष पाहातां हीं माणसें तितकीं लायकही नसतात, असामान्यही नसतात व विभूति तर नसतातच नसतात. जे सत्ताधीश आहेत त्यांचेच बरोबर हें गणित निरपवाद नाहीं, बिनचूक नाहीं. कांहीं माणसें नेहमींच बरोबर असतात, चूक करीत नाहींत हेंही तर्काला धरून नाहीं; अनुभवही तसा नाहीं. मनुष्यमात्र चुकीला पात्र आहे; म्हणून सत्तेच्या सिंहासनावर बसला तर त्याचे हातांत सत्ता येईल, तो अधिकार गाजवूं शकेल, सक्ति करील, पण केवळ सिंहासनावर बसला म्हणून तो बोलेल तें सत्य, करील तें रास्त असें मात्र होणार नाहीं. या परिस्थितींत कायदा सांगतो म्हणून ऐकलें पाहिजे, सत्ता सांगते म्हणून ऐकलें पाहिजे, असें न होतां, जर ती गोष्ट अगर आज्ञा स्वतःला योग्य व न्याय्य वाटली, रास्त वाटली तर नैतिक कर्तव्य म्हणून ती ऐकली पाहिजे, मानली पाहिजे व हाच सुबुद्ध व दक्ष नागरिकांचा दृष्टिकोन असला पाहिजे. व्यक्तिशः नागरिकानें अमुकच पद्धतीनें वागावें असें कांहीं निरपवाद रीतीनें सांगतां येणार नाहीं. पण वर सांगितलेल्या दृष्टिकोनानुसार त्यानें वागावें येवढें मात्र म्हणतां येईल व या दृष्टिकोनानुसार वागण्यानेंच त्याचा विकास होतो व आपली संमति देऊन आपल्या मताचें अर्घ्य देऊन तो स्वतःला व राज्याला उन्नत करीत असतो.

नागरिकानें आपल्या बुद्धीचा निकष लावून त्याच्या दृष्टीनें जें योग्य व न्याय्य असेल त्याला मान्यता द्यावी व राज्यकारभारांत विवेकानें काम होतें कीं नाहीं हें पाहाण्याची दक्षता घ्यावी असा आदर्श त्याचे पुढें असावा. हा आदर्श वर्तनांत उतरेल याची पण पराकाष्ठा करावी. तथापि, व्यक्ति कांहीं जीवनांतील प्रत्येक गोष्ट बुद्धि वापरून, विवेक करून करीत नाहीं. कांहीं बाबतींत व्यक्ति भावनेच्या आहारीं जाते. धर्म जाणते पण त्याकडे तिची प्रवृत्ति होत नाहीं. अधर्म जाणते पण त्यापासून

निवृत्ति होत नाहीं. कुठल्या तरी हृदयस्थ भावनेनें प्रवृत्त होऊन, व्याकुल होऊन ती वागते. हाच व्यक्तीचा स्वभाव सामुदायिक व सामाजिक बाबतींतहि प्रसंगीं दिसून येतो. आपली जात, आपला धर्म व आधुनिक कालांत आपलें राष्ट्र याबद्दलची निष्ठा बुद्धिवादानें तपासून, विवेकाच्या दृष्टीनें पाहून, व्यक्ति नेहमींच दाखविते असें मात्र नाहीं. माझा देश, चूक असो अगर बरोबर असो, त्याचे मागें मी आहें, ही प्रवृत्ति सर्वत्र मोठ्या प्रमाणांत दिसून येते. माझा पक्ष, चूक अगर बरोबर, मी त्याचे मागें आहें हा तर अनुभव जगप्रसिद्ध आहे. राष्ट्रानें युद्ध पुकारलें म्हणजे सत्य, न्याय सर्व कांहीं आपल्या राष्ट्राचे बाजूस आहे असें मानणें व तीव्र भावनेनें सांगणें व त्याप्रमाणें वागणें हीच एक राष्ट्रभक्तीची कसोटी त्या काळांत होऊन बसते. थोडें विवेकानें पाहा, जरा विचार करून चाला, असें सांगणारा देशद्रोही व पंचमस्तंभी ठरविला जातो. तात्पर्य, भावनावशता व तदनुसार निष्ठा या गोष्टी दृष्टिआड करून चालणार नाहींत. भावनावशनिष्ठेचें सामर्थ्य व त्यागवृत्ति कमी नाहीं. किंबहुना कल्पनातीत प्रमाणांत त्याग करण्याला माणसें असल्याच निष्ठेनें प्रवृत्त होतात. असली निष्ठा, अशी भावनावशता, आदर्शासाठीं मृत्यूपर्यंत त्याग करण्याची प्रवृत्ति, हीसुद्धां राष्ट्रांतील साधनसंपत्तीच आहे. म्हणून तिची जोपासना योग्य मार्गानें करून त्यांतून विधायक अशी शक्ति संघटित रीतीनें उत्पन्न केली पाहिजे. हें चैतन्य योग्य रीतीनें वापरलें तर वर आहे नाहीं तर शाप आहे. असंस्कृत भावना, अविवेकी प्रेरणा, अनगड अथवा बुद्धिहीन क्रिया यांपासून साधारणपणें समाजाविरुद्धच वर्तन घडतें. त्याचप्रमाणें जे या गोष्टींच्यावर विश्वासून आपलें धोरण आंखतात तेही अखेरीस, समाजविद्रोही असतात. सारासार विचार न करतां, स्वतःचे बुद्धीला पटो न पटो, जें केवळ सरकारनें सांगितलें म्हणून ऐकतात, सरकारनें युद्ध जाहीर केलें म्हणून जे योग्य म्हणतात, ते वस्तुतः श्रेष्ठ अशा नागरिकधर्मापासून च्युत होतात. बुद्धीनेंच मनुष्याला आलेलें तें श्रेष्ठत्व ते गमावतात; नैतिक प्रतिष्ठेला ते मुकतात. 'मुकीं बिचारीं कुणी हांका' अशीच त्यांची स्थिति होते. आजच्या प्रचलित युद्धांत युद्धमान् राष्ट्रांतील बहुतेकांची स्थिती अशीच आहे. लोकशाहीसाठीं हें युद्ध नाहीं हें जाणूनसुद्धां, आदर्श विसरून, परंपरा विसरून, अनेक यांत पडले आहेत. चालू युद्ध केवळ स्वार्थासाठीं आहे याची खात्री असून अनेकांच्या रसना निःस्तब्ध झाल्या आहेत. वाणी आवाजसुद्धां करीत नाहीं, गर्जना तर लांबच राहिल्या. अप्रिय सत्य बोलण्यानें शासनाचा दण्ड डोक्यावर घ्यावा लागेल, ही भाषा, लघुचेतसांची, सामर्थ्यहीन व दुर्बल मनांची. खरा नागरिकधर्म हा नव्हे. विरोध

करण्यानें उपयोग होणार नाहीं ही फडणिशीदृष्टीसुद्धां परिणामाचे दृष्टीनें चुकीची आहे. जेव्हां कोणी ऐकत नाहींत तेव्हां उंच हात करून धीरगंभीर वाणीनें सत्य सांगणारा लाखांत एक असला तरी कोटींचें तो काम करतो. स्वतःचा नाश ओढवून जगाची प्रतिष्ठा कायम करतो. सत्यासाठीं मरून आदर्शाला तो अमर करतो व अशींच माणसें खरी नागरिक व खरे प्रगतीचे पथदर्शक असतात.

राज्यसत्तेला मर्यादा असल्याशिवाय तद्विषयक निष्ठेला नैतिक प्रतिष्ठा असूं शकत नाहीं हें अंतर्गत दृष्टीनें वर पाहिलेंच आहे. राज्याच्या हेतुसिध्यर्थ ही मर्यादा पाहिजे व ती दक्षतेनें राखण्याचें कर्तव्य व्यक्तीचें आहे. तिचा तो नागरिकधर्म आहे. तसाच व्यक्तीचा आणखी एक नागरिकधर्माचा भाग आहे व त्याचा संबंध सर्व जगाशीं येतो. जर राज्याचें प्रभुत्व अमर्याद वस्तुतः असलें व राज्यसत्ता, सामर्थ्याचे व शक्तीचे जोरावर नागरिकांना आपल्या आज्ञा मान्य करण्यास भाग पाडूं लागली तर ही परिस्थिती मानवसमाजाचे हिताचे दृष्टीनेंही अनर्थावह आहे. राज्यनिष्ठेला, मान्यतेला, नागरिकांची संमति व नैतिक पाठिंबा नसेल तर ती परिस्थिति अस्वाभाविक व अनर्थकारक असते. ज्वालामुखी थंड दिसला तरी केव्हां पेट घेईल याचा नेम नसतो, तशीच ही परिस्थिती असते. नैतिक प्रतिष्ठा पुरेशी यावी व मान्यता यथार्थ व्हावी या दृष्टीनें राज्याचें प्रभुत्व बाह्यतः म्हणजे आंतरराष्ट्रीय दृष्टीनेंही वस्तुतः मर्यादित व्हावयास पाहिजे. ऐतिहासिक घटना घडल्या, त्यामुळें अनेक स्वतंत्र राष्ट्रें व राज्यें झालेलीं आहेत. परंतु जगाची प्रगति कांहीं एका राष्ट्राचे प्रयत्नामुळें झालेली नाहीं. त्याकामीं सर्वांचा कमी–जास्त भाग आहे. किंबहुना ही प्रगति हें एक सामुदायिक व सामाजिक कार्य या व्यक्तिगत राष्ट्रांच्या अगर राज्यांच्या दृष्टीनें ठरतें असें म्हटलें तरी चुकीचें नाही. समाजांत व्यक्ति अलग दिसल्या तरी त्या परस्परांवर अवलंबून असतात ही गोष्ट सिद्ध आहे. त्याचप्रमाणें व्यापक जगांत विद्यमान असलेलीं राज्ये अगर राष्ट्रें हीं परस्परांवर अवलंबून आहेत हें सत्य आहे. परिस्थितीप्रमाणें राज्यें विस्तारानें लहानमोठीं असतील, त्यांचे स्वरूपांत भिन्नता व विविधता असेल, पण एक मौलिक अशी मानव्याची भावना सर्वांना समान आहे. व्यक्तींचा व राज्याचा हितविरोध असतां कामा नये. किंबहुना त्यांत एकताच असली पाहिजे. निदान हा आदर्श तरी असावा हें मान्य केल्यानंतर व्यक्तिगत राज्यांत व जागतिक समाजांत, मानाव्यांत हितविरोध असूं नये असें म्हटलें तर तें योग्य आहे. त्यांचे हितसंबंधांत एकता असावी असाच आदर्श असावा हेंही युक्त आहे. मग अखिल मानव्याचे दृष्टीनें, व्यक्तीची निष्ठा केवळ राज्यापुरती स्थानिक व संकु-

चित न राहातां व्यापक व जागतिक असावी असें म्हणणें अगदीं सयुक्तिक ठरतें. अंतिम हित म्हणजे जगाचें हित, अखिल मानव समाजाचें हित हाच सिद्धांत योग्य ठरतो. या परिस्थितींत व्यक्तिगत राज्यें संकुचित व स्वार्थी दृष्टीनें प्रेरित होऊन युद्धें करूं लागलीं व आपआपल्या नागरिकांना, अमर्याद प्रभुत्वाचे व सत्तेचे जोरावर लढाईस जुंपूं लागलीं तर तीं आपल्या सत्तेचा दुरुपयोग करतात असेंच म्हणावें लागेल. म्हणून आंतरराष्ट्रीय शांततेच्या दृष्टीनें, जागतिक हिताच्या दृष्टीनें अशी अमर्याद सत्ता राज्याचे हातीं वस्तुतः ठेवणें अनिष्ट ठरतें. जागतिक हित नक्की कोणतें हें सांगणें अवघड आहे. त्याचा विचार करतांना नानाविध प्रश्न उपस्थित होतील, भावनामय वातावरण निर्माण होईल व होतें हें जरी खरें असलें तरी जगाचे हित कशांत आहे हें ठरविणें जरूर आहे. त्या हिताशीं व्यक्तिगत राष्ट्रांनीं जुळवून वागलें पाहिजे. व्यक्तिगत राष्ट्राची अगर राज्याची वागणूक व धोरण असें असलें पाहिजे कीं, त्यापासून व्यापक अशा जागतिक हिताशीं विरोध उत्पन्न होऊं नये. राष्ट्र हें एक मोठ्या व्यापक संघटनेचा भाग आहे असें समजून त्या राष्ट्रांतील राज्यसत्तेनें वागलें पाहिजे. राज्यसत्तेनें वागलें पाहिजे याचा अर्थ त्यांतील नागरिकांनीं वागलें पाहिजे. म्हणजे नागरिकांची निष्ठा राज्यापुरतीच संकुचित न राहातां व्यापक व जागतिक हिताचे दृष्टीनें ती त्यांनीं दाखविली पाहिजे. ह्या स्थितींत नागरिकांना दोन निष्ठा आहेत असें जरी मानलें तरी त्यांत विरोध असलाच पाहिजे असें मात्र ठरत नाहीं. स्थानिक स्वराज्य व मध्यवर्ती सत्ता यांत विरोध असण्याचें कारण नाहीं. जो तो घटक आपल्या क्षेत्रांत स्वतंत्र पण मध्यवर्ती सत्तेशीं जुळवून वागतो असें जसें संयुक्त राष्ट्रांत दृश्य दिसतें तेंच जगांतील राष्ट्रें व जग यांत कां दिसूं नये? दोहीकडे काम करणाऱ्या निष्ठेंत विरोध कां असावा? घटकांना जशी मर्यादा, तशीच जगाच्या संघटनेच्या दृष्टीनें राज्यांना असावी हें म्हणणें तत्त्वतः चूक कसें? घटकांनीं स्वतःचे अधिकारांत कसें वागावें, हें ठरवितांना सामुदायिक हिताची दृष्टि ठेवावी लागते, तीच दृष्टि राज्यांनीं कसें वागावें हें ठरवितांना ठेवली जाईल. कांहीं प्रश्न जसे केवळ प्रांतिक अगर व्यक्तिगत घटकांपुरतेच मर्यादित नसतात, तसेच कांहीं प्रश्न, आंतरराष्ट्रीय स्वरूपाचे असतात. त्यांचा परिणाम सर्व जगावर होतो, अखिल मानव समाजाचें भविष्य त्यांत निगडित असतें. असे महत्त्वाचे व महान् प्रश्न व्यक्तिगत राज्यांना सोडविण्याची मुभा देणें म्हणजे जगावर आपत्तींना आंमत्रण देण्यासारखें आहे. प्रत्येक राज्य हें स्वतंत्र व अमर्यादपणें प्रभुत्वपूर्ण आहे, त्याला वस्तुतः कांहीं मर्यादा नाहीं. तें जें इच्छील तें करील. असें झालें म्हणजे जगाच्या इतिहासांत युद्ध हीच एक घटना

घडत राहील. असें होणार नाहीं याची खात्री नाहीं, कारण असें झालें नाहीं असा अनुभव नाहीं. बलिष्ठ राष्ट्रांनीं मदोन्मत्त होऊन जगाची शांति धुळीस मिळविली आहे. आपण म्हणजे जग, आपण म्हणू तें जगानें ऐकलें पाहिजे या अहंकारानें आज जग उजाड होत आहे. वास्तविक जग हें एक आहे. मानवी समाज, त्यांत विविधता असली तरी तो मौलिकदृष्ट्या एक आहे. जगाची प्रगति व्हावयाची असेल तर ही एकता सर्वांनीं जाणली पाहिजे. जगांत शांतता नांदावयाची असेल व प्रगतीचें पाऊल पुढें पडावयाचें असेल तर जगांतील राष्ट्रांनीं प्रभुत्वाचा अभिमान अगर दुरभिमान सोडला पाहिजे व सहकार्यानें व सहविचारानें वागून जगाचें म्हणजे वस्तुतः स्वतः-चेंच हित साधलें पाहिजे.

अखिल मानवजातीच्या हिताच्या दृष्टीनें, आंतरराष्ट्रीयदृष्ट्या व्यक्तिशः राज्यांना अमर्याद सत्ता व प्रभुत्व ठेवणें हें अनर्थकारक आहे हें वर आलेंच आहे. व्यक्तीनें कसें राहावें हें जर सर्वस्वीं व्यक्तीवर सोपविलें तर समाजजीवन अशक्य होईल. त्याच-प्रमाणें आंतरराष्ट्रीय जगांत प्रत्येक राष्ट्रानें कसें वागावें हें जर सर्वस्वीं त्याजवर सोप-विलें तर कठीण प्रसंग ओढवेल. राष्ट्राचें एतद्विषयक वर्तन बरें कीं गैर हें त्या राष्ट्रानेंच ठरवावयाचें म्हटल्यास जगांत शांतताच राहाणार नाहीं. ही विचारसरणी भयावह आहे. मांचुकोचा बळी याच नात्यानें जपाननें घेतला, पोलंड याच न्यायानें उधळलें गेलें. किंबहुना साम्राज्यशाही वर्तन हें याच विचारसरणीचा वस्तुपाठ आहे. जगांत सर्व स्वतंत्र राष्ट्रांना, राज्यांना समान असें कांहीं जीवन आहे, असे कांहीं प्रश्न निःसंशय आहेत. या प्रश्नांचा निकाल अर्थात् समजुतीनें व तडजोडीनेंच लागला पाहिजे. आंतरराष्ट्रीय तंटेबखेडे होऊं नयेत, शांतता नांदावी, सामान्य हिताची व्यवस्था व्हावी व तीही समजूतदारपणें व सहकार्यानें येवढें मान्य केलें किंवा इष्ट मानलें म्हणजे ही व्यवस्था पाहाणारें कांहीं तरी आंतरराष्ट्रिय संघटन अगर सर-कार पाहिजे हें क्रमप्राप्त आहे. असें आंतरराष्ट्रीय सरकार अगर संघटन यशस्वी व्हाव-याचें म्हणजे त्याचे जे घटक म्हणजे व्यक्तिगत राष्ट्रें अगर राज्यें यांना आपलें प्रभुत्व मर्यादित करणें हें अनिवार्य होतें. प्रत्येक घटक राज्याला सामान्य बाबतींत या आंतर-राष्ट्रीय सरकारचें प्रभुत्व मानावें लागेल, त्याच्या आज्ञा ऐकाव्या लागतील. व्यक्ति-गत राज्याचें म्हणजें ऐकून घेतलें जाईल. निर्णयापूर्वीं सर्व घटकांची सल्लामसलत घेतली जाईल. पण निर्णयाचा अखेरचा अधिकार मात्र त्यांचा नाहीं; तो आंतर-राष्ट्रीय सरकारचा राहील. हें सरकार या घटकांनीं आपलें प्रभुत्व थोडें थोडें देऊन, त्याचा कण कण त्याग करून तयार केलेलें खरें, पण तें तयार झाल्याबरोबर सर्वश्रेष्ठ

व सत्ताधीश राहील हेंही तितकेंच खरें. पण येवढें निश्चित कीं हें असें सरकार, अस जागतिक संघटन तयार व्हावयाचें म्हणजे राज्याचें प्रभुत्व--अमर्याद प्रभुत्व--संपलें पाहिजे. या अमर्याद सत्तेच्या व प्रभुत्वपूर्ण राज्याचे नाशांत जगाच्या शांतीचा उदय आहे. जगांत विवेकाचें राज्य व्हावयाचें असेल तर हा त्याग व्यक्तिशः राज्यांनीं केला पाहिजे. शस्त्रास्त्रें किती तयार करावीं हा अधिकार आपला असें प्रत्येक राष्ट्र म्हणूं लागलें, सैन्य, आरमार, विमानदळें किती ठेवावीं हा अधिकार प्रत्येक राष्ट्राला असावा असें झालें म्हणजे जगाची शांतता संपली. व्यापाराबाबतही प्रत्येक राष्ट्र अनिर्बंधितपणें व्यक्तिगत हक्क सांगूं लागलें कीं जगांत प्रथम दारिद्र्य व नंतर महायुद्ध आलेंच. तसेंच अनेक प्रश्न कीं ज्यांचा परिणाम एका राष्ट्रांतच राहात नाहीं, जगभर पसरतो अशा प्रश्नांबाबत जर प्रत्येक राज्य आपलाच अधिकार आहे असें सांगूं लागलें तर जगांतील शांतता बिघडेल हें उघड आहे. कांहीं देशांत लोकवस्ती मावेनाशी झाली आहे तर कांहीं देशांत मुबलक प्रदेश मोकळा आहे. या परिस्थितींत आंतरराष्ट्रीय व्यवस्था कांहीं न झाल्यास युद्धें होणारच. तेव्हां अशा सर्व प्रश्नांचा योग्य निकाल करण्यांकरितां एक आंतरराष्ट्रीय सरकार अगर संघटन अवश्य आहे हें सहज पटण्यासारखें आहे.

वर वर्णन केलेलें संघटन इष्ट असलें तरी तें शक्य नाहीं असें अनेकजण प्रतिपादतात. असें संघटन घडवून आणण्याच्या मार्गांत अनेक अडचणी आहेत. त्यांचें स्वरूप काय राहील याबद्दलही मतभेद आहेत. तथापि, तें अस्तित्वांत आणणें अशक्य आहे असें मात्र नाहीं. मनुष्यांना स्थानिक अभिमान तीव्र असतो हें खरें. गांवाचा, प्रांताचा व राष्ट्राचा अभिमान हे सगळे तीव्र असतात. पण हे सर्व असून सुद्धां या सर्व परिस्थितींत मनुष्य जुळवून घेतो व व्यापकनिष्ठा श्रेष्ठ मानतो; कारण विवेकानें ती योग्यच आहे अशी त्याची खात्री होते. तीच गोष्ट आंतरराष्ट्रीय संघटनेंत झाल्यावांचून राहाणार नाहीं. जगाचें हित दक्षतेनें संभाळलें जाईल येवढी प्रचंड व सामर्थ्यवान् संघटना तयार करणें ही लहानसहान गोष्ट नाहीं. ती अत्यंत कठीण आहे हें मान्य आहे. त्याचबरोबर व्यक्तिगत राज्याचें हित तेंच जगाचें हित मानून जगांत अनर्थ केलेलीं राज्यें पाहिलीं म्हणजे असलें संघटन अत्यंत अवश्य आहे असें वाटतें. वाटेल त्यानें उठावें व शेजारच्या राष्ट्रावर धाड घालावी, वाटेल त्यानें घोषणा करावी व लाखों लोक युध्दांत बळी दिले जावे, जंगलांतील पशूंप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांतील व्यवहार व्हावा व जो बळी त्यानें लुटावें, जो समर्थ त्यानें सांचवावें असा दंडक झालेला पाहिला म्हणजे नियमन करणारें आंतरराष्ट्रीय संघटन घडवून आणणें कठीण असलें

तरी तें घडवून आणलें पाहिजे असें कोणीही म्हणेल. जगांत राहावयाचें व सर्वांना समाधानानें राहावयाचें असेल तर सहविचार व सहकार्यानेंच राहणें शक्य आहे. सहविचार व सहकार्य म्हणजे देवाण–घेवाण आलीच. आजचा समर्थ उद्यां दुर्बल होईल तेव्हां त्याला सहकार्याचा धर्म सुचेल व रुचेल. सामर्थ्याचा व सत्तेचा ताम्रपट कुणी कुणाला देत नाहीं व अशी सत्ता चिरकाल टिकत नाहीं. जगाचा इतिहास म्हणजे महत्त्वाकांक्षेनें मिळविलें, मिळाल्यावर सत्तेचा अभिमान उत्पन्न झाला व नंतर अभिमानासुध्दां सर्व गेलें, स्मृतिशेष झाले असाच आहे. म्हणून मागील अनुभव लक्षांत घेऊन भावी कालांत शांतता राहावी, सर्वांना न्याय मिळावा म्हणून जगाचें असें संघटन होणें जरूर आहे. जगाचे हितार्थ, राष्ट्राचें व्यक्तिगत हित जरूर तर दूर सारलें पाहिजे. क्षणिक बेहोष करणाऱ्या युद्धांतील जयापेक्षां प्रगतीला वाव देणारी, जीवनाला उन्नत करणारी युगाची शांतता जास्त महत्त्वाची आहे व तिच्यासाठीं जरूर तो त्याग राष्ट्रांनीं केला पाहिजे. युद्धाचा वारसा वैर; वैराचा वारसा पुन्हां युद्ध, या चक्रनेमिक्रमानें चिरकाल टिकणारें असें कांहीं राहाणार नाहीं. युद्धानें जिंकलेले प्रदेश टिकत नाहींत, कालांतरानें जातात हाच अनुभव आहे. तलवारीचे जोरावर निकाल करण्याची परंपरा भौतिक संपत्तीचा तर नाश करतेच पण नैतिक प्रतिष्ठापण कमी करते. आपलें राष्ट्र चूक अगर बरोबर त्याचे मागें मी ही विचारसरणी बुद्धि मलिन करते व त्यांतच व्यक्तीची व राष्ट्राची नैतिक प्रतिष्ठा कमी होत जाते. राष्ट्र अगर राज्य हें प्रभुत्वपूर्ण व अमर्यादपणें सत्ताधीश या विचारसरणीचें हें फळ आहे. दोन स्वतंत्र राष्ट्रांत या विचारसरणीनें व्यवहार कठीण होतो. मनुष्याचें जीवन इतकें व्यापक आहे कीं, त्याची निष्ठा राष्ट्रापुरतीच संकुचित करणें म्हणजे त्याच्यावर अन्याय करणें आहे. मानव्याचे वातावरणांत सर्व जग ही एक वास्तु होते, सोयीप्रमाणें तिचे भाग असावेत पण वास्तूचा अभिमान, या सनातन पण नित्य नवीन अशा वास्तूचा सर्वांना असला पाहिजे. सर्व जगाला समान असलेल्या प्रश्नांचा निकाल समान अशा व्यापक संघटनेमार्फतच लागला पाहिजे. त्यांत सर्वांची सल्लामसलत यावी. सर्वांचें सहकार्य त्यांत यावें. सर्वांना त्यांत आपुलकी वाटावी व आधारही वाटावा असें त्या संघटनेचें स्वरूप व सामर्थ्य असलें पाहिजे.

राज्याचें प्रभुत्व अंतर्गत व आंतरराष्ट्रीयदृष्ट्या मर्यादित असणें व त्यास नैतिक प्रतिष्ठा असणे अशक्य कां याचें स्थूलमानानें दिग्दर्शन वर आलें आहे. राज्याच्या प्रभुत्वाचा अंतर्गतदृष्टीनें अधिक विचार केला म्हणजे त्यांतील अनेक गुंतागुंती नजरेस येतात. राज्यांतील नागरिकांवर असलेलें प्रभुत्व व सत्ता कोणाची असा प्रश्न

उपस्थित केला म्हणजे ती राज्यांतील नागरिकांच्या इच्छेंतून उत्पन्न झालेली व त्यांचीच असें तत्त्वतः आढळून येतें. नागरिकांच्या इच्छेचें, बुद्धीचें सामुदायिक प्रतीक म्हणजे राज्य. पण येवढें म्हटल्यानें सर्व नागरिक स्वतंत्र आहेत असें मात्र सिद्ध होत नाहीं. राज्यांतील सामाजिक संस्था व एकंदर सामाजिक जीवन व्यक्तीला, त्याच्या विकासाला वाव देऊन प्रेरणांना प्रसन्न करणारें असेल तर व्यक्तीला मोकळेपणा वाटतो व त्याचे हातून विधायक असें कांहीं घडतें. उलट एकंदरींत वातावरण कोंदट व नाना प्रतिबंध उत्पन्न करणारें असल्यास नागरिकांत चिडखोरवृत्ति उत्पन्न होते. आपण दाबले गेलों आहोंत असें वाटतें व स्वतंत्र असून मनाचा मोकळेपणा नसल्यामुळें खऱ्या स्वातंत्र्यांतील प्रसन्नता व कार्येच्छा यांचा अभाव असतो. व्यक्ति मात्र आपल्या प्रेरणांना वाव मिळावा, व्यक्तित्वाला वाव मिळावा, त्याचा आविष्कार व्हावा म्हणून प्रयत्न करीत असते. अनेक समविचारांच्या व्यक्ति एकत्र येऊन समाजांत संस्था स्थापून संघ काढून या सामुदायिक सामर्थ्याच्या जोरावर आपल्या व्यक्तित्वाला वाव मिळवीत असतात. जें एकट्यानें करतां आलें नसतें तें संघशक्तीनें करीत असतात. कांहीं तरी कार्य करण्याच्या उद्देशानें माणसें एकत्र येतात, संघ करतात व तें कार्य संघाचें कार्य होतें. याप्रमाणें राज्य या संघटनेच्या क्षेत्रांत व्यक्ति व संस्था आपापल्या परीनें आपल्या इच्छा पूर्ण करण्याकरितां प्रयत्न करीत असतात. संघ अगर संस्था यांचें कार्य, यांचा हेतु निश्चित असतो व त्याचे सिध्यर्थ त्यांचे प्रयत्न चालू असतात. संघाचा एक सभासद या नात्यानें व्यक्ति संघामार्फत आपलें कार्य विशिष्ट हेतुपुरतेंच करीत असते. पण त्याचबरोबर व्यक्ति जी सर्व राज्यकारभाराचें, सर्व सत्तेचें मूळ आहे, ती सुद्धां नानाविध तऱ्हांनीं कार्य करीत असते व तिचीं सर्व कृत्यें यांचा समवाय करण्याचा अभावतः कां होईना ती प्रयत्न करीत असते. अनेक संघांचीं जरी व्यक्ति सभासद झाली तरी तिचें व्यक्तित्व संपून जात नाहीं. व्यक्तीचे जीवनाचा व्याप व विविधता इतकी आहे कीं, वेदांतील अश्वत्थ वृक्षाची उपमा दिली तरी अयोग्य ठरणार नाहीं. अनंतपर्ण, अनंतशाखा असा जसा तो वृक्ष तशीच व्यक्ति आहे. तिच्या विचारांचा अंत लागत नाहीं, तिच्या मनांत येणाऱ्या कल्पनांची गणना करतां येणार नाहीं. राजकारणी, साहित्यिक, उद्योगविषयक, नाना तऱ्हांचें आयुष्य मनुष्य अनुभवीत असतो, नाना तऱ्हांचीं नातीं समाजांत बाळगून तो वागत असतो. तथापि, या सर्वांची बेरीज म्हणजे तो मनुष्य असें गणित चुकीचें ठरतें. सर्व बाह्य जीवनाहून जादा, अंतरजीवनाचा ज्याचा अंत लागत नाहीं, जो क्षणभर परमेश्वराप्रमाणें सर्व व्यापून दशांगुलें उरतो, अशा स्वरूपाचा मनुष्य हा एक प्राणि आहे.

या विविध जीवनांत, विविध अनुभवांत एकसमवाय व एकसमतोल उत्पन्न करणारा असा हा प्राणि सर्व राजकारणाचें, सर्व राज्यशास्त्रविचाराचें मूळ आहे. नाना संघांतून आपले व्यक्तित्वाचा आविष्कार करीत, आपल्या गरजा भागवीत, आपल्या आशा प्रदर्शित करीत राहाणारा हा शेवटीं स्वतःचाच असतो. म्हणजे निरनिराळ्या संघांतून, कार्यक्षेत्रांतून वांटून दिल्यानंतर राहिलेलें त्याचें व्यक्तित्व हें त्याचेंच राहातें. तो ह्या अभुक्त व्यक्तित्वाचे निरनिराळे संबंध उत्पन्न करून समाधान करण्याचा प्रयत्न करीत असतो. त्याच्या मनांत उत्पन्न होणाऱ्या प्रेरणा व इच्छा या अनेक संस्कारांचा, त्यानें केलेल्या अनेक कृत्यांचा परिणाम असतो हें खरें; तथापि, या सर्वांत तो असून या सर्वांच्या वर तो आहे व ज्या मानानें त्याला आपल्या आयुष्यांत समाधान मिळतें त्या मानानें तो समाजांतील संस्था व कार्यें व खुद्द समाज याची उपयुक्तता ठरवितो; त्या दृष्टीनें तो समाजाबाबत व राज्याबाबतही आपलें मत बनवितो.

वरीलप्रमाणें सूक्ष्मदृष्टीनें पाहातां या अल्प अशा व्यक्तीचे पिंडांत ब्रह्मांडाचा व्याप दिसतो. म्हणून एवंगुणविशिष्ट व्यक्तीचें आयुष्य पूर्णतः कुठल्याही एका संघानें अगर संस्थेनें नियमित होणें योग्य नाहीं. अशा तऱ्हेनें प्रयत्न करणें म्हणजे त्याच्या सर्वांगीण विकासाला मारून टाकणें आहे. मजूरसंघानें फार तर कामाची मजुरी, वेळ, विमा, सुट्ट्या वगैरेबाबत सभासदांना नियंत्रित केलें तर तें योग्य ठरेल. पण सभासदानें काय वाचावें, आपला रिकामा वेळ कसा उपयोगांत आणावा, सोयरिक कुणाशीं करावी हें सर्व जर मजूरसंघ नियमित करूं लागेल तर अयोग्य होईल. सभासदाचें जीवन जेल–जीवन होईल, त्याचें स्वत्व नाहींसें होईल आणि आत्मगौरव व आत्मविश्वास ज्यांच्यामुळें मनुष्याला विधायक प्रेरणा होतात ते निःसत्त्व व निर्जीव होतील. संघ एक असो अगर अनेक असोत, विशिष्ट हेतुसिध्यर्थच असतात. त्यामुळें त्यांचें कार्य मोठें असलें तरी व्यक्तीच्या जीवनाइतकें तें व्यापक असणार नाहीं. मनुष्य कांहीं नुसताच मजूर नसतो, नुसता वैद्यच नसतो. त्याच्या जीवनाच्या अनेक छटा असतात व सर्वांगीण जीवनविकास व्हावयाचा तर त्याच्या सर्व प्रेरणा व सर्व शक्ति एकाच नियमनाखालीं येणें योग्य नाहीं. म्हणून व्यक्तींना त्यांचें समाजांतील मौलिक स्थान लक्षांत घेतां व्यक्तिविकासाला पूर्णपणें वाव मिळाला पाहिजे व त्याला अनुकूल असें वातावरण असलें पाहिजे. वातावरण याप्रमाणें अनुकूल असून एकाद्या विशिष्ट गोष्टीचा ध्यास त्याला इतका असेल अगर तीच एक गोष्ट आपलें जीवितसर्वस्वही मानून त्यांतच खपत राहील तर तो त्याचा प्रश्न, त्याची इच्छा बलीयसी व हें अगदीं

योग्य आहे. सामाजिक हिताच्या दृष्टीनें जें कांहीं पद्धतशीरपणें व्हावें, त्यास धरून आपलें व्यक्तिगत वर्तन व जीवन असावें हा आदर्श व्यक्तीपुढें असणें योग्य असलें तरी याप्रमाणें आपलें वर्तन आहे कीं नाहीं हें जाणणें सुद्धां सोपें नाहीं. ही शक्ति फार थोड्या व्यक्तींत असते आणि व्यक्ति जेव्हां विशिष्ट हेतूसाठीं निर्माण झालेल्या संघांतून काम करतात, त्या वेळीं तर ही शक्ति, ही प्रवृत्ति आणखीच कमी प्रमाणांत दिसते. संघांतील व्यक्तींचा समान हिताबाबतचा दृष्टिकोन हा विशिष्ट दृष्टिकोन असतो. संघहेतूच्या स्वरूपावरून संघांतील सभासद, व्यक्ति, समाजहिताकडे पाहाते. मजूर-संघाचा सभासद याची समाजहिताबाबतची दृष्टि त्या संघाच्या उद्देशानुसारच असणार. व्यापारी अगर गिरणीमालक संघाच्या सभासदांची एतद्विषयक दृष्टीपण, त्यांच्या संघांच्या हेतूंना धरूनच असणार. उलट हेच सभासद कुठल्याही संघाचे सभासद नाहींत केवळ नागरिक आहेत, या परिस्थितींत समाजहिताच्या त्यांच्या कल्पना, खात्रीनें निराळ्या असतील. केवळ नागरिकांचा व केवळ राजकीय संघ कीं, ज्यांत राजकीय नात्याशिवाय दुसरे संबंध येत नाहींत असे असत नाहींत. म्युनिसिपल मतदारसंघ म्हटला तरी करयोजनेच्या बाबत, कारभारांतील काटकसरीबाबत त्यांत उद्दिष्टें असतातच. वैद्यसंघ म्हटला तरी फी किती घ्यावी, कोणी किती घ्यावी हा भाग त्याच्या उद्दिष्टांत येतोच. तात्पर्य, प्रत्येक संघ म्हटला कीं त्याचेवर एकंदर समाजपरिस्थितीचा, समाजरचनेचा, रंग थोड्या बहुत प्रमाणांत तरी छिटकतो. समाजांतील प्रचलित धार्मिक व बौद्धिक प्रवृत्ति आर्थिक व सामाजिक घटना या व्यक्तीवर सतत परिणाम करीत असतात. यांतून व्यक्ति अगर संघ कोणी सुटत नाहीं. या परिस्थितींत निर्विकारपणें, निःपक्षपातपणें केवळ समाजहिताकडे लक्ष देऊन व्यक्ति अगर संघ वागेल हें अतिशय कठीण आहे. पूर्ण वाव व अनुकूल वातावरण असून समाज परिस्थितीमुळें व्यापक शक्ति असून शक्ति व्यापकपणें, केवळ समाजहिताकडे लक्ष देऊन न वागतां, आपल्या वर्तनांत वैयक्तिकदृष्टीनें थोड्या तरी प्रमाणांत का होईना वागतांना दिसते.

व्यक्ति जर अशा रीतीनें स्वार्थी ठरली तर समाजांतील सामुदायिक इच्छा, निस्वार्थी कशी राहील ? कुठल्या तरी एका भागाचा स्वार्थ त्या सामुदायिक इच्छेंत राहाणार. तिला सामुदायिक म्हटलें तरी वस्तुतः ती सामुदायिक नाहीं, व सर्वांचे हितार्थ नाहीं असें म्हणावें लागतें. राज्य म्हणजे सामुदायिक इच्छेचें प्रतीक. मग तें सुध्दां सर्व लोकांच्या इच्छेचें न होतां कांहींच्या इच्छेचें होणार हें क्रमशः आलेंच. कांहीं व्यक्तींच्या इच्छा कांहीं संघांच्या इच्छा, जास्त प्रमाणावर राज्याचें निर्णयावर,

धोरणावर परिणाम करणार; तर कांहीं व्यक्तींच्या व संघांच्या इच्छा परिणाम करणार नाहींत अगर कमी प्रमाणांत करतील. जेथें व्यक्तिव्यक्तींत, वर्गावर्गांत म्हणून संघासंघांत हितविरोध आहे तेथें जे वर्ग व्यक्तींच्या मार्फत अगर संघामार्फत राज्यसत्तेच्या धोरणावर निर्णायकपणें परिणाम करतात, त्यांचेंच वस्तुतः राज्य असतें, त्यांच्याच इच्छेच्या इशाऱ्यावर राज्याचा कारभार असतो. तेथें राज्य म्हणजे सामुदायिक इच्छेचें प्रतीक म्हणणें अयथार्थ आहे, थट्टा आहे. तथापि, व्यक्तींनी संघामार्फत राज्यकारभारावर, राज्याचे धोरणावर परिणाम करूं नये म्हणून संघच नको म्हणणें अयोग्य ठरेल. यथार्थ व आदर्श अशी सामुदायिक इच्छा अगर खरेंखुरें जनतेचें म्हणणें राज्यकारभारांत प्रतिबिंबित व्हावें हें व्यवहारांत घडून येणें अवघड आहे. तथापि, त्या दृष्टीनें जास्तींत जास्त परिणाम व्हावा म्हणून समाजांतील सर्व व्यक्ति व संघ यांना राजकीयदृष्ट्या समान मानलें पाहिजे. अमुक एक व्यक्तीच्या मनाला गुणाचा विचार न करतां जास्त मान देणें हें अयोग्य होईल. त्याचप्रमाणें अविवेकानें एखाद्याच संघाचें म्हणणें राज्यसत्तेनें योग्य मानणें हेंही अयोग्य. व्यक्ति व संघ किंबहुना समजांतील सर्व मतें, सर्व विचारप्रवाह यथार्थ अशा समतेच्या वातावरणांत कसास लाविले पाहिजेत. मोतीं विकणारे व मोळी विकणारे समाजहिताचे दृष्टीनें सारखे नाहींत. मोत्यांपेक्षां सरपणाच्या मोळयांची किंमत समाजाला जास्त आहे. ही सामाजिक उपयुक्तता लक्षांत घेऊन व्यक्ति व संघ यांच्या म्हणण्याची किंमत ठरविली पाहिजे. हें मूल्यमापन वरील दृष्टि ठेऊन करणें व तें करण्यासाठीं संस्थाविषयक साधनें उपलब्ध करणें हें काम सोपें नाहीं. तथापि, खरी सामुदायिक इच्छा, सामुदायिक बुद्धि राज्यांत प्रतिबिंबित व्हावी यासाठीं हें करणें जरूर आहे. समाजांतील निरनिराळे हितसंबंध सामाजिक मूल्याचे दृष्टीनें पृथक् करून त्यांचें महत्त्व ठरवावयाचें व पुन्हां त्यांचें संकलन व समवाय अशा तऱ्हेनें करावयाचा कीं, समाजांत सर्वांना जास्तींत जास्त समाधान मिळावें, निदान त्याला अनुकूल असें वातावरण निर्माण व्हावें. व्यक्तीचे जसे अनेक हितसंबंध असतात, पण त्यांच्या योग्य जुळणींत त्यांचें सुख व समाधान निर्माण होतें, तीच गोष्ट समाजाचे बाबतींत आहे.

समाजसंघटन व राज्य यांचे संबंध वर लिहिल्याप्रमाणें विविध व भानगडीचे आहेत. जर समाज एकजिनसी, एकसंधी असता, तर हे संबंध अगदीं बिनभानगडीचे व सरळ असते. एकच व एकजिनसी कार्य समाजसंघटनेचें असतें व असेल तर त्या दृष्टीनें राज्याला राज्यकारभार करणें अगदीं सोपें होईल. तेवढ्यापुरतें तंत्र निर्माण केलें कीं झालें. परंतु व्यक्ति अनेकविध व व्यापक आहे. तिचे विचार व

व्यापार नानाविध, त्या सर्वांना एका साच्यांत बसविणे अवघड. मनुष्य उत्पादक असतो, विक्रेता असतो, गिऱ्हाईकही असतो. या सर्व नात्यांतील हितसंबंध सुसंगत नसतात. ज्याचें उत्पादन करतो त्याचा उपभोग घेत नाहीं, असें जसें असतें तसेंच ज्याचा उपभोग घेतो त्याच्या उत्पादनाशीं त्याचा संबंध नसतो. धान्याचे भाव नियंत्रित करून सरकारनें तें लोकांस विकावें, हें म्हटल्याबरोबर धान्याचा उत्पादक शेतकरी याचें हित दुखविलें जाणार, जादा भावाचा फायदा त्याला मिळणार नाहीं. नियंत्रणाबरोबर व्यापारी यांचा नफा कमी होणार व त्यामुळें सरकारालाही प्राप्तीकराचें उत्पन्न कमी होणार. या विविध व विसंगत परिस्थितींत सर्व हितसंबंध योग्य तऱ्हेनें जुळवून मार्ग काढणें हें सरकारचें कार्य आहे व त्याच दृष्टीनें त्यानें वागलें पाहिजे. राज्यसत्तेनें समाजांत सर्व माणसांना आपापलें जीवन योग्य रीतीनें कंठितां येईल, व त्यासाठीं आवश्यक अशा वस्तु त्यांना योग्य रीतीनें मिळतील, अशी परिस्थिति, अशी व्यवस्था घडवून आणली पाहिजे. ज्या वस्तूंच्या गरजा सर्व लोकांना सामान्य आहेत, त्या वस्तु सर्वांना किमान प्रमाणांत मिळाल्या पाहिजेत व त्या मिळाव्यात म्हणून त्या बाबतींत एकहाती सत्ता असणें जरूर आहे. याचा अर्थ सर्वत्र सरकारी धान्याचीं दुकानें अगर भोजनशाळा अगर कापडाची दुकानें अगर सरकारी घरें असावींतच असा नाहीं. या व अशा आवश्यक गरजा किमान प्रमाणांत सर्वांच्या भागल्या जातील अशीं राज्यकारभाराचीं सूत्रें हाललीं गेलीं पाहिजेत इतकें तर निश्चित. याप्रमाणें राज्यानें करावें. राज्यसत्तेनें सत्तेचा उपयोग या दृष्टीनें करावा असें म्हटलें म्हणजे राज्य एक सार्वजनिक सेवामंडळच होतें. ( **Social Service Corporation** ) पण या मंडळाचें सभासदत्व मात्र सक्तीचें आहे, व कार्यक्षेत्र प्रादेशिक आहे. राज्याच्या अधिकारक्षेत्रांतील सर्वजण यांत येतातच. समाजांतील सर्व लोक उत्पादक नसले तरी सर्व उपभोगी असतात. जमावानें, एकमेकांचे सांनिध्यांत माणसें राहातात. म्हणून कांहीं गरजांबाबत त्यांच्या मागण्या स्थानिक स्वरूपाच्या असतात. यामुळें त्यांच्या मागण्यांत कांहीं बाबतींत हितविरोध नसतो. अन्न, वस्त्र, निवास, शिक्षण वगैरे बाबतींत एकाच वस्तींत राहाणाऱ्या लोकांच्या गरजा बऱ्याचशा एकजिनसी असतात. त्यांत सारखेपणा असतो. या सर्व गरजा भागविण्याचें कार्य राज्यसत्तेचें आहे. राज्यसत्तेचे दृष्टीनें तीं सर्व माणसें सारखीं आहेत, या गरजांबाबत, त्यांच्यांत तत्त्वतः निर्भेळ समता आहे. त्यांतील कोणी वकील असतील, व्यापारी असतील, मजूर असतील; पण सर्वांना अन्न, वस्त्र, निवास वगैरे गोष्टी हव्या आहेत, येवढया दृष्टीनें ते राज्यसत्तेपुढें सारखे आहेत. या किमान गरजा राज्यसत्तेनें

भागविल्या तरच त्यांचें जीवन यथार्थपणें घालविणें शक्य आहे. याचा अर्थ या आवश्यक गरजा भागविणें हें राज्यसत्तेचें पहिलें व प्रमुख कार्य ठरतें. मनुष्यांची, नागरिकांची राहाणी काय स्वरूपाची राहील हें सरकारी धोरणानें ठरतें, म्हणून तें धोरण काय राहावें हें या आवश्यक गरजांचेच दृष्टीनें ठरलें पाहिजे. गरजा जितक्या आवश्यक व जिव्हाळ्याच्या त्या मानानें त्यांचेवरील दक्षता विशेष अशी घेतली गेली पाहिजे. आवश्यक वस्तु व सोयी यांचें नियंत्रण व नियमन त्याच कारणासाठीं अधिक पाहिजे. शिक्षण असो, वाहतुक असो, सार्वजनिक आरोग्य असो, अगर धान्यपुरवठा असो सर्वांवरील नियमन सर्वांच्या गरजा भागतील अशा सार्वजनिक हिताचे दृष्टीनें असलें पाहिजे. नागरिकाला असलेले त्याचे हक्क पूर्णपणें उपभोगितां येतील अशी परिस्थिति निर्माण केली पाहिजे. अन्नाची व्यवस्था केली, पण गिरणींत मजूर वाटेल तितका वेळ राबला जाऊं लागला तर तें चालणार नाहीं. म्हणून कामाचे तासांवर नियंत्रण पाहिजे. गुरासारखें त्यानें राबल्यास मानव्यालाच तो मुकतो. श्रम व विश्रांति योग्य प्रमाणांत राहील अशी व्यवस्था झाली पाहिजे. योग्य राहाणीला आवश्यक इतकें वेतन अगर प्राप्ति मनुष्यमात्राला मिळल हेंही झालें पाहिजे. अर्धपोटीं माणसें, अज्ञान माणसें दोन्हीहि राज्याला लांछन आहेत, म्हणून योग्य शिक्षणाची व योग्य राहाणीची व्यवस्था राज्याकडून व्हावयास पाहिजे. जी योग्य राहाणी सामान्य समाजहिताचे दृष्टीनें ठरेल ती अंमलांत आणण्यासाठीं, राज्यानें प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष जरूर पडेल तसें व तितकें नियमन व नियंत्रण आवश्यक त्या बाबतींत व आवश्यक तेथें करणें जरूर आहे व हेंच खरें राज्याचें कार्य समाजाचे दृष्टीनें आहे. राज्य हें समाजाचें राजकीय व सत्तात्मक स्वरूप असल्यामुळें त्याचेमार्फत हें होणें हें अनिवार्य आहे व स्वाभाविक आहे.

राज्य हें मनुष्याचें नागरिक या नात्यानें हितसंबंधाचें संरक्षण करणारें, त्यांना जपणारें एक संघटन आहे, एक संघ आहे; व या हितसंरक्षाणाचे कामीं जरूर तें करण्याचा त्याचाच हक्क आहे. याचा अर्थ अगदीं बारीकसारीक गोष्टींत राज्य हस्तक्षेप करील अगर करावा असें नाहीं. स्थूल मानानें, समाजांतील उत्पादक व्यवहारांवरील दृष्टि लक्षांत ठेवून कसें चालावें येवढें तरी राज्यानें केलेंच पाहिजे. जें राज्याचें कार्य आहे, तें विद्यमान सरकारनें सफल करण्याचें, अंमलांत आणण्याचें ध्येय ठेवलें पाहिजे, व सर्व प्रयत्न केले पाहिजेत. कारण प्रत्यक्ष राज्यकारभार, अंमलबजावणी ही बाब विद्यमान सरकारची आहे. म्हणजे जें कांहीं राज्याचें कार्य म्हणून मानलें गेलें, त्याचें प्रत्यक्ष स्वरूप विद्यमान सरकारचे क्रियेवरूनच ठरणार. विद्यमान सरकार हें राज्याच्या सत्तेचें व प्रभुत्वाचें चालू मुकत्यार. सामाजिकदृष्टीनें ध्येयात्मक असें

कांहीं जरी ठरलें असले तरी त्याचे प्रत्यक्ष सृष्टींतील स्वरूप, गुणावगुण, रंगरूप हें हा मुकत्यार ज्याप्रमाणें वागेल त्यावर अवलंबून राहाणार. राज्य म्हणजे राज्यांतील व्यक्तींच्यांत जें सामान्य त्याचें स्वरूप, त्याचें प्रतिक. सामुदायिक इच्छा त्यांत प्रतिबिंबित झालेल्या. जे केवळ वैयक्तिक व विशिष्ट असें सर्व वगळून जें सर्वांत आहे, जें सर्वांना समान आहे, त्यांचें संकलित स्वरूप म्हणजे राज्य; या परिस्थितींत राज्याचें मुकत्यार म्हणजे विद्यमान सरकार जे करील तें सार्वजनिक हिताचें यथार्थपणें असणारच असेंही कोणी म्हणतील; पण राज्याचें हें तात्त्विक व आदर्श स्वरूप, वस्तुस्थितींत असत नाहीं. म्हणून जे चालू मुकत्यार आहेत त्यांनीं जें ठरविलें असेल तें सार्वजनिक हिताचें आहे, असणारच असें मानणें गैर आहे. विद्यमान सरकारला योग्य का अयोग्य ठरविण्याचा अखेरचा अधिकार देणें म्हणजे त्याचा न्याय त्याना करावयास सांगण्यासारखें आहे. एकाद्या विशिष्ट हेतूसाठीं स्थापन झालेल्या संघाला सर्व बाबतींत अधिकार देणें जसें अयोग्य तीच गोष्ट येथे आहे. गिरणीमालकसंघाला सर्व अधिकार दिल्यास त्यांच्याच वर्गाचें ते हित पाहतील व वर्गहित म्हणजे सर्व समाजाचें हित असें गणित मांडतील. विद्यमान सरकारनें जें ठरविलें ते सार्वजनिक हिताचेंच असणार, त्याची इच्छा म्हणजे सामुदायिक इच्छा हें समीकरण वस्तुतः खरें नाहीं. विद्यमान सरकार म्हणजे समाजांतील त्या राज्यांतील कांहीं माणसें, तीं व अन्य यांच्यांत फरक नाहीं. हीं राज्यकारभार करणारीं माणसे देवकोटींतील आहेत अगर असतात हेंही खरें नाहीं. मदमोहलोभादिक सर्व कांहीं त्यांचे ठिकाणीं असतें. आणि म्हणून तेही चुका करतात. त्यांची दृष्टि ही त्याच समाजांत मिळविलेल्या अनुभवानें मर्यादित असते. त्यांचे विचारावरही सभोंवतालच्या परिस्थितीचा परिणाम झालेला असतो. त्यांच्या आंकाक्षांचें स्वरूपही सामाजिक परिस्थिती ठरवीत जाते व त्याचे सिद्ध्यर्थ ते प्रयत्न करीत असतात. जमीनदार वर्गांतील लोक विद्यमान सरकारांत अधिकारारूढ झाले कीं, त्या वर्गाचें हित संरक्षिलें जातें, तेंच देशाचें हित असा दावा केला जातो. मालकवर्गाचे हातीं विद्यमान सरकार आलें कीं, कामाचें तास, पगारवाढ या ऐवजी कच्च्या मालाचा मुबलक व माफक किंमतींत कसा पुरवठा होईल याकडे लक्ष दिलें जाईल. व तें करणें देशाचे उन्नतीचे दृष्टीनें आवश्यक आहे व हिताचे आहे असें प्रतिपादलें जाईल. म्हणून विद्यमान सरकारला, राज्याचे चालू मुकत्यारांना निर्णयात्मक सत्ता देणें सार्वजनिक हिताचें नाहीं. विद्यमान सरकार म्हणून वावरणाऱ्या व्यक्ति व समाजांतील अन्य व्यक्ति यांच्यांत हितैक्यता नसते म्हणून ही खबरदारी घेणें आवश्यक होतें. सत्ता मिळाली म्हणजे ती कायम ठेवावीशी वाटते.

आपले व्यक्तीगत अगर वर्गगतहित हें सार्वजनिक हित अशी नैतिक प्रतिष्ठा त्याला देण्याचा प्रयत्न होतो. सत्ता वा लक्ष्मीनें कोणास भुरळ पाडली नाहीं ? जगाचा प्रभु तो तर कायमच तिला घेऊन बसला आहे !! सत्ताधीश सरकार हें संघटनच असें आहे कीं तें अखेरीस वाममार्गाला जातें असें प्रसिद्ध फ्रेंच राजनीतिशास्त्रज्ञ रूसो म्हणतो तें बरेंच खरें आहे. राज्याला सर्व सत्ताधीश करणें, अमर्याद सत्ताधीश करणे म्हणजे वस्तुतः हा सर्व अधिकार, ही सर्व सत्ता विद्यमान सरकार म्हणून वागत असणाऱ्या मूठभर लोकांच्या हातीं ती देणें, असें होतें व या परिस्थितींत त्यांचेकडून तिचा दुरुपयोग होणारच नाहीं असें म्हणणें कठीण आहे.

राज्याचें कार्य लक्षांत घेतां व अमर्याद प्रभुत्वाचे धोके लक्षांत घेतां, अतर्गत कारभारांत राज्य हें जबाबदार स्वरूपाचें असलें पाहिजे हें इष्ट आहे, नव्हे, अवश्य आहे. प्रगतीपर व विधायक अशी ही जबाबदारी असली पाहिजे व त्या दृष्टीनें शासनतंत्र उभारलें पाहिजे. राज्यसंस्थांचें संघटनपण याच दृष्टीनें गुंफिलें पाहिजे. समाजांतील कार्य अगर व्यवहारपरत्वें संघटन करून त्याच्याशीं सहकार करून राज्यानें राज्यकारभार चालवावा म्हणजे वर निर्दिष्ट केलेली जबाबदारी उत्पन्न होईल असें प्रतिपादणारी एक विचारसरणी आहे. समाजांत जेवढे उद्योगधंदे आहेत त्यागणिक कार्यपरत्वें ( Functional ) संघटन करून म्हणजे प्रत्येक धंदा, प्रत्येक रोजगार संघटित करून त्यांच्या प्रतिनिधींच्या सल्ल्यानें, राज्यानें राज्यसत्तेनें राज्यकारभाराबाबत अखेरचें निर्णय घ्यावेत हा या विचारसरणींतील मुख्य भाग आहे. संघनिष्ठ समाज-सत्तावादी लोकांचें ( Guild Socialist ) हें म्हणणें आहे. सर्व धंदे समाजाचे दृष्टीनें सारखे उपयुक्त नाहींत. या स्थितींत सारखें प्रतिनिधित्व दिलें तर ती विषमताच होणार. कोणतें माप, कोणतें प्रमाण या सर्व संघाना लावून त्यांची उपयुक्तता व महत्त्व मोजावयाचें, व त्या दृष्टीनें त्यांचें प्रतिनिधित्व न्याय्यदृष्ट्या विषम होणार नाहीं हें ठरविणें अत्यंत कठीण आहे. कार्याची उपयुक्तता आकड्यांत मोजून प्रतिनिधीची संख्या ठरवावयाची हें बिकट व नाजूक काम आहे. मंगळसूत्र घडविणाऱ्या सोनारसंघाला किती महत्त्व, नांगर घडविणाऱ्या लोहाराच्या दृष्टीनें द्यावयाचें हें ठरविणें अवघड व तें साधारणपणें कल्पनेंत ठरलें तरी, संख्येंत त्याचा भाव उतरावयाचा हें तर आणखी कठीण. या परिस्थितींत धंद्यागणिक संघटन होऊन त्यांचे प्रतिनिधीमंडळ जरी राज्यसत्तेला जोडीला दिलें तरी सल्लामसलतीशिवाय जास्त त्यांना कांहीं करतां येईल असें वाटत नाहीं. औद्योगिक क्षेत्रांतील विशिष्ट प्रश्नाबाबत हें मंडळ अधिकारवाणीनें बोलूं शकेल, पण सर्व औद्योगिक क्षेत्रांबाबत पूर्णपणें अधि-

कारवाणीनें त्यांना बोलतां येणार नाहीं. तितकी नैतिक प्रतिष्ठा व अधिकार या संघटनेंत उत्पन्न होणें कठीण आहे. तथापि, तसें झाल्यास हे संघटन राज्यच होईल, त्याचा एक भाग होईल हें संभवनीय आहे. आर्थिक मंडळें (Economic Councils) योजनामंडळें ( Planning Commissions ) हीं बहुतेक राष्ट्रांतून आहेत, पण तीं सर्व सल्लामसलत देणारीं, योजना तयार करणारी अशी आहेत. अंतिम निर्णय राज्यांतील शासनसंस्थाच घेतात. शासनसंस्था ह्या मंडळांना जबाबदार नसतात.

निरनिराळे मजूरसंघ घेतले तरी हीच स्थिति दिसून येईल. त्यांचे उद्दिष्ट विशिष्ट व मर्यादित. समाजांतील सर्व मजूरसंघांचा संघ जरी झाला, सर्व मजूर याप्रमाणें संघटित झाले तरी या मजूर संघटनेचें कार्यही मर्यादित राहणार. औद्योगिक क्षेत्राबाहेर त्यांचा संबंध येणार नाहीं. त्यांनीं अन्य बाबतींत कांहीं ठराव केल्यास घटकांवर ते बंधनकारक राहणार नाहीत. गिरणीकामगार संघानें शारदा–कायद्याला मान्यता दिली अगर निषेध केला तर त्याचा परिणाम नाममात्र; उलट कामाचे वेळाबद्दल, मजुरीचे दराबद्दल ठराव केल्यास त्याचें महत्त्व जास्त व तो ठराव संघाचे सभासदांवर बंधनकारक. मजूर संघटनेने औद्योगिक क्षेत्रांतील गोष्टींबद्दल कांहीं सूचना केल्या अगर मतप्रदर्शन केले तर तें राज्य विचारांत घेईल. एतद्विषयक कायदे करतांना त्यांची सल्लामसलत घेईल. पण त्यांचा निर्णय अखेरचा म्हणून मान्य करणार नाही. हा निर्णय देण्याचा अधिकार राज्य आपल्याकडेच ठेवील. मजूरसंघांना सुद्धां निर्णय देतांना, मत देतांना अनेक अडचणी असतात. एकाच धंद्यांत अनेक मजुरीचे, रोजगारीचे प्रकार असतात. अनेक प्रतीचे कारागीर एकाच धंद्यांत उत्पादनाच्या निरनिराळ्या अवस्थांत काम करीत असतात. सर्वच ८ तास काम करतात म्हणून सर्वच सारखे असें कोणी म्हणणार नाहीं. हिरे आणि कोळसे खाणींतूनच निघतात, मजूरच काढतात, म्हणून काढणारांची मजुरी व कारागिरी ही सारखी नसते व त्यांच्या उत्पादनाची किंमत तर सारखी नसतेच नसते. शस्त्रक्रिया करणारा तज्ज्ञ डॉक्टर व व सामान्य नाडी परीक्षा करून औषध देणारा डॉक्टर हें एकाच संघांत असले तरी त्यांचें कौशल्य व कारागिरी निराळी त्यांचें हितसंबंधही कांहीं बाबतींत निराळे; या परिस्थितींत वैद्य संघानें कांहीं म्हटले तरी तें अखेरचें मानणें चूक होईल. याचा अर्थ असा नव्हे कीं, कार्यागणिक धंद्यागणिक संघ नसावेत. धंद्यांतील विशिष्ट प्रश्नाबाबत त्यांचे म्हणणें महत्त्वाचें समजले पाहिजे. त्यांची सल्लामसलत घेतली पाहिजे. सर्व सामान्य अशा सामाजिक बाबींत त्यांनीं कांहीं म्हटलें तरी तें ऐकलें पाहिजे असें मात्र नाहीं. हे संघ संघटनेनें व हेतूच्या व कार्याच्या दृष्टीनेंही सर्वसामान्य अशा सामाजिक

प्रश्नावर बोलण्यास व मत देण्यास अनधिकारी आहेत. त्यांची संघटना संकुचित पायावर व कार्यही विशिष्ट. या स्थितींत सर्व समाजाला व्यापणारे प्रश्न त्यांचे कक्षेंत येत नाहींत. त्यांचें सभासदांनीं व्यक्ति म्हणून, सामान्य नागरिक म्हणून मत दिल्यास अयोग्य नाहीं; तसा त्यांना पूर्ण अधिकार आहे. परन्तु या सांघिक मतप्रदर्शनाला राज्य जबाबदार नाहीं व राहाणेंही योग्य नाही. कारण यथार्थ व सर्वांगीण प्रतिनिधित्व त्यांत असूं शकत नाहीं.

संकुचित दृष्टि व विशिष्ट हेतूमुळें निरनिराळे संघ समाजाचें असें यथार्थ प्रतिनिधित्व पावूं शकत नाहींत हें स्पष्ट आहे. तथापि, एक वेळ तसें संपूर्ण नसलें तरी समाधानकारक प्रतिनिधित्व या कार्यपरत्वें संघटित झालेल्या संघांना आलें तरी सुद्धां सर्व अडचणी दूर होतात असें नाहीं. या प्रतिनिधि मंडळाचे व राज्याचे शासनाचे दृष्टीनें काय संबंध राहावेत व ते कसे उत्क्रांन्त व्हावेत हें ठरविणें अत्यंत कठीण आहे. कार्यकारी अगर अंमलबजावणी करणारें ( Executive ) शासन व हें मंडळ यांत अधिकार विभागणी होणार व ती क्षेत्र अगर प्रादेशिक दृष्टीनें न होतां कार्यपरत्वें होणार. या परिस्थितींत कोणाच्या अधिकारक्षेत्रांत कोणती बाब विशिष्ट परिस्थितींत पडते हें सांगणें कठीण होतें. त्यांच्या अधिकारमर्यादा प्रथम निश्चित केल्या पाहिजेत व या बाबतींत वाद उपस्थित झाल्यास निर्णय करणारी संस्था अगर संघटन निर्माण केलें पाहिजे. निर्णय देणारें हें वरिष्ठ संघटन अगर न्यायालय कांहीं लोकांनीं निवडून दिलेले नसणार. न्यायाधीशांना जर निवडणुकीवर अवलंबून ठेवले तर त्यांच्या न्यायदानांत निःपक्षपातीपणा, निस्पृहता, निर्भयपणा राहणार नाहीं. त्यांची नेमणूक सरकार करील अगर घटनेप्रमाणें अन्य कोणी करील तर तें योग्य होईल. नेमणुकीनंतर जोंपर्यंत न्यायाधीश योग्य वर्तन ठेवील तोंपर्यंत त्यास जागेवरून दूर करणें योग्य नाहीं. मुदत संपतांच अगर ठराविक वय होतांच तो निवृत्त होईल हें ठीक. तात्पर्य, नेमणुकीनें अधिकारावर आलेले न्यायाधीश यांनीं वर उल्लेखिलेले वाद ऐकावयाचे व निर्णय द्यावयाचा म्हणजे अखेरचा निर्णय देण्याची अंतिमसत्ता, राज्यांतील कार्यकारी सरकाराकडे न राहतां, निवडून आलेल्या विधिमंडळाकडे न राहतां नेमलेल्या व प्रतिनिधि नसलल्या न्यायाधिशांकडे जाते. न्यायाधीश निवडून देऊन त्यांच्याकडे हे काम सोपविणें इष्ट नाहीं. निवडून आलेले न्यायाधीश लोकप्रिय असतील पण न्यायप्रिय असतीलच असें नाहीं. निवडणुकीनें अधिकारारूढ झालेल्या न्यायाधिशाकडून मिळालेला न्याय व्यक्तिशः व वर्गशः निःपक्षपाती नसतो हाच अनुभव आलेला आहे. सर्वच कार्यकारी शासन अगर सरकारचें कार्य समाजांतील

आवश्यक अशा कार्यांच्या कार्यपरत्वें संघटित झालेल्या संघाकडे द्यावें असें प्रतिपादणारे कांहीं लोक आहेत. समाजांत हजारों रोजगार, शेकडों उद्योग आहेत; कोणाला आवश्यक म्हणावयाचें व कोणाला अनावश्यक ठरवावयाचें ? समजा, कांहीं कार्यांचे, रोजगारांचे संघ आवश्यक ठरविले व त्यांच्या प्रतिनिधींचें मंडळ करून त्यांचे हातीं कार्यकारी सरकार व सत्ता दिली तर उपस्थित होणारे वाद यांचा ज्यांनीं निर्णय करावयाचा ते न्यायाधीश या प्रतिनिधींनीं निवडून द्यावयाचें कां या मंडळानें नेमावयाचे ? नेमावयाचे तरी नक्की कोणी नेमावयाचे ? संबंध मंडळ पुढाकार घेणार कां त्यांतील कांहीं व्यक्ती ? साधारण मजूर संघ अगर उद्योगधंद्यांतील संघ यांच्या घटनांमध्यें जीं तत्त्वें प्रभावी असतात तीं शासन संस्थांच्या संघटनेंत लागू केलीं तर तें योग्य होणार नाहीं. तेथें घटनेचा पाया संकुचितच राहणार व दृष्टि, हेतु मर्यादित असल्यामुळें व्यापक राहूं शकत नाहीं. शासनसंस्था, राज्याचें राजकीय संघटन हें व्यापक, समाजाइतकें व्यापक असलें पाहिजे व त्या संघटनांत प्रत्येक व्यक्तिला आपण आहोंत हें सहज कळलें पाहिजे. संघटनेंतील आपलें महत्त्व प्रत्येक व्यक्तीला कळणें ही तर लोकशाही पद्धतींतील एक महत्त्वाची बाब आहे. आपल्याला न समजणारी कांहींतरी भानगड आहे हा विचार नागरिकांत या बाबतींत उत्पन्न झाल्यास तो राजकारणविन्मुख होतो व त्यानें राजकारणांत लक्ष घालवें व दक्ष असावें हा तर त्याचा मुख्य धर्म. म्हणून राज्याचें राजकीय संघटन सरळ, सहज समजणारें असावयास पाहिजे. वर उल्लेखिल्याप्रमाणें संघप्रतिनिधींनीं शासन अगर सरकार बनून राज्यकारभार करावयाचा म्हणजे गुंतागुंतीचें संघटन होतें. सामान्य बुद्धिच्या नागरिकाला, कोणाला जबाबदार धरावें हें कळणें कठीण होतें, व या परिस्थितीचा फायदा ज्यांच्या हातांत या संघटनेची वास्तविक सूत्रें असतात व ही गोष्ट सामान्य जनतेला उकलत नाहीं, ते पूर्णपणें घेण्याचा संभव असतो. क्लिष्ट व भानगडीची घटना असली म्हणजे, जे त्यांतील रहस्य जाणतात तेंच शेवटीं सत्ताधीश होतात व स्वार्थ साधतात.

व्यक्ति ही व्यक्ति या नात्यानें नव्हे तर ती जें कार्य करते त्या दृष्टीनें समाजरचनेंत तिला महत्त्व द्यावयाचें झाल्यास त्या समाजसंघटनेचा विचार करतांना समाजाच्या आर्थिक स्वरूपाचा विचार करणें महत्त्वाचें ठरतें. सदरहू समाजांतील उद्योगधंदे हे खाजगी मालकीचे नसून सार्वजनिक अगर सरकारी मालकीचे असतील तर प्रश्न अगदींच सोपा आहे. खाजगी मालकी नाहीं म्हणून स्वार्थी हितसंबंध उत्पन्न होत नाहींत म्हणून प्रतिनिधित्वाचें दृष्टीनें पुष्कळ सोईस्कर होतें. केवळ कार्यांचें

महत्त्वमापन करून एकंदर गोष्टीचा विचार करतां येतो. अशी परिस्थिती विद्यमान जगांत एखादें दुसरें रशियासारखें राष्ट्र सोडल्यास अन्यत्र नाहीं. प्रत्यक्ष जगांत, मालक–मजूर असा भेद प्रत्येक महत्त्वाच्या उद्योगधंद्यांत दिसून येतो. चालू युद्ध संपून जगाची पुनर्घटना होऊन काय घडेल हें सांगणें कठीण. तथापि, युद्धोत्तर प्रत्येक राष्ट्रांत सामाजिक व राजकीय क्रांति झाली तरच खाजगी मालकी नष्ट होण्याचा संभव आहे, येवढें आज म्हणतां येईल. वरीलप्रमाणें क्रांति न झाली तर प्रमुख धंदे राज्यामार्फत निदान नियंत्रित होतील, नियमित होतील असें वाटतें. तसें झालें तरी प्रत्येक धंद्यांत मालक व मजूर हा भेद राहाणार व या दोन्हींना प्रतिनिधित्व मिळणें जरूर आहे. जे धंदे सर्वस्वीं सरकारी मालकीचे होतील तेथें हें द्वंद्व असण्याचें कारण नाहीं. कांहीं धंदे सरकारच्या मालकीचे, कांहीं नियंत्रित, कांहीं सर्वथैव स्वतंत्र या परिस्थितींत कार्यपरत्वें निवडून दिलेल्या प्रतिनिधींनीं राज्यकारभार चालवावयाचा झाल्यास, अडचणी वाढून कार्यक्षमतेचा निकाल लागेल. हिताहितांचे गलबल्यांत एकसूर तर राहाणार नाहीं उलट कोलाहलच वाढेल. म्हणजे जेथें समान हितसंबंध नाहीं, समान व सारख्या गरजा नाहींत तेथें उपलब्ध होणारें प्रतिनिधित्व एकजिनसी व एक विचाराचें असूं शकत नाहीं. नागरिक जर कोणी मजूर म्हणून, कोणी मालक म्हणून, कोणी घरवाला तर कोणी भाडेकरी, कोणी जमीनदार तर कोणी कुळ म्हणून, याप्रमाणें निरनिराळ्या व हितविरोधी नात्यानें ओळखले जाऊं लागले व त्याच भूमिकेला अनुसरून ते मतदार होऊन राज्यकारभारांत लक्ष घालूं लागले तर कारभारांत या सर्व सामाजिक व आर्थिक द्वंद्वांचें, विरोधांचें प्रतिबिंब पडणार. उलट मतदार ही भूमिका कुठल्याही सामाजिक अगर आर्थिक हिताशीं अगर नात्याशीं संलग्न न राहातां केवळ नागरिक या एकाच गोष्टीवर आधारलेली असेल तर राज्यकारभारांत पुष्कळच गुंतागुंत कमी होईल. नागरिक याच नात्यानें सर्व मतदार व सर्व सारख्या दर्जाचे; लक्षाधीश, भिक्षाधीश, साहित्यसम्राट्, व अक्षरशत्रू हे सर्व एकाच भूमिकेंत असले तर एक नैतिक प्रतिष्ठा व्यक्तिमात्रांत उत्पन्न होते. व्यक्तीचा व्यक्ति या नात्यानें गौरव होतो व व्यक्ति समानतेच्या वातावरणांत वागत असलेमुळें उन्नत होते. आर्थिक व सामाजिक महत्त्व ज्या व्यक्तींना मिळालें असेल त्याचा ते दुरुपयोग करूं शकतील, राज्यकारभारावर त्याच महत्त्वाचें जोरावर स्वार्थी दृष्टीनें परिणाम करूं शकतील व करताताही. पण राजकीय दृष्टीनें सर्व नागरिक हे एकाच भूमिकेवर असल्यामुळें कांहीं शक्ति निर्माण झालेली असते. ती संघटित झाल्यास आर्थिक व सामाजिक महत्त्वाचा दुरुपयोग टाळतां येणें शक्य असतें.

पण जेथें मतदान हें केवळ व्यक्ति, केवळ नागरिकत्व यावर अवलंबून न राहातां अन्य गोष्टींवर व अर्थात् विषमतेवर अवलंबून असेल तेथें, निवडून येणारें प्रतिनिधी-मंडळ एकजिनसी नाहीं, एकसंधी नाहीं, संकीर्ण व त्यामुळें प्रगतिविन्मुखच असणें शक्य असतें. सर्व राजकारणांत गटबाजी उत्पन्न होऊन सत्ता मूठभर धूर्त लोकांच्या हातीं जाते व राज्यांत आवश्यक ती जबाबदारी निर्माण होत नाहीं.

कार्यपरत्वें झालेल्या संघटनेचे हातीं राज्यकारभार आल्यास कोणत्या परिस्थितींत तो जबाबदार राज्यकारभार होऊं शकत नाहीं याचें थोडेसें दिग्दर्शन वर आलें आहे. राज्य जबाबदार स्वरूपाचें व्हावें म्हणून संघटनेचें सूत्र कसें असावें हें पाहिलें पाहिजे. राज्याची सत्ता अमर्याद असतां कामा नये व त्याचबरोबर त्याचे संघटनेंत जबाबदारीचा भाव पण उमटला पाहिजे, असें या प्रश्नाचें स्वरूप आहे. राज्यसंघटनेंत जबाबदारीची विभागणी करून राज्यसत्ता मर्यादित करणें असें कांहीं ठिकाणीं करण्यांत आलें आहे, व त्याचा अनुभव असा आला आहे कीं जबाबदारीचा अंशही तेथें राहिला नाहीं. अमेरीकेंतील सं. संस्थानांचें उदाहरण लक्षांत घेण्यासारखे आहे. शासन हें त्रिविध स्वरूपाचें आहे. विधिविषयक ( **Legislative** ) कार्यकारी ( **Executive** ) न्यायादानी ( **Judicial** ) अशा या तीन स्वरूपांत राज्याची सत्ता विभागली जाते. तथापि, या सर्वांचें आधारभूत असें जें महाकारण म्हणजे राज्याचें प्रभुत्व तें एकजिनसी व अविभाज्यच असतें. कारण, अखंडत्व व अविभाज्यत्व हीं तर त्याचीं प्रमुख लक्षणें आहेत. प्रभुत्व संघटनेच्याद्वारें व्यवहारांत येतांना त्याचीं वर लिहिल्याप्रमाणें तीन स्वरूपें दिसतात. याचा अर्थ तीं तीन एकमेकांपासून अलग असलीं पाहिजेत म्हणजेच प्रभुत्वाला मर्यादा बसते असें मात्र नाहीं. उलट, अमेरिकेच्या घटनेंत ही कांटेकोर व कठोरपणें विलग ठेवल्यामुळें, राज्याचे स्वरूपांत जशी जबाबदारी उत्पन्न व्हावयास पाहिजे तशी झालेली नाहीं. तेथील कार्यकारी सत्ता म्हणजे अधिकारावर असलेलें सरकार, विधीमंडळानें अविश्वास दाखविला तरी ठराविक काळपर्यंत सत्ता सोडण्यास बांधलेले नाहीं. विधिमंडळास तें जबाबदार नाहीं. विधिमंडळानें केलेला कायदा बेकायदेशीर आहे, विधिमंडळाल तसा कायदा करण्याच्या घटनेप्रमाणें हक्क नाहीं हें ठरविण्याची सत्ता प्रमुख न्यायालयाला आहे. समाजाच्या, विशिष्ट कालाच्या अगर क्षणाच्या गरजा जाणून विधिमंडळानें केलेला आवश्यक असा कायदा बेकायदेशीर ठरविणें म्हणजे जबाबदारीचा अभावच या घटनेंत दिसून येतो असें म्हणणें प्राप्त आहे. राज्यकारभाराची हीं तीन प्रमुख अंगें अलग ठेवल्यानें जिव्हाळ्याचे प्रश्न, जनतेला अत्यंत जरुरीचे वाटणारे प्रश्न,

निश्चित जबाबदारीचे अभावीं लोंबकळत पडतात. प्रे. रूझवेल्ट यांनीं १९३२–३६ या अवधींत मंदीचे परिणाम कमी करण्यासाटीं केलेल्या प्रयत्नांचा इतिहास हेंच सांगतो. तेथील विधिमंडळानें केलेले एतद्विषयक कायदे प्रमुख न्यायालयानें बेकायदेशीर व घटनेविरुद्ध ठरविले. समाजाची गरज जाणून राज्यकारभार जेथें होऊं शकत नाहीं, तेथील राज्याचें स्वरूप जबाबदारीचे स्वरूपाचे आहे असें कोणीही म्हणणार नाहीं. अखेरची सत्ता प्रत्येक राज्यांत कोणाची तरी असलीच पाहिजे व ही सत्ता जबाबदार झाली पाहिजे. कार्यांची विभागणी करून जबाबदारी टाळण्यांतच आली अशी टीका अमेरिकेच्या संयुक्त संस्थानाचे घटनेबाबत नेहमीं केली जाते व ती अयथार्थ आहे असें कोणी म्हणणार नाहीं.

राज्यसत्तेचा उपयोग विद्यमान सरकार म्हणजे कांहीं माणसे कांहीं गट निर्णायक रीतीनें करीत असतात असें आढळून येते. या राज्यसत्तेला जबाबदार करण्याचे तीन मार्ग सांगितले जातात. जे गट अगर जीं माणसें ही सत्ता चालवीत असतील त्यांना अधिकारापासून, सत्तास्थानापासून पदच्युत करण्याची, हांकून देण्याची परिणामकारक व्यवस्था राज्याचे संघटनेंत ठेवणें हा एक उपाय. ज्यांच्या सल्लामसलतीनें व विचारविनिमयानें राज्यकारभार चालतो, त्यांचें संघटन करून योग्य सल्लामसलत मिळेल अशी व्यवस्था करणें हा दुसरा उपाय. तिसरा उपाय म्हणजे आमजनता जी प्रभुत्वाची खरी मालक आहे तिला सुशिक्षित व स्वहिततत्पर करणें. अशी दक्ष व सज्ञान जनता होणें हें आर्थिक व शिक्षणविषयक विषमता समाजांत जर कमींतकमी असेल तरच शक्य आहे. या बाबतींत ढोबळ विषमता असेल, तर जें या बाबतीत श्रेष्ठ तेंच राज्यकारभाराचें स्वरूप आपल्या वजनानें ठरवितील हें उघड आहे. खरें जबाबदार राज्य म्हणजे ज्यांचे कारभारांत आमजनतेच्या इच्छेचा योग्य स्वीकार केला जातो तें. राज्याची इच्छा व तिचें क्षेत्र म्हणजे सर्व जनतेची इच्छा व तितकें व्यापक क्षेत्र अशी परिस्थिती तत्त्वतः असली पाहिजे इतकेंच नव्हे, तर कायद्यानेंसुद्धां तशीच असली पाहिजे; आणि इतकें असलें तरी सर्व जनतेचें फार फार तर नैतिक सहकार्य मिळूं शकेल. प्रत्येक प्रसंगीं कायद्यानुसार आमजनतेचें सहकार्य मिळणें दुरापास्त आहे. राज्याचें दिग्दर्शनाखालीं समाजांतील व्यवहार चालतो; औद्योगिक, व्यापारविषयक व अन्य रोजगार यांच्या मर्यादा अखेरीस राज्यच ठरवितें. समाजांतील जीवनाचें विविधत्व व वैचित्र्य हें व्यक्ति व शासन या दोन्हींच्यावर अवलंबून असतें. कांहीं हितसंबंध व्यक्ति उत्पन्न करतात तर कांहीं शासनामुळें उत्पन्न होतात. हे सर्व हितसंबंध विविधस्वरूपीं व प्रसंगीं विसंगतही असतात, व त्यामुळें

त्यांच्यांत समवाय उत्पन्न करून त्यांचे कायद्यानुसार सहकार्य राज्यसत्तेला मिळणें कठीण होतें. राज्यांत प्रत्यक्ष शासनाचें क्षेत्र, प्रत्यक्ष राज्यकारभाराचें क्षेत्र कमी केलें तरी त्यालाही मर्यादा आहे. ज्या खास व विशिष्ट बाबी आहेत, त्या विद्यमान सरकारच्या हवालीं न करतां अन्यरीतीनें त्यांची व्यवस्था जरी केली व सरकारचें कार्यक्षेत्र मर्यादित केलें तरी आमजनतेला ज्या बाबी समान आहेत, ज्या सोयी सर्वांसाठीं आहेत, त्यांचा कारभार तर सरकारनें केला पाहिजे व त्यांत अन्य कोणाला सरकार हस्तक्षेप करूं देणार नाहीं हें उघड आहे. आंतरराष्ट्रीयदृष्ट्या, आंतरराष्ट्रीय बाबतींतील प्रभुत्व व अधिकार जरी मर्यादित केले, नियंत्रित केले तरी आधुनिक राज्यांत अंतर्गत कारभारांत समविष्ट होणाऱ्या बाबी कांहीं थोड्याथोडक्या अगर लहानसहान नाहींत. शिक्षण, आरोग्य, शांतता व सुव्यवस्था, अनेक धंद्यांचे समाज हिताचे दृष्टीनें नियमन, बेकारी वगैरे अनेक बाबी आहेत कीं, ज्यांचे कारभारांत विद्यमान सरकारचा, राज्यसत्तेचा अधिकार सर्वश्रेष्ठ व महत्त्वाचा आहे. राज्यांतील नागरिकांची मालक—मजूर, जमीनदार कुळ वगैरे अनेक नातीं परस्परांत असलीं तरी जे मौलिक नातें म्हणजे एका राज्यांतील नागरिक हें सर्वांना समान असतें; व तेवढ्या नात्यानें राज्य, त्यांच्या म्हणजे सर्व नागरिकांच्या हितसंबंधाकडे पाहात असतें. राज्यांतील कांहीं नागरिक उत्पादक असतील व कांहीं नसतील, कांहींना जमीन असेल, कांहींना नसेल; तथापि नागरिक उपभोगी आहेत. अन्न, वस्त्र, निवास या आवश्यक गरजा सर्वांना आहेत; परंतु सर्वच कांहीं त्या भागविणाऱ्या वस्तूंच्या उत्पादनांत खपत असतात असें नाहीं. सर्व माणसें उत्पादक नसतात पण उपभोगी मात्र असतात. उत्पादनाशिवाय उपभोगावर हक्क नसावा हें अगदीं योग्य आहे. पण आजच्या जगांत अद्यापि ही परिस्थिती रशियाशिवाय अन्यत्र नाहीं. तथापि, सर्व माणसें उपभोगी असल्यामुळें समाजांत होणाऱ्या उत्पादनाचा यथायोग्य अंश प्रत्येकाला तो नागरिक आहे म्हणून, मिळून त्याचें जीवन सह्य व्हावें प्रसन्न व्हावें, सार्थ व्हावें अशी व्यवस्था करण्याचें कर्तव्य राज्याचें आहे.

समाजांत विविधता असली तरी सर्व माणसे नागरिक आहेत व उपभोगी आहेत एवढी मौलिक एकता निःसंशय आहे. व या भूमिकेशीं राज्याचा संबंध अगदीं अपरिहार्य आहे. मनुष्य संपूर्णपणें स्वावलंबी होऊं शकत नाहीं. दुसऱ्याचे उत्पादनावर, श्रमावर थोडें तरी त्याला अवलंबून राहावें लागतें. म्हणून उपभोगी हें त्याचें स्वरूप जास्त महत्त्वाचें होते व त्या दृष्टीनें त्याचे हितसंबंध जपण्याचें कार्य राज्याला करावें लागतें. उपभोगी ही त्याची भूमिका राज्याच्या दृष्टीनें महत्त्वाची ठरते.

उत्पादनाचे नियमन व नियंत्रण हें जरी सर्वस्वी त्या त्या धंद्यांतील अगर रोजगारांतील संघटनेवर सोपविलें व त्याप्रमाणें शासनांत व्यवस्था झाली तरी तेवढ्यानें मनुष्याची उपभोगी ही भूमिका कमी महत्त्वाची होत नाहीं. आयुष्य अगर जीवन म्हणजे एक विशिष्ट कार्य करण्याकरतांच आहे, एकच एक मार्गानें जाण्याकरतां आहे असें मानणारे सर्व नसतात. जीवनाकडे कलात्मक दृष्टीनें पाहून फुरसतीचे वेळीं त्याचे विकासाचा, उन्नतीचा प्रयत्न करणारेही अनेक असतात. स्वतःचे जे नियत काम असेल त्या वेळीं तो उत्पादक असतो. पण विश्रांतीचे वेळीं वर लिहिल्याप्रमाणें जेव्हां तो आपल्या जीवनाला उन्नत करण्याच्या दृष्टीनें, कलात्मक करण्याचे दृष्टीनें प्रयत्न करीत असतो त्या वेळीं दुसऱ्यानें केलेल्या उत्पादनावर तो अवलंबून असतो. साहित्यिकांचे ग्रंथ तो वाचतो, कलावंतांनीं केलेलीं चित्रें अगर चित्रपट पाहातो, कंठमधुर गायक गायिकांनीं गायिलेलें संगीत ऐकतो. तात्पर्य, दुसऱ्याचें उत्पादन तो उपभोगीत असतो व आपल्याला लाभलेली विश्रांति याप्रमाणें जीवन समृद्ध व आनंदमय करण्यांत घालवीत असतो. या सर्व गोष्टींचा परिणाम उत्पादनसृष्टीवर होत असतो. उत्पादन संघटनांत तो असतो म्हणून त्याच्या दृष्टिकोनाचा, त्याच्या मानसिक विकासाचा तेथें परिणाम होणें अपरिहार्य होतें. उपभोगी म्हणून त्याची भूमिका अशारीतीनें महत्त्व पावते. ज्या गोष्टी मनुष्याला आवश्यक वाटतात त्या त्याला पूर्णपणें मिळाल्या म्हणजे त्याच्या प्रेरणांना पूर्ण वाव मिळतो. अर्थात् या सर्व गोष्टींचें तोच कांहीं उत्पादन करीत नाहीं. इतरांच्या उत्पादनावर त्याला अवलंबून राहावें लागतें. त्याच्या उन्नतीसाठीं, जीवन यथार्थ होण्यासाठीं तो ज्याचा उपभोग घेतो तें महत्त्वाचें आहे; तो काय उत्पादन करतो हें महत्त्वाचें नाहीं. उपभोगी ही भूमिका जास्त महत्त्वाची आहे. गटारें साफ करतांना जीवनसाफल्य झालें असें कोणत्या हरिजनाला वाटेल? त्याला शिक्षण मिळालें, स्वच्छ घर राहाण्यास मिळालें, योग्य अन्न मिळालें, उन्नत करणारी करमणुकीचीं साधनें मिळालीं तरच त्याला आनंद वाटेल. पण हें सर्व उत्पादन दुसऱ्यांनीं करावयाचें व त्यानें उपभोग घ्यावयाचा. सामान्यतः श्रमजीवी लोकांच्या दृष्टीनें उपभोगी हीच भूमिका महत्त्वाची आहे. समाजांत कांहीं थोड्या बाबतींत माणसांना उत्पादकाची भूमिका महत्वाची व मौलिक वाटते हें खरें आहे. कलावन्त कलात्मक वस्तूंच्या उत्पादनांतच रममाण होतो, त्यांतच जीवनाचें साफल्य अनुभवतो. उत्कृष्ट व जातिवंत शिक्षक व साहित्यिक हे आपापल्या उत्पादनांत रंगून जातात. स्वतःचें जीवित उन्नत करीत जातात. राज्यकार्यधुरंधर मुत्सद्दी याचप्रमाणें स्वतःचें नियतकार्यांत जीवनाचें साफल्य व विकास पावत असतात. हे सर्व जगण्यासाठीं करीत

असलेल्या उत्पादनांतच श्रेष्ठ व व्यापक असें जीवन अनुभवीत असतात. म्हणून त्यांना त्यांचे उत्पादन महत्त्वाचें वाटतें. समाज–संघटन योग्य व कार्यक्षम व्हावयाचें असेल तर असल्या व्यक्तींना त्यांच्या विधायक वृत्तींना योग्य वाव मिळेल अशी व्यवस्था व वाव त्यांत असला पाहिजे.

केवळ जगण्यासाठीं केलेल्या उत्पादनांत जीवनाचा श्रेष्ठतर विकास व साफल्य मानणारा व पावणारा असा वर्ग फार अल्प प्रमाणांत असतो. केलेल्या उत्पादनांत त्यांचें व्यक्तिवैशिष्ट्य दिसून येतें. काव्यांत कवीचें हृदय, कादंबरींत लेखकाचा आदर्श, उत्कृष्ट चित्रांत कलावंताचें भाव दृग्गोचर होतात हें खरें; पण ही सर्व मंडळी समाजांत अगदीं अल्पसंख्यांक असतात. पगारासाठीं सालोसाल तेच पाठ शिकविणारा शिक्षक, दररोज सकाळपासून संध्याकाळपर्यंत त्याच साच्यासमोर काम करणारा मजूर, लोकांच्या व्यवहाराचा दररोज हिशोब करणारा कारकून यांना आपल्या कामांत, आपल्या उत्पादनांत, जीवनाचा विकास वाटतो असें म्हणणें गैर आहे. पोटासाठीं करीत असलेल्या श्रमांत हृदयाचे भाव अगर बुध्दीचा विकास उपलब्ध होत असतील हें मानणें अगदीं चूक आहे. आधुनिक जगांत उत्पादन यंत्रसहाय्यानें व मोठ्या प्रमाणावर होत आहे यामुळें पोटासाठीं काम करणारीं माणसें, करीत असलेल्या कामांत क्वचितच रममाण होतात. उलट, काम संपलें व विश्रांति मिळाली म्हणजेच ते माणसांत येतात, त्यांना कांहीं आनंद वाटूं लागतो. बेरजा करून त्रासलेला कारकून, सुट्टीचा भोंगा होईपर्यंत कानठळ्या बसणाऱ्या आवाजांत काम करणारा गिरणी मजूर, इंजिनांत कोळसे टाकून टाकून घामानें डबडबलेला आगवाला हे जेव्हां विश्रांतिसाठी, कामाचे जागेवरून चहा पिण्यास, विडीचा झुरका मारण्यास विश्रांति मिळाल्यावर येतात, त्यावेळेस त्यांना मोकळें वाटतें, आपण मनुष्य आहोंत असें वाटतें, प्रसन्न वाटतें. काम करतांना ते यंत्रवत् वागतात व तसेच होतात. म्हणून त्यांना मिळणारी विश्रांति ही महत्त्वाची बाब असते. पोटासाठीं करावे लागणारे श्रम शक्य तितके कमी पडावेत, व त्यापासून जास्तींत जास्त प्राप्ति व्हावी असें त्यांना साहजिक वाटतें. कारण, या प्राप्तीपासून आपल्या विश्रांतिच्या काळांत आपल्या इच्छेप्रमाणें वागणें त्यांना शक्य होतें. पोटापुरतेंच मिळालें तर तें विश्रांतिचा उपयोग करूं शकत नाहींत. गिरणी बंद झाली म्हणजे जशीं यंत्रें बंद राहतात तीच त्यांची स्थिति होते. जर अधिक मिळालें तर ती हालचाल करणारीं यथार्थपणें माणसें होतात, समाजांत हिंडतात, ज्ञान वाढवितात, आनंद मिळविण्याचा प्रयत्न करतात. माणसांत असलेली सर्व शक्ति जर पोटापुरतें मिळविण्यांतच खर्च झाली तर त्याची उन्नती संपली, विकास संपला. कांहीं तरी

शक्ति पोटासाठीं काम करून शिल्लक राहील, व तिचा उपयोग आत्मोन्नतीसाठीं करण्याकरितां, कांहीं तरी प्राप्ती निव्वळ पोट भागून शिल्लक राहील, अशी अपेक्षा मनुष्यमात्र करीत असल्यास तें अगदीं योग्य आहे; व या दृष्टिनें मनुष्य समाजाकडे, राज्याकडे पहात असतो. विद्यमान सरकार या दृष्टिनें नुसतें उत्पादनाचें दिग्दर्शक असून उपयोगी नाहीं, तर समाजांत होणाऱ्या उत्पादनापासून वर दर्शित केलेली अपेक्षा सफल होईल इतकी व्यवस्था करणारें व्यवस्थापक असले पाहिजे. समाजांत होणारें उत्पादन वरील अपेक्षा लक्षांत ठेवूनच झालें पाहिजे. उत्पादनाचा उपभोग हेंच त्याचें अंतिम ध्येय असलें पाहिजे.

वरील दृष्टीनें विचार केला म्हणजे पोटासाठीं श्रमणारी माणसें निव्वळ यंत्रें मानलीं जाणार नाहींत व तीं तशी राहणारही नाहींत. तथापि, आधुनिक जगांतील, औद्योगिक तंत्र लक्षांत घेतां, पोटासाठीं श्रम करीत असतां त्यांतच आनंद वाटेल, विधायक प्रेरणांना वाव मिळेल असें फार अल्प प्रमाणांत होणें शक्य आहे. सर्व धंद्यांतून वाढत्या प्रमाणांत यांत्रिकपणा वाढूं लागल्यामुळें व्यक्तिगत कारागिरीला फारसा वाव राहिला नाहीं. चांदीचीं भांडीं सुद्धां आतां यंत्रानें होऊं लागलीं, रंगकाम यंत्रानें होऊं लागलें, नक्षीकामही यंत्रानें होऊं लागलें. यामुळें कारागिरी करणाऱ्यांची संख्या कमी होऊं लागली आहे. साधारण मनुष्यसुद्धां यंत्राचे साह्यानें उत्कृष्ट काम करूं शकतो. वैयक्तिक कलाकुसरीला वाव कमी होत आहे. जे औद्योगिक सूत्रधार आहेत, जे मोठमोठ्या योजना करतात, ज्यांना आपल्या बुद्धीला मोठें कार्यक्षेत्र काम करण्याला आहे, असे कांहीं लोक असतात हें खरें व तें काम करण्यांत त्यांना एकप्रकारें उन्नतप्रद वाटतें, प्रसन्नता वाटते, हेंही खरें; पण हे लोक थोडे. तसेंच कांहीं उद्योगधंदे असे आहेत कीं त्यांत काम करणारा कारागीर हा मजूर नसून मजूर व मालक असा दोन्ही असतो. विशिष्ट पद्धतीचें रंगकाम, नक्षीकाम करणारे असतात. पण या कामाची आवड असून ते विकत घेणारेही थोडे. तैलचित्रें हातानें काढून घेणारेहि आतां थोडे. यंत्रानें आतां वाटेल तेवढे मोठें छायाचित्र काढतां येतें व तें अगदीं हुबेहुब व स्वस्त असतें. ही कला यांत्रिक होऊं लागल्यामुळें कलावंतही कमी होणार. तथापि, असे व्यक्तिगत वैशिष्ट्याचे कांहीं कारागीर आहेत, व राहिले तरी एकंदर समाजांत ते नाममात्र संख्येनें राहणार. तथापि, ही संख्या लहान असली तरी कांहींतरी उत्कृष्ट व भव्य करावें, व्यक्तित्व दाखवावें, विकासाला वाव मिळावा, 'कांहीं करावें विशेष' ही बुद्धी समाजांत कमी प्रमाणांत आहे असें मात्र नाहीं. किंबहुना, या प्रवृत्तीला वाव मिळावा, समाजांतील नेतृत्त्वाचे

सुप्त गुण जागृत व्हावेत, स्पष्ट व्हावेत, त्यांना कार्यक्षेत्र मिळावें असें सर्वांना वाटतें. मात्र विद्यमान समाजरचनेंत या दृष्टीनें प्रगति होण्यास फारशी जागा नाहीं. बहुसंख्यांक लोक व्यवहार कसा चालतो, त्याचें चालकत्व कोणाकडे आहे यांत लक्ष घालीत नाहींत, तर त्याचा परिणाम त्यांचे आयुष्यावर काय होतो हेंच त्यांना महत्त्वाचें वाटतें. युध्दांतील डावपेंचांपेक्षां युध्दांतील परिणामाकडे, विजयाकडे जनतेचें लक्ष एकवटलेलें असतें. तीच गोष्ट येथें दिसून येते. उत्पादनाच्या योजना कोण करतो त्या कशा अंमलांत आणल्या जातात, याकडे बहुसंख्यांक जनता लक्ष देत नाहीं. उत्पादनाचा उपभोग आपल्याला योग्य रीतीनें मिळतो कीं नाहीं याकडे तिचे लक्ष असतें. बहुसंख्यांक लोकांची दृष्टि उत्पादनापेक्षां उपभोगावर केंद्रित झालेली असते व तें स्वाभाविक आहे.

समाजांतील उत्पादनाचा उपभोग योग्य व्यवस्था करून समाजांतील सर्व लोकांना योग्य रीतीनें मिळेल हें घडवून आणण्याचें कार्य राज्याचें आहे, राज्यसत्तेचें आहे. कराचें उत्पन्नांतून खर्च करून लोकांच्या सोयी करून उत्पादनाचे नियंत्रण करून राज्यसत्ता वरील कार्य करीत असते. हें कार्य प्रत्यक्षपणें करणारें विद्यमान सरकार जबाबदार असणें अवश्य आहे. ही जबाबदारी विद्यमान सरकारला पदच्युत करण्याची व्यवस्था आमजनतेच्या हातीं देऊन अंमलांत आणतां येईल. ठराविक कालानंतर विद्यमान सरकारनें पुन्हां लोकमताचा कौल घेऊनच अधिकारावर राहिलें पाहिजे अशीही ती व्यवस्था असूं शकेल; अगर लोकमताचा परिणाम पाहून विधिमंडळ विद्यमान सरकारला राजिनामा देण्यास भाग पाडील अशीही व्यवस्था असूं शकेल. अधिकार उपभोगाला कालमर्यादा असणें याचा अर्थ ठराविक वेळीं ज्यांना राज्यकारभार कायदेशीरपणें हाकण्याचा अधिकार पाहिजे आहे त्यांनीं राज्यांतील सर्वसामान्य जनतेपुढें स्वयंवरार्थ उभें राहिले पाहिजे. तिनें वरिलें तर अधिकार प्राप्ती, नाहीं तर नाहीं. आधुनिक जगांत बहुतेक ठिकाणीं वयांत आलेल्या सर्व माणसांना मतदानाचा हक्क दिलेला आहे. आणि जेथें शांतता व सुव्यवस्था आहे व सरकार सनदशीर राजकारणाला मानतें तेथें सरकारला हें स्वयंवर टाळून भागत नाहीं, हें टाळण्याचा प्रयत्न केल्यास परिणाम क्रांतींत होईल हें तें जाणून असतें. म्हणून अधिकारावर रहावयाचें असेल तर लोकमताला जिंकलें पाहिजे, त्याला मान दिला पाहिजे, हें सरकार जाणतें. लोकमताला कसें बनवावें याचें एक शास्त्रच आधुनिक जगांत निर्माण झालेलें आहे. म्हणून यथार्थ लोकमत परिणामकारक व्हावयाचें असेल तर तें योग्यप्रकारें संघटित झालें पाहिजे आणि त्या संघटनेमार्फत लोकांच्या इच्छा,

सरकारला, विद्यमान राज्यसत्तेला कळल्या पाहिजेत. नुसतें विधिमंडळांत लोकांनीं प्रतिनिधी निवडून देऊन भागत नाहीं. शिवाय कोणत्या पध्दतीनें या निवडणुकी होतात हेंही महत्वाचें आहे. निवडून दिलेला प्रतिनिधी म्हणजे मतदारांच्या मतांचा इच्छेचा, आकांक्षाचा अगदीं मनोमन प्रतिनिधी असतो हेंही म्हणणें चुकीचें होईल. फार तर येवढें म्हणतां येईल कीं, निवडून दिलेला प्रतिनिधी सामान्यपणें मतदारांना मान्य होईल असें धोरण स्वीकारणारा राहील या भरंवशावर निवडून दिलेला असतो. अपेक्षेप्रमाणें तो न वागला तर त्याला पुनः निवडून देण्यांत येणार नाहीं हें उघड आहे. तथापि, ज्या मुदतींत तो प्रतिनिधी म्हणून वागत असतो त्याही वेळीं सर्व प्रकारें व सर्वशः तो लोकमत प्रतिबिंबित करतो असें मात्र नाहीं; पुन्हां निवडून येण्याची त्याची साहजिक इच्छा असते म्हणून विधिमंडळांत व बाहेर लोकमताला शक्य तितकें धरून वागण्याचा त्याचा प्रयत्न सारखा चालू असतो.

निवडणूक म्हणजे स्वीकारलेल्या धोरणाबद्दल मान्यता व स्वीकारावयाच्या धोरणाबद्दल पसंती. हीं दोन्ही कामें मतदारांनीं योग्यप्रकारें करावयाचीं म्हणजे त्यांना राज्यकारभारविषयक बाबींचें साधारणपणें ज्ञान असावयास पाहिजे. 'नीचे शीर, उपर हात' हें ध्येय कवायतीचे दृष्टीनें चांगलें, पण त्यानें नागरिक हक्कांचे संरक्षण योग्यप्रकारें होत नाहीं. 'प्रपंचीं' सुवर्ण व राजकारणीं सावधपण, नसेल तर नाश ठेवलेला आहे. नागरिक मतदार हा दक्ष पाहिजे, म्हणजे त्याला चालू घडामोडींचें यथार्थ ज्ञान पाहिजे. आपले म्हणणें त्यानें बोलून दाखविलें पाहिजे इतकी त्याची वृत्ति असली पाहिजे. विवेकी व चांगल्या अर्थानें तो वाचाळ असला पाहिजे. एकतंत्री राज्यांत कुजबुजून भागतें, लोकशाहींत ओरडावें लागते, आपलीं गाऱ्हाणी वेशीवर टांगावी लागतात, आपलें म्हणणें चौकाचौकांत गर्जून सांगावें लागतें तेव्हां दाद लागते. आर्जवून नव्हे तर आवाज काढून, प्रचलित राज्यसत्तेला, जें इष्ट तें करण्यास भाग पाडावें लागते. तात्पर्य, नागरिक निर्भय असला पाहिजे व निरक्षर नसला पाहिजे. किंबहुना नागरिकांचें शिक्षण हें आधुनिक राज्याचें श्रेष्ठतम कर्तव्य आहे. अज्ञानी नागरिक हा स्वतःचा शत्रू व राज्याचा घातक ठरतो. राज्याचा पाया म्हणजे नागरिकांची मान्यता, एतद्विषयक निष्ठा आणि ती जर अज्ञानमूलक व अंध असेल तर राज्याचें स्थैर्यच धोक्यांत आहे हें स्पष्ट आहे. लोकशाही यशस्वी व्हावी यासाठीं नागरिकांना जितकें जास्त शिक्षण मिळेल तितकें थोडें आहे. तिचें यश सर्वांना मतदार करण्यावर अवलंबून नाहीं तर ते मतदान योग्य जाणीवेनें होतें कीं नाहीं यावर अवलंबून आहे. निवडणुकीचें तंत्र व यंत्र सुधारून नुसतें भागत नाहीं तर नागरि-

कच सुधारावयास पाहिजेत. भौतिक उत्पादनांतसुद्धां कामगार माहितगार असावा लागतो; येथें तर मानसिक उत्पादन आहे. म्हणून ज्ञानाची, विवेकाची जास्तच जरूरी आहे. नागरिक निवडणुकीचे प्रसंगानें आपल्या व आपल्या राष्ट्राच्या भवितव्यतेची कुंडली मांडत असतो, म्हणून सगळ्या ग्रहांच्या गतीचें ज्ञान त्याला असणें अवश्य आहे. शुभग्रह कोणते, पापग्रह कोणते, कोण केव्हां वक्री जातो हें सर्व, निदान साधारणपणें त्यास माहिती पाहिजे. लोकशाही जेथें व्हावी तेवढी यशस्वी होत नाहीं यांची कारणें नागरिकांना पाहिजे तेवढें शिक्षण व राजकारणी ज्ञान मिळत नाहीं हीं आहेत. बहुसंख्याक लोक अज्ञानांत हयात घालवितात. त्यांना साधनें नसतात, वेळ नसतो व ही वृत्ति सरकारसुध्दां बदलूं इच्छित नाहीं. १२।१३ वे वर्षापासून पोटासाठीं खपणारी मुलें, काय शिक्षण घेणार व पुढें मोठीं झाल्यावर काय दक्षतेनें मत देणार हें उघड आहे ! मुलें, मोठीं माणसें समाजरचनेचे दोषामुळें, पोटासाठीं खपण्यांत मरून जातात व त्यांना विश्रांतिसुध्दां पुरेशी मिळत नाहीं. ज्ञान मिळवावें, चालू घडामोडींत रस घ्यावा, इतकी मनाची शांति त्यांना लाभत नाहीं. अपरिमित पण त्यांना आवश्यक झालेल्या शारीरिक श्रमानें ते ज्ञानविन्मुख होतात, सामाजिक बाबतींत उदास होतात. अशा नागरिकांकडून योग्य मतदान न झाल्यास तो दोष लोकशाहीचा नव्हे, लोकशाहीचे तत्त्वाचा नव्हे. अर्धवट माहितगार माणसाचे हातीं उत्कृष्ट कॅमेरा दिला व छायाचित्र चांगलें निघालें नाहीं, तर तो दोष कॅमेऱ्याचा नव्हे. बहुसंख्यांक लोक अज्ञान म्हणून लोकशाही व्हावी तेवढी यशस्वी झालेली नाहीं हें स्पष्ट आहे. म्हणून हें अज्ञान नाहींसे केले पाहिजे. नाहींतर जे ज्ञानी आहेत, ज्यांना शिक्षणाची संधि समजांतील रचनेमुळें लाभली आहे, तेच प्रभावी ठरतात, तेच आपलीं मतें बोलूं शकतात, आपल्या आकांक्षा मांडू शकतात; बोलणाराचे मुरमुरेसुध्दां तेजींत विकले जातात, बिनबोलणाराचे लाडू पडून राहतात. जादा प्राप्तीकराचें ओझें श्रीमंतांना होतें म्हणून ते कमी केलें जातें व गरिबांना अवश्य असणाऱ्या मिठावर कर बसला जातो हा न्याय, हें दृश्य आज जगांत दिसतें. गरीब जनता मुकी व अज्ञानी म्हणून तिच्यावर करभार, श्रीमंत बोलके म्हणून त्यांना सुखसोयी. जे राज्य सर्वजनांना शिक्षणाची सारखी संधि देत नाहीं, सर्वांच्या शिक्षणाची योग्य व्यवस्था करत नाहीं, ते एकप्रकारें श्रीमंतांची सोय करून गरिबांवर अन्याय करतें. राज्य जबाबदार व्हावयाचें असेल तर सर्व नागरिक, सर्व मतदारसंघ सुशिक्षित, दक्ष व निर्भय झाला पाहिजे.

सर्व नागरिक, सर्व मतदारसंघ नुसता सुशिक्षित होऊन भागत नाहीं. ते सर्व

संघटित झाले पाहिजेत, तरच प्रभावी ठरतात. आधुनिक जगांत, व्यक्तीच्या ओरडण्यानें अगर एकट्याचे सामर्थ्याने विशेष कांहीं होणार नाहीं. संघशक्ति हीच या युगांतील प्रभावी शक्ति आहे. गिरणींतील एकटा दुकटा मजूर मालकाशीं काय बोलणार व काय अटी घालणार? तेच मजूर संघटित झाले, त्यांचा संघ निघाला कीं मालकाशीं थोड्या रुबाबानें बोलूं शकतो, अटींच्या चर्चा करूं शकतो. कोणी कोणाकडेही रोजगार करावा, सर्वांना करारस्वातंत्र्य आहे असें म्हटल्यानें तें स्वातंत्र्य मिळत नाहीं. बेकार व उपाशी मजूर मालकापुढें गरीब होतो, दीन होतो, जें मिळेल तें घेण्यास तयार होतो. वरपांगीं तो सर्व कांहीं खुशीनें करतो. पण हा खरोखर खुशीचा सौदा नसतो. खरें करारस्वातंत्र्य, खरा खुशीचा सौदा जेव्हां दोन्ही पक्ष समबल असतात, अगर दोघांना सारखी गरज असते तेव्हांच होऊं शकतो. समबल होण्यासाठीं संघशक्ति जरूर आहे. जो मजूरसंघांत सामील होत नाहीं, तो संघशक्तीच्या जोरावर मिळणाऱ्या यशाला घातक होतो. असले संघांत नसलेले मजूर म्हणजे मालकाला संघाला हाणून पाडण्यासाठीं मिळलेली युद्धसामुग्रीच ठरते. किमान दर जरी ठरले किंवा ठरवावयाचे असतील तर हे लोक त्यापेक्षां कमी घेऊन सर्व संघटित मजुरांचें नुकसान करतात; चढाओढ करून मजुरीचे दर कमी करतात. किमान दर कमी करण्याची मालकांना संधि मिळवून देऊन वर्गद्रोह करतात. बेकार व संघाबाहेरील मजूर मालकांचे मित्र व संघटित मजूरसंघाचे शत्रू ठरतात. खाजगी मालकीचे धंदे, ज्या राष्ट्रांतून आहेत व अशींच राष्ट्रें बहुतेक आहेत तेथें तर बेकारी ही कायमची सांथ आहे म्हणून सर्वत्र मजूरसंघांना कायदेशीर मान्यता मिळाली पाहिजे व मालकांनीं मजूरसंघाशींच करार केले पाहिजेत. करारस्वातंत्र्याचे नांवांखालीं मजुरांची संघटना मोडण्याची संधि कोणाही मालकाला असूं नये. व्यक्तिस्वातंत्र्य हे आत्मनाश अगर अन्य नागरिकांचे नाशासाठीं नाहीं, तर तें त्याचे व समाजाचे उन्नतीसाठीं आहे व जेथें त्याचा तसा उपयोग होत नसेल तेथें ते मर्यादित करणें योग्य ठरेल. हल्लींचे युगांत संघशक्तीनें काम न करणारी व्यक्ति सर्वांबरोबर स्वतःचेंही अनहित करते.

जसें मजुरांना संघटन अवश्य आहे तसेंच उद्योगधंद्यानांही अवश्य आहे. जेथें सरकारी नियंत्रणाखालीं सर्व उत्पादन होतें तेथें तें योजनापूर्ण असणार व त्यांत साहजिक कांहीं पध्दत राहणार. पण जेथें उद्योगधंदे ही खाजगी मालकीची व व्यक्तीकडे सोपविलेली बाब आहे तेथें योजनेच्या अभावीं, पध्दतीच्या अभावीं अनेक अरिष्टें उत्पन्न होतात व यामुळें त्यांत सूत्रबध्दता येऊं शकत नाहीं. कारखान्याची मांडणी, तेथील

आरोग्यविषयक व्यवस्था, हिशोबांची पध्दत, विक्रीच्या योजना वगैरे कारखान्यागणिक निरनिराळ्या नवीन शोध-प्रयोगशाळा, व्यवस्थापक-व्यवस्था यांतहि नाना प्रकार आढळून येतात. धंद्यांतून मालक संघटना करतात पण मजुरांना कमी वेतन मिळावें, मालाची विक्री जास्त भावानें व्हावी, बाजारांत मक्तेबाजी उत्पन्न व्हावी याच दृष्टीनें. धंद्यांत जास्तींत जास्त नफा व्हावा हाच एक प्रधानहेतु मालकांच्या संघटनेमागें असतो. होणारें उत्पादन जनतेच्या उपभोगासाठीं आहे हें जाणून व हाच प्रधानहेतु ठेवून धंद्याचें संघटन खाजगी मालकीच्या नेतृत्वाखालीं झाल्याचें क्वचितच आढळून येईल. उत्पादन नफ्यासाठीं नव्हे, तर उपभोगासाठीं आहे ही जाणीव समाजांत आहे या स्थितींत ती परिणामकारक रीतीनें उत्पन्न व्हावयाची असेल तर राज्य व उद्योगधंदे यांच्यांतील संबंध न्याय्य भूमिकेवर आणले पाहिजेत. राज्यापासून फायदे मात्र उद्योग-धंद्यांतील मालकांनीं, भांडवलवाल्यांनीं घ्यावयाचे, व राज्य खरोखर ज्यांचें त्या बहुसंख्यांक जनतेला विचारावयाचें नाहीं, उलट पिळून काढावयाचें हें कोणीही न्याय्य म्हणणार नाहीं. प्रत्येक धंदा संघटित झाला पाहिजे व त्या संघटनेंत मजूर व मालक दोघांनाही निदान सारखें स्थान पाहिजे. संघटनेबाहेर कोणीही मजूर अगर मालक राहातां कामा नये, व असे संघटित धंदे व सरकार यांचें सहकार्य झालें पाहिजे; उभयतामध्यें विचारविनिमय होईल, सल्लामसलत दिली घेतली जाईल अशी व्यवस्था घडवून आणली पाहिजे. असें जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत सरकारी धोरण, ज्यांच्या-हातीं संपत्ति व उत्पादनाची साधनें आहेत त्यांच्या तंत्रानेंच ठरलें जाईल हें उघड आहे. जें कांहीं लोकमत म्हणून सरकार विचारांत घेईल तें यथार्थ लोकमत नसून या संपत्तिमान् व मालकवर्गाचेंच मत असेल, ह्यांचेंच मत प्रभावी ठरेल. जोंपर्यंत समाजांतील उत्पादन सार्वजनिक व सरकारी मालकीचें झालें नाहीं तोंपर्यंत लोक-मताचा यथार्थ प्रभाव उत्पादनाचे बाबतींत व्हावयाचा असेल तर उत्पादनांतील सर्व धंदे वर लिहिल्याप्रमाणें संघटित झाले पाहिजेत व त्यांच्यांत व राज्यांत सहकार्य झालें पाहिजे. सर्व उद्योगधंदे संघटित झाले कीं, त्यांतील बेजबाबदारपणा कमी होईल. मालक, मजूर व गिऱ्हाईक यांच्या हितसंबंधाकडे कांहींतरी न्याय्य दृष्टीनें पाहावें लागेल. वेतनविषयक प्रमाणें ठरविलीं जातील, उत्पादनाचेंहि प्रमाण व प्रकार ठरविले जातील, मालक—मजूर यांचे बाबत नियम केले जातील, नफ्याचें प्रमाणहि ठरलें जाईल. जें कांहीं ठरलें जाईल तें अंमलांत आणण्याची अखेरची जबाबदारी राज्य-सत्तेची असल्यामुळें, जें कांहीं ठरेल तें गिऱ्हाइकाचे दृष्टीनें; उपभोगी जनतेच्या दृष्टीनें योग्य व इष्ट आहे कीं नाहीं हें पाहूनच राज्यसत्ता, सरकार तें अंमलांत आणील

अगर आणवूं देईल. याप्रमाणें धंद्यांतील संघटन झालें व काम होऊं लागलें तर त्यांतील व्यक्तीचें स्वातंत्र्य गेलें, करारस्वातंत्र्य गेलें असा आक्षेप कोणी घेतल्यास तो चुकीचा आहे. राज्यांतील व्यक्ति ही नागरिक आहे. व्यक्तिस्वातंत्र्य म्हणजे नागरिक-स्वातंत्र्य. व्यक्तीला वाटेल तें करण्यास मुभा असावी याचा अर्थ नागरिकधर्माला अनुसरून जेवढं असेल तेवढें करण्याची मुभा. राज्य व्यक्तीकडे नागरिक या मौलिक नात्यानें पाहातें म्हणून व्यक्तीनें काय करावें याला त्याचे नागरिकधर्मानेंच राज्य मर्यादा घालतें. एकाचे स्वातंत्र्यानें दुसऱ्याचे स्वातंत्र्यांत गदा येणार नाहीं अशा रीतीनें तें वापरलें गेलें पाहिजे. म्हणजे व्यक्तीनें कुठल्या मर्यादेंत आपलें स्वातंत्र्य वापरावें हें ठरलें पाहिजे. या सर्व मर्यादा म्हणजे नागरिकधर्म व तो निश्चित करण्याचे कार्य राज्याचें असतें. नागरिक या नात्यानें व्यक्तीचे हितसंरक्षणार्थ राज्यानें समाजांतील उत्पादनकार्याशीं कसे संबंध राखावे हें ठरविणें अत्यंत महत्त्वाचें आहे.

लोकांना काय हवें आहे, काय व्हावेंसें वाटतें हें राज्याला कळणें जरूर आहे. म्हणून पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे लोकमत. लोकमताचा सल्ला घ्यावयाचा म्हणजे सल्लामसलत देणारी संघटना समाजांत निर्माण व्हावयास पाहिजे, लोकमत प्रदर्शित करणाऱ्या संस्था असावयास पाहिजेत. प्रत्येक प्रश्नावर सार्वजनिक निवडणूक करणें अशक्य असतें. नाना प्रश्न साधे अगर असाधारण उत्पन्न होतात. त्याबाबत लोकांचें म्हणणे सरकारनें जाणणें जरूर असतें. जर लोकमताच्या संस्था नसतील अगर अन्य रीतीनें ते संघटित झालें नसेल तर जे चळवळे असतील, जे तक्रारी करतील त्यांचेंच म्हणणें ऐकलें जाणें संभवनीय असतें. कूळकायदा होण्याचें जाहीर केल्याबरोबर मूठ-भर पण संघटित जमीनदारवर्गानें चळवळ सुरू केली व क्षणभर लोकमत सदरहू कायद्याचे विरुद्ध आहे असा भास उत्पन्न केला. कुळांचे संघ असते अगर अन्य रीतीनें ते संघटित असते तर त्यांनीं खरें लोकमत परिणामकारक रीतीनें मांडलें असतें. जर उद्योगधंद्यांतून सर्वत्र व सर्वांगीण संघटन झालें तर सरकारला त्या संघटनाकडे उत्पादनाशीं संबंध येणारी योजना, ती कायम करण्यापूर्वी धाडून विचारविनिमय करतां येईल, सल्लामसलत घेतां येईल. निश्चित असें संघटन असलें अगर संस्था असल्या कीं सरकारला, त्यांना विश्वासांत घेऊन आपलें धोरण कायम करण्यापूर्वीं, कायद्यांत तें बसविण्यापूर्वीं लोकमत अजमावतां येईल. सल्लामसलतीसाठीं प्रस्तुत संस्था नसतील तर जो ओरडेल, त्याचाच आवाज कानांवर जाईल व कांहीं तरी त्याचा परि-णाम होईल. म्हणून अशा संघटित संस्था असणें अनेक दृष्टींनीं श्रेयस्कर आहे. ज्यांचे हितसंबंध सरकारी धोरणानें कमी जास्त होणार आहेत त्यांना सरकारपुढें आपलें

म्हणणें असल्या संस्थांमार्फत मांडतां येईल. सरकारी धोरणानें काय परिस्थिती निर्माण होईल हें ते अनुभवानें सांगूं शकतील. त्यांच्या इच्छा, त्यांचीं मतें निदान सरकार-पुढें येतील. त्याजबरोबर सल्लामसलतीची संधि मिळाली, विचारविनिमय झाला म्हणजे सरकारी योजनेंतील तपशीलवार व तत्त्वाच्या दोन्ही गोष्टींचें ज्ञान त्यांना मिळेल. सरकारचा हेतु वस्तुतः काय आहे हेंही सरकारला सांगतां येईल व पटवून देतां येईल. इतकें झाल्यानंतर योजनेला पाठिंबा द्यावयाचा ठरला तर तो जास्त प्रभावी ठरेल व विरोध करावयाचा असेल तर तोही व्यवस्थित होईल. खुद्द विद्यमान सरकारलाही याप्रमाणें विचारविनिमय केल्याने फायदाच होतो. ज्यांनीं पाठिंबा दिला असेल ते योजना दोषरहित व्हावी, परिपूर्ण व्हावी म्हणून माहिती देऊन, अनुभव सांगून सरकारला मदत करतील, जनतेंत सदहू योजनेचे बाजूनें सरकारचा पाठपुरावा करतील. सरकारी धोरण अगर योजना प्रत्यक्ष अंमलांत येतांना काय काळजी घेतली पाहिजे, कुठें सावध राहिलें पाहिजे याबद्दल दक्षतापूर्व सूचनाही देतील. तात्पर्य, असल्या संघटित संस्था आपआपल्या हितसंबंधाचे बाबतींत अनुभवी व तज्ज्ञ असा सल्ला साधारणपणें देऊं शकतील. अशा तऱ्हेनें सल्लामसलत घेऊन, विचारविनिमय करून सरकार वागूं लागलें म्हणजे तें साहजिक लोकमताच्या कलानें वागतें व त्याच्या वागण्यांत जबाबदारीची जाणीव दिसून येते; त्याच्या धोरणाला अनुभवाचा आधार मिळतो. समजा, सल्लामसलत घेतली, विचारविनिमय केला, पण तो सर्व बाजूला सारून सरकारनें आपलें म्हणणें तडीस नेण्याचें ठरविलें तरी असल्या तऱ्हेनें पूर्वविचारविनिमय करणें अगदींच वांया जात नाहीं. सरकारला होणारा विरोध अधिक संघटित होतो व सरकारला विधिमंडळांत वादविवाद व चर्चा यांना चांगलेंच तोंड द्यावें लागतें. वादविवाद व चर्चा म्हणजे लोकशाहीचा प्राण होय. तो बंद करणें अगर दाबून टाकणें म्हणजे लोकशाहीस गुदमरून मारणें आहे. म्हणून विधिमंडळांत विरोध झाला, वादविवाद झाला म्हणजे सरकारी धोरणांतील कानाकोपऱ्यावर प्रकाश पडतो, सुप्त हेतु स्पष्ट होतात, सरकारला कांहींही लपवून ठेवतां येत नाहीं व जनतेलाहि झालेल्या वादविवादामुळें सरकारचे धोरणाबाबत आपलें मत तपासून घेतां येतें. उलट सरकारलाही पुष्कळ वेळां मस्तीनें अगर अतिशहाणपणानें पूर्वी फेटाळून लावलेल्या सूचना विधिमंडळांतील व बाहेरील विरोध पाहून स्वीकाराव्या लागतात म्हणजे जबाबदारीनें वागावें लागतें.

राज्याचें स्वरूप जबाबदार असावें व विद्यमान सरकार, जबाबदार सरकार असलें पाहिजे, याचा अर्थ त्याचे कार्यांत, वागणुकींत जबाबदारीची जाणीव दिसून आली

पाहिजे, ती असली पाहिजे. सरकारचें कार्य नानाविध व व्यापक; अनेक हितसंबंधांवर सरकार आपल्या कार्यानें परिणाम करीत असतें, परन्तु अमुक एक हितसंबंध सरकारी धोरण नियंत्रित करतो असें मात्र असत नाहीं. कुणा एका विशिष्ट हितसंबंधाला सरकार जबाबदार नसतें तर ही जबाबदारी सरकारनें विशेषतः मनानेंच स्वीकारावयाची असते, तिची जाणीव ठेवूनच वागावयाचें असतें. जनलज्जेपेक्षां मनलज्जेनेंच नम्र होऊन सरकाराला साधारणपणें वागावें लागतें. प्रत्येक वेळां लोकमतानें कान उपटून सांगण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून धोरण कायम करण्यापूर्वी आधुनिक सरकारें साधारणपणें लोकमताला, तद्‌निदर्शक संस्थांना विचारांत घेतात, त्यांच्याशीं सल्लामसलत करतात, आपण होऊन शक्य तितक्या जबाबदारीचे जाणिवेनें तीं वागतात. घटनेंतील अर्धचंद्र देणाऱ्या बडग्याचे भीतीपेक्षां मनाचे बोचणीनें त्यांच्या वर्तनावर जबाबदारीचे दृष्टीनें अधिक परिणाम होतो. या दृष्टीनें विचार करतां लोकमत व तद्‌निदर्शक संस्था यांच्याशीं पूर्वविचारविनिमय करण्याची व्यवस्था घटनेंतच असणें जास्त श्रेयस्कर ठरेल. यामुळें विचारविनिमय करून निश्चित झालेलें धोरण सरकार अधिक विश्वासानें अंमलांत आणूं शकेल. या व्यवस्थेंत लोकमत काय आहे, जनतेंतील विचारप्रवाह प्रस्तुत धोरणाबाबत काय आहेत, हें सरकारला व विधिमंडळाला माहीत असतें व त्याचा परिणाम होत असतो. जेथें पूर्वविचारविनिमय केला पाहिजे असें घटनेनें ठरविलें नसेल, तेथील सरकार, विधिमंडळांतील सभासद लोकमताचा दावा सांगून विरोध करूं लागल्यास, सार्वजनिक निवडणुकीची भीति दाखवून, आपलें धोरण लोकमताविरुद्ध विधिमंडळांत तरी दामटून नेऊं शकतें. मनुष्याला मरणाची भीति, राजकारणी व्यक्तीला निवडणुकीची. सत्कृत्यें केलीं तर चांगल्या स्थितींत दोघांनाही पुनर्जन्म मिळतो. तथापि,' येवढ्या तत्त्वज्ञानानें त्यांची भीति कमी होत नाहीं. म्हणून विधिमंडळांत विरोध करून स्वतःचे पक्षाचें मंत्रिमंडळ पदच्युत करण्यास सभासद तयार नसतो, विरोधकांनाही निवडणुकीचें दान पाहिजेल तसें पडण्याची खात्री नसल्यानें, विरोध मर्यादेपलीकडे ते जाऊं देत नाहींत. अर्थात् जेव्हां मौलिक प्रश्न उपस्थित होतात अगर उपस्थित प्रश्नांना पक्षाच्या डावपेचाचे दृष्टीनें मौलिक स्वरूप दिलें जातें तेव्हांची परिस्थिती निराळी. सामान्यतः विधिमंडळांतील सभासद मुदत पूर्ण होईपर्यंत बिनधोकपणें सभासद राहाण्याचे दृष्टीनें वागत असतात. या परिस्थितींत वर सांगितल्याप्रमाणें, सरकार लोकमत डावलवूं शकतें. तसेंच घटनेप्रमाणें कार्यकारी सरकार मुदतबंदीचें असतें तेथेंहि तें लोकमत डावलवूं शकतें. कारण मुदत पुरी होईपर्यंत सत्ता सोडण्यास तें घटनेप्रमाणें बांधलें गेलें नाहीं. या दोन्ही स्वरूपांचीं सरकारें जबाबदारीचे जाणिवेनें वागत

नाहींत असें नाहीं, पण घटनेंत पूर्वविचारविनिमयाची व्यवस्था नसल्यानें प्रसंगीं जबाबदारीची जाणीव त्यांच्यांत दिसत नाहीं, म्हणून पूर्वविचारविनिमयाची व्यवस्था घटनेंत असणें जास्त श्रेयस्कर. या व्यवस्थेंत जबाबदारीची जाणीव जास्त तीव्र होते. पूर्वविचारविनिमय म्हणजे जबाबदारीची वांटणी नव्हे, किंवा अमुक एक बाबतींत अमुक एक हितसंबंधानेंच सरकारी धोरण नियंत्रित करावयाचें असाही अर्थ नव्हे; तर जबाबदारी यथार्थ व्हावी व लोकमत परिणामकारक रीतीनें सघटित व्हावें येवढाच भाव या व्यवस्थेंत आहे.

वरील व्यवस्थेप्रमाणें संघटित लोकमत व तज्ज्ञ व अनुभवी संस्था यांच्याशीं विचारविनिमय केल्यानंतर सरकारच्या धोरणावर कांहींही परिणाम होणार नाहीं असें क्वचितच होईल. सरकार, मिळालेल्या सल्ल्याप्रमाणें धोरण ठरवील तर प्रश्नच नाहीं; पण त्याला न जुमानतां वागूं लागेल तर खुद्द विधिमंडळांत होणारा विरोध विशेष तीव्र होईल. विधिमंडळांतील सभासद सरकारी धोरण अनुभवी व तज्ज्ञ यांच्या सल्ल्याविरुद्ध आहे, लोकमताविरुद्ध आहे हें जाणून केवळ पक्षनिष्ठेनें मत देण्यास तो कचरेल. लोकमताला सरकारी धोरण अनुकूल होण्याचे दृष्टीनें तो प्रयत्न करील. त्याचा विरोध बेजबाबदार नसल्यामुळें अधिक परिणामकारक होईल, त्याच्या टीकेचें स्वरूप साहजिक विधायक स्वरूपाचें राहील. लोकमत परिणामकारक व्हावयाचें असेल म्हणजे राज्यकारभाराशीं त्याचा निगडित संबंध यावयाचा असेल तर, शासनव्यवस्थेंतच अशी योजना असली पाहिजे कीं तज्ज्ञ व अनुभवी सल्ला जे अधिकारावर असतील त्यांनीं घेतलाच पाहिजे, त्यांचेपर्यंत तो पोहोंचलाच पाहिजे. वर्तमानपत्रांतील टीका सरकार वाचील न वाचील, सरकारी धोरणावर टीका करणारी चोपडी सरकार लक्षांत घेईल न घेईल, सार्वजनिक सभांतून व्यक्त केलेलें लोकमत अवलोकील न अवलोकील; या व असल्या मार्गांनीं व्यक्त होणारें लोकमत सरकारनें विचारांत घेतलेंच पाहिजे असें जोंपर्यंत शासन-व्यवस्थेंत अगर घटनेंत नाहीं तोंपर्यंत त्याचा फारसा उपयोग होणार नाहीं; शिवाय असल्या मार्गांनीं फार तर विशिष्ट बाबतींत लोकमत व्यक्त करतां येईल. पण प्रत्यक्ष रूबरू बसून विचारविनिमय केल्यानें जो परिणाम होईल तो खास अधिक व अशी व्यवस्था कायम स्वरूपाची व घटनेंत असेल तर आणखी अधिक परिणाम होईल. वर्तमानपत्रांतून, सभांतून चोपडेबाजीनें होणाऱ्या प्रचाराला, सरकार फड मारण्याचे दृष्टीनें उत्तरें देत असतें, खुलासे प्रसिद्ध करीत असतें. मर्यादित लोकांपुढें व विशेषतः संघटित संस्थांच्या अनुभवी व तज्ज्ञ प्रतिनिधीं-पुढें विचारविनिमयासाठीं बसल्यानंतर मैदानी वक्तृत्वाला वाव नसतो, सार्वजनिक

सभेंतील कोट्या कवडी किंमतीच्या ठरतात, अतिशयोक्तीनें नुकसान होईल याची जाणीव तावडतोब होते. येथें शास्त्रोक्त बोलावें लागतें, बारीकसारीक माहिती नीट जुळवून धोरणांतील सुबद्धता व उपयुक्तता पटवून द्यावी लागते. पटवून देण्याची जाणीव साहजिक या वातावरणांत उत्पन्न होते. खात्री करून, पटवून देऊन, मिळवलेली मान्यता नैतिकदृष्ट्या श्रेष्ठ असल्यामुळें ती मिळविण्याची खटपट करावी असेंच वाटतें. ही पटवून देण्याची जाणीव, ही नैतिक जाणीव म्हणजेच जबाबदारीच्या वर्तनाचा पाया आहे. जनतेला जनतेच्या प्रतिनिधींना धोरण पटवून देणें जरूर आहे येवढें समजलें म्हणजे आपोआपच सरकार जबाबदारीनें पावलें टाकतें. पूर्वविचारविनिमयासाठीं मर्यादित लोकांना अगर संस्थेच्या प्रतिनिधींना सरकारनें बोलवावें व त्यांचेपुढें आपलें धोरण, आपली योजना मांडून तत्संबंधीं चर्चा व ऊहापोह करून नंतर आपलें धोरण अगर योजना निश्चित करावी ही व्यवस्था अनेक दृष्टींनीं श्रेष्ठ आहे. विचारविनिमयायासाठीं जमलेल्या लोकांना सरकारी धोरण पटवून द्यावे लागते व त्यामुळें आपलें धोरण जनतेच्या हिताचें, सार्वजनिक हिताचें खरोखर ठेवून सरकार वागूं शकतें. जेथें अशी पूर्वविचारविनिमयाची व्यवस्था नाहीं तेथील सरकार धोरण ठरवितांना, योजना आंखतांना ती सार्वजनिक हिताची आहे कीं नाहीं यापेक्षां या योजनेनें आपलें आसन दृढतर होईल कीं नाहीं हेंच जास्त विचारांत घेतें. कुळांना संपूर्ण न्याय देणारा कायदा केल्यास पुढील निवडणुकी जिंकूं का ? असा प्रश्न तत्संबंधी योजना आंखतांना डोळ्यांपुढें उभा राहातो. सार्वजनिक हितापेक्षां पक्षाचे भवितव्य व अधिकाराचें आसन जास्त बळकट करण्याकडेच प्रवृत्ति असते. पक्ष टिकविण्याचे दृष्टीनें, पक्षाची जूट राहावी म्हणून सार्वजनिक हिताचे दृष्टीनें योग्य असलेली गोष्ट सरकार तडजोड करून हिणकस करून टाकतें. धोरण ठरवितांना सरकारला म्हणजे प्रधानमंडळाला सार्वजनिक हितापेक्षां अन्य गोष्टीच विशेष विचारांत घ्याव्या लागतात. पक्षजुटीबरोबर प्रधानमंडळांतील जूट ठेवणें अवश्य असल्यामुळें त्या दृष्टीनें धोरणाचे कानेकोपरे कानसावे लागतात. प्रधानमंडळांतील सर्वच सभासद केवळ सार्वजनिक हितावर दृष्टि ठेवून वागत नाहींत. त्यांच्या विचारांत वर्गस्वार्थाच्या, प्रसंगीं व्यक्तिस्वार्थाच्याही छटा असतात. या सर्व छटांना जुळवून घेऊन प्रधानमंडळाला धोरण आंखावें लागतें. भावनियंत्रण केलें तर एखादा सहकारी रागावेल, कर्जविमोचनाचे योजनेंत व्याजाचा दर कमी धरला तर दुसरा एखादा रागावेल, जमीनदार, इनामदार यांचे हक्क थोडे मर्यादित केले तर तिसरा रागावेल, मजुरांना संघटनेचे जादा हक्क दिले तर चौथा रागावेल, या सर्व रागदारीचा परिणाम म्हणजे

प्रधानमंडळ खड्या सुरांत सार्वजनिक हिताची गोष्ट बोलूं शकत नाहीं येवढा निश्चित होतो. याशिवाय, व्यक्तिगत हेवेदावे, डावपेंच, गटबाजी प्रधानमंडळांत नसतेच असें नाहीं व या सर्वांचा परिणाम म्हणजे सार्वजनिक हित या एकाच दृष्टीनें सरकार विचार करूं शकत नाहीं, वागूं शकत नाहीं. पूर्वविचारविनिमयाची कायम योजना घटनेंत अमली म्हणजे निदान व्यक्तिगत गोष्टींना तेथें वाव नाहीं. जो विचारविनिमय होईल तो तात्त्विकदृष्ट्या, सार्वजनिक हिताचे दृष्टीनें होईल. शिवाय हा विचारविनिमय होतांना मतांचा प्रश्नच येणार नाहीं. मतें मिळवावयाचीं असलीं म्हणजे तात्त्विक विचारांना मुरड बसते. केवळ विचारविचारविनिमय असल्यामुळें खुल्या मनानें व निर्भीडपणें योग्य वातावरणांत साधकबाधक गुणदोष पाहाण्याचे दृष्टीने चर्चा होऊं शकते. विरुद्ध मत देण्याची भीति दाखवून तडजोडीला आणण्याला वाव नसतो. विचाराविरुद्ध विचार मांडून, प्रमेयाविरुद्ध प्रमेय उभें करून यथासांग व संभाव्य परिस्थिती विरुद्ध अन्य संभाव्य परिस्थिती कल्पून विवाद्य विषयाची चर्चा बौद्धिक वातावरणांत होऊं शकते. सरकारचें धोरण योग्य व उपयुक्त आहे हें पटवून देतांना सरकारच्या प्रतिनिधीला, प्रधानाला, अवांतर व अन्य गोष्टी विचारांत घेण्याचें कारण पडत नाहीं. व्यक्तिनिरपेक्ष, तात्त्विक व बौद्धिक अशा वातावरणांत, त्याला धोरण पटवून देण्याचा प्रयत्न करावा लागतो व हें करीत असतांना, लोकमताचा प्रस्तुत दृष्टिकोन सर्वांगानें त्याला परिचित होत जातो व लोकमताला मान देण्याची, त्याचा कल लक्षांत घेऊन धोरण आंखण्याची जबाबदारी ओळखीत ओळखीत तो पुढें जात असतो.

पूर्वविचारविनिमयाचें संघटन कसें असावें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. तथापि, एक गोष्ट निश्चित कीं, या संघटनेचें कार्य म्हणजे राज्याला, राज्यकारभार करणाऱ्या सरकारला प्रस्तुत बाबतींत सल्ला देणे, अखेरचा निर्णय घेणें नव्हे. अखेरचा निर्णय घेण्याची जबाबदारी विद्यमान सरकारची असली पाहिजे. ही व्यवस्था अनेक दृष्टींनीं श्रेष्ठ आहे. सरकारनें सल्लामसलत घेतलीच पाहिजे हें बंधन पाहिजे. पण अंतिम निर्णयाची जबाबदारी मात्र सरकारवर पाहिजे. ती जबाबदारी सदरहू संघटनेवर अगर अन्य संघटनेवर टाकली तर अनेक अडचणी उत्पन्न होतात. समजा, संघनिष्ठ समाजसत्तावाद्यांचे म्हणण्याप्रमाणें उत्पादनविषयक सर्व अखेरचे निर्णय घेण्याची जबाबदारी तद्विषयक संघटनेवर टाकली तर सदरहू संघटनेला कार्यकारी सत्तेचें स्वरूप येईल हें स्पष्ट आहे. कारण, अखेरचा निर्णय घेण्याची सत्ता आली म्हणजे ठरलेलें अंमलांत आणण्याची, कार्य करून घेण्याची सत्ता आलीच. ही सत्ता आली असें म्हटल्यानंतर ती कार्य कसें करणार असा प्रश्न

उपस्थित होतो. धंद्यागणिक संघटन झालें असेल तर सल्लामसलत घेण्याची चांगली सोय झाली; पण प्रत्येक धंद्यागणिक अगर कार्यपरत्वें झालेल्या संघटनेला प्रत्यक्ष घेतलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करण्याची सत्ता द्यावयाची का? का सर्व उत्पादना-बाबत एक मुख्य व मध्यवर्ती मंडळ निवडलेल्या प्रतिनिधींचे ठेवून त्याचे हातीं ही सत्ता द्यावयाची? हजारों धंदे व हजारों रोजगार, सर्व जरी संघटित झाले तरी प्रत्येकाला कांहीं निर्णय अंमलांत आणण्याची सत्ता देऊन चालणार नाहीं. किंबहुना तें अशक्य आहे. सारखे धंदे जरी एकत्रित केले तरी सुद्धां अडचण कमी होणार नाहीं. प्रादेशिक विभागणी केली तर मग कार्यात्मक स्वरूप [ functional ] लक्षांत घेऊन ती विभागणी झाली असें म्हणतां येणार नाहीं. एक मध्यवर्ती प्रतिनिधी मंडळ नेमून सर्व उत्पादनावर त्याचा अधिकार ठेवला, त्याचे नियंत्रणाखालीं तें व्हावें असें ठरविलें तर या व्यवस्थेंत व प्रत्यक्ष कार्यकारी सरकारकडे ही सत्ता ठेवण्याचे व्यव-स्थेंत कांहीं विशेष फरक आहे अगर पहिली दुसरीपेक्षां श्रेष्ठ आहे असें दिसून येत नाहीं. सरकारकडे ठेवल्यास प्रगतिविन्मुखता, व नोकरशाही वाढलेली दिसून येते, तीच गोष्ट या मंडळाकडे ठेवल्यास दिसून येईल. अधिकार आला कीं हाच परिणाम सर्वत्र दिसून येतो. आहे हें चांगलें आहे असें प्रतिपादलें जातें. कारण, विद्यमान ठेवण्यांत, तें कायम करण्यांत विद्यमान अधिकारीवर्ग कायम होत असतो. अनुभवाचें स्तोम माजवून सत्तेच्या जोरावर सर्वज्ञता सांगितली जाते. मनुष्यमात्र चुकीला पात्र असेल, पण हेंही मानव्याचें लक्षण नोकरशाहीचे बाबतींत गैरलागू आहे असा तिचा विश्वास असतो!! या प्रवृत्तीमुळें लोकमताचा संपर्क तुटतो. निवडणुकीनंतर प्रधान-मंडळ लोकमतापासून दूर जातें हा आक्षेप याही मंडळाबाबत घेतां येण्यासारखा आहे. बहुमताचे जोरावर केवळ निर्णय घेतल्यास होणारे परिणाम याही व्यवस्थेंत टळणार नाहींत. लोकमत व विधीमंडळांतील मत यांत मेळ नसेल, मतदारसंघ व त्याचा प्रतिनिधी यांचे दृष्टिकोन भिन्न झाले तर कांहीं घटनेंतून मतदार संघांना मुदतीपूर्वी प्रतिनिधित्व रद्द करण्याचा अधिकार आहे. या अधिकारामुळें मंडळांतील बहुमताचे जोरावर निर्णयाला जर तो निर्णय बाहेरील लोकमताविरुद्ध असेल तर थोडासा आळा बसेल. पण ही सोय दोन्ही व्यवस्थांत करतां येण्यासारखी आहे. तथापि, प्रतिनिधित्व रद्द करण्याचा अधिकार असेल तर प्रतिनिधी पण पाहिजे तितके निर्भीड, स्वार्थनिरपेक्ष व जबाबदार राहाणार नाहींत हाही संभव असतो. लोकमत भावनाप्रधान असतें. क्षणिक भावनेच्या आहारीं जाऊन, युगाचे कल्याणाकडे तें दुर्लक्ष करणें शक्य असतें. या परिस्थितींत शांत चित्तानें, विवेकानें दूरदृष्टी ठेवून वागण्याचें कर्तव्य

प्रतिनिधीचें आहे. पण लोकमत, मतदारसंघ परत बोलावील ही भीति असल्यामुळें तात्कालिक लोकमताला अनुसरून तो वागणें जास्त संभवनीय आहे. लोकमताचें चक्र पुष्कळ वेळां सामर्थ्यवान् व संपन्न गटांचे हातांत असतें. ते त्याला गती देत असतात. म्हणजे प्रतिनिधी शेवटीं या गटांचे तंत्रानें चालतो. विधिमंडळांत वागतांना सार्वजनिक हितापेक्षां या गटांचे हिताकडेच तो लक्ष देतो. पूर्ण मुदतीपर्यंत प्रतिनिधित्व कायम ठेवलें तर प्रसंगीं प्रतिनिधी व मतदार यांच्यांत विरोध होईल व प्रतिनिधी मतदारसंघांचे इच्छेविरुद्ध वागतील ही आपत्ति आहे. प्रतिनिधित्व रद्द करण्याचा अधिकार, परत बोलीचा अधिकार [ Recall ] ठेवल्यास, प्रतिनिधी तत्त्वनिष्ठा बाजूला सारून आसननिष्ठाच दाखवील, आपलें पद कायम ठेवण्याकडे त्याची वृत्ति राहील; ही आपत्ति येते. केवळ बहुमताचे दुष्परिणाम टाळण्यासाठीं या योजनेचा विशेष उपयोग होतो असें नाहीं. मग तें बहुमत विधिमंडळांतील असो अगर कार्यपरत्वें निवडलेलें मध्यवर्ती प्रधानमंडळांतील असो. या मंडळाला उत्पादनाबाबत अंतिम सत्ता दिली म्हणजे आणखी एक अडचण उत्पन्न होते. राज्यांतील विधिमंडळ हें प्रादेशिक तत्त्वावर निवडून आलेलें, मतदारसंघ देशविभागावर आधारलेला, त्या विभागांत राहाणारे सर्व नागरिक हे मतदार. मग या प्रादेशिक विधिमंडळाचें अधिकारक्षेत्र कोणतें व वरील कार्यवाचक मंडळांचे ( Functional Assembly ) अधिकारक्षेत्र कोणतें हें ठरविलें पाहिजे. कर कोणी बसवावयाचे, ते वसूल कोणी करावयाचे हें ठरलें पाहिजे. चलनविषयक अधिकार कोणाचे, आयात—निर्यात धोरण कुणी ठरवावयाचें व अंमलांत कोणी आणावयाचें, मजूर—मालक विरोध शेवटीं हातघाईवर आला तर शांतता कोणी राखावयाची असे नाना प्रश्न उपस्थित होतात. त्यांची कशी जरी व्यवस्था केली तरी शेवटीं करवसुलीची व कर बसविण्याची, देशाचे संरक्षणाची व्यवस्था ज्याचे हातीं तें मंडळ प्रभावी ठरेल व वस्तुतः त्याचाच अखेरचा अधिकार चालेल. समजा, कोणाचे अधिकारक्षेत्रांत काय येतें हें ठरविण्याचें काम न्यायालयाकडे दिलें तर अखेरची सत्ता या दोन्ही मंडळांकडे न राहातां न्यायालयाकडे राहील हें उघड आहे. कोणीं काय करावें हें सांगण्याचा अखेरचा अधिकार न्यायालयाचे वांट्याला आला. या व्यवस्थेंतील अव्यवस्था अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांचे अनुभवाला चांगलीच आली आहे. प्रेसिडेंट रूझवेल्ट यांनीं बिकट परिस्थिती नाहींशी करण्यासाठीं केलेले अनेक कायदे व योजना तेथील मुख्य न्यायालयानें बेकायदेशीर ठरविल्या, विधिमंडळाचे अधिकाराबाहेरच्या ठरविल्या. न्यायालयांना कायद्याचा काय अर्थ आहे हें ठरविण्याचा अधिकार असणें अगदीं योग्य आहे व

जरूर आहे. पण कायदाच करावा कीं नाहीं हें ठरविण्याचा हक्क त्यांना दिल्यास अगर त्यांनीं वापरल्यास समाजाचें नुकसान होण्याचा जास्त संभव आहे. समाजाला काय पाहिजे, समाजाला कोणती व्यवस्था न्याय्य वाटते हें समाज सामुदायिक दृष्टीनें विधिमंडळामार्फत ठरवितो; त्या निर्णयांना कायद्याचें स्वरूप येतें. जर न्यायाधीश कायदा योग्य अगर अयोग्य ठरवूं लागले तर जनतेचे, समाजाचे इच्छेऐवजीं दोन-पांच व्यक्तींची म्हणजे न्यायाधिशांचीच इच्छा प्रभावी ठरते असें होईल. या थोड्या लोकांची इच्छा व दृष्टिकोन समाजहिताशीं जुळणारा असेलच असें नाहीं. म्हणून न्यायाधिशांनीं कायद्याचा अर्थ सांगावा; तो योग्य कीं अयोग्य, ठेवावा का रद्द करावा हें त्यांनीं ठरवूं नये हीच व्यवस्था श्रेष्ठ ठरते. राज्यांतील प्रभुत्व, निर्णायक सत्ता न्यायाधिशांकडे असूं नये.

कार्यवाचक अशा मध्यवर्ती मंडळाकडे उत्पादनाबाबत सर्व अधिकार दिल्यास काय अडचणी येतात याचें दिग्दर्शन वर केलें आहे. पूर्वविचारविनिमयाचें कार्य हें सल्लामसलत देणारं, अनुभवावर आधारलेली माहिती पुरवणारें, तज्ज्ञ सल्ला देणारें असेंच असलें पाहिजे. या विचारविनिमयाच्या संघटनेने कांहीं मर्यादा पाळल्या पाहिजेत, शासनसंस्थेशीं तिनें सहकार्य केलें पाहिजे. उगाच योजना करून, हजारों सूचना करून प्रधानमंडळाला अगर संबंध येणाऱ्या प्रधानाला भंडावून सोडूं नये. सूचना करणें, योजना आंखणें व त्या अंमलांत आणणें यांत फरक आहे. कार्यकारी सत्ता, कोणतें अखेरीस शक्य आहे, कोणतें अंमलांत आणणें योग्य आहे हें ठरवील व तिनेंच ते ठरविलें पाहिजे. ही जबाबदारी तिचीच आहे. विचारविनिमयाचे संघटनेनें जरूर ती माहिती मागवावी, कागदपत्रें मागवावीं, सरकारी अधिकाऱ्यांना त्या दृष्टीनें बोलवावें पण हें सर्व करतांना अतिरेक होतां कामा नये. तसेंच कार्यकारी सत्तेच्या अधिकारावर अतिक्रमणही होतां कामा नये. हें संघटन व कार्यकारी सरकार यांच्यांत स्पर्धा आहे अगर विरोध आहे असें झाल्यास मूळ हेतूचाच विपर्यास होईल. विद्यमान सरकाराला तज्ज्ञ व अनुभवी सल्लामसलत मिळावी व त्यांचे वागणुकींत जबाबदारी उत्पन्न व्हावी हा प्रधान हेतु आहे. स्पर्धा अगर विरोध करणारी संस्था असें या संघटनेचें स्वरूप होऊं लागलें तर राजकीयदृष्ट्या तें अनिष्ट होईल. लायकी व लोकमत यांतील प्रसंगीं उद्भवणारा विरोध परिहार व्हावा यासाठीं ही व्यवस्था आहे. सरकार लायकही व्हावें व सरकार लोकप्रियही असावें हें घडवून आणण्यासाठीं ही पूर्वविचारविनिमयाची योजना आहे लायक माणसाचे हातीं सत्ता असावी हें योग्य असलें तरी ती लोकप्रिय माणसाचे हातीं असावी हें अधिक महत्त्वाचें

आहे. लोकशाही म्हणजे स्वराज्य, प्रत्येकाला आपण त्यांत कुणी तरी आहोंत, स्वतःचे त्यांत कांहीं तरी आहे असें वाटलें पाहिजे. स्वतः आपणच आपल्यावर राज्य करीत आहोंत ही भावना असली पाहिजे व या वृत्तीचें प्रतीक म्हणजे राज्यकारभारांतील अखेरचे निर्णय घेण्याची सत्ता प्रतिनिधींना, लोकांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींना असते. या अखेरचा निर्णय घेण्याची सत्ता असलेल्या प्रतिनिधींना योग्य सल्लामसलत देणारीं लायक माणसें उपलब्ध करून दिलीं म्हणजे झालें. अशा लायक माणसांचा सल्ला घेतलाच पाहिजे, त्यांच्याशीं पूर्वविचारविनिमय केलाच पाहिजे अशी घटनेंत व्यवस्था केली म्हणजे लायकी व लोकप्रियता, युक्ति व शक्ति यांचा योग्य समवाय होऊन जास्तींत जास्त समाजहित साधणें शक्य होईल. हितकर, योजना कोणत्या हें ठरून त्यांतील शक्य कोणत्या हे ठरून त्या अंमलांत आणल्या जातील. निव्वळ तज्ज्ञ व लायक लोकांचे हातीं कारभार गेल्यास त्यांत एकांगीपणा उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. जी व्यापक दृष्टि जनतासंपर्कानें उत्पन्न होते तिचा तेथें अभाव दिसेल. लोकमतानें उत्पन्न होणारी शक्ति व कार्यांत दिसून येणारें चैतन्य व उठाव दृष्टीस पडणार नाहीं. तेथें आपुलकीचे जाणिवेचे अभावीं लोकांना राज्यकारभार कार्यक्षम असला तरी जिव्हाळ्याचा वाटणार नाहीं. ते उदासीन राहातील. राज्यकारभारांत लोकांनीं लक्ष द्यावें, त्यांत त्यांनीं रस घ्यावा यांतच राज्याचा गौरव आहे व खरीखुरी प्रतिष्ठा त्यांतच आहे. व्यक्तीचा व समाजाचा विकास व्हावयाचा असेल तर व्यक्ति ही राजकारणांत लक्ष घालणारी व भाग घेणारी असली पाहिजे. नागरिकधर्म तिनें पाळला पाहिजे व तें तिला शक्य व्हावें असेंच शासनसंस्थेचे स्वरूप असलें पाहिजे.

सर्व दृष्टीनीं विचार करतां सार्वत्रिक मतदानपद्धतीनें निवडून आलेली प्रादेशिक प्रतिनिधी सभा, अगर विधिमंडळ हेंच समाजांतील नानाविध, मतमतांत अखेरच्या निर्णयाची सत्ता चालविण्याला लायक ठरतें, सर्व तऱ्हेच्या मतांना या योजनेंत आपलें म्हणणें मांडण्याचा वाव मिळतो. सर्व वादविवाद ऐकून, चर्चा करून सर्व तऱ्हेचे लोकमताचे दृष्टिकोन समजावून घेऊन हें मंडळ निर्णय घेत असतें. तत्त्वतः तरी या स्थितींत तें जबाबदारी ओळखून निर्णय घेत असतें असें म्हटलें पाहिजे. लोकांनी मतें देऊन याची निवड केलेली असते म्हणून एका दृष्टीनें लोकमताचा दाब त्यावर असतोच; ज्या मानानें लोक सुशिक्षित व दक्ष असतील त्या मानानें हें मंडळ, त्यांच्या इच्छेचें प्रतीक राहील, त्यांच्या इशाऱ्यावर चालेल. पूर्वविचारविनिमयाची योजना संघटनेंत सक्तीची असली म्हणजे पुन्हां लोकमताचा कल पाहूनच या मंडळाला अखेरचें धोरण ठरवावें लागेल. या विधिमंडळामार्फत निर्णय घेऊन अंमल-

बजावणी करणारें सरकार साहजिक जबाबदार सरकार राहील. न्यायालयापुढें या सरकारला सामान्य नागरिकांपेक्षां जास्त हक्क असणार नाहींत. कार्याचे सोयीसाठीं व अधिक कार्यक्षमता यावी ह्मणून कांहीं बाबी कार्यपरत्वें व कांहीं बाबी प्रदेशपरत्वें मध्यवर्ती सरकारनें वांटून दिल्या तरी त्यांपासून नुकसान होणार नाहीं. उलट अवश्य प्रमाणांत विद्यमान सरकारावर त्याचे राजकीय सत्तेवर योग्य अशी मर्यादाच उत्पन्न होते.

व्यक्तीचा विकास व्हावा, समाजाचा विकास व्हावा, समाजहित योग्य प्रकारें साधावें या दृष्टीनीं विचार केला असतां, योग्य असें राजकीय वातावरण वरील व्यवस्थेंत उत्पन्न होणें जास्तींत जास्त शक्य आहे. कार्यवाचक प्रतिनिधीमंडळ अगर प्रादेशिक विधिमंडळ एकांगी विचार करील असें वाटण्याचा संभव आहे. कार्यवाचक प्रतिनिधीमंडळ उत्पादकांचाच विचार विशेष करील व प्रादेशिक विधिमंडळ उपभोगी गिऱ्हाईकांचाच विशेष विचार करीत असें मानण्याचें कारण नाहीं. समाजांत उपभोग ही महत्त्वाची बाब खरी पण उत्पादनाशिवाय उपभोग नाहीं हेंही खरें. तथापि, वरील व्यवस्थेंत कोणतेहि हितसंबंध दुर्लक्षिले जाणार नाहींत अशी योजना आहे व प्रत्येकाला आपलें म्हणणें मांडण्याला पूर्ण वाव आहे. एक तऱ्हेनें मोकळें वातावरण राजकीयदृष्ट्या प्रत्येक नागरिकाला आढळून येईल. तथापि, नागरिकानें आपले हिताबद्दल दक्ष हें राहिलेंच पाहिजे. संघ करून आपलें जर कांहीं विशिष्ट हित असेल तर त्याला जपण्याचा प्रयत्न केला पाहिजे. व्यक्तिशः पण जास्ती परिणामकारक ह्मणजे संघशः आपलें ह्मणणें राज्यसत्तेपुढें, सरकारपुढें मांडलें पाहिजे व प्रसंग पडल्यास विरोध करण्यास, सत्ता न जुमानण्यास तयार असलें पाहिजे. आपले योग्य हिताबद्दल दक्षता, तें जपण्यासाठीं प्रयत्नाची तत्परता, प्रसंगीं सरकारास विरोध करणें जरूर पडल्यास त्यागास सज्जता, हे त्रिविध सद्‌गुण नागरिकांत नसतील तर नागरिकधर्माचें पालन त्यांचे हातून होणार नाहीं. शासनाकडे, सरकारी कृत्यांकडे उदासीनवृत्तीनें न पाहतां, सावधानवृत्तीनें जर नागरिक पाहातील तरच त्यांचे हक्क कायम राहतील, त्यांचें स्वातंत्र्य अबाधित राहील. शिवाय व्यक्तिविकासाला दक्षता व त्याग बुद्धीची अत्यंत जरूरी असते. ध्येयासाठीं त्याग करण्याची वृत्ति व तयारी हें खरोखर व्यक्तीच्या उन्नतीला आवश्यक असें रसायन आहे, प्रगतीचें जीवनतत्त्व आहे. त्याग हाच शीलाचा आत्मा आहे. म्हणून व्यक्तीच्या उन्नतीच्या दृष्टीनें, विकासाच्या दृष्टीनें त्यानें दक्ष राहावें व जें योग्य वाटतें त्याचेसाठीं स्वार्थत्याग करण्यास तयार व्हावें, त्यांतच त्याच्या हिताबरोबर सामाजिक हिताचा पण संबंध येतो. अशा वृत्तीचीं माणसें, असे निर्भीड नागरिक समाजांत आहेत यामुळें प्रसंगीं समाजांतील शांततेस व सुव्यवस्थेस

धोका असतो हें खरें असलें तरी तो धोका आहे म्हणूनच सरकार, लोकमताची दखल घेण्यास तयार असतें, हा सामाजिक फायदा या वृत्तीचे नागरिक असल्यास मिळतो. ज्या समाजांत लोक गुण्यागोविंदानें राहून राज्यसत्तेला योग्य प्रसंगींसुध्दां संघटित विरोध करण्यापेक्षां व त्यापासून अस्वस्थता निर्माण करण्यापेक्षां सरकारचे कलाकलानें घेऊं व मुकाट्यानें राहूं ह्या वृत्तीचे असतील, त्या समाजांत स्वातंत्र्याची गोडी राहाणार नाहीं. स्वातंत्र्याची गोडी, त्याचेसाठीं व तें टिकविण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांत, धडपडींत असते. ही धडपड बंद झाली, लोकांच्यांत ही वृत्तीच मावळली तर स्वातंत्र्याची वृत्तीही मावळेल ही गोष्ट निश्चित आहे. राज्यघटना कितीही चांगली असली, शासनसंस्था कितीही निर्दोष असल्या तरी स्वातंत्र्य हें शेवटीं नागरिकांच्या वृत्तीवर व शीलावर अवलंबून आहे. सरकारला अगर राज्यसत्तेला जबाबदारीची जाणीव घटनेंतील नियमापासून होत नाहीं तर नागरिकांच्या स्वातंत्र्यरक्षणाच्या निश्चयापासून, शीलाचे कणखरपणापासूनच. घटनेंतील कलमें बाजूस सारलीं तर निश्चयानें जाब मागणारा निर्भीडवृत्तीचा नागरिकवर्ग विद्यमान असेल तर तीं कलमें बाजूस सारलीं जाणार नाहींत; घटनेप्रमाणें सरकार वागेल. इतकेंच नव्हे तर समाजाची प्रतिष्ठा, त्याची राजकीय प्रगति या शीलवान् व श्रेष्ठ वृत्तीच्या नागरिकावरच अवलंबून असते. घटनापंडित व कायदेपंडित यांनीं सर्व बुद्धि खर्च करून किती जरी निर्दोष घटना तयार केली, राज्यकारभाराबाबत आदर्श नियम केले तरी त्या सर्वांना यश यावयाचें असेल तर लोकमत संघटित व दक्ष पाहिजे, नागरिक निर्भीड व निश्चयी पाहिजेत. ज्या लायकीचे लोक, त्या लायकीचें सरकार या म्हणण्यांत पण कांहीं अर्थ आहे. उदासीन, निष्काळजी, भेकड असे नागरिक असले कीं राज्यसत्ता जुलमी, जनतेच्या इच्छेला न जुमानणारी अशी होणें अपरिहार्य आहे. उलट, दक्ष, निर्भीड, त्यागीवृत्तीचे नागरिक असतील तर तेथील सरकार प्रजाहिततत्पर, लोकमताला मान देणारें व प्रगतिप्रिय होईल. राज्यकारभार कसा राहील हें शेवटीं नागरिक आपल्या वृत्तीनें ठरवितो.

सरकारच्या राजकीय जबाबदारीची जी व्यवस्था शासनसंस्थेंत असावी असें वर म्हटलें आहे ती व्यवस्था कार्यक्षम व्हावी, योग्य रीतीनें चालावी म्हणून नागरिकवर्ग जसा दक्ष असावा लागतो, तशीच दक्षता व निर्भीडपणा न्यायदानांतही असली पाहिजे, नव्हे अत्यंत आवश्यक आहे. राज्याचें जबाबदार हें स्वरूप यथार्थ व्हावयाचें तर न्यायदानी सत्ता [ **Judicial powar** ] स्वतंत्र असली पाहिजे. कार्यकारी सत्तेची संदेश मानणारी दासी असतां कामा नये. तिच्यापुढें न्यायाचे दृष्टीनें, सामान्य नाग-

रिक व विद्यमान सरकार हे समान असले पाहिजेत. सरकारने अपकृत्य केल्यास त्याविरुद्ध नुकसानभरपाई मागण्याचा हक्क नागरिकाला असला पाहिजे व त्याचा निवाडा सर्वसामान्य न्यायालयांनीं दिला पाहिजे. नागरिकाप्रमाणेंच सरकारनें करारभंग केल्यास त्याविरुद्ध दाद न्यायालयांतून मिळाली पाहिजे व या सर्व न्यायादानांत निःपक्षपातीपणा राहावा म्हणून नेमले जाणारे न्यायाधीश कार्यकारी सरकारनें नेमूं नयेत. स्वतंत्र मंडळानें लायक व्यक्ति पाहून नेमावेत. तथापि, जरी कार्यकारी सरकारनें नेमले तरी त्यांना काढून टाकण्याचा हक्क, बढतीबहालीचा हक्क, त्याचेकडे नसावा. नोकरींत पुढें पाऊल पडावयाचें असेल तर विद्यमान सरकारची मेहेरनजर पाहिजे अशी परिस्थिती असेल तर न्यायाचा रंग सरकारी छापाचाच राहील. म्हणून न्यायखातें स्वतंत्र पाहिजे. कार्यकारी सत्तेचें त्यावर प्रभुत्व असतां कामा नये. विधिमंडळानें केलेला जो कायदा असेल त्याचा यथार्थ अर्थ कोणता हें सांगण्याचें कार्य न्यायाधिशाचेंच असलें पाहिजे. कोठल्याही कायद्यानें, त्यांतील अगर अन्य कायद्यांतील कलमांचा निर्णयात्मक अर्थ करण्याची सत्ता, कोठल्याही कार्यकारी [ Executive ] अधिकाऱ्यांकडे असतां कामा नये. जिल्हा मॅजिस्ट्रेटला कोणतें लिखाण राजद्रोहात्मक आहे हें ठरविण्याचा अधिकार कायद्यानें दिल्याबरोबर, त्यानें त्याप्रमाणें ठरविलेले लिखाण खरोखरीच तसें आहे कीं नाहीं हें पाहाण्याचा हक्क सुद्धां न्यायाधिशांना असूं नये ही गोष्ट आधुनिक जगांतील न्यायाचे कल्पनेला धक्का देणारी आहे. पण अशी वस्तुस्थिती या देशांत आहे. म्हणून नागरिकस्वातंत्र्याचे संरक्षणार्थ, न्यायखातें व कार्यकारी सरकार हें एकमेकांपासून स्वतंत्र पाहिजे. न्यायदान हा हक्क न्यायाधिशांचा आहे, कार्यकारी अधिकाऱ्यांचा नाहीं; त्यांना तो असतां कामा नये. राज्यकारभार करतांना कार्यकारी अधिकाऱ्यांना सत्ता असणे अवश्य आहे. राज्यकारभारविषयक अनेक कायदे असतात, अनेकांत कार्यकारी अधिकाऱ्यांना कलमांचा अर्थ करण्याची जबाबदारी देण्यांत आलेली असते व तें कार्याचें कारभाराचे दृष्टीनें जरूरपण असतें. तथापि, कार्यकारी अधिकाऱ्यांना असलेली सत्ता, व अनेक बाबतींत त्यानें अर्थ लावून केलेलें कार्य हें सर्व कायद्याला अनुसरून असलें पाहिजे. अर्थ करण्याची मुभा याचा अर्थ, अनर्थ अगर अन्याय करण्याची मुभा असा नव्हे. सारासार विचाराला व विवेकाला अनुसरूनच जें योग्य असेल तेंच त्यानें केलें पाहिजे. प्रत्येक समाजांत, न्याय्य कोणतें, विवेकाला धरून कोणतें हें समजून येण्यासारखें असतें. कांहीं मौलिक हक्क, कांहीं मौलिक संकेत हे असतातच. त्यांचे विरुध्द कार्यकारी सत्तेनें जातां कामा नये. मग हे हक्क अगर संकेत राज्याचे घटनेंत स्पष्ट केलेले असोत अगर नसोत. त्या

हक्कांसाठीं, ह्या मौलिक हक्कांसाठीं, पूर्वजांनीं त्याग केलेला असतो, लढा केलेला असतो. हा वारसा बिनधोक राहिला पाहिजे. सभास्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य, अपराधांची उघड चौकशी, मुद्रणस्वातंत्र्य, जो अपराधी तोच न्यायाधिकारी असूं नये वगैरे बाबी मौलिक स्वरूपाच्या असतात. यांच्या छटा समाजाच्या जीवनांत पूर्णपणें पडलेल्या असतात. असले मौलिक संकेत समाजजीवनाशीं समरस होऊन बसलेले असतात, त्यामुळें परंपरा उत्पन्न झालेली असते. संस्कृतींत त्यांचा समावेश झालेला असतो. मांसाहार पिढ्यान्‌पिढ्या न करणाऱ्या गृहस्थाला, मांस पाहून जशी शिसारी येते व तो ते सहन करूं शकत नाहीं, तीच गोष्ट असल्या मौलिक बाबतींत असते. चौकशी-शिवाय अटक, गुप्त चौकशी, वगैरे गोष्टी अंगावर शहारे आणणाऱ्या असतात. इतक्या त्या परंपरेनें अस्वाभाविक झालेल्या असतात. मौलिक झालेल्या, परंपरेत मुरलेल्या, समाजजीवनांत प्राधान्य पावलेल्या गोष्टींविरुध्द कार्यकारी सत्तेनें अगर तिच्या अधिकाऱ्यानें जातां कामा नये. आपल्या कृत्याचा अखेरचा न्यायनिवाडा देण्याचा अधिकार पण सरकारला, अगर सरकारी अधिकाऱ्याला असतां कामा नये. तें काम न्यायाधिशाचेंच. न्यायखातें स्वतंत्र, न्यायाधीश निर्भीड व लायक व न्यायदान विवेकी असें असलें म्हणजे, न्यायदानी सत्तेकडून नागरिकांच्या स्वातंत्र्याचें योग्य संरक्षण होईल.

निःपक्षपाती व निर्भीड न्यायदानाप्रमाणेंच मुद्रणस्वातंत्र्य, लोकांचे स्वातंत्र्यासाठीं आवश्यक आहे. प्रसिद्धीस्वातंत्र्य जेथें नाहीं तेथें जबाबदारीची वस्ती नाहीं हें निश्चित. जेथें राज्यकारभार गुप्त, त्यावरील टीकेला वाव नाहीं, काय छापावें हें सरकारचे मर्जीवर अवलंबून, तेथें हुकुमशाही, वर्गशाही कारभार होणार हें अपरिहार्य आहे. देशांतील वर्तमानपत्रांना राज्यकारभारावर टीकाटिप्पणी करण्याचा पूर्ण अधिकार असला पाहिजे. संपूर्ण मुद्रणस्वातंत्र्याचें वातावरणांतच स्वातंत्र्याला पूर्णता येते. म्हणून सरकारवर टीका करण्यास पूर्ण वाव पाहिजे. सरकारी कृत्यें, सरकारी धोरणें, सरकारी अधिकारी हे केवळ सरकारी म्हणून टीकातीत असतां कामा नयेत. बेअदबी अगर बदनामी करणारा मजकूर नसला म्हणजे झालें. तथापि, असा मजकूर, असें लिखाण लिहिलें गेलें तरी न्यायालयें न्याय देण्यास मोकळी आहेत. काय लिहावें हें सर्वस्वीं लिहिणाराचें आधीन असावें. बाह्यतः मुद्रणस्वातंत्र्य पण प्रत्यक्ष व्यवहारांत सरकारचे इशाऱ्यावर चालणारीं वर्तमानपत्रें असलीं म्हणजे लोकशाहीचे नांवाखालीं गटबाजी वावरत असते. काय छापावें, कसें छापावें, केव्हां छापावें याबद्दल जेथें सरकार संपादकांना अगर मालकांना गुप्तपणें सूचना देत असेल तेथें वर्तमानपत्रें निर्भीडपणें अगर निःपक्षपातीपणें लिहितील हें अशक्य आहे. सरकारचे हातीं अधि-

कार व पुरस्कार करण्याचीं साधनें असल्यामुळें सरकार आपल्या पक्षाचा असा वर्तमानपत्रांचा गट करूं शकतें. ज्या वर्गाचा दाब सरकारवर असतो ते वर्ग संपन्न असतात व आपल्या पैशाच्या जोरावर बहुतेक वर्तमानपत्रें आपल्या आधीन करून घेतात. मुद्रणस्वातंत्र्य असून वर्तमानपत्रें लाचार, लांचखाऊ, पक्षपाती, कर्तव्य-विन्मुख होऊं शकतात. सरकार व मुद्रणव्यवसाय (Press) यांची युति लोकशाहीचे मुळावरच असते. वर्तमानपत्रें म्हणजे लोकमताचे शिक्षक, प्रवर्तक व प्रक्षोभकही असतात. शस्त्रापेक्षां जास्त तीव्र, अस्त्रापेक्षां जास्त व्यापक, मंत्रापेक्षां अधिक मोहक व मारक असें हें वर्तमानपत्रांचें तंत्र आहे. मतप्रसाराचीं उत्कृष्ट व प्रभावी साधनें म्हणजे वर्तमानपत्रें व नभोवाणी; हीं ज्याचे हातीं त्याचे हातीं लोकमत, त्याचें हातीं राज्यकारभार. निर्भीड, स्वतंत्र व विवेकी पत्रकार व वृत्तपत्रें जेथें आहेत, तेथील स्वातंत्र्य जिवंत आहे. स्वातंत्र्याचा खरा आधार मुद्रणस्वातंत्र्य आहे व तें यथार्थ असलें पाहिजे. कारस्थानें, खटपटीलटपटी, प्रसिद्धीस्वातंत्र्य व निर्भीड पत्रें असलीं म्हणजे फारसें मूळ धरत नाहींत. जुल्मजबरदस्ती, हुकुमशाही व मुद्रणस्वातंत्र्य एका राज्यांत राहूं शकत नाहींत. "तोफोंसे मुकाबला है तो अखबार निकालो" तोफांना तोंड द्यावयाचें आहे तर वर्तमानपत्र काढा हा कवि अकबराचा सल्ला अगदींच अयथार्थ नव्हता. मुद्रणस्वातंत्र्य लोकशाही स्वातंत्र्याच्या पंचप्राणांपैकीं एक प्राण आहे.

कार्यवाचक प्रतिनिधीमंडळापेक्षां प्रादेशिक मंडळाकडे अखेरची सत्ता असावी ही व्यवस्था श्रेष्ठ म्हणून वर सांगितले आहे. प्रादेशिक स्वरूपाची राज्यसत्ता असली म्हणजे सर्व नागरिकांचे उपभोगी या नात्याचे हितसंबंध चांगल्या रीतीनें जपले जातात असेंही वर म्हटलें आहे. सर्व नागरिक उत्पादक नसले तरी उपभोगी असतात व त्या नात्यानें त्यांनीं संघटन करून प्रादेशिक राज्य निर्माण केलेलें असतें. म्हणजे नागरिक केवळ नागरिक या नात्यानें मतदारसंघांत येऊन आपले प्रतिनिधी निवडून देऊन विधिमंडळ बनवीत असतो व त्याच्यामार्फत विद्यमान सरकार स्थापीत असतो. व्यक्तिव्यक्तींत अनेक भेद असले तरी सर्व व्यक्ति उपभोग घेणारे नागरिक असतात म्हणून जास्तींत जास्त व्यापक व सर्वांना सामान्य अशा भूमिकेवर संघटन करावयाचें झाल्यास प्रादेशिक दृष्टीनेंच शक्य आहे हें उघड आहे. तथापि, प्रादेशिकदृष्ट्या संघटित झालेली राज्यसत्ता नागरिकांचे हिताचे दृष्टीनें कार्यक्षम व्हावयाची असेल तर राज्यांतील उत्पादनावर तिचा अधिकार असला पाहिजे. आर्थिक विषमता असली तर तिचा परिणाम राजसत्तेमार्फत उत्पादनावर होतो. ज्यांचे हातीं

संपत्ति व ती निर्माण करण्याचीं साधनें आहेत, तेच उत्पादन कसें व्हावें, किती व्हावें व कोठें व्हावें हें अखेरीस ठरवितात. म्हणून आर्थिक विषमता शक्य तितकी कमी व आर्थिक समता शक्य तितकी जास्त असेल तरच राज्यसत्तेला उत्पादनावर खरा अधिकार गाजवितां येईल. अफाट संपत्ति अल्प लोकांच्या हातीं व असंख्य माणसें आजउद्यांचे काळजींत चिंतामग्न अशी समाजाची परिस्थिती असली म्हणजे राज्याचे कांहीं हेतु असोत, शासनतंत्र, श्रीमंतांचे बाजूनें बहुसंख्यांक गरिबांचे हिताविरुद्ध वापरलें जातें हा अनुभव आहे. गरिबांचे हाल दूर होण्याऐवजीं श्रीमंतांच्या सुखसोयींत भर पडते, गलिच्छ वस्त्या सुधारण्याऐवजीं सुंदर उपनगरें वसविलीं जातात. प्राथमिक शिक्षणापेक्षां उच्च शिक्षणाकडे जास्त पैसा खर्चिला जातो. खेडेविभागांतील रस्त्याकडे लक्ष न जातां श्रीमंतांच्या मोटारींची सोय व्हावी म्हणून हमरस्ते रुंदावले जातात, कॉंक्रीटचे केले जातात. चैनीचे वस्तूंवर कर न बसतां गरिबांच्या आवश्यक वस्तूंवरच तो बसविला जातो. सतत व संतत गरिबीमुळें मनुष्याचें मनही कमताकद होतें. पुरेसें अन्नवस्त्र मिळाल्यानंतर जी प्रसन्नता मनाला वाटते त्यांतच स्वाभिमान तेजाळतो व मनाचा कणखरपणा वाढतो. आर्थिक विषमतेचे दुष्परिणाम नुसते भौतिकच नसतात, मानसिकही असतात. लोकशाही स्वातंत्र्य यथार्थपणें सर्वांना उपभोगण्यास मिळावें म्हणून आर्थिक समता, जास्तींत जास्त समाजांत असणें आवश्यक आहे.

समाजांत विषमता घालवून आर्थिक समतेचें वातावरण निर्माण करावयाचें म्हणजे कांहीं तरी स्वरूपांत समाजसत्तावाद अगर साम्यवाद स्वीकारला पाहिजे. निदानपक्षीं खाजगी मालकीच्या उद्योगधंद्यांवर नियंत्रण घालून त्यांच्या आर्थिक दुष्परिणामांपासून समाजाला शक्य तितकें मुक्त केलें पाहिजे. शंभर टक्के साम्यवाद २५ वर्षे प्रयोग करून रशियांत स्थापित झाला नाहीं. मर्यादित प्रमाणांत, खाजगी मालकी-खाजगी धंदे उपस्थित राहिलेच. मनुष्यमात्रांत परिग्रहबुद्धि उपजतच आहे असें म्हटलें तरी चालेल. वतनासाठीं धर्म सोडतील पण वतन कायम ठेवतील, जहागिरीसाठीं प्राणापेक्षां प्रिय असलेली राष्ट्रनिष्ठा सोडतील पण जहागिर वांचवतील, संपत्तीसाठीं सत्य सोडतील पण तिला कायम करतील, ही मनुष्यप्रवृत्ति सार्वत्रिक आहे. जे अपवाद असतात तेच सत्याचे आधार, जीवनाचें श्रेष्ठत्व, प्रगतीचें चैतन्य होत. तथापि, सर्वसाधारणपणें मनुष्य जें बाळगून आहे तें सोडण्यास तयार नसतो. ही परिस्थिती लक्षांत घेतां आर्थिक समतेकडे होणारी समाजाची प्रगति हळू हळू कां हें समजून येतें. तथापि, समाजांतील संपत्तीचें उत्पादन व विभागणी यांचें नियंत्रण

कांहीं तरी प्रमाणांत झालेंच पाहिजे व तें करतांना सार्वजनिक हिताचीच दृष्टि ठेवून प्रत्येक नागरिकास समानहक्कानें किमानपक्षीं आवश्यक तेवढें मिळेल असें घडवून आणलें पाहिजे. सार्वजनिक हित म्हणजे कांहीं व्यक्तींच्या वैयक्तिक हितांची रास नव्हे. या व्यक्ति राष्ट्रांत आहेत, राष्ट्रांत उत्पादन कार्य करीत असतात येवढयावरून त्यांचें हित सार्वजनिक हित होऊं शकत नाहीं. सार्वजनिक हित म्हणजे ज्यांत प्रत्येकाला भाग आहे व निदान शक्य तितका सारखा भाग आहे तेंच; व एवंगुणविशिष्ट सार्वजनिक हित जें सरकार जपूं शकत नाहीं, तें नैतिकदृष्टया अनधिकारी आहे. केवळ सक्तीचे जोरावर तें सत्ता चालवूं शकतें इतकेंच. तात्पर्य, यथार्थपणें लोकशाही स्वातंत्र्य नांदावयाचें असेल तर आर्थिक समता शक्य तितकी जास्त समाजांत असली पाहिजे, घडवून आणली पाहिजे.

ही आर्थिक समता उत्पन्न व्हावी म्हणून उत्पादनाच्या संस्था कोणत्या स्वरूपाच्या असाव्यात, शासनसंस्था कोणत्या स्वरूपाच्या असाव्यात हे सर्व प्रश्न महत्त्वाचे आहेत. तथापि, येथें तात्त्विक विचार करतांना येवढें सांगणें जरूर आहे कीं, समाजांत मालमत्ता व संपत्ति यांचे मालकी संबंधीं कांहीं जरी कल्पना असल्या तरी समाजांतील प्रत्येक नागरिकाला निदान त्याला आवश्यक तेवढें आवश्यक अशा किमान गरजा भागविण्याकरितां मिळालें पाहिजे, ही व्यवस्था राज्यानें केली पाहिजे. या व्यवस्थेआड येणाऱ्या मालमत्तेच्या मालकीहक्कासंबंधाच्या सर्व कल्पना अनैतिक व असामाजिक आहेत म्हणून राज्यसत्तेनें त्या अग्राह्य ठरविल्या पाहिजेत. वरील व्यवस्थेला ज्या हक्कांपासून, ज्या मालकीहक्कांपासून बाध येतो ते हक्क कायदेशीर असले तरी नैतिकदृष्टया ते गैर आहेत. जें मिळविलें नाहीं तें मिरविण्याचा हक्क असूं नये. समाजांत श्रम आणि आराम यांत कार्यकारणभाव असला पाहिजे. कांहींनीं श्रमावें व कांहींनीं आराम घ्यावा यांत न्याय नाहीं. जें श्रमानें मिळविलें असेल तेंच उपभोगण्याचा हक्क नैतिक व न्याय्य आहे. अशा रीतीनें समाजहेतूला अनुसरून व्यक्ति जें मिळवील तें त्याच्या श्रमाची किंमत; जी मालमत्ता अगर मिळकत याप्रमाणें व्यक्ति मिळवील तिचें स्वरूप नैतिकदृष्टया इष्ट व राजकारणी न्यायाचे दृष्टीनें तिच्या श्रमाचें, तिनें केलेल्या कार्याचें राज्यसत्तेनें केलेलें मूल्यमापन असें राहील. श्रम केले तर संपत्ति व श्रमाप्रमाणें संपत्ति असें झालें म्हणजे मालमत्ताविषयक हक्क श्रम केले तरच उत्पन्न होतील. समाजांत कांहीं कार्य केलें तर त्यामुळें जें मिळेल तें व्यक्ति बाळगूं शकेल. परिश्रममूलक परिग्रह असा न्याय होईल. एकानें श्रमावें व

दुसऱ्यानें त्याचें फल भोगावें हें अनैतिक म्हणून अन्याय्य आहे. ज्या राज्यांत केवळ जगण्यासाठीं कांहीं मरमर मरतात, श्रम करतात व कांहीं स्वतः कांहींही न करतां दुसऱ्याचे श्रमावर जगतात, त्या राज्यांत न्याय नाहीं. उपभोगासाठीं उत्पादन पाहिजे. त्याचप्रमाणें उत्पादन न करणारास उपभोग पण मिळतां कामा नये, या व्यवस्थेंत खरा न्याय आहे. जो श्रम करणार नाहीं, सामाजिक हेतुप्रीत्यर्थ जो कांहीं उत्पादन करणार नाहीं त्याला नागरिकत्वहि असूं नये. राज्यकारभारांत मतदानाचा हक्क संपत्तीचे मालकीवर ठेवणें अगर मिळकतवाल्यांना खास हक्क देणें यांत न्याय नाहीं. नागरिकत्वाचा संबंध मिळकतीशीं नसावा, व्यक्तीशीं असावा. श्रीमंत मनुष्य पण वेडा आहे, तरीसुद्धां त्याला मताधिकार देणें म्हणजे वस्तुतः निर्जीव गोष्टीला मत देण्याचा हक्क देणें असें होतें. अज्ञानाला मत नसावें, वेड्याला मत नसावें याचा अर्थ मताचा हक्क व्यक्तीचें व्यक्तित्व लक्षांत घेऊन दिला जातो. हीच खरी मूलभूत व योग्य दृष्टि आहे. जें सर्वांना सर्व नागरिकांना समान असेल त्यावर हा अधिकार आधारलेला असावा. म्हणजे नागरिकाला तो नागरिक आहे येवढ्याच गोष्टीवर हा अधिकार असला पाहिजे. किमान आवश्यक गरजा सर्वांनाच असतात, त्या भागल्या पाहिजेत म्हणून सर्वांचें तेवढ्यापुरतें हित सारखें व त्यांच्यांत हितैक्यहि असतें. या दृष्टीनें राज्यकारभारांत प्रतिनिधित्वहि सारखेंच असलें पाहिजे. प्रतिनिधित्वाचे दृष्टीनें, मतदानाचे दृष्टीनें साहित्यसम्राट् व निरीक्षर माळी, मोतीवाला व मोळीविक्या हे जरी सारखे असले तरी त्यांच्या उत्पादनाचें फळ, श्रमाची किंमत, अगर मेहनताना सारखाच असेल असें नाहीं. सामाजिक मान्यता व गौरव तर सारखा नसणारच. तथापि, सामाजिक व्यवस्थेनें, समाजरचनेनें, समाजांतील नागरिकांच्या प्रवृत्तींना सारखा वाव मिळावा, म्हणून त्यांत व्यक्तिभेद न करतां सारख्याच महत्त्वाच्या मानून त्याप्रमाणें समाजव्यवस्थेचें, समाजसंघटनेंचें स्वरूप घडवून आणलें पाहिजे. समतेचा भाव समाजसंघटनेंत उमटला पाहिजे. जड आणि प्राज्ञ, दोन्ही विद्यार्थ्यांना सारखें शिकविलें पण परिणाम निराळा झाला, यांत गुरूचा गौरव नाहीं. उलट त्यानें सारखें शिकविलें हेंही तत्त्वतः खरें नाहीं. ज्या प्रमाणांत परिणामांत सारखेपणा दिसून येईल त्या प्रमाणांत शिकविण्यांत समता होती व त्या प्रमाणांत गुरूचा गौरव आहे हें खरें सत्य आहे. गुरूचें कार्य परिणामानें ठरवावयाचें असतें. त्याचप्रमाणें समाजानें केवळ सर्वांना सारखी संधि दिली, राज्यानें संधिसमता उपलब्ध केली येवढ्यानें तें श्रेष्ठ ठरत नाहीं; तर प्रत्यक्ष परिणामांत या संधिसमतेमुळें किती समता उपललब्ध झाली, त्या दृष्टीनें किती यश मिळालें यावर तें श्रेष्ठत्व अवलंबून आहे.

येथपर्यंत मांडलेल्या विचारांवरून एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, सामाजिक हेतु, समानहित साधण्यासाठीं राज्यसंघटनेची आवश्यकता आहे. राज्याचें प्रत्यक्ष संघटन कसें जरी असलें तरी तें आवश्यक आहे. समाजांतील सर्व संघटनांत राज्यविषयक संघटन हें श्रेष्ठ आहे. कारण त्यावरच सर्व समाज अवलंबून आहे. नानाविध विरोध ज्यांत आहेत, अनेक हितसंबंध ज्यांत आहेत अशा नानाविध व असंख्य व्यक्तींनीं भरलेला समाज, याला कांहीं जरी नियंत्रण घालणारें, सर्व लोकांना, सर्वांच्यासाठीं आहे असें कांहीं थोड्या प्रमाणांत तरी वाटेल असें सार्वजनिक संघटन असल्या-शिवाय भागत नाहीं व तें सार्वजनिक संघटन म्हणजे राज्य. या राज्यामुळें, कांहीं स्थैर्य समाजांत उत्पन्न होतें, कांहीं विश्वास उत्पन्न होतो, कांहीं परंपरा उभारल्या जातात. सर्व लोकव्यवहाराचा आधार म्हणजे राज्य. राज्याचें हें श्रेष्ठत्व मानणें अप-रिहार्य आहे हें मानलें तरी तें करील तें सर्व नैतिक दृष्टीनें श्रेष्ठ असें मात्र नाहीं. कांहीं हेतु साध्य व्हावेत म्हणून तर समाजानें, व्यक्तींनीं हें संघटन स्वीकारलें. मानवव्यवहार सुरळीत व्हावा म्हणून मनूला राजा केला, त्याला चक्रवर्ती केलें. कांहीं हेतु साधण्या-साठीं, राज्य हें एक साधन निर्माण झालें. हें त्याचें मौलिक स्वरूप विसरून चालणार नाहीं, आतां तें सनातन झालें म्हणून साध्य स्वरूपाचें होणार नाहीं. प्रतिष्ठा वाढली तरी पायरी सोडून तें जाऊं लागल्यास विरोध केला पाहिजे. विजयादशमीस शस्त्राची पूजा केली तरी संरक्षणाचे कामीं नालायक ठरल्यास तीं फेंकलीं पाहिजेत. त्यांचा उपयोग ज्याच्यासाठीं आहे तो जर होत नसेल तर त्यांचा त्याग केला पाहिजे. मानवी जीवन संपन्न व पूर्ण होण्याचे कामीं साधन म्हणून राज्य आहे. त्याचें सामर्थ्य व त्यावरील निष्ठा वरील हेतु ज्या प्रमाणांत साध्य होतील, त्यावर अवलंबून आहे. राज्यासाठीं प्रजा नाहीं, प्रजेसाठीं राज्य आहे. मनुष्यासाठीं शस्त्र आहे, त्याची पूजा झाली म्हणून हा मौलिक संबंध बदलत नाहीं; जेथें या संबंधीं विपरीत भावना आहेत तेथें काय होतें हें आज जग पाहात आहे. व्यक्तिविकासाला वाव मिळत नसेल तर या साधनांत कांहीं तरी गोम आहे असेंच नागरिकांना वाटेल. व्यक्तींच्या उन्नतीला व विकासाला असणारे व येणारे अडथळे जर राज्यसत्ता दूर करणार नाहीं तर तिचा निषेधच नागरिक करतील. राज्य या साधनाद्वारें जर मनुष्याला त्याच्यांतील उत्कृष्ट प्रवृत्तींना वाव मिळून व्यक्तिविकास करतां आला नाहीं, तद्विषयक मानसिक समाधान मिळालें नाहीं तर तें साधन त्याचे दृष्टीनें व्यर्थ आहे. या साधनाचे द्वारें जास्तींजास्त लोकांना जास्तींत जास्त समाधान मिळेल असेंच त्याचें कार्य असलें

पाहिजे. असें कार्य करणाऱ्या साधनाला राज्याला, निष्ठावंत राहाणें योग्य ठरेल. राज्यसत्ता मौलिक हेतूंचा विपर्यास करून वागूं लागली तर नागरिकांचा धर्म तिला विरोध करून विवेकानें आपली मुक्तता करून घेणें हा आहे. मौलिक हेतूंचा विपर्यास होऊन राज्य—सत्तेचा दुरुपयोग होऊं लागला म्हणजे स्वातंत्र्य नष्ट होतें व मानसिक गुलामगिरी पसरत जाते. या दोन्हीपासून स्वतःला व समाजाला वांचविणें हाच खरा नागरिकधर्म आहे. साधन हें साधन राहिलें पाहिजे, प्रजेनें राज्याला हेतुसाध्यर्थ दिलेलें प्रभुत्त्व याच कारणाकरितां मर्यादित राहिलें पाहिजे.

---

# : नागरिकधर्म व नागरिकहक्क :

राज्याचा लौकिक त्यांतील नागरिकांना कोणत्या स्वरूपाचें स्वातंत्र्य आहे यावर अवलंबून आहे. कोणत्या नागरिकहक्कांचे पालन तें करतें यावर त्याची प्रतिष्ठा मानली जाते. नागरिकांना किती सुखासमाधानानें त्यांत राहातां येतें यावर त्याची योग्यायोग्यता ठरते. केवळ केलेला कायदा व दिलेला हुकूम अंमलांत आणणारे सत्ताधीश व प्रभुत्वपूर्ण असें संघटन म्हणजे राज्य ही व्याख्या कायद्याचे दृष्टीनें बरोबर असली तरी राजकारणमीमांसेचा विचार करीत असतांना, राज्यशास्त्राचा विचार करीत असतांना ती उपयोगी पडत नाहीं. कायदा अगर विधि जें आहे तें सांगतो; शास्त्र आणि मीमांसा जें आहे तें कां आहे याचा प्रपंच करतात. ते योग्य अगर अयोग्य ठरवितात, तें कां आहे, कसें आलें, याची कारणें सांगतात. येथें राज्याचा विचार केवळ विधिदृष्टीनें करावयाचा नाहीं. म्हणून राज्याला देण्यांत येणारी नागरिकांची निष्ठा कायद्याचे गजानें मोजून भागणार नाहीं. ती मापानें पूर्ण भरली तरी तिचें स्वरूप काय आहे हें पाहिलें पाहिजे. मापानें दूध प्रमाणाप्रमाणें भरलें. पण त्याची प्रत पाहातां तें नुसतें दूधमिश्रित पाणी होतें असें आढळून आलें तर काय उपयोग ? दुधाची प्रत मापावर नाहीं. गजानें बारभर कापड भरलें पण विरळ असलें तर काय उपयोग ? नागरिक कायद्याविरुद्ध जात नाहींत पण राज्याबद्दल आपुलकी नाहीं, प्रेम नाहीं तर काय उपयोग ? म्हणून राज्याला निष्ठावंत राहिल्यापासून काय मिळणार, कोणतें सुख लाभणार, किती समाधान होणार यावर नागरिकांची निष्ठा अवलंबून राहाते. किंबहुना, नागरिक हा नागरिक आहे म्हणूनच त्यानें प्रत्येक सरकारी कृत्य, प्रत्येक धोरण तपासून पाहिलें पाहिजे, त्या मागील हेतु हुडकून काढला पाहिजे, त्याचें स्वरूप नीट निरखून पाहिलें पाहिजे, हें त्याचें कर्तव्य आहे व हें त्यानें केलें पाहिजे. सरकारनें कृत्य केलें म्हणजे तें योग्य अगर न्याय्य मानणें व त्यास मान तुकविणें ही अनागरिकदृष्टि आहे. खरी नागरिकदृष्टि म्हणजे सरकारी कृत्य, सरकारी

धोरण हें योग्य कीं अयोग्य हें पाहून नंतरच तें मान्य अगर अमान्य करावयाचें हें ठरवितां यावें म्हणून कांहीं नमुना, कांहीं प्रमाण समाजांत उपलब्ध असलें पाहिजे, कांहीं निकर्ष पाहिजे. कांहीं ध्येय, कांहीं साध्य डोळ्यांसमोर असलें पाहिजे, व हें सर्व असतें म्हणूनच नागरिकाला योग्य कोणतें, अयोग्य कोणतें, इष्ट कोणतें, अनिष्ट कोणतें हें ठरवितां येतें. सत्तेनें केलें म्हणून तें सात्त्विक हा सिद्धांत चुकीचा व घातक आहे. सात्त्विकता कर्त्यावर अवलंबून नाहीं, कार्याचे स्वरूपावर आहे. सरकारी कृत्य अगर धोरण हें या दृष्टीनें नागरिकानें तपासलें पाहिजे. समाजानें मान्य केलेल्या प्रमाणाप्रमाणें तें आहे का, समाजानें मान्य केलेल्या ध्येयाकडे तें नेणारें आहे का, हें नागरिकानें पाहावयाचें असतें. म्हणजे जे कांहीं संकेत, जीं कांहीं प्रमाणें, अगर जे कांहीं हक्क असतील त्याला सरकार आपल्या कृत्यानें, आपल्या धोरणानें मान्यता देतें कीं नाहीं हें पाहावयाचें. याचा अर्थ असा कीं, राज्य अगर राज्यसत्ता कांहीं हक्क उत्पन्न करीत नाहीं, तर जे समाजांत असतील त्यांना मान्यता देतें व ज्या प्रमाणांत तें या हक्कांना मान्यता देईल त्यावर त्याचें खरें स्वरूप अवलंबून राहील. ज्याची जशी श्रद्धा तसा तो होतो, हाच न्याय येथें आहे. ज्या हक्कांना राज्य मान्यता देतें त्यांच्या स्वरूपाचें तें होतें.

वर निर्दिष्ट केलेलें हक्कांचें महत्त्व लक्षांत घेतां खुद्द हक्कांचें स्वरूप; त्यांचा आशय, त्यांचा व्याप हें सर्व काळजीपूर्वक पाहिलें पाहिजे, त्यांची यथायोग्य चिकित्सा केली पाहिजे. हक्क हे विधायक वृत्तीनें, कांहीं तरी रचनात्मक दृष्टीनें राज्यसंघटनेवर परिणाम करीत असतात. मान्यता मिळाली, कीं त्या संघटनेच्या स्वरूपावर व कार्यावर परिणाम करीत असतात. विधायक राजकारणाचे दृष्टीनेंही त्यांना महत्त्व येतें. हक्कांचा विचार करतांना नागरिकांचे अधिकारांचा विचार करतांना, नेहमीं ते मूलभूत आहेत, पूर्वापार ते चालत आले आहेत, परंपरागत आहेत असें म्हटलें जातें. याचा अर्थ हे अधिकार अगर हे हक्क प्राचीनकाळीं कुणी तरी मानवजातीला, अगर समाजाला बहाल केले व नंतर ते लुप्त झाले व आतां ते पुन्हां मिळवावयाचे आहेत, असा करणें चुकीचा आहे व वस्तुस्थितीही तशी नाहीं. लुबाडलेला अगर लुप्त झालेला वारसा पुन्हा मिळवावयाचा आहे, वडिलोपार्जित संपत्ति—बाहेर गेलेली पुन्हां कुटुंबांत आणावयाची आहे, असा कांहींहि भाग येथें नाहीं. किंबहुना अशी दृष्टि ठेवून विचार केल्यास नुकसानच होईल. जें हल्लीं विद्यमान पिढी मागत आहे, तें प्राचीन काळीं होतें असें म्हटलें तर तें खरें नाहीं. ज्या स्वातंत्र्याच्या कल्पना आज आहेत, जे नागरिकांचे हक्क

आज मागितले जातात त्या बरहुकूम एखादे काळीं समाजव्यवस्था होती असें इतिहास सांगत नाहीं. उलट आधुनिक कालांत जें राज्याचें स्वरूप उपलब्ध आहे, तें अनेक प्रकारें प्राचीन व मध्ययुगीन राज्याचे स्वरूपापेक्षां अधिक उदार व कमी जुलमी निश्चित आहे. कविकल्पनेंतील रामराज्य सोडल्यास प्रत्यक्ष अनुभवांत, विद्यमान राज्यसंघटना पूर्वीपेक्षां बरी म्हणणें चुकीचें नाहीं. याचा अर्थ तुलनेने बरी परन्तु विद्यमान आकांक्षांना, विद्यमान राजकीय ध्येयांना अनुरूप ती आहेच असा अर्थ नाहीं. आज ज्या राजकीय कल्पना आहेत, हक्कविषयक ज्या कल्पना आहेत, त्या अनुभवानें घडत घडत आल्या आहेत, त्यांत अनुभव व आकांक्षा यांचा मिलाफ झालेला असतो. प्राप्त पक्के करून प्राप्याकडे ओढ घेण्याचा धर्म त्यांत असतो. हक्क म्हणजे कांहीं तरी सनातन स्वरूपाचें वस्तुभांडार नव्हे कीं, जें समाजाचें स्वरूप सतत बदलत असतां तें मात्र नित्य व सनातन राहातें. निसर्गाप्रमाणें त्याचें स्वरूप कायम व सनातन असतें असेंही नाहीं. खुद्द निसर्गातील नित्यत्व सुद्धां हल्लींच्या शास्त्रीय युगांत संशयातीत नाहीं. शास्त्रीय शोध व प्रगति सारखी होत असतां समाजांत कांहीं कायमचें, निरपेक्ष व सनातन राहील हें शक्य नाहीं. कांहीं गोष्टी अत्यंत जरुरीच्या, अत्यंत महत्त्वाच्या वाटतील, आवश्यक वाटतील, म्हणून त्या समाजाला स्वाभाविक आहेत येवढें फार तर म्हणतां येईल. पण कालाकालाप्रमाणें जरुरी, महत्त्व व आवश्यकता यांच्या कल्पना बदलत असतात. म्हणून ' नैसर्गिक हक्क आहेत. ' ' स्वाभाविक हक्क ' आहेत असें जेव्हां म्हणण्यांत येतें तेव्हां त्यांतील मर्यादा ओळखणें जरूर आहे. जन्मलेल्या बालकाला मातेचें स्तनपान करण्याचा नैसर्गिक हक्क आहे, तो स्वाभाविक हक्क आहे. याचा अर्थ स्तनपान आवश्यक आहे म्हणून तो आहे इतकाच घेतला पाहिजे. नैसर्गिक म्हणण्यांत गरजेचा, आवश्यकतेचा भाव प्रमुख आहे. गरजेच्या कल्पना निरपेक्ष नाहींत. त्या देशकालपरिस्थितीवर अवलंबून आहेत. सर्वांच्या गरजा सर्वकाल सारख्या असणेंच शक्य नाहीं. म्हणून जे हक्क एका देशांत आवश्यक वाटतील ते दुसऱ्या देशांत वाटणार नाहींत, किंबहुना त्याच देशांत ५० वर्षांपूर्वी जे हक्क आवश्यक वाटले ते आज वाटणार नाहींत. म्हणून हक्कांना कोणीं नैसर्गिक म्हटलें तर त्यांतील मर्यादा ओळखूनच म्हटलें पाहिजे. सर्व कालीं, सर्व प्रदेशीं निरपेक्ष रीतीनें कोणतेही हक्क नैसर्गिक नाहींत. किंबहुना, लौकिक अर्थानें त्यांत नैसर्गिकपणाही नाहीं. कोणत्या परिस्थितींत कोणते हक्क आवश्यक म्हणून स्वाभाविक व नैसर्गिक हें ती परिस्थिति पाहून ठरविलें पाहिजे. पुस्तक पाहून हें ठरवावयाचें नाहीं,

परिस्थितीपरीक्षणानें ठरवाययाचें आहे. हक्क सनातन आहेत कारण ते नित्य बदलतात. ‘ सनातन नित्य नूतनू. ’

नागरिकांना आज असलेले अगर ते आज मागत असलेले हक्क अगर अधिकार पूर्वी कुणी दिले होते अगर ते नैसर्गिक आहेत, स्वाभाविक आहेत, म्हणून ते आहेत, अगर हवेत ही विचारसरणी कितपत बरोबर आहे याचा विचार वर झाला. कांहींच्या मतें हे हक्क म्हणजे मनुष्याला, नागरिकाला आपल्या इच्छा पुऱ्या करण्याची सत्ता. अशी इच्छा पुरी करण्याची सत्ता असल्यास समाजांत कठीण प्रसंग येतील, समाजबंधच तुटतील. खून करण्याची इच्छा उत्पन्न झाली, परस्त्री हरण करण्याची इच्छा उत्पन्न झाली, परधन हरण करण्याची इच्छा उत्पन्न झाली व या इच्छा पुऱ्या करण्याची सत्ता नागरिकाला असली तर समाज शतशः विदीर्ण होईल, गुंडांचें व पुंडांचें फावेल. ‘ जिसकी लाठी उसकी भैंस ’ असा प्रकार होईल. म्हणून वाटेल त्या इच्छा पुऱ्या करण्याची सत्ता असें स्वरूप हक्कांचें असूं शकत नाहीं. ज्या इच्छांना समाजानें मान्यता दिली अगर ज्या पुऱ्या करणें योग्य आहे असें समाजाला वाटतें त्या पुऱ्या करण्याची सत्ता नागरिकाला असावी व तो त्याचा हक्क असावा हें म्हणणें ठीक दिसेल. नागरिकांच्या इच्छेवरच अनेक गोष्टी होत असल्या तरी सर्व इच्छा न्याय्य आहेत अगर योग्य आहेत अगर सारख्या प्रमाणांत त्या योग्य आहेत अगर न्याय्य आहेत असें कदापि म्हणतां येणार नाहीं. नागरिकांच्या इच्छांना त्या पूर्ण केल्यापासून होणारा परिणाम लक्षांत घेऊन मर्यादा घातल्या पाहिजेत. प्रत्येकाच्या प्रत्येक प्रवृत्तीला वाव देण्याची व्यवस्था जर राज्य करूं लागलें कायद्यानें तशी मुभा ठेवली तर अनर्थ होईल, समाजांतील स्थैर्य व संरक्षण नाहींसें होईल. इच्छापूर्तीचा परिणाम लक्षांत घेऊनच राज्यानें वागलें पाहिजे, कायद्यानें मर्यादा घातल्या पाहिजेत. जीवनांत पूर्णता यावी, प्रसन्नता यावी, हें ध्येय, वाटेल त्यानें वाटेल तसें वागावें व तसा त्यास हक्क असावा, सत्ता असावी या वातावरणांत साध्य होणार नाहीं. समाजांत कांहीं शाश्वति, कांहीं स्थैर्य असेल तर हें शक्य आहे. जीवित सुरक्षित असेल तर तें पूर्ण होण्याचा संभव. म्हणून वाटेल त्या इच्छा पूर्ण करण्याची सत्ता म्हणजे हक्क ही कल्पना टाकली पाहिजे. हक्कांचा अगर अधिकारांचा विचार करतांना मानवी इच्छेला मर्यादा घालून केला पाहिजे हें स्पष्ट आहे. याचा अर्थ राज्यानें मर्यादा घालून जेवढे मान्य केले तेवढेंच हक्क अगर अधिकार असें मात्र नाहीं. राज्यमान्यता मिळाली म्हणजे तो हक्क प्रतिष्ठित होतो हें खरें. तो

कोणी अमान्य केल्यास अगर त्यावर अतिक्रमण केल्यास राज्यांतील न्याय व व्यवस्था हक्कदाराचे मदतीस येईल, ती हुकूम देईल व राज्य आपल्या प्रभुत्वाचे जोरावर हक्कदाराचे हक्क त्याला उपभोगूं देईल. राज्यमान्यता असली म्हणजे हक्काचे उपभोगा-बाबत येवढी निश्चिती येते हें खरें. तसेंच प्रत्येक नागरिकाला राज्यांत काय हक्क आहेत तें निश्चितपणें कळूंपण शकतें. राज्यांतील कायदेकानू पाहून आपला अधि-कार त्याला कुठपर्यंत आहे, कुठल्या परिस्थितींत आहे हें कळूं शकतें. कायद्यांत बदल झाल्याबरोबर त्याच्या हक्कांत, त्याच्या अधिकारांत बदल होतो. कायदेकानू व दिलेले न्यायालयाचे निर्णय न्याहाळले म्हणजे राज्यानें मान्य केलेल्या हक्कांची मीमांसा लक्षांत येते, ते कां दिले अगर कां मर्यादित केले हें स्पष्ट होतें.

राज्यमान्यता मिळालेले हक्क म्हणजे त्यांतील व्यक्तींच्या इच्छेचें स्वरूप जाऊन त्या जागीं राज्याचें, समाजांतील सामुदायिक इच्छेचें, बुद्धीचें स्वरूप येऊन त्याचें ते निदर्शक होतात. ही राज्येच्छा राज्याज्ञेच्या स्वरूपांत, विधिरूपांत प्रकट होते. न्याया-लयें, या राज्याच्या आज्ञा, हे कायदे काय सांगतात, त्यांचा अर्थ काय आहे हें सांगून राज्याच्या इच्छा काय आहेत हें स्पष्ट करतात. यामुळें नागरिकांना कोणत्या मागण्यांना ताबडतोब मान्यता मिळेल हें कळून येतें. केवळ राज्यमान्यता मिळाली तरच ते हक्क एरवीं नाहींत ही कायद्याची कांटेकोर दृष्टि प्रस्तुत राज्यांत काय हक्क आहेत, राज्यानें कोणते मान्य केले आहेत हें सांगेल, पण ते योग्य आहेत अगर देणें योग्य आहे हें सांगूं शकणार नाहीं. कायदा काय आहे तें सांगेल, तो बरोबर कीं चूक हे सांगण्याचें कार्य तिचें नाहीं. राज्यांतील कायद्यापासून राज्याचें विद्यमान स्वरूप कसें आहे हें कळेल, कसें असावें हें ती सांगूं शकणार नाहीं. राज्यमान्यता मिळाली म्हणून जे हक्क कायदेशीर झाले पण ते योग्य कीं अयोग्य हें अन्य दृष्टीनें ठरलें जातें. कायदेशीर तें सर्व योग्यच ही विचारसरणी घातक आहे व खरीही नाहीं. हिंदुस्थानांत आज स्त्रियांना मर्यादित वारसा आहे हें आजचा राज्यमान्यता मिळा-लेला कायदा सांगूं शकेल, त्यांना घटस्फोटाचा अधिकार नाहीं हें तो कायदा स्पष्ट करील; पण स्त्रियांना पूर्णपणें वारसा देणें अगर घटस्फोटाचा अधिकार त्यांना देणें हें योग्य कीं अयोग्य हें तो सांगूं शकणार नाहीं. स्वकष्टार्जित संपत्ति मृत्युपत्रानें वाटेल तशी देण्याचा हक्क हिंदूंना आहे, याचा अर्थ हा हक्क कायद्यानें मान्य केला आहे. इच्छा असल्यास हिंदु गृहस्थ याप्रमाणें करूं शकतो. पण त्याला हा हक्क देणें योग्य आहे का, हें कांहीं कायदा ठरवीत नाहीं. वृध्द-तरुणी विवाह होऊं शकतो, याचा

व्यर्थ कायदा त्याला बंदी करूं शकत नाहीं. हा विवाह योग्य कीं अयोग्य हें कायद्या-व्यतिरिक्त जी कांहीं परिस्थिती असेल तिनें ठरविलें पाहिजे. तथापि, कायदा जो निर्माण होतो, तो कांहीं स्वयंभू परिस्थितींत निर्माण होत नाहीं, तत्त्वतः सामाजिक, सार्वजनिक बुध्दीचें स्वरूप जें राज्य या संघटनेच्या मार्फत प्रगट होतो, त्याचें आज्ञा-पक स्वरूप म्हणजे विधि अगर कायदा. या दृष्टीनें विचार करतां प्रत्येक कायद्यामागें कांहीं तरी विचारप्रणाली असते. कांहीं सामाजिक इच्छा, कांहीं सामाजिक बुध्दि, कांहीं संकेत गृहित धरलेले असतात. म्हणून कायद्यामागें असलेले सर्व विचार, सर्व संकेत तपासून पाहिले पाहिजेत व ते ज्यामानानें योग्य असतील त्यामानानें कायदा योग्य मानला पाहिजे. निव्वळ राज्यसत्तेच्या आज्ञा या स्वरूपांत त्यांना यथार्थत्व येत नाहीं व केवळ त्या स्वरूपांत त्यांची जरूरी भासत नाहीं. त्यांच्यामागें कांहीं सामा-जिक संबंध आहेत, कांहीं सामाजिक संकेत आहेत असें असेल तरच त्यांची यथार्थता व जरुरी. ज्याचा समाजाच्या व्यवहाराशीं कांहींही संबंध नाहीं असा कायदा राज्य करणार नाहीं. अधिकार आहे म्हणून जरी केला तरी तो निरर्थक व म्हणून अनव-श्यक हें उघड आहे. समाजाला उपयोगी म्हणून कांहीं तरी प्रमाणांत आवश्यक असेंच कायद्याचें स्वरूप असतें. काय उपयोगी आहे ही अर्थात् वादाची गोष्ट. आवश्यक संबंधच कायद्यांत असतात हें चूक; जे अवश्यक असतील असे सामाजिक संबंध कायद्यांत यावेत, आले पाहिजेत हें बरोबर.

हक्क अगर अधिकार यांना राज्यमान्यता मिळाली, म्हणजे त्यांची परिस्थिती काय असते हें वर सांगितलें. पण जेवढे मान्यता पावले तेवढेच हक्क असें मात्र नाहीं. हक्क अगर अधिकार यांची भूमिका अधिक व्यापक आहे. व्यक्तिमात्राला त्याच्या उत्कट व उत्कृष्ट प्रवृत्तींना वाव मिळून पूर्णत्व येण्यासाठीं जी सामाजिक परिस्थिती आवश्यक आहे ती प्राप्त करून घेण्यासाठीं जें जें जरूर आहे त्या सर्वांचा समावेश हक्क या कल्पनेंत होतो. इतकी त्याची व्यापक भूमिका आहे. राज्याचा हेतु व्यक्ति-विकासाला व सामाजिक विकासाला वाव मिळेल हें पाहाण्याचा असल्यामुळें, या विकासाला आवश्यक असणारे हक्क देण्यांत व त्यांचें संरक्षण करण्यांवर राज्याचे हेतु सफल होतात, राज्याला यथार्थता प्राप्त होते. आधीं प्रजा मग राजा अगर राज्य. याच न्यायानें मान्यता मिळो अगर न मिळो समाजांत हक्क, हक्कविषयक विचार हे राज्याचे आधीं आहेत; त्याबरहुकूम घडून यावें म्हणून तर राज्यसंघटनेची जरुरी. किंबहुना खुद्द राज्याला मिळणारी मान्यता व त्याची विधियुक्ततासुद्धां या हक्क-

विषयक विचारप्रणालीवर अवलंबून आहे. या समाजांतील विचारप्रणालीला अनुसरून राज्य हें संघटन असेल तर त्याची नैतिक प्रतिष्ठा, समाजानें संमति दिली, मान्यता दिली तरच राज्य हें विधियुक्त. समाजाच्या विरुद्ध राज्य म्हणजे अनधिकारी, अनैतिक संघटनच होय. निष्ठेचा अगर मान्यतेचा तेथें संबंधच येत नाहीं. म्हणून हक्कांना मान्यता देण्यांत एतद्विषयक विचारप्रणाली स्वीकारण्यांतच राज्य मान्यता पावत असतें, त्याचा नैतिक पिंड वाढत असतो. परस्परांबद्दल भाव दाखवूनच सुखाचें व समाधानाचें श्रेय मिळणें शक्य होतें. ही हक्कविषयक विचारप्रणाली कालपरत्वें बदलत जाते म्हणूनच पुनःपुनः मान्यतेचा प्रश्न उत्पन्न होत असतो. जसें शरीर वाढेल त्याप्रमाणें कपडे घेतले पाहिजेत. बालपणींचा कोट तारुण्यानें परिपूर्ण झालेल्या शरिरानें घातल्यास फाटेल. दोघांत अनुरूपता पाहिजे. त्या त्या कालच्या कल्पनेप्रमाणें प्रगतीप्रमाणें हक्कविषयक विचार व संकेत उत्पन्न होतात, त्यांना जाब देणारें राज्यविषयक संघटन पाहिजे असतें. या कल्पनांची एक यादी कायम करून सर्व देशीं सर्व काळीं ती उपयोगांत आणावी हें म्हणणें हास्यास्पद आहे. असें झालें नाहीं, असें होणें शक्य नाहीं, अस्वाभाविक आहे. कालपरत्वें या कल्पना, हे संकेत ठरत जातात व ते समाजाला आवश्यक असल्यामुळें स्वाभाविकपणें समाज त्यांच्या मान्यतेसाठीं झटत असतो. मान्यता मिळतेच असें नाहीं. मान्यतेसाठीं, राज्यमान्यतेसाठीं विद्यमान सरकारला क्रांतीच्या मार्गानेंहि खालीं ओढावें लागतें. समाजांतील ध्येय व विद्यमान सरकारचा व्यवहार यांत कांहींच मेळ न बसल्यास संघर्ष निर्माण होतो. समाजाला जें हवें आहे असें वाटतें, जें ध्येय म्हणून समाजानें आपल्या डोळ्यांपुढे ठेवलें असतें, त्याकडेच पावलें टाकण्यांत विद्यमान सत्तेला स्थैर्य मिळतें. दिलें असतां सत्ता कमी होत नाहीं तिला समाधानाची जोड मिळते, ती वाढतेच; चालू सत्तेचा भोगवटा कायम ठेवण्यासाठीं ही किंमत फारशी नाहीं, न दिल्यास विरोध वाढत जातो व त्याचें स्वरूप देशकालपरिस्थितीवर अवलंबून राहील. रशिया—फ्रान्सप्रमाणें क्रांतिस्वरूपांतही तो प्रकट होईल. किंमत देत गेल्यास विरोधाचा परिहार होईल पण नव्या आकांक्षा उत्पन्न होतात, नवे विचार उत्पन्न होतात, पुनः समाजाला जें हवें आहे असें वाटतें तें व विद्यमान सरकार करीत असलेला व्यवहार यांत अंतर पडतें. मान्य केलेले हक्क कायमचे कधींच पुरे पडणार नाहींत. केलेला कायदा मागील अनुभव लक्षांत घेऊन केलेला असतो. नवीन परिस्थिती उत्पन्न झाली म्हणजे जुना कायदा बदललाच पाहिजे; त्यांत ओढताण करून

नव्या परिस्थितींत फार काळ तो टिकाव धरूं शकत नाहीं. नव्या परिस्थितीला अनुरूप असा कायदा करणें जरूर होतें. हक्कांचे स्वरूप, एतद्विषयक कल्पना, बदलत जातात. त्यांचें स्वरूप बदलतें. नवीन दारू जुन्या बाटलींत घालून भागत नाहीं. स्फोट टाळावयाचा असेल तर अनुरूप पात्र निर्माण केलें पाहिजे. नवी परिस्थिती, नवे संकेत, नवे विचार, नवीं मूल्यें लक्षांत घेऊन त्यांना अनुरूप असें वर्तन करण्यांत, मान्यता देण्यांत तदनुरूप कायदे करण्यांतच विद्यमान सरकारची प्रतिष्ठा आहे. त्याचप्रमाणें नव्या परिस्थितीला, नव्या वस्तुस्थितीला अनुरूप असे हक्क मागण्यांतच ते मिळण्याचा व योग्य समजले जाण्याचा संभव असतो.

समाजहेतु लक्षांत घेऊन त्याचे सिद्धर्थ उपयोगी पडतील म्हणून तर ते हक्क, अशी व्यापक भूमिका त्यांचे मागें आहे हें वर सांगितलें आहे. ते उपयोगी आहेत तथापि, विद्यमान सत्तेनें प्रचलित ठेवलेल्या हितसंबंधांना म्हणजे विद्यमान कायदेप्रणालीला ते विरोधी असूं शकतील. विद्यमान परिस्थिती लक्षांत घेऊनच उपयोगी म्हणून या हक्कांची मागणी उत्पन्न झालेली असते. तथापि, जुने हितसंबंध कायद्याची ढाल घेऊन शांतता व सुव्यवस्था राखण्याचें निमित्त करून प्रचलित सरकारचे मार्फत विरोध करीत असतात, त्यांना मान्यता मिळूं नये म्हणून प्रचंड खटाटोप करीत असतात. बदललेल्या परिस्थितींत चालू असलेली राजकीय व्यवस्था निरर्थक झालेली असते, निदान ती अपुरी पडलेली असते. नव्या आकांक्षांना ती साद घालूं शकत नाहीं. समाजांतील व्यवहार बेसूर होतो, बदसूर होतो. साम्राज्यांतर्गत स्वराज्याची आकांक्षा, कायदेमंडळें अधिक संख्येनें लोकप्रतिनिधींचीं करण्यानें तृप्त होत नाही. स्वातंत्र्याची आकांक्षा, अर्धवट जबाबदार अशा प्रांतिक स्वायत्ततेनें पुरी होत नाहीं व संपूर्ण स्वातंत्र्याची आकांक्षा साम्राज्यांतर्गत स्वराज्यानें पुरी होत नाहीं. वस्तुस्थितीशीं व्यस्त प्रमाणानें वागण्यांत ती स्थिर होत नाहीं, निर्जीव होत नाहीं. उलट, अधिक हुकुमी होत जाते. अमेरिकेंतील वसाहतींनीं फक्त जनतेच्या प्रतिनिधींचे संमतीशिवाय कर बसवूं नयेत अशी मागणी केली होती. वस्तुस्थितीनें ती निर्माण केली होती. वांकडे वागून ती सुधारली नाहीं तर ती अधिक बळावली व शेवटीं वसाहती स्वतंत्र झाल्या. मानवी तृष्णा कधीं तृप्त होत नाहींत. मिळालें कीं मनुष्याचें मन अधिक मागतें. तीच गत अगर तोच स्वभावधर्म हक्कांचा आहे. मान्यता मिळाली कीं, तृप्ति न होतां नवीन हक्क समाजांत उत्पन्न होतात. अमुक ठिकाणीं क्षितिज संपेल असें मानावें व तेथें जावें तों पुन्हा तें दूरच अशी स्थिति

राज्याची होते. मान्यता दिली कीं हें प्रकरण संपेल असें वाटतें, पण अरबी भाषेंतील सुरस गोष्टीप्रमाणें लागलीच नवीन गोष्ट सुरू होते. आणि तसें न झालें तर हा समाज-पुरुष झोपीं जाईल !! तो जागृत राहावा, दक्ष राहावा म्हणून तर सर्व उद्योग. राज्यानें, राज्यसत्तेनें म्हणून वस्तुस्थितीशीं वांकडे न वागतां व्यस्तवृत्तीनें न वागतां, तिच्याशीं अनुरूपवृत्तीनेंच वागलें पाहिजे. मान्य केलेले व मान्यतेसाठीं आतुर झालेले अशा द्विविध हक्कांच्यामध्यें, राज्य उभें असतें. पाटावर बसलेल्यांना कांहीं तरी घातलें पाहिजे नाहीं तर ते रागावतील व दाराशीं उभे असलेल्यांना फार वेळ ताटकळत ठेवलें तर ते कोपतील अशा स्थितींत सांपडलेल्या यजमानाप्रमाणें राज्याची स्थिति असते. ज्या प्रमाणांत राज्य नव्या आकांक्षांना, नव्या हक्कांना समवृत्तीनें जुळवून घेईल त्यावरच त्याची प्रतिष्ठा व यथार्थता अवलंबून आहे.

नवे हक्क, नव्या आकांक्षा समाजहेतुसिध्यर्थ उपयोगी म्हणून त्यांना मान्यता असावी असें म्हटलें; पण उपयोगी असें नुसतें म्हणून भागत नाहीं. कोणाला उपयोगी असा प्रश्न उपस्थित होतो. राज्यांतील प्रत्येक नागरिकाला व्यक्तिविकासाचा हक्क आहे व प्रत्येकाचा हा हक्क सारखाच मौलिक आहे. अशा मौलिक हक्कांना, ह्मणजे जे सर्वांच्या उपयोगासाठीं आहेत, त्यांनाच मान्यता मिळाली पाहिजे, व वस्तुतः तेच खेर खेर हक्क आहेत. जे सर्वांच्या उपयोगी नाहींत ते यथार्थपणें हक्कच होऊं शकत नाहींत. भाषणस्वातंत्र्य जर अधिकारीवर्गालाच असेल तर तो हक्क कसा म्हणतां येईल ? पंचांमार्फत चौकशी व्हावी हा हक्क फक्त विशिष्ट लोकांनाच दिला तर तो सार्वजनिक हक्क कसा मानला जाईल ? जें असेल तें सर्वांना असलें पाहिजे, नाहीं तर कुणालाहि नसलें पाहिजे. राज्याचा संबंध जें सार्वजनिक आहे त्याच्याशीं आहे. जें सार्वजनिक आहे त्यांत सर्वांना सारखा हक्क असला पाहिजे. कोणतें कार्यक्षेत्र सार्व-जनिक हें राज्यानें ठरवावयाचें असतें. सार्वजनिक हक्क मान्य करून त्याला मर्यादा घालणें हें चूक आहे. मनुष्यांत कांहीं समान आहे म्हणून तर समाज अस्तित्वांत आला. व्यक्तिव्यक्तींत जरूर फरक आहे. तथापि, कांहीं विशिष्ट परिस्थितींत सर्व माणसें सारखींच वागतात. ही परिस्थिती लक्षांत घेऊन राज्यानें धोरण आंखणें जरूर आहे. राज्यानें आपल्या धोरणानेंच नागरिकानागरिकांत फरक केला तर तें वर्तन सार्वजनिक हिताचें ठरणार नाहीं. मालमत्तेच्या मालकीबाबत विषम कायदे केले अगर जातिविषयक, अगर धर्मविषयक फरक करून धोरण आंखलें तर ज्यांना त्या धोरणा-पासून अधिक फायदा झाला त्यांनीं निष्ठा दाखविली तरी ज्यांना नुकसान पोहोंचलें

अगर ज्यांना कमी फायदा झाला त्या नागरिकांची निष्ठा तितकी तीव्र राहाणार नाहीं. उलट या विषमतेच्या धोरणामुळें जे वंचित झाले त्यांच्या निष्ठेवर पूर्वी इतका नैतिक हक्क राज्याचा राहाणार नाहीं. एकाचे हितासाठीं जरूर आहे म्हणून जेथें राज्य त्याला देतें व इतराला तें देत नाहीं, तेथें ज्यांना मिळत नाहीं ते राज्याचे दृष्टीनें साहजिकच हिणकस, अपूर्ण असे नागरिक ठरतात. किंबहुना हा भाव राज्य आपल्या वरील कृतीनें उत्पन्न करीत असतें व त्याचबरोबर आपली नैतिक प्रतिष्ठा व अधिकार घालवीत असतें. निष्ठेमागील नैतिक भूमिका जाऊन केवळ सत्तेचे जोरा-वर नागरिकाला कायदा मान्य करण्यास तें प्रवृत्त करीत आहे असाच अर्थ त्यांतून निघतो. सत्ता हें कठोर सत्य आहे याची जाणीव उत्पन्न होते.

नागरिकांनीं राज्याकडे हक्क मागावेत, राज्याविरुद्धही मागावेत व राज्यानें त्यांना मान्यता द्यावी व ज्यायोगें नागरिकांना स्वतःचा विकास करतां येईल अशी परिस्थिती समाजांत निर्माण करूं द्यावी हें सर्व ठीक आहे. तथापि इतकें करून नागरिकाची उन्नति होईल, त्याचा विकास होईल, त्याचें जीवन परिपूर्ण झालें असें त्याला वाटेल अशी मात्र कोणी ग्वाही देऊं शकणार नाहीं. त्याच्या उन्नतीला आव-श्यक अशी सामाजिक परिस्थिती फक्त राज्य उत्पन्न करील, त्या दृष्टीनें असलेले अडथळे अगर अडचणी तें दूर करील. कोणत्या अडचणी असूं शकतील, कोणते अडथळे उत्पन्न होतील याचा विचार मागील अनुभव लक्षांत घेऊन राज्य करील. कोणते हक्क नाकारले असतां आपत्ति उत्पन्न होतात याचा अनुभव राज्यसत्तेला असतो. राज्यव्यवस्थेशीं सर्व लोकांचा संबंध व संमति नसेल तर ज्यांचा संबंध आहे व ज्यांच्या सल्ल्यानें ती होत आहे, त्यांचें हित प्रायः साधलें जातें हा अनुभव प्रसिद्ध आहे. म्हणून राज्यकारभाराशीं सर्वांचा संबंध आला पाहिजे, सर्वांना त्यांत आपला अधिकार आहे असें वाटलें पाहिजे, आपलें कांहीं त्यांत आहे अशी जाणीव उत्पन्न झाली पाहिजे व हें व्हावें म्हणून केलेली मागणी नाकारल्यास आपत्ति उत्पन्न होईल याची जाणीव राज्यकर्ते यांना असली पाहिजे. असें असेल तर लोकशाही व्यवस्थेंत स्थैर्य राहील, तिचा पाया भक्कम राहील. कांहींना राज्यकारभारांत हक्क आहे, कांहींचेंच ऐकलें जातें, कांहींचेच हात अधिकाऱ्यांपर्यंत पोहोंचतात, असें असेल तर जे अलिप्त राहिले अगर ठेवले गेले, त्यांचें हितसंरक्षण केव्हांही पूर्णपणें होणार नाहीं, त्यांच्या विकासाला पूर्ण वाव कधींही मिळणार नाहीं. आपण ज्यांचें ऐकलें जातें त्यांच्यापेक्षां सर्वतोपरी कमी नसतां, बाजूला मारले जावे ही भावना त्यांच्यांत उत्पन्न

होणें अपरिहार्य आहे व तसें झालें म्हणजे मन साहजिक उद्विग्न होतें व कार्य करण्याकडे तें धांव घेत नाहीं; त्याचें समाधान नाहींसें होऊन तें अस्वस्थ होतें. हा समाजाचे दृष्टीनें नैतिक तोटाच आहे, व त्यायोगें समाजाचेंही स्वास्थ्य व स्थैर्य धोक्यांत असतें. उलट, राज्यकारभाराशीं राज्यव्यवस्थेशीं, सर्वांचा संबंध आहे, सर्वांना त्यांत आपलें ऐकलें जातें, आपल्याला असा कांहीं अधिकार आहे, असें वाटत असलें, निदान कोणालाही इतरांपेक्षां जादा अधिकार नाहीं अशी खात्री असेल तर त्या व्यवस्थेंत कोणाही नागरिकांत उणेपणाची भावना नसते, त्यांच्या प्रवृत्ति प्रसन्न राहतात, त्यांची मनें कार्यप्रवण होतात, हा अनुभव इतिहासांत पाहाण्यास मिळतो. व्यापक अर्थानें इतिहास म्हणजे जगाचा भविष्यदर्शकच आहे. निश्चितपणें माणसें काय प्रयत्न करतील, त्यांच्या प्रवृत्ति कशा रीतीनें ते प्रकट करतील हें तो सांगूं शकणार नाहीं. तथापि, राज्यकर्ते विशिष्ट प्रकारें वागले तर प्रजा विशिष्ट प्रकारें वागते हा पुरावा इतिहास देत असल्यामुळें, राज्यकर्त्यांच्या आजच्या बर्तनाचा परिणाम काय होईल, हें त्याचे साक्षींतून कळून येतें. भूतकाळ वर्तमानाचे मार्फत भविष्य निर्माण करतो इतकें जरी सनातनी मार्क्सवाद्यांप्रमाणें मानलें नाहीं तरी इतिहासाचे साहाय्यानें उद्यांचें भविष्य थोडें तरी आज वर्तवितां येतें येवढें म्हटलें तरी चालेल. इतिहासाचें हें महत्त्व लक्षांत घेऊन, त्यापासून सर्वसामान्यपणें काय हक्क असावेत याची कल्पना करतां येईल. त्याची स्मृति स्थूलमानानें रचतां येईल. त्यांत फरक होईल पण त्याचें स्वरूप या स्मृतीशीं जुळणारें असावें लागेल तरच तें योग्य ठरेल व मान्य होईल.

सर्वसामान्यपणें हक्क काय असावेत, त्यांचें स्वरूप काय असावें हें आजपर्यंतच्या इतिहासावरून ठरवितां येण्यासारखें आहे हें वर सांगितलें. पण हे सर्व हक्क अगर या सर्व मागण्या एकतर्फी आहेत असें मात्र नाहीं. हक्क अगर अधिकार या बरोबरच तन्निर्मित कर्तव्यें यांचा उगम होतो. मनुष्याबरोबरच त्याची सावली जशी अपरिहार्य त्याचप्रमाणें हक्क व जबाबदारी, अधिकार व कर्तव्य यांचे संबंध आहेत. माझे व्यक्तित्वाला वाव मिळाला पाहिजे, मला जरूर तें संरक्षण मिळालें पाहिजे हा माझा हक्क आहे. समाजांतील नाना उलाढालींत माझें म्हणून जें विशिष्ट आहे, जें माझें स्वत्व आहे तें संरक्षित ठेवलें गेलें पाहिजे हा माझा हक्क आहे. नाण्याप्रमाणें शिक्का मारलेलीं सर्वांचीं जीवनें राज्यसत्ता सारखीं करूं लागली तर व्यक्तींचें वैशिष्ट, त्यांचें स्वत्व नाहींसें होईल. त्याविरुद्ध व्यक्तींना संरक्षण पाहिजे, समाजाप्रमाणें व्यक्तीलाहि 'अस्मीता' आहे व ही एक प्रगमनशील शक्ति आहे. या सर्वांचें संरक्षण

व्हावें व तें राज्यानें करावें असें जेव्हां म्हटलें जातें त्याच वेळीं संरक्षणाचा हक्क सांगणारी व्यक्ति, त्या राज्याची एक घटक आहे, एक प्रजाजन आहे हें उघड होतें. इतकेंच नव्हे, तर हे हक्क प्रजाजन आहे, घटक आहे म्हणूनच व्यक्तीला मिळावयाचे असतात. समाजाला सोडून या हक्कांना जागा नाहीं. समाजांत स्थान आहे म्हणून हक्क, सभासदत्व आहे म्हणून अधिकार. समाजापासून ते स्वतंत्र नाहींत, समाजान्तर्गत ते आहेत. समाज आहे म्हणून हक्क आहेत. समाजच नसला तर कोण कुणाविरुद्ध हक्क सांगणार ? हक्क पाहिजे असतील तर समाजही अवश्य पाहिजे; मग समाजानें राहावें म्हणून त्याचे तरी कांहीं हक्क असलेच पाहिजेत व ते मान्य केले पाहिजेत हें अगदीं योग्य आहे. व्यक्ति व समाज या दोघांनाही उभयतांचे संरक्षणार्थ हक्क आहेत. मला व्यक्तिविकासाला वाव पाहिजे तसा इतरांनाही पाहिजे. माझ्या एतद्‌विषयक हक्कांवर गदा येऊं नये म्हणून समाजानें राज्यामार्फत संरक्षण दिलें पाहिजे, तसें सर्वांना मिळालें पाहिजे. अतिक्रमण दुसऱ्यानें करूं नये म्हटल्याबरोबर स्वतःही तें करूं नये हें कर्तव्य ठरतें. मला संरक्षण पाहिजे म्हणून मीही इतरांचे हक्कांवर गदा आणतां कामा नये, अतिक्रमण करतां कामा नये व ही दृष्टि ठेवून वागणें माझें कर्तव्य ठरतें. मला शिक्षण पाहिजे हा माझा हक्क व मला तें मिळाल्याबरोबर सामाजिक हिताचे दृष्टीनें त्याचा उपयोग करणें हें माझें कर्तव्य ठरते. व्यक्ति ही उभयविध स्वरूपाची आहे, केवळ व्यक्तिही आहे व सामाजिक वस्तुही आहे. शिक्षण घेऊन मनावर होणारे परिणाम हे व्यक्तिगत पण त्यापासून होणारे वर्तनांतील परिणाम हे सामाजिक. गाणारा स्वतःला आनंदवीत असतो पण भोवतालच्या समाजालाही आनंदवीत असतो. व्यक्ति ही केवळ व्यक्तीसाठीं नाहीं, केवळ समाजासाठींही नाहीं. पण त्याजबरोबर समाज अगर राज्य हीं कांहीं एकाच व्यक्तीसाठीं नाहीं. समाजाचें ध्येय असेल, जें सर्वांच्या हिताचें असेल तें साध्य व्हावें म्हणून होणाऱ्या प्रयत्नांत व्यक्ति भाग घेते म्हणूनच तिला हक्क, म्हणूनच अधिकार. या हक्कांचा, या अधिकारांचा हेतु वरीलप्रमाणें व्यक्तीनें भाग घ्यावा, आपलें सामाजिक कर्तव्य बजावावें हा आहे. ही व्यक्तीला मिळालेली सत्ता समाजाचे हिताविरुद्ध उपयोग करण्यासाठीं नाहीं. व्यक्तीचे विचार, तिच्या भावना, तिचें वर्तन यांनीं मिळून तिचें व्यक्तित्व बनलेलें असतें. या व्यक्तित्वामुळें राज्यानें आपला व्याप कोठपर्यंत पसरावा याला मर्यादा उत्पन्न होते. व्यक्तींच्या जीवनांत सर्वशः राज्य प्रवेश करूं लागेल तर सर्व जीवन शिक्केबाजीचें होईल. व्यक्तींच्या विविध अनुभवांचा समन्वय करून राज्य चालत असेल तरच

त्यांत व्यक्तींना आपलें असें कांहीं वाटेल व ही जाणीव समाजांत असण्यांतच राज्याचें स्थैर्य व यथार्थत्व आहे. ही जाणीव उत्पन्न व्हावयाची तर व्यक्तीचें व्यक्तित्व असें राज्यानें संरक्षिलें पाहिजे. तसें केलें म्हणजे राज्यानें व्यक्तीचे व्यक्तित्वाला किती मर्यादा घालावयाची किंवा या व्यक्तित्वानें राज्याचा व्याप कोठपर्यंत येऊन द्यावयाचा हें ठरलें पाहिजे. व्यक्तीला ही दिलेली समाजान्तर्गत अगर राज्यान्तर्गत स्वायत्तता व्यक्तीचें व समाजाचें हित यांत विरोध उत्पन्न न होऊं देण्याचेच शर्तीवर, व सामाजिक हेतु लक्षांत ठेवून व्यक्ति आपलें हित साधतांना सामाजिक हित साधील याच श्रद्धेवर दिलेली असते असें मानण्यास हरकत नाहीं. या संकेतानुसार व्यक्ति व राज्य यांच्यातील संबंधाच्या मर्यादा निश्चित होतील, व यालाच अनुसरून नागरिकांचे अधिकार अगर हक्क व तन्निर्मित कर्तव्यें यांचें स्वरूप राहील.

हक्क अगर अधिकार हे कांहीं ब्रह्मप्रमाणें निर्गुणनिराकार नाहींत. कर्तव्याशीं ते बांधले गेले आहेत व कार्याचे स्वरूपानेंच ते प्रकट होत असतात. समाजाशीं कांहींही संबंध नाहीं असें हक्कांचे स्वरूप नाहीं. ते बजावावयाचे असतात, त्यांचा उपभोग घ्यावयाचा असतो म्हणून तर ते आहेत व हवे आहेत व त्यांचा उपभोग समाजहिताविरुद्ध होऊं नये ही त्यांवर मर्यादा आहे. इतकेंच नव्हे तर व्यक्तीनें समाजाचें ध्येय साधण्याचे दृष्टीनें त्यांचा उपयोग करावा हा त्यांचा हेतु आहे. असामाजिक अशी कृति करण्याचा व्यक्तीला हक्क नाहीं. श्रम न करतां कांहींही व्यक्तीला घेण्याचा हक्क नाहीं. दुसऱ्याचे श्रमानें केलेली वस्तु निदान कांहींही मोबदला न देतां घेणें ही असामाजिक कृति आहे. कांहीं तरी समाजाला द्यावें व मग घ्यावें, मगच घेण्याचा हक्क आहे, हें खरें हक्काचें स्वरूप आहे. कांहींतरी सामाजिक कार्य मिळालेल्या हक्कांची किंमत म्हणून, मोबदल्यांत म्हणून व्यक्तीचे हातून झालें पाहिजे. किंबहुना सामाजिक कार्य करीतच व केलें तरच हा हक्काचा उपभोग त्यानें घेतला पाहिजे. कांहीं तरी भर समाजाचे जीवनांत आपल्या कृतीनें, व्यक्तीनें टाकली पाहिजे. जन्मानें लोकसंख्येंत भर टाकली पण हें श्रेय त्याला नाहीं. त्यानें स्वतःचे कृतीनें समाजजीवन अधिक सुखी केलें पाहिजे. या दृष्टीनें त्यानें समाजांत राहिलें पाहिजे. सुखालागिं आरण्य सेवन केल्यानें, त्यानें समाजाचे सुखांत भर टाकली असें होत नाहीं. समाजाचें सुख कशांत आहे, काय केलें असतां समाजजीवनांत अधिक आनंद, अधिक प्रसन्नता येईल, हें कळणें अवघड नाहीं. समाजाचें ऋण व्यक्तीनें फेडलें पाहिजे, कर्तव्यें करून हक्काचा मोबदला पटविला पाहिजे, व तो स्वतः कृतीनें. त्यानें हरिजन होऊन समाजाचें आरोग्य राखावें, विद्वान् होऊन समाजाचे ज्ञानांत भर

टाकावी, कांहीं तरी कार्य करून ऋण फेडावें. असें कांहीं कार्य करीत आहों म्हणूनच समाजानें हक्क व अधिकार दिले आहेत याची जाणीव ठेवून व्यक्तीनें तें कार्य करावें. कार्य करणार नाहीं तर व्यक्तीला हक्कही असतां कामा नये. जो श्रम करील त्यानेंच आराम घ्यावा, जो झिजेल तोच जेवील. व्यक्ति जें या दृष्टीनें सामाजिक कार्य करील त्यावरच तिची उपयुक्तता व महत्त्व मोजलें पाहिजे. व्यक्ति ही सामाजिक आहे व तिला सामाजिक असें कर्तव्य आहे, असें ती मान्य करीत नसेल तर तिला नागरिकत्वाचा हक्क नाहीं हा मौलिक सिद्धांत आहे.

वरील दृष्टीनें विचार करतां व्यक्तीला वाटेल तें करण्याचा अधिकार नाहीं. जे कांहीं हक्क अगर अधिकार आहेत ते जें सामाजिक कार्य समाजहितासाठीं ती व्यक्ति करीत असेल त्यावर आधारलेले व त्याला अनुसरूनच असणार; तसेंच जे हक्क व्यक्ति सांगेल ते त्याचे सामाजिक कार्य चांगल्या रीतीनें पार पाडण्यासाठीं आवश्यक आहेत असें त्यानें शाबित केलें तरच मिळणार. कांहीं तरी स्पष्ट असें सामाजिक कार्य व्यक्ति करीत आहे व त्यासाठीं जरूर म्हणून कांहीं अधिकार तिला पाहिजेत, अशा परिस्थितींतच ते दिले गेले पाहिजेत, त्यांना राज्यानें मान्यता दिली पाहिजे. व्यक्तीनें काय सामाजिक कार्य करावें हें ठरविण्यास तिला वाव असला पाहिजे. वर्णाश्रम धर्माप्रमाणें, जन्माबरोबर तिचें सामाजिक कर्तव्य ठरतां कामा नये. क्षत्रियानें लढावें म्हटलें म्हणजे त्याच्या जन्माकडेच पाहून; त्याची शरीरयष्टि, त्याची ताकद याचा विचारच तत्त्वतः होत नाहीं. ब्राह्मणानें त्याची पात्रता असो वा नसो ज्ञान, तपादिक गोष्टी करव्यात हें सांगणें म्हणजे व्यक्तीला व्यक्ति म्हणून क्रियास्वातंत्र्य नाहीं असें सांगण्यासारखें आहे. थोरल्या बाजीरावानें त्रिसुपर्ण म्हणण्यापेक्षां तलवार चालविणें पसंत केलें यांत वर्णाश्रमव्यवस्थेप्रमाणें अधर्म झाला, पण राष्ट्राचा फायदा झाला. व्यक्तीला आपलें सामाजिक कार्य निश्चित करण्यासाठीं स्वातंत्र्य दिलें पाहिजे, त्यांत समाजाचें हित आहे. व्यक्तीला त्याच्या प्रवृत्तींना अनुसरून कार्याची निवड करण्याचा पूर्ण अधिकार असला पाहिजे. प्रत्येकाचें कांहीं स्वाभाविक कर्म आहे, याचा अर्थ अन्य प्राण्याप्रमाणें तें जन्मानें नियत केलें आहे असा नव्हे. त्याच्या ज्या प्रवृत्ति आहेत त्याला अनुसरून, त्यांचा विकास लक्षांत घेऊन तो जें करील तें स्वाभाविक व त्यांत त्याला यश मिळेल. समाजांत कार्यानें आपलें स्थान मिळविण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे. व्यक्तीला आपल्यांतील शक्ति, लायकी पडताळून पाहाण्याची, त्याबाबत प्रयोग करून पाहाण्याची मुभा असली पाहिजे. स्वतःचे अनुभवानें त्यानें आपलें स्थान शोधून काढलें पाहिजे. स्वे स्वे कर्मणि रत

राहिल्यानें मनुष्याला सिद्धी मिळतें याचा अर्थ प्रत्येकानें आपलें कार्य आपल्या प्रवृ-त्तींना अनुसरून हुडकून काढलें पाहिजे. वस्तुतः व्यक्तीच्या प्रवृत्ति, व्यक्तीचा अनुभव ही त्याची अशी संपत्ति आहे. त्याचा विनियोग कसा करावा हें ठरविण्याचा प्रायः हक्क त्याचा आहे इतकें तरी मान्य केलें पाहिजे. आपला अनुभव, आपल्या प्रवृत्ति काय आहेत हें स्पष्ट करण्याइतकी पात्रता व्यक्तिमात्रांत असली पाहिजे. जीवनाचा विकास होत असतांना व्यक्तीला भावना व्यक्त करण्याला वाव पाहिजे, आपल्या इच्छा समाजापुढें मांडतां आल्या पाहिजेत, आकांक्षांना स्पष्ट करतां आलें पाहिजे. प्रत्यक्ष कार्य व्यक्ति कोणतेंही करो, परन्तु प्रत्येक व्यक्तीला वर लिहिल्याप्रमाणें करतां येण्यास अवश्य असे अधिकार अगर हक्क पाहिजेत व हे हक्क सर्व व्यक्तींना किमान म्हणून असले पाहिजेत. इतक्यापुरती सर्वांची गरज सारखी आहे. प्रवृत्तींना अनु-सरून विविध कार्यें विविध व्यक्ति करतील, परन्तु प्रथम सर्वांना आवश्यक अशी किमान परिस्थिती राज्यानें निर्माण केली पाहिजे. प्रवृत्तीप्रमाणें मुलें जमेल तो खेळ खेळतील, पण सर्वांना खेळासाठीं जरूर असें मैदान मात्र किमानपक्षीं शाळेनें उप-लब्ध केलें पाहिजे. राज्यानेंही पराक्रमाला मोकळें मैदान दिलें पाहिजे व तेथें कोणा-लाही प्रवेशबंदी नसली पाहिजे.

सर्व लोकव्यवहार समाजाचे सुखासाठीं आहे. समाजाचें सुख म्हणजे समाजा-तील व्यक्तीचे सुखावरच आधारलेलें असणार. म्हणून अधिकारांचा अगर हक्कांचा विचार करतांना व्यक्तीला प्राधान्य देणें योग्य ठरतें. व्यक्तीला यामुळें समाजहिता-विरुद्ध हक्क प्राप्त होतो असें मात्र नाहीं. समाजहिताविरुध्द हक्क देणें म्हणजे व्यक्तीला त्याचे हिताविरुध्दच तत्त्वतः हक्क देणें असें होतें. कारण समाजहितांत त्याचें हित समाविष्ट असतें, समाजहिताचा व त्याचे हिताचा समन्वय झालेला असतो. समाजहिताविरुध्द जरी व्यक्तीला हक्क नसले तरी राज्याविरुध्द तिला हक्क नाहींत असें मात्र नाहीं. तत्त्वतः राज्य म्हणजे समाजसंघटनेचें राजकीय स्वरूप हें खरें असलें तरी वस्तुतः राज्य म्हणजे विद्यमान सरकार व विद्यमान सरकार म्हणजे प्रत्यक्ष सत्ता हातांत असलेले अल्पसंख्य लोक. या मूठभर लोकांनीं अनिर्बंधितपणें नागरिकांना काय हक्क असावेत, काय अधिकार असावेत हें ठरविणें अयोग्य आहे. हे राज्यकर्ते विद्वान असतील, कार्यक्षम असतील, पण ते स्खलनशीलही आहेत, चुकीला पात्र आहेत, कारण तीं सर्व माणसें आहेत. त्यांचें म्हणणें, सत्तेचें म्हणणें म्हणून सत्य हें खोटें आहे. सत्तेचें निरपेक्ष लक्षण सत्य नव्हे. मध्ययुगांत राज्यसत्तेनें प्रचलित श्रद्धेविरुद्ध म्हणून अनेक सत्यें दडपून टाकलीं. राज्यसत्तेविरुद्ध बोलण्याचा,

सनातनधर्माविरुद्ध बोलण्याचा व्यक्तीचा हक्क राज्यसत्ता पूर्वी मान्य करण्यास तयार नसे. हल्लींचीं सरकारें तो तत्त्वतः मान्य करून व्यवहारांत त्याला दडपून टाकतात. सत्य तें सांगण्याचा हक्क बजावीत असतां प्राचीन काळीं सॉक्रेटिस आत्माहुति देऊन अमर झाला. सत्य तें सांगण्याचा व्यक्तीचा हक्क राज्यसत्ता दडपून टाकूनच सत्याला चिरंजीव करीत असते. सत्याची अमरज्योति कायम जगाला प्रकाश देत राहावी म्हणून अनेकांनीं स्वतःचें बलिदान केलें आहे. सत्याग्रहींचे मृत्यूनेंच सत्य जिवंत राहातें, तें अमर होतें. राज्यसत्तेलाच फक्त सत्य काय आहे हें ठरविण्याचा हक्क नाहीं. तसे आहे असें मानलें तर मूठभर लोकांनाच तो हक्क आहे असें होतें. त्यांचे अनुभवाचें क्षेत्र अल्प, त्यांची दृष्टिही मर्यादित असणार; या स्थितींत त्यांचें मत श्रेष्ठ अगर सत्य मानणें अयोग्य आहे. राज्यसत्ता त्यांचे हातांत आहे म्हणून सर्वज्ञता त्यांचे बुद्धींत आहे असें नाहीं. या परिस्थितींत त्यांचें म्हणणें योग्य नाहीं; चुकीचें आहे हें म्हणण्याचा हक्क व्यक्तीला आहे व असला पाहिजे. राज्याला व्यक्तिविरुद्ध हक्क आहेत. एका व्यक्तीनें अधिकार उपभोगतांना दुसऱ्या व्यक्तीचे अधिकारावर अतिक्रमण होणार नाहीं अशी वर्तणूक प्रत्येक नागरिकानें ठेवली पाहिजे, हे सांगण्याचा व त्याप्रमाणें न झाल्यास शासन करण्याचा अधिकार राज्याला आहे व असला पाहिजे. कारण राज्याचे दृष्टीला सर्व नागरिकांचे हक्क सारखेच महत्त्वाचे असले पाहिजेत. दुसऱ्याचे हक्कांवर गदा येईल असा कुठलाही अधिकार अगर हक्क राज्यानें मान्य करतां कामा नये. कारण अशी विषमता जर राज्यानें आपल्या व्यवस्थेनें व वर्तनानें उत्पन्न केली तर कांहीं व्यक्तींना उणेपणा येईल व त्यायोगें व्यक्तीचे उन्नतीस व समाजाचे उन्नतीस अडथळा उत्पन्न होईल; समाजांत अन्याय होत आहे ही भावना वाढून समाजाचे स्थैर्यास धोका उत्पन्न होईल. व्यक्ति व राज्य यांनीं एकमेकांविरुद्ध असलेले व एकमेकांवर असलेले हक्क सर्व लोकांचें हित ज्यांत साधलें जाईल त्या दृष्टीनें सांगितले पाहिजेत व त्याच दृष्टीनें बजाविले पाहिजेत. याच कसोटीनें त्यांची उपयुक्तता व योग्यता ठरत असते.

वरील दृष्टि ठेवून विद्यमान सरकार वागेल अगर न वागेल, सार्वजनिक हिताची त्याची कल्पना बहुसंख्यांक लोकांचे कल्पनेशीं जुळणार नाहीं; वर्गहिताला, वर्गस्वार्थाला तें सार्वजनिक हिताची प्रतिष्ठा देईल. पण विद्यमान सरकारनें कांहींही केलें तरी समाजाचा आत्मा जो व्यक्ति त्यानें आपलें कर्तव्य बजावलें पाहिजे, आपले अधिकार निर्भयपणें सांगितले पाहिजेत. व्यक्तीला जें यथार्थपणें सार्वजनिक हिताचें वाटतें तें सांगितलें पाहिजे. तें सरकार मान्य करीत नसेल तर तें त्यानें मान्य करावें म्हणून

प्रयत्न व्यक्तीनें केले पाहिजेत. हे प्रयत्न करण्यांत राज्यसत्तेला विरोध करावा लागेल. तिच्या सामर्थ्याशीं व सामुग्रीशीं टक्कर द्यावी लागेल. कदाचित् जबर किंमत देऊन व्यक्तीला यशही मिळेल पण अपयश मिळणें व जबर निराशाच वांट्याला येणें हें जास्त शक्य आहे. तथापि, हें सर्व दिसत असलें तरी हा खरा नागरिकधर्म; हा श्रेष्ठ धर्म आचारावयाचा कीं नाहीं हें व्यक्तीनें स्वतः ठरविलें पाहिजे. सत्य पटून त्या-प्रमाणें न वागल्यास सत्याला सत्तेचें दास व्हावें लागेल हें विसरून भागणार नाहीं. जेथील नागरिक सत्य पटून गप्प बसतील, ते स्वतःचा अधःपातच करतील. सत्तेच्या आज्ञा योग्यायोग्य विचार न करतां निमूपटपणें पाळण्याची संवय एकदां झाल्यास त्या समाजाचा अधःपात कायमचा झाला असेंच अनुभवास येतें. म्हणून जें राज्य-सत्तेनें करावें, जें हवें आहे तें राज्यसत्तेनें घडवून आणावें, जो आदर्श राज्यसत्तेनें आपलेपुढें ठेवावा असें व्यक्तीला वाटतें, त्या आदर्शाला अनुसरून व्यक्तीनें आपलें कर्तव्य बजाविलें पाहिजे. आहे हें ठेवणें हें व्यक्तीचें कर्तव्य ठरत नाहीं. कारण त्या व्यतिरिक्त समाजहिताचे दृष्टीनें तिला कांहीं तरी निराळें हवें आहे असें वाटतें. निराळा आदर्श तिनें आपले पुढें ठेवलेला असतो. निराळा आदर्श ठेवल्याबरोबर तो साध्य करण्याचा प्रयत्न करण्याची नैतिक जबाबदारी व्यक्तीवर येतेच. इतकेंच नव्हे तर प्रसंगीं राज्यसत्तेवर अगर विरुद्ध सांगितलेल्या हक्कांना, नैतिक प्रतिष्ठा व योग्यता प्राप्त करून घ्यावयाची असेल तर राज्यसत्तेला विरोध करणें हें व्यक्तीचें अपरिहार्य कर्तव्यकर्म ठरतें. हे प्रसंग केव्हां उद्भवतात हें समाजांतील परिस्थिति ठरवील. पंचांग पाहून कोणत्या दिवशीं काव्य करण्यास स्फूर्ति होईल हें कसें सांगतां येईल ? भावनोद्दीपक प्रसंग आला कीं काव्यनिर्मिती होईल. रेल्वेचें वेळापत्रक पाहून गाड्यांची येजा कळते त्याप्रमाणें राष्ट्रांतील घटना कळणें शक्य नाहीं. कारण वेळा-पत्रकाप्रमाणें त्या घडत नाहींत. अमुक नक्षत्रावर क्रांति होईल असें कोणी सांगू शकत नाहीं. राज्यकारणांत तरी पंचांग पाहून भविष्य सांगणाराची फजितीच उडाली आहे. म्हणून राज्यसत्तेला विरोध करण्याचे कर्तव्यकर्म करण्याचा काल केव्हां येईल हें कोणी आगाऊ सांगू शकणार नाहीं. जगांत किती तरी अकल्पित घटना घडून येत असतात. निश्चितपणें येवढेंच म्हणतां येईल कीं, जेथें नागरिकांचे मनांत राज्यव्यवस्थे-बद्दल निष्ठा नाहीं तेथें राज्याला नैतिक अधिष्ठान नाहीं. राज्यसत्तेविरुद्ध सामान्यतः लोक जाण्यास कचरतात. लोकांनीं राज्यसत्तेला विरोध केल्याचे प्रसंग हे थोडेच आढळून येतील. सामान्यतः लोकांची प्रवृत्ति उदासीनपणें चालू व्यवस्था सहन कर-ण्याकडे असते. ते नाखुषीनें पण निमूटपणें सहन करीत असतात. राज्यानें बराच

काळपर्यंत लोकांना मान्य असलेल्या ध्येयानुसार समाजहिताचें व लोककल्याणाचें कांहीं तरी काम केलें तर त्यांची निष्ठा प्रेरक व संमतिपूर्ण होऊं शकते. लोकांची राज्यविषयक उदासीनता ही स्पृहणीय अवस्था नव्हे. लोकांचीं मनें प्रसन्न होत नाहींत त्यांच्या व्यक्तित्वाचा कोंडमारा होत आहे ही स्थिती बराच काळ राहिल्यास समाजांत नैराश्य पसरून त्यांतून स्फोटक वातावरण हळूहळू उत्पन्न होतें. राज्यावरील संकटाची सधीच पाहिजे असते. ती प्राप्त झाल्याबरोबर स्फोट होत असतो. लोकांच्या आकांक्षा दडपून टाकल्यानें, त्यांचे हक्क अगर अधिकार नाकारल्यानें राज्यालासुद्धां लोकांकडून निष्ठा मागण्याचा अधिकार राहात नाहीं. नैतिक अधिकार प्रेरक व संमतिपूर्ण निष्ठेच्याच वातावरणांत राहूं शकतो.

व्यक्ति व राज्य या दोहोंचा संबंध लक्षांत घेऊन एकंदर येथपर्यंत अधिकारमीमांसा केली; पण आधुनिक राज्यांतून व्यक्ति ही व्यक्तिशः व संघशः वागत असते. व्यक्ति ही नागरिक म्हणून तिला अधिकार व हक्क असणें ठीक आहे पण जेथें संघ करून ती वागते व त्यांतून कांहीं सामाजिक कार्य करते त्या वेळीं संघाला म्हणून कांहीं अधिकार आहेत का असा प्रश्न उपस्थित होतो. व्यक्ति संघांत जाते म्हणजे ती आपले गुणधर्म घेऊन जाते. तिचे जे अधिकार आहेत ते टाकून ती जाते अगर संघांत गेल्याबरोबर ते गळून पडतात असें नाहीं. अनेक व्यक्ति एकत्र आल्यानें, संघटित झाल्यानें, एक सामुदायिक भाव उत्पन्न होतो व तो व्यक्तिइतकाच सत्य आहे. संस्था, अशरीरिणी आहे. समष्टीस्वरूप, सामुदायिक स्वरूप यांना शरीर नाहीं पण ह्या सर्वांना अस्तित्व आहे. या सर्व नैतिक वस्तु [ Entity ] आहेत. त्या परिणाम करीत असतात, त्यांतील व त्याबाहेरील व्यक्तींना त्यांचे अस्तित्वाची जाणीव असते. 'लोक काय म्हणतील' हा शब्दप्रयोगच सामुदायिक स्वरूपाचें अस्तित्व शाबित करतो. समूह हा व्यक्तीचा खरा; पण त्याचे असे कांहीं तरी गुणधर्म असतातच. व्यक्तिइतकेच समूहांचे, संघांचे अधिकार व हक्क सत्य आहेत व ते मानणें योग्य आहे. व्यक्ति आपलें जीवन अनेक प्रकारें अनेक समूहांतून, संघांतून पूर्ण करण्याचा प्रयत्न करीत असते. त्यामुळें समाजाला एक संयुक्त व्यवस्थेचें स्वरूप प्राप्त झालेलें असतें. मनुष्य संगतिप्रिय आहे, किंबहुना ही त्याची स्वाभाविक प्रवृत्ति आहे. या प्रवृत्तीला अनुसरून तो वागत असतो, म्हणून केवळ व्यक्ति या नात्यानेंच त्याचे अधिकार मान्य करणें म्हणजे त्याचे व्यक्तित्वाला बांधून टाकल्यासारखें होतें. नागरिक म्हणून हक्क, पण तोच कामगारसंघांत अनेकांबरोबर सामील झाला तर त्याच्या कांहीं प्रवृत्ति त्या संघामार्फत काम करतील. त्यांना वाव द्यावयाचा असेल तर त्या

संघाला वाव दिला पाहिजे म्हणजे संघाला अधिकार असले पाहिजेत, हक्क असले पाहिजेत. तथापि, हे हक्क अगर अधिकार अमर्याद नाहींत. राज्य हें समाजांतील सर्वश्रेष्ठ व सत्ताधीश असें संघटन आहे; समाजांतील सर्व संघांपेक्षां ज्येष्ठ संघ आहे व त्याचा अधिकार इतर सर्वांपेक्षां अधिक व अपूर्व आहे. राज्याचा हा अधिकार लक्षांत घेऊन इतर संघांचे अधिकार ठरत असतात. धर्म व स्वातंत्र्य यांत विरोध आल्यास कांहीं व्यक्ति धर्म श्रेष्ठ मानतील व राज्याला विरोध करतील. धर्माची आज्ञा व नागरिकधर्माची आज्ञा यांत विरोध आल्यास कोणी धर्म श्रेष्ठ मानतील, कोणी नागरिकधर्म श्रेष्ठ मानतील. कामगारसंघानें सार्वजनिक संप पुकारला म्हणून कांहीं त्यांत सामील होतील, तर कांहीं नागरिकांचे हिताचे दृष्टीनें विचार करून त्यांत सामील होणार नाहींत. संघनिष्ठा व नागरिकधर्म यांत विरोध आल्यास व्यक्ति कशा वागतील हें लक्षांत घेऊन या समाजांतील धर्मविषयक, उद्योगविषयक अगर अन्य संघांना किती अधिकार असावेत हें ठरविलें पाहिजे. दिलेल्या अधिकारांचा काय उपयोग होईल हें जाणून अधिकार दिले पाहिजेत, हक्क मान्य केले पाहिजेत.

समाजांतील इतर संघांपेक्षां राज्याचे अधिकार आधीं व अधिक व म्हणूनच त्याची जबाबदारी सर्वांगीण व संपूर्ण आहे. व्यक्तींच्या इच्छांचा व अनुभवांचा समन्वय करून राज्यानें वर्तावें हें जसें श्रेयस्कर तसेंच त्यानें समाजांतील नानाविध संघांच्या कार्यप्रवृत्तींचा समन्वय करून लोकव्यवहार चालवावा हें श्रेयस्कर आहे. किंबहुना हें संकलन करणें, हा समन्वय घडवून आणणें हें राज्याचें एक प्रधान कार्य आहे असें म्हटलें तरी तें योग्य होईल. हें कार्य करीत असतांना संघांना स्वातंत्र्य किती द्यावें व कोठें मर्यादा घालावी हें परिस्थिती पाहून ठरवावें लागेल. उलेमानची जमात हिंदूंनीं अमुक तऱ्हेनें पूजा करणें हें हिंदुधर्माप्रमाणें आहे हें ठरविण्याचा अधिकार सांगूं लागली तर राज्यानें तो हक्क नाकारला पाहिजे. उलट सनातन–धर्म-मंडळ अमुक प्रकारें कुर्बानी करणें मुसलमानी धर्माप्रमाणें आहे हें सांगण्याचा दावा करूं लागेल तर तोही नाकारला पाहिजे. खुद्द राज्याचा सुद्धां धर्मदृष्ट्या अमुक सिद्धांतावर व्यक्तीनें विश्वास ठेवावा, श्रद्धा ठेवावी हें सांगण्याचा हक्क नाहीं. धर्म व राज्य हे मौलिक भूमिकेनें भिन्न आहेत व ते भिन्न असावेत हा आधुनिक राज्य-शास्त्रांतील एक मौलिक सिध्दांत आहे. धर्मावर विश्वास नाहीं म्हणून त्या व्यक्ति-विरुध्द राज्याचे न्यायालयांत काम चालूं नये. राज्याविरुध्द गेल्यास राज्य शासन करील. स्वखुषीनें एकाद्या संघांत सामील झाल्यानंतर तेथील धोरण नापसंत असेल तर संघांतून निघून जावें, पण धोरण बदलण्याचे कामीं राज्याचा उपयोग त्यांना

करतां येणार नाहीं. निष्ठा असेल तर जशी राज्याला नैतिक प्रतिष्ठा, त्याचदृष्टीनें संघाला सभासदांची निष्ठा लाभेल तर त्याला महत्त्व व प्रतिष्ठा. संघाविरुध्द गेल्यानें शासन नाहीं म्हणून निष्ठा दाखवावयाची नाहीं अगर त्याचे निर्णयास जुमानावयाचें नाहीं, असें झालें तर संघ हा एक निर्जीव व निष्क्रिय सांगाडा आहे असें होतें. राज्य हें संघटन सर्व व्यक्तींना संपूर्णपणें अवश्य तें जीवनविषयक वातावरण उत्पन्न करूं शकत नाहीं. म्हणून तर समाजांत नानाविध संघ व संस्था निर्माण होतात. तें जर याप्रमाणें करूं शकेल तर अन्य संस्थांची गरज नाहीं. आजच्या परिस्थितींत हें श्रेष्ठ स्वरूप राज्यानें कुठेंही प्राप्त करून अद्यापि घेतलेलें नाहीं. म्हणून इतर संघांची, संस्थांची आवश्यकता व या आहेत म्हणून समाजांत व्यक्ति व संघ व राज्य असे त्रिविध भाव आहेत व या सर्वांचें नियमन करणें हें राज्याचें एक प्रमुख कर्तव्य ठरतें. जें न्यून तें या दृष्टीनें पुरतें करून घ्यावें लागतें.

आधुनिक राज्यांत पूर्वीपेक्षां व्यक्तीचे सुखाकडे सर्वसामान्यपणें अधिक लक्ष पुरविलें जातें हें खरें आहे. तथापि, विषमताही अजून मोठ्या प्रमाणावर आहे. श्रमाप्रमाणें मेहनताना अद्यापि मिळत नाहीं. समाजांत सुखाची वांटणी अद्यापि इतकी विषम आहे कीं बहुसंख्यांक लोकांना सरासरी जगण्याइतकीसुद्धां साधनसामुग्री लाभत नाहीं. मग त्यांच्या विधायक प्रेरणांना, कर्तृत्वास वाव मिळून जीवन उन्नत व प्रसन्न होण्यास अवसर मिळणें लांबच राहिलें. सकाळपासून संध्याकाळपर्यंत गिरणीच्या आत्मविनाशी वातावरणांत काम करून थकून येणारा मजूर काय वाचणार, काय ज्ञान मिळविणार, त्याला कोणती हौस शिल्लक राहाणार? कचेरींत अर्धपोटीं जाऊन संध्याकाळपर्यंत बेरजा करण्यांत चूर झालेला कारकून आयुष्यांतून सुखाची, प्रसन्नतेची वजाबाकीच करत असतो. कांहीं रचनात्मक अशी कृति करण्याला, आवश्यक तें मानसिक वातावरणच त्याला उपलब्ध होत नाहीं. राज्यव्यवस्था याला जबाबदार आहे. इतकेंच नाहीं तर ज्याला आहे त्याला अधिक देण्यांत व ज्याच्याजवळ थोडें आहे तें अधिक कमी करण्यांत आधुनिक राज्यें कुशल दिसतात. ज्यांच्या हातांत राज्यसत्ता आहे, राज्यसूत्रें आहेत, त्या वर्गाचें अगर त्या अल्पसंख्यांक समूहाचे सोयीचे दृष्टीनें सत्ता वापरली जाते. राज्याचे निर्णय त्यांच्या सोईचे दृष्टीनें होत असतात. ज्यांना कांहीं प्राप्त झालें आहे त्यांना तें ठेवण्याचे दृष्टीनें शासनाचीं यंत्रें फिरूं लागतात. जें आहे, जें विद्यमान आहे तेंच बरोबर, तेंच योग्य हें ठरविण्याची काळजी घेण्यांत येते. शिक्षण व संपत्ति यांच्या वांटणींतील विषमता कमी व्हावी म्हणून जाणिवेनें प्रयत्न होत नाहीं. ज्ञान व धन या दोन्ही साध-

नांचे अभावीं, अगर तीं नाममात्र असल्यामुळें बहुसंख्यांक लोक राज्यकर्ते यांच्यावर परिणाम करूं शकत नाहींत. समाजांत ज्ञान वाढतें असतें, शोध वाढत असतात, परन्तु ह्या ज्ञानाचा वारसा व त्यांत चालू पिढी टाकत असलेली भर याचा फायदा बोटावर मोजतां येईल इतक्याच लोकांना मिळतो. समाजांत उत्पादन वाढत असतें, संपत्ति वाढत असते, साधनसामुग्रींत भर पडत असते, परन्तु बहुसंख्यांक लोकांच्या आवश्यक अशा गरजा सुध्दां म्हणाव्यात तशा पुऱ्या होत नाहींत. संपत्तीकडे संपत्ति आकर्षिले जाते; ज्ञानही जातिनिष्ठा दाखवितें, सुखाकडेच सुख ओढ घेतें व क्षणाक्षणाला कवीच्या प्रतिभेप्रमाणें नव्या नव्या स्वरूपांत दाखल होणारें दुःख व दारिद्र्य पुनः जुन्या नात्यानें नव्या ओळखी काढून, दरिद्र्याच्याच घरीं मुक्कामाला येतें. गरीबच खरा अतिथिधर्म जाणतात व गरिबाला आश्रय देतात ! आहे हें दैवायत्त आहे, पूर्वजन्मींचे देणें आहे, हरीची इच्छा आहे, असें त्यांचें सांत्वन व समाधान करण्यास सनातनधर्म सदैव तयार असतो. या धर्माचा देवच जेथें लक्ष्मीचे सान्निध्यांत श्रमणाऱ्या शेषशाईचे डोक्यावर कायम बसला आहे तेथें या व्यतिरिक्त गरिबांचे वांट्यास धर्म काय देणार ! ! ! राज्यकर्त्यांवर परिणाम करणारी शक्ति फक्त सुवर्णातच आहे व ती सर्व ज्यांच्या हातांत असते असे अल्पसंख्यांक श्रीमान् मग ते उद्योगधंद्यांतील असोत अगर जमीनदारवर्गातील असोत, जुटीनें वागून शक्य तेवढी जास्त संपत्ति आपले हातांत आणण्याची खटपट करीत असतात, व आलेली संपत्ति वांटली जाऊं नये म्हणून धडपडत असतात. याचा परिणाम समाजांत एका बाजूला अल्पसंख्यांक लक्ष्मीनारायण तर दुसरे बाजूस बहुसंख्यांक दरिद्रीनारायण असें दृश्य असतें, हें आधुनिक राज्यांतील समाजस्वरूपाचें यथार्थ चित्र आहे. आधुनिक राज्याचा लौकिक सुव्यवस्था व संरक्षणासाठीं आहे. पण यांत संपत्तिवाल्यांचेंच संरक्षण होतें व गरिबांची गरिबी कोणी नेऊं नये म्हणून दक्षता घेण्यांत येते ! ज्यांना भरपूर आहे त्यांच्यांत कमी होऊन ज्यांना कांहीं नाहीं त्यांना थोडें तरी मिळून होणारी अव्यवस्था टाळली जावी म्हणून, आहे तेंच विषमतापूर्ण असलें तरी समाजाला आवश्यक, धर्मानें मान्यता दिलेलें म्हणून ठेवण्याची सुव्यवस्था राखली जाते ! बहुसंख्यांकांना संरक्षण व सुव्यवस्था यांचे नांवाखालीं जीवनसाफल्य, त्यांतील आनंद यांपासून वंचित करण्यांत येतें.

वरील परिस्थितींत राज्यानें केलेली व्यवस्था ती उत्तम अगर अधिक चांगली करणें शक्य नाहीं असें मानणें चूक आहे. अधिष्ठित सत्तेचें मत, तें तसें आहे म्हणून त्याला मान्यता देणें हेंही चूक आहे. प्रत्यक्ष अनुभवांत काय येतें हें पाहून

राज्यसत्तेचें धोरण चूक अगर बरोबर ठरविलें पाहिजे. निरपेक्ष अगर बिनशर्त निष्ठा खऱ्या नागरिकधर्माला विरोधक आहे. अंधश्रद्धा भक्तिभाव वाढवील पण मुक्ति देणार नाहीं. भक्ताचा बळी पडून मुक्ति मिळाली तर गोष्ट निराळी ! ! विवेकी निष्ठा कीं जी राज्य योग्य आचरण करते कीं नाहीं हें पाहून प्रदान केली जाते तीच खऱ्या नागरिकधर्माला अनुसरून आहे. नागरिक म्हणून जे हक्क आहेत ते प्रथम दिल्या-शिवाय राज्यनिष्ठेची मागणी न्याय्यरीतीनें तरी राज्य करूं शकत नाहीं. आधुनिक राज्यांतून बहुतेक ठिकाणीं सार्वत्रिक मतदानाचा हक्क दिलेला आहे. या परिस्थितींत या सर्व मतदारांना म्हणजे नागरिकांना संतुष्ट राखणें व त्यांची निष्ठा मिळविणें हें एक प्रचंड कार्य आहे. राज्यकारभार कोणी करावयाचा हें ठरविण्याचा हक्क म्हणजे मत-दानाचा हक्क. हा एकदा मिळाल्यानंतर लोक नुसतीं मतें देऊन झोपीं जात नाहींत. ही राजकीय सत्ता मिळाल्यानंतर तिचा उपयोग, हक्कांचा उपभोग अधिक कसा करतां येईल, ते कसे वाढतील यांकडे होणें अपरिहार्य आहे. नुसती मतदानाचा हक्क देऊन उत्पन्न केलेली राजकीय सत्ता मिळाली म्हणजे नागरिक–जीवन पूर्ण झालें हें कोणी मानलें नाहीं व मानणार नाहीं. या समतेच्या साधनानें जी परिस्थिती नागरिकांना योग्य व आवश्यक वाटते, जे हक्क असावेसे वाटतात, ते सर्व घडवून आणण्याचे दृष्टीनें प्रयत्न केले जातात. समाजांत नव्या व्यवस्था, नव्या शासनसंस्था काढून समाजांतील विषमता कमी करून सुखसंपत्ति सर्वांना भरपूर मिळावी म्हणून योजना केल्या जातात. राजकीय समता मिळाल्यानंतर समाजांतील आर्थिक विषमतेच्या स्थैर्याला धोकाच उत्पन्न होतो. थोड्या लोकांनीं उपभोगावें व बाकीच्यांनीं उपाशीं राहावें ही अन्याय्य परिस्थिती आहे याची जाणीव समाजाला होते. ही परिस्थिती अपरिहार्य नाहीं व मनुष्यनिर्मित आहे याचें ज्ञान राजकीय समतेच्या वातावरणांत झटकन होतें. म्हणून कोण्या एका गटाला अगर वर्गाला विशिष्ट हक्क असतील तर ते सर्वांना मिळावेत अगर ते कुणालाच नसावेत म्हणून प्रयत्न होतात. सर्वांना मत-दानाचा हक्क देऊन राजकीयदृष्ट्या लोकशाही व्यवस्था स्थापल्यानंतर ती यथार्थ व्हावयाची तर समता आणि स्वातंत्र्य यांचा अभाव तेथें असूं शकत नाहीं. समता आणि स्वातंत्र्य याशिवाय खरी लोकशाहीव्यवस्थाच शक्य नाहीं. ही गोष्ट कळण्यास लोकशाहीचीं धुळाक्षरें वाचल्याबरोबरच सुरवात होते. हें ज्ञान समाजांत पसरतें व आमजनता तदनुसार मागण्या करूं लागतें व त्या नाकारणें राज्याला अधिकाधिक कठीण होत जातें. मतदानाचा हक्क देणें म्हणजे दृष्टि देणें आहे. दृष्टि लाभली कीं समाजांत काय आहे याचें निरीक्षण ती करणारच. मग दिसलेल्या अन्यायाची

जाणीव त्याला स्वस्थ बसूं देत नाहीं. ज्यांचेवर अन्याय होत आहे ते समाजांत बहु-संख्यांक आहेत अशी परिस्थिती उत्पन्न झाली म्हणजे त्यांना संख्याधिक्यांतील सुप्त शक्तीची जाणीव होण्यास विशेष वेळ लागत नाहीं. ही जाणीव झाल्यानंतर बहु-संख्यांक जनतेनें ध्येयाकडे टाकलेल्या पावलांची चाहूल अल्पसंख्य राज्यकर्ते यांच्या पोटांत भीति उत्पन्न करीत असते. तिचा आवाज या गटवाल्यांच्या हृदयांत थरकांप निर्माण करतो. या परिस्थितींत या अल्पसंख्यांकांत एकी व एकसूरपणा राहात नाहीं व जन-तेला विरोध करण्याची शक्ति तर असूंच शकत नाहीं. त्यांना आज नाहीं उद्यां सत्ता सोडावी लागते अगर ज्यांचा न्याय्य हक्क, न्याय्य वारसा त्याला तो द्यावा लागतो. राज्याला स्थैर्यासाठीं, कायम राहावें म्हणून समाजांत उत्पन्न होणाऱ्या बहु-संख्यांकांच्या मागण्यानुसार स्वरूपांत बदल करावा लागतो. सार्वजनिक हितासाठीं व तें साध्य करण्यासाठीं जर राज्य हें संघटन आहे तर त्या दृष्टीनें ज्या मागण्या होतील जें अपेक्षिलें जाईल, त्या बरहुकूम राज्यानें वागण्यांतच त्याची यथार्थता आहे.

वरील दृष्टि ठेवून वागणूक न झाल्यास समाजांत अव्यवस्था माजेल, अराजक परिस्थिती निर्माण होईल. अल्पसंख्यांचे अन्याय्य अधिकारासाठीं राज्य बहुसंख्याकांचे न्याय्य मागण्यास विरोध करूं लागेल तर राज्यनिष्ठेचा नैतिक पायाच खचेल. काय-द्याचा आधार घेऊन सक्तीचे जोरावर थोडा वेळ राज्य यशस्वी रीतीनें विरोध करील हें खरें, पण त्याचबरोबर समाजांतील निर्बंध पटापट तुटूं लागतील, ते मान-ण्यांत स्वहित आहे ही जाणीव लुप्त होईल. राज्याचे अन्याय्य वर्तनाची दुर्गंधी अधिक पसरून समाजजीवन असह्य होईल. सुखापासून अन्यायानें वंचित झालेला बहुसंख्यांक समाज शत्रुत्वाचे पावित्र्यांत सारखा उभा राहिल्यानंतर ज्या शक्तीचे, ज्या शासनाचे आधारावर कायद्याची प्रतिष्ठा आहे ती सुद्धां हळुहळू क्षीण होईल. कारण सैन्यसुध्दां या वातावरणांत स्थिर राहूं शकत नाहीं. समाजांतील वातावरण बराकींत शिरतें व त्याचा व्हावयाचा तोच परिणाम होतो. चौकांतील घोषणा चौकींत ऐकूं जातात व इष्ट तेंच तेथें घडत जातें. अव्यवस्था व अराजक अपरिहार्य होते. उधळलेली धूळ पुन्हां बसण्यास वेळ लागतो. त्याचप्रमाणें समाजाची घडी क्रांतीनंतर बसण्यास वेळ लागतो. पण तेथपर्यंत अराजक प्रभावी राहाणें टळूं शकत नाहीं. हें सर्व टाळा-वयाचें असेल तर माणसांनीं आपल्या व्यक्तिगत स्वार्थाला, समाजहिताचे दृष्टीनें मुरड व मर्यादा घातली पाहिजे. थोडया लोकांना असलेले खास अधिकार, खास सुखसोयी, सर्वांच्या हिताचे दृष्टीनें सोडण्यास तयार झालें पाहिजे. किंबहुना ज्या थोडयांना हें सोडावें लागेल त्यांचें खरें हित या त्यागी वर्तनांतच आहे. समाजांत

मिळणारें सौख्य समाजाचेच कलानें घेतलें पाहिजे. पाण्यांत राहून माश्यांशीं वैर करून चालणार नाहीं, त्यांच्याशीं सहकार्य केलें पाहिजे, त्यांच्याशीं हितैक्य साधलें पाहिजे. समाजांतील बहुसंख्यांक जनतेला सुखापासून वंचित करून थोडया लोकांनीं तें उपभोगिल्यास, काय किंमत द्यावी लागते, काय प्रायश्चित भोगावें लागतें याची साक्ष फ्रेंच व रशियन क्रांतीनंतर देशोधडीला जाऊन अन्नान्नदशेंत राहिलेल्या लोकांचे उदाहणावरून सहज मिळते. वेळींच अधिकारत्याग न केल्यानें, स्वार्थ न सोडल्यानें, सत्ता व संपत्ति दोन्ही संपूर्णपणें घालवून देशही त्यांना सोडावा लागला. हेंही प्रायश्चित अपुरें आहे असें मानणारें एक मत आहे. हा इतिहासाचा दाखला लक्षांत घेऊन राज्यानें म्हणजे विद्यमान राज्यकर्त्यांनी वागावें यांत शहाणपणा आहे व न्यायही आहे.सर्वसामान्य लोकांना जीवनाला किमानपक्षीं आवश्यक तेवढें तरी मिळालें पाहिजे. असें मिळाले तर थोडया शांतवृत्तीनें ते समाजाकडे पाहातील. कांहीं प्रगति मग शक्य आहे. कांहीं संस्कृति मग मूळ धरूं शकेल. आवश्यक तेवढें मिळण्याचा हक्कच अमान्य करणें म्हणजे समाज या संस्थेचे विसर्जनास आवाहन देण्यासारखें आहे. लोकांच्या मनांत कल्पनाच येणार नाहींत हें मानणें वेडेपणाचें आहे. जें जरूर आहे तें मनुष्य मागतोच, तें मिळविण्याचा त्याचा हक्क आहे ही जाणीव समाजाची परिस्थिती त्यास करून देते. हक्कविषयक विचार मनुष्याचे मनांत रुजले म्हणजे ते त्याचे मनांत श्रद्धा व शक्ति निर्माण करतात. कुठल्याही जुलमी राज्यसत्तेच्या शस्त्रापेक्षां हे विचार अधिक सामर्थ्यवान् व प्रभावी असतात व जेथे लोकशाही आहे तेथें तर हे विचार व्यापक प्रमाणांत दिसून येतात व म्हणून जास्त प्रभावी असतात. कारण हे विचार मनांत आणणारे लोक लोकशाही व्यवस्थेंत संख्येनें अधिक म्हणून महत्त्वानेही अधिक असतात. हक्कविषयक विचार निर्माण झाल्यानंतर मनुष्य स्वस्थ बसूं शकत नाहीं. त्याची जिव्हा प्रथम काम करील, पाय प्रचाराची पायपीट करतील; शेवटीं मतास हात वर करून काम न भागल्यास मूठ वळलेले हात उभारून तो यश आपलेकडे ओढील. त्याला जें अवश्य वाटतें तें मिळविण्याचा प्रयत्न केल्याशिवाय तो राहाणार नाहीं हें निश्चित. क्रमाक्रमानें करील. आज करील, उद्यां थांबेल; पण पुन्हां उचल खाईल. कारण अन्यायाची जाणीव झालेलें मन त्यास स्वस्थ बसूं देणार नाहीं. त्याची मागणी सर्वांना सारखें वागवावें, सर्वांना न्याय मिळावा ही असली तरी परिस्थितीच्या मर्यादा तो ओळखत नाहीं असें नाहीं. यथार्थ लोकशाहीव्यवस्थेंत सुद्धां कांहीं विषमता, कांहीं निर्बंध राहाणें शक्य आहे. तथापि, किमामपक्षीं व्यक्तिविकासाला पूर्ण वाव देणारी परिस्थिती तेथें उपलब्ध असते. संधि जेथें नाहीं तेथें अन्याय्य विषमता अधिक ठळक-

पणें दिसून येते. अर्धपोटीं जेवण, अर्धे अंग न झाकलेलें असें शरीर, अंधार आणि घाण यांनी टाणें दिलेलें खोपटें या लव्याजम्यांत प्रसन्न मन राहून जीवनांत समाधान कसें वाटेल ? या परिस्थितींत वावरणाऱ्यांचीं मनें उदास व उद्विग्नच राहाणार. या वातावरणांत उत्पन्न होणारी प्रजा तदनुसारच असणार. या वातावरणांत वावरणारे नागरिक उत्साहहीन राहिल्यास नवल नाहीं. या विषमतापूर्ण परिस्थितीविरुद्ध आवाज काढल्यास तें अस्वाभाविक कसें म्हणतां येईल ? अगदीं आवश्यक अशाच गोष्टी मिळण्यासाठीं तर ही मागणी असते. ही मागणी करतांच लोकांवर राज्यसत्तेनें तुटून पडणें अगर त्यांना राजद्रोही टरविणें यासारखें मूर्खपणाचें कृत्य कोणतेंही असूं शकत नाहीं. वंचित व विपण्ण झालेले लोक प्रसंगी दंगाधोपा करतात सबब त्यांना चळवळे अगर कटवाले म्हणून शिक्षा करून राज्यकर्ते वागतात. यांत त्यांची मागणी ते सोडून देतील ही आशा केली जाते, पण ती व्यर्थ टरते. दडपशाहीनें क्षणभर लोक शांत होतील पण त्यांचीं मनें अधिक क्षुब्ध होतील. त्यांची चळवळ दडपली जात नाहीं उलट ती अधिक व्यापक होते. जी उघड असते तिला गुप्त स्वरूप प्राप्त होतें. सर्व सत्ताधीश राज्यसत्तेपुढें टिकाव धरणारी चळवळ केवळ चळवळीच्या स्वरूपाची अगर कांही स्वार्थी लोकांचे कटाचे स्वरूपाची असूं शकत नाहीं. वंचित जनतेचा तो उघड उघड कट आहे असाच त्याचा अर्थ असतो. सर्व समाजांत पसरलेल्या निराशामय वातावरणांत जनतेच्या या वागण्याचें रहस्य असतें. बहुसंख्यांक समाज गांजलेला असतो; कांहीं तरी व्हावें असें त्याला वाटत असते व कुणी कुटेंही पुढें येऊन कांहीं केलें कीं, त्याचें स्वागतच होत असतें. बोलणारी वाचा एकाची असली तरी त्यांतील अर्थ सर्वांच्या मनांतीलच असतो. मारलेल्या हांकेचा पडसाद लक्षावधि हृदयांत पडत असतो. जनतेची मागणी न्याय्य असते म्हणून तर तिला सहानुभूति मिळत जाते. समाजांतील एक वर्ग सुखांत असतां दुसऱ्या वर्गाच्या सामान्य गोष्टींना सुद्धां विरोध जेथें होतो तेथें अन्याय अधिक चीड आणण्यास कारणीभूत होतो, आणि राज्यसत्ता जेथें आपल्या सत्तेचे जोरावर जनतेची न्याय्य हक्कांची मागणी दडपून टाकण्यास सज्ज होते तेथें प्रत्यक्ष अन्यायाचेंच राज्य सुरू होतें. दडपशाहीनें कांही काळ जनता दबली जाईल पण न्याय तिचे बाजूस असल्यामुळें तिचे बाजूनें सहानुभूति वाढत जाते व राज्यसत्ता प्रथम नैतिक अधिकार घालवून शेवटीं आपलें मरण ओढवून घेते. जनतेच्या न्याय्य आकांक्षा पुऱ्या केल्यानेंच राज्य प्रतिष्ठा पावतें व टिकतें. इतिहासांतील महत्त्वाच्या घटना हेंच सांगतात. इतिहास हा सर्व जगांतील राज्यकर्त्यांना व्यासांप्रमाणें उंच हात करून सांगत आहे कीं, 'प्रजा प्रीतिस्तु स्थैर्याय नाशाय जनपीडनम्'। पण किती ऐकतात ?

लोकशाहीव्यवस्था जेथें आज आहे तेथील परिस्थितीसुध्दां सामान्यतः वरील-प्रमाणेंच असते. लोकशाहीराज्यव्यवस्थेंतच्च होणारे कायदे लोकांच्या इच्छेप्रमाणें होतात हें फक्त तत्त्वतः खरें आहे. राज्यांतील प्रभुत्व हें तत्त्वतः लोकांकडे आहे पण त्याचा वापर प्रत्यक्ष कोण करतो व कशासाठीं व कशा रीतीनें करतो हें जास्त महत्त्वाचें आहे. लोकशाहींत लोकांना आपल्या शक्तीची व सत्तेची जाणीव आज तरी पूर्णपणें झाली आहे असें दिसत नाहीं. इतकेंच नव्हे, तर सार्वत्रिक निवडणुकीचे वेळीं मत दिल्यानंतर हा राज्याचा मालक असलेला मतदार झोपीं जातो व पुन्हां निवडणुकीच्या नौबती वाजूं लागल्या म्हणजे अगर ह्या वाजवून या कुंभकर्णाला जागा करावा लागतो. दक्ष व जागिवेनें काम करणारा नागरिकवर्ग नसेल तर लोकशाही व्यवस्थासुध्दां जुलमी होऊं शकते हा अनुभव आहे. आजही नागरिकवर्ग जेथें लोकशाही व्यवस्था आहे तेथें सारखा जागृत नसतो, परिस्थितीचें पूर्ण ज्ञान त्याला नसतें, व राजकीय घडामोडीतील गुंतागुंत, कार्यकारणभाव तर क्वचितच त्याला समजतो. बदलत्या काळाबरोबर परंपरा, संकेत व संस्थाही महत्त्वाचे व उपयुक्ततेच्या दृष्टीनें बदलत असतात. म्हणून काल अवश्य वाटत असलेली व्यवस्था अगर संस्था आजचे परिस्थितींत निरर्थक असते. तथापि, तिचे महत्त्व चालू आहे असें समजून बहुसंख्यांक नागरिक वागत असतात. कोणी विचार करून वागूं लागला, समाजांतील परंपरा तपासूं लागला, संस्थेची शक्ति अजमावूं लागला कीं, लागलीच तो टीकेला पात्र होतो; राज्यकर्ते त्याच्याकडे संशयानें पाहूं लागतात. राजकारण, समाजकारण ही फार जड भानगड आहे, ती आपल्यासाठीं नाहीं अशी वृत्ति सामान्य जनतेंत असते; नव्हे, पुष्कळ ठिकाणीं ती मुद्दाम वाढविली जाते. जनतेंत याप्रमाणें हीन मनोगंडाचें वातावरण असलें म्हणजे, नवी जबाबदारीची गोष्ट करण्याकडे प्रवृत्ति होत नाही व हीच परिस्थिती, लोकशाहीव्यवस्था बाह्यस्वरूपी ठेवून सर्वसत्ता मूठभर लोकांच्या हातांत ठेवण्याचे दृष्टीनें उपकारक ठरते व म्हणून तिची जाणून-बुजून जोपासना करण्यांत येते. धर्मांप्रमाणें राजकारणांतहीं स्वार्थी व धूर्त लोक दैव-वाद प्रचलित करीत असतात. राजकारणांतही ऋषिबाजी, गुरुबाजी उत्पन्न करून कांहीं व्यक्ति व कांहीं संस्था, कांहीं संकेत यांचे भोंवताली दैवी प्रसादाचीं वलयें उत्पन्न करून बुद्धिग्राही मनाला मज्जाव करण्यांत येतो. चमत्काराचें वातावरण लोकांचें स्वातंत्र्य हातचलाखी करून लुबाडण्यास उपयोगी पडतें. लोकांना शिक्षण देतांनासुद्धां त्यांची बुद्धि चिकित्सक होणार नाहीं याची काळजी घेण्यांत येते. प्रत्येक गोष्ट कां व कशी असें जर नागरिक विचारूं लागला तर परंपरा व बाबावाक्यप्रामा-

ण्यांनें टिकविलेली प्रतिष्ठा व अधिकार, अनाठायीं आहे हें सत्य उघड होईल. हें संकट टळावें म्हणून शिक्षणानें जिज्ञासा जागृत होणार नाहीं अशी दक्षता घेतली जाते. भौतिक सत्तेचीं साधने शस्त्रादिक हीं तर सर्व राज्यकर्ते आपल्या हातीं ठेवतातच पण ज्ञानाचीं साधनेंसुद्धां आपल्या हातांत ते ठेवतात. शस्त्र, शास्त्र, प्रचार व पैसा या साधनचतुष्टयांनीं सज्ज व हातीं सत्ता असलेला राज्यकर्त्यांचा वर्ग एका बाजूला व दुसऱ्या बाजूला अज्ञानी, निर्धन, निःशस्त्र असा अफाट जनसमूह हें दृश्य पाहिल्यानंतर, पहिल्याला जय मिळविणें किती सोपें व दुसऱ्याला किती अवघड हें सहज कळून येईल. या परिस्थितींत लोकशाहींतील मतदार हातांत असलेली तात्त्विक सत्ता कशी वापरतील याची कल्पना सहज होईल. विद्यमान सरकारजवळ सत्ता आहे, तें पुरस्कार करूं शकतें, आज रोख कांहीं तरी देतें म्हणून त्यालाच उचलून धरणारे अधिक निघतात जे विरोधक असतात, त्यांचेजवळ वचनाशिवाय पुरस्कार नसतो, संख्येशिवाय शस्त्र नसतें, भावी काळाची आशा हेंच त्यांचें कर्तृत्व असतें. या परिस्थितींत हातचें सोडून पळात्याच्या मागें लागण्यांत शहाणपण नाहीं हें जाणून अनेक लोक वागतात. हातीं असलेल्या तात्त्विक सत्तेचा उपयोग प्रत्यक्ष कसा करावा हें जनतेला शिक्षण मिळालें तरच ती सत्ता आहे व तिची भीति राज्यकर्ते मानतील. पण असें शिक्षण अजून मिळत नाहीं, सत्य म्हणजे तें देण्यांत येत नाहीं.

आपण सिंह आहोंत, ही जाणीव नसलेला सिंहाचा छावा जसा वागतो तीच गोष्ट लोकशाही-जनतेची झालेली दिसून येते. जाणीव उत्पन्न होतांच फरक पडतो, तीच गोष्ट जनतेच्याही बाबतींत खरी आहे. हातीं असलेलें शस्त्र किती परिणामकारक आहे व तें पूजेसाठीं नाहीं, संरक्षणासाठी आहे याची जाणीव तें बाळगणाराजवळ सारखी असली पाहिजे. जाणीव नसेल तर प्रसंग येतांच लक्ष्मीधराप्रमाणें हें शस्त्र गंजलेलें म्हणून निकामी ठरावयाचें. विद्या आवृत्तीनें म्हणजे पुनःपुनः उजळणीनें व शस्त्रें उजाळून कार्यक्षम राहातात. स्वातंत्र्याचे हक्क हे सारखे सांगितले पाहिजेत. सांगणें बंद झालें कीं, हक्कही लुप्त होतात असाच त्यांचा व सत्तेचा संबंध असतो. स्वातंत्र्य हे प्रेमाप्रमाणें नित्य उपासना केली तरच टिकतें. प्राप्त झालें आहे या भरंवशावर राहून चालत नाहीं. स्वातंत्र्याचें युध्द हें अखंड व अविरत, तें संपलें असें होतच नाहीं. नव्या नव्या आघाडया उत्पन्न होत असतात. नवे नवे शत्रु समरांगणांत उतरत असतात. अखंड सावधानता व अखंड उपासना ही स्वातंत्र्याची किंमत आहे. हें जेथें जाणिलें जात नाहीं तेथें राज्यसत्ता व्यक्तींचें हक्कांवर हळूहळू आक्रमण करीत जाते. किंबहुना सत्तेचा हा स्वभावधर्मच आहे. तेलाचा बिन्दु पाण्यांत पडल्याबरोबर

सर्वत्र पसरतो तसेंच सत्तेचें लक्षण आहे. प्रत्येक गोष्ट आपल्या कक्षेंत घेण्याचा प्रयत्न राज्यसत्ता वापरणारे करीत असतात. समाजांत, आमजनतेंत असलेलें प्रभुत्व व सर्वाधिकार हळूहळू मध्यवर्ती व मुख्य ठिकाणीं असलेल्या मूटभर सत्ताधारी लोकांचे हातीं जातो. सर्व सत्ता एके ठिकाणीं केंद्रित असणें हें नागरिकांचे हक्कांचे दृष्टीनें अनिष्ट आहे. सत्ता जर केंद्रित नसेल तर तिच्यावर कांहीं तरी निर्बंध राहातो. राज्यसंघटनेंत सत्ताविषयक वांटणी असली व निरनिराळीं केंद्रें उभारलीं असलीं तर ही व्यवस्था नागरिकांचे हक्कांचे दृष्टीनें इष्ट ठरते. प्रत्येक केंद्र म्हणजे लोकमताला आपलें म्हणणें मांडण्याच्या दृष्टीनें, चर्चेच्या दृष्टीनें एक क्षेत्र असतें. ग्रामपंचायत असली म्हणजे तिच्या कारभाराबाबत गांवांतल्या लोकांना आपलें म्हणणें मांडतां येतें, चर्चा करतां येते व ही सर्व गोष्ट त्यांच्या आवांक्यांतही असते. गांवांत किती जागले असावेत, कसे रस्ते असावेत हें सर्व गांवांनीं ठरविलें तर लोकांना त्यांत कांहीं सांगतां येईल. गांवांनीं ठरवावयाचें तर थोडी सत्ता तरी ग्रामपंचायतीला असली पाहिजे. म्हणजेच सत्तेची विभागणी करून अनेक केंद्रें निर्माण केलीं पाहिजेत. सर्व सत्ता एके ठिकाणीं असेल तर प्रदेशभर पसरलेल्या जनतेला आपल्या अडचणी सत्तेचे कानांवर घालतां येणें कठीण असतें. जनतेच्या इच्छा एकीकडे व राज्यकारभार एकीकडे असें होऊन जनतेच्या अधिकाराचा लोप होत जातो. राज्यकारभाराच्या सर्व केंद्रांशीं, सर्व व्यवस्थेशीं जनतेचा संबंध असला पाहिजे व त्या दृष्टीनें शासनसंस्थेची व्यवस्था असली पाहिजे. नुसती राजकीय सत्ता लोकमतानुयायी करून भागणार नाहीं. सर्व लोकांना किमान म्हणून ज्या गोष्टी मिळाल्याच पाहिजेत, त्यांच्या कारभराची सूत्रें मूठभर लोकांच्या हातीं ठेवणें धोक्याचें आहे. मताचे अधिकाराबरोबर किमानपक्षीं जीवनाला अवश्य असलेल्या गोष्टीही मिळाल्या पाहिजेत, म्हणून या गोष्टींचे व्यवस्थेशीं जनतेचा संबंध पाहिजे, त्यावर तिचें नियंत्रण पाहिजे. नागरिकत्व यथार्थ व्हावयाचें तर नुसती मतदानापुरती समानता देऊन भागणार नाहीं, समता व स्वातंत्र्य पूर्णांशानें राज्यव्यवस्थेंत प्रतिबिंबित झालें पाहिजे. किंबहुना स्वातंत्र्य व समता यावरच ती उभारली पाहिजे.

समता व स्वातंत्र्य यांचें विवेचन विस्तारानें पुढें येईलच. तथापि, या ठिकाणीं येवढें सांगणें जरूर आहे कीं, समता व स्वातंत्र्य यांच्याबद्दलच्या कल्पना कायम ठरयाच्या व कधींही न बदलणाऱ्या असूं शकत नाहींत. निरपेक्ष असें त्यांचें स्वरूप असत नाहीं. समता व स्वातंत्र्य या कल्पनांचा मनुष्यांशीं संबंध आहे व मनुष्य हा देशकालपरिस्थितीनें वेष्टित आहे. म्हणून परिस्थितीला अनुसरून मनुष्य समतेच्या व

स्वातंत्र्याच्या कल्पना उभारीत असतो. धर्मानें गांजलेल्या देशांत धार्मिक जुलमा-पासून मुक्ति म्हणजे स्वातंत्र्य व मनाप्रमाणें धर्माचरण करण्यास मोकळीक म्हणजे समता असें वाटेल. करानें गांजलेल्या नागरिकांना करापासून मुक्ति म्हणजे स्वातंत्र्य वाटेल. ' उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया ' ही परिस्थिती झाली कीं स्वातंत्र्य मिळालें असें कांहींना वाटेल. कसलेल्या जमिनीचें पीक कसणाऱ्याच्या हातीं पडेल अशी व्यवस्था झाली तरच स्वातंत्र्य असें कांहीं ठिकाणीं वाटेल. तथापि, विविध कल्पना असल्या तरी मुळाशीं एक गोष्ट समान आहे ती ही कीं व्यक्तीला आपल्या विकासाला, आपल्या उन्नतीला, आपल्याला जें योग्य वाटतें तें करण्यास राज्यव्यवस्थे-कडून अडथळा नसावा, हें स्वातंत्र्याचें मुख्य लक्षण कायम स्वरूपानें आहे. व्यक्तींना आपल्या प्रवृत्तींना जुळवून आयुष्यांत प्रसन्नता निर्माण करण्याची मोकळीक असावी ही मूलभूत कल्पना स्वातंत्र्याचे मुळाशीं आहे. समाजानें व राज्यव्यवस्थेनें ही मोक-ळीक ठेवावी. आपल्या परंपरेनें अगर नियमानें नागरिकानागरिकांत या बाबतींत तफावत करून विषमतेचा भाव निर्माण करूं नये. आत्मोन्नति अर्थात् व्यक्तीनेंच करावयाची असते. पण राज्यसत्तेनें त्यांत अडचणी उत्पन्न करूं नयेत. गरिबींत जन्मला म्हणून शिक्षणास मुकावें लागणें ही आपत्ति व ही अडचण राज्यानें दूर केली पाहिजे. दैवायत्त म्हणून गरिबींत जन्मला तरी मदायत्तं तु पौरुषम् हें खरें ठरेल अशी व्यवस्था व वातावरण समाजानें व राज्यानें निर्माण केलें पाहिजे. व्यक्तीचे पौरुषाला, पराक्रमाला सारखा वाव मिळणें म्हणजेच समता. किमानपक्षीं या बाब-तींतील अडथळे व अडचणी कमींत कमी करणें इतकें तरी समतेच्या कल्पनेंत असलेंच पाहिजे. सर्वांना सर्व अर्थानें सारखा वाव मिळेल, अगदीं सारखी संधि मिळेल हें कठीण आहे. कांहीं ऐतिहासिक कांहीं अनुवंशिक फायदे कांहींना मिळणें अपरिहार्य आहे. तथापि, मनुष्यमात्रांच्या प्रवृत्ति लक्षांत घेऊन त्यांना योग्य वाव देणें शक्य आहे. पिढीजात गवयाचा मुलगा गाणें लवकर शिकेल व त्याला अनुकूल असें वातावरण घरापासूनच मिळूं लागतें. प्राचीन काळापासून विद्येंत पुढारलेल्या वर्गां-तील मुलें यांना शिक्षणाचे दृष्टीनें अधिक अनुकूल वातावरण असतें. हें मान्य करून-सुध्दां लोहाराचे मुलानें लोहारच व्हावें अगर हरिजनाचे मुलानें झाडुवाल्याचेंच काम करावें असें म्हणणें गैर आहे. प्रत्येक बालकाची प्रवृत्ति पाहून तिला वाव देणें, संधि देणें हें राज्यव्यवस्थेनें घडवून आणलें पाहिजे. असें करणें म्हणजे समता राखणें होय. प्रत्येक मनुष्य जन्मानें सामान्यतः सारखाच असतो. परिस्थितीनें त्याच्यावर संस्कार होऊन तो कमी अगर जास्त बुध्दीचा होतो. परिस्थिती ही समाज व राज्य घडवीत

असते. म्हणून सारखी परिस्थिती केल्यास सर्वांना सारखी संधि मिळेल, समाजांत समता नांदेल, अशीही एक विचारसरणी आहे. आनुवंशिक असें कांहीं नाहीं असें असेल तर उत्तमच; पण असें कांहीं जरी असलें तरी समाजानें व राज्यानें आपल्या व्यवस्थेनें त्यांतील विषमता दूर करून सर्वांना उन्नतीचे दृष्टीनें जास्तींत जास्त वाव द्यावा व समाजांत समता व स्वातंत्र्य यांचें वातावरण निर्माण करून सामाजिक सुख व समाधान वाढवावें हें योग्य आहे. समाजांतील कल्पकता, ज्ञान, शोधबुध्दि, कलात्मकता, कौशल्य कांहींही, संधि अगर साधनाभावीं निरर्थक होऊं नये येवढी काळजी समाजानें व राज्यानें घेतली पाहिजे.

राज्यानें काय करावें हें वर सांगितलें. राज्याच्या मौलिक हेतुसिध्यर्थ काय कल्पनांना, काय हक्कांना मान्यता द्यावी हें सांगणें तात्विक झालें पण तें कसें घडवून आणावें हा व्यवहार सांगणें सोपें नाहीं. ज्या राज्यांत पुष्कळ वेळ मिळूनही आदर्शाप्रमाणें कांहींही वर्तन होत नाहीं तें राज्य प्रजेच्या निष्ठेला, मान्यतेला पात्र नाहीं, म्हणून पदच्युत करण्याचा प्रजेला अधिकार आहे येवढें सांगून भागत नाहीं. प्रजेचे अधिकार प्रत्यक्ष कोणते आहेत व कोणत्या अधिकारांना राज्यानें मान्यता द्यावी याची कल्पना पूर्णपणें आली पाहिजे. तसेंच, कोणती व्यवस्था, कोणत्या संस्था निर्माण केल्या असतां हे अधिकार राज्यसत्तेपासून प्राप्त करून घेतां येतील याची पण कांहीं तरी कल्पना आली पाहिजे. किती प्रमाणांत अधिकारांचा उपभोग मिळाला असतां प्रजेला समाधान वाटेल हें जरी निश्चितपणें सांगतां आलें नाहीं तरी इतिहासाचा अनुभव लक्षांत घेऊन, काय हक्क अगर काय अधिकार प्रजेला असणें सामान्यपणें जरूर आहे याचें दिग्दर्शन करणें शक्य आहे. तसेंच, अमुक संस्था निर्माण झाल्या असतां हे हक्क मिळवितां येतील हें जरी निश्चितपणें सांगतां येत नसलें तरी विशिष्ट संस्था, अगर व्यवस्था असल्यास या हक्कांना वाव मिळणार नाहीं येवढें तरी सांगतां येईल. कुंडलींतील पुण्यग्रह फळ देतील हें अनिश्चित पण पापग्रह कोणतें फळ नक्की देतात येवढें ज्योतिषाचें ज्ञान राजकारणांत अनुभवानें सिध्द झालें आहे. तसेंच, अनुभवानें असेंही सांगतां येईल कीं, कांहीं संस्था अगर कांहीं विशिष्ट व्यवस्था असल्याशिवाय हक्कांच्या विचारांना समाजांतील राजकारणांत प्रवेशच मिळणार नाहीं. प्रवेश मिळून ते मान्यता पावतील व राज्याचा हेतु सफल होईल असें सांगणें कठीण आहे. किंबहुना कुठल्या परिस्थितींत राज्य निश्चितपणें आदर्श व्यवहारांत आणूं शकेल हें सांगतां येणार नाहीं. आदर्श अंमलांत आणण्याचे कामीं, हेतु सफल करण्याचे कामीं, विरोधक पारीस्थिती कोणती असूं शकते हें इतिहासाचे व अनुभवाचे सहाय्यानें सांगतां येईल. अनुभवानें काय हक्क

अगर अधिकार असणें व त्यांना मान्यता मिळणें जरूर आहे हें वर दर्शित केलें आहे. हे हक्क कांहीं स्मृतीप्रमाणें एका ठिकाणीं लिहून ठेवलेले नाहींत. किंबहुना सर्वत्र हे हक्क अगर अधिकार कुठल्या दानपत्रांत अगर सनदेंत लिहिलेलेच असतात असेंही नाहीं. कांहीं राज्यांचे घटनेंत त्यांचा समावेश केलेला असतो. मूलभूत हक्क अगर अधिकार म्हणून त्यांची घोषणा करून घटनेंतच त्यांना स्थान दिलेलें असतें. त्यांची मान्यता राज्यमान्यतेबरोबरच अस्तित्वांत आलेली असते. हक्कांची याप्रमाणें लेखी सनद असली म्हणजे तिला निःसंशय अधिक महत्त्व आहे. निव्वळ परंपरेवर, निव्वळ संकेतांवर आधारलेल्या अधिकारांपेक्षां, या लेखनिष्ठ अगर घटना—कायद्यानेंच मान्य केलेल्या हक्कांना अधिक प्रतिष्ठा आहे हें उघड आहे. तथापि घटनेंत मूलभूत म्हणून दिलेले हक्कसुध्दां प्रसंगीं राज्यसत्ता कशी उधळून लावते याचें उदाहरण मागील व चालू महायुध्दांत अनेक ठिकाणीं दिसून येतें. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत भाषणस्वातंत्र्य, संघस्वातंत्र्य, हे सर्व हक्क घटनेनें दिले आहेत. पण मागील महायुध्दांत हे सर्व बाजूला सारून राज्यसत्तेनें कारभार चालविला. सर्वांना राजकीय समता घटनेनें दिली आहे तरी अद्यापि निग्रो लोकांना कोर्टांतून अगर अन्य शासनसंस्थांतून तिचा लाभ मिळत नाहीं. या देशांत ज्युरी—पंचांसमोर—खटला चालला पाहिजे हा कायद्यांत हक्क असतां वटहुकमानें खास कोर्टाची स्थापना करून त्याचा निकाल लावण्यांत आला. निव्वळ संशयावरून अनियमित काल कोणालाही अटकेंत ठेवूं नये, अपराधाची उघड चौकशी व्हावी या सर्व गोष्टी कायद्यांत असून ते कायदेच आज वटहुकुमानें निरर्थक करण्यांत आले आहेत. कायद्यांत आहेत, घटनेंत आहेत म्हणून राज्यसत्ता हक्कांना जपेल हें निश्चित नाहीं. प्रजेचे हक्क दक्षतापूर्वक जपले पाहिजेत ही परंपरा व वृत्ति राज्यकर्त्यांत असेल तरच कांहीं निश्चिती आहे. कायद्याविरुद्ध विद्यमान सरकार, कार्यकारी सरकार वागत आहे हें दाखविण्याचे दृष्टीनें लेखनिष्ठ अधिकार असणें चांगलें. जनमत त्यामुळें जागृत होतें, तीव्र होतें. सरकारनें हक्कांवर गदा आणली आहे हें स्पष्टपणें दाखवितां येतें. जे हक्क प्राप्त करून घेण्यासाठीं पूर्वजांना लढावें लागलें, त्यांचें संरक्षण करणें हें कर्तव्य आहे याची जाणीव अधिक परिणामकारकरीतीनें या योगें होते. तथापि, जाणीव होऊन हक्कसंरक्षणार्थ नागरिकवर्ग जेव्हां राज्यसत्तेविरुद्ध उभा राहून आव्हान देऊन तिच्याशीं हक्कसंरक्षणार्थ झगडेल तेव्हांच त्याला यश येईल व राज्यसत्ता बेकायदेशीर व बेसनदशीर उपक्रमापासून परावृत्त होईल. निषेधानें व रोज अगर आठवड्यांतून दोनदां सरकारी कृत्याचे बेसनदशीरपणाबद्दल रकानेचे रकानें लिहिण्यानें सरकार ठिकाणावर

येत नाहीं. कायद्यांतील कलमें अगर घटनेंतील घोषणा यांपेक्षां नागरिकांची दक्षता व निर्भयवृत्ति हीच त्यांच्या हक्कांचें अधिक परिणामकारकरीतीनें संरक्षण करीत असते. निर्भयता हीच स्वातंत्र्याची ढाल आहे. मरणालाही न भिणारें धैर्य हें त्याचें मोल आहे. धैर्यानें स्वातंत्र्य मिळतें व धैर्यानेंच तें रक्षिलें जातें.

राज्यव्यवस्थेंत न्यायखातें कार्यकारी सत्तेपासून अलिप्त व स्वतंत्र असावें हें इष्ट म्हणून पूर्वी सांगितलें आहे. तें स्वतंत्र असलें तर नागरिकहक्कांचें अधिक संरक्षण होईल हें स्पष्ट आहे. तथापि, न्यायाधीशसुद्धां कार्यकारी सत्तेनेंच नेमलेले असतात; आणि त्यांची बढतीबद्दली जरी कार्यकारी सत्तेवर बाह्यतः अवलंबून नसली तरी कार्यकारी सत्तेचें वजन न्यायखात्यावर व न्यायदानावर पडतच नाहीं असें क्वचितच घडतें. स्वतंत्र मंडळानें न्यायाधिशांची नेमणूक केली तरी हें मंडळ कार्यकारी सत्ताच नेमत असतें. व सूक्ष्म रीतीनें का होईना कार्यकारी सत्तेच्या इच्छेचा विचार होऊनच नेमणुका होतात असा अनुभव आहे. निरपेक्ष स्वातंत्र्य व निर्भय निरपृहता न्यायाधिशांचे ठायीं मोठ्या प्रमाणांत आढळून येते असें कोणी म्हणणार नाहीं. अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे न्यायाधीश हे सर्व समाजांत वावरणारे असल्यामुळें त्यांच्या वर्गनिष्ठ संस्कृतीचा, कांहीं सामाजिक कल्पनांचा संस्कार त्यांच्या मनावर होणें अपरिहार्य आहे. त्यांची प्रेरणा, त्यांची अंतःस्फूर्तिसुद्धां या संस्कारांनीं परिवेष्टित असते. म्हणून जे विवेकाला अगर न्यायाला स्मरून म्हणून ते करतील, त्यांतसुद्धां अभावतः व अत्यंत सूक्ष्म प्रमाणानें हे संस्कार परिणाम करीत असतात असें प्रसिद्ध अमेरिकन न्यायाधीश होल्म यांचें मत आहे. तथापि, न्यायखातें व कार्यकारीसत्ता हीं दोन्ही अलग असणेंच योग्य आहे. अलग व स्वतंत्र असल्यानें एकमेकांचें कार्यक्षेत्र निश्चित होतें व त्यावर आक्रमण न होईल अशी साहजिक दक्षता घेण्यांत येते. आपआपल्या कार्यक्षेत्रांत काय करावें व किती प्रमाणांत तें कार्य करावें याला मर्यादा घालण्यासाठीं, अन्य इलाज केले पाहिजेत. राज्यव्यवस्थेच्या तीन सत्ता कार्यकारी, विधिविषयक व न्यायदानी या स्वतंत्र कल्पितां येतात व त्याप्रमाणें कल्पिल्याही आहेत. तथापि, हे भेद स्थूल स्वरूपाचे आहेत असें व्यवहारांत दिसून येत आहे. आधुनिक कालांत विधिमंडळाचें काम इतकें वाढत आहे कीं, पुष्कळ कायद्यांतून कार्यकारी सत्तेला नियम व वटहुकूम काढण्याची सत्ता देण्यांत येते. वास्तविक हे नियम व हे वटहुकूम कायद्यांचे स्वरूपांत असतात. या दृष्टीनें विचार करतां कार्यकारी सत्ता विधिविषयक कार्य करते. कांहीं ठिकाणीं कार्यकारी सत्तेनें केलेल्या नेमणुकांना विधिमंडळ मान्यता देतें म्हणजे तें कार्यकारी सत्तेचेंच काम करतें.

न्यायाधीश तर नुसता कायद्यांचा अर्थ सांगून थांबत नाहींत, कायदा म्हणजे गत-अनुभव लक्षांत घेऊन विद्यमान परिस्थितीचे दृष्टीनें निश्चित केलेले समाजव्यवस्थेसाठीं विधि अगर निषेध. समाज बदलत असतो. ज्या वेगानें तो बदलतो, त्यांतील परिस्थिती बदलते, त्या वेगानें कायदा बदलत नाहीं. नवीन परिस्थितीला अनुसरून जुना कायदा लावावयाचा तर अन्याय होतो. न्याय करावयाचा म्हणजे कायद्याबाहेर न्यायाधिशानें गेलें पाहिजे. कायदा व न्याय व कायदा व नीति यांतील फरक कमी करणें न्यायाधिशाला प्रसंग आला म्हणजे करावें लागतें. एक तर जुन्या कायद्याचा न्यायाला जुळेल असा नवीन अर्थ करून तो निकाल देतो; म्हणजेच एक प्रकारें कायदा करण्याचें विधिविषयक काम तो करतो. अर्थात् विधिमंडळांतील प्रतिनिधींचे अनुभवाऐवजीं स्वतःचा अनुभव जमेस धरून तो वागतो. येवढी अनियंत्रित सत्ता त्याला अशा प्रकारें लाभते!! अगर जुना कायदा बाजूला ठेवून सरळ न्यायाचे दृष्टीनें, सारासार विचाराचे दृष्टीनें तो वागतो. त्याच्या निर्णयाला प्रतिष्ठा असल्यामुळें व राज्यव्यवस्थेचे तंत्राप्रमाणें जर तो मुख्य न्यायाधिशाचा निर्णय असेल तर कार्यकारी सत्ता त्याला मान्यता देते. म्हणजे एकप्रकारें या निर्णयानें न्यायाधीश नवीन कायदाच निर्माण करीत असतो. तात्पर्य, तीन सत्ता स्वतंत्र कल्पिल्या तरी व्यवहारांत अगदीं कांटेकोरपणानें त्या स्वतंत्र नसतात. तथापि त्या स्वतंत्र ठेवल्यानें राज्यकारभारांत अधिक व्यवस्था, अधिक अधिकारनिश्चिती व नागरिकहक्कांचें अधिकार-संरक्षण शक्य होतें. तथापि, नागरिकस्वातंत्र्याचें खरें संरक्षण नागरिकांचे निर्भय वृत्तीवरच अवलंबून आहे हें विसरून चालणार नाहीं.

प्रजेचे हक्क अगर अधिकार लेखनिष्ठ असोत अगर अलिखित असोत, सनदेप्रमाणें असोत अगर संकेताप्रमाणें असोत, ते कसे मिळवावयाचे हा मुख्य प्रश्न आहे. या दृष्टीनें विचार करतांना आवश्यक असा प्रत्येक अधिकार घेऊन त्याचा विचार प्रथम केला पाहिजे, व प्रत्येक अधिकाराच्या योग्य उपयोगासाठीं राज्यसत्तेवर काय काय नियंत्रण घालणें जरूर आहे हें ठरविलें पाहिजे. हें झाल्यानंतर त्यांतून जरूर ती नियंत्रणव्यवस्था मांडतां येईल. याप्रमाणें ह्या प्रश्नाचा विचार केल्यानें पुष्कळ गोष्टी साध्य होतात. व्यक्ति हिला समाजांत महत्त्वाची भूमिका आहे हें प्रथम लक्षांत घेतलें जातें. व्यक्तीला योग्य जीवन जगण्यासाठीं आवश्यक गोष्टी किमानपक्षीं मिळाल्याच पाहिजेत तरच ती समाजाचे प्रगतींत व जीवनांत कांहीं भर घालूं शकेल हें स्पष्ट होतें. त्या दृष्टीनें विचार करूं लागल्याबरोबर समता व स्वातंत्र्य यांचा अर्थ कसा लावावयास पाहिजे हें कळून येतें. समाजांत काय व्यवस्था असावी, काय स्वरू-

पाच्या शासनसंस्था असाव्यात म्हणजे इष्ट हक्क योग्य रीतीनें उपभोगिले जातील याची कल्पना येते. प्रत्येक हक्क व त्याचे उपभोगासाठीं राज्यसत्तेवर घालावयाची मर्यादा याचा विचार सुरू केल्याबरोबर राज्यसंघटनेचे स्वरूपाचाही विचार सुरू होतोच. मर्यादा घालवयाच्या तर राज्य–सत्तेचा आकार व आशय लक्षांत घेणें अपरिहार्य होतें. राज्यानें हक्क संरक्षणाचे दृष्टीनें कारभारांत कसे संकलन करावें, कसें जुळवून घ्यावें याचेंही दिग्दर्शन होत जातें. राज्य हें कांहीं समाजाबाहेरून आणून समाजाचे शिरावर नियंत्रणासाठीं बसविलेली घटना नाहीं. समाजांतच त्याचा पिंड उत्पन्न झाला असून समाजजीवनानेंच तो वाढत असतो. ही वस्तुस्थिती या पध्दतीनें विचार करतांना उघड होते. समाज आधीं नंतर राज्य; प्रजा आधीं नंतर राज्य हा उपक्रम लक्षांत येण्यानें व्यक्तीची पदवी कायम राहून राज्याचे प्रतिष्ठेला कमीपणा येत नाहीं. व्यक्ति आधीं म्हणून त्यांना आवश्यक वाटणारे हक्क आधीं म्हणून त्यांचें महत्त्व जास्त. कांहीं आवश्यक गोष्टी करण्यासाठीं, समाजाला राजकीयदृष्टीनें सार्वजनिक स्वरूपाच्या संघटनेची जरुरी वाटली म्हणून राज्य निर्माण झालें. ज्या हेतूसाठीं झालें त्याचे दृष्टीने विचार करूनच राज्य योग्य व अयोग्य ठरणें तर्काला धरून आहे. जोंपर्यंत या दृष्टीनें तें योग्य आहे तोंपर्यंतच त्याला नैतिक प्रतिष्ठा व अधिकार आहे हेंही म्हणणें तर्काला धरून आहे. राज्यामुळें व्यक्तीला अवश्य वाटणारे हक्क अगर अधिकार कांहीं उत्पन्न झाले नाहींत, तर राज्याचे आधींपासून ते आहेत. समाजांतील व्यक्ति, त्यांचे हक्क, समाजांतील अनेक संस्था या राज्याचे आधींपासून आहेत. राज्याला प्राप्त झालेलें श्रेष्ठत्व त्यांचेकडून अपेक्षिलेलें कार्य होतें म्हणून झालें. तें कार्य जोंपर्यंत नागरिकांचे समाधानाप्रमाणें होत आहे तोंपर्यंतच त्याचा अधिकार, त्याचें श्रेष्ठत्व. ते अधिकार उपभोगण्यास मिळाले तर नागरिकजीवन सुखी होईल, तें राखण्यानेंच राज्याचा अधिकार चालू राहाणार. तें नाकारल्यानें राज्याचें अस्तित्व व सत्ता जरी राहिली तरी नैतिक अधिकार नष्ट होईल. या अधिकार अगर हक्कांबाबत राज्य कसें वागतें यावरच त्याचें स्वरूप व त्याची लायकी ठरत असते. नैतिक अधिकार घालवून राज्यें राहातात, बराच काळही राहातात पण अधिकार घालविल्यानें त्यांचा नाशही सारखा जवळ येत असतो व तो तें टाळूं शकत नाहीं. झंझावाताची वाट पाहात कांहीं काळ वठलेलें झाडही उभें असतेंच.

वर उल्लेखिलेल्या अधिकारविषयक मीमांसेंत राज्याची कल्पना स्पष्ट आहे. राज्य म्हणजे निश्चित प्रदेशांत राहाणाऱ्या समाजाचें राजकीय स्वरूप दर्शविणारें संघटन. या संघटनेंत प्रत्यक्ष कारभार करणारें विद्यमान सरकार व प्रजा यांचा समावेश होतो.

नागरिकांना विकासाला, उन्नतीला वाव मिळावा म्हणून त्यांना जीवनांत सुख व समाधान लाभावें म्हणून राज्याचा जन्म, त्याचें अस्तित्व व त्याच दृष्टीनें त्याचा अधिकार व त्याचबद्दलची निष्ठा, हें स्पष्ट आहे. याच हेतूला धरून पण नागरिकांचे हक्क व अधिकार हेही उघड आहेत व असे हक्क असतील तर नागरिकांना जीवनसाफल्य शक्य आहे. या परिस्थितींत या हक्कांना अनुसरून राज्याचे निर्बंध व कायदे असले पाहिजेत. कायद्यानें हक्क अगर अधिकार उत्पन्न होत नाहींत तर कायद्यांचे सहाय्यानें त्यांचा उपभोग शक्य केला जातो किंबहुना असा उपभोग शक्य करणें, घडवून आणणें हा कायद्यांचा प्रधान हेतु आहे असें म्हटलें तरी चालेल. विद्यमान संस्था चांगल्या अगर वाईट हें नागरिकांच्या आवश्यक हक्कांच्या दृष्टीनेंच ठरविलें जाणार. या सर्व विचारप्रणालीमागें एक विशिष्ट सामाजिक भाव दिसून येतो. समाजांतील व्यक्ति स्वतंत्र पण तें स्वातंत्र्य राहावें म्हणून सामाजिक बंधनें स्वीकारण्याची तिची तयारी असते. सामाजिक संघटनेमुळें व्यक्तीचे व्यक्तित्वाला येणारी मर्यादा, व्यक्तिविकासाला व्यक्तिमत्वाचे अविष्काराला वाव देणारे अधिकार देऊन, यथायोग्य परिस्थिती निर्माण करून, सुसह्य करण्याची इच्छा असते. सामाजिक संयमापासून व्यक्तिगत शक्ति वाढेल अशी अपेक्षा असते. या दृष्टीनें व्यक्तींना असणारे हक्क अगर अधिकार अर्थशून्य अगर केवळ भूषणापुरते असून चालणार नाहींत. नानाविध व नाना प्रवृत्तींत व्यक्तींनीं आपली उन्नति करून सामाजिक सुखांत भर टाकावा, समाजप्रगति घडवून आणावी हा त्यांचा हेतु आहे. अधिकाराबरोबर व्यक्तिकर्तव्यें हीं आलींच, किंबहुना तीं पार पाडण्यासाठींच अधिकार आहेत. प्रत्येक व्यक्तीला कार्याचे दृष्टीनें स्वधर्म आहे. समाज हा धारणेसाठीं व्यक्तीनें आचारलेल्या स्वधर्मावर अवलंबून आहे. समाजांतील सर्व व्यक्तींना स्वप्रवृत्तिप्रमाणें कार्य नियोजित करून धारणा घडवून आणणारा हा धर्म यथार्थ धर्म आहे. प्रत्येकानें आपलें नियोजित कर्म केलें पाहिजे. कारण समाज हा कर्म अगर कार्यव्यवस्थेवर अवलंबून आहे व कार्यव्यवस्थेपासून मिळणाऱ्या सेवेवर, सामाजिक कल्याणावर त्याचा लौकिक अवलंबून आहे. प्रत्येकानें कार्य करून समाजव्यवस्थेंत आपला भाग उचलला पाहिजे, समाजाचे संपत्तींत भर टाकून ती वाढविली पाहिजे. जन्मतः जी सामाजिक संपत्ति मिळाली, जें वैभव प्राप्त झालें त्यांत प्रत्येक पिढींतील प्रत्येक व्यक्तीनें जातीनें व जाणिवेनें प्रयत्न करून कांहीं तरी भर टाकणें हें त्याचें कर्तव्य आहे. खरें पितृऋण नुसती प्रजा निर्माण करून फिटत नाहीं. या नवीन धर्माप्रमाणें वारसानें आलेलें सामाजिक दुःख व दैन्य कमी करून, विद्यमान सुखांत व समाधानांत, ते ज्या योगें समाजाला मिळतील त्या साधनसामुग्रींत भर

टाकून पुढील पिढीला अधिक सुखी करण्यांत व हा वाढविलेला वारसा ठेवण्यांतच पितृऋण खरें खरें फिटत असतें. जें आहे त्याचा लौकिक सांगण्यांत स्वारस्य नाहीं, आपण काय करूं शकतों, काय होऊं शकतों तें घडवून आणण्यांत पराक्रम आहे, पुरुषार्थ आहे. उपलब्ध सत्तेचा उपयोग करून अवश्य ती परिस्थिती मनुष्य निर्माण करूं शकतो. इष्ट अशी परिस्थिती निर्माण करून पुनः आपल्या सत्तेला अधिक व्यापक क्षेत्र त्याला मिळवितां येतें. प्रत्येक नागरिकाला कार्य आहे म्हणजेच प्रत्येक नागरिकाला काम करण्याचा हक्क आहे, काम करून जीवनाला अवश्य तें मिळविण्याचा हक्क आहे. समाजांत जन्मल्याबरोबर हा हक्क त्याला प्राप्त झालेला आहे व हा जन्मसिद्ध हक्क समाजांत योजनेनें व्यवहार संघटित केल्यास प्रत्येक नागरिकाला उपभोगितां येईल.

व्यक्तीला जन्म दिल्यानंतर त्याला हा हक्क नाकारणें अगर त्याचा उपभोग सामाजिक व्यवस्थेनें अशक्य अगर दुष्प्राप्य करणें हा अन्याय आहे. स्वखुषीनें तो जन्मास आला नाहीं. त्याला कोणी विचारीतच नाहीं! समाज चिरंजीव राहावा म्हणून प्रजोत्पत्ति हें जर खरें तर त्या जन्माला आलेल्या प्रजेची व्यवस्था ही सामाजिक जबाबदारी हें उघड आहे. जर बेजबाबदाररीतीनें प्रजा निर्माण होते असें म्हणावयाचें असेल तर निर्माण झालेल्या प्रजेचा समाजव्यवस्थेशीं संबंध असतो, म्हणून समाजानें आपल्या व्यवस्थेनें जबाबदारीची जाणीव योग्य ठिकाणीं करून दिली पाहिजे. तथापि, कुठल्याहि परिस्थितींत व्यक्ति जन्माला आल्यानंतर तिची जबाबदारी समाजावर आहे. व्यक्तीला जीवनाला लागणाऱ्या गोष्टी मिळूं नयेत याचा अर्थ समाजअव्यवस्था व व्यक्तीचे विकासाचा संपूर्ण नाश. व्यक्ति काम करण्यास व कष्ट करून पोट भरण्यास तयार असतां त्याला काम मिळूं नये ही परिस्थिती म्हणजे समाजाला कलंक आहे; नव्हे, समाज रचनेचे दृष्टीनें दोषपूर्ण आहे हाच त्याचा अर्थ आहे. काम मिळाण्याचा हक्क म्हणजे अमुकच काम पाहिजे असा नाहीं. व्यक्तीच्या प्रवृत्ति, लायकी, शिक्षण, अनुभव लक्षांत घेऊन तिला काम मिळालें पाहिजे. प्रत्येक व्यक्तीला अगदीं तिच्या इच्छेप्रमाणें कामाची निवड करण्याचा हक्क आहे असें मानलें तर तें शक्य नाहीं. प्रत्येकाला राष्ट्राध्यक्ष होण्याची इच्छा असणें स्वाभाविक आहे, पण एका वेळीं एकच होऊं शकतो. प्रत्येक तरुणाला सरसेनापति व्हावें असें वाटणें स्तुत्य आहे पण एका वेळीं एकालाच होतां येईल. लोकमताचा परिणाम म्हणून प्रधानमंडळ गडगडलें तर त्यांतील लोकांना तेंच कार्य त्यांची इच्छा आहे म्हणून द्यावें म्हटलें तर कठीण प्रसंग येईल. म्हणून योग्य समाजव्यवस्थेंत कोठलेंही कार्य

अवास्तव महत्त्वाचें मानलें जाऊं नये. कुठल्याहि कार्याचा अगर जागेचा अफाट गौरव होऊं नये. सेवाबुद्धीनें सर्व कार्यें समान मानलीं पाहिजेत. निदान समाज-प्रतिष्ठेचे दृष्टीनें जास्तींत जास्त समता त्यांत असावी. मुख्य प्रश्न म्हणजे कांहीं वस्तु व कांहीं सोयी समाजाला लागत असतात. त्यांचा पुरवठा होणें जरूर असतें. समाजाला लागणाऱ्या या आवश्यक वस्तु व सोयी यांचे उत्पादनकार्यांत प्रत्येक व्यक्तीला काम मिळविण्याचा हक्क आहे. याप्रमाणें या उत्पादनकार्यांत काम मिळालें नाहीं तर काम केल्यानें मिळणारा मेहनताना तरी मिळाला पाहिजे. व्यक्ति काम करण्यास तयार असल्यास काम समाजानें दिलें पाहिजे नाहीं तर पोसलें पाहिजे. असंख्य बेकार अमर्याद कालपर्यंत कुठलाही समाज पोसूं शकत नाहीं. या परिस्थितीत बेकारीला वावच राहाणार नाहीं अशा स्वरूपाचें राज्यसंघटन पाहिजे हें उघड होतें. समाजांतील उत्पादन योजनापूर्ण असल्याशिवाय हें शक्य नाहीं. अपरिहार्य बेकारीचे काळांत बेकारांना काम नसलें तरी अवश्य तो भत्ता मिळेल अशी व्यवस्था पाहिजे. व्यक्तीचा काम मिळण्याचा अगर काम मिळेपर्यंत भत्ता मिळण्याचा हक्क समाजानें संभाळण्याची योजना केली पाहिजे. योजनेचें तपशीलवार स्वरूप काय असावें हा येथें प्रश्न नाहीं. व्यक्तीचे हक्कांचे जपणुकीचा प्रश्न आहे. व्यक्तीनें काम न करतां समाजावर बांडगुळाप्रमाणें जगावें हा व्यक्तीचा हक्क नाहीं, असा वावही समाजानें आपल्या व्यवस्थेंत तिला देऊं नये. समाजांत राहावयाचें तर काम करूनच राहाण्याचा हक्क आहे व त्याला मान्यता देऊन नव्हे तो मौलिक आहे हें जाणून समाजानें व्यवहार योजनापूर्ण केला पाहिजे.

व्यक्तीला काम करण्याचा हक्क आहे येवढें म्हणून भागत नाहीं. त्यानें केलेल्या श्रमाला पूर्ण मोबदला मिळाला पाहिजे. हा मोबदला हाही त्याचा हक्क आहे. योग्य रीतीनें राहातां येऊन कांहीं आहारनिद्रादिकांपलीकडे व त्यापेक्षां जास्त असें कांहीं जीव-नांत आहे असें वाटण्याइतकी सुस्थिती श्रमाबद्दल मिळणाऱ्या मोबदल्यानें त्याला प्राप्त झाली पाहिजे. असें झालें तरच तो प्रभावी नागरिक होईल, त्याच्या विधायक प्रवृत्तींना वाव मिळेल, जीवनांत त्याला प्रसन्नता वाटेल. अमुकच मोबदला त्याला मिळाला पाहिजे असें या विचारसरणींत निश्चित करतां येणार नाहीं. श्रमानें मिळणारी सर्व ऐपत अगर क्रयशक्ति जर अन्न, वस्त्र व निवास यांच्यांतच खर्च झाली तर त्याला योग्य मोबदला मिळाला नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. या सर्व आवश्यक गरजा यथा-प्रमाणांत भागून कांहीं तरी जीवनाला आनंद देईल, प्रसन्नता आणील अशी साधन-सामुग्री अगर संधि मिळण्याचे दृष्टीनें अवश्य ती ऐपत अगर पैसा त्याच्याजवळ

राहिला पाहिजे. आधुनिक समाजांत काहीं ठिकाणीं पशूंनासुद्धां आवश्यक तें देऊन आणखी त्यांच्यावर खर्च करण्यांत येतो ! ! पण समाजांतील मूलभूत महत्त्वाची बाब म्हणजे व्यक्ति; यांना अनेक ठिकाणीं जगण्याइतकेंसुद्धां मिळत नाहीं. व्यक्तीला त्याचे श्रमाचा योग्य मोबदला मिळाला पाहिजे म्हणजे सर्व प्रकारच्या श्रमांना सारखा मोबदला असा त्याचा अर्थ नाहीं. पण सर्वांना जरूर तेवढें मिळाल्याशिवाय कोणालाही जरुरीपेक्षां जास्त मिळतां कामा नये. सर्वांना भाकरीचटणी प्रथम मिळाली पाहिजे, नंतर कुणाला पुरीबांसुदी मिळाली तर क्षम्य ठरेल. येवढें तरी झालें पाहिजे. आज एकीकडे झोंपड्यांतून केवळ हाडांचे चालतेबोलते सांपळे अर्धनग्न स्थितींत व अर्धपोटीं दिवसभर कष्टतांना दिसतात तर दुसरीकडे प्रासादांतून दिवसांतून तीन वेळां पोशाख बदलून चार वेळां आहार करून 'सुखंच मे शयनंच मे' प्रवृत्तीचे लोक दिसून येतात. हें दृश्य न्यायी दृष्टीला असह्य आहे. बहुसंख्यांकांनीं खपावें व थोड्यांनीं विनाश्रम खावें यांत न्याय नाहीं. जगांतील उपलब्ध साधनसामुग्री सर्वांना योग्य प्रमाणांत दिल्यास अपुरी पडेल या म्हणण्यांत सत्य कदाचित् असेल पण तिची होत असलेली वांटणी यांत न्याय आहे असें मात्र सिद्ध होत नाहीं. उपलब्ध संपत्ति व सामुग्री सर्वांना सारखी वांटली तर गरिबांची गरिबी तसूभर सुद्धां कमी होणार नाहीं असें जरी आंकडे मांडून सिध्द झालें तरी त्याजबरोबर विद्यमान उत्पादनपध्दति व विद्यमान व्यवहार दोपपूर्ण आहे हेंही सिध्द झालें. सर्वांच्या हिताचे दृष्टीनें ही विद्यमान उत्पादनपध्दति बदलली पाहिजे असेंच स्पष्ट होतें. लोकांच्या गरजा पूर्ण करणें हें तर उत्पादनाचें ध्येय असलें पाहिजे. योग्य राहाणीला आवश्यक असणारें उत्पादन पूर्ण प्रमणांत शक्य नसेल तर लोकसंख्येला नियंत्रण घातलें पाहिजे. अयोग्य व अपुऱ्या राहाणींत असंख्य लोकांना राहाणें टाळण्यासाठीं, लोकसंख्या नियंत्रित करणें जरूर झाल्यास व्हावयास पाहिजे. योग्य राहाणीचें ध्येय ठेवलें, त्याची परंपरा उत्पन्न झाली कीं लोकसंख्येला नियंत्रण बसतें असा अनुभव पाश्चात्य देशांत आला आहे. अफाट लोकसंख्या असलेल्या देशांत दुःख, दारिद्र्य व हीन राहाणी आज तरी दिसून येत आहे. योग्य राहाणी ठरवून त्याप्रमाणें समाजानें लोक राहूं लागतील अशी व्यवस्था सुरू केल्यानेंच लोकसंख्येवर आपोआप नियंत्रण बसणें शक्य आहे. जास्त प्रजा म्हणजे राहाणींत फरक, सुखांत कमतरता, याची जाणीव समाजांत आपोआप उत्पन्न होते व त्याचा परिणाम इष्ट तोच होतो.

आहे या लोकसंख्येसाठीं योग्य राहाणीच्या दृष्टीनें विद्यमान साधनसामुग्री योजनापूर्ण व्यवहार केल्यानें पुरी पडेल कीं नाहीं हें कोणीं विस्तृत विचार करून

पाहिलें नाहीं. लोकसंख्या नियंत्रित केली तरी सुद्धां त्याच दृष्टीनें विद्यमान सामुग्री पुरी पडेल का हेंही कोणीं फारसें पाहिलें नाहीं. विद्यमान साधनसामुग्रीचा उपयोग ज्या उत्पादनपध्दतीनें होत आहे तिचें ध्येय समाजाच्या गरजा भागविणें हें नसून भांडवलवाल्यांना कमाल नफा मिळवून देणें हें आहे. उपलब्ध साधनसामुग्री ही सेवेचे दृष्टीनें उपयोगिली न जातां संचित वाढविण्याकडे ती वापरली जात आहे. प्रत्यक्ष समाजाचे गरजेसाठीं उत्पादनाचा कारभार संघटित केल्यानें काय परिणाम होतील हें तपशीलवार सांगतां आलें नाहीं तरी रशियांतील अनुभव उत्साहजनक व आशादायक आहे. किरकोळ हातपाय व पोटाची ढेर असणाऱ्या मनुष्यापेक्षां प्रमाणांत शरीर असणारा मनुष्य तितकेंच वजन असून जास्त सशक्त, जास्त चलाख व जास्त कार्यक्षम असतो. रशिया व्यतिरिक्त देशांत ज्याचेजवळ भांडवल आहे त्यानें उठावें व धंदा सुरू करावा अशी सर्वसामान्य परिस्थिती आहे. अनेक धंदे तत्संबंधीं संपूर्ण माहिती नसतां, चालविण्याची पात्रता नसतां, केवळ नफा मिळेल, भांडवलावर योग्य व्याज सुटेल अशा भरवंशानें काढले जातात. ते काढतांना समाजाची गरज, तिची तीव्रता अगर तिचा व्याप लक्षांत घेऊन तीं भागवावी ही दृष्टि नसते. अनेक धंदे बुडून साधनसामुग्रीचा नाश होतो. केवळ भांडवल आहे, पैसा आहे म्हणून वाटेल तो व्यवहार करतां यावा व समाजांतील साधनसामुग्री व सरंजाम यांचा वाटेल तसा उपयोग करतां यावा ही परिस्थितीच आजच्या अनेक आपत्तींना जबाबदार आहे. पैसा व पात्रता, लक्ष्मी व लायकी, फारशी एके ठिकाणीं राहातात असा त्यांचा लौकिक नाहीं. धंद्यांत प्रवेशबंदी नाहीं. किमान पात्रतासुद्धां कुठेंही समाजानें ठेवली नाहीं. वकील व्हावयाचें तर परीक्षा द्यावी लागते, डॉक्टर व्हावयाचें तर परीक्षा द्यावी लागते, यापैकीं कुणाचेही हातून चूक झाली तर राज्यसत्ता त्यांना शासन करते. ज्यांचें नुकसान होईल त्यांना भरपाई कायद्याप्रमाणें मागतां येते. याचे उलट धंद्यांत वाटेल ते केलें, वाटेल त्या प्रकारें समाजाचें नुकसान झालें तरी राज्यसत्ता व्यक्ति-स्वातंत्र्याचे नांवावर त्यांत लक्ष घालणार नाहीं. लक्ष्मीपति विष्णु हाच पृथ्वीपति आहे याचा आधुनिक अर्थ भांडवलवाल्यांची रखवालदारी करणारी संस्था म्हणजे राज्य-सत्ता हाच होय. अन्यत्र वर्णव्यवस्था मोडणारी राज्यसत्ता लक्ष्मीवंताचे सोयीसाठीं जन्मजात श्रेष्ठत्व मानते. डॉक्टरचा दवाखाना, मुलगा डॉक्टरकीची परीक्षा पास झाल्या-शिवाय चालवूं शकत नाहीं, वडिलांची वकिली चालवावयाची तर परीक्षा पास होऊनच. पण वडिलांची गिरणी, सराफी दुकान अगर सावकारी कुठलाही धंदा चाल-विण्यासाठीं चिरंजिवांना परीक्षा द्यावी लागत नाहीं. धंद्यांतील ज्ञान असो नसो, अवश्य

ती लायकी असो नसो वारसा मिळतोच व त्यालाच तो मिळेल अशी कायद्याची व्यवस्था राज्यसत्ता करते. समाजाला अवश्य तें उत्पादन करावें असें सुद्धां छातिठोकपणें या लक्ष्मीपुत्रांना राज्यसत्ता सांगत नाहीं. ज्यांच्या श्रमावर उत्पादन होतें त्या कामगारांचे संबंधीं कायद्यानें अवश्य तेवढाच विचार भांडवलवाले करतात, आणि तोही कायदा यशस्वी रीतीनें कसा चुकवितां येईल या दृष्टीनेंच बहुशः होतो. ज्ञान वाढत आहे, शोध लागत आहे, मोठ्या प्रमाणावर उत्पादन होणें शक्य आहे, पण हें करून सर्व समाजाला त्याचा यथान्याय उपयोग व्हावयाचा तर उत्पादनपद्धतीच बदलली पाहिजे. समाजांतील उत्पादनाची साधनसामुग्री खाजगी मालकीची ठेवून वरील हेतु साध्य होणार नाहींत. आजच्या स्थितींत निदान जे उद्योगधंद्यांत काम करून पोट भरणारे कामगार आहेत, त्यांना तरी योग्य राहणीला पुरेल येवढें वेतन मिळालें पाहिजे. ही किमान अपेक्षासुद्धां राज्यसत्ता पुरी करते, अगर करवून घेतेच असें नाहीं.

सर्व व्यवहार नियोजित झाले, उत्पादन योजनापूर्ण झालें तरीसुध्दां योग्य राहाणीचे दृष्टीनें सर्वांना तें पुरें पडत नाहीं असें आढळून आलें तर प्रश्न कसा सोडवावयाचा? राहाणीचें प्रमाण कायम ठेवावयाचें तर कांहींना कांहींच मिळणार नाहीं. पुरें कोणीं घ्यावयाचें व भूकें कोणीं मरावयाचें हें कसें ठरविणार? बरें, कांहीं न ठरवून भागणार नाहीं. समाजानें अगर राज्यसत्तेनें ठरविलें नाहीं तर समाजांत अव्यवस्था होऊन न्यायनीति सोडून ज्याचा जोर त्याची जोरु व त्याचीच जमीन असा प्रसंग येईल. ज्याला जमेल त्यानें मिळवावें, ज्याला बाळगतां येईल त्यानें बाळगावें; संयम व निर्बंध संपतील. या परिस्थितींत समाजव्यवस्था नाहीं मग तत्संबंधांच्या मीमांसेला जागाच नाहीं!! कांहीं नियम, कांहीं नीति, कांहीं न्याय यावरच समाजव्यवस्था होऊं शकते. संयम हा तर समाजधारणेचा प्राण आहे. त्याचे अभावीं माणसें लबाडीनें, दांडगाईनेंच जसें जमेल तसें वागतील. त्यांची नीति म्हणजे अरण्यांतील श्वापदांची नीति. बलिष्ठानें कनिष्ठाचा बळी घ्यावा हा एकच कायदा तेथें प्रभावी असतो. आतां राज्यसत्तेनें कुणीं घ्यावें व कुणीं मुकावें हें ठरवावें म्हटलें तर आज तें ठरत नाहीं म्हणून आजची तरी उत्पादनपध्दति व चालू देणारी राज्यपध्दति नालायक आहेत, निषेधार्ह आहेत हें तर सिध्द होतेंच. आज श्रमाचा मोबदला तरी नीतिमान्य व न्यायनिष्ठ पध्दतीनें मिळतोच असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. ठोकळमानानें असेंही म्हणतां येईल कीं, श्रमाला मिळत असलेला मोबदला, लायकी अगर शील यांच्या दृष्टीनें व्यस्त प्रमाण असतो. अधिक अधिक श्रम, लायकी व चारित्र्य यांना कमी कमीच मोबदला मिळतो असें दिसून येतें. नालायक सत्ताधीश व अश्रमी लक्षाधीश हीं दोन सामाजिक

शल्यें आधुनिक जगांत अनेक ठिकाणीं दिसतात. लोकशाही व्यवस्थेंतही मनुष्याचें जन्मानंतर लोकशाही सुरू होते. जन्माला घालतांना मातापितरें अर्भकाला विचारीत नाहींत. कदाचित् अज्ञानाला मत नाहीं म्हणून तें होत नसेल ! भाग्यानें श्रीमंत माता-पितरें असतील तर सर्व सुखें मिळलींच व बिनश्रमानें; कांहीं तरी उत्पादन केलें व समाजानें घेतलें, झाला भांडवलवाला श्रीमंत; यांत श्रम, लायकी, चारित्र्य यांना स्थानच नाहीं. दोन्हींतही यदृच्छा काम करते. देशाचे विचारसंपत्तींत भर टाकणारा, साहित्य निर्माण करणारा जन्मभर दरिद्रि राहातो, तर जडीबुटीच्या जाहिराती देऊन वैदूसम ज्ञान असलेले लक्षाधीश होतात. मूल्यें ठरविण्याची ही रीत नाहीं. यांत कांहीं न्याय नाहीं, कांहीं सारासार विचार नाहीं. संपदा स्वयमेव येत नाहीं व गुणलुब्ध होऊनही येत नाहीं. पैसा व पात्रता यांचा संबंधच समाज लक्षांत घेत नाहीं.

या सर्व अन्यायाचें व अव्यवस्थेचें मुख्य कारण असें आहे कीं, समाजव्यवस्था, आर्थिक व्यवहार हे कसे असावेत, हे कधीं ठरवून त्याप्रमाणें घडवून आणण्याचे जाणिवेनें प्रयत्न होत नाहींत. समाजव्यवस्थेचें नियंत्रण करावयाचें, आर्थिक व्यवहार नियोजित करावयाचा तर काय काय गोष्टी करावयास पाहिजेत, काय तत्त्वें त्यांत येतात, कोणत्या तत्राचा अवलंब केला पाहिजे, काय संस्था समाजांत निर्माण केल्या पाहिजेत, या सर्व बाबींचा तपशीलवार विचार व्हावयास पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे हें करण्याचा समाजाचा, राज्यसत्तेचा हक्क आहे, नव्हे कर्तव्यकर्म आहे हें ठरलें पाहिजे. राज्यसत्ता म्हणजे फक्त शांतता व सुव्यस्थेचा रखवालदार. त्यापलीकडे तिला कार्यक्षेत्र नाहीं, ही घातकी विचारसरणी प्रथम टाकून दिली पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्य याचा अर्थ सामाजिक अव्यवस्था व अन्याय हा होतां कामा नये. सामाजिक न्यायाला अनुकूल असेल तेंच व तेवढेंच व्यक्तिस्वातंत्र्य हें योग्य आहे. प्रत्येक व्यक्ति आपले हिताबाबत दक्ष आहे, तेव्हां सर्वांना मोकळीक दिली म्हणजे जो तो आपआपलें हित साधण्याचा प्रयत्न करील व त्या योगें समाजाचे दृष्टीनें कमाल हित साधेल ही विचार-सरणी अनुभवानें चुकीची व घातुक ठरली आहे. काम न मिळाल्यास मरण. म्हणून मालक जेवढें देईल तेवढें घेऊन सरासरी जिवंत राहाणारा मजूर स्वतंत्र आहे, त्याला व्यक्तिस्वातंत्र्य आहे हें म्हणणें म्हणजे समता व स्वातंत्र्य यांची विटंबना आहे. मरण्याचें स्वातंत्र्य व मेल्यानंतर समता निश्चित त्याला आहे !! मालक—मजूर दोघांच्याही शरी-राची राख सारखीच होते !! या परिस्थितींत व्यक्तींच्या हितांची रास म्हणजे कमाल सामाजिक हित हें गणित चुकीचें आहे. या त्रैराशिकांत थोड्यांना पुष्कळ मिळून पुष्कळांना थोडेंच मिळतें. यांत कांहीं तरी न्याय मिळावा म्हणून राज्यसत्तेनें

हस्तक्षेप करून गेल्या शतकांत अनेक देशांतून औद्योगिक बाबतींत कायदे करून समाजघातकी व्यक्तिस्वातंत्र्य व करारस्वातंत्र्य यांना थोडा आळा घातला आहे. राज्यानें याहीपेक्षां पुढें गेलें पाहिजे. अनिवार्य म्हणून हस्तक्षेप न करतां हा समाजाचा संसार आपला आहे म्हणून त्यांची आपुलकीचे भावानें व्यवस्था केली पाहिजे. बापाला लंगडा व लठ्ठ, मंद व मतिमान् दोन्ही मुलें आपलींच म्हणून त्यांच्यांत तो पंक्ति-प्रपंच करीत नाही; लंगडा व मंद म्हणून त्याला उपाशी तो ठेवींत नाहीं. ही बापाची कळकळ व त्यामागील सुप्त पण सत्य अशी नैतिक जबाबदारी, राज्यानें दाखविली पाहिजे. फार काय पंगु मुलांची बाप विशेषच काळजी घेतो ही सुद्धां वृत्ति राज्यांत आली पाहिजे. समाजांत जें चाललें आहे ते न्याहाळत चौकांतील शिपायाप्रमाणें नुसती जन्ममृत्यूची ये–जा पाहण्याचें त्याचें काम नाहीं. राज्य यापुढें प्रेक्षक असून भागणार नाहीं; तें प्रेरक झालें पाहिजे. वाक्य चूक का बरोबर येवढें सांगणारा वैय्याकरणी न राहतां समाजजीवनग्रंथांत क्षणाक्षणाला रम्यता उत्पन्न करणारा, अर्थगौरव उत्पन्न करणारा, पदलालित्य दाखविणारा, प्रमाणज्ञ असा रचयिता राज्य यानें झालें पाहिजे. आधुनिक युगाची ही त्याला हांक आहे. समाजांतील व्यक्तींच्या मौलिक गरजा त्यानें भागविल्या पाहिजेत, नाहीं तर नाश स्वीकारला पाहिजे हें स्पष्ट आहे. हा इशारा लक्षांत घेऊन आधुनिक उत्पादनव्यवस्थेंतील अव्यवस्था त्यानें दूर केली पाहिजे. उत्पादनाची साधनसामुग्री व सरंजाम खाजगी मालकीचा असल्यामुळें, ही मालकी संघटित होऊन कायदेशीर दरवडेखोरी समाजांत कशी वावरू शकते याचा अनुभव सर्वत्र आहे. वस्तूची विक्री–किंमत तिचा पुरवठा कमी करून, सव करून वाढवि-ण्यांत येते व ती समाजाकडून उघड उघड वसूल करण्यांत येते. उत्पादनखर्च व विक्री–किंमत यांत सामाजिक परिस्थितीचा फायदा घेऊन जास्तीत जास्त फरक उत्पन्न करून तो सगळा फायदा म्हणून घशांत टाकण्याचा सारखा प्रयत्न खाजगी मालकी करीत असते. संपन्न व संघटित झालेले उद्योगधंद्यांतील भांडवलवाले हातीं असलेल्या साधनसत्तेचे जोरावर राज्य–सत्तेला वांकवितात व आपल्याला जरूर त्या रीतीनें तिचा उपयोग करून घेतात. हें टाळावयाचें असेल तर सबंध उत्पादनव्यवस्था राज्य-सत्तेनें आपल्या अधिकारांत आणली पाहिजे. प्रत्येक नागरिकाला त्याचे श्रमाबद्दल योग्य मोबदला मिळाला पाहिजे हें तत्त्व मौलिक मानून त्या दृष्टीनें उपाययोजना केली पाहिजे, अवश्य ते कायदे व संस्था निर्माण केल्या पाहिजेत, उद्योगधंदे काय प्रमाणावर चालावे हें त्यानें ठरविलें पाहिजे. खाजगी मालकी ठेवलीच तर निदान कामगारांना योग्य मोबदला मिळाल्याशिवाय भांडवलवाल्यांना नफा वांटला जाऊं

नये हा निर्बंध घातला पाहिजे. कुठलाही उद्योगधंदा चालू ठेवावयाचा झाल्यास कामगारांच्या आरोग्याचे व संरक्षणाचे दृष्टीनें एक प्रमाणव्यवस्था सर्वत्र असली पाहिजे. हें राज्यानें सांगितलें पाहिजे व तें प्रमाण संभाळिलें जाईल याची दक्षता घेतली पाहिजे. हें प्रमाण व त्याचप्रमाणें योग्य राहाणीचे दृष्टीनें योग्य मोबदला हें परिस्थितीप्रमाणें राज्यानें ठरविलें पाहिजे. हें ठरविण्यासाठीं अवश्य त्या संस्था राज्यानें निर्माण केल्या पाहिजेत. आजही अनेक राज्यांतून किमान–वेतन–योजना मान्य करण्यांत आल्या आहेत. कांहीं ठिकाणीं वेतन मालक व मजूर यांच्या विचारविनिमयानें ठरतें. जेथें असें नसेल तेथें सरकारी व्यवस्था निर्माण झाली पाहिजे. व्यक्तिस्वातंत्र्य अगर करारस्वातंत्र्य हें दुर्बलांना, असंघटितांना, लुबाडलें जावें म्हणून नाहीं. त्यांचे योग्य हितांचे संरक्षणार्थ तें मर्यादित करण्याचा राज्यसत्तेचा अधिकार आहे. आधुनिक उद्योगधंद्यांत सर्वत्र यांत्रिकता आली आहे. प्रत्येक क्षणाला कामगारांचे हात व पाय धोक्यांत असतात. या स्थितींत धंदे चालविण्याला परवानगी देण्यापूर्वीं अगर ते चालू ठेवतांना, कांहीं मर्यादा सरकारनें घातल्या पाहिजेत. मजूर वाटेल त्या स्थितींत अगर वाटेल त्या वेतनावर काम करण्यास तयार असला तरी सरकारी मर्यादेविरुद्ध वागणाऱ्या कारखान्यांत अगर सरकारी मर्यादेखालीं वेतन घेऊन काम करण्याचें स्वातंत्र्य त्यास नसावे. मालकानें सरकारी वेतन प्रमाणापेक्षां जास्त देण्याचें ठरविल्यास व या प्रमाणापेक्षां जास्त वेतन घेऊन कामगारांनीं काम करण्याचें ठरविल्यास अर्थात् दोघांनाही मोकळीक असावी. जेथें खाजगी मालकीच नाहीं तेथें हा प्रश्नच नाहीं. सरकारी मालकी जेथें आहे तेथें वेतन कमी–जास्त झालें तर तें सामाजिक हिताचेच दृष्टीनें होईल हें प्रथमदर्शनीं तरी मानलें पाहिजे. जगांतील घडामोडींचा प्रत्येक राष्ट्रावर परिणाम होत असतो; त्या दृष्टीनें राज्यांतील वेतनप्रमाणही बदलणें शक्य आहे. तथापि, नागरिकाचे जीवनाला अवश्य त्या गोष्टींचा त्याग त्यास करण्यास सांगून कुठलाही उद्योगधंदा राष्ट्रांत चालतां कामा नये. राज्यावरच संकट आलें, युध्दप्रसंग आला तर या व असल्या आकस्मिक व अपवादात्मक प्रसंगीं कांहीं काळ नागरिकांना स्वार्थत्याग करावयास सांगणें योग्य ठरेल. परंतु याही प्रसंगीं जर नागरिकांना कमी देऊन भांडवलल्यांचें पुरतें करावयाचें असेल तर तें अश्लाघ्य व अन्याय्य आहे व तें होतां कामा नये. राजकीयसत्तेमार्फत व्यक्तींना करावयास लागणारा त्याग सामाजिक हितासाठींच झाला पाहिजे, अन्य व्यक्तींचे हितासाठीं होतां कामा नये. समाजांत श्रमावर नागरिकत्व आहे म्हणून श्रम करतो तर त्याची नागरिक ही पदवी यथार्थ होईल इतकें वेतन त्याला मिळालें पाहिजे. आपण यंत्र नाहीं, मनुष्य आहों व

मानवी जीवनांतील शक्य तेवढा आनंद व उत्कर्ष आपणास साधतां आला पाहिजे अशी त्याला जाणीव असली पाहिजे व तें साध्य होईल असें वातावरण राज्यसत्तेनें आपल्या व्यवस्थेनें निर्माण केलें पाहिजे.

वरीलप्रमाणें व्यवस्था करण्यासाठीं वेतनप्रमाण सर्व धंद्यांत सारखें पाहिजे अगर सारख्याच पद्धतीचें पाहिजे असें मानण्याचें कारण नाहीं. तशी व्यवस्था कधीं काळीं समाज करूं शकला तर तो धन्यतेला पात्र होईल. किमान शर्त, किमान हक्क म्हणून येवढें राज्यसत्तेनें मान्य केलें पाहिजे कीं, कुठलाही उद्योगधंदा कामगारांना योग्य वेतन दिल्याशिवाय चालूं नये. सैनिकांची भरती होतांना त्यांची उंची, त्यांची छाती, त्यांचें वजन यांचें किमान प्रमाण ठरलेलें असतें. त्याचे खालीं पडणारा इसम भरती करण्यांत येत नाहीं. त्याचप्रमाणें उत्पादनसृष्टींत प्रवेश करणाऱ्या कोणत्याही उद्योग-धंद्यांत किमान वेतनप्रमाण मिळेल अशी ग्वाही असेल तरच त्याला प्रवेश मिळावा. या किमान वेतनप्रमाणापेक्षां जास्त दिल्याशिवाय श्रमांत कार्यक्षमता येणार नाहीं हें शक्य आहे. सर्वांनाच गुणदोष व कर्तृत्व लक्षांत न घेतां सारखेंच वेतन दिलें तर गुणी कामगार मामुली काम करील, त्याला अधिक चांगलें काम करावें यासाठीं स्फूर्ति राहाणार नाहीं, मनाची ओढ राहाणार नाहीं. अधिक काम करावें, अधिक चांगलें काम करावें, कारण त्यापासून अधिक प्राप्ति होईल अशी परिस्थिती असेल तर माणसें स्वाभाविक अधिक काम करतील. हा मनुष्यस्वभाव आहे. पण मनुष्यस्वभाव ही कांहीं स्वयंभू अगर सिद्धस्वरूप अशी गोष्ट नाहीं. मनुष्य स्वभाव हा शेंकडों शतकें देशकालपरिस्थितीप्रमाणें बनत बनत बनला आहे. उत्क्रान्त अगर इतिहासनिष्ठ अशी घटना तो आहे. ( **Historical Category** ); म्हणजे परिवर्तनक्षम तो आहे. तो बदलूं शकतो इतकी गोष्ट निश्चित. आजही मनुष्य आयुष्यांतील सर्व गोष्टी केवळ पैशाचे अगर प्राप्तीचे हेतूनें करीत नाहीं. धर्मासाठीं, समाजसेवेसाठीं, कलेसाठीं, शास्त्रासाठीं अनेक माणसें निष्कामबुद्धीनें श्रमत असतात. त्या त्या प्रयत्नांत ते इतके रमलेले असतात, इतके तन्मय झालेले असतात कीं, वेतनादि बाह्य गोष्टींचा त्यांना विसर पडलेला असतो. मनुष्याच्या मनोमंदिरांत अगदीं आंतल्या गाभाऱ्यांत, कोपऱ्यांत का होईना कुठें तरी श्रेष्ठ अशा आदर्शाची प्रतिमा असते. त्यांत सर्वत्र नाण्यांचाच आवाज ऐकूं येतो असें नाहीं. मधून मधून श्रेष्ठ जीविताचे संगीताचा तेथें आलाप निघत असतो. त्याचे स्वभावांतील, निष्कामबुद्धीनें काम करण्याची छटा अधिक व्यापक करणें शक्य आहे, परिस्थितीवर तें अवलंबून आहे. समाजांतील मूल्यें संपत्तीवर न आधारलीं जातां सेवेवर आधारलीं गेलीं कीं कर्मप्रेरणेचें स्वरूप बदलेल. आवश्यक

तेवढें सर्वांना मिळत आहे व अधिक काम करून अगर अधिक चांगलें करून सामाजिक हित कीं ज्यांत व्यक्तिहिताचा समावेश आहे, तें साधतें व व्यक्तीची सामाजिक प्रतिष्ठा वाढते, असें होऊं लागलें म्हणजे अधिक श्रमाबद्दल अधिक प्राप्तीची अभिलाषा राहाणार नाहीं. मनुष्याला संपत्ति प्रथम जीवनाला आवश्यक गरजांसाठी, व नंतर प्रतिष्ठेसाठीं मिळवावीशी वाटते. योग्य राहाणी हा नागरिकहक्कच जाहाला व प्रतिष्ठेचा आधार संपत्ति न राहातां समाजसेवा झाला म्हणजे कर्मांची प्रेरणा प्राप्ति अगर संपत्ति राहाणार नाहीं, सेवा राहील. ही परिस्थिती अर्थात् एकदम येणार नाहीं, हे विचार एकदम रुजणार नाहींत. कांहीं काळपर्यंत वेतनांत फरक राहील. पण किमान वेतन सर्वांनाच मिळेल. विशेष कसबी, विशेष कारागीर यांना कांहीं अधिक द्यावें लागेल. शारिरिक श्रम करणाऱ्यांना किमान वेतन हें मौलिक हक्क म्हणून मिळून अधिक काम करणारांना लायकीप्रमाणें, गुणांप्रमाणें मिळालें पाहिजे. राष्ट्राच्या प्रपंचां-तीक सुवर्ण, कांहीं प्रमाणांत सर्वांनाच मिळालें पाहिजे व त्यापेक्षां अधिक, अधिक लायकी पाहूनच वाटलें पाहिजे. ही जादा वांटणी समाजांतील सर्वांच्या सामान्य व आवश्यक अशा गरजा भागल्यानंतरच होणार. राष्ट्राच्या प्राप्तीवर सर्वांना योग्य राहाणीनें राहातां येईल इतकी व्यवस्था करण्यास अवश्य ती रक्कम हा पहिला बोजा आहे; नागरिकांचा हा अग्रहक्क आहे. त्यानंतर उत्पादन अधिक चांगलें व्हावें, अधिक प्रमाणांत व्हावें, तत्संबंधीं शास्त्रीय शोध व्हावेत वगैरेसाठीं, कांहींना अधिक मेहनताना देणें विद्यमान परिस्थितींत जरूर आहे. सोव्हियट रशियांत हाच अनुभव आला आहे. मात्र हें देतांनासुद्धां मालक व मजूर यांना या बाबतींत स्वातंत्र्य असूं नये. निःपक्षपाती अशा संघटनेनें अगर संस्थेनें लायकीचें, गुणांचें, कसबांचें प्रमाण ठरवून त्याप्रमाणें वेतनयोजना आंखली पाहिजे. गुणांना अनुसरून वेतन मिळालें पाहिजे. मोकळीक ठेवली कीं पुन्हां मालक, मजुरांना हताश केल्याशिवाय राहाणार नाहींत. प्रसंगीं मजूर पण मालकांना सताविल्याशिवाय राहाणार नाहींत व त्यायोगें सामाजिक नुकसान होईल. जेथें सरकारी मालकी आहे तेथें गुणानुसार अधिक वेतन मिळण्याची योजना ठरविण्याचें काम सहकार्यानेंच होईल.

योग्य राहाणीला आवश्यक वेतन, पुरेसें वेतन याला योग्य वेतन म्हणणें गैर होणार नाहीं. नुसतें योग्य वेतन दिल्यानें भागणार नाहीं. योग्य वेतनासाठीं मनुष्यानें दररोज किती खपावें, किती वेळ श्रम करावेत यालाही मर्यादा पाहिजे. योग्य वेतन योग्य श्रम करूनच मिळालें पाहिजे. श्रमानंतर मनुष्याला विश्रांति मिळून मनाला विरंगुळा मिळाला पाहिजे. मनोरंजन करून प्रसन्नता मिळवितां आली पाहिजे. ज्ञाना-

र्जन करून जीवन उन्नत करतां आलें पाहिजे; त्याच्यांत जें कलात्मक असेल, जें विधायक असेल, त्याचे आविष्कारासाठीं वेळ मिळाला पाहिजे. साराच वेळ अगर बहुतेक वेळ अवश्य तें मिळविण्याचे श्रमापायींच खर्च झाला तर हें कांहीं शक्य नाहीं. दिवसा श्रम व रात्रीं निद्रा यांतच आयुष्य सरलें तर मनुष्य माणुसकीलाच मुकतो. विचारशील मनुष्य म्हणजे नागरिक. जर विचाराला वेळच नाहीं अशी स्थिति असेल तर मनुष्याचा नागरिकहक्कच नष्ट करणें होय. श्रमाला शारीरिक मर्यादा आहे. तथापि तेथपर्यंत श्रम मनुष्यानें करूं नयेत म्हणून राज्यानें कांहीं तरी मर्यादा घातली पाहिजे. दिवसभर तेंच तेंच यंत्र चालवून अगर त्याचेपुढें उभें राहून मनुष्य वृत्तीनें तत्सम बनतो. अहोरात्र तारायंत्र बडविणारे झोपेंतसुद्धां बोटांची हालचाल त्याच ठेक्यावर करतात! जन्मभर घोंटीव आयुष्य काढून माणसें निर्बुद्ध होतात, सर्व दृष्टींनीं निःसत्व होतात. श्रम व विश्रांति यांचा योग्य मेळ घालून आयुष्यांत कांहीं विविधता उत्पन्न करून त्यांतील आनंद उपभोगण्याचा प्रत्येक नागरिकाला हक्क असला पाहिजे. सतत श्रमी व विश्रांतिशून्य आयुष्यानें मनुष्याचें मन मारलें जातें, त्याचें व्यक्तित्व चिरडलें जातें, जीवन निरर्थक वाटून उदासपणाची कळा जीवनभराची साथी होते. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत कारखान्याचे गलगल्यांत काम करून थकून भागून आलेला मजूर कावलेला असतो. त्याची विचारशक्ति क्षीण झालेली असते. त्याचे निर्विचारी मनाला जणूं मुंग्या येऊन तें निर्जीव झालेलें असतें!! विकासी भावनांना साद देण्याइतकी प्रसन्नता त्याचे हृदयांत असूं शकत नाहीं. तो यंत्रें चालविणारा खरा, पण यंत्रेंच त्याला चालवितात. यंत्राबरोबर त्याची मानसिक सृष्टीही गिरक्या घेत जाते. यंत्राचा तो गुलाम होतो व आपलें स्वातंत्र्य न कळत पण निश्चितपणें तो घालवितो. हा सर्व अनुभव पाश्चात्य देशांत औद्योगिक युग सुरू झालें तेव्हां आला. राज्यानें कांहीं निर्बंध घालून कांहीं अतिरेक थांबविले. राज्याचें कार्य केवळ निषेधात्मक नसावें, तें विधायक असावें, राज्याचें स्वरूप निराकरणी नसून कारक, प्रेरक असावें [ Positive State ] हें हळूहळू त्या वेळेपासून मान्य होत आलें आहे. काय करूं नये येवढे निर्बंध घालून न थांबतां, काय करावें हें सांगून त्याप्रमाणें घडवून आणावें ही भूमिका राज्यानें घेतली पाहिजे. नेति नेति म्हणून भागणार नाहीं. अन्न हें ब्रह्म आहे, ज्ञान हें ब्रह्म आहे, आनंद हें ब्रह्म आहे असें सांगून त्या ब्रह्माची प्राप्ती राज्यानें सर्वांना करून दिली पाहिजे. योग्य विश्रांति मिळाली पाहिजे हा नागरिकाचा हक्क आहे. तसें झालें तरच त्याला वेळ मिळून मनाची उन्नति तो करील, मन कांहीं आहे असें त्याला वाटूं लागेल, ज्ञानाची गोडी

उत्पन्न होऊन, त्याचा स्वाद तो घेईल. ज्ञानसुद्धां भोक्त्यांचे अभावीं नष्ट होतें.ज्ञान-नेत्र त्याला प्राप्त झाल्याबरोबर समाजांतील विचारसंपत्तीचा वारसा त्याला दिसेल; त्याचा उपभोग तो घेईल व कदाचित् भरही तो टाकूं शकेल. योग्य विश्रांति म्हणजे किती हें उत्पादनाच्या तत्कालिन परिस्थितीवर अवलंबून राहील. यंत्रमय उत्पादनांत कुठल्या कारखान्यांत किती तास काम करणें योग्य आहे हें ठरवितांना हवा, पाणी, कारखान्याची मांडणी, उत्पादनाचें स्वरूप, यंत्राचा वेग वगैरे गोष्टी विचारांत घ्याव्या लागतील. पृथ्वीचे पोटांत, खाणींत काम करण्यांतील श्रम व पृथ्वीचे पृष्ठभागावर काम करण्यांतील श्रम यांत फरक आहे. लोखंड अगर पोलादाचे कारखान्यांतील तप्त काहिलीजवळचे श्रम व कापड गिरणीचे साचे चालवितांना होणारे श्रम यांत फरक आहे. तथापि, सर्वसाधारणपणें कमालमर्यादा म्हणून राज्यसत्तेला ठरवितां येईल. सारासार विचार करून शारीरिक श्रम दिवसांत ८ तासांपेक्षां अधिक असूं नयेत हें उचित दिसतें. अनेक देशांतून याप्रमाणें मान्य करण्यांत आलें आहे. २४ तासांत ८ तास काम करून जरूर ती विश्रांति मिळणें शक्य आहे. उत्पादनांत अधिक शोध लागले तर कमी श्रमांत अधिक उत्पादन होईल व त्यामुळें कामगारांना अधिक विश्रांति मिळणें सुलभ होईल. शास्त्रांची प्रगति चालू आहे. गेल्या १५० वर्षांत उत्पादनाचें स्वरूप शास्त्रांमुळें बदललें आहे. शास्त्रांचे सहाय्यानें उत्पादनांत कल्पनातीत बदल होणें अशक्य नाहीं. ताशीं ४०० मैल जाणारीं विमानें सुरू झालीं. वाहतुक जलद झाली, सुलभ झाली. अनेक वस्तूंचेबाबत मोठ्या प्रमाणावर उत्पादन करणें आज चालू आहे. उत्पादनाचा वेग, काल व श्रम यांचे प्रमाणानें वाढत आहे. कमी श्रमांत व कमी वेळांत अधिक उत्पादन ही उत्पादनसृष्टीची आजची घोषणा आहे. बदललेली परिस्थिती लक्षांत घेऊन सर्वसामान्यपणें कमाल मर्यादाही बदलेल. ८ चे ऐवजी ६ तास रोजीं अशी होईल. तथापि, ही मर्यादा अवश्य आहे. बौद्धिक श्रमाचें काम असलें म्हणजे काम करणाराचें काम कंटाळवाणें नसतें असें नाहीं. तथापि, त्याचें मन मरत नाहीं, कांहीं तरी विचार तें करीत असतें, त्याच्या विधायक प्रवृत्तींची जाणीव त्याला असते. हिशोबाचे तक्ते भरणारा कारकूनसुद्धां बिनहिशोबी प्रेमाचें काव्य करतो ! ! वर्षानुवर्षे तेच ते विषय शिकविणारा शिक्षक मधंच लघुकथा लिहून एकाद्या दिवाळी–अंकांत फडकतो. परंतु हातानें काम करणाऱ्या कारागीराला त्याच्या विधायक प्रवृत्तींना करीत असलेल्या कामांत क्वचितच वाव असतो. जेथें कांहीं योजना करणें आहे, कांहीं व्यवस्था घडवून आणणें आहे,- तात्पर्य, बुद्धि अगर हिकमत चालविणें यांस जेथें वाव आहे तेथें असल्या कारागिरांनाही कामांत रस वाटतो, कांहीं करून

दाखवावेंसें वाटतें. त्यांच्यांतील प्रवृत्तींना वाव मिळतो, व कंटाळवाणें व मन मारणारें काम थोडेंसें सह्य होतें. पण जेथें कामगाराला यंत्रापुढें अगदीं तेंच तें काम सालोसाल करावें लागते, तेथें त्याच्या प्रेरक शक्तींना क्षय लागतो, गुणांचा विकास दाबला जातो, मन गळून पडतें. माणसांतील गुणांना वाव मिळाल्यानें समाजाचा फायदा होतो व समाज वरील परिस्थितींत या सर्व फायद्यांना मुकतो; व्यक्ति सुखाला आंचवते. जगांत कांहीं आहे, तें समजावून घ्यावें, त्यांतील आनंद हेरावा ही जिज्ञासाच नष्ट होते. झालेल्या शारीरिक श्रमाचा भार हलका व्हावा म्हणून श्रेष्ठ दर्जाच्या करमणुकीकडे त्याचें लक्ष जात नाहीं. श्रमाचा विसर पडावा म्हणून ज्ञानविलासाकडे क्वचितच त्याचें लक्ष जाते. इतके श्रम त्याला झालेले असतात कीं, सुलभ ज्ञानसुद्धां त्याला जवळ करावेंसें वाटत नाहीं. साहित्य, संगीत, कला यांतील श्रेष्ठतर प्रसन्नता उत्पन्न करणारा उपभोग त्याला नकोसा वाटतो. हीन कादंबऱ्या, कुटाळ वृत्तपत्रें, बीभत्स संगीत व 'नऊटांक' बेवडा यांच्या आश्रयाला श्रमपरिहारार्थ तो जातो. हा दोष त्याचा नाहीं. समाजांत राहून आपली भौतिक व अध्यात्मिक उन्नति करण्याचा त्याचा हक्क आहे. अन्याय्य श्रम त्याचेकडून घेऊन अपुरें वेतन त्याला देऊन, सर्व तऱ्हेनें त्याची माणुसकी मारून त्याला उन्नतिविन्मुख करण्याचें पाप राज्यसत्तेचे माथ्यावर आहे. राज्यसत्तेनें योग्य वेतन, योग्य विश्रांति हे नागरिकहक्क मौलिक म्हणून जोपासले पाहिजेत व व्यक्तींचे आयुष्यांत आनंद व समाजांत स्थैर्य निर्माण केलें पाहिजे.

योग्य वेतन व योग्य विश्रांति मिळून सर्व भागलें असें म्हणतां येणार नाहीं. हें सर्व असून त्याची स्थिती थोडीशीं सुधारलेली गुलामगिरीच अशी राहाणें शक्य आहे. जेथें सर्व उत्पादन सरकारी मालकीचें व सरकारी नियंत्रणाखालीं आहे तेथें सुद्धां ज्या उत्पादनांत कामगार असेल, तेथें त्याला आपलें म्हणणें मांडण्यास संधि मिळाली पाहिजे; कारखान्याचे कारभारांत त्याला भाग घेतां आला पाहिजे, आपुलकी त्यांत उत्पन्न झाली पाहिजे. ही जाणीव होईल तर त्याचे हातून श्रेष्ठ प्रतीचे काम होईल. कामगारांना खरें स्वातंत्र्य मिळेल व तें मिळालें तरच त्यांचे हातून श्रेष्ठ प्रतीचें काम होईल. जेथें आज खाजगी मालकी उत्पादनांतून नाहींशी करणें शक्य नाहीं तेथें राज्यसत्तेवर या बाबतींत जबाबदारी विशेष आहे. अधिक मोठ्या प्रमाणावर उत्पादन होत असल्यामुळें स्वतःच कच्चा माल घेऊन तो तयार करून विकणारा कारागिरवर्ग कमी झाला आहे. कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाशीं तयार करण्यापलीकडे मजुरांचा संबंध नाहीं. कच्चा माल घेणें, पक्का विकणें हें सर्व काम

मालकाचें. एका बाजूला लाखों मजूर व दुसरे बाजूस मूठभर मालक, भांडवलवाले अशी परिस्थिती या उत्पादनपध्दतीनें निर्माण झाली आहे. मालकवर्ग संघटित व चलाख, मजूरवर्ग मागासलेला व अजूनही सर्वत्र संघटित नाहीं. मालकांचे हातांत साधनसामुग्री व सरंजाम असल्यामुळें त्यांचे हातांत सत्ता उत्पन्न झालेली असते. मजूर, रोजंदारीनें काम करणारा, कफल्लक व त्यामुळे कामासाठीं लाचार झालेला; काम नसेल तर उपासमारीच त्याचा बळी घेणार, अशा परिस्थितींत मालकाचे हातीं असलेल्या सत्तेचा दुरुपयोग होणार नाहीं याबद्दल दक्षता घेणें जरूर आहे. लाखों लोकांना बेकार करण्याची सत्ता, निराधार करण्याची सत्ता, समाजांतील उत्पादनसाधनें व सामुग्री खाजगी मालकीची असली म्हणजे खाजगी व्यक्तींच्याच हातांत राहाणार. आधुनिक उत्पादन जेथें खाजगी मालकीचें आहे व संपूर्णपणें अनियंत्रित आहे, तेथें कामगारांचें स्वातंत्र्य नष्टच झालेलें आहे. म्हणून खाजगी मालकीच्या या सत्तेला मर्यादा घातल्या पाहिजेत. जेथें राज्याचे तत्त्वतः अमर्याद असलेल्या सत्तेला मर्यादा घालीत घालीत आधुनिक राज्य हें निर्माण झालें आहे, तेथें औद्योगिकक्षेत्रांतील मालकांना अमर्याद सत्ता देणें विसंगतच नव्हे तर समाजाला विघातक आहे. राज्यकारभारांत भाग घेण्याचा हक्क जर नागरिकांना आहे तर तो उत्पादनाचे कारभारांतही असलाच पाहिजे, तो नाकारणें अन्यायाचे आहे. राजकारणांत लोकशाही व उत्पादनांत सुलतानशाही हीं दोन्ही एकत्र राहाणे शक्य नाहीं. उत्पादनांतील सुलतानशाही लोकशाहीचा देखावा ठेवून खरी सत्ता आपले हातीं घेते हा अनुभव आलेला आहे. मतदार म्हणून स्वतंत्र व मजूर म्हणून लाचार, असें हें अर्धवट स्वतंत्र व अर्धवट गुलामगिरीचें जीवन राज्यांत फार काळ राहाणे शक्य नाहीं. कांहींही राज्यसत्तेनें न केलें तर मतदाराचें स्वातंत्र्य वस्तुतः जाऊन मजुराची गुलामगिरी वाढेल. राजकीय स्वातंत्र्य जिवंत राहावें म्हणून कामगारांना उद्योगधंद्याचे व्यवस्थेत भाग घेण्याचा, निर्णयांचे कामीं विचारविनिमय करून त्याची जबाबदारीपण घेण्याचा अधिकार मिळाला पाहिजे.

कारखान्याचे व्यवस्थेंत अगर उत्पादनाचे व्यवस्थेंत मजूर हा एक प्रमुख घटक आहे. त्याला जे कांहीं श्रम करून तो घडवून आणतो त्याचे घडामोडींत मत देण्याचा, त्याची व्यवस्था कशी असावी हे सांगण्याचा अधिकार असावा; पण त्याची मर्यादा व महत्त्व यांत सारासार विचार ठेवला पाहिजे. मजूर ज्या उत्पादनांत असेल तें समाजाला अवश्य असणाऱ्या अगर समाजांत होणाऱ्या प्रचंड उत्पादनप्रपंचाचा एक भाग असणार. तुकडींत काम करणाऱ्या सैनिकाला तुकडीतील व्यवस्थेसंबंधीं

विचारणें योग्य होईल; पण सबंध आघाडीचे मांडणीसंबंधी अगर उठावासंबंधीं तपशील-वार त्याचा विचार घेणें अप्रयोजक आहे. कामाचे तास, सुट्ट्या, कारखान्यांतील आरोग्य, वेतन, यंत्रांची पुनर्घटना, बेकारी, विमा, वगैरे विषय कीं ज्यांचा संबंध त्याचे श्रमाशीं येतो त्या बाबतींतील व्यवस्थेंत त्याचें म्हणणें ऐकून घेतलें पाहिजे. होणारे निर्णयांत त्याचें मत विचारांत घेतलें गेलें पाहिजे. व्यापक उत्पादनाचें धोरण अगर उत्पादनाच्या विनि-मयाचें व विक्रीचें धोरण यांत त्याचा मजूर म्हणून विशेष संबंध येत नाहीं. समाजानें उत्पादनाबाबत काय धोरण ठेवावें हा प्रश्न नागरिक म्हणून त्याचे क्षेत्रांतला आहे. योग्य वेळी तेथेही त्याचा अधिकार, त्या नात्यानें चालला पाहिजे. मुख्य मुद्दा असा आहे कीं, भांडवलावरील मालकीनें आलेली सत्ता मर्यादित झाली पाहिजे. अप्रतिहत-पणें मालकांना वाटेल तें मजुराबाबत करणें अशक्य व्हावें. मजूर कमी करणें झाल्यास मजुरांचे संघाशीं विचारविनिमय करून मग तो कमी झाला पाहिजे. नवीन यंत्रें बसवून थोड्या मजुरांवर अधिक उत्पादन करण्याचा मालक पुनर्घटनेचे नांवाखालीं प्रयत्न करतील तर तोही मजूरसंघाशीं बोलणें करून त्यांनं केला पाहिजे. बेकार होणाऱ्या कामगारांची सोय करून अगर त्यांना नुकसानभरपाई देऊनच तें होणें इष्ट असतें. मजूर-संघांना मालकांनीं मान्यता देणें हे या दृष्टीनें अवश्य आहे. उद्योगधंद्यांतील ही अंतर्गत-व्यवस्था मालक व मजूर यांच्या विचारविनिमयानें व सहकार्यानें चालली पाहिजे. हें सहकार्य सुलभ व्हावें म्हणून अवश्य तें संघटन व व्यवस्था होणें जरूर आहे. या संघट-नांत मालक व मजूर दोघांचाही समावेश प्रतिनिधिद्वारा झाला पाहिजे. मालक—मजूर यांच्यांतील मतभेदाचे सर्व योग्य प्रश्न या संघटनेनें अखेर निकालीं लावले पाहिजेत. कारखान्याच्या व्यवस्थेसंबंधीं साधारण नियम सर्वसामान्यपणें सरकारनें ठरवून त्यांची अंमलबजावणी विवक्षित कारखान्यांत होणें असल्यास अगर होत असल्यास, त्यांतील मजुरांच्या विचारविनिमयानें व्हावी हें ठीक; इतकेंच नव्हे तर हे नियम व प्रमाणें ठरवितांनासुद्धां मजुरांचें म्हणणें ऐकून घेऊन, त्यांचा अनुभव विचारांत घेऊन ठर-विणें योग्य होईल. खाजगी मालकी ठेवावयाचीच झाली तर आणखी एका दृष्टीनें तिची सत्ता मर्यादित करतां येईल. मालकी व व्यवस्था यांत असलेले संबंध नष्ट केले म्हणजे तें शक्य आहे. भांडवलवाले आजही प्रत्यक्ष उत्पादनाची व्यवस्था फारशी पाहात नाहींत. कंपन्यांचे भाग घेऊन भांडवल पुरविणार दूर असतात. होणाऱ्या उत्पादनावर, तत्संबंधींचे व्यवस्थेवर सर्व अधिकार योजकवर्ग चालवीत असतो. भागीदार फक्त नफ्याकडे पाहातात व त्या दृष्टीनें जें काय नियंत्रण करीत असतील तेवढेंच. समजा, भांडवलाची उपयुक्तता व जरुरी लक्षांत घेऊन ठराविक दरानें

त्यावर व्याज देण्याचें ठरवून, सर्व उत्पादन सरकारला, राज्यसत्तेला आपले व्यवस्थेखालीं, आपले नियंत्रणाखालीं घेतां येईल. भागीदार फक्त व्याज घेणारे सावकार, बाकी त्यांचा उत्पादनाशीं संबंध नाहीं. सरकारी कर्जरोखेवाले कांहीं राज्यकारभावर नियंत्रण करूं शकत नाहींत, सरकारी धोरणावर ते परिणाम करूं शकत नाहींत, त्याच प्रमाणें या उद्योगधंद्यांतील भांडवलवाल्यांना ठराविक व्याज मिळेल असें करून भांडवलाचे किंमतीचे रोखे देऊन सरकार त्यांची सत्ता संपुष्टांत आणूं शकेल. खाजगी मालकी असेल तर उत्पादन आहे असें होईल, हा दावा या योजनेनें खोटा पडेल. योजकवर्ग सरकारी नोकर होईल, मजूर हे सरकारी कामगार होतील, खाजगी नफा वाढविण्यासाठीं उत्पादनाचें धोरण आंखलें जाणार नाहीं. सरकारी मालकीच्या व सरकारी व्यवस्थेखालीं रेल्वे असल्यामुळें त्यांची व्यवस्था जनतेचे दृष्टीनें सुधारते असा येथेंही अनुभव आहे. सरकारी व्यवस्था उत्पादनांत आली म्हणजे निदान वाटेल त्या कामगाराला ठेव, वाटेल त्याला काढ ही मनसोक्त वागणूक बंद होऊन कांहीं स्थैर्य कामगारांना नोकरींत वाटेल. भांडवलशाही नियंत्रणाखालील उत्पादनांत अमर्याद सत्ता ठेवणें म्हणजे गुलामगिरीला बेगड लाऊन तिला कायदेशीर करणें होय. राज्यकारभारांत जसा हक्क नागरिकाला आहे तसाच हक्क उद्योगधंद्यांत असला पाहिजे. प्रतिनिधींमार्फत दोन्हीकडे त्याला त्याच्या इच्छा व आकांक्षा सांगतां आल्या पाहिजेत. आपुलकीची भावना जागृत झाल्यानेंच मनुष्याचे कर्तृत्वाला पालवी फुटते, त्याचे प्रयत्नांत तीव्रता येते, यशांत भागी असेल तर त्याचे वर्तनांत जबाबदारी वागूं लागते. लोकशाहीव्यवस्थेंत राजकीय स्वातंत्र्याबरोबर औद्योगिक गुलामगिरी राहूं शकत नाहीं. लोक जास्त संघटित व जास्त निश्चयी असतील तर उत्पादानांतील खाजगी मालकी कानसून कानसून अगर प्रसंग येतांच एका घावासरशी निकालीं लावतील. जर मालकवर्ग जास्त संघटित झाला व देणें शक्य असलेल्या सवलतींची मर्यादा संपली कीं, लोकशाही मोडून हुकूमशाही तो प्रस्थापित करील. लोकशाहीतंत्राचाच उपयोग करून हुकूमशहा तिचें विसर्जन करील. सार्वजनिक निवडणुकीचे पोटीं शनैश्वर हिटलर जन्माला आला, व शनी जें गिळूं शकला नाहीं तें सर्व लोकशाहीचें सूर्यमंडळ त्यानें गिळलें. लोकमताचे पाठिंब्यावर येऊन लोकांचे पाठीवर बसला. लोकांचा तो नव्हे असें कोण म्हणणार!! हा अनुभव लक्षांत घेऊन राज्यसत्तेचे लगाम खाजगी मालकीच्या हातांतून काढून घेणें लोकशाही स्वातंत्र्याचे दृष्टीनें इष्ट व आवश्यक आहे, व ते करावयाचें म्हणजे औद्योगिक क्षेत्रांतही लोकशाही स्थापन केली पाहिजे.

लोकशाही स्वातंत्र्य नागरिक दक्ष व विवेकी असतील तरच शक्य आहे. नाग-

रिक म्हणजे जो आपल्या विवेकी व दक्ष वर्तनानें सार्वजनिक हितांत भर टाकतो तोच होय. नागरिक ज्ञानी, दक्ष व विवेकी व्हावा म्हणून प्रत्येक नागरिकाला त्या दृष्टीनें योग्य शिक्षण मिळण्याचा हक्क असला पाहिजे. योग्य शिक्षण नसेल तर तो आपला नागरिकधर्म चांगल्या रीतीनें पालन करणार नाहीं. योग्य शिक्षणाचीं साधनें राज्यसत्तेनें त्याला उपलब्ध करून दिलीं पाहिजेत. आत्मबोध होईल, जीवनांतील महत्त्व लक्षांत येईल, आपल्या गुणांचा विकास करतां येईल अशीं ज्ञानाचीं साधनें त्यास मिळालीं पाहिजेत.आपल्या गरजा, आपलीं दुःखें त्याला योग्य रीतीनें सांगतां येतील, आपला अनुभव लोकांना चांगल्या तऱ्हेनें पटवितां येईल इतकी शिक्षणानें त्याची प्रगति होणें जरूर आहे. ज्ञानमंदिरांत जाणारे रस्ते सर्वांना मोकळे पाहिजेत येवढेंच नव्हे, तर ज्ञानमंदिरांत सर्व जनांना प्रवेश पाहिजे. नुसतें शिखरदर्शन अगर मंडपापर्यंत सर्वांना प्रवेश, व गाभ्यांत मात्र ठराविक लोकांना प्रवेश असें करून चालणार नाहीं. ज्यांना ज्ञानाचीं साधनें मुबलकपणें उपलब्ध आहेत तेच शेवटीं समाजावर सत्ता चालवितात. जे समाजाच्या विचारसंपत्तीचे मालक तेच शेवटीं अन्य संपत्तीचे व सत्तेचे मालक होतात. ज्ञान या अर्थानें खरोखर सत्ता आहे. जे योजना करतात. जे माहितगार असतात ते सरस ठरतात. सर्व लोक ज्ञानाचीं साधनें सर्वांना मोकळी झालीं तरी श्रेष्ठ ज्ञान मिळविणार नाहींत हें खरें. तथापि, संधि अगर साधन यांचे अभावीं कोणालाही वाव मिळाला नाहीं असें होतां कामा नये. किमान वेतनाप्रमाणें किमान शिक्षणाची, मनुष्य योग्य नागरिक होईल या दृष्टीनें व्यवस्था राज्यसत्तेनें केली पाहिजे. किमान शिक्षण याप्रमाणें मिळणें हा नागरिकाचा मौलिक हक्क मानला पाहिजे. शिक्षणानें दृष्टि आल्याखेरीज राज्यकारणांतील गुंतागुंती मनुष्यास कळणें कठीण आहे. ज्यांचा त्याचे जीवनावर परिणाम होणार आहे अशा अनेक घटना होत असतां तो जर अज्ञानानें स्वस्थ राहिला तर तो नागरिकधर्म आचरत नाहीं असेंच होतें. देशांतील राजकारणांत लक्ष घालतां यावें म्हणून शिक्षण जरूर आहे व तें असलें म्हणजे त्याला आपलें म्हणणें सांगतां येईल, आपला अनुभव पटवितां येईल. ठरणाऱ्या धोरणांत आपलेंही ऐकलें असें समाधान त्याला वाटेल. कांहीं समजतच नसेल, तो अज्ञानी असेल तर राजकारणांतील मुखंड त्याचा फायदा घेतील व त्याचें अनगड मन आपल्या स्वार्थाचे दृष्टीनें कबजांत घेतील. योग्य शिक्षणाचे अभावीं हल्लींचे युगांत मनुष्य गुलामच समजला पाहिजे. आधुनिक राज्यव्यवस्था म्हणजे मोडीलिपी आहे. त्यांतील गुंतागुंत समजणें सोपें नाहीं. स्वहिताचा मार्ग समजणें योग्य ज्ञानाचे अभावीं या गुंतागुंतींत अवघड आहे. मार्ग समजूनसुद्धां विवेकानें तो चोखाळण्यासाटीं ज्ञानाची,

शिक्षणाची अत्यंत जरुरी आहे. आजच्या युगांत शिक्षणाचे अभावीं मनुष्य क्षुद्र आहे. त्याच्यांतील सुप्त गुण, शिक्षणानेंच जागृत होतात, शिक्षणानेंच त्याचे व्यक्तित्वाला पूर्णता येते. शिक्षणाचे अभावी त्याच्या प्रवृत्तींना योग्य मार्ग सांपडत नाहीं. पुष्कळ वेळां ध्येयशून्य प्रयत्न होऊन उत्साह वायां जातो, शक्ति क्षीण होते; आयुष्यांत उणेपणाचा भाव मनांत सारखा उत्पन्न होतो व त्यानें सर्व आकांक्षा दडपल्या जातात, मन मोडलें जातें. शिक्षणानें मनुष्याचा आत्मविश्वास वाढतो. ज्ञानानें मार्गदर्शन मिळतें, धीर येतो. विद्या ही खरोखरच मुक्तिदायक असते. म्हणून ती किमानपक्षीं कांहीं प्रमाणांत तरी सर्वांना मिळालीच पाहिजे. राज्यसत्तेनें हा हक्क जोपासला पाहिजे.

किमान प्रमाणांत सर्व नागरिकांना शिक्षण मिळण्याचा हक्क असावा याचा अर्थ सर्व लोकांना अगदीं ओतीव व सारखे शिक्षण मिळावें असा नव्हे. माणसें शाडू नव्हेत कीं ठसा घेऊन त्यांच्या एकसारख्या मूर्ति कराव्यात. शिक्षण म्हणजे मनुष्यांतील उत्कृष्ट गुणांना वाव मिळण्याचें एक साधन. प्रदर्शनांत नाना दालनांत नाना तऱ्हांच्या वस्तु असतात. प्रत्येक वस्तूचे दालनांत प्रवेश करण्याकरितां निराळी फी असते. पण प्रदर्शनांतच प्रवेशासाठीं असणारी फी सर्वांना द्यावी लागते. आंत गेल्यावर जो तो प्रेक्षक आपल्या प्रवृत्तीप्रमाणें वस्तु पाहातो व तेवढ्यापुरती अधिक फी देतो. शिक्षण हें प्रवेशफीपुरतें सर्वांना मिळालेंच पाहिजे. त्यानंतर प्रत्येक व्यक्तीची प्रवृत्ति पाहून तदनुसार शिक्षण मिळण्याची व्यवस्था व्हावयास पाहिजे. अवश्य तेवढें प्राथमिक शिक्षण मिळाल्यानंतर मुलांचा कल पाहून त्याला अनुसरून औद्योगिक अगर अन्य शिक्षण मिळणें जरूर आहे. सर्व मुलें सारखीं एक अर्थानें व नाना प्रकारचीं दुसऱ्या अर्थानें हे समजून शिक्षणक्रम असला पाहिजे. चांगला शेतकरी, चांगला कारागीर, चांगला हिशोब तपासनीस, चांगला शिक्षक हे सर्व समाजाला आवश्यक आहेत. केवळ जन्मानें ज्याच्या त्याच्या धंद्याची निवड होऊं नये. मुलाची बुद्धि, त्याचा कल पाहून शिक्षण दिल्यानें त्याला गोडी वाटते, प्रगतीची ओढ त्याचे मनांत उत्पन्न होते व तो कार्यक्षम होतो. प्रत्येक नागरिक आपले धंद्यांतील कार्य उत्तम करणारा व्हावा म्हणून तद्विषयक शिक्षण त्याला मिळालें पाहिजे. त्याचबरोबर नागरिकधर्माचें पालन त्यास चांगलें करतां यावें म्हणून सर्वसाधारण शिक्षण इतकें त्यास मिळालें पाहिजे कीं, कुठल्याहि प्रश्नाचा साधारणपणें विचार करून त्याला आपलें मत देतां आलें पाहिजे. त्याची विचारशक्ति शिक्षणाने वाढली पाहिजे. राज्य हें त्याचें आहे, राज्यकारभार करणारे काय करतात हें त्यानें पाहिलें पाहिजे व तें समजण्याची शिक्षणविषयक पात्रता त्याचे अंगीं येईल इतकी व्यवस्था झाली पाहिजे. प्रचार व

सत्य यांतील फरक कळेल इतकी त्याची बुद्धि प्रगल्भ झाली पाहिजे. कोणतें धोरण स्वीकारल्यानें योग्य ते होईल हें साधकबाधक गोष्टींचा विचार करून ठरविण्याची संवय त्यास लावली पाहिजे. आपल्या विचारयुक्त मतदानानें व मतप्रदर्शनाने भोंवतालील परिस्थितीचा रागरंग बदलत जाणार आहे याचे जबाबदारीची जाणीव त्यास असली पाहिजे. हें सर्व व्हावयाचें तर कांहीं कालपर्यंत मुलांनीं शिक्षण घेतलेंच पाहिजे अशी सक्ती असली पाहिजे. १२।१३ वर्षांचीं मुले शारीरिक श्रमाचे कामावर जातात असें जेथें आहे तेथें २।३ वर्षांच्या शिक्षणाचा कांहींही उपयोग होत नाहीं. निदान १५ वर्षे होईपर्यंत प्रत्येक मूल, मुलगा व मुलगी यांना सक्तीनें व फुकट शिक्षण मिळालें पाहिजे. या शिक्षणक्रमांत सर्वसाधारण व कलानुसार या दोन्हींचा समावेश असला पाहिजे. हे शिक्षणाचें किमान प्रमाण आजच्या परिस्थितींत मानलें पाहिजे. समाजांत अधिक योजनापूर्ण उत्पादन होऊं लागलें म्हणजे याही प्रमाणांत भर पडेल हें उघड आहे. कापडाच्या गिरण्यांत, कोळशाचे खाणींत, अगर अन्य कारखान्यांत १५ वर्षांखालील मुलांना अगर मुलींना कामास लावणें म्हणजे त्यांच्या जीवनाचे विकासाला मारून टाकणें आहे. कारखान्यांतील वातावरणाचा या बालमनावर होणारा परिणाम उन्नतिप्रद खास नसतो. मनाला आनंद देऊन विधायक प्रवृत्तींना चालना देईल असें कामाचें स्वरूप तेथें नसतें. कोळसा भरणें यांत बालमनाला काय आनंद वाटणार? इकडले तागे तिकडे टाकण्यांत अगर तत्सम काम करण्यांत, कांहीं तरी करून दाखवावें असें त्यास कसें सुचणार? मुलांच्या बुध्दीचा विकास होईल अगर त्यांतून कांहीं साधनें उपलब्ध होऊन त्यांचा त्याला उपयोग होईल असें कांहींही त्यांत नसतें. त्या दृष्टीनें शेतीकामावर काम करतांना निदान वातावरण चांगलें असतें. तथापि, कुठेंही मुलें ठराविक वर्षांचीं होईपर्यंत कामास लावण्यांत येऊं नयेत. अभ्यासाचें वय, विद्येचे वय अभ्यासांतच गेलें पाहिजे. मनुष्याचे आयुष्यांत १२ ते १५ पर्यंतचीं वर्षे विकसनाचे दृष्टीनें, त्याच्या भावी मानसिक उन्नतीचे दृष्टीनें महत्त्वाचीं असतात. या वर्षांत त्याच्या प्रवृत्तींना योग्य वळण देऊन भावी चारित्र्याची, मानसिक शक्तीची बैठक निर्माण करावयाची असते. हें अर्थात् या वयांत मुलें कामगार झालीं तर अशक्य आहे. किती तरी बुध्दि, किती तरी कारागिरी, कौशल्य, व कलावन्तपणा याला विद्यमान व्यवस्थेमुळे समाज मुकत आहे. पुढें आणणारा, पुरस्कार करणारा कोणी नसेल तर गुणमुध्दां मलिन होतात, मग नवीन निर्माण होणें लांबच राहिलें. गुणाला संधि पाहिजे, आश्रय पाहिजे. पण याहीपेक्षां अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्याची जाणीव मनुष्याचे ठिकाणीं उत्पन्न झाली पाहिजे. ही

जाणीव प्रयत्नाची चालना आहे, प्रगतीचें चैतन्य आहे. ही जाणीव कोमल वयांतील शारीरिक श्रमानें मारली जाते. शिक्षणानें ती उत्पन्न होते, तिचा बोध होतो. जीं असामान्य माणसें आहेत तीं वाटेल त्या परिस्थितींतून, शिक्षण असो नसो मार्ग काढतात. ते खडकांत कलापूर्ण कैलास उत्पन्न करतील पण साधारण माणसाला वीट कशी थापावी याचें शिक्षण घेऊनच गवंडी बनावें लागतें. समाजानें साधारण माणसाची व्यवस्था केली पाहिजे. असाधारण माणसें स्वतःचे अव्यवस्थेनें व अलौकिकपणानें समाजाची व्यवस्था व वैभव वाढवितात. तथापि, पिकासाठीं वळवाचे पावसावर शेतकरी भरंवसा ठेवत नाहीं, पावसाळी नक्षत्रें पाहूनच पेरणी करतो; हीच दृष्टि राज्यसत्तेची शिक्षणाबाबत असली पाहिजे.

लोकशाहीव्यवस्थेंत प्रभुत्व, निर्णयात्मक सत्ता लोकांची; प्रत्येकाचा राज्यसत्तेशीं संबंध असतो. या दृष्टीनें पाहातां प्रत्येक नागरिकाला राजकीय सत्ता असण्याचा हक्क आहे ती जवळ असणें हा त्याचा अधिकार आहे. या हक्काचें स्वरूप त्रिविध मानण्यांत येतें. कोट्यवधि नागरिक असलेल्या व लक्षावधि चौरस पसरलेल्या राज्यांत प्रत्येक नागरिकाला प्रत्यक्षपणें राज्यकारभारांत, राज्यसत्तेच्या उपभोगांत भाग घेणें अशक्य आहे. म्हणून प्रतिनिधिद्वारा संकल्प सोडणें क्रमप्राप्त झालें आहे. आधुनिक लोकशाही प्रातिनिधिक स्वरूपाची अगर प्रातिनिधिक आहे. जेव्हां राज्य म्हणजे एकादें ५।१० हजार नागरिकांचें शहर होतें त्या वेळी सर्व नागरिकांनीं जमून राज्यकारभार पाहाणें शक्य होतें व त्याप्रमाणें प्राचीन ग्रीक शहरांत चालेही. आज प्रत्येक नागरिकाला प्रतिनिधी निवडून कारभारांत भाग घ्यावा लागतो. म्हणून प्रत्येक नागरिकाला प्रतिनिधि निवडण्यासाठीं मतदानाचा हक्क असला पाहिजे. वयांत आलेल्या प्रत्येकाला आपले राज्याचा कारभार कोणीं करावा हें निवडणुकीचे द्वारां मत देऊन सांगण्याचा अधिकार असला पाहिजे. कोणत्या शासनसंस्थांचे द्वारां हें काम व्हावें हें सांगण्याचाही त्याला हक्क असला पाहिजे. हा मतदानाचा हक्क कार्यपरत्वें असावा अगर प्रादेशिक दृष्टीनें असावा अगर अन्य तऱ्हेनें असावा हें त्यांनीं मान्य केलेली घटना ठरवील. प्रादेशिक दृष्टीनें असणें अधिक चांगलें. कारण त्यांत जास्तींत जास्त माणसें येऊं शकतात व सार्वत्रिकपणा निःसंशय अधिक आहे. केवळ नागरिक म्हणून हा हक्क असला पाहिजे. नागरिकधर्माचीं कर्तव्यें न बजाविल्यास तो तहकूब झाला पाहिजे. जन्म, जात, मिळकत, शिक्षण अगर अन्य आगंतुक गोष्टींमुळें त्यांत फरक होतां कामा नये अगर स्त्री-पुरुष हा भेद विचारांत घेतला जाऊं नये. प्रत्येक नागरिक स्त्री अगर पुरुष कुठल्याहि जातींत अगर कुळांत जन्मो, त्यास शिक्षण असो अगर

नसो, तो वयांत आला म्हणजे त्यास मतदानाचा हक्क असलाच पाहिजे. अशा सार्वत्रिक स्वरूपाच्या मतदानानें अयोग्य माणसें निवडून येतील अशी शंका व भीति अनेक व्यक्त करतात. संकुचित मतदारसंघ चुका करत नाहीं असा अनुभव नाहीं. चुका करत, ठेंचा खात, अनुभव घेत, प्रयोग करीत करीत जगाची प्रगति झाली आहे व होत आहे. लोकशाहीही याच मार्गानें जाते. अनुभवाची ठेंच लागून होणाऱ्या वेदना लोकशाहींत जाहीर बोलल्या जातात, इतरत्र प्रचाराचे ढोलक्याचे आवाजानें लोकांना त्या ऐकतां येत नाहींत, पण त्यानें झालेल्या वेदना कमी होत नाहींत. सर्व लोकांना त्या कळल्यानें अनुभवाचें ज्ञान सार्वत्रिक होतें, पुन्हां तीच चूक होणें असंभवनीय होतें. सार्वत्रिक मतदान झाल्यास विचार करून विवेकानें तें होणार नाहीं म्हणून कांहींना हुरहुर वाटते. मतदार दक्ष व विवेकी करण्याचें काम राज्यसत्तेनें केलें म्हणजे ही अडचण राहाणार नाहीं. अज्ञानी म्हणून मत नाहीं व राज्यकारभारांत अधिकार नाहीं म्हणून शिक्षणाची व्यवस्था होत नाहीं हा अनुभव मिळालेला आहे. ज्यांना मतें नाहींत, ज्यांना निवडणुकींत मतदानाचा हक्क नाहीं, त्यांच्या हिताकडे राज्यकारभारांत दुर्लक्ष होतें हें अनेक ठिकाणीं दिसून आलेलें आहे. अमुक एक कसोटीला उतरला तरच त्याला नागरिकाचा, मतदानाचा हक्क असें एकांगी ठरविणें न्याय्य नाहीं. घरमालकांनाच तो हक्क दिला अगर कांहीं मिळकत असेल तर हक्क असें जेथें झालें तेथें या 'आहे रे,' नी 'नाहीं रे' वर अन्यायच केला आहे, त्यांच्या हिताला जुमानलें नाहीं. जातीवर अगर धर्मावर जेथें हा हक्क ठेवण्यांत आला आहे तेथें या जातिनिष्ठ अगर धर्मनिष्ठांची मिरासदारीच झाली व तद्व्यतिरिक्त नागावले गेले असा इतिहासाचा निर्वाळा आहे. केवळ शिक्षणावर हा हक्क आधारून भागणार नाहीं. जुने शिलालेख व ताम्रपट वाचण्यांत व त्यांचा अर्थ लावण्यांत निष्णात असलेला संशोधक प्रातिकरामुळें धंद्यावर काय परिणाम होतील हें सांगण्यांत निष्णात असेल असें मानण्याचें कारण नाहीं. रोमचा इतिहास लिहिणारा गिबन पार्लमेंटमध्यें चमकला नाहीं. प्रतिभासंपन्न कविश्रेष्ठ दिवाणी काम चालविण्याचा कायदा दुरुस्त करण्याचा प्रसंग येतांच मुखदुर्बळ होईल. फार काय, राज्यशास्त्र—राज्यकारणशास्त्रावर अलौकिक ग्रंथ लिहिणारे प्रत्यक्ष राजकारणांत अयशस्वी ठरल्याचीं उदाहरणें आहेत!! तात्पर्य, अमुक तऱ्हेचें अगर अमुक दर्जाचेंच शिक्षण असेल तर हा मतदानाचा हक्क ठेवल्यानें राज्यकारभार यशस्वी होईल असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून हा मतदानाचा हक्क वयांत आलेल्या प्रत्येक नागरिकाला असला पाहिजे. त्याला योग्य शिक्षण मिळाल्यानें हें मतदान विवेकी व विचारयुक्त होणें जास्तींत जास्त संभवनीय आहे.

सार्वत्रिक मतदानाचा हक्क म्हणजे कोणीं राज्यकारभार करावा हें ठरविण्याचा हक्क होय. उपस्थित जाहलेले प्रश्न, मांडण्यांत आलेलीं धोरणें, जाहीर झालेले निरनिराळे कार्यक्रम या सर्वांवर यथाशक्ति विचार करून योग्य वाटणाऱ्या कार्यक्रमाचा पुरस्कर्ता उमेदवार मतदार निवडून देईल. अमुक एक माणसालाच हा निवडण्याचा हक्क व बाकीच्यांना नाहीं हें जसें अयोग्य व अन्यायी, त्याचप्रमाणें अमुक एका वर्गाचींच माणसें अगर विशिष्ट गटाचींच माणसें उमेदवार म्हणून राहूं देणें व इतरांना बंदी करणें हेंही चूक आहे. मतदानाचे हक्काप्रमाणें उमेदवारीचे, प्रतिनिधिपात्रतेचे हक्काबाबतही विषमता नसावी. तोही हक्क सार्वत्रिक असला पाहिजे. मतदार व उमेदवार यांच्यांत राजकीय सोयरीक व्हावयाची तर ते एकाच वर्णाचे असले पाहिजेत. राज्यांतील समान वर्ण म्हणजे नागरिक. प्रतिनिधिपात्रता, प्राप्ति, मिळकत, विद्वत्ता अगर जन्म यांवर अवलंबून ठेवणें म्हणजे सार्वत्रिक मतदारसंघ व प्रतिनिधि यांच्यांत हिताचे दृष्टीनें वर्णविषमता उत्पन्न करणें होय. मतदारांच्याच गोत्रांतला प्रतिनिधि असला पाहिजे. बेकार मतदार यांचा प्रतिनिधी गिरणीमालक असूं शकत नाहीं. गरजू नागरिक व व्याजू म्हणजे व्याजावर जगणारा श्रीमंत यांच्यांत हितसंबंध एक नाहींत. तात्पर्य, मतदार व प्रतिनिधि यांच्यांत हितैक्याच्या रक्तमांसाचा संबंध पाहिजे. प्रतिनिधि म्हणजे मतदारांच्या आकांक्षांचें, अनुभवांचें यथार्थ प्रतिबिंब पाहिजे. प्रतिनिधि होण्याचे हक्कांवर मर्यादा आली कीं, मतदारांचे हितसंबंधाला धोका येणारच. श्रीमंत प्रतिनिधि प्राप्तीकर वाढवावा असें म्हणणार नाहींत, अप्रत्यक्ष कर वाढविण्याकडेच त्यांचा ओढा असणार; मिठावर कर, कापडावर कर ते बसवतील, वाढवतील; विद्वान् प्रतिनिधि, प्राथमिक शिक्षणापेक्षां, उच्च शिक्षण, संशोधनात्मक विद्याप्रसाराकडे अधिक लक्ष देतील. राज्यांत होणारे कायदे वर्गहितानेंच निर्माण केले जातील. जमीनदार प्रतिनिधि कुळकायदा करून आत्महिताचा नाश करील ही आशा व्यर्थ आहे. प्रतिनिधिपात्रतेला मर्यादा घातल्यानें प्रतिनिधींपुढें सार्वजनिक कर्तव्य व वर्गस्वार्थ यांचा पेंचप्रसंग नेहमीं उभा राहातो व वर्गस्वार्थ म्हणजेच सार्वजनिक हित असें गणित बसवून तो सोडविण्यांत येतो. या व्यवस्थेंत व्यक्ति अनैतिक होते, समाज असंतुष्ट होतो. राज्यांचें कार्यक्षेत्र सारखें वाढत आहे. या स्थितींत प्रतिनिधि होण्याचा हक्कही सार्वत्रिक असला पाहिजे, म्हणजेच राज्यकारभारावर सार्वजनिक हिताचे दृष्टीनें योग्य लक्ष राहणें शक्य आहे. प्रतिनिधि होण्याचा हक्क मर्यादित केल्यानें राज्यकारभारापासून होणारे फायदेही मर्यादित लोकांनाच मिळणार, व असाच अनुभव आहे. कर, नेमणुका,

शिक्षण, उत्पादननियंत्रण हरएक बाबतींत आलेला अनुभव लक्षांत घेऊन समाजहिताचे दृष्टीनें प्रत्येक मतदाराला प्रतिनिधि होण्याचा हक्क असला पाहिजे. सार्वत्रिक मतदान केल्यानंतर हा हक्क मान्य करणें तर्कशुद्ध आहे, इष्ट आहे व अपरिहार्य आहे. मतदार हा राजा आहे तर कारभार जातीनें करण्याचाही हक्क त्याला असलाच पाहिजे. जेऊं घालणाराला जेवण्याचा हक्क नसणें हास्यापद आहे.

प्रत्येक नागरिकाला योग्य शिक्षण मिळालें आहे, या परिस्थितींत प्रत्येक मतदाराला प्रतिनिधी होण्याचा हक्क असणें अगदीं योग्य आहे. कुठल्याहीं विषमता उत्पन्न करणाऱ्या कसोटीवर तो मर्यादित होतां कामा नये. तत्त्वतः वरील गोष्ट मान्य करून कांहींच्या मतें प्रतिनिधि होण्यासाठीं, अधिक पात्रता ठेवावी असें आहे. हक्क अगर अधिकार हे कर्तव्यें करण्यासाठींच आहेत म्हणून कर्तव्यें चांगल्या रीतीनें पार पडावीं म्हणून कांहीं अधिक पात्रतेचा विचार अयोग्य नाहीं. ही अधिक पात्रता घालतांना तरतमभाव नसला, विषमता नसली म्हणजे झालें, अशी त्यांची विचारसरणी आहे. घर बांधावयाचें तर इंजिनियरला विचारलें पाहिजे. कायद्याचा प्रश्न आला तर वकिलाला विचारलें पाहिजे, या न्यायानें राज्यकारभाराचे कामीं तत्संबंधीं जे अनुभवी आहेत त्यांना विचारणें योग्य होईल. उलट कांहींच मर्यादा जर प्रतिनिधि होण्यास नसेल तर अवश्य त्या लायकीअभावीं होणारा प्रतिनिधि कार्यक्षम होणार नाहीं. श्रीमंतीचे जोरावर कांहीं निवडून येतील, कुळाचा लौकिक सांगून कोणी निवडून येतील, कोणी जातितत्त्वावर येतील व हें सर्व राज्यकारभाराचे दृष्टीनें, विधिमंडळांतील कामाचे दृष्टीनें लायक असतीलच असें नाहीं. म्हणून वरील विचारसरणींत कांहीं पात्रतेची मर्यादा घालावी असें आहे. मध्यवर्ती विधिमंडळांत निवडून येण्यापूर्वीं स्थानिक–स्वराज्य–संस्थेंत कांहीं काल काम केलें असलें पाहिजे, कांहीं अनुभव घेतला असला पाहिजे. अर्थात् ही मर्यादा विषमता उत्पन्न करणारी नाहीं व सर्वांनाच लागू असल्यामुळें तिच्यांत अन्याय नाहीं. अशी मर्यादा घातल्यानें हक्क नाकारला जात नाहीं. तो मर्यादितही तत्त्वतः होत नाहीं, उलट तो अधिक कार्यक्षम व प्रभावी होतो. हें सर्व बरोबर असलें तरी अशी मर्यादा नसावी असें प्रस्तुत लेखकाचें मत आहे. योग्य शिक्षण मिळालेला मतदारसंघ याचाच अर्थ सारासार विचार करून विवेकानें मत देण्याची मानसिक पात्रता असलेल्या नागरिकांचा मतदारसंघ. स्थानिकस्वराज्यसंस्थेंतून विवक्षित कालपर्यंत मिळालेला अनुभव त्याज्य अगर कमी महत्त्वाचा आहे असें नाहीं. परन्तु तो असेल तरच राज्यकारभार जाणण्याची पात्रता येते हा सिद्धांत सर्वथैव खरा नाहीं. तेथेंही निवडून येणारे कसे निवडून येतात हा अनुभव

प्रसिद्ध आहे. निवडून आलेले कसे व किती कार्य करतात व काय अनुभव मिळवितात व आपले लायकींत भर टाकतात, हेंही प्रसिद्ध आहे. संबंध मुदतींत सभेंत तोंड न उघडतां अनेक वेळां निवडून आलेले महानुभाव असतातच!! जो कार्यकर्ता आहे तोच कार्य करतो, जो प्रगति करूं इच्छितो त्याचीच प्रगति होते. म्हणून अनुभवाची अट घालण्यांत विशेष अर्थ नाहीं. उत्साही व प्रयत्नशील तरुणांना व्यापक क्षेत्रापासून ताटकळत ठेवणें विशेष हितकर नाहीं. योग्य शिक्षण प्राप्त झालेला मतदार हा प्रतिनिधि होण्यास लायक धरणें चूक नाहीं. जे अनुभवी आहेत त्यांचा अनादर करून जे कार्यक्षम आहेत त्यांना अव्हेरून लोकशाहीचें भागणार नाहीं हें खरें; तथापि, अनुभव व कार्यक्षमता, जनतेच्या इच्छा व आकांक्षा यांच्याशीं सुसंगत व समभावांत पाहिजेत. अनुभव व कार्यक्षमतेच्या रेखाबंद कार्यांत व्यक्तिमत्वाचा नाश होतां कामा नये. नागरिकांना राज्यकारभारांत आपुलकीचा भाव असणें हेंच लोकशाहीचें जीवनतत्त्व आहे. आपुलकीच्या जाणिवेनें जबाबदारी उत्पन्न होते व जबाबदारीनें पावलें योग्य मार्गावर व योग्य मर्यादेंत राहातात. हा भाव जनतेंत राहिला तरच लोकशाही यशस्वी होईल. जेथें राज्यसत्ता महाजन लोकांचे (Aristocracy) हातांत आहे व आमजनता राजकीय सत्तेला वंचित झालेली आहे अगर जेथें राज्यसत्ता म्हणजे राजसत्ता (Monarchy) असा हिशोब आहे तेथें जनतेवरील अंमल अगर राज्यकारभार हा जनतेच्या इच्छेला धरून नाहीं; तिची संमति हा त्याचा पाया अगर आधारही नाहीं. नैतिकदृष्ट्या अनधिकारी असलेली ही राज्यसत्ता कांहीं अलौकिक लायकीवर अगर दैवी इच्छेवर आपला आधार सांगत असते. सत्तेचा भोगवटा जनतेला समजेल अशा कारणानें मिळाला आहे असा दावा तेथें होत नाहीं; कारण तशी वस्तुस्थिति नसते. राजमुकुट देवानें डोक्यावर ठेवला असें सांगितलें की डोक्याची नालायकी खपून जाते. पण सर्वज्ञ व सर्वन्यायी परमेश्वर नालायक व कुपरीक्षक ठरतो याचा विचार कोणी करत नाहीं!! जन्मानें अलौकिक गुणसंपदा प्राप्त झाली असें सांगून जन्मदरिद्री जनतेची फसवणूक करण्यांत येते. पण जन्मानें संपत्ति मिळेल लायकी मिळतेच असें नाहीं हा अनुभव फार काळ टाळला जात नाहीं. राज्यसत्तेचा खरा आधार जनतासंमति ही गोष्ट लोकशाहींत क्षणाक्षणाला स्पष्ट होत असते. तेथें राज्यकारभाराचा रथ जनता ओढत असून रथांत बसलेला जगन्नाथ असतो. त्याची मूर्ति जनता स्वेच्छेप्रमाणें घडवीत असते. गणपतीची स्थापना व विसर्जन दोन्ही जनता सारख्याच उत्साहानें करीत असते. जनतेला जेथें ह्या प्रभुत्वाची जाणीव नाहीं तेथें राज्यसत्तेची पालखी वाहणें

हा धर्म आहे व जन्मसिद्ध धर्म आहे अशी भावना उत्पन्न करण्यांत आलेली असते. भोयांनीं पालखी खालीं ठेवली तर त्यांचें ओझें कमी होईल व पालखी-पदस्थ एक सामान्य मनुष्य आहे हें त्यांना लगलीच कळेल. पण हें वस्तुस्थितीचें ज्ञान नसतें. तें झालें म्हणजे लोकशाही उजाडलीच. पृथ्वीपति हा विष्णु नाहीं. प्रत्येक नागरिक हा विष्णु आहे. कारण त्याच्यांतही राज्याचे प्रभुत्वाचा अंश आहे. हें विष्णुपद प्राप्त झाल्यानंतर त्या प्रतिष्ठेला अनुसरून वागलें पाहिजे, तिला अनुसरून कर्तव्यें बजाविलीं पाहिजेत. त्यासाठी योग्य शिक्षण प्रत्येक नागरिकाला मिळालेंच पाहिजे. प्रत्येक मतदाराला प्रतिनिधि होण्याचा हक्क असलाच पाहिजे. सामाजिक हिताचे दृष्टीनें तो हक्क अधिक पात्रता सरसहा ठेवून मर्यादित करण अपरिहार्य झालें तर तसें करणें ठीक होईल. तथापि, अपरिहार्यता कोठें उत्पन्न झालेली आहे असा अनुभव नाहीं.

मतदानाचा हक्क, प्रतिनिधि होण्याचा हक्क व प्रत्यक्ष राज्यकारभारी होण्याचा हक्क असें नागरिकाच्या राजकीय सत्तेचें त्रिविध स्वरूप आहे. प्रतिनिधि निवडण्याचा हक्क, अर्थात् हा मुख्य व मौलिक आहे व त्यांतूनच बाकीचे दोन्ही निर्माण होतात व तेही तितकेच महत्त्वाचे आहेत. प्रतिनिधि निवडून आल्या-नंतर राज्यकारभारांत प्रत्यक्ष अधिकारपद मिळण्यासाठीं कुठलीही अडचण अगर अडथळा असतां कामा नये. प्रतिनिधीला शासनमंडळ अगर मंत्रिमंडळांत स्थान मिळण्यासाठीं पुनः निवडणूक ठेवणें हें अप्रयोजक दिसतें. मंत्री कोणीं व्हावें अगर कार्यकारी अधिकाराच्या जागेवर कोणीं जावें हें प्रत्यक्ष निवडणुकीनें ठरविणें, आधुनिक राज्याचा व्याप व विस्तार लक्षांत घेतां, योग्य ठरणार नाहीं. स्थानिक स्वराज्यांतसुद्धां अध्यक्ष निवडून आलेल्यांनींच निवडणें हें श्रेयस्कर आहे. अध्यक्ष पुनः शहरांतील सर्व मतदारांनीं प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडावयाचा यांत लोकमताला अधिक मान दिला असें दिसतें, लोकांना आपणच अधिकारी नेमला असें वाटतें, हें सर्व खरें व आटोपशीर लोकसंख्या असलेल्या शहरांत ही व्यवस्था ठेवल्यानें पक्ष-बाजी व पैसाबाजीचे दुष्परिणामही टळणें शक्य आहे. तथापि, मोठ्या लोकसंख्येचे शहरांत स्थानिक स्वराज्य संस्थेचे प्रतिनिधीही संख्येनें अधिक असतात व ते कोणाला अध्यक्ष करावें हें अनुभवानें व परिचयानें जास्त चांगलें जाणणें शक्य आहे. ५-१० हजार वस्तीचे शहरांतील मनुष्य मतदारांना जाणतां येतो, परिचयप्रसंग अनेक असतात, पण अफाट शहरांत लक्षावधि वस्ति असतांना उमेदवार अध्यक्ष नांवा-नेंच माहीत असतो, पुष्कळ वेळां पक्षानें व प्रचारानेंच त्याची माहिती होते. या

परिस्थितींत निवडून आलेल्या प्रतिनिधीवरच हें काम सोंपविणें इष्ट ठरतें. शिवाय मुख्य मतदारसंघाला किती वेळां व किती बाबतींत निवडणुकीची कवाईत करावयास लावावयाची हाही प्रश्न आहे. निवडणूक हें यंत्र किती आघात व किती ताण सहन करूं शकेल याला मर्यादा आहे. कारण तें मानवी मनाचे चैतन्यावर चालतें. वारंवार निवडणुकी व्हावयास लागल्या तर उत्साह राहात नाहीं, मनें कंटाळतात व विवेकी व विचारयुक्त मतदान होण्याचा संभव कमी कमी होत जातो. निवडणुकीचे वातावरणांत युद्धाचे वातावरणाप्रमाणें मनावर ताण पडत असतो. आशानिराशांचे प्रसंग उद्‌भवत असतात व खळबळीनें मानसिक अस्वास्थ्य वाढूं लागतें. सर्व काळ किंवा वारंवार ही परिस्थिति समाजांत असणें इष्ट नाहीं. देवसुद्धां चातुर्मासांत विश्रांति घेतात. समाजालासुद्धां निव्वळ निवडणुकींतच शक्ति व उत्साह खर्च करावयास लावणें हिताचें नाहीं. त्यालाही उसंत व विश्रांति मिळाली पाहिजे. दररोज गौरी—गणपतीचा उत्सव करण्याचा प्रसंग आला तर त्यांतील आनंद व कर्तव्यबुद्धिही लोपून जाईल. वरील सर्व गोष्टींचा विचार करतां अधिकारपदासाठीं प्रत्यक्ष निवडणूक न ठेवणेंच योग्य ठरतें. जेथें अशी प्रत्यक्ष निवडणूक आहे तेथील अनुभव विशेष आशादायक नाहीं आधुनिक राज्यकारभार ज्यांचे हवालीं करावयाचा त्यांची माहिती, त्यांचीं मतें, त्यांचें शील, रूबरू ज्यांनीं त्यांना पाहिलें असेल, ज्यांना त्यांचा परिचय असेल, ज्यांनीं त्यांचे आडाखे हेरले असतील अशांनाच ते स्पष्ट झालेले असणार, म्हणून त्यांनीं निवडणें अधिक श्रेयस्कर आहे. सार्वत्रिक मतदारसंघानें मंत्रिमंडळ निवडणें हें अशक्य नसलें तरी अनिष्ट ठरेल. अमेरिकेची परंपरा अधिकारी प्रत्यक्ष निवडणुकीनें निवडण्याची आहे. या परंपरेंतून उत्कृष्ट माणसें फारशीं पुढें आलीं नाहींत. राज्यकारभार प्रत्यक्षपणें करण्याला लागणारे गुण उमेदवारांत आहेत कीं नाहींत हें परीक्षक थोडे असतील तरच चांगल्या रीतीनें कळणें शक्य आहे. लक्षावधि मतदारांपुढें उमेदवारांचे प्रत्यक्ष गुणांपेक्षां प्रचारित गुणच येतात. लायकीपेक्षां लोकप्रियतेकडे उभें करणारांचें लक्ष असतें. या परीक्षणासाठीं प्रत्यक्षापेक्षां अप्रत्यक्ष निवडणूकच श्रेयस्कर ठरते असा अनुभव आहे. मंत्रिमंडळ हें निवडून आलेल्या प्रतिनिधींनीं निवडावें अगर त्यांच्यांतीलच तें असावें असें म्हणण्यांत कोणताही अन्याय नाहीं व त्यांत विषमतेचा भावही नाहीं. प्रतिनिधि नालायक मंत्रिमंडळ निवडणार नाहींत अगर प्रतिनिधि तत्संबंधीं चुका करणार नाहींत असें नाहीं. पण सापेक्षतेनें तो संभव या व्यवस्थेंत कमी असेल.

प्रत्येक नागरिकानें आपलें म्हणणें मांडलें पाहिजे, आपल्या गरजा सांगितल्या पाहिजेत, आपला अभिप्राय व्यक्त केला पाहिजे; यांत त्याचें व समाजाचें हित आहे. किंबहुना याप्रमाणें वागणारा नागरिक हाच लोकशाहीनिष्ठ समाजव्यवस्थेचा आत्मा आहे. त्यानें आपलें मत सांगावयाचें, अभिप्राय द्यावयाचा व हें योग्य रीतीनें व्हावें तर त्याला भाषणस्वातंत्र्य असणें जरूर आहे; नव्हे, भाषणस्वातंत्र्य हा नागरिकाचा मौलिक हक्क असला पाहिजे. मनुष्य बोलतो त्याचा क्रियेशीं निकट संबंध असतो हें विसरून चालणार नाहीं. त्यानें एकट्यानें बडबड केली, त्यांत त्याला कोणीं अडथळा केला नाहीं, राज्यसत्तेनें प्रतिबंध केला नाहीं येवढाच अर्थ भाषण–स्वातंत्र्याचा नाहीं. स्वगत भाषणें करण्याला कोण अडथळा करणार ? व तीं करणें म्हणजेही भाषण-स्वातंत्र्य नाहीं. पण जेव्हां मनुष्य जमावांत बोलतो, जमावाशीं बोलतो त्या वेळीं त्याचें बोलणें नुसतेंच बोलणें नसतें. येथें भाषणस्वातंत्र्याचे हक्काचा प्रश्न उपस्थित होतो. हक्क हे कर्तव्यासाठीं, कार्यासाठीं आहेत म्हणून भाषणस्वातंत्र्याचे अधिकाराचा कर्तव्याचे दृष्टीनें विचार करणें जरूर आहे. सार्वजनिक हितासाठीं सारासार विचार करून अभिप्राय देणें हें एक नागरिकाचें कर्तव्य मानलें आहे. समाजहित कशांत आहे हें विचार करून सांगणें हा एक नागरिकधर्माचा भाग आहे. हें कर्तव्य करतांना जर त्याला शिक्षेची भीति असेल तर हें कर्तव्य त्याचे हातून योग्य तऱ्हेनें बजावलें जाणार नाहीं. सरकारनें अगर समाजानें कोणत्या मार्गानें जावें म्हणजे योग्य हें सांगणें जर कर्तव्य, तर तें सांगितलें असतां राज्यसत्तेनें शिक्षा देणें म्हणजे समाजद्रोह आहे, राज्य-द्रोह आहे. बहुसंख्यांक लोकपरंपरा, समाजसंकेत, प्रचलित विचार या विरुद्ध जाण्याचें मनांत आणीत नाहींत. जे थोडेसे आणतात, त्यांतून अत्यंत थोडे आपले विरोधी विचार बोलून दाखविण्याचें धैर्य दाखवितात. अंगभूत उदासीनता जरी नाहीं तरी शिक्षेचे भीतीमुळें निर्माण झालेली उदासीनता दूर करणें भाषणस्वातंत्र्यानें सहज साध्य आहे. राज्याला लोकांच्या आकांक्षा कळल्या पाहिजेत, त्याचे कार्यांत लोकमताचा पाठिंबा पाहिजे या दृष्टीनें जास्तींत जास्त प्रमाणावर लोकमत कळणें जरूर आहे. भाषणस्वातंत्र्याचे अभावीं हें अशक्य आहे. भाषणस्वातंत्र्य नसेल तर व्यक्तीचें जीवन गुदमरून जाईल, त्याचें नागरिकपण उणें राहील. माणसाला त्याला वाटेल तें बोलून दिल्यानें त्याला प्रसन्न वाटतें, अपुरेपणाचा भाव जाऊन त्याचें मन विकासोन्मुख होतें. नैतिक दृष्टीनें त्याचे नागरिकत्वाला पूर्णता येते. भाषणस्वातंत्र्य नाकारणें म्हणजे अभिप्राय देणें हें कर्तव्य त्यास करूं न देणें आहे; जेथें राज्यसत्ता मौलिक कर्तव्यें करणें अशक्य करते तेथें ती स्वतःचाच नैतिक अधिकार घालविते व नागरिकनिष्ठेचाही

नैतिक आधार नष्ट करते. भाषणस्वातंत्र्य नाकारणें म्हणजे जें आहे, जें विद्यमान आहे व ज्याविरुध्द आवाज उठत आहे तें कायम ठेवण्याचा प्रयत्न करणें असाच अर्थ होतो. विद्यमान आहे तें योग्य आहे अशी खात्री राज्यसत्ता प्रजेची करूं शकत नाहीं, बुद्धिवाद करून तें श्रेयस्कर आहे हें ती प्रजेला पटवूं शकत नाहीं. चर्चेंत व वादविवादांत विद्यमानाची विफलता लक्षांत येईल म्हणून भाषणस्वातंत्र्य राज्यसत्ता नाकारते. तिचे आचरणांत सारासार विचाराची जागा सुलतानी प्रवृत्तीनें घेतली याचा पुरावा म्हणजे भाषणस्वातंत्र्याचा अपहार. भाषणस्वातंत्र्य बंद केल्यानें बंडखोर विचार बंद होत नाहींत, त्यांचा उच्चारही बंद होत नाहीं. चौकांतील चळवळ तळघरांत जाते व आपल्या स्फोटक आवाजानें बहिऱ्यांनाही जागें करते. दाबून टाकल्यानें तिचा अधिकच प्रसार होतो. लोकमतापासून राज्यकर्ते अधिक दुरावत जातात. समजुतीनें घेणें म्हणजे दुर्बलता आहे असें मानून राज्यकर्ते धाकधपटशावर आरूढ होतात. हे बुजरे घोडे शेवटीं स्वाराला खड्डयांत आणतात. भाषणस्वातंत्र्य नाकारल्यानें जनमनाचा कानोसा घेण्याचे मार्गच राज्यसत्ता बंद करते व स्वतःचे नाशाचा मार्ग मात्र उघडते.

एके काळीं राज्यकर्त्यांचे धर्माविरुद्ध बोलणें हा गुन्हा होता. आधुनिक जगांत स्वतःचीं धार्मिक मतें बोलण्यास सर्वसामान्यपणें स्वातंत्र्य आहे. धर्मसत्ता व राज्यसत्ता यांची भागीदारी क्वचितच आहे. दोन्ही एकत्र अगर एकजीव कुठेंही नाहींत. राजा म्हणजे धर्मगुरु अगर धर्मगुरूला राज्यसत्तेचे अधिकार हें दृश्य आतां दिसत नाहीं. राज्यसत्ता सर्वत्र धर्माबाबत स्वातंत्र्य देते. राज्यसत्ता प्रजेचें ऐहिक सुखच पाहाणें आपलें मुख्य कर्तव्य समजते. एका अर्थानें आधुनिक राज्य हें धर्मभ्रष्ट झालें आहे!! तथापि कुठल्याहि राज्यांत प्रत्यक्ष राज्यसत्ता वापरणारे कुठल्या तरी धर्माचे असतातच. कुठल्याही राज्यांत धर्म अफू जरी मानला गेला तरी तो अद्यापि कोठेंही परलोकवासी झाल्याचें उदाहरण नाहीं. उलट सोव्हियट रशियांत त्याची उत्पादनक्षमता वाढूं लागली आहे! चालू युद्धांत रशियांत त्याचें पुनर्जीवन होत आहे. लोक कुठला तरी धर्म मानतात, त्यामुळें राज्यकर्ते यांचा जो धर्म असेल त्याला त्या राज्यांत अधिक प्रतिष्ठा साहजिक मिळते. धार्मिक सहिष्णुता असली तरी राज्यकर्त्यांच्या धर्माला साहजिक सवलती मिळतात, मानमरातब मिळतो. राज्यकर्ते मुसलमान होते त्या वेळीं येथें काय स्थिति होती हें सांगण्याचें कारण नाहीं. पण आज त्यांचा धर्म खिस्ती असल्यामुळें त्या धर्मांतील लोकांना व त्यांत येणारांना फायदा मिळतो. खिस्ती–मिशनच्या कार्याला सवलती मिळतात. खुद्द हिंदुस्थानसरकार खिस्तीधर्मावर दरसाल एक कोट रु. खर्च करतें. संपूर्ण धार्मिक स्वातंत्र्य या स्थितींत अपूर्ण आहे. समतेच्या अभावीं

स्वातंत्र्याला पूर्णता येत नाहीं. धार्मिकदृष्ट्या स्वमत बोलण्यास सर्वांना हक्क आहे याची पूर्णता कुठल्याही धर्माला, राज्याकडून पुरस्कार मिळतां कामा नये, असें असेल तर होईल. तफावती पुरस्कारानें विशिष्ट धर्माला राज्याचा पाठिंबा आहे असा भाव समाजांत उत्पन्न होतो व त्याचा परिणाम मतस्वातंत्र्यावर झाल्यावांचून राहात नाहीं. कुठलेंही स्वातंत्र्य समतेच्या वातावरणांतच नांदूं शकतें. राज्यानें या बाबतींत इष्ट ती समता राखण्यासाठीं संपूर्णपणें धर्मापासून अलिप्त राहाणें जरूर आहे. राज्यांतील सुख व शांति या 'धर्मभ्रष्टते'नेंच साधणारी आहे. नागरिकानें किती देव पुजले अगर न पुजले याबाबत राज्यानें संपूर्णपणें उदासीन राहिलें पाहिजे.

मोठ्या प्रमाणांत धार्मिकबाबतींत मतस्वातंत्र्य आधुनिक राज्यांत आहे व ही सहिष्णुता दाखविणें अनुभवानें श्रेयस्कर ठरलें आहे. तथापि, सामाजिक व विशेषतः राजकीय बाबतीत भाषणस्वातंत्र्य तितकेंच श्रेयस्कर आहे, तेथेंहि संपूर्ण सहिष्णुता पाहिजे हें अद्यापि व्हावें तितक्या प्रमाणांत मान्य झालेलें नाहीं. ज्या मतांचा परिणाम प्रचलित व्यवस्थेचा पाया नाहींसा करण्यांत होणार तीं मतें बेकायदेशीर ठरवून त्यांना दडपून टाकण्याचा हक्क राज्यसत्तेला आहे असें सर्वसाधारणपणें मानण्यांत येतें. वास्तविकपणें प्रचलित व्यवस्थेविरुद्ध असलेलीं मतें अराजक आहेत, तीं प्रतिपादणारांना राज्यच नको आहे, असें कुभांड-रचून तीं कांहीं ठिकाणीं दडपलीं जातात. कांहीं ठिकाणीं तीं मतें समाज-विघातक आहेत, त्या मागील तत्त्वप्रणालीच चूक व समाज नष्ट करणारी, म्हणून तीं दडपलीं जातात. कांहीं ठिकाणीं मतस्वातंत्र्य दिलें तर समाजतांत विरोध उत्पन्न होऊन शांतताभंग होईल म्हणून दडपलीं जातात. वास्तविक मतें बोलून दाखविणें यांत दोन क्रिया होतात. एक निव्वळ तात्त्विक म्हणजे मतांमागील तत्त्वप्रणाली सांगणें, तिची चर्चा करणें व दुसरी प्रतिपादित मत समाजांत सिध्द व्हावें म्हणून प्रत्यक्ष क्रियेबाबत दिग्दर्शन, विवरण व वर्तन. तात्त्विक व प्रात्यक्षिक यांमधील हा फरक लक्षांत घेतला पाहिजे. त्याचप्रमाणें मतप्रदर्शनाचा काल अगर तत्कालीन परिस्थितिपण लक्षांत घेतली पाहिजे. केवळ मतें सांगणें व तदनुसार वर्तन करणें यांतील फरक लक्षांत घेतां मताचे स्वरूपाचा विचार करतांना जी दृष्टि ठेवावी लागेल त्यापेक्षां निराळी दृष्टि मतानुसार होणाऱ्या वर्तनाबाबत ठेवावी लागेल हें स्पष्ट आहे. कालविषयक परिस्थिति लक्षांत घेतांना, शांतेच्या कालांत जी दृष्टि ठेवावी लागेल, त्यापेक्षां निराळी दृष्टि-युद्धाचे अगर अंतर्गत बंडाळीचे काळांत ठेवावी लागेल हेंही लक्षांत येईल. विचाराचें स्वरूप, जसेंचे तसें उच्चारांत येतें असें नाहीं, व उच्चाराचें स्वरूप जसेंचे

तसें आचारांत येतेंच असें नाहीं. प्रत्येकाचें ऐन स्वरूप व त्यांचा परस्परांतील संबंध हे दोन स्वतंत्र प्रश्न मानून त्यांचा विचार केल्यानें आधुनिक कालांतील बऱ्याच घटनांची संगति लागते व सम्यक् ज्ञानहि होतें; आधुनिक राज्यें यांचें वर्तन स्पष्ट होतें.

भाषणस्वातंत्र्याचा हक्क हा मौलिक हक्क आहे. त्याच्याशिवाय स्वातंत्र्य नाहीं, स्वातंत्र्याची वाचाच ती आहे. त्याचे अभावीं स्वातंत्र्य हें मुकें, म्हणजे अपूर्ण आहे. केवळ राज्याचे दृष्टीनें विचार केला तरी प्रत्येकाला व्यक्तिशः अगर संघशः मत-प्रदर्शनाला पूर्ण व अप्रतिहत हक्क असला पाहिजे. त्यानें काय बोलावें व काय बोलूं नये याला राज्यानें मर्यादा घालूं नये. प्रचलित समाजव्यवस्था त्याला पसंत नसेल तर तें बोलून दाखविणें हा त्याचा हक्क आहे. प्रचलित व्यवस्था समाजहिताविरुद्ध आहे, म्हणून जरूर तर सशस्त्र बंड करून ती निकालीं लावली पाहिजे असेंही म्हणणें या हक्काला धरून आहे. विद्यमान राज्यव्यवस्था उत्कृष्ट आहे अगर ती निकृष्ट आहे, हें म्हणण्याचा त्याला हक्क आहे. इतकेंच नव्हे तर स्वतःचे मताखेरीज अन्य मतें चुकीचीं, घातुक म्हणून तीं दडपून टाकलीं पाहिजेत हें प्रतिपादण्याचाही हक्क त्याला आहे ! ! तात्पर्य, राजकीय, सामाजिक अगर अन्य विषयांसंबंधीं अगर व्यवस्थेसंबंधीं बिनहरकत मतप्रदर्शन करण्याचा त्याला हक्क असला पाहिजे. हें मत-प्रदर्शन त्यानें स्वमुखानें करावें अगर संघशः करावें; वृत्तपत्रद्वारें करावें, पुस्तकें छापून करावें; आपलें म्हणणें त्याला समाजांत उपलब्ध असलेल्या साधनांनीं लोकां-पुढें मांडण्यास पूर्ण वाव असावा. राज्यसत्ता त्याला श्रोते मिळवून देणार नाहीं, वाचक मिळवून देणार नाहीं, पण श्रोत्यांनीं त्याला मारहाण करूं नये, त्याची पुस्तकें घेणारांवर खटले होऊं नयेत इतकी खबरदारी राज्यसत्तेनें घेतली पाहिजे. भाषणस्वातंत्र्याचा हक्क राज्यांत जोपासणें हें राज्याचे दृष्टीनें इष्ट आहे व त्याचें स्वरूप वर लिहिल्याप्रमाणें व्यापक असलें पाहिजे. जर राज्यांत याप्रमाणें नसेल तर अखेरीला राज्यांतील विचारसामर्थ्यच नष्ट होईल. सामाजिक परंपरा, सामाजिक संस्था यांवर होणारी टीका अमुक मर्यादेपर्यंत योग्य असें ठरविणें कठीण आहे. टीकेला हिंसेचा वास येतो म्हणून ती बंद केली कीं, ती अधिकाधिक बंद करावी अशी व प्रवृत्ति राज्यकर्त्यांची वाढते. जातिजातींत द्वेष माजतो, वर्गद्वेष माजतो म्हणून टीका बंद केली, मुस्कटदाबी केली कीं, समाजांतील विषमता मनुष्यनिर्मित आहे, त्यांतील अन्याय माणसांनीं केले आहेत, विद्यमान व्यवस्था म्हणजे ईश्वराची व्यवस्था नाहीं, तर कांहीं वर्गनिष्ठ श्रीमंतांनीं स्वार्थासाठीं केलेली आहे, जाती अगर

वर्ण भगवंतांनीं निर्माण केले नाहींत, जन्मानें कोणी श्रेष्ठ नाहीं, इत्यादि टीकासुद्धां, राज्यकर्त्यांना अगर त्यांच्या सग्यासोयऱ्यांना नकोशी वाटते. नाना प्रकारांनीं तिला आळा घालण्याचा प्रयत्न होतो. सामाजिक व आर्थिक बाबतींत अमुक एक गोष्ट निर्विवादपणें योग्य आहे असें ठासून सांगतां येत नाहीं. सामाजिक व आर्थिक सिध्दान्त हे सर्व सापेक्ष आहेत. म्हणून त्यांची तरफदारी राज्यसत्तेनें करणें श्रेयस्कर नाहीं. आजचें सिद्ध वाटणारें प्रमेय, उद्यां उलटें होईल; जीं सामाजिक शास्त्रें आहेत त्यांत चिरकालीन व चिरंतन असें निरपेक्षपणें अमुकच आहे असें सांगणें हास्यास्पद आहे. भौतिक शास्त्रांतील प्रमेयें, व कार्यकारण भाव निश्चित व निरपेक्ष. कुठल्याही काळीं कुठल्याही देशांत दगड वर फेकला तर खालीं येईल, परंतु मनुष्यें सर्व काळीं सर्व स्थळीं सारख्या परिस्थितींत सारखेंच वर्तन करतील असें निश्चितपणें सांगतां येणार नाहीं. सामाजिक शास्त्रें मनुष्यांचे प्रवृत्तींचा विचार करतात म्हणून त्यांतील प्रमेयें सापेक्ष; त्यांत भौतिक सिद्धान्ताची निश्चिती नसते. या परिस्थितींत राज्यसत्तेनें आग्रह धरून एखाद्या विचारप्रणालीची बाजू घेऊन वागणें गैर आहे. अमुक एक मतप्रणाली वाईट म्हणून गृहीत धरून वागणें चूक. असें होऊं लागलें तर समाजांतील विचारप्रवृत्तीच नष्ट होईल. मतें परिणामीं वाईट हें ठरविणें कटीण म्हणून तीं ऐनजिनसी खच्ची करणें यांत समाजांतील विचारशक्ति खच्ची होते. विचारशक्ति विचार करूनच वाढते. विचाराला शिक्षा होऊं लागली तर विचारही कोणी करणार नाहीं. विचाराला असमर्थ झालेले नागरिक, बुध्दिपात झालेले नागरिक कर्तव्यशील असणार नाहींत. आपलीं मनोगतें, आपले अभिप्राय सांगणें हें कर्तव्य बजाविण्यास अवश्य लागणारी विचारशक्तीच जर नष्ट झाली तर मनुष्यें नागरिकधर्म कसा पाळणार ? जीवनांत येणारे अनुभव मनांतच पडून सुकून जातील. त्यांचा उपयोग समाजाला होणार नाही. भाषणस्वातंत्र्य नष्ट केल्यानें राज्याला अवश्य लागणारा कर्तव्यदक्ष नागरिकवर्गच नाहींसा होतो.

वर लिहिल्याप्रमाणें भाषणस्वातंत्र्य अमर्याद व अप्रतिहत ठेवलें तर समाजांत अव्यवस्था व पुंडावा माजेल असा आक्षेप येण्यासारखा आहे. भाषणस्वातंत्र्याला कुठेंही व कोणतीही मर्यादा नसली तर कुणीं कांहींही बोलावें, कसेंही बोलावें हें होईल व मग मतप्रदर्शन निव्वळ शाब्दिक राहाणार नाहीं, त्यांत हातही काम करूं लागतील. विवेचनांतील दुर्बलता, मनाची दुर्बलता मनगटाचे सहकार्यानें भरून निघेल. व्यक्तिव्यक्तींतले संबंध कडवट होतील. समाजाचे बंद आग्रही व अत्याचारी मतप्रदर्शनानें तुटतील. जें काम विवेकानें करावयाचें त्या ठिकाणीं दमदाटी येईल. या

वातावरणांत मुद्दे लुप्त होतील, गुद्दे प्रभावी ठरतील. या सर्वांचा अर्थ असा कीं, समाजांतील लोकांचे मनावर युक्तीपेक्षां शक्तीचा प्रभाव जास्त झाला आहे, आणि हा समाजांतील भाव राज्यविषयक प्रश्नांसंबंधीं खरा असेल तर राज्यांतच कांहीं तरी विशेष आक्षेपार्ह आहे व तें दूर करण्याकरितां, समाजाचें मन या थरापर्यंत आलें आहे. विवेकानें आळवून, विनंत्यांनीं आर्जवून राज्य आपली क्रिया बदलत नाहीं हा अनुभव चांगलाच दृढ झाल्याशिवाय जनताजनार्दन, नारसिंहाचें स्वरूप घेत नाहीं. दंगाधोपा करावा, अव्यवस्था माजवावी अशी लोकांची प्रवृत्ति नसते. जनता समुद्राप्रमाणें गंभीर असते. माणसाची स्वाभाविक प्रवृत्ति शांततेनें व बिन कटकटीनें राहावें अशीच असते. धामधुमीच्या वातावरणांत सामान्य माणसांना नकोसें होतें. म्हणून जेव्हां मूठभर नव्हे तर बहुतेक सर्व लोक अंग झाडून प्रचलित राज्यसत्तेविरुद्ध बाहु उभारतात व राज्यसत्तेच्या मार्गावर मुकाबला करण्यास उद्युक्त होतात त्या वेळीं हें असामान्य वर्तन कांहीं तरी क्षुल्लक कारणासाठीं त्यांचे हातून होत नाहीं. सामान्यपणें माणसें राज्याबाबत निष्ठावन्त असतात, निदान उदासीन असतात; पण तीं जेव्हां राज्याविरुद्ध बंड करून उभीं राहातात तेव्हां त्याचा अर्थ राज्यानें आपली नैतिक प्रतिष्ठा गमाविली आहे असाच होतो. अन्यायाची सीमा झाल्याशिवाय पवित्र व मौलिक अशा समाजाच्या भावना दुःखविल्या गेल्याशिवाय, सामान्य जीवनालासुध्दां राज्यकारभार असह्य झाल्याशिवाय, निष्ठेचे बंद तुटत नाहींत. निष्ठा नष्ट झाल्यानंतर लोक प्रत्यक्ष क्रांतींत सामील होतील अगर जे निश्चयी व वीरात्मे आहेत त्यांच्या राज्याविरूध्द चालविलेल्या लढ्यांत सहानुभूति दाखवितील. कारण लोकांच्या मनाचीच गोष्ट ते करीत असतात. लोकांच्या तीव्र निराशेचे, तीव्र रागाचे ते प्रतिनिधि असतात. म्हणून त्यांनीं केलेलीं वीर कृत्यें, सोसलेलीं संकटें यांकडे लोक आपुलकीनें पाहातात. संमतिशून्य सरकार, प्रचलित राज्यसत्ता त्यांना अत्याचारी भलेंही म्हणो, गांजलेली जनता त्यांना उध्दारकच म्हणते, हुतात्मे म्हणून त्यांचीं गीतें गातें. उदासीन जरी ती दिसली तरी वस्तुतः तशी नसते. भाषणस्वातंत्र्य दिल्यानें अशांतता होईल, पण ती केव्हां व कोणत्या स्थितींत होईल हें वर पाहिल्यानंतर हा अशांततेचा आक्षेप अयथार्थ ठरतो. उलट भाषणस्वातंत्र्याचे प्रमाणावरून राज्याबद्दल लोकांचे मनांत किती निष्ठा आहे हें कळून येतें. ज्या राज्यसत्तेला जनमताचा पाठिंबा आहे असा विश्वास आहे ती राज्यकारभारावर टीका करण्यास बंदी करणारच नाहीं. टीकेला मिळण्याऱ्या वावावरून, संधीवरून हा विश्वास किती आहे हें कळून येतें. राज्यकारभारांतील चुका, गैरमुत्सद्दीगिरी जाहीर टीकेनें दाखविली गेली म्हणूनच

अनेक सुधारणा झाल्या अशीं उदाहरणें शेंकडों आहेत. कांहीं टीका गैर असेल म्हणून अजिबात भाषणस्वातंत्र्य, मतप्रदर्शन बंद करणें हें चूक आहे. अग्नीनें घरें पेटवितां येतात म्हणून अग्नि त्याज्य ठरला नाहीं. उलट त्याची उपयुक्तता समाजानें गौरविली असून देवपदसुध्दां त्याला बहाल केलें आहे. भाषणस्वातंत्र्याची उपयुक्तता इतिहासानें सिध्द केली आहे. भाषणस्वातंत्र्याची, मतप्रदर्शनाची बंदी केल्यानें, अटल क्रांति टळत नाहीं, उलट लवकर येते. ज्यांची जिव्हा बंद केली जाते त्यांना सहस्र जिव्हांचें सामर्थ्य येतें. मतबंदीनेंच मतप्रदर्शन व्यापक होतें. हद्दपारीनें 'बंडखोरां'चें शरीर बाहेर जातें पण त्यांचे विचार राज्याचें काळजांत चांगलेच मूळ धरतात. विचारांना कोणी हद्दपार करूं शकत नाहीं; त्यांना भौगोलिक परिस्थिति अगर मर्यादा अडवूं शकत नाहीं. भाषणस्वातंत्र्य व ज्यांत संघस्वातंत्र्याचाही समावेश होतो हें समाजांतील असंतोषाला वाचा फोडतें. असंतुष्ट माणसानें आपलें मन दुसऱ्याजवळ बोलून दाखविलें म्हणजे त्याला थोडा संतोषच होतो. दुःखी माणसाचें दुःख त्यानें बोलून दाखविण्यानें कमी होतें. मत्सरी माणसाला निंदा करण्याला मिळालें म्हणजे समाधानच वाटतें. मनांतील मळमळ ओकल्यानें मन हलकें होतें, थोडें प्रसन्नही होतें; मग थोडे विचारीही होतें. मनुष्यांचीं मनें साफ व स्वच्छ होण्यासाठीं भाषणस्वातंत्र्य रेचकासारखें आहे, त्याजबरोबर तें प्रगतीला आवश्यक असें शक्तिवर्धकही आहे. भाषणस्वातंत्र्यानें राज्यसत्तेचे दोष विरोधक दाखवतील हें खरें; पण मित्रांच्या मतलबी पाठिंब्यापेक्षां हेंच दोषदर्शन श्रेयस्कर असतें. विरोधकांची मुसकटदाबी केल्यानें राज्यसत्ता अविवेकी होते, अंध होते, व शेवटीं आत्मनाशही टाळूं शकत नाहीं.

भाषणस्वातंत्र्याचा हक्क म्हणजे स्वगत भाषण करण्याचा हक्क नाहीं; मतप्रदर्शन हें समाजांतच व्हावयाचें, समूहांतच व्हावयाचें. भाषणस्वातंत्र्याची कर्मभूमि सामाजिक स्वरूपाची आहे. हें तिचें स्वरूप लक्षांत ठेवणें महत्त्वाचें आहे. खोलींत बसून एखाद्यानें भाषण केलें त्याचें महत्त्व नाहीं. पण जेव्हां तो मनुष्य चार लोकांत बोलतो तेव्हांच भाषणस्वातंत्र्याचा प्रश्न येतो. म्हणून भाषणस्वातंत्र्य हें खाजगी नाहीं, वैयक्तिक नाहीं, तो एक सामाजिक भाव आहे. म्हणून त्याचा उपयोगही त्याच भूमिकेवरून झाला पाहिजे. सरकारनें या स्वातंत्र्यावर बंदी घालूं नये हें योग्य आहे. त्याजबरोबर हा हक्क बजाविणारानें ज्या गोष्टींचा समाजाशीं सामाजिक दृष्टया संबंध येत नाहीं, जी बाब सार्वजनिक स्वरूपाची अगर महत्त्वाची नाहीं, निव्वळ वैयक्तिक आहे, खाजगी आहे, तिजबद्दल भाषणस्वातंत्र्याचे नांवानें वाटेल तें बोलणें अयोग्य आहे. सार्वजनिक प्रश्न अगर व्यक्तींच्या वागणुकीचा

सार्वजनिक गोष्टींशीं संबंध येत असेल तर त्याबाबत भाषणस्वातंत्र्य असणें योग्य आहे. सार्वजनिक नीतिमेत्तवर कादंबऱ्या लिहिणाऱ्या लेखकांनीं नीतिबाह्य वर्तन केलें तर त्यावर टीका करणें रास्त होईल. परंतु ज्याचा समाजाशीं संबंध नाहीं अशा तऱ्हेचें कुटाळगिरीचें भाषण करणें अगर लेख लिहिणें याला भाषणस्वातंत्र्य अगर मतप्रदर्शनस्वातंत्र्य म्हणतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें गर्दीत जाऊन 'आग आग' अगर 'साप साप' म्हणून ओरडणें यालाही कोणी भाषणस्वातंत्र्याचा सदुपयोग म्हणणार नाहीं. भाषणस्वातंत्र्य म्हणजे व्यक्तिगत निंदा अगर टवाळी करण्याचा हक्क नव्हे. समाजहितार्थच व्यक्तीचे वर्तनावर सार्वजनिक टीका करण्याचा हक्क आहे. सत्यकथन असून भागत नाहीं. तें सत्यकथन करण्यांत कांहीं सार्वजनिक हित होतें हें जर सिध्द न झालें तर भाषणस्वातंत्र्याचें संरक्षण मिळूं नये. व्यक्तिगत निंदा व टवाळी यांविरुद्ध राज्यसत्तेनें संरक्षण दिलें पाहिजे. निंदा करणारास शासन झालें पाहिजे. व्यक्तीला आपली कीर्ति, आपला लौकिक सुरक्षित ठेवण्याचा हक्क आहे व त्याकामीं राज्यसत्तेनें संरक्षण द्यावें. आपलें व्यक्तिगत जीवन खाजगीच राहावें, त्याविरुध्द सार्वजनिक चर्चा होऊं नये म्हणून व्यक्तीला जरूर तें संरक्षण करण्याचा हक्क आहे. त्याजबरोबर व्यक्तीचीं कृत्यें सामाजिक परिणाम करणारीं असतील तर त्यांवर टीका करण्याचाही हक्क अन्य व्यक्तींचा आहे. एखादा गवई पत्नीला मारीत असेल व ही गोष्ट खरीही असेल, तथापि तिला जर सामाजिक महत्त्व नाहीं व त्यावर टीका करण्यांत कोणतेंही समाजहित नाहीं तर ती टीका दंडनीय आहे. सामाजिक हितार्थ टीका आहे कीं नाहीं हें न्यायालयानेंच ठरवावयाचें असतें. निव्वळ भाषणस्वातंत्र्याचा हक्क सांगून निंदक सुटतां कामा नये. त्याचप्रमाणें अश्लील, अनीतिमान् भाषणें अगर लेख केवळ भाषणस्वातंत्र्याचा, मुद्रणस्वातंत्र्याचा हक्क सांगून निर्दोष ठरूं नयेत. कोणतें अश्लील व कोणतें अनीतिमान् हें सुद्धां न्यायालयानेंच ठरविलें पाहिजे, कार्यकारी सत्तेनें ठरविणें योग्य नाहीं. कुठल्या तरी कारकुनानें वाचलें, त्याला नापसंत पडलें, त्यानें अभिप्राय दिला, प्रमुखानें मान्य करून लिखाण अश्लील ठरविलें हा उपक्रम अयोग्य आहे. लेखकाचें म्हणणें ऐकून घेऊन दोन्ही बाजूंचा पुरावा लक्षांत घेऊन न्यायालयांतच त्याचा निवाडा होणें इष्ट आहे. तसें झाल्यानें समाजाला न्याय झाला असें वाटतें व भाषणबंदी अगर मतप्रदर्शनबंदी अयोग्य रीतीनें झाली नाहीं हेंही सिध्द होतें. भाषणस्वातंत्र्य, मतप्रदर्शनस्वातंत्र्य यांची ही मर्यादा त्याला संरक्षकच होते.

भाषणस्वातंत्र्यांत व त्याबरोबर संघस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य येतें. भाषणस्वातंत्र्य

हें चार लोक जमले तरच शक्य आहे म्हणून लोकांना एकत्र जमण्याचा हक्क आहे. कांहीं प्रसंगानें ते सभेसाठीं जमोत अगर कांहीं कार्य करण्याकरितां संघ काढून त्या दृष्टीनें जमोत त्यांना हा हक्क असणें जरूर आहे. हल्लींचे युगांत संघशक्ति हीच शक्ति आहे. एकटादुकटा एखाद्या शिलेदार प्रभावी असेल पण त्याला कार्य करावयाचें असेल तर अनेक लोकांचें सहकार्य त्याला लाभलें पाहिजे. नुसतें मतप्रदर्शनच करावयाचें झालें तरी एकानें तें करणें व संघानें तें करणें यांत फरक आहे. संघाच्या मतप्रदर्शनाला महत्त्व साहजिकच जास्त असणार. एखाद्या मजुरानें सरकारी धोरणावर टीका केली व मजूरसंघानें आपले विचार प्रकट केले यांतील फरक सहज लक्षांत येण्यासारखा आहे. या दृष्टीनें संघानें केलेल्या मतप्रदर्शनाला प्रातिनिधिक स्वरूप येतें. संघस्वातंत्र्य या दृष्टीनें जरूर आहे. नागरिकांना संघ काढून कार्य करणें, मतप्रदर्शन करणें याला मोकळीक असली पाहिजे. ज्या संघांचा अगर संस्थांचा हेतु उघडउघड विद्यमान व्यवस्था जरूर पडल्यास हिंसेचे मार्गानें-सुध्दां बदलून टाकावी असा असेल त्यांना सभा करून देऊन मतप्रचार करून देणें योग्य आहे का? आज या देशांत व अनेक देशांत अनेक संस्थांना त्यांच्या मार्गाचा कार्यपध्दतीचा विचारही न करतां बंदी करण्यांत आलेली आहे. या संस्थांमार्फत, सभा करून मतप्रचार करणें राज्यसत्तेनें बेकायदेशीर ठरविलेलें आहे. वास्तविक या बंदीनें जें अटल तें कुठेंही टळलें नाहीं व टळणार नाहीं. कांहीं ठिकाणीं संस्था बेकायदेशीर नाहींत पण त्यांच्या सभा सार्वजनिक जागीं करण्यास बंदी आहे. इतकें करून कुठेंही त्यांचा मतप्रचार बंद झालेला नाहीं. फक्त सार्वजनिक ठिकाणीं भाषणानें, मतप्रदर्शनानें होणारा प्रचार बंद झाला एवढेंच. अशा प्रकारें बंदी करून राज्यसत्तेला लोकांचे मनांत काय चाललें आहे हें कळणें अशक्य होतें. तात्त्विकदृष्टया राज्यांत सर्व तऱ्हेच्या लोकांच्या इच्छा विचारांत घेऊन त्यांच्या आकांक्षा समजावून घेऊन राज्यकार्य झालें पाहिजे. व्यवहार व तत्त्व दोन्ही दृष्टींनीं हीं बंधनें चूक आहेत. जाहीर सभा भरल्यास शांतताभंग होईल म्हणून ती बंद करणें म्हणजे जे शांतताभंग करणारे आहेत त्यांना उत्तेजन देण्यासारखें आहे. मिरवणूक नेण्याची परंपरा व प्रघात असतां, दंगाधोपा होईल म्हणून ज्यांचा कायदेशीर हक्क त्यांनाच मिरवणूक बंद करण्यास सांगणें म्हणजे गुंडगिरीला राज्यसत्तेनें प्रोत्साहन देणें आहे. राज्यसत्ता हक्क जोपासण्याऐवजीं दमदाटी करणारांचीच जोपासना करूं लागली म्हणजे अखेरीस राज्यसत्तेंत गुंडगिरी येते, न्याय पदभ्रष्ट होतो, धमकीनें कायद्याची जागा भरून निघते. नागरिकांचे हक्क, न्याय्य व मान्यता पावलेले हक्क राज्यसत्तेनें

भीतीनें संरक्षण करण्याचें टाळलें तर तिला सत्ताधीश राहाण्याचा नैतिक हक्क नाहीं व भीतिग्रस्त झालेली राज्यसत्ता फार काळ टिकणार नाहीं. म्हणून राज्याचे दृष्टीनेंही सभा भरून दिली तर शांतताभंग होईल म्हणून ती बंद करणें इष्ट नाहीं. सभा अगर निदर्शनें यांनीं कांहीं लोकांचीं मनें दुखवतील, शांतताभंग होईल म्हणून त्यांना मुळांतच बेकायदेशीर ठरविणें हें तर त्याहून अनिष्ट आहे. संभाव्य शांतताभंग हें सभास्वातंत्र्य नाकारण्याला योग्य कारण नाहीं. सभास्वातंत्र्य हा मौलिक हक्क आहे.

सभास्वातंत्र्य हा मौलिक हक्क आहे हें मानल्यानंतर ज्या संस्थांचा उद्देश वाटेल त्या मार्गानें विद्यमान व्यवस्था उखडून टाकावी असा असेल त्यांनाही सभा करून मतप्रदर्शन करण्यास प्रतिबंध नसावा हें उघड आहे. पण तात्त्विक मतप्रदर्शन व साधनभूत कार्यक्रमप्रचार यांतील भेद लक्षांत घेणें जरूर आहे. राज्य नाहींसें होणें जरूर आहे. त्याशिवाय लोकांना सुख लागावयाचें नाहीं हें सांगणें व त्याची तात्त्विक चिकित्सा करणें ही मतप्रदर्शनाची गोष्ट झाली. पण ही गोष्ट घडवून आणण्यासाठीं अमुक अमुक कार्यक्रम लोकांनीं करावा व तो पार पाडण्याकरतां कांहीं गोष्टी लोकांनीं कराव्यात म्हणून सांगणें हें मतप्रदर्शनांत येत नाहीं. विचार उच्चारले जाऊन आचार सुरू झाला, क्रियेची पावलें सरकूं लागलीं असा त्याचा अर्थ होतो. या स्थितींत आक्रमित राज्यसत्तेनें कसें वागावें हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. जे मौलिक हक्क अगर अधिकार नागरिकत्वाचे यथार्थपणासाठीं आवश्यक आहेत म्हणून येथपर्यंत सांगितलें व पुढें सांगितले जातील, त्या सर्वांना मान्यता देऊन त्यावर आधारलेल्या राज्याला व त्यांना अनुसरून चालणाऱ्या राज्यसत्तेलाच आपलें अस्तित्व आक्रमकांपासून संरक्षित ठेवणें हें समाजाचे दृष्टीनें इष्ट आहे असें मानण्याचा हक्क आहे. वरील मौलिक हक्क कायम ठेऊन, त्यांना बाध न आणतां आपलें अस्तित्व टिकविण्यासाठीं जरूर ते योग्य उपाय करण्याचाही हक्क तिला मग प्राप्त होतो. जी संस्था, अगर गट तावडतोब सत्ता हिसकावून घेण्याचा प्रयत्न करीत असेल, राज्यसत्तेचा अधिकार बळकाविण्याचा प्रयत्न करीत असेल त्यांना नेस्तनाबूद करण्याचा राज्यसत्तेला अधिकार आहे. परन्तु या आक्रमकांविरुद्ध केलेले उपाय हे योग्य किंवा अयोग्य हें सर्वस्वीं कार्यकारी सत्तेनें ठरविणें चूक आहे, नव्हे घातक आहे. राज्यसत्तेनें, कार्यकारी सत्तेनें स्वीकारलेले उपाय हे योग्य होते हें पुराव्यानिशीं दाखवून देण्याचें बंधन तिजवर असलें पाहिजे. तावडतोबीचा इलाज म्हणून संस्था बेकायदेशीर ठरविल्या तरी न्यायालयांत ह्या कृत्याचें सरकारला समर्थन करतां आलें पाहिजे. संस्था अगर गट बेकायदेशीर ठरविला नसता तर त्यांच्या अस्तित्वामुळें बेकायदेशीर

कृत्यें होणें व ताबडतोब शांतताभंग होणें नुसतेंच संभाव्य नव्हतें तर अपरिहार्य होतें, इतकें योग्य पुरावा देऊन न्यायालयांत शाबीत करण्याची जबाबदारी राज्यसत्तेवर असली पाहिजे. व्यक्तींना बिनचौकशीनें स्थानबद्ध केल्यानंतर राज्यसत्तेनें न्यायालयांत योग्य पुरावा देऊन सदरहू व्यक्तींना न्यायालयांत योग्य पुरावा देऊन सदरहू व्यक्तींना अटक केली नसती तर त्यांच्या प्रचारानें, त्यांच्या भाषणानें लोकमतावर ताबडतोब इतका परिणाम झाला असता कीं लोकांनीं गैरकायदा व शांतताभंग करणारीं कृत्यें ताबडतोब केलीं असतीं असें शाबीत केलें पाहिजे. नुसत्या संशयावरून अगर लोकमतावर वरीलप्रमाणें परिणाम होण्याचा संभव आहे म्हणून बिनचौकशी अटक करून ठेवण्याचा हक्क राज्यसत्तेला नाहीं. त्याचप्रमाणें अटकेमुळें लोकक्षोभ झाला व शांतताभंग झाला म्हणून अटक योग्य ठरत नाहीं; कारण झालेला क्षोभ व शांतताभंग हा राज्यसत्तेच्या गैरवर्तणुकीचा परिणाम आहे. तें कांहीं अटकेचें कारण होऊं शकत नाहीं. संस्था अगर त्यांतील व्यक्ति यांचें वर्तन व विचार व लोकांचीं कृत्यें यांच्यातील कार्यकारणसंबंध केवळ राज्यकर्ते, अधिकारी यांनीं जाहीर केल्यानें शाबीत होत नाहींत. आक्रमकांना नाहींसें करण्याकरितां योजलेले उपाय योग्य होते हें पुराव्यानें निस्पृह व निःपक्षपाती न्यायालयांत राज्यसत्तेनें शाबीत केलें पाहिजे. चार अधिकाऱ्यांचा अभिप्राय बरोबर मानणें धोक्याचें आहे. कारण तो एकतर्फीच असणार. अधिकारी बरोबरही असतील, पण ते अधिकारी म्हणून त्यांचें बरोबर हें मान्य करणें चूक आहे, नागरिकांचे दृष्टीनें व राज्याचे दृष्टीनेंही घातक आहे; म्हणून अधिकाऱ्यांच्या कृत्याची शहानिशा न्यायालयांत होणें अत्यंत इष्ट आहे. मागील व हल्लींचे युद्धांतील येथील व अन्य देशांतील अनुभव राज्यकर्त्यांचे हातांत नागरिकस्वातंत्र्याचे हक्क संकटकाल म्हणून न्यायालयांतील संरक्षण दूर करून अगर कमी करून दिल्यानें चिरडले गेले असाच आला आहे. येरवीं अगर संकटसमयींसुद्धां एखाद्या अधिकाऱ्याचे लहरीवर नागरिकस्वातंत्र्य अवलंबून असतां कामा नये. स्त्रियांचे सूत–कमिटींत राज्य उलथून टाकण्याचा कटही लहरी अधिकाऱ्याला दिसतो ! ! व्यायामासाठीं एकत्र जमणाऱ्या मंडळांत राज्यकर्त्यांच्या खुनाची योजना दुसऱ्या एकाला दिसते. प्रचलित व्यवस्थेविरुध्द बोलणारी प्रत्येक व्यक्ति अगर संस्था, राज्यसत्ता जबरीनें हरण करणारें आक्रमक आहे असें गृहीत धरण्याची मुभा कोणाही राज्यसत्तेला अगर तिच्या अधिकाऱ्यांना असतां कामा नये. अवश्य त्या नागरिकहक्कांना मान्यता देऊन त्यांवर आधारलेल्या व त्यांना अनुसरून चालणाऱ्या राज्यसत्तेलाच आत्मसंरक्षणाचा नैतिक हक्क आहे. पण तोही तिच्या जिवावर अगदीं बेतलें आहे, वार उगारला आहे अशा

परिस्थितींतच आहे व तेव्हांच तो सुरू होतो. कृष्ण जन्मणार, प्राणहरण व राज्य-हरण करणार म्हणून देवकीला होणारें प्रत्येक अपत्य आगाऊ मारण्याचा हक्क प्राप्त होत नाही. कृष्णजन्मानंतरसुद्धां जिवाला धोका सुरू होईपर्यंतही हक्क प्राप्त होत नाहीं. व्यक्तीला तसेंच राज्याला संभाव्य आक्रमक म्हणून त्याला मारण्याचा, त्यावर हल्ला करण्याचा हक्क नाहीं. आत्मसंरक्षणाचा हक्क प्रत्यक्ष हल्ल्याचा धोका सुरू झाला म्हणजे सुरू होतो व तो संपतांच तो संपतो. व्यक्तीप्रमाणें राज्यालाही आत्म-संरक्षण करतांना योग्य तेवढेंच केलें हें शाबीत करतां आलें पाहिजे व त्यानें तें केलें पाहिजे, येवढी मर्यादा त्यावर असलीच पाहिजे.

कांहींच्या मतें वरील विचारसरणी जरी योग्य असली तरी युध्दकालीन अगर तत्सम परिस्थितींत ती सर्वस्वीं स्वीकारणें योग्य ठरणार नाहीं व यशस्वी पण होणार नाहीं. राष्ट्रांतच यादवी माजली व दोन्ही पक्ष सशस्त्र होऊन राज्यसत्ता काबीज कर-ण्यासाठीं लढत असतां कोण कुणाला नागरिक मानणार, व कोण कुणाला बंडखोर ठरविणार ? स्पॅनिश राज्यक्रान्तीचे वेळीं असाच अनुभव आला. 'प्रस्थापित सत्ता' अशी या परिस्थितींत असूं शकत नाहीं. समाजांत सर्वत्र अस्थिरता उत्पन्न झालेली असते. विचार व विवेक मालविले जातात. शस्त्रांनीं व हिंसेनें सर्वत्र वातावरण निनादून गेलेलें असतें. विवेकाची वाणी ऐकूंच जात नाहीं. क्रांती म्हणजे विद्यमान व्यवस्था निर्मूलन करण्यासाठींच असल्यामुळें तिनें मानलेले व जोपासलेले नागरिकांचे हक्क व अधिकार निरर्थक ठरतात, क्रांतिकालांत ते निर्जीव होतात. सत्ता कशी वापरावी, अगर ती तात्त्विक अगर नैतिक दृष्ट्या कशावर आधारावी हा त्या वेळीं प्रश्न नसतो, तर प्रत्येक पक्षापुढे ती कशी घ्यावी व घेतल्यानंतर विरोधकांचा संपूर्ण नाश होईपर्यंत कशी बळकट करावी एवढाच प्रश्न असतो, व तो शस्त्रांनीं सोड-विला जातो. वादविवाद, चर्चा, सद्भावना व सदसद्विवेकबुद्धीला आवाहन हें सर्व निरुपयोगी ठरल्यानंतर क्रांतीचा जयघोष होत असतो. हृदयपालट होणें अशक्य झालेलें असतें, नीति निराश झालेली असते. मन वळविण्यांत अर्थ नाहीं हें समजून शरीरें लोळविण्याचे क्रियेस सुरवात झालेली असते. क्रांतीचें आगमन म्हणजे मनु-ष्यांच्या मनांतील विवेकशास्त्रावरील श्रध्दा संपून शस्त्रावरील श्रध्दा सुरू झाली असाच अर्थ होतो. या परिस्थितींत, या विवेकशून्य वातावरणांत, राज्यकारणशास्त्र काय सिद्धांत सांगणार ? धरणीकंप चालू असतां कशी गृहरचना करावी म्हणजे ती पडणार नाहीं हें सांगण्यासारखेंच अप्रयोजक आहे. धरणीकंपानें घरें हादरलीं जाऊं नयेत म्हणून कशीं जरी बांधलीं तरी धरणीकंप आला म्हणजे तीं कोलमडणारच.

धरणीकंप संपल्यानंतर स्थिर झालेल्या भूप्रदेशाचें स्वरूप पाहून कशीं नवीन घरें बांधावीं हें सांगतां येईल. घरांची रचना मुळीं भूमी स्थिर आहे या कल्पनेवर आधारलेली आहे. जेथें तीच अस्थिर तेथें गृहरचनाशास्त्र निरर्थक व निष्फळ ठरतें. क्रांतिकाल हा समाजांतील धरणीकंपाचा काल आहे. समाजांतील सर्व विचारभूमि हादरलेली असते. कुणाचे तरी हातीं राज्यसत्ता स्थिर होऊन प्रस्थापित होईपर्यंत नागरिकहक्क निर्जीव होतात. क्रांति यशस्वी झाली वंचित व वगळलेले लोक सत्ताधीश झाले, म्हणजे राज्याचें वैभव त्यांना प्राप्त होतें; त्याचा डंका वाजतो. या प्रसंगीं त्यांची सत्ता कुठल्याहि नागरिकहक्कांवर आधारलेली नसते, शस्त्रांनीं त्यांनीं ती मिळविलेली असते व त्यांचेच जोरावर त्यांचा हुकूम बजाविला जातो. जेव्हां हे सत्ताधीश लोकमताचा कौल लावून आपली सत्ता लोकांचे संमतीनें पुनीत व पूर्ण करतात, त्या वेळीं या प्रस्थापित राज्यसत्तेला नैतिक अधिकार प्राप्त होतो व नागरिकहक्क पुनः सजीव होतात. ज्या आदर्शाचें वातावरण उपलब्ध असेल, त्याला अनुसरून नागरिकहक्कांचे स्वरूप ठरत जाईल. पण क्रांति अयशस्वी झाली, पूर्वीचेच सत्ताधीश कायम राहिले, मग जे अयशस्वी म्हणून बंडखोर ठरले, त्यांच्या नागरिकहक्कांचें काय होतें, याचा विचार करणे जरूर असतें. त्याचप्रमाणें ज्यांनी क्रांति हाणून पाडली त्यांच्या कृत्यांबद्दल कोण जबाबदार याचाही विचार करणे महत्त्वाचें ठरतें.

कोणत्या राज्यसत्तेला आत्मसंरक्षणाचा हक्क आहे याचा उल्लेख वर आलाच आहे. जी राज्यसत्ता केवळ शस्त्राचे जोरावर आधारलेली आहे, तेथें नागरिकहक्कांचा प्रश्नच नाहीं; त्याजबरोबर नागरिकांच्यावरही निष्ठेचें बंधन नाहीं. प्रजा व प्रचलित सत्ता यांमध्यें या परिस्थितींत अहोरात्र युद्धाचा प्रसंग आहे. तें उघड चालेल, गुप्त चालेल, कधीं जोरानें खळबळेल कधीं स्तब्ध झाल्याचें दिसेल. जी मौलिक एकता व्यक्ति व राज्य यांमध्यें हवी ती येथें नसल्यामुळें प्रजा बंडखोर समजली जाते व राज्यकर्ते लुटारू समजले जातात. बंडखोरांना हक्क नाहींत व राज्यकर्त्यांवर कोणतेंही कृत्य केलें तरी जबाबदारी नाहीं. असल्या राज्यसत्तेला आत्मसंरक्षणाचा नैतिक अधिकार नाहीं. लुटलेलें धन मालकापासून संरक्षण करण्याचा हक्क कोणत्याहि नीतिशास्त्रानें लुटारूंस दिला नाहीं. म्हणून असल्या राज्यसत्तेचा येथें विचार करावयाचा नाहीं. आत्मसंरक्षणाचा नैतिक हक्क असलेल्या राज्यसत्तेचा विचार करावयाचा आहे. अर्थात असल्या राज्यसत्तेला नागरिकहक्कांचा आधार असतो व त्यांना अनुसरून तीं वागते म्हणून तिजविरुद्ध केलेल्या क्रांतींत अयशस्वी झालेल्या नागरिकांच्या अगर 'बंडखोरां'च्या हक्कांचा विचार प्रस्तुत आहे. नागरिकहक्क आहेत म्हणून प्रत्येक

गोष्ट न्यायाला व कायद्याला धरून होणें शक्य आहे. राज्यकर्त्यांनीं केलें म्हणून तें बरोबर असें गृहीत कृत्य नसल्यामुळें राज्यकर्त्यांचें प्रत्येक कृत्य कायद्याला धरून असलें पाहिजे. न्यायालयांत त्याचें समर्थन करतां आलें पाहिजे. जें कृत्य राज्याधिकाऱ्यानें कायद्याविरुद्ध केलें असेल त्याबद्दल त्याला शासन मिळालें पाहिजे किंवा राज्यसत्तेनें त्याला माफी दिली पाहिजे. राज्यकार्य करतांना, राज्यसत्तेच्या आज्ञा अंमलांत आणतांना व्यक्तिगत अधिकाऱ्यांना कायद्यांचें उल्लंघन करण्याचा हक्क नाहीं, व नसावा. गर्दी न हटविली तर शांतताभंग होण्याचा संभव आहे. लाठीमार करून अगर गोळीबार करून गर्दी हलेल, पण त्यांत अधिकारातिक्रम होण्याचाही संभव आहे; या पेंचप्रसंगांत पोलिसाला वागावें लागतें म्हणून अधिकारातिक्रम केल्यास माफी त्यास असावीच हें म्हणणें गैर आहे. अधिकाराचा उपयोग न केल्यास कर्तव्यविन्मुखतेचा अपराध घडतो व उपयोग केल्यास त्याचा अतिक्रम होण्याचा संभव असतो म्हणूनही अधिकाऱ्यांस अतिक्रम केल्यास माफी असावी हें म्हणणें सयुक्तिक नाहीं. सरकारी कृत्य करतांना कायद्याप्रमाणें अपराध झाला तर त्या अधिकाऱ्याला शासन झालें पाहिजे. सरकारी आज्ञा पाळत असतां, नागरिकांचें नुकसान झालें तर त्याची जबाबदारी घेऊन तिची भरपाई सरकारनें केली पाहिजे. ती व्यक्तिगत अधिकाऱ्यांवर लादणें अन्यायाचें व सरकारला ती देणें भाग पाडणें अगदीं योग्य आहे. क्रांतीचे कालांत सामान्य कायदे व सामान्य कोर्टें बाजूला सारण्यांत येतात. वटहुकूम, लष्करी कायदा हे जारी असतात. झटपट न्याय करण्यासाठीं, फार्सवजा खास न्यायालयें राज्यसत्ता फर्मानें काढून स्थापते. इतक्या जलदीनें ' न्याय ' देण्यांत येतो कीं, त्याचा उद्देश खरोखर न्याय करण्यापेक्षां प्रजेंत दहशत उत्पन्न करून प्रजेला निर्जीव करण्याचा असतो हें स्पष्ट होतें. म्हणून सामान्य न्यायालयें यांचा अखेरी हक्क हिरावला जाऊं नये. लष्करी कोर्टानें शिक्षा दिली तरी सामान्य न्यायालयांत त्याविरुद्ध दाद मागण्याची सोय कायद्यानें असणें जरूर आहे. लष्करी कायदा म्हणजे सारासार विचारावर आधारलेला नसून सुलतानी स्वरूपाचा असतो. सूक्तासूक्ततेचा विचार तो करीत नाहीं, लष्करी गरजेचाच विचार तो करतो. कायद्याचें राज्य खलास झालेलें असतें, व राज्यसत्तेची निकड जें सांगेल तसा लष्करी कायदा होतो. लष्करी कायदा झाला म्हणजे नागरिकत्व रद्द झाल्यासारखें होतें. म्हणून लष्करी न्यायालयांतील निकाल सामान्य न्यायालयानें तपासल्यानंतर कायम झाले पाहिजेत. सकाळीं अटक, दुपारीं चौकशी व संध्याकाळीं फांशी या विद्युत्वेगी न्यायांत, नागरिकहक्क जीव धरून राहाणें अशक्य आहे. हा न्याय

नाहीं, हा कार्यकारी सत्तेनेंच घेतलेला निकाल अंमलांत आणणें आहे. खळबळीचे व क्रांतीचे काळांत, वाटेल तो अधिकार राज्यकर्त्यांना प्राप्त होतो असें समजणें गैर आहे. त्यांचें प्रत्येक कृत्य न्यायालयांत समर्थनीय असलें पाहिजे. त्यांचे हातून अधिकारातिक्रम झाल्यास, त्यांत होणारा अन्याय दूर करण्यास वाव राहील अशी व्यवस्था असली पाहिजे. नाहीं तर नाममात्र चौकशीने झटपट फांशी गेले व मागाहून चौकशी बेकायदा होती, अपराध झालाच नव्हता असे सिध्द व्हावयाचें. खळबळीचा काळ असल्यामुळें कार्यकारी सरकारांत अवश्य असणारें विवेकाचें व समतोल बुध्दीचें वातावरण नसतें. म्हणून झालेले अपराध सामान्य न्यायालयांतच चौकशिले जावेत हें त्यांतल्या त्यांत इष्ट आहे. नागरिकांच्या अपराधांची चौकशी व्हावी हें ठीक आहे, पण त्याबरोबर अधिकाऱ्यांनीं केलेल्या कृत्यांबद्दल माफीचा कायदा करून (**Imdemnity Act**) ते तेवढे चौकशीपासून सुटले जावेत हें गैर आहे. विधिमंडळ कार्यकारी राज्यसत्तेवर कांहीं नियंत्रण घालील ही आशा करणें व्यर्थ असतें. खळबळ चालू आहे तोंपर्यंत विधिमंडळ बहुतेक बोलाविलें जाणारच नाहीं, व बोलाविल्यानंतर राज्यसत्तेनें क्रांति हाणून पाडली, या कृतज्ञतेच्या जाणिवेनेंच माफी—कायदा पास करणारे सभासद बहुसंख्यांक निघतात. म्हणून झालेल्या सर्व अपराधांची, कृत्यांची चौकशी सामान्य न्यायालयांवर सोंपविणें योग्य आहे. त्यांत जें काय नागरिकहक्कांचें संरक्षण होईल तें होईल. युद्ध किंवा क्रांति ही चालू असतां देशाचे संरक्षणासाठीं केलेला खास कायदा, अगर वटहुकूम नागरिकहक्कांचें संरक्षण करीत नाहीं, त्यांना प्रथम निर्जीव करतो हा अनुभव सर्वत्र आहे. म्हणून जें कांहीं संरक्षण निस्पृह व निःपक्षपाती अशा सामान्य न्यायालयांत मिळेल तेवढें तरी मिळालें पाहिजे. असाधारण परिस्थिति म्हणून असाधारण न्याय हें त्रैराशिक चुकीचें आहे. नागरिक ‘ बंडखोर ’ झाला म्हणून राज्यसत्तेनें न्याय व नीति यांविरुद्ध बंडखोर होण्याचें प्रयोजन नाहीं. राज्यसत्तेने आपला नैतिक स्वभावधर्म व गुण कुठल्याही परिस्थितींत सोडणें इष्ट नाहीं.

अंतर्गत यादवी अगर बंडाळी चालू असतां भाषणस्वातंत्र्याची व अन्य नागरिकहक्कांची काय स्थिति होते याचें दिग्दर्शन वर केलें आहे. जर राष्ट्र युद्धयमान असेल तर भाषणस्वातंत्र्याचा हक्क मर्यादित व्हावा का तहकूब व्हावा का पूर्वीप्रमाणें अनिर्बंधपणें चालावा या प्रश्नाचा विचार आतां करावयाचा आहे. हा विचार करतांना हल्लींच्या युद्धतंत्रांत झालेली क्रांति व तिचें स्वरूप लक्षांत घेतलें पाहिजे. त्याचप्रमाणें प्रचारशास्त्रांत व त्याचे तंत्रांत झालेली प्रगतिपण लक्षांत घेतली

पाहिजे. पूर्वींचीं युद्धें निर्वाणीचा खलिता देऊन जाहीर करून सुरू होत. गेल्या १० वर्षांत नवीन प्रकार सुरू झाला आहे. युध्दाला सुरुवात करावयाची व नंतर तें जरूर पडलें तर जाहीर व्हावयाचें नाहीं तर आपोआप जाहीर होतच असतें. त्याचप्रमाणें विद्यमान युगांतील युध्दे नुसत्या भूमीवर व समुद्रावरच न होतां, आकाशपण आतां रणक्षेत्र झालें आहे. जेवढे नागरिक सैनिक झाले असतील तेवढ्या पुरतेंच युध्द आतां मर्यादित नाहीं, तसेच जेथें प्रत्यक्ष सैनिक लढाई करीत आहेत तेवढेंच रणक्षेत्र असेंही राहिलें नाहीं. हल्लींचे युध्दांत, युद्ध्यमान् राष्ट्रांतील सर्व प्रदेश व सर्व प्रजा ओढली जाते. तें सर्वग्राही स्वरूपाचें झालें आहे. प्रत्येक नागरिक, बालक व वृध्द, स्त्री व पुरुष या नवीन स्वरूपाचे युध्दामुळें युध्दकार्यांतच जुंपला जातो व युध्दसामुग्री वापरणारे सैनिक, युध्दसामुग्रीचे उत्पादनकार्यांत गुंतलेला नागरिकवर्ग, रणक्षेत्रावर असलेल्या तोफा, विमानें वगैरे व त्यांचे कारखाने या दोहांत विद्यमान युध्दनीति फरक करीत नाहीं. दोन्हीं ठिकाणीं बॉम्बवर्षाव होतो. सर्व प्रदेशच युद्ध्यमान राष्ट्रांची आघाडी म्हणून समजले जातात. अशा स्वरूपाचें युध्द चालवावयाचें म्हणजे सबंध राष्ट्र युध्दभूमिकेवर आणून संघटित करणें राज्यसत्तेला जरूर होतें. राष्ट्रांतील प्रत्येक नागरिक, स्त्री अगर पुरुष वय व कारागिरी लक्षांत घेऊन युद्धकार्यांत राज्यसत्ता सक्तीनें भरती करते. राष्ट्रांतील सामुग्री व सरंजाम युध्दकार्याकरतां आपले हातीं घेऊन त्यांची व्यवस्था युध्दांत यश मिळविण्याचे दृष्टीनें केली जाते. नागरिकाचें जीवित व वित्त हें सर्वस्वी राज्यसत्ता आपले हातीं घेऊन युध्दांत यश मिळावें म्हणून आपले मताप्रमाणें त्यांचा विनियोग करीत असते. शरिरावर हल्ला झाल्याबरोबर स्वाभाविकपणें विलग असलेलीं बोटें मुठींत घट्ट होऊन प्रतिकाराला तयार होतात, तीच क्रिया येथें होते. जेथें राज्य व नागरिक यांच्यांत मौलिक एकता आहे व जेथें मागें सांगितल्याप्रमाणें राज्यसत्तेला आत्मसंरक्षण करण्याचा नैतिक अधिकार आहे तेथें ही विलगता जाऊन जूट होण्याची क्रिया मोठ्या प्रमाणावर स्वाभाविक असते. तेथील राज्यसत्तेला राष्ट्राचे संरक्षणासाठीं, नागरिकांचें जीवित व वित्त आपले ताब्यांत घेण्याचा नैतिक अधिकार आहे, म्हणून कायद्यानें तिनें तसें केलें तर तें आक्षेपार्ह होऊं शकत नाहीं. जेथें प्रचलित राज्यसत्ता व प्रजा यांच्यांत मौलिक हितविरोध आहे व जेथें राज्यसत्ता केवळ शस्त्रबलावर अधिकार चालवीत आहे, तेथें युद्ध्यमान परिस्थिति निर्माण झाली तर तें युध्द केवळ प्रचलित राज्यसत्तेविरुध्द आहे, त्यांत प्रजेच्या दृष्टीनें राष्ट्रसंरक्षणाचा प्रश्नच उद्भवत नाहीं, अशी भावना उत्पन्न होणें अपरिहार्य आहे. या परिस्थितींत राज्यसत्तेनें युध्द

पुकारणें अगर चालविणें हें केवळ तिचेंच कार्य असल्यामुळें जनता युध्दविन्मुख अगर युध्दविरोधी झाल्यास नवल नाहीं. शस्त्रबलाचे जोरावर राज्यसत्ता वाटेल ते हुकूम करील, प्रजा पण तिला निष्ठेचें बंधन नसल्यानें वाटेल तशी वागेल. तेथें प्रजा ही नागरिक नाहीं व राज्यसत्ता ही जनसंमतीचे अभावीं नैतिकदृष्ट्या प्रतिष्ठित असें राज्यही नाहीं. सत्तीचे जोरावर नागरिक व सत्तीचे जोरावर निष्ठा या वातावरणांत हक्कांचा विचार अप्रस्तुत आहे. जेथें राज्यसत्तेला आत्मसंरक्षणाचा नैतिक अधिकार आहे तेथील हक्कांचाच विचार करणें योग्य व प्रयोजक आहे.

वरील दृष्टीनें विचार करतांना पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे प्रत्येक नागरिकाला आपलें मत, आपला अभिप्राय सांगण्याचा हक्क आहे नव्हे त्याचें तें कर्तव्य आहे हे लक्षांत ठेवलें पाहिजे. त्याला युद्ध पसंत असेल तर प्रश्नच नाहीं, नापसंत असेल तर तें मत बोलून दाखविण्याचा त्याचा हक्क आहे, त्याचें कर्तव्य आहे. सर्व देशाचा पाठिंबा युध्दकालीं राज्यसत्तेला असणें यशाचे दृष्टीनें योग्य आहे, जरूर आहे, म्हणून केवळ नागरिकाचा वरील हक्क स्थगित करणें इष्ट नाहीं. लोकमत ऐकूनसुद्धां न घेतां राज्यकारभार करण्याचा कोणत्याही कार्यकारी राज्यसत्तेला अधिकार नाहीं. लोकमत ऐकून घेऊन, विरुध्द व अप्रिय मतेंसुध्दां ऐकून घेऊन व त्यांचे प्रदर्शनार्थ पूर्ण वाव देऊनच राज्यकारभाराचीं सूत्रें हाललीं पाहिजेत. हें नैतिक भावबंधन अगदीं मौलिक आहे. यावर व या भोंवतालीं राज्य व नागरिक यांचे संबंध व मौलिक एकता ग्रथित झालेली आहे. जनमतानें प्रदर्शित झालेली संमति हा राज्यरथाचा कणा आहे. त्याअभावीं राज्य हें निराधार आहे. जनतेंत सर्वच सर्व एकविचाराचे नसतात; आणि जे विद्यमान राज्यकर्ते असतात, तेही सर्वदा योग्यच वागतात असेंही नाहीं. लोकमताची टीका म्हणजे योग्य मार्गानें सरकारनें जावें म्हणूनच सद्बुद्धीनें केलेली टीका असें गृहीत धरलें पाहिजे. लोकमताचा निर्णय म्हणजे राज्यसत्तेनें कोणता मार्ग स्वीकारला पाहिजे हें दर्शविणारा फलकच असतो. युध्दकालीं, विवेकानें वागणें कठीण होतें. कारण युद्ध म्हणजे भावनांचा उद्रेक व त्यांना आवाहन देऊनच रणचंडीचा प्रळयकारी नाच सुरू होतो. म्हणून कोणीं नागरिकानें विरोधी मत मांडलें तर तें अधिक काळजीनें सरकारनें ऐकून घेतलें पाहिजे. भावनांचा कल्लोळ उठला असतां, राग व द्वेष यांनीं मानसिक वातावरण मलीन झाले असतां विवेकानें व धीरगंभीरपणें मत मांडणारा नागरिक आपलें कर्तव्य बजावीत असतो व तें बजावीत असतांना राज्यसत्तेनें त्याला केवळ मतप्रदर्शन केलें म्हणून शासन करणें म्हणजे उभयतांत असलेलें नैतिक भावबंधन तोडून टाकण्या-

सारखें आहे. युध्द म्हणजे खून, मोठ्या प्रमाणावर खून. राष्ट्र त्यांत सामील झालें म्हणून त्यांतील अनैतिकता, अगर अपराधित्व कमी होत नाहीं. हिंसेनें जगांत कधींही शांतता नांदावयाची नाहीं. हिंसा व्यक्तीनें अगर राष्ट्रानें कोणीही केली तरी तें पाप आहे असें जर एकाद्या नागरिकाला वाटत असेल तर तें सांगण्याचा त्याला हक्क असला पाहिजे. शांततावादी, अहिंसावादी यांनीं आपलें मत युद्धकालांतच सांगितले पाहिजे. कारण त्याच वेळी तें प्रस्तुत आहे. ही मतप्रदर्शनाची वेळ राज्यसत्तेला योग्य वाटणार नाहीं, अडचणीचीही वाटेल; कर्तव्याचे दृष्टीनें, प्रस्तुत नागरिकाला हीच वेळ आहे, मताप्रमाणें वागण्याची शक्यता मात्र याच वेळीं असते. शांततेच्या काळांत युध्दें नसावींत यावर हजारों भाषणें झालीं तरी त्याकडे राज्यसत्ता बघत नाहीं. जी वेळ मतप्रदर्शनाला अडचणीची म्हणून राज्यसत्ता मानते, त्याच वेळीं त्या विचारसरणीकडे ती लक्ष देते. दाखविण्यांत येणारी अडचण युध्दाचे दृष्टीनें असते. युध्द ओढवून अगर पुकारून राज्यसत्तेनेंच ही अडचण उपस्थित केलेली असते. या अडचणीची ढाल करून सरकारनें नागरिकहक्कांवर वार करणें अयोग्य आहे.

युद्धाविरुद्ध कोणी मतप्रतिपादन करील तर त्याचा तो हक्क राज्यसत्तेनें नाकारतां कामा नये. युध्दाविरुध्द मत मांडूं इच्छितात याचा अर्थ काय व त्याचा व्याप किती हें पाहाणेंही महत्त्वाचें आहे. राज्यव्यवस्था लोकशाही असो अगर अन्य असो, युध्द पुकारण्याचा अधिकार कार्यकारी सत्तेला म्हणजे विद्यमान सरकारला, विद्यमान राज्यसत्तेलाच असतो. विधिमंडळापुढें ठराव मांडून चर्चा करून युध्द पुकारलें जात नाहीं. आकस्मिकपणा व आवेग हीं युध्दशास्त्रांत महत्त्वाचीं मानलीं जातात. युध्द करण्याचें ठरविल्यानंतर झटपट व कल्पना येण्यापूर्वी हल्ला करणें हें यशाचें एक साधन आहे. विधिमंडळांत चर्चा करून तयारी आहे का नाहीं याची चिकित्सा करून, उपसूचना उजवून, मतें नोंदवून युध्द सुरू करणें हें युध्दतंत्रांत बसत नाहीं. म्हणून कार्यकारी सरकार, मग ते प्रधानमंडळ असो अगर एकादा हुकुमशहा असो, अगर घटनेनें अधिकार दिलेला अध्यक्ष असो, त्यानेंच युध्द जाहीर करण्याचा अधिकार वापरणें योग्य ठरतें. कार्यकारी सरकारनें, युध्दाची अपरिहार्यता, त्याची तयारी, त्याचे तात्कालिक व दूरगामी परिणाम व तत्संबंधीचे प्रचलित व भावी लोकमत लक्षांत घेऊन हा निर्णय घेतला पाहिजे. कुठलेंही सरकार म्हणजे माणसेंच व तीं चूक करणें शक्य आहे; त्यांचा निर्णय चुकीचा असणें शक्य आहे. युध्द सुरू करण्याचा अधिकार देणें जितकें योग्य, तितकेंच त्याबाबत नागरिकांना टीका करण्यास मुभा देणें योग्य आहे. ही विरोधी टीका, युध्दाचे कारणाबद्दल, युध्द चालविण्याबाबत, युध्दाचे ध्येयाबाबतही

असूं शकेल. उत्पत्ति, स्थिति, लय या त्रिविध अवस्थेत टीका करण्याचा हक्क निरपेक्ष असावा का कांहीं मर्यादा त्याला असावी हा महत्त्वाचा प्रश्न आहे. तात्त्विकदृष्ट्या हा हक्क देणे योग्य आहे हें तर वर सांगितलेंच आहे. युध्द सुरू झाल्यानंतर युध्द सुरू का झालें याबद्दलची टीका महत्त्वहीन होते. विद्यमान राज्यसत्तेचे राजकारणी डाव चुकले अगर तिनें अनेक प्रसंगीं अवसानघातकीपणा केला, शत्रूला आपल्या गैर-मुत्सद्दी वर्तनानें बळाविला, या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी युध्दांत राष्ट्र पडलें अगर लोटले गेलें म्हणजे युध्द यशस्वी कसें होईल, राष्ट्र त्यांतून कसें अब्रूनें निभावून निघेल, एतद्विषयक टीकाच अधिक महत्त्वाची असते. विद्यमान सरकारच्या नालायकीमुळे युध्दात राष्ट्र आलें म्हणून युध्दकार्याची जबाबदारी घेण्यास व ते चालविण्यास सदरहू सरकार नालायक आहे असे म्हणणें चूक नाहीं. अशा टीकेचा हेतु उज्ज्वल व राष्ट्रसंरक्षणाचाच असल्यामुळें ती बंद करणे म्हणजे नागरिकहक्क नाकारणें येवढेंच नव्हे तर उलट यशस्वी युध्दकार्यांतच अडथळा आणणें आहे. जे नैतिकदृष्ट्या कुठल्याही हिंसात्मक युध्दाला विरोधक आहेत, त्यांना आपली नैतिक श्रध्दा जाहीर करण्याला अडथळा असूं नये आणि जोंपर्यंत ते आपला विरोध नैतिक भूमिकेवरून सांगत आहेत तोंपर्यंत त्यांना व्यक्तिशः मांगण्यास वाव असावा. तथापि युध्द सुरू झाले, नागरिक राष्ट्रसंरक्षणाची हद्द करूं लागले असतां, नैतिक विरोधकांना कांहीं तरी मर्यादा असणे इष्ट आहे. ती मर्यादा म्हणजे त्यांनीं आपली श्रध्दा जाहीर करून स्वस्थ राहावें व राज्यसत्तेनें जे खरोखरच प्रामाणिकपणें अहिंसावादी आहेत त्यांना युध्दकार्यांत जुंपूं नये व त्याचबरोबर त्यांना प्रचारबंदी करावी. राज्यांतील व्यवस्था नागरिक हक्कांवर आधारलेली व त्याला अनुसरून असतां सामाजिक हितार्थ सामाजिक संरक्षणार्थ राज्याला नागरिकांकडून कांहीं कर्तव्यें करवून घेण्याचा अधिकार आहे. राज्याचें संरक्षण म्हणजे नागरिकांनीं बनलेल्या समाजाचेंच संरक्षण व मग त्यासाठीं समाजानें आपल्या राजकीय संघटनानें नागरिकांना केवळ समाजहेतूसाठी कांहीं गोष्टी करण्यास भाग पाडलें तर तें चूक नाहीं. मग त्यांचे स्वरूप सक्तीची लष्कर भरती असो, सक्तीनें युध्दसामुग्रीचे उत्पादनांत काम करणे असो अगर संपत्तीवरील करग्रहण असो; कांहींनीं देशप्रेमानें उन्नत व उज्ज्वल भावनांनीं देश पारतंत्र्यांत जाऊं नये म्हणून प्राण अर्पावेत, कांहींनीं भाषणस्वातंत्र्याचा, नागरिकस्वातंत्र्याचा, व्यक्तिस्वातंत्र्याचा हक्क सांगून संकटापासून अलग राहावें, कर्तव्यापासून दूर सरावें, स्वार्थत्यागास कमी लेखून जीव बचावावा हें गैर आहे. देश वांचला म्हणजे सर्वांचाच वांचतो, म्हणून सर्वांवर त्याचे संरक्षणाची जबाबदारी आहे. स्वार्थत्यागाचा,

कष्टाचा बोजा सर्वांवर सारखाच असला पाहिजे. प्रत्येक नागरिकानें आपला वांटा उच-लला पाहिजे. अपवाद फक्त जे नैतिक भूमिकेवरून युध्दविरोधी व प्रामाणिक शांतता-वादी व अहिंसावादी आहेत त्यांचेच बाबतींत असावा व त्यालाही वर सांगितलेली मर्यादा असावी.

युध्द चालू झाल्यानंतर तें चालविण्याबाबत यशाचे दृष्टीनें टीका करणें, मत-प्रदर्शन करणें, सूचना करणें हें केव्हांही बंद करतां कामा नये. युध्दांत जर सर्वांनीं भाग घ्यावयाचा, सर्वांना स्वार्थत्याग करण्याला राज्यसत्ता सांगणार, तर तिच्या चुका सांगण्याचा सर्व नागरिकांना हक्क असलाच पाहिजे. विद्यमान राज्यसत्ता म्हणजे माण-सेंच. तीं सर्व व सर्व काळीं, सर्व प्रसंगीं बिनचूक वागतील असें शक्य नाहीं. म्हणून युध्द चालविण्याचे नीतिसंबंधीं, योजनेसंबंधीं टीका केल्यानें राष्ट्राचा फायदाच होतो. लष्करी अधिकारी, म्हणून ते टीकेला पात्र नाहींत हेंही म्हणणें चुकीचें आहे. प्रसगी केलेली टीका विद्यमान सरकारला आवडत नाहीं व तें असली टीका म्हणजे पराभूत-वृत्ती राष्ट्रांत निर्माण करण्याचा प्रयत्न म्हणून त्यावर शिक्का मारत असतें; व संकट-समयीं म्हणून दिलेल्या अधिकारांचा दुरुपयोग करून टीकाकारांची मुस्कटदाबी करतें. त्यांना तुरुंगांतही डांबून टाकतें. पण जेथें अशी टीका झाली व तिचा परिणाम एक सरकार जाऊन दुसरें आलें व युध्दकार्य चांगलेंच चालूं लागलें अशीं अनेक उदा-हरणें दाखवितां येतील. मागील महायुध्दांत खुद्द इंग्लंडमध्यें एक प्रधानमंडळ जाऊन दुसरें आलें व त्यानंतरच युध्दकार्य जोरावलें तेंच याही वेळीं झालें. चेंबर्लेन–सरकारवर टीका करणें त्याविरुध्द मतप्रदर्शन करणें, ते नालायक आहे असें स्पष्ट सांगणें हा गुन्हा मानला असता तर इंग्लंडची काय स्थिति झाली असती ? चेंबरलेन सरकार गेलें व नंतरच युध्दकार्य जोरावलें, जनतेचा सरकारचे नेतृत्वावरील विश्वास वाढला. तात्पर्य, युध्द यशस्वी होण्याचे दृष्टीनें त्याच्या संचलनाबाबत केलेली टीका बंद करणें राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीनें गैर आहे. नागरिकांचा हा हक्क तो पराभूतवृत्तीचा प्रयत्न आहे म्हणून हाणून पाडणें गैर आहे. युद्ध म्हणजे सर्वांचें साह्य पाहिजे व तें मिळवावयाचे म्हणजे सर्वमान्य सरकारच असलें पाहिजे. त्याच्या लायकीबद्दल जनमत निर्धास्त असलें पाहिजे. युद्ध जिंकावयाचें तर व्यक्तिगत मानापमान अगर महत्त्वाकांक्षा यांना तेथें स्थान नाहीं. जे कार्यक्षम असतील तेच राहिले पाहिजेत. जुने म्हणून नालायक ठेवावयाचे हें चूक आहे व युध्दकालीं प्राणघातक आहे. राज्यकारभारांतील दोष व गबाळेपणा येरव्हीं सुध्दां असतां कामा नये. मग युध्दासारख्या संकटसमयीं तर तो बिलकुल असतां कामा नये. भाषणस्वातंत्र्य, हें सहस्त्राक्षी लोकमत जागृत असेल तर

शक्य आहे म्हणून आघाडीवरील सैनिकांप्रमाणें याही आघाडीवर नागरिकानें दक्ष राहून अखंड सावधानता ठेवली पाहिजे.

प्रत्यक्ष युध्दसंचालनाशीं ज्याचा संबंध येत नाहीं पण त्यावर परिणाम होईल अशाही स्वरूपाची टीका असूं शकते. समाजा, युध्द चालू आहे व जगांतील राजकारणाचे दृष्टीनें कोणत्या राष्ट्राशीं कसे संबंध ठेवावेत व ते कसे असावेत यासंबंधीं विद्यमान राज्यकर्ते व नागरिक यांच्यांत मतभेद असूं शकतील. कांहीं नागरिकांना आपल्या सत्तेखालीं असलेल्या बध्द राष्ट्रांना स्वातंत्र्य द्यावें व त्यांचें विद्यमान युध्दांत सहकार्य निर्माण करून नैतिक व सैनिक सामर्थ्य दोन्ही वाढवावींत असें वाटणें शक्य आहे, त्यांना तें सांगण्याची बंदी नसावी. त्यांना तें जाहीर सांगूं नये असें म्हणणेंही चूक आहे. विद्यमान राज्यकर्त्यांना असलें मतप्रदर्शन अडचणीचें वाटेल, अंकित लोकांना उठाव देणारें म्हणून युद्धकार्यांत अडचण उत्पन्न करणारें असा शेरा मारण्यास ते कमी करीत नाहींत; तथापि, या मतप्रदर्शनाला बंदी नसावी. अन्य राष्ट्रांशीं कसे संबंध असावेत याबाबत मतप्रदर्शनालाही बंदी असूं नये. एतद्विषयक मतप्रदर्शन झालें तर युध्दकार्यांतील एकी बिघडेल ही सबब योग्य नाहीं. उलट असल्या व्यापक प्रश्नाबाबत जाहीर व खुली चर्चा झाल्यानेंच आदर्शाचे दृष्टीनें भिन्न असलेलीं पण संकटांमुळें एकत्र आलेलीं राष्ट्रें एकमेकांशीं अधिक सहकार्य करूं लागलीं, व त्याचा परिणाम युध्दाचे दृष्टीनें इष्ट असाच झाला असें सद्ध्याचे युध्दांत दिसून आलें आहे. निकाली युध्द लढून लाखोंनीं प्राणहानि करून मिळविलेल्या विजयापेक्षां तडजोडीनें व विवेकानें बोलणीं करून युध्द संपवून शांतता प्रस्थापित करावी व प्रचंड प्राणहानि थांबवावी असें जर एखाद्या नागरिकाला प्रामाणिकपणें वाटत असेल तर तें त्याला बोलून दाखविण्याची मुभा असावी का ? प्रचंड प्राणहानीची किंमत देणें जरूर आहे का ? असा प्रश्न एकदां विचारला गेला कीं त्याचा परिणाम युध्दसंचालनावर आज नाहीं उद्यां होणारच. युध्दकार्यांत अडथळा उत्पन्न करणारा कुठलाही विचार प्रदर्शित करतां कामा नये असें म्हटलें म्हणजे राज्यसत्तेच्या हातांत भलतीच व अमर्याद सत्ता देणें आहे. कोणता विचार या स्वरूपाचा आहे हें तीच ठरविणार, निदान प्रथम दर्शनीं तीच ठरविणार, तिनें वाटेल तें धोरण स्वीकारलें तरी तिला विरोध करणें म्हणजे युध्दप्रयत्नाला विरोध करणें आहे असें ती मानील हें स्वाभाविक आहे. आणि याचा सरळ अर्थ असा की, जोंपर्यंत सैनिक लढत आहेत तोंपर्यंत विद्यमान राज्यकर्त्यांच्याविरुध्द मतप्रदर्शन नाहीं, युध्दकालपर्यंत समाजांतील विचारशक्तीनें आराम घेतला पाहिजे, समाजांतील नैतिक जीवन तहकूब राहिलें पाहिजे. ही अपेक्षा व्यर्थ आहे.

विचारच जर समाजांत बंद झाला तर समाज निष्प्रभ, निर्जीव होईल. जे आहे, तें व असावें तें यावर सारखा विचार करणारा समाजच नैतिकदृष्ट्या जिवंत राहातो. विचार हेंच या जीवनाचें मुख्य अन्न आहे आणि युध्दासारख्या कालांत त्याची अत्यंत जरुरी आहे म्हणून कुठलाही विचार असा बंद केला जाऊं नये. म्हणून कोणी युद्ध अखेरपर्यंत न लढत मिटवून घ्यावें असें म्हणेल तर त्याला युद्धप्रयत्नाला अडथळा करतो म्हणून बंदी करणें योग्य नाहीं. राज्यसत्तेला मात्र अमर्याद सत्ता व हुकुमशाहीप्रमाणे सुद्धां वागण्याची संधि, नागरिकांना मात्र काय वाटतें हें नुसतें बोलून दाखविण्याचीही बंदी हें अयोग्य आहे. शेवटपर्यंत कां लढणें जरूर आहे, समजूत होणें कां अशक्य आहे हें राज्यकर्त्यांनीं लोकांना पटवून दिलें पाहिजे. जीं कारणें त्यांना माहिती आहेत तीं सर्व लोकांना समजलीं पाहिजेत. केवळ राज्यकर्ते म्हणून बंदी करावयाची पण लोकमताला मात्र विश्वासांत घ्यावयाचें नाहीं हें चालतां कामा नये. राज्यकर्त्यांनीं स्वीकारलेलें धोरण लोकांना पटलें म्हणजे विरोधकांनीं मांडलेली विचारसरणी निर्बल होईल. लोकमतापुढें सत्यकथन झालें पाहिजे. प्रचारानें सरकार नेहमीं मित्रांनाच फसवितें, शत्रु फसत नाहींत म्हणून खरें ते सर्व नागरिकांना सांगितलें पाहिजे. त्यांच्या सूचना विचारांत घेतल्या पाहिजेत. त्यांनी चौकशीची मागणी केली कीं ती धमकी आहे असें मानण्याचें कारण नाही. आपण कधींच चूक करीत नाहीं असा परमेश्वरी सत्तेचा दावा सांगू नये. उलट ज्या प्रमाणांत मतप्रदर्शन युध्दकालांत राज्यसत्ता होऊं देईल, त्या प्रमाणांत तिचा नैतिक अधिकार व नेतृत्व वाढतच जातें. मतप्रदर्शनावर मर्यादा घातल्यानें बहुशः मतप्रदर्शन मारलें जातें. नैतिक मर्यादा राज्यसत्तेनें संभाळली तर मतप्रदर्शनालाही नैतिक मर्यादा येतेच. विरोधी मतप्रदर्शन बंद करणें म्हणजे राज्यसत्तेनें आपल्या नैतिक पायावर धोंडा पाडून घेणें आहे. म्हणून मताला माहितीनें तोंड देऊन, विचाराला विचारानें पटवून, भावनेला वस्तुस्थितीनें गोंजारून धोरणाची अपरिहार्यता जनतेपुढें मांडून जनमन आपलेसें करावें. जनता ही कामधेनु आहे. वसिष्ठांच्या सुरनंदिनीप्रमाणें लक्षावधि सैनिक सहस्रावधि आयुधें व अस्त्रें निर्माण करण्याचें सामर्थ्य तिच्यांत आहे. तथापि, दडपशाहीचे दांडक्यानें हाणून ही पूजार्हा आपलें सामर्थ्य राज्यसत्तेसाठीं प्रकट करणार नाहीं.

युध्दकालांत भाषणस्वातंत्र्याला कितपत मर्यादा असावी याचें विवेचन करतांना एक गोष्ट महत्त्वाची म्हणून लक्षांत ठेवणें जरूर आहे. शांततेच्या काळीं एकादे वेळीं नागरिकांनीं कर्तव्यें करण्यांत कसूर केली, चुकारपणा केला तर त्याकडे कानाडोळा करणें शक्य आहे. परन्तु युध्दाचा काळ म्हणजे राष्ट्राच्या प्राणसंकटाचा काळ. म्हणून

या काळांत प्रत्येक नागरिकानें आपलें कर्तव्य बजाविलेंच पाहिजे. मग तें आघाडीवर राहून शत्रूंच्या गोळयांना तोंड देण्याचें असो अगर देशांत समाजाच्या संरक्षणाचे दृष्टीनें सरकारी धोरणावर निर्भीड टीका करण्याचे असो. हें कर्तव्य करीत असतांना शत्रूचे हातून मृत्यु येईल अगर आपल्याच राज्यसत्तेचे हातून येईल, कदाचित् देशांतच कारागृहवास पत्करावा लागेल. नागरिक याप्रमाणें स्वकर्तव्य करीत असतां, आपला स्पष्ट अभिप्राय कर्तव्यबुध्दीनें सांगत असतां तो लोकांनाही अप्रिय होईल. बहुसंख्यांक नागरिक युध्दधोरण मान्य करणारे असले तर सरकारला भिण्याचे कारण नाहीं. बहुसंख्यांक लोक युध्दाविरुध्द असतील तर राज्यसत्तेला युद्ध सुरू करण्याचा अधिकार नाहीं. बऱ्याच प्रमाणांत लोक विरुद्ध असतील तर सरकारी धोरण तसेंच चालू ठेवणें इष्ट नाहीं. सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे विरोधकांना बोलू देऊन सरकारनें आपली बाजू मांडून, जनमत आपले बाजूस निर्विवादपणें करून घेऊन आपलें स्वीकृत धोरण पुढें चालविण्याचा हक्क संशयातीत करावा हाच होय. असाधारण व खळबळीचे परिस्थितींत, कर्तव्याबद्दल व्यामोह उत्पन्न होतो; नागरिक व राज्यसत्ता दोघांनाही आपली कर्तव्यें निश्चित करणें व निश्चितपणें करणें अवघड होतें. याप्रसंगीं विवेकाचाच आधार घेतला पाहिजे व विवेकच योग्य मार्गदर्शन करूं शकेल. विवेक म्हणजे खुल्या मनमोकळ्या वातावरणांत साधकबाधक गोष्टी विचारांत घेऊन झालेल्या चर्चेंतूनच निर्माण होत असतो. म्हणून तिला युध्दकालांत जास्तच महत्त्व येतें. चर्चा बंद केल्यानें, परिस्थितीचें ज्ञान जनतेस न दिल्यानें अनर्थ ओढवतात. युद्धकालांत अमेरिकेत युद्धाचे हेतूबद्दल चर्चा बंद केली याचा परिणाम मागील महायुद्धांत विजयी राष्ट्रें विजय संपादन करूनही शांतता प्रस्थापित करूं शकलीं नाहींत. अनेक गुप्त तहनामे १९१७ चे क्रांतीनंतर सोव्हियट रशियानें प्रसिध्द केले पण ते बहुतेक देशांतून प्रसिध्द होऊं दिले नाहींत; त्यावरील चर्चा तर लांबच राहिली. झालेलें युद्ध लोकशाहीसाठीं नव्हतें, साम्राज्यवृध्दीसाठीं होतें याची जाणीव अनेक युद्ध्यमान देशांतील लोकांना फार उशिरां झाली. युध्दकार्याला अडथळा होईल म्हणून मतप्रदर्शनावर अनर्थकारक मर्यादा सर्वत्र घालण्यांत आली होती. गुप्त करारमदार जे रशियन साम्यवादी सरकारनें प्रसिध्द केले ते जर इंग्लंड, अमेरिका व अन्य देशांत वेळींच प्रसिध्द झाले असते, जनतेनें त्यावर मत प्रदर्शित केले असतें तर युध्दाचा शेवट निराळा झाला असता, अधिक न्याय्य व योग्य तह झाला असता, दुसरें महायुध्द कदाचित् टळलें असतें. खुद्द अध्यक्ष विल्सन यांना इंग्लंड, रशिया व इटली यांचेमधील युध्द चालू असतां केलेले गुप्त करार शांततापरिषदेत येईपर्यंत कळले नव्हते!!

रशियानें ते २ वर्षे आधीं प्रसिद्ध केले होते. गुप्तकरार करून करार करणाऱ्या प्रत्येक राज्यसत्तेनें प्रजाद्रोह केला होता. प्रजेचे असंख्य बळी, राष्ट्रांतील अगणित सामुग्री या धोरणानें खर्ची पडली. राष्ट्रसंरक्षणासाठीं, आत्मसंरक्षणासाठीं प्राणाची मागणी करून तिचा दुरुपयोग केला गेला. कर्तव्यच्युत राज्यसत्ता झाल्या याबद्दल आतां कोणीही शंका घेत नाहीं. राज्यसत्तेला युद्धकालांत अमर्याद सत्ता दिल्याचे दुष्परिणाम असेच होतात. संकटाचें निमित्त करून भाषणस्वातंत्र्यहक्क नष्ट करण्यानें कर्तव्याचा मार्ग दाखविणारा विवेकच नाहींसा होतो. मागील अनुभव जमेस घेऊन युद्धकालांत राज्य-सत्तेला तिचें कर्तव्य काय आहे हें कळण्यासाठींच नागरिकहक्कांची आवश्यकता अधिक तीव्र भासते.

सामान्यतः युद्धाचे उत्पत्ति, स्थिति व लय याबाबत युद्धकालांत भाषणस्वातंत्र्य असावें असें येथपर्यंत सांगितले. तथापि, कांहीं अपवादात्मक परिस्थिति असूं शकेल. युद्ध जोंपर्यंत दूर आहे, तोपर्यंत ही सर्व हक्कांबाबतची विचारसरणी ठीक आहे. पण प्रत्यक्ष देशांतच शत्रु घुसला आहे व राष्ट्रांतील सर्व शक्ति त्याला विरोध करण्यांत, त्याचा हल्ला परतविण्यासाठीं एकत्रित होऊन झटत आहे अशा वेळीं भाषणस्वातं-त्र्याचे नांवाखालीं कोणी विरोध करूं लागला तर तें योग्य आहे का ? त्याला बंदी व्हावी कीं नाहीं ? असा प्रश्न उपस्थित होतो. नागरिकहक्कांना मान्यता देऊन त्यावर आधारलेली, त्यांना अनुसरून चालणारी राज्यव्यवस्था म्हणजे लोकशाही स्वरूपाची हें उघड आहे. लोकशाही व्यवस्थेचा आधार म्हणजे विवेक, युद्ध म्हणजे भावनांचा उद्रेक, तेथें विवेकाला वाव मिळत नाहीं. जितकें युद्ध तीव्र होत जातें, जितकें व्यापक, जितकें सर्वग्राही तें होत जातें तितकें तितकें भावनेचें प्रमाण वाढत जातें, आणि तें युद्ध निकट आलें नव्हे प्रत्यक्ष राष्ट्रांत आलें, रस्त्यारस्त्यांतून तें लढले जाऊं लागलें म्हणजे लोकांच्यांत राग, द्वेष त्याचबरोबर देशप्रेम अपूर्व व आत्यंतिक स्वार्थत्यागाच्या भावनांचा कल्लोळ होतो. या वेळीं कोणी विरोधी सूर काढल्यास त्यास दडपून टाकण्याची मागणी तीव्र होते व राज्यसत्तेनें कांहींही केलें तरी तिला दडप-शाही करतांना पाठिंबाच मिळतो. तथापि राज्यसत्तेनें विरोधाला दडपून टाकावें का ? हा प्रश्न शिल्लकच राहातो. त्याचें उत्तर राज्यसत्तेनें युद्धापूर्वीचें धोरण कसें ठेवलें होतें यावर अवलंबून राहील. बेल्जम, नॉर्वे अगर हॉलंड या राष्ट्रांचा कांहींही संबंध नसतां त्यांच्या स्वातंत्र्यावर हल्ला झाला व तें टिकविण्यासाठीं तेथील राज्यसत्ता लढत असतां कोणीं विरोधी सूर काढला तर तो बंद करण्याचा राज्यसत्तेला कायदेशीर हक्क तर आहेच पण नैतिक हक्कसुद्धां त्या परिस्थितींत प्राप्त होतो. आपल्या परराष्ट्रीय

धोरणानें, राष्ट्राराष्ट्रांत नाना गट निर्माण करून, पुन्हां ते फोडून, पुन्हां दुसरे निर्माण करून जगांतील शांतता धोक्यांत आणणाऱ्या व युद्ध आपल्या दुष्ट व दुटप्पी राजनीतीनें अपरिहार्य करून ओढवून आणणाऱ्या राष्ट्रांतील सरकारांना खुद्द देशांत रणक्षेत्र झालें तरी नागरिकहक्क दडपून टाकण्याचा नैतिक अधिकार प्राप्त होत नाहीं. अर्थात् कायदेशीर हक्काचे जोरावर ते वाटेल तें करतात हा प्रश्न निराळा. वाटेल तें जरी झालें असेल तरी युद्ध शेवटपर्यंत चाललेंच पाहिजे असें म्हणण्याचे अधिकाराप्रमाणें, तें तह करून लवकर संपविलें पाहिजे असेंही म्हणण्याचा नैतिक अधिकार वरील राष्ट्रांतील नागरिकांना निःसंशय आहे. प्रत्यक्ष संकट भोंवतालीं पाश टाकून ते आंवळीत असतांना जितकी एकी व एकता संकटग्रस्त राष्ट्र निर्माण करूं शकेल तितकी त्यांनीं केली पाहिजे. या दृष्टीनें प्रचलित लोकमतावर दृष्टि ठेवून, त्याच्याच जोरावर प्रयत्न केल्यास यश मिळणें शक्य होतें. लोकमताला राज्यसत्ता विचारूं लागली म्हणजे लोकमत तिच्या गरजांचाही विचार करतें. लोकमताला मान मिळूं लागला तर राज्यसत्तेचा मान राखण्यासाठीं लोकमत स्वार्थत्यागाला तयार होतें. स्वातंत्र्याचें संरक्षण जे नागरिक स्वकर्तव्यें धैर्यानें करतात तेच करूं शकतात. युद्धांतील साधनसामुग्री कितीही चांगली असो, अखेरीस तें वापरणाऱ्या सैनिकांची मनें कशीं आहेत यावरच विजय अवलंबून असतो. ज्या राष्ट्रांतील जनतेची खात्री युद्ध चालविणें अपरिहार्य आहे अशी राज्यसत्तेनें करून तिचा विश्वास संपादन केला आहे, त्या राष्ट्रांतील सैनिकांची मनें पोलादी निश्चयानें लढतात; अन्य परिस्थितींत, सक्तीमुळें, शासनाचे भीतिमुळें लढतात. राज्यसत्तेची खरी शक्ति शस्त्रागारांत नाहीं, शस्त्रास्त्रांत नाहीं, ती नागरिकांच्या प्रभावी निष्ठेंत असते. युद्धकालांत ही निष्ठा मिळविणें हें राज्यसत्तेचें पहिलें कर्तव्य आहे आणि ती नागरिकांचे हक्क दाबून टाकून कधींच मिळत नाहीं.

नागरिकहक्कांवर आधारलेल्या व त्यांना अनुसरून चालणाऱ्या राज्यांत हक्कांचे संरक्षण योग्य प्रकारें व्हावयाचें तर कार्यकारी राज्यसत्तेवर सर्वस्वीं अवलंबून भागणार नाहीं. कार्यकारी सत्तेची प्रवृत्ति लक्षांत घेतां, नागरिकहक्कांना व अधिकारांना शक्य तितकें न्यायालयीन संरक्षण मिळणें जरूर आहे. नागरिकानें अपराध केला असेल तर त्याची चौकशी व्हावी व त्याला आपण निरपराधी आहोंत हें दाखविण्याची संधि मिळाली पाहिजे, म्हणजे बिनचौकशी अटक कुणालाही होतां कामा नये, हा एक नागरिकाचा मौलिक हक्क आहे. त्याचप्रमाणें अटक झाली असतां व चौकशी चालू असेपर्यंत त्याला अपवादप्रसंग सोडून जामिनावर सुटण्याचाही हक्क

असला पाहिजे व योग्य जामीनच मागितला जावा. ५ रुपयांचे अफरातफरीबद्दल दहा हजारांचा जामीन मागून १५ रु. पगाराचे शिपायास अगर कारकुनास तो देणें अशक्य करणें म्हणजे अन्यायानें अटकेंत ठेवणें आहे. अपराधाची चौकशी शक्य तितक्या लवकर व्हावी अशी अपेक्षाही न्याय्य आहे व तशी व्यवस्था राज्य-सत्तेनें ठेवावी हें राज्यसत्तेचें कर्तव्य होय. नागरिकानागरिकांत वाद उत्पन्न झाला तर त्याचा न्याय होण्याची व्यवस्था असली पाहिजे. न्यायदानांत निश्चितपणा पाहिजे. त्यांत विलंब नसावा व तें सर्वांना लाभलें पाहिजे. न्यायदानांत निश्चितपणा नसेल तर नागरिकांना व्यवहाराबाबत भरवंसा वाटणार नाहीं, अवश्य तो विश्वास समाजांत राहाणार नाहीं. न्यायदानांत विलंब म्हणजे न्यायाचा विनाशच असा अनुभव येतो. वर्षानुवर्षें, अनेक न्यायालयांतून काम चालून मिळालेला निवाडा बव्हंशीं निरर्थकच असतो. न्यायदान जर खर्चाचें असेल तर तें सर्वांना लाभणार नाहीं. गरिबी हा एक अन्याय समाजानें केला व त्यामुळेंच न्यायालयांतही न्याय मिळणें अशक्य व्हावें हा दुहेरी अन्याय आहे. न्यायालयांत गरीब व श्रीमंत या दोघांनाही भेदभाव न होतां न्याय मिळाला पाहिजे. या दृष्टीनें न्याय मिळणें शक्य तितकें कमी खर्चाचें असलें पाहिजे. श्रीमंत, सावकार वादी म्हणून त्याला सवलत न शेतकरी प्रतिवादी, गरीब वकीलही देण्यास असमर्थ म्हणून त्याला सवड अगर सवलत मिळूं नये हें अयोग्य आहे. कोणीं कज्जा कसा मांडला यावर न्याय नसावा, कोणाचा पक्ष खरा आहे हें न्यायधिशानें आपण होऊन शोधून काढून न्याय दिला पाहिजे. असें झालें तरच न्यायालयांत सर्वांना न्याय लाभेल. राज्याचा लौकिक त्यांत न्याय कसा मिळतो, यावर आहे. राज्यांत न्याय असेल तरच समाधान राहील. प्रसिद्ध चिनी तत्त्वज्ञ कॅन-फ्युसिअसला बादशहानें विचारलें, “ माझें राज्य कसें कायम राहील ? ” त्यानें उत्तर दिलें कीं, “ नागरिकांना पुरेसें अन्न, पुरेसें संरक्षण व न्यायदानांत पुरेसा विश्वास मिळाला म्हणजे राज्य चिरकाल राहील. ” न्यायदानांत पक्षपात झाला तर राज्या-वरील विश्वास नाहींसा होतो. गुन्हा करणारे श्रीमंत अनेक वेळां न्यायालयांत वेडे ठरून सुटतात, तर खायला मिळालें नाहीं म्हणून जगण्यासाठीं उचलून घेतलेल्या धान्याचे ‘ चोरी ’ बद्दल ४ महिने शिक्षा होते. श्रीमंतांचे वाहनाखालीं गरिबाचा मृत्यु झाल्यास तो ‘ अपघात ’, बेफामपणें हाकल्याचा परिणाम नव्हे, अपराध नव्हे असेंच ठरतें. उलट निरपराधी माणसें केवळ त्यांची बाजू मांडण्यास वकील नाहीं म्हणून घोपटलीं जातात हेंही दिसून येतें. सरकारी वकील फक्त सरकार फिर्यादी असेल तेव्हां असावा हें ठीक नाहीं. सरकारी वकिलानें जे गरिबीमुळें वकील देऊं

शकत नाहींत त्यांचेंही काम चालवावें. अपराध्याला शिक्षा करण्याची व्यवस्था करणें जसें राज्यसत्तेचें कार्य आहे, त्याचप्रमाणें निरपराधी दंडिला जाणार नाही ही दक्षता-पण तिनेंच घेतली पाहिजे व त्यासाठीं जरूर ती बचावाची व्यवस्था केली पाहिजे. अपराधी कृत्य सरकारी नोकरानें केल्यास अपराधच ठरला पाहिजे. ज्या अप-घाताबद्दल अगर अपकृत्याबद्दल खाजगी व्यक्तींना कायद्याप्रमाणें नुकसानभरपाई द्यावी लागते, तेच अपघात अगर तीच अपकृत्यें सरकारी नोकरांनीं सरकारी काम करीत असतांना केलीं तर त्याबद्दलही सरकारनें नुकसानभरपाई दिली पाहिजे. काम करतांना सरकारी नोकर व नुकसानभरपाईची वेळ आली कीं, तो खाजगी व्यक्ति, त्यानें नुकनानभरपाई द्यावी हें म्हणणें रास्त नाहीं. पोलिसाला लॉरीखालीं मृत्यु आला तर मृताचे वारसास सरकारनें नुकसानभरपाई दिली पाहिजे. लॉरी हांकणा-रास द्यावयास सांगणें म्हणजे नुकसानी नाकारणेंच आहे. तो गरीब, अर्थात् पगाराचे दृष्टीनें, पुरी नुकसानी देण्यास असमर्थच असणार. म्हणून ही अपकृत्याचे नुकसान-भरपाईची जबाबदारी राज्यसत्तेवरच असली पाहिजे. त्याचप्रमाणे सरकारी नोकरांनीं सरकारी काम करीत असतांना केलेल्या कृत्यांची चौकशी, सामान्य न्यायालयांत होणें जरूर आहे. सरकारी नोकरांसाठीं, राज्यकारभार हाकणाऱ्यांसाठीं स्वतंत्र कायदा व स्वतंत्र कोर्टें ही प्रथा चुकीची आहे. न्यायदानांत समता पाहिजे व ती सर्वांना लाभली पाहिजे, या दृष्टीनें सरकारी नोकर व नागरिक यांच्यातील न्यायदानांत कुठ-ल्याहीं तऱ्हेनें, पद्धतींत अगर प्रमाणांत फरक असू नये. राज्यांत कायद्याची हुकमत चालली पाहिजे व ही अगदीं मौलिक बाब आहे. कोणीही नागरिक अगर कोणीही राज्यसेवक, मग तो कितीही उच्चपदस्थ असो, कायद्याचे हुकुमतीखालीं असलाच पाहिजे. कायदे करणारे म्हणून ते सुटूं नयेत; अंमलबजावणी करणारे ह्मणून ते सुटूं नयेत, कायद्याचा अर्थ करणारे म्हणून सुटूं नयेत. कायद्याचें राज्य अगर कायद्याची हुकमत सर्वांवर चालली पाहिजे. राज्यांतील प्रत्येक व्यक्ति कायद्याचे राज्यांत कायद्याचे हुकमतींत असलीच पाहिजे. मर्यादा घालणाऱ्यावरही मर्यादेचें बंधन असलें पाहिजे.

कायद्याची हुकमत सर्वांवर असावी यासाठीं न्यायाधीश निःस्पृह, निःपक्षपाती पाहिजेत. न्यायखातें कार्यकारी सरकारापासून स्वतंत्र असलें पाहिजे. न्यायदान कर-तांना बढती–बहाली कार्यकारी सत्तेवर अवलंबून आहे हा विचार न्यायाधिशांचे मनांत आला तर त्यांचे हातून निःपक्षपाती न्याय होणें कठीण आहे. न्याय देतांना त्यांनीं आपल्या सदसद्विवेकबुध्दीला स्मरून न्याय दिला पाहिजे. त्यांचे निवाडे व निकाल चालू राज्यसत्तेला नापसंत असले तरी त्यांना कामावरून काढण्याचा अधि-

कार तिला असतां कामा नये. त्याचप्रमाणें एखादा निकाल जनतेला पसंत नसेल म्हणूनही त्या न्यायाधिशाची बदली तेवढ्यासाठीं होणें गैर आहे. निःपक्षपातीपणें व निस्पृहपणें न्याय पाहिजे असेल तर न्यायाधिशाला त्याचे निकालाबद्दल कुठल्याही तऱ्हेनें तोषिस लागतां कामा नये. जोंपर्यंत आपण सद्वर्तनी आहोंत तोंपर्यंत आपलें स्थान कायम आहे, असा विश्वास न्यायाधिशाचे मनांत असेल तरच योग्य न्याय मिळेल. त्याची नेमणूक निवडणुकीवर अवलंबून असेल तर त्याचें न्यायदान न्यायापेक्षां लोकप्रियतेकडेच अधिक लक्ष देईल आणि वारंवार या निवडणुकी होणाऱ्या असतील तर न्यायास कस फारच कमी दर्जाचा राहील. जनतेच्या निवडून आलेल्या प्रतिनिधींनीं राज्यकारभार चालवावा हें अगदीं योग्य; पण नागरिकहक्कांचें यथार्थपणें संरक्षण व्हावें, व तें राज्यसत्तेला करतां यावें म्हणून न्यायालयीन संरक्षण आहे, व तें प्रभावी व्हावयाचें असेल तर तें न्यायाधीश निवडणुकीनें नेमले जाण्यानें होणार नाहीं. निवडणुकी जरी लांब मुदतीच्या ठेवल्या तरी, न्यायाधिशांचे मनांत जें विश्वासाचें वातावरण जरूर असतें तें निर्माण होत नाहीं. विशिष्ट मतप्रणालीचे म्हणून निवडून आलों आहोंत ही जाणीव असल्यामुळें विशिष्ट हितसंबंध रक्षण करण्याचें एक अलिखित बंधन त्यांचे मनावर असतें. न कळत कां होईना, त्याचा प्रभाव त्यांच्या न्यायदानावर होतो. अगदीं सूक्ष्म स्वरूपानें पक्षविषयक, वर्गविषयक विचार-कण त्यांचे मनोभूमींत रुजलेले असतात. पासंगाइतके जरी ते लहान असले तरी न्यायदानाचें पारडें लववितात. कायद्याची हुकमत सर्वांवर यथार्थपणें असावी यासाठीं कार्यकारी अधिकार व न्यायदान हीं दोन्ही कामें एका हातीं कधींच नसावींत. ज्यानें हुकूम दिला अगर ज्यानें कायद्याची अंमलबजावणी करावयाची त्यानेंच हुकूम अगर कायद्याचा अर्थ बरोबर आहे कीं नाहीं हें सांगावयाचें हें अगदीं गैर व घातक आहे. असें केंद्रीकरण जेथें होतें तेथें राज्यसत्ता जुलमी होते. राज्यकर्त्यांनीं पकडावयाचें, त्यांनींच न्याय करावयाचा, ही सुलतानशाहीची परंपरा आहे; नव्हे, तिचें मुख्य लक्षण आहे. जेथें कारभार नोकरशाहीचे हातीं आहे तेथेंही असें केंद्रीकरण झालें तर हाच अनुभव येतो. अंमलबजावणी करणारा अधिकारीच न्यायाधीश असला म्हणजे न्यायापेक्षां कारभाराच्या सोयीकडे व गरजेकडे तो बघतो. कारभाराची सोय अगर गरज म्हणजे नागरिकांची गैरसोय असाही अनुभव अनेक ठिकाणीं येतो न्यायदानांतील चालना विवेकाची असावी लागते. न्यायाधीश कार्यकारी अधिकारी असला म्हणजे तेथें विवेकाची जागा विवंचना—राज्यकारभारांतील अडचणींची विवंचना—**(Reasons of State)** घेते. राज्याचें कार्यक्षेत्र हल्लीं सारखें वाढत आहे; त्याबरो-

बरच राज्यकारभार चालविणारी नोकरशाही सर्वत्र वाढत आहे. त्यामुळें अनेक बाबीं-तील न्याय नोकरशाहीवर सोंपविणें भाग पडत आहे. सामान्य न्यायालयांना सर्व कामें करणें अशक्य होत आहे. यासाठीं, मजुरांच्या कायद्यासाठीं स्वतंत्र कोर्टें, प्राप्तिकरांचे कायद्यासाठीं निराळीं कोर्टें, स्थानिक स्वराज्याचे कायद्यासाठीं निराळीं कोर्टें स्थापन केलीं तर चालेल, नव्हे केलीं पाहिजेत. पण हीं सर्व कोर्टें, सर्व न्यायालयें, सामान्य न्यायालयांप्रमाणेंच निःपक्षपाती न्याय देणारींच असावींत. हीं न्यायालयें, व त्यांचीं खातींही पण कार्यकारी सत्तेपासून अलग व स्वतंत्र पाहिजेत. त्यांतील न्याया-धीशही निवडणुकीनें नेमले जाऊं नयेत व ते सद्वर्तनी आहेत तोंपर्यंतच कामावर असावेत. निरनिराळ्या कायद्यांच्या निर्णयासाठी स्वतंत्र कोर्टें असलीं तर चालतील, मुख्य मुद्दा—न्यायालयें स्वतंत्र पाहिजेत व कार्यकारी सत्तेचे हुकूम न्याय्य अगर अन्याय्य ठरविण्याचा, कायद्याचा अर्थ लावण्याचा अखेरी अधिकार न्यायालयांना असला पाहिजे. याबाबतींत त्यांचें सर्वश्रेष्ठत्व असलें पाहिजे. नागरिक व राज्यसेवक यांना सारखाच न्याय मिळाला पाहिजे. कायद्याचे हुकमतीखालीं सर्वच असले पाहि-जेत. कार्यकारी अधिकारी कितीही चांगला असला तरी त्यानें दिलेला न्यायनिवाडा अखेरचा असतां कामा नये. हुकूम काढणारा कार्यकारी अधिकारी न्यायाधीश असणें म्हणजे नागरिक हक्कांवर गदा आलीच.

व्यक्तीला आत्मोन्नतीच्या दृष्टीनें, विकासाच्या दृष्टीनें, समाजाच्या हिताशीं अवि-रोधानें, कोणते अधिकार असावेत, कोणते हक्क असावेत याचें विवेचन इतिहासाचा अनुभव लक्षांत घेऊन येथपर्यंत केलें आहे. व्यक्तीला संपत्तिविषयक मिळकतीबाबत कांहींच हक्क अगर अधिकार नसावा का ? असा प्रश्न कोणी करील. जर असा कांहीं अधिकार अगर हक्क असल्याशिवाय व्यक्तीचा जीवनविकास होणारच नाहीं असें असेल तर तोही हक्क मान्य करणें जरूर आहे व त्याला मान्यता दिल्यास त्याच्या मर्यादाही निश्चित केल्या पाहिजेत. स्वीकृत विचारसरणीत कर्तव्यविरहित असा अधि-कार अगर हक्क मान्य केलेला नाहीं, मग याही हक्काचे बाबतींत कर्तव्याचे दृष्टीनेंच विचार केला पाहिजे. जें कार्य, जी सेवा व्यक्ति करणार आहे त्यासाठीं त्या व्यक्ती-जवळ मिळकत अगर संपत्ति ठेवणें अगर तिचा मालकी हक्क त्यास असणें जरूर आहे का ? हा मालकी हक्क—समाजहितासाठीं—असूं देणें जरूर आहे का ? ज्यावर मालकी हक्क द्यावयाचा तें कोणाच्या श्रमाचें फळ ? श्रमाशिवाय मिळविलेल्या संपत्तीवर मालकी हक्क देणें यांत न्याय नाहीं. एकानें श्रमावें व त्याचें फळ सरळ दुसऱ्यास मिळावें हें न्याय्य कोण म्हणेल ? मालकी हक्काचा परिणाम जर दुसऱ्यांच्या

जीवनावर सत्ता गाजविण्यांत होणार असेल तर तो हक्क न्याय्य कसा ठरेल ? प्रत्येक व्यक्तीला समाजांत जीवन–विकासाला वाव असला पाहिजे नव्हे, तो त्याचा हक्क आहे असें मानल्यानंतर एका व्यक्तीला अनेक व्यक्तींवर सत्ता असूं देणें म्हणजे त्या व्यक्तीची इच्छा प्रभावी करणें आहे. सत्ताधारी मनुष्याच्या इशाऱ्याप्रमाणें त्यांना वागणें भाग पडतें; म्हणजेच त्यांच्या स्वाभाविक प्रेरणांना, आकांक्षांना, त्यांना दाबावें लागतें, त्यांचें व्यक्तिमत्व उमलूं शकत नाहीं, त्यांचे जीवन कोंदटलेलें होतें. शेवटीं मन मेलेलीं, ठोकळेवजा अशीं माणसें तीं होतात. हा सामाजिक परिणाम लक्षांत घेतां व्यक्तीला मिळकतीबद्दल मालकी हक्क देणें किती समाजहितविरोधी आहे हें स्पष्ट होतें. व्यक्तीचें सामाजिक कर्तव्य व सेवा लक्षांत घेऊन, कार्याला आवश्यकच असेल तर आणि तेवढ्यापुरतीच ही मालकी मर्यादित झाली पाहिजे. व्यक्तीच्या प्रेरणांना योग्य समाधान मिळणें हें अगदीं आवश्यक आहे व तें प्राप्त झालें तर व्यक्ति कांहीं सामाजिक सेवा व त्याचें नियत कार्य करील. म्हणून हें समाधान लाभण्यास अवश्य तेवढी साधनसामुग्री, मिळकत, त्याची म्हणून ठेवल्यानंतर जर अधिक संपत्ति अगर मिळकत व तिची मालकी त्याजजवळ राहिली तर ती समाजहिताचे दृष्टीनें अनवश्यक व अनर्थकारक आहे. कारण त्याच्या नियत कर्तव्याला, तें पार पाडण्याला तिची गरज नसल्यामुळे तिचा दुरुपयोग होणेंच संभवनीय असतें. अनेकांना कर्तव्यासाठीं आवश्यक तें समाधान नसतें. कारण अवश्य त्या गरजाच भागल्या जात नाहींत. त्यांना या संपत्तीमान् व्यक्तींवर अवलंबून राहाणें भाग पडतें. गुणांचे जोरावर नव्हे तर संपत्तीचे जोरावर ह्या व्यक्ति आपले समाजांतील वजन वाढवितात, व आपली संपत्ति कायम राहील अशीच व्यवस्था करीत असतात. अमर्याद खाजगी मालकी जेथें वावरत आहे तेथें संपत्ति असेल तेथेंच वाढत जाते व संपत्ति म्हणजेच सत्ता असल्यामुळें अनेकांचें व्यक्तिमत्व ती मारते. समाजांतील व्यवस्थेमुळें–अव्यवस्थेमुळें–मिळालेली संपत्ति दानानें पवित्र होत नाहीं अगर ती राहूं देणें न्याय्य वा योग्य ठरत नाहीं. डोक्यावरील मण्यानें नागाला शोभा आली असली तरी त्याचें विष त्यानें कमी होत नाहीं. संपत्तीची इष्टानिष्टता तिची मालकी असणाऱ्याचे समाजांतील नियत कार्यावर आहे. जी अधिकार अगर हक्कव्यवस्था नागरिकांचे हक्कांबाबत असावी म्हणून येथपर्यंत प्रतिपादिलें आहे, त्या दृष्टीनें अर्थसंपादनाला मानवी तृष्णा हीच एक मर्यादा ठेवून भागणार नाहीं. व्यक्तीचें समाजांतील कार्य करण्याला जर मालकी हक्क आवश्यकच असेल तर तेवढ्यापुरताच तो असावा, जास्त असूं देणें समाजहिताविरुद्ध आहे.

येथपर्यंत जे अधिकार अगर हक्क नागरिकांना असावेत म्हणून सांगितलें ते जर त्याला उपलब्ध झाले तर त्याचें नागरिकत्व यथार्थता पावेल, त्याचे जीवनांत प्रसन्नता येईल, सार्थकता निर्माण होईल. हे सर्व हक्क आवश्यक खरे, असावेत खरे, पण ते प्राप्त झाले पाहिजेत, मान्यता पावले पाहिजेत आणि हें सर्व राज्यावर अवलंबून आहे. या दृष्टीनें समाजांतील राज्याचें स्थान व भूमिका यांचा विचार झाला पाहिजे. राज्य हें समाजाचें राजकीय स्वरूप व संघटन, आणि प्रत्येक समाजांत सर्वमान्य व सामान्य नियम व संकेत अमलांत आणण्यासाठीं हें संघटन अपरिहार्य आहे. कोणी तरी 'शास्ता' लागतो याचा अर्थ नियंत्रण करणारी शक्ति असावी लागते. व्यक्ति-व्यक्तींचे संबंध निर्माण झाल्यानंतर त्यांचें नियंत्रण होऊन व्यवहारांत विश्वास उत्पन्न होण्यासाठी, समाजांत स्थैर्य व शांतता राहाण्यासाठीं कांहीं तरी किमान गोष्टींत समाजांत एकवाक्यता असावी लागते. ज्यांत एकवाक्यता झाली, ज्यांत सर्वमान्यता आली, तें वर्तन, तशी वागणूक सर्वांची असावी म्हणून ती घडवून आणण्याचें काम राज्याचें असतें. तद्विषयक नियमांची त्यानें अंमलबजावणी करावयाची असते. किमानपक्षीं कांहीं तरी गोष्टी समाजांतील सर्व व्यक्तींना सारख्या आहेत, त्यांत कांहीं तरी सार्वजनिकपणा आहे, निव्वळ कांहीं व्यक्तींचाच त्यांत संबंध येतो असें नाहीं, तर समाजांतील सर्व व्यक्तींचा येतो, असें झालें म्हणजे त्याबाबत कांहीं नियम करणें, कांहीं संकेत ठरविणें शक्य होतें व समाजाला त्यांची जरूर भासते. कारण समाजाला व्यवस्था असावीशी वाटते, व्यवहारांत निश्चितपणा असावासा वाटतो. यासाठीं व या दृष्टीनें नियमन व नियंत्रण करणारी संस्था, अगर शक्ति असणें आवश्यक व अपरिहार्य होतें. या शक्तीचें सूक्ष्म स्वरूप म्हणजे राज्य व स्थूल स्वरूप सरकार. प्रचलित राज्यसत्ता चालविणारे राज्यकर्ते, प्रत्यक्ष कारभार करणारें मंडळ अगर व्यक्तिसमूह राज्य हा एक भाव आहे. त्याचा आविष्कार, त्याचें स्वरूप प्रत्यक्ष जे कारभार करतात, जें सरकार आहे त्यावर अवलंबून आहे. नागरिकांना जें दिसतें, जें स्पर्श करतें, जें ऐकूं येतें तें स्वरूप म्हणजे स्वराज्याचें सूक्ष्म स्वरूप नव्हे, तर स्थूल म्हणजे सरकार. भक्ताला जो परमेश्वर दिसतो तो निराकार नव्हे तर तो मंगलमूर्ति गणराज असेल, नाहीं तर मुंडमाळा घातलेला काळभैरव असेल. म्हणून जें प्रत्यक्ष आहे, त्याचाच विचार करणें अधिक महत्त्वाचें आहे. म्हणून जें विद्यमान सरकार आहे, जी विद्यमान राज्यसत्ता आहे तिनें विधियुक्त आचरण करावयाचें तर नागरिकहक्कांना मान्यता मिळेल, त्यांना अनुसरून वागणूक होईल अशीच कार्यप्रणाली ठेवली पाहिजे. समाजांतील अन्य संस्थाचें मार्गदर्शनही तिनें याच भूमिकेवरून केलें पाहिजे. व्यक्ति ही व्यक्तिशः व

संघशः विकासाचा आणि उन्नतीचा प्रयत्न करीत असते व तें तिला सुलभ व्हावें म्हणून सर्वत्र राज्यसत्तेनें काळजी वाहिली पाहिजे. त्याचबरोबर हेंही उघड आहे कीं, या राज्यसत्तेला अमर्याद सत्ता नाहीं व तिला अमर्यादपणें ही सत्ता वापरतां येणार नाहीं. राज्यसत्तेचें जें कार्य आहे, जें निश्चित कार्य आहे त्याला आवश्यक तेवढीच सत्ता व तेवढाच अधिकार तिला असला पाहिजे. ज्यांत सर्वांचें हित आहे व म्हणून ज्यांत सर्वांना हक्क आहे अशा क्षेत्रांत तिचें कार्यक्षेत्र आहे व तेथें तिनें हक्कसंगोपनाचें व संरक्षणाचें कार्य करावयाचें असतें व त्याच दृष्टीनें समाजांतील नाना व्यापार व व्यवहार यांची जुळवणूक करावयाची असते. राज्यसत्तेच्या कार्यक्षेत्रांत मनुष्याचे हितसंबंध व त्याचे हक्क यांत विरोध उत्पन्न झाला तर हक्कांना अनुसरून जेवढें हितसंबंधांचें क्षेत्र असेल तेवढेंच राज्यसत्तेचें योग्य व विधियुक्त क्षेत्र असलें पाहिजे. हक्कांना विरोध करून हितसंबंध जर ती राखूं लागली तर ते हितसंबंधच सार्वजनिक असूं शकणार नाहींत व राज्यसत्तेचा त्या प्रमाणांत नैतिक अधिकार कमी होईल. समाजांतील सर्व व्यक्तींचे जे हितसंबंध असतीऽ त्यांचें स्वरूप सार्वजनिक असल्यामुळें तें हक्कविरोधी असूं शकत नाहीं, व या सार्वजनिक दृष्टीनें समाज व राज्य यांत एकता असते. तथापि समाज व राज्य हीं एक नाहींत. जें राज्याच्या कक्षेंत येत नाहीं असें पुष्कळ क्षेत्र समाजांत असतें. जें वैयक्तिक आहे, समाजविरोधी नाहीं पण सामाजिक किंवा सार्वजनिकही नाहीं असेंही क्षेत्र समाजांत असतें. वैयक्तिकही नाहीं, समाजविरोधीही नाहीं पण सार्वजनिकही नाहीं असेंही क्षेत्र समाजांत असतें. राज्याचा प्रभाव, जेवढें साधारण व सार्वजनिक तेवढ्यावरच जरी असला, तरी बाकी राहिलेल्या समाजांतील क्षेत्रांत राज्यसत्तेला तिचें कार्य करतांना विरोध होणार नाहीं एवढी व्यवस्था असली पाहिजे. व्यक्तीनें मनांत काय विचार करावा, अगर कोणत्या देवाला भजावें, नास्तिक असावें कीं देवधर्म करावा, हें सर्व क्षेत्र राज्याच्या अधिकाराबाहेरील आहे. देवळांत कीर्तनें व्हावींत कीं पुराणें व्हावींत, देव भक्तीनें पावतो कीं कर्म केल्यानें पावतो, ज्ञानोत्तर कर्म राहातें कीं नाहीं, लग्नांत जेवणावळी असाव्यात कीं नसाव्यात, या व असल्या वैयक्तिक व सामाजिक गोष्टी राज्याच्या कार्यक्षेत्रांत येत नाहींत. तथापि कीर्तनावरून वा जेवणावळीवरून शांतताभंग झाला अगर होणें अपरिहार्य झालें, तर तेथें राज्यक्षेत्र आलें; कारण शांततासंरक्षण हें सार्वजनिक हितार्थ आहे, सार्वजनिक कार्य आहे व तें करण्याची जबाबदारी राज्याची आहे. तसेंच एखादा इसम केवळ भक्तीनें मुक्ति मिळते म्हणून आपल्या मुलांस शाळेंत धाडीनासा झाला तर जेथें सक्तीचें व सार्वत्रिक शिक्षण आहे तेथें सरकार हस्तक्षेप करील व सदरहू इसमास मुलांस शाळेंत घालणें भाग पाडील.

कारण शिक्षण ही सार्वजनिक हितसंबंधाची बाब झाली व तें कार्य पार पाडणें राज्याकडे त्या कारणामुळें आलें. प्रत्येकाला काम मिळणें व योग्य वेतन मिळणें ही सार्वजनिक हिताची बाब म्हणून तत्संबंधींची जबाबदारी राज्यसत्ता टाळूं शकत नाहीं. जें कार्य राज्याचें म्हणून ठरलें गेलें आहे तें राज्यसत्तेनें पार पाडलें पाहिजे व त्या दृष्टीनें समाजांत व्यक्तिशः अगर संघशः जें कार्य होत असेल त्याची जुळणी केली पाहिजे. त्याचबरोबर व्यक्तिशः अगर संघशः राज्यकार्याला विरोध होत असेल तर हक्कसंगोपनार्थ—हक्कांची व्यवस्था नीट राहावी म्हणून विरोधक व्यक्ति किंवा संघ, यांना निष्प्रभ करण्याचा, त्यांचीं विरोधक कृत्यें बंद करण्याचा तिला अधिकार आहे. मात्र हीं कृत्यें खरोखरच विरोधक व विघातक आहेत हें न्यायालयांत राज्यसत्तेला दाखवितां आलें पाहिजे. राज्यसत्तेला असलेला अधिकार, दिलेली सत्ता, तिनें करावयाच्या कार्याच्या दृष्टीनेंच तिला प्राप्त झालेली असते. कार्याचें स्वरूप सत्तेची व्याप्ति ठरवितें. समाजांतील सर्व सत्ता वा अधिकार राज्याला समाजानें देऊन स्वत्वनिवृत्ति केलेली नसते. इतकेंच नव्हे तर समाजांतील सत्तेचें शेषाधिकारी वारसही राज्य नाहीं. समाजांतील सत्तेतून, समाजांतील सार्वजनिक हिताचे संगोपनार्थ जरूर तेवढा अंश समाजानें राज्याला दिलेला असतो. राज्याचें कार्यक्षेत्र समाजाचे क्षेत्राइतकें व्यापक नसतें. बाहेरच्या क्षेत्रांत राज्यसत्तेचा अधिकार नाहीं. स्वतःच्या क्षेत्रांतही तिचा अधिकार व सत्ता अमर्याद नाहीं. तसेंच तिनें सत्ताधीश म्हणून जें कांहीं केलें तें चांगलें व योग्य असें गृहीत धरण्याचें कारण नाहीं. सत्ता तेथें सौजन्य अगर सत्य हा सिद्धांत अचूक नाहीं. या परिस्थितींत राज्याचा अधिकार हक्कव्यवस्थेचे दृष्टीनें कसा वापरला गेला पाहिजे तें पाहिलें पाहिजे.

आधुनिक राज्याचें कार्यक्षेत्र वाढत आहे. प्रादेशिकदृष्ट्या आधुनिक राज्यें विस्तृत आहेत. ही गोष्ट लक्षांत घेतां राज्यांतील सर्व सत्ता एके ठिकाणी केंद्रित होणें इष्ट नाहीं. केंद्रीकरण झालें तर सत्तेचा दुरुपयोग होण्याचा संभव असतो व असा अनुभवही आहे. म्हणून प्रादेशिक दृष्टीनें व कार्यपरत्वें सत्तेची एका अर्थानें वांटणी व्हावी हे इष्ट असतें. मध्यवर्ती व मुख्य सत्तेनें राज्यांतील निरनिराळ्या भागांना कांहीं कांहीं राज्यकारभाराच्या बाबी चालविण्यासाठीं द्याव्यात. ही वांटणी अगर विकेंद्रीकरण ( Decentralisation ) केल्यानें मध्यवर्ती सत्तेचा अखेरी अधिकार कमी होतो असें नाहीं. जे प्रश्न, ज्या बाबी स्थानिक स्वरूपाच्या आहेत, त्या, त्या त्या भागांतील लोकांनीं पाहाणें योग्य आहे. सर्वसामान्य नियंत्रण व देखरेख मध्यवर्ती सत्तेनें केली म्हणजे पुरेसें होतें. खेड्यांतील शाळा कोठें असावी हें ठरविण्याचें काम

त्या खेड्यावरच सोंपविणें इष्ट आहे. पण मुलांना शाळेंत घालावें कीं नाहीं हा प्रश्न त्या खेडेगांवाचा नाहीं. शिक्षण हें सर्वांना मिळालेंच पाहिजे; तो प्रश्न स्थानिक नाहीं. एखाद्या शहरांत अजबखाना, अगर कलागृह असावें कीं नाहीं हें त्या शहरानें ठरविणें इष्ट होईल; पण शहरांत प्राप्तीकर असावा कीं नाहीं हें त्या शहरानें ठरविणें अव्यवहार्य आहे. तात्पर्य, स्थानिक अगर भागविषयक महत्त्वाचे प्रश्न तेथील लोकांनींच सोडविणें इष्ट आहे. त्यांना देण्यांत येणारी सत्ता तेवढ्या सोपविलेल्या बाबींपुरतीच व्यापक असावी, केवळ अंमलबजावणीपुरती सत्ता दिली आहे असें तिचें स्वरूप असूं नये. तसें झालें तर निरनिराळ्या ठिकाणीं कारभारकेंद्रें उघडण्यापासून लोकबुद्धीला चालना देण्याचा जो फायदा असतो तो उपलब्ध होत नाहीं. अंमलबजावणीचीं नाकीं न होतां कारभार चालतो अशीं केंद्रें व्हावींत हा तर सत्ताविभागणीचा उद्देश असला पाहिजे. केंद्रीकरण म्हणजे सर्वत्र स्थानिक परिस्थितीचा विशेष विचार न करतां सारखेपणा आणण्याचें तंत्र. ज्या बाबी खरोखरच सर्वत्र सारख्या असतात अगर असल्याच पाहिजेत, तेथें मुख्य व मध्यवर्ति सत्तेनें धोरण ठरविणें अवश्य असतें. परदेशांतून येणाऱ्या मालावर आयातकर बसविणें झाल्यास प्रांतांना तो अधिकार देणें चूक. मादक पदार्थांची बंदी, अनिष्ट पदार्थांची पैदास, चलनविषयक बाबी या कांहीं प्रांतिक स्वरूपाच्या नाहींत. स्थानिक परिस्थितीवर अवलंबून राहाणाऱ्या बाबी यांचा कारभार स्थानिक लोकांनीं चालवावा व अशीं अनेक कारभारकेंद्रें निर्माण झालीं म्हणजे लोक त्यांत भाग घेतात. लोकांना कारभारांत भाग दिला म्हणजे त्यांना त्यांत आपुलकी वाटते, कार्याच्या जबाबदारीची जाणीवही त्यांना होते. त्यांचे बुद्धीला, कर्तृत्वाला वाव मिळतो. अनुभवानें त्यांच्या नागरिकत्वाला प्रौढत्व येतें, स्वभावांत दक्षता येते. म्हणून जेथें जेथें नागरिकहक्कव्यवस्थेस बाध न येतां सत्तेचें विकेंद्रीकरण करणें शक्य आहे तेथें तेथें तें जरूर झालें पाहिजे. सत्तेच्या केंद्रीकरणापासून तिचा दुरुपयोग होणें जास्त संभवनीय असतें तें वरील प्रकारानें टळेल. सत्तेबरोबर तिच्या मर्यादा उपलब्ध नसतील तर तिचा दुरुपयोग होणें स्वाभाविक आहे.

विकेंद्रीकरणानें सत्तेला एक अनुरूप व आवश्यक अशी मर्यादा नसते. त्याचदृष्टीनें राज्यसत्तेला ज्या ज्या हितसंबंधांबाबत कांहीं धोरण आंखावयाचें आहे त्या त्या हितसंबंधांचे जे संघ असतील त्यांच्याशीं पूर्वविचारविनिमय तिनें केलाच पाहिजे अशी व्यवस्था असली पाहिजे. विधिमंडळांतील वादविवाद, विचारविनिमय व चर्चा ही निराळी. विधिमंडळापुढें धोरण अगर योजना ठेवण्यापूर्वी, प्रस्तुत संघांशीं व हितसंबंधांशीं अधिकृत प्रतिनिधिद्वारां विचारविनिमय करूनच मग राज्यसत्तेनें

तें धोरण अगर योजना कायम करून विधिमंडळापुढें मान्यतेसाठीं मांडली पाहिजे. शिक्षकांचे पगाराची योजना असेल तर शिक्षकसंघाचे प्रतिनिधींशी प्रथम चर्चा केली पाहिजे. कामाच्या तासांची योजना असेल तर मजूरसंघाच्या प्रतिनिधींनीं विचारविनिमय केला पाहिजे. आयातनिर्यातकरांची योजना असेल तर उत्पादक व शेतकरी संघ यांचे प्रतिनिधींशीं विचारविनिमय केला पाहिजे. ही सल्लामसलत अगर हा विचारविनिमय राजसत्तेनें आपल्याला पाहिजे त्या मंडळींना निवडून बोलावून करावयाचा नाहीं; याप्रमाणें केलें तर होयबाच येतील. म्हणून त्या त्या व्यवसायांतील, धंद्यांतील अधिकृत संघांनीं जे प्रतिनिधि म्हणून नेमले असतील, त्यांच्यांशीं विचारविनिमय केला पाहिजे. योजनेला अनुकूल असणारेच सरकार नेमण्याचा संभव असतो म्हणून प्रतिनिधि सरकारनें न नेमतां त्या त्या संघांनींच नेमणें इष्ट आहे. असें असेल तरच साधकबाधक अशी चर्चा होईल. प्रश्न सर्व तऱ्हेनें, सर्व दृष्टिकोणांतून निरीक्षिला जाईल. या पूर्वविचारविनिमयाचा वृत्तांत जनतेला कळणें जरूर आहे. नुसता विचारविनिमय केला व त्याचा वृत्तांत गुप्त ठेवला तर या योजनेंतील मुख्य उद्देश पुरा होत नाहीं. पूर्वविचारविनिमयानें सत्तेला एक मर्यादा बसते पण तिचा यथार्थ प्रभाव जेव्हां सर्व लोकांना, सर्वसामान्य लोकांना काय विचारविनिमय झाला हें कळेल तेव्हांच पडेल. सरकारनें कायम केलेल्या धोरणाबाबत निरनिराळ्या दृष्टिकोनांतून काय विचार मांडले गेले हें जनतेला कळलें म्हणजे जनता आपला अभिप्राय देऊं शकेल. जनतेनें योग्य तऱ्हेनें अभिप्राय द्यावा म्हणून विचारविनिमयांत आलेली माहिती, सांगितलेली वस्तुस्थिति, निरनिराळ्या प्रतिनिधींचीं विचारसरणी, हीं सर्व, जनतेपुढे येणें जरूर आहे. हीं सर्व सामुग्री सरकारनें स्वतःजवळ ठेवणें म्हणणे लोकांना अंधारांत व अज्ञानांत ठेवण्यासारखें आहे. अभिप्राय म्हणजे उपलब्ध माहिती विचारांत घेऊन सारासार विचार करून विवेकानें घेतलेला निर्णय. एवंगुणविशिष्ट अभिप्राय सरकारी धोरणास अनुकूल करून घेणें हें सरकारचें ध्येय असले पाहिजे. असा अभिप्राय सरकारचे विरुद्ध जाईल ही भीति राज्यसत्तेला असणे ही एक मर्यादा अधिकारातिक्रम अगर त्याचा दुरुपयोग होऊं नये म्हणून असली पाहिजे.

व्यक्ति आपल्या जीवनविकासाचें, उन्नतीचें कार्य व्यक्तिशः व संघशः करीत असते. संघटित संस्थांतून अगर असंघटित जमावांतून व्यक्ति अनेक नात्यांनीं वागते व आपल्या भावनांना वाव देते, त्यांचा आविष्कार करते. ती एकांतांत चिंतन करील अगर एखाद्या प्रासादिक भजनमंडळांत जाऊन टाळ कुटील. स्वतः

खरेदी करून ग्रंथ वाचील नाहीं तर नगर वाचनालयांत सभासद होऊन ज्ञानार्जन करील. मालकाशीं स्वतंत्रपणें भांडेल अगर मजूरसंघांत सामील होऊन सामुदायिक रीतीनें 'भाकरीचा प्रश्न' सोडविण्याचा प्रयत्न करील. संघजीवनांत ती सामील झाली म्हणून तिचे अधिकार राज्यसत्तेचे दृष्टीनें कमी होत नाहींत. संघांतून होणाऱ्या तिच्या कार्यांत सरकारनें हस्तक्षेप करण्याचें कारण नाहीं. जी नागरिकहक्कव्यवस्था आहे, तिचे संरक्षणार्थ जर हस्तक्षेप करणें जरूर असेल तर सरकारला हा अधिकार आहे. जोंपर्यंत संस्थेच्या कार्यानें कुठल्याही नागरिकहक्कांचें अतिक्रमण होत नाहीं, तोंपर्यंत राजसत्तेला तिच्या कार्यांत हस्तक्षेप करण्याचा अधिकार नसावा. समाजांत संघ असतील, संस्था असतील, जमावानें कार्य करण्याची प्रवृत्ति असेल, तर राज्यसत्तेला अधिकारातिक्रम करण्यास सोपें जात नाहीं. अधिकाराचा दुरुपयोग न व्हावा म्हणून जो मर्यादासंरजाम आवश्यक आहे त्यांत राज्यसत्तेवर, वर उल्लेखिलेलें बंधन हा एक महत्त्वाचा भाग आहे. संघांना व संस्थांना त्यांचे कार्यांत स्वातंत्र्य देणें ही एक सामाजिक हिताचे दृष्टीनें महत्त्वाची गोष्ट आहे. विकासाचे दृष्टीनें व संरक्षणाचे दृष्टीनें त्याचें महत्त्व आहे. संघांनीं आपलें स्वातंत्र्य, नागरिकहक्कांना अविरोधें करून वापरलें म्हणजे झालें. संघाचें कार्य कसें चालावें हें संघाच्या सभासदांनीच ठरविलें पाहिजे. कालपरत्वें संघाचें उद्दिष्टही बदलावें लागतें व तें जर सभासदांनीं बदललें तर राज्यसत्तेनें त्यांत हस्तक्षेप करण्याचें कारण नाहीं. तसें करणें म्हणजे विकासाचा मार्ग बंद करणें आहे. गांवकी करून देऊळ बांधलें, आतां गांवांतील लोकांना तें सर्वांना खुलें करावेंसें वाटलें, अगर शाळा काढावी असें वाटलें तर तें करण्याचा त्यांना पूर्ण अधिकार असला पाहिजे. मजूरसंघानें आपल्या पैशांमधून चाळी बांधण्याचें ठरविलें तर त्याला तो पूर्ण अधिकार आहे. उद्यां त्यानें मजुरांचे हितसंबंध राखणाऱ्या प्रतिनिधींना वेतन दिलें अगर राजकीय निवडणुकींत भाग घेऊन खर्च केला, तरीही त्याला तो हक्क असला पाहिजे. जो संघ, संघ या नात्यानें करील व जोंपर्यंत नागरिकहक्कांच्या विरोधक तो नाहीं तोंपर्यंत त्याचे कार्यांत हस्तक्षेप सरकारनें करूं नये हें बंधन त्यावर असलें पाहिजे. मूळ हेतूंना धरून संघाचें कार्य आहे कीं नाहीं, अगर संस्थापकांचे हेतूला धरून विशिष्ट कार्य आहे कीं नाहीं हा प्रश्न सरकारचा नाहीं. संघानें संघ म्हणून ठरविलें म्हणजे पुरे. अन्यथा सरकार जर हस्तक्षेप करूं लागेल तर समाजांतील संस्थांचें जीवन विद्यमान राज्यसत्ता अशक्य करील व ज्या संस्था, जी संघप्रवृत्ति राज्यसत्तेच्या अधिकारातिक्रमाला मर्यादा घालणारी तीच निष्प्रभ होईल. विकेंद्रीकरण, पूर्वविचारविनिमय व हस्तक्षेपनियंत्रण यांनीं

राज्यकारभाराच्या कटा धरून ठेवल्या म्हणजे राज्यसत्तेला नागरिकहक्कव्यवस्था कुज-वितां येणार नाहीं. लोकमताचे दानाप्रमाणें अधिकार वापरावे लागतील.

राज्यसत्तेनें अगर सरकारनें वापरावयाचे अधिकार, त्याचें जें कार्य ठरलें असेल त्याचे स्वरूपानें मर्यादित होतात, हा येथपर्यंतच्या विचारसरणीचा सारांश आहे. शस्त्राचें स्वरूप, साधनाचे स्वरूप व त्याच्या मर्यादा जें साध्य करावयाचें असेल त्याचेवरून ठरतात. दगडकाम करावयाचें असेल तर हातोडा लागेल, लांकूड-कामाला धार असलेलें वाकस अगर करवत लागेल. हातोड्यानें लांकडें चौरस करा-वयाचीं नसतात, किंवा करवतीनें दगड घासावयाचा नसतो. तसा प्रकार कोणीं केला तर शस्त्र निकामी होतें व या जाणिवेनें तसें कोणी करीत नाहीं. राज्यसत्तेला कार्या-न्वयें दिलेल्या अधिकारांत वागणें इष्ट असलें तरी अधिकारातिक्रम झाल्यास सत्ता ताबडतोब नष्ट होत नाहीं. मर्यादेची जाणीव ठेवून तिची वागणूक झाली तर प्रश्नच नाहीं. मर्यादेच्या बाहेर सत्ता चालविण्यास तिला नैतिक अधिकार नाहीं हें खरें; तथापि, राजसत्तेचीं कृत्यें मर्यादेंत आहेत कीं नाहींत, त्यांत अधिकारातिक्रम झाला कीं नाहीं, हें कोणीं तरी ठरविलें पाहिजे. मौलिक हक्क राज्यसत्तेनें राखले पाहिजेत, पण विशिष्ट कृत्यानें त्यांना बाध आला हें कोणीं सांगावयाचें? अतिक्रम झाला आहे असें अधिकृत रीतीनें निर्णीत झालें म्हणजे मग राज्यसत्तेचें वर्तन गैर झालें असें ठरणार व नंतर तत्संबंधीं उपाययोजना. पण प्रथम राज्यसत्ता जें कांहीं केलें आहे तें योग्य आहे, विधियुक्त आहे असेंच म्हणणार, म्हणून राज्यसत्तेचीं कृत्यें या दृष्टीनें तपासणारी कांहीं तरी योजना असली पाहिजे. भिंत ओळंब्यांत आहे कीं, झुकली आहे हें नजरेनें ठरवावयाचें कीं ओळंबा व दोरी लावून? तसेंच राज्य-सत्तेचीं कृत्यें निव्वळ संकेतानें तपासावयाचीं कीं त्याला कांहीं निश्चित लिखित असें प्रमाण ठेवावयाचें हा महत्त्वाचा प्रश्न आहे. राज्यसत्तेच्या अधिकारांवरील मर्यादा दरोबस्त त्यांची सनद करून निश्चित करावयाच्या अगर, परंपरा अलिखित संकेत यांवर, त्या काय आहेत यासाठीं अवलंबून राहावयाचें? कांहीं राज्यांतील घटना संपूर्णपणें लेखनिष्ठ आहेत व त्यांत सर्व मौलिक गोष्टी, मौलिक हक्क यांचा समावेश केलेला आढळतो. राज्यसत्तेचे अधिकार स्पष्ट केलेले असतात, नागरिकहक्कव्यवस्था स्पष्ट केलेली असते. यामुळें राज्यसत्तेला जें काय करावयाचें असेल तें घटनेप्रमाणें आहे असें दाखवावें लागतें. विधिमंडळाला अगर विधिविषयक सत्तेला काय करतां येईल हें निश्चित सांगतां येतें. आपले अधिकार व हक्क काय आहेत हें लेखनिष्ठ असल्यामुळें नागरिकांना राज्यकार्य समजण्यास अधिक सुलभ होतें. आपल्या हक्कांवर

अतिक्रमण होत असेल तर तत्काळ तें त्यांना कळणें शक्य होतें. सनदेंत हक्कांना स्थान असले म्हणजे कालांतरानें त्यांना परंपरेची प्रतिष्ठाही प्राप्त होते. सनदेमुळें निश्चिति व परंपरेमुळें प्रतिष्ठा हे दोन्ही भाव समाजांतील राजकारणांत वावरत असले म्हणजे अधिकारातिक्रम होणें अधिक असंभवनीय होतें.

अलिखित संकेत व परंपरा यांवर राज्यकारभार व विशेषत: मौलिक हक्क व मौलिक बाबी अवलंबून ठेवण्यापेक्षां राज्यकारभार हा लेखनिष्ठ घटनेवर आधारलेला असणें अधिक श्रेयस्कर आहे. लेखनिष्ठ घटना असली तर तिच्यांत बदल करणें कठीण जातें. काळ बदलत असतो व बदललेल्या काळाला अनुसरून घटनेंत बदल करावयाचा तर तोही अधिकार वापरणें सुलभ नसतें, असा आक्षेप येण्यासारखा आहे व अमेरिकेच्या संयुक्तसंस्थानांतील अनुभव पुरावा म्हणून कांहीं आक्षेपक देतातही. तेथें १७८७ सालीं प्रथम घटना मंजूर होऊन अंमलांत आली व तेव्हांपासून आतांपर्यंत घटनेंत अशा वीस दुरुस्त्या झाल्या. बदललेल्या काळाला अनुसरून कांहीं दुरुस्त्या मूळ घटनेंत आवश्यक असूनही झाल्या नाहींत. पण त्याचें कारण घटना लेखनिष्ठ आहे असें नव्हे, तर घटनेंत बदल करण्याचा, ती दुरुस्ती करण्याचा जो विधि सांगितलेला आहे तो सुलभ नाहीं. त्या वेळच्या परिस्थितीप्रमाणें केलेली योजना समर्थनीयही ठरेल; पण नंतर ती बदलून, दुरुस्त करून अधिक सुलभ योजना करणें कठीण नव्हतें व नाहीं. घटनेंत बदल करण्याचा अधिकार, व तत्संबंधींच्या योजनेत सुलभता या दोन्ही गोष्टी अलीकडे अस्तित्वांत असलेल्या बहुतेक घटनांतून दिसून येतात. घटना केवळ लेखनिष्ठ आहे म्हणून तीत बदल करू नये अशी प्रवृत्ति उत्पन्न होते हेंही खरें नाहीं. लोकव्यवहार बदलला, समाजाची गरज विद्यमान घटनेनें पुरी पडत नसेल तर घटनेमध्यें बदल व्हावा अशी मागणी अपरिहार्य होते व केवळ बदल करण्याचें तंत्र क्लिष्ट आहे, कष्टाचें आहे, म्हणून बदल करण्याचें कार्य सोडून देण्यांत येतें असेंही होत नाहीं. तथापि दुरुस्ती करण्याची योजना सुलभ असावी हें तितकेंच इष्ट आहे. तसेंच राज्यसत्तेचें कृत्य घटनेला धरून आहे कीं नाहीं हें घटना लेखनिष्ठ असली म्हणजे सांगावें लागतें व ती गोष्ट कुणीं करावी हें ठरविणें अडचणीचें आहे. म्हणून घटना लेखनिष्ठ नसावी हेंही म्हणणें बरोबर नाहीं. सरकारी कृत्य घटनेला धरून आहे कीं नाहीं हे ठरविण्याचें काम कांहीं घटनेप्रमाणें विधिमंडळाला आहे. याचा अर्थ कांहींच्या मतें विद्यमान सरकारला, विद्यमान राज्यसत्तेलाच तो प्राप्त होतो असा आहे. विधिमंडळांत बहुमत आहे म्हणून तर विद्यमान सरकार कारभार करीत आहे व त्यानें केलेलें कृत्य सनदशीर किंवा गैरसनदशीर, घटनेला धरून कीं विरुद्ध हें

विधिमंडळानें ठरवावयाचें म्हणजेच सरकारनेंच ठरवावयाचें असें उघड होतें. तथापि हा प्रश्न विधिमंडळांतील नाममात्र बहुमतानें न ठरवितां, विशिष्ट प्रमाणांत बहुमत मिळालें तरच सरकारी कृत्य सनदशीर ठरावें अशी योजना केली तर वरील आक्षेपाची तीव्रता बरीच कमी होईल. तसेंच विशिष्ट संख्येनें विधिमंडळांतील सभासदांनीं एखादा प्रश्न घटनात्मक आहे व त्याचा निर्णय व्हावा अशी मागणी केली तर विद्यमान सत्तेनें तो तसा मानून, विधिमंडळाकडून तो वर उल्लेखिलेल्या योजनेप्रमाणें घटनेनुसार आहे असा निर्णय घ्यावा अशी व्यवस्था असावी. याप्रमाणें झालें तर वरील आक्षेपांतील तीव्रता व तथ्य नाहींसें होईल. कांहीं घटनेंत राज्यसत्तेनें केलेलें कृत्य अगर कायदा घटनेविरुद्ध आहे, सबब तो निरर्थक ठरविण्याचा, तो बेकायदेशीर ठरविण्याचा अधिकार न्यायालयांना दिलेला आहे. याचा अर्थ सर्व अखेरी सत्ता व घटनेवरील सर्व नियंत्रण न्यायाधिशाचे हातीं जातें, असा कांहीं जण करतात. एका न्यायाधिशानें निर्णय द्यावयाचा तर त्याला हुकूमशहाइतकी सत्ता लाभते. तो जो निर्णय देईल त्यावर कार्यकारी सत्ता अवलंबून राहाणार. तो प्रागतिक वृत्तीचा असेल तर त्याचा निर्णयही प्रागतिक. तो प्रतिगामी असेल तर त्याचा निर्णयही त्याच स्वरूपाचा राहाणार. एकापेक्षां अधिक न्यायाधीश असले तरी त्यांच्या प्रवृत्ति निर्णयावर परिणाम केल्याशिवाय राहात नाहींत. कायद्याचा अर्थ न्यायापेक्षां राजकारणी प्रवृत्तीचे संदर्भानें लावला जातो व निवाडा न्यायपूर्ण निर्णयाऐवजीं एक राजकीय निवेदनच असतें. न्यायाधिशांनीं कायद्याचा अर्थ सांगावा व तो न्यायाधिशाचेच भूमिकेवरून हें केव्हांही इष्ट आहे व तेवढाच त्यांचा अधिकार असावा. त्यांना, कायदाच कायदेशीर आहे कीं नाहीं, तो घटनेला धरून आहे कीं नाहीं हें सांगण्याचा अधिकार दिल्यानें त्यांच्या निस्पृह बुद्धीला अधिक ताण दिल्यासारखें होतें व त्याच्याबरोबर त्यांच्या प्रवृत्तींना धरून कायदे करणें, योजना करणें, कार्यकारी सत्तेला भाग पडतें. राजसत्तेला लोकांचा पाठिंबा असूनही ती निष्प्रभ होते. अमेरिकेंतील न्यायाधिशांनीं अध्यक्ष रूझवेल्ट यांना लोकमताचा पाठिंबा असतांनासुद्धां त्यांच्या योजना गैरकायदा ठरवून निष्प्रभ केलें. तथापि, ज्या ठिकाणीं घटनात्मक बदल करण्याचें तंत्र कष्टाचें आहे, भानगडीचें आहे; तेथेंच घटनात्मक प्रश्नांचा निर्णय देण्याचा अधिकार न्यायाधिशांकडे ठेवल्यानें वरील परिणाम घडून आले आहेत व येणें शक्य आहे. पण जर घटनात्मक बदल करण्याची व्यवस्था सुलभ असेल, तर घटनात्मक प्रश्नाबाबत निर्णय देण्याचें काम न्यायालयांवर सोंपविण्यांत धोका नाहीं. निर्णय विरुद्ध गेल्यास व लोकमताचा पाठिंबा असल्यास घटनेंत जरूर तो बदल करून राज्यसत्ता प्रभावी

कार्य करूं शकेल. तात्पर्य, लेखनिष्ठ घटना नागरिकहक्कव्यवस्थेचे दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे व योग्य योजनेनें तिजविरुद्ध घेतलेले आक्षेप व तिच्या कार्यांतील अडचणी दूर करतां येण्यासारख्या आहेत.

जेथें लेखनिष्ठ घटना नाहीं, तेथें निर्वेध काम चालतें अगर ती व्यवस्था आक्षेपरहित आहे असेंही दिसत नाहीं. आधुनिक युगांत सर्वत्र लेखनिष्ठच घटना आहेत. लेखनिष्ठ घटना म्हणजे सक्त न बदलणारी असेंही मानण्याचें कारण नाहीं. परंपरेवर, संकेतावर आधारलेली राज्यव्यवस्था वाटेल तशी व वाटेल तेव्हां बदलतां येण्याइतकी ती लवचिक असते असेंही नाही. लेखनिष्ठ घटनेंत, साधारण कायदे व संघटनात्मक कायदे असे कायद्यांचे दोन भाग कल्पितां येतात. ज्यांचा मूळ घटनाकायद्यांशीं संबंध नाहीं, म्हणजे ज्यायोगें मूळ घटनाकायद्यांत कांहीं दुरुस्ती अगर फरक सुचविला जात नाहीं अगर होत नाहीं असे कायदे म्हणजे साधारण कायदे ( **Ordinary laws** ) होत. ज्या कायद्यांमुळें घटनाकायद्यांत फरक होतो असे कायदे संघटनात्मक कायदे ( **Organic laws** ) होत. राज्यव्यवस्था लेखनिष्ठ घटनेवर आधारलेली असणे म्हणजे तिचे कार्य, तिची संघटना, तिनें चालवावयाचे अधिकार, वगैरे सर्व बाबींचा समावेश लेखांत केलेला असतो व तो लेख म्हणजे त्या राज्याची घटना अगर घटनाकायदा, त्याला अनुसरून राज्यकारभार चालला पाहिजे. राजसत्ता व नागरिक या दोघांनाही अधिकारांच्या दृष्टीनें हा लेख म्हणजे सनद असते. राज्यसत्तेला या सनदेविरुद्ध वागण्याचा हक्क नाहीं व सर्वसामान्य व साधारण कायदे या घटनाकायद्याला अनुसरून असले पाहिजेत. ते कसे मांडावे व विधिमंडळानें कसे पास करावे यासंबंधींची व्यवस्था घटनाकायद्याला अनुसरून केलेली असते. पण संघटनात्मक कायदे हे घटनेंत फेर करणार असल्यामुळें साहजिक महत्त्वाचे असतात, म्हणून त्या बाबत अधिक दक्षता लेखनिष्ठ घटनेंत घेण्यांत येते. ते कसे मांडावे, कोणीं मांडावे, व किती बहुमतानें पास व्हावेत यासंबंधीं घटनाकायद्यांत अगर त्याला अनुसरून व्यवस्था केलेली असते व ही व्यवस्था सामान्य कायद्यांच्या व्यवस्थेपेक्षां निराळी असते. संघटनात्मक कायदा पास करून घेणें हें सामान्य कायदा पास करून घेण्याइतकें सोपें नसतें व नसलें पाहिजे. घराची रंगसफेती करणें, मूळ रचना कायम ठेवून कमीअधिक सोयी करणें ही गोष्ट व ऐन पाया बदलून अगर त्यांत फरक करून वास्तूचें रचनात्मक स्वरूपच बदलणें ही गोष्ट यांत फरक आहे. दोन्ही गोष्टींचा विचार सारख्या महत्त्वाचा असणारच नाहीं. स्वास्थ्य, भावना, परंपरा व खर्च या सर्वांबाबत अधिक विचार दुसऱ्या प्रकारांत करावा लागतो. पण गरज उत्पन्न झाली,

ती तीव्र झाली कीं, मनुष्य सर्व करण्यास प्रवृत्त होतो. राज्यकारभारांतसुद्धां हा फरक असला पाहिजे. जें मौलिक व महत्त्वाचें असतें तें वाटेल तेव्हां व सहसा बदलतां येण्याजोगें असतां कामा नये, व तशी व्यवस्था घटनाकायद्यांत केल्यानें घटना सक्त व न बदलणारी आहे असें मानण्याचें कारण नाहीं. 'लवचीक' म्हणून समजल्या जाणाऱ्या इंग्लंडच्या घटनेंत वाटेल तो कायदा वाटेल तेव्हां व वाटेल तसा पास करून घेतां येतो असाही अनुभव नाहीं. इंग्लंडची राज्यव्यवस्था अमुक एका कायद्याप्रमाणें चाललेली आहे अगर तिला आधारभूत असा एखादा लेख आहे असें जरी म्हणतां आलें नाहीं तरी राज्यव्यवस्थेसंबंधीं, तिच्या संघटनेसंबंधीं, नागरिकअधिकारांबाबत अनेक कायदे आहेत. फरक एवढाच आहे कीं, सदरहू घटनेंत सामान्य व संघटनात्मक कायदे असा फरक नाहीं. म्हणून कुठलाही कायदा कितीही महत्त्वाचा व मौलिक असो, अगर अगदीं सामान्य गोष्टीबाबत असो, तो पास करण्याचा संकल्प एकच, त्यांत फरक नाहीं. मतदानाचा कायदा व मद्यपानाचा कायदा या दोन्हींनाहीं एकच संकल्प. त्यांचे पसार करून घेण्याचे विधि दोन नाहींत. येवढ्यावरून घटना 'लवचीक' आहे व वाटेल तो कायदा झटकन् पास होऊं शकतो असें मात्र नाहीं. अनुभवास असें येतें कीं, खाजगी सभासदांनीं आणलेलीं बिलें क्वचित्च पास होतात व खुद्द सरकारनें आणलेलीं घटनात्मक स्वरूपाचीं बिलें वर्षानुवर्षांच्या चर्चेनंतर पसार होतात. राज्यव्यवस्थेबाबत अनेक कायदे असल्यामुळें कोणाला किती अधिकार आहे हें सहज समजून येत नाहीं. नागरिकांच्या हक्क व अधिकारांबाबत अवश्य तेवढी दक्षता घ्यायवाची व त्यांचें संगोपन व संरक्षण ह्या परिस्थितींत व्हावयाचें. प्रत्यक्ष राज्यकारभार करणारे, प्रत्यक्ष अधिकार, सत्ता चालविणारे ज्यांचे हातांत प्रत्यक्ष सत्ता आहे ते लोक सूज्ञ व सात्त्विक असतील तरच शक्य आहे. निदान राज्याचें ध्येय मान्य असणारेच प्रतिनिधि लोक निवडून देतील व आपला त्यांचेवरील अधिकार जाग्रत राहावा म्हणून दक्ष राहातील तर शक्य आहे. ज्यांच्या हातांत सत्ता येते ते आपण होऊन लोकमताचे भीतीनें नव्हे, नागरिकांचे हक्कांबाबत दक्षता घेतील, सत्तेचा दुरुपयोग करणार नाहींत, न्यायानें वागतील हें संभवनीय नाहीं; आणि त्यांचें कृत्य घटनेविरुद्ध आहे असें निश्चितपणें, लेखनिष्ठ घटनाकायद्याच्या अभावीं नागरिक सांगूं शकत नसल्यामुळें, राज्यकर्त्यांचें अधिकच फावेल. परंपरा, अलिखित संकेत, राज्यकर्ते सोयीस्कर असेल तेव्हां मानतात व नसेल तेव्हां त्यांना कायद्याइतकें महत्त्व नसल्यामुळें बंधनकारक नाहींत म्हणून बाजूला सारतात. नागरिकहक्कव्यवस्था चांगली राहावी, या दृष्टीनें लेखनिष्ठ घटना असणेंच चांगलें.

लोकमत प्रभावी राहील, लोक आपली राज्यकर्ते निवडण्याची सत्ता व अधिकार जागृत ठेवतील तर नागरिकहक्कांचें संरक्षण होईल, संगोपन होईल, हें वर सांगितलें खरें; पण लोकांमध्यें जागृति, अखंड सावधानता, केवळ त्यांना घटनेंत सत्ता दिल्यानें अगर तद्विषयक व्यवस्था केल्यानें येत नाहीं. ही व्यवस्था तर हवीच, पण सावधानता, श्रेष्ठ धारिष्टय हें स्वभावांत उत्पन्न झालें पाहिजे. लांब बाह्यांचा अंगरखा केल्यानें घालणारा आजानुबाहु होत नाहीं अगर डबलब्रेस्ट्चा कोट वापरल्यानें दुप्पट धीटपणा अंगीं येत नाहीं. लोकांचे अंगांतच हे गुण असले पाहिजेत. अंगचे कांहीं गुण असले म्हणजे 'आगांतुक' पण तत्पोषक अशा गोष्टींचा फार उपयोग होतो. लोक निर्भीड, कर्तव्यदक्ष व धैर्यशील असले म्हणजे कायद्यांतील न्यूनसुद्धां पुरतें करून घेतात. जसे लोक तसे त्यांचे राज्यकर्ते. समाजांतील लोकस्वभावाचें प्रतिबिंब राजकर्त्यांचे स्वभावांत उमटलेलें दिसतें. तत्त्वतः समाजव्यवस्था अगर राज्यव्यवस्था कशीही असो, प्रत्यक्ष समाजांत जो व्यवहार घडतो, जे विचारप्रवाह चालू असतात, जें वर्तन घडत असतें, त्या सर्वांचा संकलित परिणाम होऊन लोकस्वभाव बनत असतो. समाजांत कर्तव्यदक्षतेला मान नसेल, उदासीनवृत्ति वावरत असेल, निर्भीड वृत्ति नसेल तर लोकस्वभावही तसाच होईल. घटनाकायद्यांत कांहीं जरी व्यवस्था असली, किंवा त्याचे अभावीं परंपरा व संकेत उज्ज्वल असले तरी लोक जर कळाहीन व कळकट असतील तर त्यांचा कांहीं उपयोग होणार नाहीं. राज्याचा आदर्श घटनेंत अगर परंपरेनें किती जरी भव्य व उत्कट ठेवला असला तरी तो प्रत्यक्ष व्यवहारांत सफल करून घ्यावयाचा तर तो लोकांना उमगला पाहिजे आणि उमगून तो सफल करण्याची आकांक्षा मनीं धरून नेटानें प्रयत्न करण्याचें वळण त्यांच्या बुद्धीला असलें पाहिजे. आणि असल्या प्रयत्नांना यश येण्यास समाजांत आर्थिक समता हवी. आर्थिक विषमतेच्या वातावरणांत, आदर्श व्यवस्था सफल करूं पाहाणाऱ्यांच्या मार्गांत विघ्नेंच येतात. तात्पर्य, समाजांतील परिस्थितीचा ठसा राज्यकारभारावर उमटतो. केवळ नागरिकहक्कव्यवस्था घटनेत आहे, राज्यव्यवस्थेंत तिला स्थान आहे अगर परंपरेनें ती आहे म्हणून ती सर्वस्वीं सुरक्षित आहे अगर संगोपिली जाईल असें नाहीं. काम मिळवण्याचा हक्क घटनेंत आहे म्हणून काम मिळेलच असें नाहीं. कांहीं हक्क मिळवून घ्यावयाचे म्हणजे समाजांत जागृत लोकमताबरोबर अनेक प्रभावी संस्था असणें जरूर असतें व या दोघांनीं राज्यसत्तेवर नेट धरून वजन आणून कार्य केलें तरच शक्य होतें. कांहीं हक्क ढोबळ स्वरूपाचे असतात. त्यांचें संरक्षण करण्याकरितां त्यांचें स्थान राज्यव्यवस्थेंत असलें म्हणजे

पुरेसें होतें. मतदानाचा हक्क, क्रांतीचा प्रसंग येईपर्यंत भाषणस्वातंत्र्याचा हक्क, यांचें संरक्षण करण्याकरतां राज्यावर समाजांतील अन्य संस्थांचें दडपण आणण्याची जरुरी नसते.

क्रांतीचाच प्रसंग आला तर सर्व हक्क कांहीं काळ गुंडाळून बाजूला सारले जातात. पण तोपर्यंत कांहीं हक्क कायद्यांत स्थान असल्यामुळें सुरक्षित असतात. चौकशीशिवाय अटक नसावी असा कायदा जेथें आहे, तेथें नागरिकांना बिनमुदत अटक होत नाहीं. कोर्टापुढें उभें करावे लागतें, कोर्टांत, सरकारला, पकडलेल्या व्यक्तीचा अपराध शाबीत करावा लागतो. कायद्यांत असलेले हक्क स्थगित करण्याकरितां विशिष्ट विधि घटनेंतून ठेवणें शक्य आहे. तशी व्यवस्था असली म्हणजे राजसत्तेला महत्त्वाचे कायदे स्थगित करणें सोपें जात नाहीं. महत्त्वाचे व मौलिक कायदे बदलण्यासंबंधीं काय व्यवस्था असते व असावी याचा विचार मागें येऊन गेला आहे. कांहीं काळपर्यंत जरी हे कायदे स्थगित करावयाचे राजसत्तेला जरूर वाटलें तरीसुध्दां ते विशिष्ट विधीनें, विशिष्ट पध्दतीनें व्हावें अशी व्यवस्था घटनेंतच असणें श्रेयस्कर आहे. विशेष बहुमत नुसतें बहुमत नव्हे—असेल तरच तहकुबी कायदा पास समजावा असेंही या व्यवस्थेचें स्वरूप ठेवतां येईल अगर कायदा जरी विधिमंडळांत पास झाला तरी पास झाल्यापासून कांहीं काळ तो अमलांत येणार नाहीं असेंही स्वरूप या व्यवस्थेचें ठेवतां येईल. असले तहकुबी कायदे पास केल्यानें अनेक प्रश्न उद्भवतात. त्यांची योग्य वासलात लावण्यासाठीं जरूर ती न्यायादानाची व्यवस्थापण घटनेंत करून ठेवणें जरूर आहे. तसेंच मौलिक गोष्टी व मौलिक हक्कांवर आक्रमण केल्यास, आक्रमकांना शासन करण्याचीही व्यवस्था घटनेंत अशी असावी कीं आक्रमण करून, माफी कायदा पास करून घेणें त्यांना सुलभ जाऊं नये. तहकुबी कायदे असाधारण परिस्थितींतच करण्याचा प्रसंग येत असल्यामुळें आमलोकमताचा कौल लावून विशेष फायदा होण्यासारखा नसतो. कार्यकारी सत्ता परिस्थितीचा, भावनांचा फायदा घेऊन लोकमताची दिशाभूल करणें शक्य असतें. जे हितसंबंध राज्यांत प्रभावी असतात व ज्यांच्या इशाऱ्यावर राज्यसत्ता वागत असते, ते सबळ असतात, व आपली साधनसामुग्री उपयोगांत आणून सरकारचे बाजूनें लोकमत मिळविण्याचे कामीं दक्ष असतात. वस्तुस्थिति सरकार लोकांपुढें मांडीत नाहीं. आपल्या प्रचारी निवेदनानें लोकमत विवेकी न राहील अशी कोशीस करीत असतें. सरकारनें योजलेल्या तहकुबी कायद्यावर वाजवी व विवेकी टीका होणें जरूर आहे. कारण महत्त्वाचा व मौलिक हक्कांचा संबंध त्यांत असतो. म्हणून योग्य टीका

करण्याला वेळ व वाव मिळेल अशी व्यवस्था घटनेंत असली पाहिजे. आमलोक-मताचा कौल असाधारण परिस्थितींत विवेकपूर्ण असण्याचा संभव कमी. निव्वळ विधिमंडळांतील बहुमतावर कायदे करण्याचा अधिकार असला तरी बहुमताचे जोरावर सत्तेचा दुरुपयोग करण्याचा अधिकार राज्यसत्तेला असणें इष्ट नाहीं, व बहुमतानें झालें म्हणून अन्याय न्याय ठरत नाहीं. सत्तेचा दुरुपयोग न होईल या दृष्टीनें जेवढीं नियंत्रणें व जेवढी व्यवस्था घटनेंतच हक्कसंरक्षणाचे दृष्टीनें करण्यासारखी असेल ती केल्यानंतर हक्कसंरक्षणाचा अखेरचा आधार म्हणजे व्यक्तीचें शील. नागरिक व्यक्तिशः कर्तव्यदक्ष, जागृत व धैर्यशील असतील व समाजांतील त्यांच्या संस्था संघटित व सामर्थ्यवान् असतील तर राज्यांतील राज्यसत्तेला त्यांच्या मौलिक हक्कव्यवस्थेंत अकारण व अन्याय्य बाध आणणें अशक्य होईल.

वरील विचारसरणींत हक्कसंगोपन व हक्कसंरक्षण यांचा विचार केवळ राजकीय दृष्टीनें झालेला आहे. त्याचबरोबर राज्य व नागरिक यांच्यांत मौलिक एकता आहे, हितैक्य आहे असें उघड मानलें आहे. राज्य व नागरिक यांच्यांत मौलिक एकता व हितैक्य असलें पाहिजे व तें असावें हा हेतु धरून राज्यव्यवस्था व प्रत्यक्ष व्यवहार होणें इष्ट आहे. तथापि वस्तुस्थितींत आधुनिक जगांतील राज्यांत अशी हितैक्यता दिसून येत नाहीं. समाजांत आर्थिक विषमता वास करीत असल्यामुळें मौलिक हितैक्य तर नाहींच उलट हितविरोधच दिसून येतो. विद्यमान न्यायदानपद्धतीनें व मिळकती-बाबत उपलब्ध असलेल्या कायद्यामुळें हा हितविरोध कमी न होतां वाढतच जातो. जोंपर्यंत समाजांत राजकीय संस्थांवर भर देण्यांत येत आहे तोंपर्यंत समाजांतील सत्ता साहजिक राजकीय संस्थांतच राहील, तेथेंच तिचें केंद्रीकरण होईल व तिचा कायदे-शीर उपयोग करण्याचा हक्क अधिकाधिक प्रमाणांत त्या संस्थांचेच हातीं येईल. तसें होत गेलें म्हणजे आणखी हितविरोध वाढेल व मौलिक एकता व हितैक्य प्रस्थापित करणें अधिक कठीण होईल. सोव्हियट रशिया वगळल्यास आधुनिक राज्य ही आजच्या स्थितींत अशी घटना आहे कीं त्यांतील सत्ता, आर्थिक विषमतेचें वातावरण समा-जांत असल्यामुळें, समतेच्या भावानें वापरली जात नाहीं. राज्य हें सर्व समाजाचें यथार्थ प्रतिनिधि हा त्याचा दावा विद्यमान जगांत त्याला अद्यापि खरा करून दाख-वितां आला नाहीं. त्याचे कायदे कमीजास्त प्रमाणांत संपन्नांचेच पाठीराखे झाले आहेत. विपन्नांकडे त्यांनीं यथार्थपणें लक्ष दिलेलें नाहीं हें सर्व खरें आहे. तथापि मौलिक एकता होईल, मौलिक हितैक्य होईल या दृष्टीनें आधुनिक राज्याचें परिवर्तन करण्यासाठीं संघनिष्ठ समाजसत्तावादी जो उपाय सुचवितात तो अचूक आहे असें

म्हणतां येणार नाहीं. समाजांत जीं मुख्य कार्ये चालतात त्यांचें कार्यपरत्वें संघटन होऊन, त्या सर्व संघटनांच्या प्रतिनिधिसमूहानें राजसत्ता, राज्याधिकार चालवावा हा त्यांचा उपाय आहे. परंतु नुसतें संघटन करणें एवढ्यानें काम भागणार नाहीं. कोणतें कार्य समाजाचे दृष्टीनें किती महत्त्वाचें, याचें मापन करणें सोपें नाहीं. अन्न अवश्य म्हणून तें उत्पन्न करणारे शेतकरी यांचें महत्त्व किती? औषधोपचार न केले तर मृत्यु म्हणून जिवंत ठेवणारे, स्वास्थ्य राखणारे वैद्य यांचें महत्त्व किती? वस्त्रें तयार करणारे मजूर यांचें महत्त्व किती? नांगरादिकांची यंत्रसामुग्री तयार करणाऱ्या मजुरांचें महत्त्व किती? कोणत्या संघटनाला किती प्रतिनिधि दिले म्हणजे विषमता येणार नाहीं हें कसें ठरवावयाचें? पुनः माणसें नुसतीं उत्पादक स्वरूपांतच विचारांत घेऊन भागणार नाहीं. तीं उपभोगी आहेत याही गोष्टीचा विचार झाला पाहिजे. मनुष्याच्या गरजा व तो उत्पादन करीत असलेल्या वस्तु यांचा हल्लींच्या युगांत संबंध नसतो म्हणून त्याचें द्विविध स्वरूप लक्षांत घ्यावें लागतें. उत्पादक सर्व नसतात, पण उपभोगी सर्व असतात. उपभोगांत हितैक्य जास्त. गरजेच्या दृष्टीनें प्रादेशिक सारखेपणाही जास्त. एका शहरांत राहाणारे सर्व नागरिक, स्वच्छता, आरोग्य, उत्कृष्ट रस्ते, उद्यानें, शाला-गृहें वगैरे बाबतींत हितैक्याच्या दृष्टीनें समभावी असतात. उलट उत्पादक या नात्यानें अनेकांचे अनेक हितसंबंध वेगळे असतात. त्यांत सारखेपणा नसतो. या दृष्टीनें विचार करतां मागें सांगितल्याप्रमाणें राज्यव्यवस्था ही कार्यपरत्वें निवडलेल्या संघटनेवर आधरा-लेली ठेवणें योग्य व फलदायी होणार नाही. ज्यांत हितसंबंधाचे दृष्टीनें जास्तींत जास्त सारखेपणा व सार्वजनिकता येणें शक्य आहे अशाच क्षेत्रांत राज्याचा पाया असला पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं, मनुष्याचे जे निरनिराळे हितसंबंध आहेत व ज्यांत सारखेपणा नाहीं ते महत्त्वाचे नाहींत अगर त्यांचा विचारही होऊं नये. योग्य ती दक्षता व संरक्षणें उपलब्ध करून समाजांतील सत्ता, निर्णयात्मक सत्ता प्रादेशिक दृष्ट्या निर्माण केलेल्या संघटनेवर आधारलेल्या राज्याचे हातीं देणें श्रेयस्कर आहे. समाजांतील सामाजिक व सार्वजनिक हितसंबंधांचें नियंत्रण व व्यवस्था असल्या स्वरू-पाच्या राज्याच्या हातीं देण्यानें राज्यकारभारांत सुलभताच येते.

मुख्य उद्देश, सत्तेचें केंद्रीकरण होतें व त्यामुळें मौलिक एकता व हितैक्य प्रस्था-पित होणें दुर्घट होतें तें टळावें हाच असेल तर प्रादेशिक राज्यावर कांहीं मर्यादा घालून तो घडवून आणतां येईल. या मर्यादांच्या स्वरूपाचा विचार यापूर्वी केलाच आहे. सत्तेचें विकेंद्रीकरण करून व पूर्वविचारयोजना आवश्यक करून, नागरिक-हक्कव्यवस्था बलवान् करून, राज्यसत्तेच्या अधिकाराला मर्यादा घालतां येतील.

राज्यांतील होणाऱ्या निर्णयांना मान्यता देण्याचें काम, नोंद करण्याचें काम, प्रादेशिक संघटनेवर निवडून आलेल्या विधिमंडळाकडेच ठेवणें इष्ट व सोयीचें आहे. या व्यवस्थेचा दुरुपयोग होतो हे खरें, पण त्यांत प्रत्यक्ष राज्यकारभाच्या दृष्टीनें व नागरिकांचे दृष्टीनें सोय आहे व सर्व राज्यकारभार समजण्यास नागरिकांना सुलभ जातें. दक्ष नागरिकवर्ग, नागरिक-हक्कांवर आक्रमण करणें राज्यसत्तेला अवघड व धोक्याचें आहे ह्याची तिला जाणीव, असें असलें म्हणजे वरील व्यवस्थेचा दुरुपयोग करणें सोपें जाणार नाहीं. योग्य शिक्षण मिळालेला नागरिक दक्ष राहून राजसत्तेस इष्ट ध्येयानुसार कार्य करण्यास भाग पाडणाराच असतो. अखेरीस सर्व आवश्यक व म्हणून नैसर्गिक मानलेल्या हक्कांचा खरा आधार, दक्ष नागरिक हाच आहे. समाजांत हितैक्यता स्थापन करण्याचे दृष्टीनें खरी चालना देणारी शक्ति म्हणजे कर्तव्यदक्ष नागरिकच होय. विकेंद्रीकरणानें राज्यकारभारांत भाग घेणारे अनेक होतात, व त्यांना इष्ट तें तें घडवून आणण्याची अधिक संधि मिळतें. प्रादेशिक दृष्ट्या राज्यव्यवस्था झाली म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य नष्ट होतें, असें नाहीं, तसेंच कार्यपरत्वें जें स्वातंत्र्य समाजांत असेल तेंही नष्ट होतें असें नाहीं. प्रादेशिक ऐक्यतेवर राज्य आधारलें आहे म्हणून अन्य गोष्टींचा विचारच करावयाचा नाहीं असें मानण्याचें कारण नाहीं. ही व्यवस्था राज्यकारभाराचे दृष्टीनें सर्वांत सोयीची ठरली आहे. कार्यपरत्वें झालेल्या संघटनेवर राज्यव्यवस्था आधारलेली असली म्हणजे तींत जबाबदारी येतेच असें नाहीं. राज्य जबाबदार करावयाचें तर त्याचें सत्ताहरण करून नाहीं, तर ती सत्ता त्यानें कशी वापरावी याचा निर्णय घेऊनच. सत्तीनें, आपल्या हातीं असलेल्या शक्तीच्या जोरावर राज्य आपला हुकूम मानण्यास लोकांना भाग पाडतें. अशी व अशा स्वरूपाची सत्ता असणें हुकुमी सत्ता असणें हें तर राज्याचें मुख्य लक्षण आहे; फणा काढतो म्हणूनच नाग, नाहीं तर मोठ्या आकाराचें गांडूळच म्हणणें योग्य होईल. ही हुकुमी सत्ता, राज्य—संघटन कोणत्याही तत्त्वावर झालेलें असो, कशी वापरली जाते यावरच, राज्य जबाबदार आहे कीं नाहीं हें ठरतें. ही सत्ता कशी वापरली जावी, यासंबंधीं मतभेद असतात, म्हणून तर पक्ष उत्पन्न होतात. समाजांतील नानाविध मतांचा समन्वय व समास घडवून आणण्याचें काम राज्याचें असतें; व त्या कार्यांत न्यायबुद्धीनें वर्तन केल्यानेंच राज्य जबाबदार स्वरूपाचें होतें. समन्वयाचें कार्य करतांना राज्याचा सर्व हितसंबंधांशीं, सर्व मतप्रणालींशीं संबंध येतो व असा संबंध जितक्या जास्त प्रमाणांत येईल व जितक्या प्रत्यक्ष रीतीनें, सुलभतेनें येईल, तितकें हें कार्य राज्य चांगल्या रीतीनें करूं शकेल. या दृष्टीनें विचार करतां प्रादेशिक ऐक्यतेवर आधारलेल्या राज्यव्यवस्थेचें महत्त्व अधिक आहे. सर्व तऱ्हेच्या

समाजांतील मतांशीं व हितांशीं या व्यवस्थेंत राज्याचा संबंध येतो. त्यांचा समन्वय करतांना त्यांतील अनेक हितसंबंधांच्या छटा राज्यांत दिसूं लागतात. कारण हे सर्व हितसंबंध समन्वयाचे क्रियेंत आलेले असतात. नानाविध धान्यांचें कडबोळें असलें तरी कांहीं धान्यांची चव त्यांत ठळकपणें लागते. कारण तीं सर्व संमिश्रणाच्या क्रियेंत आलेलीं असतात. राज्याचें समान्वयाचें कार्य यथार्थपणें होण्यासाठीं सर्व हितांशीं त्याचा संबंध असला पाहिजे व समन्वयांत न्यायबुद्धि आली म्हणजे राज्यकार्य स्वादिष्ट होतें, त्याबद्दल सर्वांना रुचि उत्पन्न होते. समाजांत कार्यपरत्वें निर्माण झालेल्या संघटनांना स्वायत्तता देऊन, प्रादेशिक राज्याचा सर्वांवर नियंत्रण ठेवण्याचा अधिकार कायम ठेवून केलेल्या व्यवस्थेंत मौलिक एकता व मौलिक हितैक्य जास्तींत जास्त प्रस्थापित होण्याचा संभव आहे. समाज हा कांहीं सर्व दृष्टींनीं एकजिनसी नाहीं, या स्थितींत नागरिकहक्कव्यवस्थेचा विचार करतांना नागरिक ही एक व्यक्ति, नागरिक हा एक संघाचा सभासद, व नागरिक हा राज्याचा एक नागरिक या तिन्ही अवस्था लक्षांत घेतल्या पाहिजेत. व्यक्ति ही सामाजिक खरी, तथापि कांहीं जीवन, कांहीं हितसंबंध इतके खाजगी असतात कीं, त्यांत इतरांचा संबंध येत नाहीं. तेथें ती अगदीं एकाकी अशी वागते. संघांत येऊन ती आपल्या व्यक्तित्वाचा आविष्कार करीत असते. या दोन्ही अवस्थेंत व्यक्तीचे हक्क स्पष्ट करणें जरूर असतें. समाजांतील एक व्यक्ति याही नात्यानें, समाजहिताच्या दृष्टीनें हक्क स्पष्ट करणें जरूर असतें. व्यक्तीला मनास येईल त्याप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य देणें अनिष्ट; तसेंच समाजांतील संघ व संस्था यांनाही वाटेल तसें वागण्याचा हक्क अगर स्वातंत्र्य देणें अनिष्ट आहे. तसें झालें तर समाजांत सुरक्षितता राहाणार नाहीं. मनगटाचे जोरावर सर्व गोष्टींचा निकाल लागेल हें अनिष्ट म्हणून समाजांत कांहीं तरी संकेत कांहीं तरी नियम, सर्वांनीं पाळले पाहिजेत, व त्यांना अनुसरून सर्वांनीं वागलें पाहिजे. हे सर्वसाधारण व सार्वजनिक नियम सर्वांनीं पाळावे, हें पाहाण्याचें कार्य, त्याचप्रमाणें त्या नियमांचा अर्थ करण्याचें कार्य करण्यासाठीं समाजाचें असें एक संघटन, अशी एक व्यवस्था आवश्यक आहे व ही व्यवस्था उभारतांना, हें संघटन तयार करतांना समाजांतील व्यक्ति व अन्य संघ यांचें इष्ट तें स्वातंत्र्य राहील, समाजांत इष्ट ती समता राहील, इतकी व्यवस्था खुद्द त्या घटनेंतच केली पाहिजे. संघटनेच्या शरिराचा तो एक भागच असला पाहिजे. समाजांतील व्यक्ति व गट, सर्व अगदीं तुल्यबल नसतात. अधिक बलवान् व्यक्ति व अधिक बलवान् गट, आपल्या बलाचे जोरावर राज्यकारभारास आपल्या हिताच्या दृष्टीनें वळण लावतात. हें टाळावें व समाजांतील

साधनसामुग्री राज्यसत्तेनें जास्तींत जास्त लोकांना उपयोगीं पडेल या दृष्टीनें वापरावी व अशाच रीतीनें राज्यकारभार हांकावा, यासाठीं नागरिकहक्कव्यवस्था ही राज्यव्यवस्थेचा राज्यसंघटनेचा एक भागच असला पाहिजे. हातपाय अस्थिचर्म राहून पोट नौबत होणें हें आरोग्याचें लक्षण नाहीं. पोट व इतर अवयव, या इसापच्या गोष्टीचें तात्पर्य राज्यशास्त्राचे दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. राज्याची मौलिक एकता अगदीं समर्पक रीतीनें त्यांत दाखविलेली आहे.

## : स्वातंत्र्य व समता :

मागील प्रकरणांत नागरिकधर्म व नागरिकहक्क यांचा विचार केला. व्यक्तीला तिच्या विकासासाठीं, आत्मोन्नतीसाठीं कांहीं गोष्टींची जरुरी असते. त्या दृष्टीनें विचार करतांना आलेला अनुभव लक्षांत घेऊन कांहीं अधिकार, कांहीं हक्क, नागरिकांना आवश्यक आहेत व ते असतील तरच त्यांचें जीवन त्यांच्या दृष्टीनें पूर्ण होणें, विकसित होणें शक्य आहे हेंही लक्षांत आलें. समाजांत याप्रमाणें नागरिकांना हक्क असतील, विकसनाला व उन्नतीला वाव असेल तर एक विशिष्ट वातावरण समाजांत निर्माण होतें. या वातावरणांत नागरिकांना मोकळें वाटतें. प्रयत्नांना प्रसन्नता येते. आकांक्षांना अशक्यता भेवडावीत नाहीं. प्रवृत्तींना सफलता स्वागत करीत आहे असें वाटतें. हें वातावरण कायम राहाणें म्हणजे स्वातंत्र्याचें वातावरण कायम राहाण्यासारखें आहे. नागरिकहक्कव्यवस्था समाजांत आहे म्हणून हें वातावरण उत्पन्न होत असल्यामुळें स्वातंत्र्य हें नागरिकहक्कांचें फल आहे असें म्हटलें तर गैर नाहीं. नागरिकहक्कांवर आधारलेल्या राज्यांत स्वातंत्र्य हें राज्यव्यवस्थेंतच नागरिकांना मिळतें. एवंगुणविशिष्ट राज्यांत नागरिकांच्या व्यक्तित्वाला वाव राहील, मोकळेपणा वाटेल. त्यांना आपल्या प्रवृत्त्यनुसार वागत असतांना मिळालेल्या अनुभवाचा फायदा समाजाला देतां येईल. आपलें म्हणणें, आपला अभिप्राय मांडून समाजाचें धोरण सुयोग्य ठेवण्यास मदत करतां येईल. राज्यकारभारांतील कामकाज न्याहाळतां येईल. राज्यसत्ता जीं धोरणें स्वीकारील त्यांचीं कारणें व तत्संबंधींची सर्व प्रस्तुत माहिती नागरिकांपुढें येईल. आपल्याला न कळत गफलत करून राज्यकारभार चालणार नाहीं अशी ग्वाही नागरिकांना असल्यामुळें सुरक्षितता वाटेल. विधायक कर्तृत्व दाबलें जाणार नाहीं. ज्याला त्याला आपल्यांत कांहीं विशेष करामत करण्याची शक्ति आहे असें वाटत असेल त्याला अकारण प्रतिबंध नसल्यामुळें पराक्रम करून दाखविण्याला संधि मिळेल. या सर्व गोष्टी होऊं देणें म्हणजेच स्वातंत्र्य देणें आहे, त्याचा उपभोग घेऊं देणें आहे; स्वातंत्र्य असलेल्या राज्यांत कारभार व कायदा नागरिकांच्या सोयींचा,

व्यक्तिमत्वाचा विचार करूनच काम करतात. नागरिकहक्कव्यवस्थेवर राज्य आधार-लेलें असलें म्हणजे कारभार व कायदा नागरिकआकांक्षांच्या अनुरोधानें चालतात व स्वातंत्र्य असल्यामुळें आकांक्षांना आशापूर्ण वातावरण उपलब्ध होतें. स्वातंत्र्य म्हणजे मोकळें व कर्तृत्वोत्तेजक वातावरण. पण स्वातंत्र्य म्हणजे बंधनांचा अभाव, हें त्याचें स्वरूपही महत्त्वाचें आहे. समाज हा भाव निर्माण झाला म्हणजे मर्यादा व नियमन हीं आलींच. सर्व माणसें संपूर्णपणें वेगळीं अशीं वागूं शकत नाहींत. दोन माणसें एके ठिकाणीं आलीं कीं मर्यादा उत्पन्न होते, कांहीं समाइक असें उत्पन्न होतें. अनेक एका ठिकाणीं आले म्हणजे हें समाइकाचें क्षेत्र वाढतें. अनेक गोष्टी सर्वांना साधारण व समान होतात. माणसांची प्रवृत्ति जमावानें राहाण्याची आहे व याचा परिणाम म्हणजे जमावाच्या आयुष्यांत, समाजाच्या व्यवहारांत नियमनाची जरुरी अपरिहार्य होते. कारण ज्या गोष्टी समाइक आहेत, ज्यांत सर्वांचे असे कांहीं हित-संबंध आहेत त्यांचें नियमन करणें अवश्य होतें. नियमनाशिवाय जमाव अगर समाज असणें अशक्य आहे. सर्वांच्या वागणुकीसाठीं कांहीं नियम व कांहीं व्यवस्था असणें हें अपरिहार्य व इष्ट आहे हें खरें, तथापि या नियमांचें, या व्यवस्थेचें यथार्थत्व व्यक्तींना समजलें पाहिजे व त्यांना तें सामान्यतः मान्य होईल असेंच असलें पाहिजे. नियमन व व्यवस्था म्हणजे बंधन हें खरें. तथापि कांहीं बंधनांनीं व्यक्तिशः आपलें स्वातंत्र्य मर्यादित झालें अगर त्यावर आक्रमण झालें असें वाटत नाहीं. कारण सद्-रहू बंधनांतील सामाजिक यथार्थता त्यांना पटलेली असते. कायद्यांत एका माणसानें दुसऱ्यास मारूं नये, त्याचा खून करूं नये, त्याची बेअब्रू करूं नये हीं बंधनें आहेत म्हणून कुणाला आपलें स्वातंत्र्य मर्यादित झालें व आपला विकास थांबला असें वाटत नाहीं. रात्रीं दिव्याशिवाय पायगाडी हांकूं नये या बंधनानें कोणा कवीची प्रतिभा थंडावत नाहीं. मुलांना सक्तीनें शिक्षण दिलें पाहिजे या बंधनानें आईबापांना आपलें मुलांवरील वात्सल्य कोणीं हिरावून नेलें असें वाटत नाहीं. प्राप्तीवर कर देण्याचें बंधन घातलें म्हणून आपली लायकी, आपले गुण कमी झाले असें कोणाला वाटत नाहीं. समाजाच्या दृष्टीनें योग्य जीवनासाठीं काय बंधनें असावींत हें अनुभवानें उपलब्ध झालें आहे. असल्या बंधनांचा स्वीकार समजानें व्यवस्थेसाठीं केला तर त्यांत गैर नाहीं. स्वातंत्र्यावरही मर्यादा आहे, पण तिचें सामाजिक यथार्थत्व अनुभवानें सिद्ध झालें असल्यामुळें ती समर्थनीय व इष्ट ठरते. या मर्यादेमुळें स्वातंत्र्यानें जें मिळवाव-याचें, जें साधावयाचें त्याचा नाश होतो असें मात्र नाहीं. साध्य सफल करून घेण्या-साठीं अवश्य तें वातावरण कायम राहाण्याकडेच या गोष्टींचा परिणाम होतो.

कांहीं बंधनें इष्ट व समर्थनीय असतात म्हणून राज्यसत्तेनें आज्ञापिलेलें प्रत्येक बंधन अगर आंखलेली प्रत्येक मर्यादा तशी असते असें मात्र नाहीं. प्रत्येक बंधन घालतांना राज्यसत्ता सार्वजनिक हिताचीच सबब सांगत असते. विशिष्ट जातीच्याच किंवा विशिष्ट धर्माच्याच लोकांना विशिष्ट खात्यांत नोकऱ्या देण्यांत राज्यसत्ता जरी सार्वजनिक हिताचीच बाब सांगत असली तरी वस्तुतः ही गोष्ट स्वातंत्र्याला विरोधक आहे. समाजांत प्रत्येक व्यक्तीला कर्तृत्वानें अधिकार व सन्मान मिळण्याला कायदेशीर प्रतिबंध असतां कामा नये. तसा ठेवणें म्हणजे त्याच्या स्वातंत्र्याला अयोग्य मर्यादा घालणें आहे. फक्त मिळकतीचे मालकांनाच मतदानाचा हक्क ठेवणें म्हणजे सार्वजनिक हित साधलें जातें असें कोणीही म्हणणार नाहीं. उलट प्रत्येक नागरिकाला जो मतदानहक्क असावा तोच हिरावून घेणें, तो त्यास न देणें म्हणजे त्याच्या स्वातंत्र्यावर आक्रमणच आहे. सार्वजनिक हितार्थ सभाबंदी करणें अगर संघस्थापना बेकायदेशीर ठरविणें याचा अर्थ व्यक्तींना संघशः कार्य करण्याचे, आपला विकास करण्याचे स्वातंत्र्यापासून वंचित करण्यासारखेंच आहे. त्यांचीं नागरिकांचीं कर्तव्ये पार पाडण्यास त्यांना संधि न देण्यासारखें आहे. सार्वजनिक हिताचा उच्चार केल्यानें घातलेलीं बंधनें समर्थनीय ठरत नाहींत. पूजा करून अगर भिसमिल्ला म्हणून जनावराची हत्या केल्यानें त्यांतील हिंसा कमी होत नाहीं. ज्यांच्यावर बंधनें परिणाम करणार आहेत, ज्यांना मर्यादा जाचणार आहेत, त्यांच्या सल्ल्याशिवाय, त्यांच्या समतीशिवाय, राज्यसत्तेनें घातलेलीं बंधनें हीं स्वातंत्र्यावर आक्रमकच ठरतात. सल्लामसलतीनंतर, अभिप्रायांचा विचारविनिमय झाल्यानतर घातलेल्या बंधनांतील कडवटपणा थोडासा कमी होतो. नागरिकांना आवश्यकता जरी पटली नाहीं, तरी आपला विचार घेतला गेला होता हें एक समाधान वाटत असतें व तें राज्यसत्तेच्या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. अजिबात नागरिकांना न विचारतां, त्यांचें म्हणणें मांडण्याला वाव न देतां, टीकेला अवकाश न देतां, राज्यसत्तेनें बंधनें घालणें अगर हुकूम फर्माविणें यांत नागरिकांच्या स्वातंत्र्यावर आक्रमण होतें एवढेंच नव्हे तर त्यांना आपण गुलाम आहोंत, आपलें सर्वच स्वातंत्र्य अर्थहीन आहे, याची जाणीव करून देण्यासारखें होतें. स्वातंत्र्य म्हणजे राज्यसत्तेचे जे हुकूम जाचक नाहींत, अगर स्वातंत्र्यावर आक्रमण करणारे नाहींत ते पाळणें, त्यांना मान्यता देणें एवढेंच नव्हे. नागरिकाला राज्यसत्तेनें एखादे धोरण योग्य अगर अवश्य ठरविलें येवढ्यानें त्यानें तें तसें मानलें पाहिजे असें नाहीं. धोरणाचा परिणाम त्याच्यावर होत असल्यामुळें त्या बाबींतील त्याचा अभिप्राय, त्याचा अनुभव, हाच त्याच्या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. एकच

पदार्थ कोणाला अति तिखट वाटेल, कोणाला बेताचा वाटेल, कोणाला मिळमिळीत वाटेल. ज्याची त्याची रुचि व अनुभव ही वैयक्तिक बाब आहे. राज्यसत्तेच्या धोरण ठरविण्याच्या क्रियेंत आपला अभिप्राय, आपुला अनुभव ग्रथित झाला आहे अशी जाणीव नागरिकाला झाली म्हणजे तें धोरण स्वीकारणें, त्याला मान्यता देणें, यांत आत्मगौरवाचा भाव उत्पन्न होतो. स्वतःला योग्य वाटलें, पटलें, म्हणून तें मानलें यांत नागरिकाचें व्यक्तित्व राहून राज्याची प्रतिष्ठा वाढते. समाजांत राहावयाचें म्हणजे कांहीं बंधनें पाळावीं लागतात, हें प्रत्येकाला कळतें व मान्यही असतें. रस्त्याच्या डाव्या बाजूनें गाडी हांकली पाहिजे, जन्माची नोंद केली पाहिजे, मुलांना शाळेंत घातलें पाहिजे हीं व असलीं बंधनें त्रासदायक वाटलीं तरी नागरिकाला, त्यांच्या इच्छेविरुद्ध कांहीं तरी ओंगळ गोष्ट जबरदस्तीनें करण्यास राज्यसत्ता भाग पाडीत आहे, असें वाटत नाहीं. असली कोणतीही गोष्ट अगर बंधन अशा स्वरूपाचें नसतें कीं, त्याचे मनाला कष्ट व्हावेत व त्याचें मनस्वास्थ्य बिघडावें; यामुळेंच ते बंधन त्यांस अनिष्ट व असह्य वाटत नाहीं. मनुष्याला जें योग्य वाटतें, जें करावेंसें वाटतें, त्यांतच जर राज्यसत्तेच्या बंधनानें प्रतिबंध आला, अडथळा उत्पन्न झाला, तर साह-जिक त्याच्या मनांत क्षोभ उत्पन्न होतो, घडी बिघडली असें वाटतें व सरकारी कृत्य त्याच्या दृष्टीनें त्याच्या स्वातंत्र्यावर आक्रमणच वाटतें, आपल्या प्रगतीच्या मार्गात, विकासाच्या मार्गात हीं बंधनें विफलता उत्पन्न करणारीं म्हणून तीं अनिष्ट व असह्य वाटतात. प्रत्येक व्यक्तीला कांहीं तरी करावेंसें वाटतें, कांही तरी कर्तृत्व दाखवावेंसें वाटतें व त्या दृष्टीनें प्रत्येकजण आपल्या आयुष्यांत संधि असावी अशी अपेक्षा करीत असतो. व्यक्तीमधील ही चालनाबुद्धि, ही कर्तृत्वाची आकांक्षा, समाजामध्यें प्रभावी राहाणें अत्यंत जरूर असतें. त्यांना दडपून टाकणारीं, त्यांना खची करणारीं बंधनें अगर मर्यादा निर्माण करणें म्हणजे स्वातंत्र्य नष्ट करण्यासारखें आहे. ज्यांची मनें सुन्न झालीं आहेत, विचारविन्मुख झालीं आहेत ते नागरिकधर्म यथार्थपणें आचरण करूं शकत नाहीत. नागरिकांनीं आपलीं मनें जागृत ठेवलीं पाहिजेत, आपली बुद्धि सजीव ठेवली पाहिजे. नागरिकांत विचार करण्याची संवय उत्पन्न केली पाहिजे, म्हणजेच समाजांत अखंड चालना राहील. सारासार विचार करून वाग-ण्याची आवश्यकता समाजाला सतत वाटली पाहिजे. आपल्या मताप्रमाणें व सद्-सद्विवेकबुद्धीप्रमाणें वागणारीं माणसें समाजांत असतील व समाजालाच तसें वळण असेल तरच नागरिकधर्म चांगल्या रीतीनें आचरिला जाईल. सर्वसामान्य नागरि-कांनीं सारासार विचार करून स्वबुद्धीनें वागावें व तसें वागण्यास त्यांना समाजांत उत्तेजन मिळावें यांतच खरें स्वातंत्र्य आहे.

स्वातंत्र्यासाठीं राज्याचें कार्यक्षेत्र मर्यादित करण्याचें कारण नाहीं किंवा त्या मर्यादा कायम निश्चित करण्याचें सुद्धां कारण नाहीं. नागरिकांच्या अभिप्रायानें राज्य-कारभाराचें धोरण निश्चित झालें पाहिजे असें म्हटल्यानंतर, परिस्थितीप्रमाणें राज्याचें कार्यक्षेत्र ठरलें जाईल हें उघड आहे. व्यक्ति ही सामाजिक आहे म्हणून तिचें वर्त-नही सामाजिक परिणाम घडविणारें असतें. या दृष्टीनें सामाजिक वर्तन म्हणून त्यावर नियमन करण्याचा अधिकार राज्याला येतो. तथापि निव्वळ अनुत्साही, आज्ञापालक असा नागरिक न राहातां त्यानें दक्ष व कार्यनिष्ठ नागरिक व्हावें यासाठीं कांहीं बाब-तींत नियमन न ठेवणें जरूर आहे, कांहीं स्वातंत्र्य देणें आवश्यक आहे व हें स्वातंत्र्य अखंड सावधानता असेल तरच टिकतें. समाजांत स्वातंत्र्य यांत विरोधाभास आहे. समाज म्हणजे नियंत्रण, व्यवस्था, पण या बंधनांतच मोक्ष असतो. अंगावर चिल-खत घातलें म्हणजे ओझें वाटतें, पण त्यानेंच संरक्षण होतें. ढालीसाठीं एक हात गुंतवावा तेव्हां दुसऱ्या हातानें कर्तृत्वाची तलवार चालवितां येते. स्वातंत्र्याचीं बंधनें दुसऱ्याच्या स्वातंत्र्यासाठींच असतात. माझ्या स्वातंत्र्याचा उपयोग दुसऱ्याचें स्वातंत्र्य नष्ट करण्यांत होतां कामा नये हें बंधन माझें स्वातंत्र्य मला लाभावें, याचसाठीं आहे. माझ्या स्वातंत्र्याचा उपयोग वरील बंधन पाळून मी माझ्या विकासाचा मार्ग चोखाळण्यासाठीं करण्यास मोकळा आहे. माझा वर्तनक्रम ठरविण्यास मला पूर्ण स्वातंत्र्य आहे. मला माझ्यांत जें कांहीं श्रेष्ठ आहे, जें उत्कृष्ट आहे त्याचें विकसन करून जीवन सफल करण्याइतकें हें स्वातंत्र्य व्यापक व अर्थपूर्ण असलें पाहिजे. इतकें व एवंगुण-विशिष्ट स्वातंत्र्य समाजांत असावें. असें असून त्याचा सदुपयोग सर्वच नागरिक कर-तील असें नाहीं. अगदीं घराला लागून देऊळ झालें म्हणजे भक्ति उत्पन्न होते अगर देवळांत भक्त जातात असें नाहीं. वस्तींत देऊळ असल्यानें नास्तिकपणा देवळाभावीं आला असें मात्र म्हणतां येणार नाहीं. संधीच्या अभावीं, योग्य स्वातंत्र्याच्या अभावीं जीवन विफल झालें, असें म्हणण्याचा प्रसंग समाजांत येऊं नये. स्वातंत्र्य म्हणजे मनुष्याला त्याचे गुणविकासाला, व्यक्तिमत्वाच्या आविष्काराला वाव देण्यासाठीं अवश्य त्या संधींचा समूह असें म्हटलें तरी चालेल, व मनुष्याच्या दृष्टीनें हें निश्चितपणें होण्यासाठीं स्वातंत्र्याभोंवतीं मौलिक हक्कांचा जागता पाहारा असणें आवश्यक आहे. हक्कव्यवस्था नसेल तर स्वातंत्र्य व्यर्थ आहे. मनुष्यानें आपला अनुभव व अभिप्राय सांगावा, व त्यावर राज्यसत्तेनें खटला करून त्याला शासन करावें, असें झालें म्हणजे लोक कांहीं बोलूनच दाखविणार नाहींत. भीतीचें वातावरण समाजांत पसरेल. नाग-रिकांना नागरिकधर्म आचारतां येणार नाहीं, किंबहुना त्यांच्यांत व राज्यांत असलेला

मौलिक ऐक्यतेचा भावच नष्ट होईल. मी त्यांत आहें, माझें त्यांत ऐकलें जातें म्हणून तें माझें ही जी खऱ्या नागरिकाची वृत्ति, तीच शिल्लक राहात नाहीं. निष्ठेचे भावबंध तुटतात. राज्य नागरिकांचे दृष्टीनें अर्थहीनच होतें असें नव्हे तर अनर्थपूर्ण होतें. नागरिकांना बोलणें बंद केलें म्हणजे त्यांच्या इच्छा व आकांक्षा या राज्यसत्तेपासून दुरावतात. त्यांच्या इच्छेकडे लक्ष द्यावें अगर त्यांना कांहीं बुद्धि आहे असें राज्य-सत्तेला पुढें पुढें वाटेनासें होतें. म्हणून स्वातंत्र्याभोंवतीं जागत्या हक्कांचा पाहारा पाहिजे. राज्यसत्तेला नागरिकहक्कांवर गदा आणल्यास निषेधासच तोंड द्यावें लागेल, एवढेंच नव्हे तर प्रभावी विरोधाची चपराक बसेल याची भीति वाटली पाहिजे. स्वातंत्र्य म्हणजे प्रसंग पडल्यास संघटितपणें राज्यसत्तेला विरोध करण्याची समाजांतील शक्तीच होय, व या शक्तीची जाणीव समाजांत जागृत असली पाहिजे. अधिकाराचा दुरुप-योग केल्याबरोबर अधिकारच्युति होणार ही भीति असली म्हणजेच अधिकाराचा दुरुपयोग सहसा होत नाहीं.

स्वातंत्र्य म्हणजे व्यक्तीला जें ध्येय वाटतें तें साध्य करण्याची संधि, त्याला पोषक असें वातावरण व हें सर्व राजसत्तेनें उपलब्ध करून दिलें पाहिजे. राज्यांत अशी परिस्थिति असेल तर स्वातंत्र्य वावरेल व संघटित होऊं शकेल. व्यक्तीला तिचें ध्येय साधण्यासाठीं अवश्य ती व्यवस्था संस्थाविषयक अगर अन्य रीतीने करतां येईल. स्वातंत्र्य असून, प्रयत्नांना वाव असून, सफलतेची संधि असूनही त्यांचा फायदा लोक घेतीलच असें नाहीं. ध्येयसाधनाला, सफलतेला जे प्रतिबंध असतील ते दूर करणें एवढें फक्त राज्यव्यवस्था करूं शकेल. सगोत्र विवाह निषिद्ध म्हणून, आंतरजातीय विवाह निषिद्ध म्हणून कोणाचा प्रेमभंग होऊं नये व जीवन विफल वाटूं नये म्हणून राज्य ते निषेध रद्द करील. इतकें करून त्याला प्रेम मिळालें नाहीं तर राज्यावर जबाबदारी नाहीं. लग्न म्हणजे जन्मठेपेची शिक्षा, व त्यामुळें नको वाटणाऱ्यांशीं संसार करून निराशेत राहावें लागतें, म्हणून योग्य कारणासाठीं घटस्फोट मिळण्याची व्यवस्था राज्य करील. पण इतकें करून व्यक्तीला सुख मिळेल याची ग्वाही राज्य देऊं शकणार नाहीं. राज्य जास्तींत जास्त म्हणजे आदर्श व्यवस्थेनें सुखाचीं व विका-साचीं साधनें उपलब्ध करून देईल. पण प्रत्यक्ष सुख व विकासबुद्धि ही ज्याची त्याची वैयक्तिक गोष्ट असल्यानें साधनांचा उपयोग त्याचा त्यानेंच केला पाहिजे. वैद्य आरामासाठीं औषध देईल पण तें रोग्यानें घेतलें पाहिजे, तें घ्यावें हें त्याला वाटलें पाहिजे, आपण बरें व्हावें हा भाव त्याचेच मनांत आला म्हणजेच तो औषध घेईल. वैद्यानें औषध घेऊन रोगी कसा बरा होणार? सुख व विकासाचा आनंद, उन्नतीची

प्रसन्नता ही व्यक्तिगत मनाची बाब आहे. त्यांत समाजाला अगर राज्यव्यवस्थेला प्रवेश नाहीं. समाज अगर राज्य ज्या योगें सुख दुरावेल अगर विकास अशक्य होईल अशी परिस्थिति, असे प्रतिबंध नाहींसे करील. इतकेच नव्हे तर अनुकूल अशीं साधनें व वातावरण उपलब्ध करून देईल. पण येथें त्याची मर्यादा संपते. तथापि वाईटच करावयाचें राज्यानें मनांत आणलें तर तशी परिस्थिति व प्रतिबंध तें निर्माण करू शकेल व करतेंही. मिळकत असेल तरच मतदानाचा हक्क ठेवून अनेकांना त्यापासून वंचित करील. संपत्तीचीं साधनें खाजगी व्यक्तींचे हातीं ठेवून, त्यांना पूर्ण वाव ठेवून, बहुसंख्यांकांना त्यांच्या आर्थिक गुलामगिरींत दाखल करील. शिक्षणाची सोय फक्त श्रीमंतांनाच सोयीची पडेल इतकी महाग करून बहुसंख्यांकांना अज्ञानांत ठेवून त्यांच्या उन्नतीचा मार्ग बंद करील. पोटापुरतें मिळविण्यांतच सर्व शक्ति व वेळ खर्च करावा लागेल, अशी व्यवस्था बिनतक्रार चालवून देऊन विश्रांति व उत्साह यांचे अभावीं अनेकांच्या आयुष्यांत खिन्नता व निराशा यांचेंच पीक उगवेल याची काळजी घेईल. तात्पर्य राज्य, सुख व समाधान मिळण्याची, विकास व उन्नति करण्याचीं सर्व साधनें व अनुकूल अशी परिस्थिति, प्रतिबंध उत्पन्न करून अगर उदासीन राहून समाजांत उपलब्धच होऊं देणार नाही. सर्व साधनें व संपूर्ण वातावरण अनुकूल असें असेल तर स्वातंत्र्य नांदूं शकेल. स्वातंत्र्य हा एक मानसिक भाव आहे, तो संपूर्ण असेल तरच प्रभावी असतो. नुसती शिक्षणाची सोय झाली, पण बेकारी असली तर कांहीं तरी स्वातंत्र्य आहे असें म्हणणें अयथार्थ आहे. जें जें ध्येयसाधनाला, सुखाला, विकासाला अवश्य त्या सर्वांचीं साधनें व अनुकूल परिस्थिति असेल तरच स्वातंत्र्य हें यथार्थ आहे, त्यांत साफल्याची रुचि आहे. राज्य काय करूं शकेल याचें वर्णन वर केलें आहे. अर्थात् जें समाजांत प्रत्यक्ष होतें तें राज्यसत्ता अगर सरकार करीत असतें हें उघड आहे. राज्यसत्तेचें कार्य नियमनानें व नियंत्रणानें होत असतें व त्यायोगें स्वातंत्र्यावर आक्रमण होत असतें. नियम तयार करणारे, नियंत्रण घालणारे जे सज्जन तेच वास्तविक सरकार असतात. राज्यसत्तेच्या मुखवट्यामागे त्यांचा आवाज असतो. त्यांची बुद्धि काम करीत असते. राज्य व सरकार किंवा राज्यसत्ता यांत तात्त्विक दृष्टीनें फरक आहे. त्यांत दोन भिन्न कल्पना आहेत. तथापि वस्तुस्थितींत, प्रत्यक्ष व्यवहारांत जे कारभार चालवतात त्या व्यक्तींच्या कृत्यांनीं कार्याचे स्वरूप ठरलें जातें. त्यांच्या वृत्तींचा रंग कार्यांत उमटतो. आकाशांतून पडणारं निर्मळ पाणी ज्या नदीच्या पात्रांतून वाहात जाईल त्याप्रमाणें त्याचा रंग व रुचि बदलत जाईल हें स्पष्ट आहे. राज्याचें ध्येय उत्कृष्ट असेल, तथापि राज्यसत्ता जे प्रत्यक्ष चालवितात, त्यांच्या

वागणुकीनें, त्यांच्या कृत्यांनच त्या ध्येयाचा अनुभव मिळत जातो व अनुभवानें जी चव लागेल तीच खरी. बदामाचे व शेंगदाण्याचे तुकडे सारखे दिसतात, पण खाल्ल्याबरोबर फरक कळत असतो. हक्क आहेत असें म्हणून भागत नाहीं. प्रत्यक्ष अनुभवांत काय मिळतें तें खरें. राज्यसत्ता प्रत्यक्ष ज्यांच्या हातांत आहे ते कसे वागतात हेंच खरें महत्त्वाचें आहे. राज्यांतील अखेरची सत्ता अगर प्रभुत्व जनतेचें आहे, एवढें तात्त्विकदृष्ट्या लोकशाहींत खरें असलें, तरी प्रत्यक्ष सत्ता जनता वापरीत नाहीं. राज्यांतील अंमलबजावणीशीं जनतेचा संबंध नसतो. प्रत्यक्ष कार्य कसें करावें हें लोकमत सांगत नाहीं, किंबहुना लोकमताचें तें कार्यही नाहीं. आधुनिक राज्यकारभार इतका विविधस्वरूपी व गुंतागुंतीचा आहे कीं, त्याचें तपशीलवार ज्ञान हें लोकमताच्या आवांक्याबाहेरचें आहे. उपस्थित प्रश्नांची छाननी, त्यांची मांडणी, हे कार्य प्रत्यक्ष राज्यकारभार करणाऱ्यांचें आहे. उपस्थित प्रश्नांचा विचार लोकमत करतें याचा अर्थ, ते सोडविण्याचे जे मार्ग त्यांचेपुढे मांडण्यांत येतात त्यांपैकीं जो लोकांना सारासारविचार करून ठोकळ मानानें योग्य वाटतो, त्याची निवड करणें, व तो मार्ग मांडणाऱ्यांची सर्वसामान्यपणें लायकी पाहून निवड करणें एवढाच आहे, प्रत्यक्ष कारभार करणें नव्हे. तो करण्यास मुखत्यार निवडणें येवढेंच कार्य लोकमत करतें. लोकमतापुढें प्रश्न येणें याचा अर्थ राज्यकारभारांत मुरलेल्यांनाही जे प्रश्न सोडवितां येत नाहींत ते लोकमताला सोडविण्यास सांगणें असा नव्हे, तर मतभेद उत्पन्न झाला आहे, जें व्हावेंसें वाटतें तें करण्यास अधिकारावर आहेत ते करूं शकत नाहींत म्हणून जे करूं शकतील असें जनतेला वाटतें व असा जे दावा करतात त्यांना अधिकार देऊन करून घेणें हा आहे. पेशवाईचीं वस्त्रें एकाचीं काढून दुसऱ्यास देणें आहे व तेवढेंच कार्य हा जनतारूपी छत्रपति करीत असतो. अपात्रीं हें वस्त्रदान होऊं नये येवढाच विचार तो करीत असतो. लोकमताचें प्रदर्शन, लोकमताचा परिणाम म्हणजे प्रत्यक्ष सत्तेचा वापर नव्हे. प्रत्यक्ष सत्ता, जे राज्यकारभार चालवितात तेच वापरीत असतात. आधुनिक राज्यांत प्रत्यक्ष राज्यकारभार हेंच महत्त्वाचें केंद्र आहे. राज्यकारभारामागील तत्त्वज्ञान महत्त्वाचें खरें पण प्रत्यक्ष राज्यकारभारांत जे होतें त्यानें त्याचें स्वरूप ठरतें हें अधिक महत्त्वाचें आहे. म्हणून राज्यकारभार चालविणारें सरकार हेंच शेवटीं जनतेच्या सुखदुःखांचें खरें कारण आहे.

अखेरीस राज्यकारभार चालविणारी राज्यसत्ता ही जनतेच्या सुखदुःखांचीं खरें कारण असल्यामुळें ,जोंपर्यंत ती बेजबाबदार आहे, तिला कोणी विचारणारें नाहींत तोंपर्यंत स्वातंत्र्य हें अर्थहीन आहे म्हणून राज्यसत्ता ही जबाबदार स्वरूपाची असली

पाहिजे. हक्कांवर अतिक्रमण केल्याबरोबर तिला जाब देणें भाग पडलें पाहिजे. राज्य-व्यवस्थेंत, घटनेंतच अशी व्यवस्था असेल तर ठीक, नाहीं तर राज्यसत्ता चालविणारे जे आहेत त्यांच्या हिताचाच विचार राज्यकारभारांत होईल. सार्वजनिक हित, सर्व समाजाचें हित डोळ्यांपुढें ठेवून राज्यसत्ता नेहमीं वागते असा अनुभव नाहीं. प्रत्यक्ष राज्यकारभार चालविणाराचें हित म्हणजे सार्वजनिक हित, सर्व समाजाचें हित असा हिशोब मांडला जातो. स्वातंत्र्य म्हणजे नुसतें व्यक्तिगत स्वातंत्र्य नव्हे, त्यांत राजकीय व आर्थिक स्वातंत्र्याचाही समावेश होतो. म्हणून संपूर्ण स्वरूपी स्वातंत्र्याचे दृष्टीनें राज्यकारभारांत विषमवृत्ति राहाणार नाहीं अशी दक्षता घेतली पाहिजे. व्यक्तिगत स्वातंत्र्यांतसुद्धां कसबी राज्यसत्ता विषमता उत्पन्न करून कांहींचा फायदा करूं शकते. धार्मिक स्वातंत्र्य सर्वांना आहे, व्यक्तीला वाटेल तो धर्म त्यानें पाळावा अशी मुभा आहे, असें नुसतें म्हणून भागत नाहीं. तर कोणत्याही धर्माच्या माणसांचा अगर संस्थांचा धार्मिक कारणासाठीं राज्यसत्तेने पुरस्कार करतां कामा नये. विशिष्ट धर्माचा म्हणून ठराविक प्रमाणांत नोकरी मिळण्याचा हक्क, अगर विशिष्ट जातीचा म्हणून त्याला व्यापक दृष्टीनें मतदानाचा हक्क देणें, यांत व्यक्तिस्वातंत्र्यावर आक्रमण आहे. अमुक जातीचा अगर अमुक धर्माचा नाहीं, म्हणून त्याला नोकरी नाहीं किंवा मत-दानहक्क नाहीं, अगर अधिक लायकीशिवाय नाहीं, याचा अर्थ त्याचे व्यक्तिस्वातंत्र्या-वर आक्रमण हाच आहे. राज्यांतील न्यायदान खर्चाचें करून गरिबांना तें अशक्य करणें म्हणजे त्यांच्या व्यक्तिस्वातंत्र्यावर आक्रमण आहे. पैशाच्या अभावीं वकील देतां येत नाहीं म्हणून किती तरी जणांना आपलें निरपराधित्व शाबीत करतां येत नाहीं. पैशाच्या जोरावर अनेक अपराधी सुटून जातात, हा अनुभव सर्वत्र आहे. न्याया-धीश वकील असो नसो, न्याय करील हें खरें मानलें तरी वस्तुस्थिति आरोपीलाच माहीत असणार व तो ती मांडूं शकत नाहीं व त्यामुळें पुरेशी माहिती व पुरावा यांचे अभावीं न्याय होणें इच्छा असून अशक्य होतें. न्यायाधिशानें आरोपीची वकिली करावयाची म्हणजे आपली निःपक्षपाती भूमिका सोडणें असा अर्थ होतो. म्हणून न्यायादानाचे कामीं सरकारनें, आरोपित गरीब असल्यास त्याला वकिलाचे सहाय्य मिळवून दिलें पाहिजे, म्हणजेच त्याचें व्यक्तिस्वातंत्र्य रक्षिलें जाईल. मोठ्या रकमेचा जामीन मागून त्याला अटकेंत राहाणें भाग पाडणें हा आणखी एक प्रकार राज्यसत्ता करीत असते. हा व्यक्तिस्वातंत्र्यावर आघात आहे. फिर्यादी सरकारच्या बाजूनें, सर्व साहित्य व सर्व सरंजाम, व गरीब आरोपी निराश्रित व गरीब या परिस्थितींत त्याला व्यक्तिस्वातंत्र्य आहे, आपला बचाव करण्यास पूर्ण संधि आहे असें म्हणणें थट्टा आहे,

स्वातंत्र्याचें विडंबन आहे. व्यक्तिस्वातंत्र्य आहे म्हणून भागत नाहीं, तें व्यक्तीला लाभलें पाहिजे, त्याला आहे असें वाटलें पाहिजे. आपल्या खाजगी संबंधांत आपण स्वतंत्र आहों असें त्यास वाटलें पाहिजे व स्वातंत्र्यसंरक्षणासाठीं असलेल्या व्यवस्थेचा फायदा घेण्याची संधि पण त्याला मिळाली पाहिजे. नुसती व्यवस्था असून उपयोग नाहीं. गोप्रदानांत भाकड गाय दिल्यानें दात्याला पुण्य लागत नाहीं व प्रतिग्रह घेणारा पुष्टही होत नाहीं. स्वातंत्र्य अनुभवाला आलें म्हणजेच तें आहे, नाहीं तर केवळ तें कागदी आहे.

राजकीय स्वातंत्र्य म्हणजे राज्याच्या कार्यांत व कारभारांत भाग घेण्याची सत्ता असणें हें होय. ॲरिस्टॉटलनें तर "जो न्यायादानांत भाग घेतो व अधिकारांत भाग घेतो तोच नागरिक" अशी नागरिकाची व्याख्या केली आहे. आधुनिक राज्याच्या राज्यकारभारांत व कार्यांत प्रत्येक नागरिकानें प्रत्यक्ष भाग घेणें अशक्य आहे. तथापि राज्यकार्याबद्दल व कारभाराबद्दल नागरिकाला विचार करण्यास व आपला अभिप्राय बोलून दाखविण्यास पूर्ण वाव असला पाहिजे. आपला अनुभव व अभिप्राय यांची भर समाजाच्या अनुभवांत व अभिप्रायांत टाकून राज्यकारभाराचें धोरण ठरविण्यास त्याला पूर्ण व अप्रतिहत संधि मिळाली पाहिजे. राज्यकारभारांतील एखाद्या पदाची योग्यता असल्यास तें मिळण्याची प्रत्येकाला पूर्ण संधि असली पाहिजे. आपलें मतप्रदर्शन करण्यास व्यक्तिशः व संघशः स्वातंत्र्य असलें पाहिजे. मतप्रदर्शन यथार्थपणें करतां यावें म्हणून, प्रत्येक नागरिकाला योग्य शिक्षण मिळालें पाहिजे. अज्ञान शेतकरी धूर्त सावकाराचा खुराक व अज्ञान मतदार कावेबाज राजकारण्यांचा बळी, असा अनुभव आहे. मतदाराला अगर नागरिकाला राज्यकारभारांतील प्रत्येक बाबींतील प्रत्येक तपशील टाऊक पाहिजे, मतदार म्हणजे चालता बोलता ज्ञानकोश झाला पाहिजे असा याचा अर्थ नाहीं. बरवाईट हें साधारणपणें सारासार विचार करून ठरविण्याइतकी त्याची बुद्धि शिक्षणानें तयार झाली पाहिजे. आजच्या शिक्षणपद्धतींत सर्वांना शिक्षण मिळत नाहीं. शिवाय कित्येक ठिकाणीं विशिष्ट वर्गांतील मुलांना विशिष्ट पद्धतीनें शिक्षण मिळण्याची सोय करून, विषमता उत्पन्न केली जाते. कारकून व कामगार तयार करावयाच्या दृष्टीनें दिलेलें शिक्षण, दक्ष नागरिक उत्पन्न करूं शकत नाहीं. उच्च शिक्षण निवडक लोकांनाच शक्य होईल एवढें खर्चाचें केल्यानें तें घेणाऱ्यांच्या मनांत आपण कांहीं विशिष्ट योग्यतेचे आहोंत असा भाव उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. या भावानुसार त्यांची मनोभूमिका बनते. त्यांची संस्कृति, त्यांच्या संवयी तशाच वळणाच्या असतात. श्रेष्ठ व कनिष्ठ हा भेद तर

समाजांत असतोच व तो जणूं कायम राहण्यासाठींच जरूर त्या मनोभूमिका विषमतापूर्ण शिक्षणपध्दतीनें निर्माण केल्या जातात. या परिस्थितींत एक वर्ग आपलें श्रेष्ठत्व, आपला अधिकार कायम ठेवण्याचे दृष्टीनें आपली सत्ता व संधि यांचा उपयोग करीत असतो. शिक्षण व संस्कृति यांमुळें राज्यकारभारांतील अधिकारपदें साहजिक या वर्गाकडे जातात. आपला स्वार्थ म्हणजे समाजाचा स्वार्थ असा दडक सांगून हा वर्ग आपलें कार्य करीत असतो. अन्याय होण्यापूर्वीच तो झाला अशी आरोळी मारून दुसऱ्या कोणाचा आवाज राज्यसत्तेच्या कानावर जाऊं नये अशी तो कोशिस करीत असतो. अशिक्षित व अज्ञानी बहुजनसमाज स्वतःला काय पाहिजे हें बोलून सुध्दां दाखवूं शकत नाहीं. हजारों शरीरें व हजारों मुखें असून हा मुका व म्हणून भुका असतो. उलट एक शरीर पण चार मुखें असलेल्या ब्रह्मदेवाप्रमाणें वरचा वर्ग असून, चारी मुखांनीं चारी दिशांना ओरडून चारी मुखांनीं तो मुख ओरपीत असतो. अनुभवानें बहुजनसमाज संघटित होतो हें खरें, पण अज्ञान अगर अपुऱ्या शिक्षणामुळें त्याचें संघटन तितकें प्रभावी होत नाहीं. खरें राजकीय स्वातंत्र्य त्याला लाभावयाचें असेल तर त्याला योग्य शिक्षण मिळालें पाहिजे. समाजांत श्रेष्ठ व कनिष्ठ वृत्ति निर्माण करणारें शिक्षण, स्वातंत्र्यप्रेमी नागरिक उत्पन्न करूं शकणार नाहीं. राज्यकारभार हा सर्वस्वीं आपल्यावर अवलंबून आहे. आपण त्यास जें स्वरूप देऊं तसा तो होईल हें ज्ञान जनतेला झाल्याशिवाय, या शक्तीची जाणीव तिला झाल्याशिवाय, तिला जें पाहिजे तें तिला राज्यसत्तेकडून करून घेतां येणार नाहीं. ज्ञान हीच खरोखर शक्ति आहे.

राजकीय स्वातंत्र्य यथार्थपणें लाभावें यासाठीं जसें शिक्षण आवश्यक, तसेंच राज्यांतील, समाजांतील व्यवहाराबद्दल यथार्थ कल्पना जनतेला येणें, मिळणें अवश्य आहे. जनतेनें आपलें मत द्यावयाचें व तें जर योग्य विचार करून द्यावयाचें तर सर्व गोष्टी सत्यस्वरूपांत तिजपुढें येणें जरूर आहे. वकिलाप्रमाणें एकतर्फी कथनच लोकांपुढें ठेवणें म्हणजे त्यांना अज्ञानांत ठेवण्यासारखें आहे. मोठमोठ्या मुत्सद्यांनींसुद्धां प्रचाराला पहिलें स्थान देऊन दुसरें स्थान सत्याला दिलें आहे. प्रचार म्हणजे सरळ खोटें सांगूनच करावा लागतो असें नाहीं. किंबहुना असला प्रचार प्रभावीही होत नाहीं. पण सत्यकथन न करतां व असत्य व्यंजनेनें सुचवून लोकमतावर छाप बसविण्याची कला ही प्रचारांत विशिष्ट प्रभावी ठरली आहे. आधुनिक जगांत मुद्रण हें एक मोठें प्रचाराचें साधन आहे. वर्तमानपत्रें, हे लोकमताचे विश्वकर्मेच स्वतःला समजतात. ते मोठमोठ्या मुत्सद्यांना आपल्या इशाऱ्यांप्रमाणें नाचवितात. त्यांच्या राजकीय भवितव्याची वासलात लावण्याची ताकद ते बाळगतात. सत्याचाच प्रचार करावा

असें बंधन त्यांच्यावर कोण घालणार ? या परिस्थितींत नागरिकवर्ग शिक्षित असला तरी योग्य तो निर्णय घेण्याला अवश्य ती माहिती त्याजपुढें येईल याची खात्री नसते. शिवाय राज्यकारभाराचें क्षेत्र इतकें वाढलें आहे कीं असले प्रसंगही जास्त वाढले आहेत. प्रत्येक प्रश्नाची तपशीलवार माहिती घेऊन मत देण्याइतका वेळ व उत्साह दरवेळीं आमजनतेंत राहाणें शक्य नाहीं. लोक विश्वासानें वागतात व सरकारी कथन सामान्यपणें सत्यकथन आहे असें मानतात. म्हणून, सरकारचें, राज्यसत्तेचें कर्तव्य हें आहे कीं, प्रश्नाला प्रस्तुत असलेली माहिती खरीखुरी दिली पाहिजे, वस्तुस्थिति अगदीं यथार्थपणें जनतेपुढें मांडली पाहिजे. सत्य हा एक प्रचाराचा भाग न मानतां, सत्याचा फक्त प्रचार केला पाहिजे. जाणूनबुजून विपर्यास करून, सत्यापलाप करून, लोक-मताला ठकविल्यानें राजकीय स्वातंत्र्याचा पाया उखडून पडतो. राजकीय स्वातंत्र्य म्हणजे प्रत्येक व्यक्तीला आपला अनुभव व अभिप्राय सांगून राज्यकारभारावर परि-णाम करण्याची संधि. पण सत्य कथनाचे अभावीं नागरिकाला योग्य अभिप्राय देणें, विवेकपूर्ण अभिप्राय देणें अशक्य होतें. सत्य तें सांगितल्याने व्यवहारांत अडचणी येतील, जनता भीतिग्रस्त होईल म्हणून तें न सांगणें क्षम्य टरत नाहीं. तसेंच जनमत योग्य रस्त्यावर यावें म्हणून सद्भावनेनें सत्यकथन न करणें व कांहीं तरी बनवाबनवी करून तें वळवणेंही योग्य टरत नाहीं. नागरिकवर्ग योग्य शिक्षण घेतलेला असला म्हणजे सत्यकथनापासून कांहींही अनहित होत नाहीं. लोकशाही समाज जें करतो, करतो तें पटतें म्हणून करतो व त्यांत त्याचें मन असतें. विचार करून, खात्री होऊन पटलें असल्यामुळें, त्याचे कार्यांत श्रद्धेची तीव्रता असते. यंत्राप्रमाणें शिस्तींत वागणाऱ्या नागरिकांपेक्षां करीत असलेलें कार्य योग्य व आवश्यक आहे असे मनाला पटून वागणारा नागरिक, अधिक प्रभावी व कार्यक्षम असतो. हा अनुभव मागील-प्रमाणें याही युद्धांत येत आहे. जनतेपासून वस्तुस्थिति गुप्त ठेवल्यानें श्रमांतील श्रद्धाच राज्यसत्ता नाहींशी करते, वस्तुस्थिति प्रकट झाल्यानें नाना मतें तिजबद्दल विचार करतात. सर्व कारभार जेथें उघड आहे, जेथें सत्याला प्रसिद्धि आहे, तेथेंच स्वातंत्र्य नांदतें. राज्यकारभारांत चांगलीं माणसें असलीं म्हणजे त्यांच्यावर विश्वास टाकून जनतेनें राहावें हें स्वातंत्र्याच्या दृष्टीनें हितावह नाहीं. प्रसिद्ध राजानीतिपंडित ॲक्टनप्रमाणें सर्वच मुत्सद्दी वाईट असतात असें जरी मानलें नाहीं तरी, राज्यकर्ते कसे वागतात याकडे सारखें लक्ष देणें जरूर आहे. त्यांच्या कार्यांची माहिती जनतेला मिळाली पाहिजे, ती जाहीर झाली पाहिजे म्हणजे सत्तेचा दुरुपयोग स्वातंत्र्यहरणाकडे होणें अशक्य होईल.

राजकीय स्वातंत्र्य जर आर्थिक स्वातंत्र्य नसेल तर व्यर्थ आहे. आर्थिक स्वातंत्र्य म्हणजे उपजीविकेची निश्चिति, ती प्राप्त करून घेण्याची संधि व योग्य विश्रांति. रोजगार राहील कीं नाहीं, आज मिळालें, उद्यां मिळेल कीं नाहीं, सकाळीं पुरेसें मिळालें, संध्याकाळीं पुरेसें मिळेल कीं नाहीं, अशी कायम विवंचना माणसाच्या मागें राहिली तर ती त्याच्या जन्माचें मातेरें करते. चिता पत्करते; कारण ती एकदांच जाळते व सर्व ग्रंथ समाप्त करते. ही दैनंदिन चिंता दररोज जाळीत असते, तोळा तोळा रक्त कमी करून माणसाला निःसत्व करते व त्याच्या मनाला निर्जीव करीत असते. समाजांत प्रत्येक व्यक्तीला आपल्याला काम मिळेल, रोजगार मिळेल व भरपूर प्रमाणांत अवश्य त्या गोष्टी मिळतील इतका विश्वास वाटला पाहिजे. या विश्वासाचें वातावरण असेल तर त्याला आपली उन्नति करतां येईल, आपल्या विकासाकडे लक्ष देतां येईल. आपण श्रम केले म्हणजे योग्य तो मोबदला मिळेल, आपण घरदार बांधूं, मुलांना अधिक शिक्षण देऊं, आपला दर्जा वाढवूं, वगैरे विचार त्याच्या मनांत येऊन त्याच्या प्रयत्नांना प्रसन्नता येण्यासाठीं त्याचा सर्व वेळ व सर्व शक्ति अवश्य तेवढेंच सरासरी मिळवण्यांत खर्चिली जातां कामा नये. सर्व शक्ति व वेळ तसा खर्चिला जाऊं लागला, तर होणारे कार्यात त्याचें मन राहात नाहीं. कांहीं कर्तृत्व करावें ही आकांक्षा मरते व मनाला आशादायी विचारांचा खुराक न मिळाल्यानें तें खुजट व शेवटीं पंगु होतें, विचारही करीनासें होतें. समाजांत वर वर्णन केल्याप्रमाणें आर्थिक स्वातंत्र्य नसेल तर स्वातंत्र्यही फार काळ टिकणार नाहीं. जेथें मनुष्याचे श्रम ही एक, जोडे, छत्री, कुदळ, फावडी यांच्यासारखी विकत घेण्याची व देण्याची वस्तु मानली जाते अगर वस्तुतः ठरते तेथें श्रम विकत घेणारे हे श्रम विकत देणाऱ्यांचें स्वातंत्र्यच नष्ट करीत असतात. श्रम करणारा हा मनुष्य आहे, तो जे श्रम करील त्याबद्दल कांहीं तरी बोलण्याचा त्याला अधिकार आहे हें जर मान्य केलें नाहीं तर तो एक सजीव यंत्रच होतो. शारिरिक व मानसिक दोन्ही गुलामगिरींच्या शृंखला त्याला सहन कराव्या लागतात. प्रत्यक्ष माणसांची गुलाम म्हणून खरेदीविक्री होई त्या वेळीं निदान मालक गुलामांची शक्ति व शरीर चांगलें राहील इतकी काळजी तरी स्वार्थी बुद्धीनें का होईना, घेत असे. हल्लींच्या सुधारलेल्या युगांत तेंही होत नाहीं. मालक व मजूर यांचा प्रत्यक्ष संबंधही येत नाहीं. घाणेरड्या वस्त्या, बेकारांच्या रांगा, वाढती गुन्हेगारी, हा सर्व आधुनिक सुधारणेचा "खास बनेलो" माल आहे. ज्या समाजांत आर्थिक स्वातंत्र्य नाहीं तेथें हेंच व्हावयाचें. जेथें आर्थिक स्वातंत्र्य आहे तेथें निराळें चित्र दिसेल. आर्थिक स्वातंत्र्यांत

श्रमणाऱ्यास श्रमाबद्दल बोलण्याचा अधिकार आहे. म्हणजेच आर्थिक स्वातंत्र्यांत आर्थिक लोकशाही आलीच. ज्यांचा ज्यांचा संबंध उत्पादनाशी येतो त्यांच्या त्यांच्या मताप्रमाणें सहकार्यानें उत्पादनाची व्यवस्था आंखली गेली पाहिजे. या व्यवस्थेंत अवश्य व आनुषंगिक हक्कांना मान्यता मिळून स्थान मिळालें पाहिजे. उत्पादन हें कोणाच्याही लहरीवर आधारलेलें न राहतां समाजाचे गरजेवर आधारलेलें असलें पाहिजे व त्या दृष्टीनें औद्योगिक क्षेत्रांतील कार्याचें मार्गदर्शन झालें पाहिजे. त्यांत योजना पाहिजे, नियम पाहिजे, काम करणाऱ्यांना कर्तृत्व दाखविण्यास संधि मिळेल अशी व्यवस्था पाहिजे. यंत्र व त्यामागें काम करणारा कामगार हे एक नव्हेत. कामगार हा मन असलेला, विचार करणारा प्राणी आहे, ही मौलिक गोष्ट मानली गेली पाहिजे. त्याला कराव्या लागणाऱ्या कामांत किचकटपणा, सारखेपणा असल्यामुळें कंटाळा येतो ही वस्तुस्थिति ओळखून त्याच्या विधायक प्रवृत्तींना चालना मिळेल असें कांहीं तरी वातावरण निर्माण केलें गेले पाहिज. त्याची चालनाबुद्धि, त्याचें कर्तृत्व हे आज्ञापित स्वरूपाचें न राहातां स्वयंस्फूर्त राहील याची काळजी घेतली गेली पाहिजे. व्यवस्थेंत व कारभारांत त्याला भाग असेल तरच त्याला त्यांत आपुलकी वाटेल, आपुलकीनें जबाबदारी येईल व जबाबदारी ही कर्तृत्वाची जननी आहे. गरजवंत म्हणून त्याची अक्कल निकालीं न लागतां, उपाशी राहावें लागेल म्हणून त्याचे श्रम मातीमोलानें न घेतां त्याच्या अक्कलेचें, श्रमाचें चीज होईल या दृष्टीनें आर्थिक व औद्योगिक व्यवस्था झाली पाहिजे. आपल्या गरजेचा व दुर्बलतेचा फायदा घेतला जाईल ही भीति जेव्हां नाहींशी होईल तेव्हांच कामगारांची कला खुलेल. स्वातंत्र्याचा सूर्य उगवतांच खरी कारागिरी प्रकट होते. कर्तृत्वाला बहर येतो.

स्वातंत्र्याची खास संरक्षणव्यवस्था केल्याशिवाय आमजनतेला तें लाभणार नाहीं हें उघड आहे. त्याचप्रमाणें ज्या समाजांत खास अधिकार, खास हक्क असें कांहींना लाभले आहेत, तेथें जनतेच्या स्वातंत्र्याला धोका आहे. समाजांतील सत्ता व अधिकारप्राप्ति सर्वांना मिळण्याची संधि नसेल व कांहींनाच हा अधिकार आपोआप लायकीचा, न्यायाचा अगर कर्तृत्वाचा विचार न करतां मिळणार असेल तर बहुसंख्याक जनतेला विफलतेच्या वातावरणांत राहावें लागेल. गुणलुब्धा संपदा व सत्ता असली म्हणजे कर्तृत्वाला आवाहन असतें. जो तें दाखवील त्याला ती लाभेल. पण जेथें गुणांचा विचार न करतां सत्ता व संपत्ति मिळण्याची व्यवस्था आहे तेथें बहुसंख्याकांना जेथें राज्यसत्तेनें ठेवलें आहे त्याच स्थानावर राहावें लागतें, तें आपलें नशीब म्हणून मान्य करावें लागतें. या कर्मव्यवस्थेंत अन्याय आहेच, पण कर्तृत्वही

मारलें जातें, समाजांतील स्वातंत्र्यभावना लुप्त होते. जें आहे तेंच चांगलें, जें चालत आलेलें तेंच समाजधारणेला आवश्यक असें प्रतिपादलें जातें. या स्वार्थी प्रतिपादनाला धर्माची जोड देण्यांत येते. भगवंतांनीं केलेली वर्णव्यवस्था, हजारों वर्षें टिकाव धरून राहिलेली व्यवस्था वाईट म्हणणारा नास्तिक व समाजशत्रु मानला जातो. समाजांत खास अधिकार गुणानें नव्हे, जन्मानें अगर अन्य रीतीनें ज्यांनीं मिळविले असतील ते 'हें सर्व देणें ईश्वराचें' आहे दैवाचें आहे अशी प्रवृत्ति व प्रयत्नांना मारणारा भाव समाजांत उत्पन्न करीत असतात. बहुसंख्यांक लोक दैववादी बनून, त्यांच्यांतील कांहीं तरी करावें ही चालनाबुद्धि नष्ट होते. हरी असेल तर तारील, तोच सर्व कांहीं करील असें म्हणून जें चालत आलेलें आहे तें तसेंच मुकाट्यानें लोक पुढें नेत असतात. भोयांचे मनांत पालखी खालीं ठेवून आपण त्यांत बसावें व बसणाराला ती वाहाण्याची 'संधि' द्यावी असें येतच नाहीं. जें होत आहे तें सृष्टिक्रमानुसार होत आहे असाच त्यांचा विश्वास असतो. हे खरोखर गुलाम असतात. उन्नतीची संधि ते शोधीत नाहींत. चालत आली तर भीतीनें दूर सरतात. फार काय कोणी धैर्यानें परिस्थितीची कोंडी फोडून त्यांना स्वतंत्र केलें तरी नवीन वातावरणांत जुन्या गुलामगिरीच्या संवयी ते सोडीत नाहींत. हांजी हांजी करणें, गुणहीनांना सन्मानणें, ते आपला जन्मसिद्ध हक्क मानतात. वरचा, राजकर्त्यांचा वर्ग सांगेल तें वेदवाक्य मानतात, स्वतःचे बुद्धीनें स्वतः विचार करून वागण्याचें ते पार विसरून गेलेले असतात. पंगु झालेली त्यांची बुद्धि सर्वस्वीं राज्यकर्ते, सत्ताधिकारी यांवर अवलंबून असते. सत्तेकडून आलें म्हणजे तें पारखून घेणें हा राजद्रोह आहे असें त्यांना वाटतें. परंपरा हें प्रमाण मानल्यानंतर चिकित्सा हें पाप ठरणें साहजिक आहे. आपलें खरें हित त्यांना कळेनासें होतें. उलट अधिकारावर बसले आहेत, त्यांचें हित व लोकांचे हित यांत ऐक्य नसतें व बहुसंख्याकांचें हित करावें अशी त्यांची प्रवृत्तीही सहसा नसते. सर्वांचे हित करावयाचें तर सर्वांचे हिताआड येणारी ही खास हक्कव्यवस्था प्रथम दूर केली पाहिजे, ती ठेवून सर्वांचे हित होणार नाहीं. इमारतीचा सुंदर भाग कांहींना ठेवून राहिलेल्यांत बाकी सर्वांची सोय करणें यांत न्यायही नाहीं व सोयही नाहींच नाहीं. खास हक्क व अधिकार ठेवून समाज पुढें जात नाहीं. आहे तें कायम ठेवण्याचाच तेथें प्रयत्न होतो व वर वर्णन केल्याप्रमाणें त्या समाजाची स्थिति होते.

जे कांहीं खास हक्क बळकावून श्रेष्ठ झालेले असतात ते आपल्या गौरवाचा व अधिकाराचा दुरुपयोग करीत नाहींत असें क्वचितच होतें. एक तर ते स्वतःची अशी

जातच निर्माण करीत असतात. त्यांच्यांत वर्गजाणीव व वर्गभावना इतकी तीव्र असते कीं अन्य जनांना ते क्षुद्र लेखतात. जेथें अधिकारावर असतील तेथें 'देवाचे लाडके' म्हणून मिरवतात. आपल्या श्रेष्ठत्वाच्या स्थैर्याकरितां व तें संपूर्णपणें उपभोगितां यावें म्हणून अनेक मर्यादा उत्पन्न करून नूतनांना प्रवेशबंदी, निदान सुलभ प्रवेश अशक्य करतात. समाजांतील विषमभाव हा नैसर्गिक आहे असा सिद्धांत मांडून 'हाताचीं बोटें कुठें सारखीं आहेत' असला बालिश पुरावासुद्धां पुढें करण्यास कमी करीत नाहींत. किंबहुना जे वंचित व पददलित आहेत त्यांना त्यांच्या स्थितींत आनंद वाटतो असें मनोविश्लेषण गंभीरपणें मांडतात. परंपरेनें अधिकार चालविल्यामुळें स्वाभाविकपणें गुणवर्धन झालें, लायकी आली व नियतकर्म केल्यानें कौशल्याचा योग साधतो असा गीताधर्म प्रतिपादतात. समाजाचे संघर्षांत टिकून सामर्थ्य व लायकी सिद्ध केली आहे असें खोटें सांगून आपलें विद्यमान अस्तित्व व सत्ता यांना उत्क्रांतिवादाची नैसर्गिकता प्राप्त झाली आहे असें समर्थन करतात. समाजांत श्रेष्ठ आहोंत म्हणून समाजाचे एकमेव प्रतिनिधि हा दावा ते मांडतील. समाजपुरुषाचें मुख आहोंत म्हणून इतरांना बोलण्याचा हक्क नाकारतील. इतरांनीं उन्नतीची आकांक्षा धरली, अधिकाराची आशा बाळगली, तर तें पायरी सोडून वर्तन झालें असें श्रुति व स्मृति म्हणजे कायदा व परंपरा यांच्या आधारें सिध्द करतील, व राज्यसत्ता म्हणजे ते अगर त्यांचे पाहारेकरी यांच्यातर्फे प्रायश्चित्तही देववतील. अनायासानें गुणाभावीं मिळालेले खास हक्क अगर सत्ता कोणी सुखासुखी सोडल्याचें इतिहासांत उदाहरण नाहीं. अपवादप्रसंग सुध्दां अगदीं थोडे. सत्ता बळेंचि नेल्यानंतर समाजाचे हितार्थ तिचा त्याग केला, तिचें दान केलें असें तुळशीपत्रही नंतर टाकण्यांत आल्याचे प्रसंगसुध्दां अनेक आहेत. तथापि, अखेरच्या घडीपर्यंत आपला अधिकार राहावा म्हणून रणें माजवतील, प्रयत्नांची शर्थ करतील व प्रसंगीं विजयी होतील आणि ते जेव्हां अपवित्र कार्यांत विजयी होतात, तेव्हां जे पराभूत झाले ते कांहीं काळ तरी जमीनदोस्त होतात, कांहीं काळ राम वनवासी होतो. न्याय अज्ञातवास पत्करतो. समाजांत राज्यसत्तेंतील अगर अधिकारपदस्थांतील दोषदर्शन अगर त्यावर रास्त टीका सुध्दां अशक्य होते. सर्व बाजूनीं कोंडून स्वातंत्र्याचे प्रयत्नांवर भालाफेंक होत असते. तथापि स्वातंत्र्याची अमर स्फूर्ति मरत नाहीं. प्रल्हादाप्रमाणें सर्व प्रसंगांतून निभावून प्रसंग येतांच अनपेक्षित रीतीनें, अनपेक्षित स्वरूपांत प्रकट होते. मूषकांच्या व मनुष्यांच्या योजना अनेकदां कोलमडतात. त्यागिलेलें, तुडविलेलें सत्य पुनः पुन्हा उंचीनें उभें राहातें व मान्यतेचा मुजरा स्वीकारीत सिंहासनावर विराजमान होतें. स्वातं-

त्याला त्याचा वारसा पूर्णपणें मिळतो. जेथें स्वातंत्र्य, तेथें तें सर्वांना म्हणून तेथें खास हक्क अगर अधिकार असूंच शकत नाहींत. ते असणें म्हणजे विषमता, म्हणजेच स्वातंत्र्याची अपूर्णता व अभाव, विषमता व स्वातंत्र्य यांत स्वाभाविक विरोध आहे. सत्तेपासून, स्वातंत्र्यापासून, व्यक्तींना त्यांचे हितार्थ वंचित केलें आहे, असा दावा अनेकांनीं केला असेल, पण वस्तुस्थितींत वगळणारांनींच आपलें हित साधलें असें निरपवाद रीतीनें इतिहासाचा अनुभव सांगत आला आहे.

खास अगर राखीव हक्कांच्या वातावरणांत स्वातंत्र्य नांदत नाहीं. तसेंच नागरिकांचे हक्क कोणा व्यक्तीचे मर्जीवर अवलंबून असतील तर तेथेंही स्वातंत्र्य नांदणार नाहीं. राज्यसत्ता ही सर्वांना सर्वसामान्य नियम लावून समाजाचें नियंत्रण करण्यासाठीं आहे. म्हणून राज्यसत्तेच्या नियमांतून जे प्रत्यक्ष राज्यकारभार करणारे आहेत ते वगळण्याचें कारण नाहीं. राज्यसत्तेचा नियम व कायदा सर्वांना सारखा व न्याय देणारा असला पाहिजे. तेथें वशिला अगर मर्जी यांना वाव असूं नये. जे हक्क आहेत ते सर्वांना असले पाहिजेत, जें नियंत्रण असेल तें सर्वांना असलें पाहिजे. काम व योग्य वेतन मिळण्याचा हक्क आहे, त्याचा उपभोग सर्वांना मिळाला पाहिजे. मालकांनीं कारखाने बंद करून त्याचा उपभोग अशक्य करणें म्हणजे तो केवळ मालकांच्या मर्जीवर आहे असा अर्थ झाला. मालक भाव पडला म्हणून आपल्या वर्तनाचें समर्थन करणार आणि पदार्थांचे भाव आजकालच्या जगांत बाजारांतील डावपेंचावर अवलंबून. समाजांतील व्यापार व उद्योग समाजाच्या गरजेचा विचार न करतां होऊं लागले, समाजांतील संपत्तीची वांटणी श्रमानुसार न होतां समाजांत विषमता वाढविणारी होऊं लागली, म्हणजे नागरिकहक्कांना बाध आला. राजकीय स्वातंत्र्य मिळूनही आर्थिक स्वातंत्र्याचे अभावीं तें अयथार्थ होणार. नागरिकांना जीवनांत स्वाथ्य व सफलता मिळणार नाहीं व याचें कारण कांहीं व्यक्ति, कांहीं गट आपल्या मर्जीप्रमाणें आपली साधनसामुग्री वापरून, जनतेच्या हक्कांना बिनहरकत बाध आणतात. हें अशक्य करणारें नियंत्रण राज्यानें निर्माण केलें पाहिजे. अर्थात् प्रत्यक्ष नियंत्रण राज्यसत्ता अगर सरकार करीत असतें. म्हणून नागरिकांच्या हिताच्या दृष्टीनें हें नियंत्रण करणें तिचेंच कर्तव्य आहे. जे जे कोणी आपल्या कृत्यांनीं इतरांवर व इतरांच्या सुखदुःखांवर परिणाम करीत असतात, ज्यांच्या हातांत इतरांचें भाग्य कमीजास्त करण्याची सत्ता असते, त्या सर्वांच्या वर्तनावर, त्यांनीं स्वैर वागून समाजहिताला बाध आणूं नये म्हणून मर्यादा घालणें इष्ट असतें व तें कार्य राज्यसत्तेनेंच केलें पाहिजे, तेथें इतरांचा अधिकार नाहीं. राज्यसत्तेला वरीलप्रमाणें अधिकार आहे

याचा अर्थ प्रत्येकाच्या जीवनांत बारीकसारीक गोष्टींत सुद्धां हस्तक्षेप करण्याचा तिला अधिकार आहे असा नव्हे. राज्यसत्तेनें नागरिकहक्कांना बाध येणार नाहीं, ते कोणा व्यक्तीच्या अगर गटाच्या मर्जीवर अवलंबून राहाणार नाहींत, या दृष्टीनें समाजव्यवहाराचें योजनापूर्ण मार्गदर्शन करणें, कोणत्या तत्त्वानुसार तो चालला पाहिजे हें ठरवून देणें, असा त्या अधिकाराचा अर्थ आहे. अशी योजना असली म्हणजे व्यवहारांत अनिश्चितता कमी होईल व व्यक्ति अगर गट यांच्या स्वार्थी गुंडगिरीला वाव राहाणार नाहीं. योजनेनें व्यवहार होत गेल्यानें श्रम व सामुग्री वायां जाणार नाहीं. दैवी आपत्ति, अतिवृष्टि, अनावृष्टि यांवर कोणाचाच ताबा नाहीं. भूकंपाचें भविष्य करतां आलें तरी तो कोणी टाळूं शकत नाहीं. पण बाजारांतील अरिष्टें, भावांचे चढउतार, एकीकडे गिऱ्हाइकांच्या अभावीं उत्पादन पडून सडून जात आहे, व दुसरीकडे उत्पादन नाहीं म्हणून उपभोगी खंगत जातो आहे अशी परिस्थिति, या सर्व गोष्टी, दैवानें अगर निसर्गानें निर्माण केलेल्या नाहींत, यांत अस्मानी नाहीं, सुलतानी आहे, हे सर्व मानवनिर्मित मानवांनीं केलेले अन्याय व अपकृत्यें, अशक्य करणें राजसत्तेला शक्य आहे व सर्वसाधारण स्वरूपाची योजना करून हें नियंत्रण मध्यवर्ती व मुख्य राज्यसत्तेनें निर्माण केलें पाहिजे. त्याची प्रत्यक्ष अंमलबजावणी योग्य रीतीनें होण्यासाठीं आधुनिक राज्याचा विस्तार व कार्यक्षेत्र लक्षांत घेतां राज्यकारभारांत अनेक केंद्रें असणें अधिक चांगलें.

राज्यसत्तेनें वरीलप्रमाणें नियंत्रण केलें म्हणजे, स्वातंत्र्य यथार्थ होईल हें खरें; पण नियंत्रणयोजनेंत राज्यसत्ता निस्पृह रीतीनें वागेल असें गृहीत धरलें आहे. राज्यसत्ता म्हणजे प्रत्यक्ष सत्ता वापरणारीं माणसें, अधिकार चालविणाऱ्या व्यक्ति. समाजांत नानाविध व्यक्ति व नानाविध हितसंबंध असतात. तो कधीं अगदीं एकजिनसी नसतो. सर्व लोक सारखे ज्ञानी नसतात, सर्व लोक सारखे प्रयत्नशील नसतात. या परिस्थितींत जे प्रभावी, ते आपलें वर्चस्व व वजन राज्यसत्ता चालविण्याऱ्या व्यक्तींवर आणणें शक्य आहे व त्याचा परिणाम राज्यसत्तेच्या धोरणांत सर्व हितांचा समतोल असा समन्वय न होतां, तें एखाद्या विशिष्ट हिताकडे झुकणें संभवनीय आहे. हें अजिबात टाळणें शक्य जरी नाहीं तरी शक्य तितकें तें अशक्य करणें, समाजांत स्वातंत्र्य नांदावें यासाठीं इष्ट आहे व हा हेतु धरून नागरिकहक्क–व्यवस्था उभारली पाहिजे राज्यसत्ता एखादे वर्गाचे अगर गटाचे स्वार्थासाठीं वापरली जाणार नाहीं याची ग्वाही समाजांत असली पाहिजे. योग्य हक्कव्यवस्थेनें अशी ग्वाही मिळते. पण घटना कितीही निर्दोष केली, कायदे कितीही पक्के केले, तरी त्यांचा विपर्यास करून स्वार्थ साधणारीं

माणसें नसतातच असें नाहीं. म्हणून राज्यसत्तेचें प्रत्येक कृत्य दक्षतेनें पाहून वागणारी वृत्ति समाजांत अखड जागृत असली तर स्वातंत्र्य टिकेल. एका कामासाठीं घेतलेला अधिकार दुसऱ्या कामीं दुरुपयोगिला जातो हा राज्यसत्तेबाबतचा अनुभव सार्वत्रिक आहे. शांतताभंग होऊं नये, अव्यवस्था होऊं नये म्हणून घेतलेले जादा अधिकार सर्व नागरिकहक्क नेस्तनाबूद करण्यासाठीं, व स्वतःचें आसन स्थिर करण्यासाठीं दुरुपयोगिले जातात हा सर्व देशांत आलेला अनुभव प्रसिद्ध आहे. अरिष्ट टळावें म्हणून केलेल्या योजनेनें निवडक वर्गाचें हित साधलें जातें. देशासाठीं हक्कांचा अतिक्रम करूं दिल्यानें मजुरांचेच हक्क जातात. मालकांना, सरकारी नियंत्रण, ठराविक तैनातीप्रमाणें घरबसल्या फायदा देणारें होतें. राष्ट्राच्या संकटांत सुद्धां राज्यसत्तेच्या कृपेनें, कित्येक जण सणच साजरा करतात. नागरिकवर्ग दक्ष असेल तरच राज्यसत्तेचें प्रत्येक कृत्य दक्षतेनें पाहील व विषमता उत्पन्न करणारें असेल तर त्याला विरोध करून ते बंद पाडील. विरोधवृत्ति निर्भयवृत्ति, हीच खरी नागरिकहक्कांची ढाल आहे. निर्भयता हीच स्वातंत्र्याचा आत्मा व आधार आहे.

विषमता उत्पन्न करणारीं कृत्यें राज्यसत्तेच्या हातून होणार नाहींत याची ग्वाही निर्भयवृत्ति आहे व ती समाजांत वृद्धिंगत व्हावी, समाजास तदनुसार वागणुकीचें वळण लागावें यासाठीं कांहीं भाव, कांहीं विचारप्रणाली समाजांत दृढ झाली पाहिजे. विषमता हा अन्याय आहे व समता हा न्याय आहे, ही भावना समाजाचे मनोभूमिकेंत दृढमूल झाली पाहिजे. माणसें एका समाजांत वागतात याचा अर्थ त्यांना परस्परांवर अवलंबून राहावें लागत आहे. एका संघटनेंत वागत आहेत, याचा अर्थ कांहीं तरी सारखेपणा त्यांच्यांत आहे. तसें नसतें तर ते संघटनेंत येतेच ना. कांहीं किमान गरजा भागाव्यात, सर्वांना सारखेच अवश्य वाटणाऱ्या नियमांची, नियंत्रणाची गरज सर्वांनाच आहे म्हणून राज्य आलें. गाडींत अनेक वर्गांचे डबे असतील, पण सर्वच उतारू या दृष्टीनें कांहीं सारखेपणा सर्वांत आलाच. केवळ उतारू म्हणून सर्वांची गरज सारखी, ते कुठेंही बसले तरी गाडीला उशीर झाला तरी तो पहिल्या वर्गाच्या उतारूंना होणार नाहीं असें थोडेंच!! समाज या संस्थेचा जन्म, संरक्षण व सुव्यवस्था यांसाठीं झाला व तें व्हावें म्हणून सर्व कमी जास्तपणा बाजूला सारून सर्वांची सोय व्हावी म्हणून, एका भावनेंत आले; एक प्रकारची आपुलकी त्यांच्या भावनेंत आली; एक प्रकारची समता त्यांच्यांत उत्पन्न झाली व समाज हा भाव, ही संस्था जन्माला आली. समाजांत आज समता दिसत नसली तरी समाजाचें जन्मरहस्य हें असें आहे. परस्परांवर अवलंबून असल्यामुळें कांहीं प्रमाणांत एक पातळींत

सर्व आले व म्हणूनच समाज हें संघटन जन्मास आलें. समाजाच्या कल्पनेच्या बीजांतच समताभाव आहे. म्हणून समता ही समाजाला, समाजधारणेला विरोधी असूं शकत नाहीं. उलट समाजाचा हेतु साध्य होण्यासाठीं, पूर्णपणें साध्य होण्यासाठीं, समताही आवश्यक आहे. समता याचा अर्थ सर्वांना सारखें वागविणें, पण एकसारखें वागविणें नव्हे. व्यक्ति नानाविध प्रवृत्तींच्या असतात, त्यांच्या गरजा विविध स्वरूपांच्या असतात, त्यांची योग्यताही भिन्न भिन्न स्वरूपाची असते. समाजांतील ही विविधता, हें वैचित्र्य लक्षांत घेऊन सर्वांची अनुरूप सोय करणें यांत समता आहे. एकच सोय सर्वांची करणें यांत समता नाहीं व समतेचा तसा अर्थही नाहीं. शब्द-रचना करणारा पंडित व विटांची रचई करणारा गवंडी यांच्या प्रवृत्तींना अनुरूप असें वातावरण असलें म्हणजे समता आली. गवंडी स्थापत्यशास्त्रावरील ग्रंथ वाचील, पंडित छंदशास्त्रावरील वाचील, त्यांना त्यांच्या उन्नतीच्या दृष्टीनें जें पाहिजे तें मिळालें म्हणजे झालें. दोघांनाही समतेच्या नांवाखालीं तेच ग्रंथ वाचावयास लावणें म्हणजे समतेच्या कल्पनेचा विपर्यास करणें आहे व समाजाच्या हेतूंचाही विपर्यास करणें आहे. हातोड्यानें शारीरिक श्रम करणारांस व समाजाच्या करमणुकीसाठीं काव्यगायन करणारांस समतेच्या नांवाखालीं सारखाच खुराक देणें म्हणजे एकाला उपाशी मारणें आहे अगर एकाला अजीर्ण होईपर्यंत देणें आहे. प्रत्येकाला त्याच्या गरजेप्रमाणें देण्यांत समता आहे. एकाच प्रमाणांत अगर एकसारखें देण्यांत समता नाहीं. या दृष्टीनें व्यक्तींना मिळणारें वेतन एका प्रमाणांतच पाहिजे अगर एकसारखें पाहिजे म्हणजे समता असा अर्थ करण्याचें कारण नाहीं. व्यक्तींना गरजेप्रमाणें, त्या सारख्या नसतात हें लक्षांत घेऊन दिलें गेलें म्हणजे, कुठल्याही परिस्थितींत कुणालाही इतकें अधिक मिळूं नये कीं, त्याचेयोगें तो दुसऱ्याचे हक्कांवर आक्रमण करील अगर तसें करण्यास समर्थ होईल. असें झालें म्हणजे समता भाव आला. समतेचा हा अर्थ आहे म्हणून समता व स्वातंत्र्य यांत विरोध नाहीं.

समता म्हणजे एका पातळींत सर्वांना आणणें व समाजांतील विषमता कमी करणें. टेकाडें, उंचवटे कमी करून, खांचखळगे भरून काढून समाजभूमि सारखी करणें. एकाच्या हक्कास बाध येईल, अशी परिस्थिति दुसऱ्याला न मिळूं देणें. प्रत्येक व्यक्तीला हक्क आहे याचा अर्थ तो उपभोगणारानें तत्सम हक्क उपभोगणाऱ्या दुसऱ्या व्यक्तीच्या उपभोगास बाध आणतां कामा नये. यांत प्रत्येकाला आपली उन्नति करण्याचें स्वातंत्र्य राहिलें, समाजांत समताही राहिली. एकाची उन्नति दुसऱ्याच्या अवनतीवर अवलंबून नाहीं राव मेले म्हणजेच पंत चढतात असें नाहीं तर समाजां-

तील व्यवहारव्यवस्थेत श्रम व प्राप्ति यांच्यांत समतोल राहील, प्रत्येकाला स्वतःचे विकासाच्या दृष्टीनें व नागरिककर्तव्यें योग्य रीतीनें पार पाडण्याच्या दृष्टीनें, पुरेशी प्राप्ति मिळेल. समतेनें प्रत्येकाला आपला अभिप्राय समाजहितार्थ सांगतां येईल, कदाचित् तज्ज्ञ म्हणून, अनुभवी म्हणून, कार्यधुरंधर म्हणून, एखाद्याच्या अभिप्रायास महत्त्व आलें तरी कोणाही व्यक्तीचा अभिप्राय विचारांतच घेतला गेला नाहीं असें होणार नाहीं. व्यक्तीव्यक्तींत विविधता आहे, फरक आहे हें लक्षांत घेऊन प्रत्येक व्यक्तीला अनुरूप अशी सोय व संघटना, अभिप्राय देण्याबाबत होईल व असें झालें तरच समता आहे हें उघड आहे. ओरडणाऱ्यांचें काल्पनिक दुःख सुद्धां दूर केलें जातें व मुक्यांना हाल तर सहन करावे लागतातच, पण ते बोलूनही दाखवितां येत नाहींत, कोणी त्यांची चौकशीही करीत नाहीं हा अनुभव आहे म्हणून तर, समतेची गरज जास्त वाटते; तें ध्येय जास्त समर्थनीय ठरतें. लोकांच्या इच्छेला योग्य मान दिला जात नाहीं. कांहींची सल्लामसलत घेतली जाते व कांहींना कोणी विचारीतच नाहीं. याचा परिणाम कांहींना दुःखांत व दास्यांत ठेवूनच कांहींचें सुख व स्वातंत्र्य खुलतें. बहुसंख्यांकांच्या मरणांत कांहींचें जीवनसाफल्य निर्माण होतें. राज्यसत्तेची प्रवृत्ति समभावाची नसल्यामुळें, कांहींनीं कितीही तारा छेडल्या तरी कर्णमधुर ध्वनि त्यांना लाभत नाहीं. समतेच्या अभावीं हें होतें. विषमतेच्या छत्राखालीं थोड्यांचेंच ऐकलें जातें, थोडयांच्याच प्रयत्नांना राज्यसत्ता फलप्रद होते, व हे थोडे शेवटीं राज्यसत्तेवर वर्चस्व बसवितात, तिला आपली दासी समजून राबवितात. त्यांचें सुख म्हणजे समाजाचें सुख, त्यांची इच्छा म्हणजे समाजाची इच्छा, त्यांचें मत म्हणजे लोकमत असें राज्यसत्ता मानते.

समतेच्या वातावरणांत कोणालाही खास असा अधिकार राहूं शकत नाहीं. प्रत्येकाला आपआपला अभिप्राय मत देऊन व्यक्त करण्याचा सारखाच अधिकार आहे. मताच्या दृष्टीनें मोजणींत विद्वानाचें मत म्हणून दुप्पट गणिलें जाणार नाहीं. लोकमतानें पसंत केलें तर अमुक जातीचा अगर अमुक धर्माचा म्हणून कोणीही अधिकारापासून वंचित केला जाणार नाहीं. वगळला जाणार नाहीं. नागरिक या नात्यानें सर्वांचे हक्क सारखे राहातील, त्यांत प्रति लागणार नाहींत. जे एकाला नागरिक म्हणून हक्क असतील, तेच सर्वांना. जन्मानें कांहींही विशिष्ट अगर जादा राजकीय हक्क प्राप्त होणार नाहींत. समतेच्या वातावरणांत जन्मजात भेद मानून अधिक हक्क देणें म्हणजे नास्तिकांना मंदिरप्रवेश देण्याइतकें चुकीचें आहे. त्यांत वंशपरंपरागत कांहीं हक्क ठेवणें अगर देणें होणार नाहीं. मूल्यमापन हें गुणानें, सेवेनें, कार्यानें

होईल, जन्मानें व आगंतुक संपत्तीनें नव्हे. दैवायत्त जन्म राहील हें खरें, पण प्रयत्नायत्त पौरुष राहील व त्यालाच सामाजिक सन्मान मिळेल. अधिकारपद वारस्यानें कोणाकडे येणार नाहीं. गुणानें ते प्रत्येकाला प्राप्त करून घेण्याची मुभा राहील. अवांतर कारणासाठीं अधिकारापासून कुणालाही वंचित केलें जाणार नाहीं. नालायकी व अपात्रता असेल तरच वगळलें जाईल. कोणत्याही तऱ्हेनें व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आघात होणार नाहीं. समतेचें वातावरण म्हणजे सर्वांना योग्य संधीचें वातावरण. सर्वांना समान संधि मिळेल म्हणजे अगदीं एकसारखी संधि मिळेल असा अर्थ नाहीं. जन्मानें ज्यांना कांहीं वातावरण लाभलें असेल तें प्रत्येकाला सारखें असणार नाहीं. विद्वान् आईबापांच्या पोटीं जन्म घेतल्यानें एक निराळें वातावरण त्या व्यक्तीला जन्मापासून मिळेल, आनुवंशिक असे कांहीं संस्कार त्याला लाभतील व त्याची प्रगति अधिक लवकर होईल. सुरुवातीला जरी या प्रकारची अपरिहार्य विषमता असली तरी शिक्षणाची व्यवस्था व संधि ही सर्वांना सारखीच लाभेल. रूप व लावण्य, त्याचप्रमाणें कांहीं मानसिक, आनुवंशिक संस्कार हे अभ्यासानें येणारे नाहींत, ते जन्माबरोबर येतात. त्यांचें नियमन कोणतीही राज्यसत्ता करूं शकणार नाहीं. राज्यसत्ता सर्व नागरिकांना सारख्या उंचीचे व स्वरूपाचे करूं शकणार नाहीं. तथापि, आगंतुक गुणाची सोय मात्र सर्वांसाठीं सारखी करतां येईल. जन्मानें शरीर कसेंही असो, तें सुदृढ व स्वच्छ राखण्याला अवश्य तेवढी प्राप्ति राज्यसत्ता मिळवून देईल. पण नकटें नाक चाफेकळीसारखें करूं शकणार नाहीं. रसायनशाळा, प्रयोगशाळा, सर्वांसाठीं राहातील, पण सर्वांना कांहीं ती संशोधक करूं शकणार नाहीं. सर्वांना काव्यग्रंथ मिळतील पण सर्वांना ते प्रतिभावान् कवि करूं शकणार नाहींत. ज्याच्या बुद्धीचा जसा कल असेल तशा प्रकारची संधि मिळेल. कारण सर्वांचा कल, सर्वांची प्रवृत्ति सारखी असणार नाहीं. मनुष्य हा इतर मनुष्यांप्रमाणें आहे व नाहींही. त्याच्यांत मौलिक ऐक्य आहे व मौलिक विविधताही आहे. विविधता आहे म्हणून स्वारस्य आहे वैचित्र्य आहे म्हणून सौंदर्य आहे, ऐक्य आहे म्हणून समाज आहे. संधि अभावीं कलेला व बुद्धीला निष्प्रभ व निष्फळ व्हावें लागतें. ती परिस्थिति समतेच्या वातावरणांत राहाणार नाहीं. समता म्हणजे सर्वांना सारखी संधि; सारखी संधि म्हणजे पुरेशी व अनुरूप संधि.

पुरेशी संधि म्हणजे प्रत्येक व्यक्तीला, त्याच्यांत असलेल्या बुद्धीला वाढविण्यास, त्याच्यांत असलेल्या गुणांचा विकास करण्याला, अनुभवानें ज्या प्रमाणांत पाहिजे तितकी. व्यक्तीचा विकास संपूर्णपणें होण्यासाठीं जेवढें प्रमाण पाहिजे तेवढें संधींचें

प्रमाण असलें पाहिजे. या संधीचा फायदा प्रत्येक व्यक्तीला घेतां यावा म्हणून योग्य, अनुकूल असें वातावरण उत्पन्न केलें पाहिजे. शाळा काढल्या पण मुलें येईनात, असें झाल्यास व्यर्थ. सक्ति केल्यानें मुलें येतील, गरीब कुटुंबांत ज्यांना पुरेसें खायला मिळणार नाहीं, ते उपाशीं, अर्धपोटीं येतील. त्यांचें लक्ष अभ्यासांत लागणार नाहीं. म्हणून त्यांची शाळेंत तरी खाण्याची सोय झाली पाहिजे नाहीं तर त्यांच्या आईबापांना पुरेशीं प्राप्ति सरकारनें दिली पाहिजे. जेऊन आलेला मुलगा व उपाशी मुलगा हे दोघे शाळेंत आले एवढ्यानें दोघांना सारखी संधि लाभली असे होत नाहीं. तो उपाशी राहिला, ही परिस्थिति दूर करतां येण्यासारखी आहे व ती दूर झाली पाहिजे. त्याला विषय लवकर समजत नाहीं म्हणून त्याच्यावर शिक्षकांनं जास्त मेहनत घेतली पाहिजे, म्हणजे त्याला मिळणारी संधि पुरेशी व अनुरूप होईल. १०×१० फुटांचे खोलींत आईबाप व तीन भावंडें राहात असतां, मुलांना काय अभ्यास करावासा वाटेल? तेरा चौदावे वर्षीं गिरणींत अगर शेतावर काम करावयास जावें लागलें तर चाळीचाळींत अगर गांवोगांव शाळा काढून काय उपयोग होणार? लहान वयांत पोटासाठीं श्रमावें लागलें तर त्यांना कसली जिज्ञासा उत्पन्न होणार? ज्ञान मिळवावें, उन्नति करावी, मोठें व्हावें, ही सर्व आकांक्षा उत्पन्न होण्यालासुध्दां कांहीं अनुकूल वातावरण निर्माण व्हावें लागत असतें. बाप, आजा वृध्दपणीसुध्दां खपत आहेत, सरासरी जिवंत राहात आहेत हें कौटुंबिक दृश्य बालमनावर काय परिणाम करील? आई, आजी, मुलांना टाकून गिरणींत कामाला जात आहेत अगर लोकांच्या घरीं स्वयंपाक करून भांडीं घासून झिजत आहेत, हें पाहून मुलांत कोणती आशा उत्पन्न होत असेल? उलट वकिलाचा मुलगा लहानपणींच बापाची पगडी डोक्यावर घालून पुस्तक वाचण्याची ऐट करतो व त्याचें कौतुकही होतें. कौटुंबिक स्थितीवर मोठ्या प्रमाणांत आयुष्यांत मिळणारी संधि व मनांत उत्पन्न होणारी आकांक्षा अवलंबून असतात. प्रवेशपरीक्षा, नंतर पदवीपरीक्षा, नंतर डॉक्टर, वकील, इंजिनियर अगर नोकरी याप्रमाणें घडणार अशी शाश्वति मध्यमवर्गीय पांढरपेशे कुटुंबांतील मुलांना असते. व्यापारी वर्गांतील कुटुंबांतील मुलें लहानपणापासून कचांचा हिशेब करत करत पक्के होत जातात, त्यांच्या आयुष्यक्रमाचें खातें जन्माचेच दिवशीं टाकलें जातें. शारीरश्रम करणाऱ्या आईबापांच्या पोटीं जन्माला येणाऱ्या मुलांचें षष्ठिपूजन विळाकोयत्यानेंच होतें. त्यांचीं बहुसंख्याक मुलें श्रमजीवीच होतात. श्रमजीवी म्हणजे कमी योग्यतेचा असें नाहीं. पण श्रमांनासुध्दां अनुरूप शिक्षणाची साथ मिळाली, तर त्यांतून कौशल्य फुलतें, कला प्रसवते. हें अनुरूप शिक्षण मिळण्याची संधि सर्वत्र

मिळाली पाहिजे. विवक्षित वयापर्यंत कोणालाही पोटासाठीं श्रम करणें भाग पडूं नये, ही व्यवस्था राज्यसत्तेनें केली पाहिजे. या मर्यादेपर्यंत योग्य व अनुरूप शिक्षण मिळून तयार झालेल्या मुलाला, रोजगार करावा लागला तरी रोजगाराला अनुरूप असें शिक्षण मिळण्याची व त्यायोगें आपली पात्रता वाढविण्याची संधि मिळेल अशी व्यवस्थाही केली पाहिजे. कांहीं काल अवश्य तें सामान्य शिक्षण मिळून, त्याला विचार करण्याची संवय लागली पाहिजे. बुध्दीचा उपयोग करण्याचें वळण त्याला लागलें पाहिजे व नंतर त्याचा कल ज्या गोष्टीकडे आहे त्याला अनुसरून तद्विषयक शिक्षण त्याला कांहीं काल मिळालें पाहिजे. कारागिरीकडे त्याचा कल असेल तर तें शिक्षण मिळालें पाहिजे, चित्रकलेकडे असेल तर तें मिळालें पाहिजे. त्याच्या विशिष्ट प्रवृत्तींना अनुरूप असें शिक्षण त्याला कहीं काल तरी मिळालें पाहिजे म्हणजे त्याच्यांतील गुण वायां जात नाहींत. पुरेशी व अनुरूप संधि मिळाली म्हणजे समाजांतील गुणसंपदा वायां जात नाहीं.

आजच्या परिस्थितींत संधिअभावीं किती काव्य मनांतल्या मनांतच विराम पावतें, किती तरी कला स्वप्नांतच विरतात. पुरेशा शिक्षणाभावीं किती तरी कारागिरी निष्फळ पडलेली दिसते. लहान वयांत, विद्येच्या वयांत, मुलांना पोटासाठीं श्रम करावयाला लावून समाजानें स्वतःचेंच नुकसान करून घेतलें आहे. आर्थिक हलाखीमुळें अनेक कुटुंबांतील सर्व मुलगे हुशार असून एकच पुढें शिकतो व बाकीचे, त्याच्या शिक्षणासाठीं रोजगार करतात. एकासाठीं हे खरोखर स्वार्थत्यागच करतात हा त्यांचा मोठेपणा झाला, पण यांत समाजाचा अपराध कांहीं कमी झाला नाही. समाजाला जें करावयास पाहिजे तें समाज व्यक्तींना करावयास लावतो, यांत त्याची कर्तव्यच्युति आहे. सारा नागरिकधर्म, योग्य शिक्षणाभावीं आचरणें शक्य नाहीं व समाज आपल्या व्यवस्थेनें बहुसंख्यांकांनां योग्य शिक्षण अशक्य करतो. लहान लहान वयांत, खाणींतून, कारखान्यांतून, शेतांतून काम करणें मुलांना भाग पडावें, व उन्नतिकारक ज्ञानाला मुकावें लागावें हें दृश्य अन्याय्य आहे. कोणीं कोठेंही कोणताही रोजगार केला तरी ज्ञानाचा मार्ग त्याला राज्यसत्तेनें कायम मोकळा ठेवला पाहिजे, नव्हे—तो त्याला सुलभ रीतीनें उपलब्ध करून दिला पाहिजे. ज्ञान देणारे, राज्यसत्तेनें उत्कृष्ट व ध्येयदर्शी असेच ठेवले पाहिजेत. आधुनिक युगांत शिक्षकाला अत्यंत श्रेष्ठ दर्जा आहे. राष्ट्रांतील शिक्षक ज्ञानी, समाधानी, व्यासंगी व विद्यादानांत आनंद मानणारा असला म्हणजे शिक्षण ही कवाईत न होतां, मनुष्यांतील प्रवृत्तींना, गुणांना प्रफुल्ल करणारी, त्यांच्यांत आकांक्षा उत्पन्न करून प्रयत्नांना आवाहन देणारी, साधकाची उपासना वाढविणारी प्रेरक क्रिया होते.

आज संधीचे अभावीं, व प्रेरक शिक्षणाचे अभावीं, जन्मानें आलेले आनुवंशिक फायदे राहून शिवाय शिक्षणाचे फायदे पण ठराविक लोकांनाच मिळतात. आनुवंशिक गुण कमीजास्त करतां येणार नाहींत, पण समाजव्यवस्था अशी असली पाहिजे कीं, त्याचा फायदा अन्याय्य रीतीनें कोणालाही मिळतां कामा नये. आजच्या समाजांतील सर्वांत अन्याय्य दृश्य म्हणजे लायकी व लक्ष्मी यांचें वैर. पण लक्ष्मी ही लायकी आहे म्हणून आहे असें आग्रहानें प्रतिपादलें जातें. श्रीमान्, मग ते कसेही झालेले असोत, आपल्या मुलांना वाटेल तेवढें शिक्षण देऊं शकतात. विश्वविद्यालयाचीं द्वारें त्यांना मोकळीं असतात. लायकी असून कित्येकांना पैशाचे अभावीं आपल्या मुलांना शिक्षण देतां येत नाहीं. जरूर तें व जरूर तेथील शिक्षण ते देऊं शकत नाहींत. पुष्कळ वेळां विद्यालयांतील प्रवेश ठराविक वर्गांतील मुलांना सहज मिळतो. इतरांना वस्तुतः बंदीच असते. जी विषमता नैसर्गिक आहे ती सोडून बाकीची योग्य व्यवस्था करून राज्यसत्तेनें दूर केली पाहिजे. हुशार व लायक विद्यार्थ्यांना मोठ्या प्रमाणावर जरूर त्या शिष्यवृत्त्या देऊन त्यांच्या शिक्षणाची सोय राज्यसत्तेस करतां येईल. गरिबी ही वैयक्तिक अगर नैसर्गिक नालायकी नाहीं. ती समाजव्यवस्था दोषपूर्ण असल्याची निदर्शक आहे. समाजाच्या अपराधाबद्दल व्यक्तीला प्रायश्चित यांत न्याय नाहीं. हिरे, सोनें, मोती हीं जशीं समाजांतील उद्योगी लोक शोधून काढतात, तशी राज्यसत्तेनें समाजभूमि न्याहाळून, सुप्त गुण शोधून काढून त्यांच्या विकासाला वांव दिला पाहिजे. श्रीमंत व गरीब हा भेद तेथें नसावा. अंगचे गुणांना शिक्षणानें व संधीनें सुसंस्कृतता व सफलता येते म्हणून तशी व्यवस्था असली पाहिजे. नैसर्गिक विषमतेमुळें समाजांतही विषमता असावी हें म्हणणें तर्कशून्य आहे. तींत न्याय आहे अगर ती समाजहितार्थ अवश्य आहे असें पटवून दाखविलें पाहिजे नाहीं तर ती नष्ट केली पाहिजे. आहे म्हणून अवश्य, नैसर्गिक किंवा इष्ट मानणें नुसतें चुकीचेंच आहे असें नव्हे तर घातुक व प्रतिगामी आहे. आजची विषमता याच विचारसरणीची प्रतिमा आहे व हीच विचारसरणी मान्य केल्यास ही प्रतिमा स्थानभ्रष्ट होणार नाहीं. आजची विषमता संपत्तीच्या हल्लींच्या मालकी पद्धतीमुळें व विभागणीमुळें उत्पन्न झाली आहे. आज संपत्तीचें संपादन समाजाच्या सेवेसाठीं म्हणून केलें न जातां, तिच्या जोरावर समाजांत प्रतिष्ठा, आर्थिक सत्ता मिळते व त्याचे जोरावर राज्यसत्ता काबूत ठेवतां येते म्हणून केलें जातें. समाजाची सेवा अगर गरज हा प्रधान हेतु नाहीं, सत्ताप्राप्ति हा प्रधान हेतु आहे. ही विषमता जावी व समाजांत समता उत्पन्न व्हावी म्हणून प्रथम शिक्षणाची, उन्नतीची संधि सर्वांना असली पाहिजे.

शिक्षणाची संधि हा समतेचा मौलिक भाग आहे. ज्ञान ही शक्ति आहे व समाजांत जे त्याचा उपयोग करूं शकतात ते प्रभावी होतात. ही शक्ति सर्वांना मिळविणें शक्य झालें पाहिजे. ज्ञान असेल तरच व्यक्ति आपला विकास करूं शकेल, आपल्या गुणांचा प्रभावी रीतीनें उन्नतीसाठी उपयोग करू शकेल व तेंच समाजानें, राज्यानें, त्याला नाकारलें अगर अशक्य केलें तर त्याला राज्य व समाज हे अयथार्थ वाटणार. त्याच्यापुरता राज्याचा मुख्य हेतु विफलच झाला. ज्ञान मिळालें म्हणजे तो खरा नागरिक झाला; उन्नतीच्या मार्गावर प्रवास करण्यास लागणारें पाथेय त्याला मिळालें. ज्ञान मिळालें म्हणजे स्वतःला तो ओळखतो, आपल्याला काय करतां येईल याचा तो अंदाज करूं शकतो. उपलब्ध संधींचा तो फायदा घेऊं शकतो, व त्यानें फायदा करून घेतांना कांहीं तत्त्वांना अनुसरून वागलें पाहिजे व त्यांपैकीं समता हें एक महत्त्वाचें तत्त्व आहे.

लोकशाही राज्यांत प्रत्येकाला सुखपूर्ण जीवन जगण्याचा हक्क आहे हें मान्य केलें जातें. सर्वांचें राज्य म्हणून सर्वांना सुख मिळालें पाहिजे. जेथें राज्य उघड उघड हुकूमशाही आहे अगर विशिष्ट वर्गाच्या ताब्यांत आहे, तेथें सर्व सुखी असावेत हा हक्क मान्य नाहीं. असले तर, झाले तर हरकत नाहीं. पण पहिला विचार जे सत्ताधीश आहेत त्यांचा, त्यांच्या सुखाचा, आणि म्हणून तेथे विषमता नैसर्गिक व आवश्यक आहे असें प्रतिपादलें जातें. जे वञ्चित आहेत, ते अपात्र आहेत; ज्यांना वगळलें आहे ते नालायकच आहेत; जे सुखांत आहेत ते गुणामुळें, दैवामुळें व पूर्वसुकृतामुळें ते तसे राहाण्यांत परंपरा आहे, समाजहित आहे असें सांगण्यांत येतें. या जन्मींच्या सुखाला व सत्तेला, मागील जन्मांतील लायकीचा, पूर्वसुकृताचा, आधार मान्य केला म्हणजे पुढील जन्माची पण त्याच न्यायानें तरतूद होते. समाजांतील सुखावर व संपत्तीवर कांहींना अग्रहक्क देण्यांत तेथे अन्याय वाटत नाहीं. सर्वांना हक्क नाहीं म्हटल्या नंतर कांहींनाच तो आहे व अधिक प्रमाणांत आहे हें स्पष्टच झालें. पण लोकशाही राज्य सर्वांचा सुखाचा हक्क मान्य करतें म्हणून तेथें विषमता राहू शकत नाहीं. ती अपरिहार्य असेल तर ती न्याय्य आहे अगर समाजहितासाठीं आवश्यक आहे असें सिद्ध झालें पाहिजे. प्राप्तीमधील विषमता, अगर सामाजिक प्रतिष्ठेमधील विषमता, सर्वांना सारखी संधि देऊन समाजहितासाठीं अपरिहार्य आहे हें लोकांना पटलें पाहिजे. वंशपरंपरेनें अधिकार असणें ही उघड उघड विषमता आहे. तसें ठेवणें समाजहिताचें आहे, त्यायोगें व्यक्तींचा अधिक विकास होतो असें जोंपर्यंत सिद्ध होत नाहीं व कधींही होणार नाहीं तोंपर्यंत ते ठेवणें अन्यायाचें आहे, समाजां-

तील स्वातंत्र्यावर आक्रमण आहे. थोड्या लोकांनीं चैन करावी, संपत्तींत लोळावें, यांत समाजाचें कोणतें हित? कोण शाबीत करणार? थोडे कोट्यधीश, बहुसंख्यांक कवडीपति. या परिस्थितीत राज्यावर थोडयांचाच कबजा राहील, व ते आपलें हित कायम करण्याच्या दृष्टीनेंच राज्यकारभार चालवतील. उलट सर्वांना सारखी प्राप्ति, सोव्हिएट रशियांत सुद्धां शक्य झाली नाहीं. सर्वांना सारखी प्रतिष्ठापण तेथें शक्य झाली नाहीं. जे उत्कृष्ट काम करणारे त्यांना अधिक सामाजिक प्रतिष्ठा मिळते. अधिक प्राप्तिपण तेथें होते. सेनापति व सैनिक यांना सारखे अधिकार समाज-हिताच्या दृष्टीनें कसे देतां येतील ? व्यवस्थापक व कारकून यांना सारखे अधिकार देणें म्हणजे कामाचा चुथडा करणें आहे. जे राज्याचा बंदोबस्त करतात त्यांच्या कार्याचें महत्त्व लक्षांत घेऊन, अधिक प्राप्ति देणें समाजहिताचेंच असतें. राज्याच्या कार्याची, भवितव्यतेची धुरा वाहाणारे यांना प्रपंचाच्या विवंचनेपासून मुक्त करण्यासाठीं, व जें मानसिक वातातरण, मोठमोठ्या प्रश्नांचा विचार करण्यासाठीं, व्यापक योजना आंखण्यासाठीं, दीर्घसूचनेनें पाहाण्यासाठीं, आवश्यक असतें तें उपलब्ध करून देण्या-साठीं, अधिक प्राप्ति दिली तर त्यांत समाजहित नाहीं का ? नागरिकहक्कांचे दृष्टीनें प्रधान व परीट हे दोघे सारखे, पण सामाजिक कार्याच्या दृष्टीनें, प्रतिष्ठा व प्राप्ति यांत फरक आवश्यक झाला तर तो अन्याय होणार नाहीं. मात्र राज्यांतील कोणतेंही पद प्राप्त करून घेण्याची संधि प्रत्येकाला असली पाहिजे. जन्मानें, अगर मागील जन्माच्या दाखल्यानें कोणीही वगळला जाऊं नये. व्यक्ति समाजांत जें कार्य करीत असेल, ते कार्य उत्कृष्ट होण्यासाठीं, समाजाच्या हितार्थ, जी प्राप्ति व जी प्रतिष्ठा जरूर असेल तेवढीच दिली पाहिजे. कोणाला अग्रहक्क नाहींत. सर्वांना सारखे हक्क आहेत.

सर्वांना सारखे हक्क व जो काय फरक असेल तो केवळ समाजहिताचे दृष्टीनें आवश्यक म्हणूनच राहावा. सर्वांच्या आवश्यक गरजा प्रथम भागल्या पाहिजेत व नंतरच खास गरजांचा विचार झाला पाहिजे. व्यक्तीला त्याचे जीवनविकासाला पुरेल इतकें एक राहाणीचें किमान प्रमाण ठरवून त्याप्रमाणें प्रत्येकाला प्रथम मिळालें पाहिजे. राष्ट्रांतील संपत्ति व सामुग्रीही अशा रीतीनें उपयोगांत आणली पाहिजे कीं, प्रत्येक नागरिकाला अवश्य तें आवश्यक प्रमाणांत मिळालें पाहिजे. याप्रमाणें सर्वांना मिळाल्या-नंतर जें कार्य व्यक्ति करीत असेल, त्याचे दृष्टीनें जेवढें अधिक देणें जरूर असेल तेवढें दिलें पाहिजे. तीव्र शारीरिक श्रम करणारांना अधिक देणें अवश्य आहे तें दिलें पाहिजे. विशिष्ट दर्जाचे बौद्धिक श्रम करणारांना अधिक देणें अवश्य आहे तर तें दिलें पाहिजे. प्रथम व्यक्ति म्हणून अवश्य तें दिलें पाहिजे व नंतर, ती जें कार्य, करते

त्या कार्याला जेवढें अधिक देणें अवश्य असेल तेवढें दिलें पाहिजे. व्यक्तीला कार्यामुळें अधिक मिळेल तें तिनें आपल्या श्रमानें मिळविलें पाहिजे. तिनें केलेल्या कार्याचा तो मोबदला असला पाहिजे. कोणीं तरी श्रमावें व कोणाला तरी प्राप्ति व्हावी असें होतां कामा नये. त्याचप्रमाणें व्यक्ति जें कार्य करील तें सामाजिक पाहिजे, समाजाची गरज पुरी करणारें तें असलें पाहिजे; त्याकार्यानें त्या व्यक्तीचें नव्हे, समाजाचें हित झालें पाहिजे. एका व्यक्तीला अनेक दालनी बंगला व दुसऱ्या दहांना मिळून एक खोली एक व्यक्ति अनेकवेळां दिवसांतून जेवावी व अनेकांना एकदांही पुरें मिळूं नये; एका व्यक्तीनें दिवसांतून ६ वेळां कपडे बदलावे तर इतरांना साही ऋतूंत तेच ते कपडे घालावे लागावेत; एकाला वेळ जात नाहीं म्हणून विवंचना तर दुसऱ्याला पोटासाठीं श्रमून विश्रान्तीलाही वेळ मिळूं नये ही परिस्थिति, सर्वांना सुखाचा हक्क आहे याशीं विसंगत आहे. यांत सर्वांचें सुख तर नाहींच पुष्कळांचें पुष्कळ सुखही नाहीं, तर कमींत कमी लोकांचें जास्तींत जास्त सुख आहे. सर्वांना राहाण्यास आवश्यक, व अवश्य तितक्या सोयींचीं घरें झाल्याशिवाय कोणालाही बंगला बांधण्याचा हक्क नाहीं. बाप प्रधान होता म्हणून मुलाला मोठा वाडा पाहिजे, बाप गिरणीवाला होता म्हणून मुलाला चार मोटारी पाहिजेत, हें म्हणणें मूर्खपणाचें आहे. लोकशाहींत लौकिक ही व्यक्तिगत बाब आहे. आपल्या परिश्रमानें मिळविलें पाहिजे व आपल्या पराक्रमानें विख्यात झालें पाहिजे. सर्वांना जरूर तें मिळून लायकीप्रमाणें अधिक मिळण्याची संधि सर्वांनाच असली म्हणजे झालें हें राज्यसत्तेनें शक्य केलें पाहिजे, आपल्या व्यवस्थेनें हें घडवून आणलें पाहिजे. श्रीमंतांच्या गरजांकडेच लक्ष दिल्यानें हें कधींही होणार नाहीं. शिवाजीनगरांतील रम्य वसाहती जरी अवश्य ठरल्या तरी प्रथम कसब्यांतील घाण व गर्दी काढून टाकली पाहिजे. समाजांत इतिहाससंशोधनाची सोय आवश्यक ठरली तरी प्रथम प्राथमिक शिक्षणाचीं शालागृहें बांधून नंतर संशोधन-मंदिरें उभारलीं पाहिजेत, आवश्यक सोयी प्रथम व नंतर सार्वजनिक पण खास सोयी असा क्रम पाहिजे. ज्या सोयी नसतील तर व्यक्तींना जीवन अर्थशून्य वाटेल, त्या सोयी योग्य प्रमाणांत, सर्वांना भेदाभेद न करतां मिळाल्या पाहिजेत. अन्न, वस्त्र, निवास वगैरे सोयी, सर्वांना सारख्या मिळाव्यात याचा अर्थ ज्याला ज्या प्रमाणांत मिळणें योग्य आहे त्या प्रमाणांत मिळाल्या पाहिजेत व तें प्रमाण, व्यक्तींच्या कार्या-वर अवलंबून राहील. समता म्हणजे योग्य प्रमाण, व्यक्तीच्या दृष्टीनें काढून अगर ठरवून त्यांस उपलब्ध करून देणें. व्यक्तीच्या गरजा म्हणजे त्याला त्याच्या जीवन-साफल्यासाठीं अवश्य वाटणाऱ्या राहाणीची मागणी. व्यक्ति विविध प्रवृत्तींच्या व

म्हणून प्रत्येकाची साफल्याची, विकासाची कल्पना निराळी. नांगरणाऱ्या शेतकऱ्याची कल्पना लेखणी चालविणाऱ्या ग्रंथकाराचे कल्पनेशीं जुळणार नाहीं. कल्पनेंत वावरणाऱ्या कवीची कल्पना व व्याजामुद्दलाचा हिशेब करणाऱ्या सावकाराची कल्पना निरनिराळी. विविधता आहे म्हणून ज्या अवश्य गोष्टी, ज्या अवश्य गरजा, जें किमान प्रमाण ठरलें आहे त्यांत विषमता करून, एकाला देऊन दुसऱ्याला वगळणें न्याय्य ठरणार नाहीं. या बाबतींतील सर्वांची मागणी व सर्वांची गरज सारखीच निकडीची मानली पाहिजे व ती भागल्यानंतरच जी सामुग्री समाजांत उरेल, ती व्यक्तींना, त्यांचीं त्यांचीं कार्यें उत्कृष्ट रीतीनें करून, समाजाला ती जास्तींत जास्त उपयोगीं पडेल अशा रीतीनें वांटून दिली पाहिजे.

प्रत्येकाला योग्य प्रमाणानें दिल्यानें समता राहाते, अगदीं एकसारखें दिलें म्हणजेच समता राहाते असें नाहीं. पण हें योग्य प्रमाण काढणें सोपें नाहीं. हा बव्हंशीं आर्थिक प्रश्न आहे. राष्ट्रांतील उत्पन्नावर, संपत्तीवर प्रत्येक नागरिकाला किती हक्क आहे व कोणत्या परिस्थितींत तो कसा उपलब्ध करून द्यावा, हें ठरविणें मात्र जरूर होतें. प्राप्ति गरजेप्रमाणें का श्रमाप्रमाणें ? असा प्रश्न मग उपस्थित होतो. सर्वांना सारखें मिळावें, भेदाभेद होऊं नये म्हणजे काय ? हेंही स्पष्ट करणें प्राप्त होतें. सारख्या श्रमांना सारखा मोबदला, हें मान्य करून श्रमांना मोजणारें माप न सांपडलें तर कसें वागावें ? हा प्रश्न उभा राहातोच. कंठमधुर आलापांनीं आनंदविणारी गायिका, सुग्रास भोजनांनीं प्रसन्नता देणारी स्वयंपाकीण यांचे श्रम कसे मोजावयाचे ? चरचरीत टीका करून चर्चेला खाद्य देणारा वर्तमानपत्रकार, सर्व बाजू ऐकून घेऊन न्याय देणारा न्यायाधीश, यांचे श्रम कसे मोजावयाचे ? आणि त्याहीपेक्षां त्यांच्या श्रमाच्या प्रति कशा लावावयाच्या ? कांहीं वेळां, ज्यांनीं श्रम केले, समाजाची सेवा केली, ते मान्यता मिळण्यापूर्वींच मरून जातात. जिवंतपणीं लाथा व मेल्यावर समाज त्यांना माथ्यावर घेतो असेंही होतें, मग त्यांच्या श्रमांचें चीज, त्याचें मूल्य यथार्थ झालें तरी त्याला त्याचा काय उपयोग ? साक्रेटिसानें सत्य अमर करून जगाची अमूल्य सेवा केली पण जीवंतपणीं विषाचाच प्याला हें त्याच्या श्रमाचें पारितोषिक त्याला मिळालें. समाजानें ख्रिस्ताला सुळावर चढविलें, त्याची योग्यता मृत्यूनंतरच जगाला कळली. गवंडी—सुतार, एंजिनीयर यांच्यांत क्रम तरी लागेल, पण एंजिनीयर व व्याकरणकार, गवंडी व बँकेंतील कारकून यांत क्रम कसा ठरणार ? समाजासाठीं श्रम करणारास श्रमाप्रमाणें मिळावें म्हटल्यानें वरीलप्रमाणें अडचणी येतात. गरजेप्रमाणें द्यावें म्हटलें तर प्रत्येकाची गरज सारखी नाहीं व

प्रत्येकाचे श्रम अगर प्रयत्नही इतके सारखे नसतात कीं त्यांना सारखी प्राप्ति व्हावी. तथापि, गरजेप्रमाणें मिळावें याचा अर्थ आवश्यक तेवढ्या गरजेपुरतें, किमान राहाणी-पुरतें मिळावें, येवढाच धरला तर तेवढ्यापुरतें चालेल. पण तेवढ्यानें प्रश्न संपूर्ण-पणें सुटत नाहीं. सर्वांच्या कांहीं गरजा सारख्या असतात, कांहीं मर्यादेपर्यंत सारख्या असतात, पण नंतर विविधता त्यांत येते हें विसरून चालणार नाहीं. अवश्य त्या प्राथमिक गरजा भागल्यानंतर मनुष्याला कांहीं अधिक करावेंसें वाटतें, त्याच्या कर्तृत्वबुद्धीला चालना मिळते. विविध प्रवृत्तींना अनुसरून तो कार्यप्रवण होतो. तो करीत असलेल्या कार्याचे दृष्टीनें त्याचें सामाजिक महत्त्व लक्षांत घेऊन, त्याला प्राप्ति मिळणें योग्य आहे. मर्यादेपर्यंत गरजेला अनुसरून, मर्यादेनंतर केलेल्या श्रमांना लायकीप्रमाणें, प्राप्ति मिळावी यांत वाजवी न्याय आहे. प्राथमिक गरजा, अवश्य त्या गरजा सर्वांच्याच एका मर्यादेपर्यंत सारख्या, तेथपर्यंत सर्वांना सारखें वेतन, यांत कोणता अन्याय आहे? उलट प्रत्येक व्यक्तीला, आपल्या विकासाला अवश्य तेवढें मिळालें, यापुढें आपण मिळवावें असेंच वाटेल. एका बाजूनें स्थैर्य येतें, सुरक्षितता वाटते व दुसऱ्या बाजूनें आकांक्षा उत्पन्न होते, कर्तृत्वाची ओढ लागते. उपास-मारीची भीति नष्ट झाली म्हणजे मनांत उल्हास उत्पन्न होतो, मन कार्यप्रवण होतें. जे समाजांत दुर्बल आहेत त्यांनाही अवश्य तेवढें मिळून, त्यांचें संरक्षण होतें व जे समर्थ आहेत त्यांना वाटेल तेवढें घेऊन दुसऱ्यांना वंचित करणें अशक्य होतें. समाज म्हणजे कांहीं शर्यत नव्हे, कीं जो पुढें जाईल त्यालाच बक्षीस व जो मागे मागें राहील तो नष्ट. समाजानें सर्वांची काळजी वाहिली पाहिजे. त्याचसाठीं तर समाज आहे व ज्या प्रमाणांत समाज–राज्य, हें करील, त्यावर त्याचें यथार्थत्व अव-लंबून राहील. कांहींची काळजी करणें म्हणजे इतर कांहीं माणसेंच नाहींत असा अर्थ होतो. उत्पादन मनुष्य करतो, पण निव्वळ उत्पादनाचें साधन, निव्वळ एक वस्तु त्यास मानणें चूक आहे. उत्पादनाचें साधन तो आहे, पण त्याचेसाठींच उत्पादन आहे. समाजवस्थेंत यासाठींच समतोल पाहिजे. एकाच वर्गाचें जर हित होत असेल तर इतरांना त्यांत सुखापासून वंचित करणें आहे, वगळणें आहे, त्यांना एकाच वर्गासाठीं खपण्यास सांगणें आहे. एकानें स्वतःसाठीं न श्रमतां, स्वतःच्या सुखाची होळी करून दुसऱ्यासाठीं श्रमणें गुलामगिरीच आहे. गुलाम दुसरें काय करतात?

वरील विचारसरणीवर कोणी असा आक्षेप घेतील कीं जर समाजांत सर्वांना पुरेल इतकें नसेल तर ही व्यवस्था व्यर्थ आहे. मनुष्यांना गरज आहे एवढें उत्पादन करतां येत नाहीं. या स्थितींत कुठलाही निर्बंधन न घालतां, ज्याला जें करतां येईल

तें त्यानें करावें, आपल्या शक्तीप्रमाणें गरजा भागविण्याकरितां जेवढें मिळवितां येईल तेवढें मिळवावें अशी व्यवस्था करणें योग्य नाहीं का ? यामुळें जे लायक आहेत, जे गुणी आहेत, तेच या चढाओढींत किंवा आयुष्याच्या शर्यतींत टिकतील; जे नालायक आहेत ते निवडून बाजूला पडतील. शर्यत सर्वांनाच मोकळी आहे, यांत अन्याय कोणता ? या आक्षेपाला उत्तर द्यावयाचें म्हणजे राज्य हें कशासाठीं आहे हें सांगितलें पाहिजे. राज्य हें सामाजिक हितासाठीं, व्यक्तींच्या संरक्षणासाठीं, सुव्यवस्थेसाठीं, सामान्य नियमांच्या बजावणीसाठीं आहे. मनुष्य सामाजिक आहे. तो जें मिळवितो तें राज्याचें संरक्षण आहे म्हणूनच. त्यानें मिळविलें व त्याचेपेक्षां जबरदस्तानें हिसकावून घेतलें, असें झालें तर समाज, समाज न राहातां एक आखाडा होईल. जो जबरदस्त तो घेईल. जो लाठी चालवील तोच टिकवील. लहानांना, दुर्बलांना, मोठ्यानें व सबलानें मटकावें हा जंगलाचा कायदा झाला; ही नीति पशुपक्षांतील झाली. मिळविलेलें राहावें, श्रमाचें फळ श्रम करणाऱ्यांना मिळावें हें न्याय्य आहे व हा विश्वास व न्याय, समाज अगर राज्य म्हणजे नियंत्रणशक्ति असेल तरच शक्य आहे. या शक्तीनें अगर संस्थेनें हा न्याय व हा विश्वास सर्वांनाच दिला पाहिजे. राज्य हें सामाजिक हितासाठीं आहे म्हणून व्यक्तींची शक्ति ही समाजहितविरोधी चालूं देणें म्हणजे राज्याचे मौलिक सिद्धांतावर आघात आहे. सावली पाहिजे तर हातांत छत्री धरली पाहिजे, त्यानें एक हात गुंतला म्हणून तक्रार करणें अयोग्य आहे. समाजाचें संरक्षण पाहिजे तर राज्याचे हेतूविरुद्ध वर्तन क्षम्य ठरणार नाहीं. व्यक्तींची शक्ति राज्याचे सिद्धांतांना अनुसरूनच श्रमली पाहिजे. राज्यव्यवस्थेशीं विरोध न येईल अशी तिची चाल असली पाहिजे. राज्यव्यवस्थेचा हेतु जर सर्वांना सुख लाभावें असा आहे, तर त्या हेतूविरुद्ध वागून व्यक्तींना स्वतःसाठीं वाटेल तेवढें मिळविणें अन्याय्य आहे. हेतूविरुद्ध वागून संरक्षण घ्यावयाचें यांत द्रोह आहे. म्हणून जर समाजांत सर्वांना पुरेसें नसेल तर सर्वांनींच कमी कमी घ्यावें. सर्वांना अगदीं आवश्यक तें मिळाल्याशिवाय कोणालाही रतिमात्र जास्त घेण्याचा हक्क नाहीं. कांहींनीं पोळी खावी व कांहींना भाकरीही मिळूं नये हें अन्याय्य आहे. सर्वांना भाकरी भरपूर मिळाल्याशिवाय कोणालाही पोळी मिळूं नये हें रास्त आहे. दुसरा उपाशी आहे तोंपर्यंत पहिल्याला चैन करण्याचा हक्क नाहीं. तो हक्क मान्य केल्यास दुसऱ्यास उपाशी राहून मरावें लागेल व हें समाजानें, राजसत्तेनें चालूं दिलें तर ती आपलें मौलिक कर्तव्यच करण्यास चुकली असें होईल. सर्वांना अवश्य तें मिळण्याचा सारखा हक्क आहे, तो समाजव्यवस्थेनें अशक्य करणें अगर नाकारणें, म्हणजे मनुष्यांना मनुष्य न मानणें आहे, त्यांचें जीवन अर्थहीन करणें आहे.

समाजव्यवस्थेनें सर्वांची अवश्य ती गरज भागवून नंतरच अनवश्यक अगर अन्य गरजेकडे लक्ष पुरवावें. हें तत्त्व अव्यावहारिक नाहीं, अंमलांत आणणें अशक्य नाहीं. आज मोठ्या प्रमाणांत सोव्हिएट रशियांत त्याची अंमलबजावणी होत आहे. पूर्वी हें अमलांत आणलें नाहीं म्हणून तें आणणें धोक्याचें आहे ही विचारसरणी स्वार्थी आहे. नवीन आहे म्हणून त्याज्य मानणें गैर आहे. वास्तविक तें नवीनही नाहीं. त्यामधील समताभाव हा समाज या कल्पनेंतील एक भाग आहे. समाज या वस्तूचे घडण्यांत काय काय वैचारिक द्रव्यें आलीं याचा पुरता ठाव अजूनही घेतला गेला नाहीं. तथापि, समता हें त्यांतील प्रमुख द्रव्य आहे ही गोष्ट स्पष्ट आहे. समाज टिकावयाचा, जिवंत राहावयाचा तर त्यांतील मौलिक सिद्धांत पण टिकले पाहिजेत. ते अधांतरीं नसतात. ते व्यक्तींच्या अनुभवांत जिवंत राहातात. व्यक्तींचा अनुभव हाच त्यांचा देह आहे. म्हणून व्यक्तींना अनुभवांतही समता आली पाहिजे. ही अनुभवांत आल्यानें समाजव्यवस्था बिघडणार नाहीं, चांगली सुदृढ होईल. ही समता समाज-व्यवस्थेंत नसल्यामुळें आजपर्यंतच्या अनेक व्यवस्था कोलमडून पडल्या आहेत. विटे-वर वीट रचून भिंत भक्कम होत नाहीं, तिला पाया घ्यावा लागतो, ती ओळंब्यांत राहावी लागते. समाजांत समाधानाचा तोल नसेल तर समाजव्यवस्था कोलमडेल. समाजांत समाधान, सर्वांना अवश्य तें मिळेल तेव्हांच उत्पन्न होईल. मनुष्यांना विकासाला, जीवनाला जरूर तें मिळालें नाहीं म्हणजे तो तें कां मिळत नाहीं याचा विचार करतो. सुख व समाधानाची धार कोणा शुक्राचार्यामुळें अडून राहिली हें शोधून काढतो. विरोधक व्यक्ति व संस्था यांना नाहींशा करण्याचा व्यक्तिशः अगर संघशः तो प्रयत्न करतो. स्वस्थ बसून, झिजून, तो उपाशीं मरणार नाहीं. समाजांत एक वर्ग मुबलक सुख भोगीत आहे, चैनींत आहे व बहुसंख्यांक उपाशी मरत आहेत हें दृश्य जे उपाशीं मरतात त्यांचे मनांत प्रक्षोभच उत्पन्न करतें. समाज-व्यवस्थेंतील अन्याय त्यांच्या डोळ्यांपुढें अगदीं ठळकपणें दिसतो. मुकी व भूकी जनता बोलली नाहीं तरी हातानें काम करते. मर्यादेबाहेर अन्याय दुर्बलांना सबळ करतो, मुक्यांना बोलके करतो, पंगूंना धावून जाण्याची गति देतो, सुप्त वड-वानल जागा करतो. खरोखर समाजांत असें होणें अपरिहार्य नाहीं. सर्वांना एक-सारखें द्यावें अगर लेखावें असें येथें सांगितलें नाहीं. एकाच खाणींत सांपडतात म्हणून दगड व हिरे यांचे एक माप लावण्यास कोणी सांगत नाहीं. दूध आणि लोणी एका मापानें कोणी येथें मागत नाहीं. मनुष्यांतील विविधता मान्य करून ती समा-जाचे दृष्टीनें अधिक विधायक व्हावी, तिला वाव मिळावा, यासाठीं सर्वांना प्रथम

मनुष्य म्हणून जिवंत राहातां आलें पाहिजे. ही व्यवस्था सर्वांच्या आवश्यक गरजा प्रथम भागविल्यानें होणारी आहे. सर्वांना ज्या गरजा सारख्या आहेत त्यांत सर्वांना सारखी वागणूक मिळाली पाहिजे. राज्यव्यवस्था जर त्यांत विषमता उत्पन्न करील, खास अधिकार कोणाला देईल तर तें अन्यायाचें ठरेल, नव्हे घातुक ठरेल. खास अधिकार हा आक्रमक प्रवृत्तीचा असतो. एका क्षेत्रांत मिळाला कीं अन्य क्षेत्रांत तो येतोच. कांहींनाच शिक्षण शक्य झालें म्हणजे त्यांनाच अधिकारपदें मिळतात, तेथेंही ते अग्रहक्क सांगतात. खास अधिकार एकदां मिळाले म्हणजे आपण होऊन कोणी सोडीत नाहींत. फार काय, ते राहावे, म्हणून देशाचें स्वातंत्र्यहि मोबदल्यांत देण्यास हे खासे लोक तयार होतात असा इतिहासाचा दाखला आहे. समाजाचे संरक्षणाखालीं खास हक्क घेऊन समाजाचे हितावरच वार करावयाचा असा या खास हक्कांचा लौकिक आहे. म्हणून कोणालाही खास हक्क नसावेत. सारख्या गरजांची प्रथम सोय करून नंतर मनुष्यांतील विविधतला सामाजिक कार्याच्या दृष्टीनें योग्य वाव देणें यांत कोणाचेही व्यक्तित्व मारलें जात नाहीं; उलट या समाजव्यवस्थेनें व्यक्तींच्या कर्तृत्वाला योग्य वातावरण उपलब्ध होतें, त्यांच्या गुणविकासाला आवाहनच दिलें जातें.

वरील व्यवस्थेंत मनुष्यांच्या विविधतेला समाजहिताच्या दृष्टीनें वाव मिळावा म्हणून जरूर तेवढीच विषमता आहे. या विषमतेमुळें मनुष्यांचे प्राप्तींत सारखेपणा राहाणार नाहीं हें खरें आहे. पण त्याजबरोबर कोणालाही इतकें मिळणार नाहीं कीं, त्याच्या जोरावर तो समाजांतील व्यवस्थेवर वजन मारील अगर वर्चस्व गाजवील. विद्यमान विषमतेंतील अनुभव अगदीं उलट आहे. आपल्या कार्यानें अगर गुणानें नव्हे तर आपल्या संपत्तीच्या जोरावर कांहींजण समाजव्यवस्थेंत वर्चस्व गाजवतात. त्यांचें सामाजिक अगर राजकीय वजन हें त्यांच्या संपत्तीची प्रतिष्ठा आहे. त्यांच्याकडून संपत्ति गेली कीं ही प्रतिष्ठाही जाते. मालकाला महत्त्व नाहीं, मालकीला आहे. संपत्तीच्या जोरावर, या मालकीचे जोरावर स्वतःच्या इच्छेनुसार समाजाचे व्यवस्थेंत, उत्पादनांत ते वाटेल तें करूं शकतात. समाजाची गरज विचारांत न घेतां नफा होईल म्हणून अनवश्यक उत्पादनाकडे साधनसामुग्री खर्ची घालतात. संपत्तीचे जोरावर, पुंजीच्या जोरावर, ज्ञानसाधनावर कबजा करतात. या लोकांच्या ताब्यांत वर्तमानपत्रें जाणें म्हणजे हाच अर्थ होतो. प्रचाराचीं साधनें हातांत घेऊन ते लोकमताचा ताबा मिळविण्याचा प्रयत्न करतात. संपत्तीचे जोरावर उत्पादनव्यवस्था त्यांना पाहिजे तशी करून घेऊन जे केवळ श्रमावर जगणारे बहुसंख्यांक लोक आहेत त्यांचें जीवन

लाचार करतात. संपत्तीचे जोरावर देशी व परदेशी राजकारणावर वर्चस्व गाजवितात. हत्यारांच्या कारखानदारांस नफा व्हावा म्हणून युद्धाचें वातावरण व युद्ध या लोकांनीं निर्माण केल्याचीं उदाहरणें आहेत. यांना नफा व्हावा म्हणून देशांतील लाखों लोकांनीं शांततेच्या काळीं पोटापुरतें घेऊन जिवंत राहावें व लढाईच्या वेळीं तो नफा कायम राहावा म्हणून लाखोंनीं मरावें यांत त्यांना समाजहितविरोधी कांहीं आहे असें वाटत नाहीं. या सर्व अनर्थांचें मूळ समाजांतील विषमता आहे. विषमतेमुळें विषमता वाढते. संपत्तीची वांटणी अधिकाधिक विषम होते. विषम वांटणी असलेल्या समाजांत लोकांशीं राज्यसत्तेची वागणूकही विषम असते. कारण राज्यसत्ता संपत्तीचे आहारीं गेलेली असते. ज्या वेळीं संपत्तीचें राजकीय महत्त्व कमी होईल, नव्हे नाहींसें होईल, त्या वेळीं सर्वांना राज्यसत्तेकडून समतेनें वागविलें जाईल. समतेला तेव्हां राज्यसत्ता यथार्थानें मान्यता देईल. हें व्हावें म्हणून संपत्तीची विषम वांटणी अशक्य झाली पाहिजे; म्हणजे कोणालाही इतकें मिळूं नये कीं, त्यानें त्याचे जोरावर वर्चस्व गाजवावें. संपत्तीची विषमता समाजांत राहिली तर स्वातंत्र्य राहाणें मुष्कील आहे. कारण ज्यांच्या हातांत संपत्ति ते आपल्या इच्छेनुसार जे "नाहींरे" आहेत त्यांचा जीवनक्रम ठरवीत असतात. उत्पादनावर तर त्यांचाच ताबा असतो. राज्यसत्ता त्यांची संदेशकारिका दासी असते, देशांतील विधिमंडळें त्यांच्याच मुखत्यान्यानीं भरलेलीं असतात. बेकार व धनहीन साहित्यिकांना व लेखकांना पुरस्कार व पगार देऊन त्यांना जें पाहिजे तें साहित्य, ती संस्कृति ते निर्माण करून देशाचे बौद्धिक जीवनावर कबजा करण्याचा प्रयत्न करतात. शिक्षणसंस्थांना त्यांची मदत मिळत असते, याचा अर्थ, त्यांना विरोध उत्पन्न करील, त्यांच्या संचितावर आघात करील असें शिक्षण दिलें जात नाहीं अशी खात्री असते म्हणूनच. फार काय, राज्यांतील न्यायादानाचा कांटासुद्धां त्यांच्याच हिताचे बाजूनें झुकतो. विद्यमान न्यायाधीश पूर्वाश्रमींचे वकील असतात, धंद्यामध्यें यांच्याशीं संबंध आलेला असतो, राज्यसत्ता व यांचे संबंध त्यांना अवगत असतात. न्यायदेवता आंधळी असेल, पण न्यायाधीश डोळस असतो. न्यायार्थ मांडलेल्या प्रश्नांचा केवळ न्यायाचे दृष्टीनें विचार करणें, यांतील धोका त्याला सहजप्रवृत्तीनें कळतो. संवत्सराचे सुरवातीस सरस्वतीपूजन करणारा धर्म सालअखेर लक्ष्मीपूजन करून लक्ष्मीचेंच श्रेष्ठत्व शेवटीं दर्शवितो. या व्यवहारज्ञ लक्ष्मीपूजकधर्माची जोडही या लक्ष्मीपुत्रांना मिळते. तात्पर्य, विषमतेच्या वातावरणांत स्वातंत्र्याची गळचेपी सर्व बाजूंनीं, सर्व दृष्टींनीं होते. विषमता व स्वातंत्र्य यांत तडजोड नाहीं. एक आहे तर दुसरें नाहीं इतकी त्यांची मैत्री आहे !!

राजकीय समता, जर समाजांत आर्थिक विषमता असेल तर निष्फळ ठरते. आर्थिक विषमतेमुळें राज्यसत्ता पुंजीवाद्यांची, ज्यांचे हातांत आर्थिक सत्ता आहे त्यांची "करणेषु दासी" होते. आर्थिक सत्तेला, संपत्तीला, हें राजकीय महत्त्व स्वयंभूच आहे असें मानण्याचें कारण नाहीं, पण इतिहासांतील घटनेमुळें तें तिला प्राप्त झालें आहे ही शल्यवत् पण सत्य गोष्ट आहे. थोड्यांचे हातांत राज्याधिकार म्हणजे थोड्या श्रीमंतांचे हातांत राज्यकारभार. बहुसंख्यांकांचे हातांत राज्याधिकार, लोकशाही राज्यकारभार म्हणजे गरिबांचे हातांत राज्यकारभार असा जणूं कांहीं सिद्धांतच ठरला आहे; नव्हे, ॲरिस्टॉटलनें तो मांडला आहे. संपत्ति व राजकीय सत्ता यांची युति बहुजनसमाजाच्या हिताला अनर्थ करणारी असा अनुभव सारखा आला आहे, येत आहे. संपत्तीचे विषम वांटणीविरुद्ध झगडा हा प्रायः राजकीय झगड्याची पार्श्वभूमी आहे असें म्हटलें तर चुकीचें नाहीं. समाजांतील संपत्ति व तिचे उत्पादनाचीं साधनें हीं अधिक अधिक केंद्रित होणें, म्हणजे राज्यसत्तेवर आर्थिक सत्तेचा, संपत्तीचा ताबा अधिक अधिक बसणें, असा अनुभव आल्यामुळें आर्थिक समतेला अधिक महत्त्व आलें. समाजांतील आर्थिक व्यवस्थेनें समाजाचा इतिहास घडवून आणला; समाजाची प्रगति अगर परागति ही आर्थिक संबंधावर अवलंबून आहे, इतकें महत्त्व संपत्तीला, अर्थोत्पादनाला देण्यांत आलें. मार्क्सनें तर सर्व इतिहासाचा अन्वय-अर्थ, केवळ अर्थोत्पादनाचे पध्दतीनें लावला. तथापि, येवढी गोष्ट निश्चित कीं, संपत्तिमान् लोकांनीं राज्यावर, राज्यसत्तेवर सारखा ताबा ठेवण्याचा प्रयत्न केलेला आहे. राज्यसत्तेनें संपत्तीला ताब्यांत न ठेवलें तर संपत्ति राज्यसत्तेचा कबजा घेईल ही भीति अस्थानीं नाहीं. हें होऊं नये याला परिणामकारक उपाय म्हणजे आर्थिक समता समाजांत निर्माण करणें व संपत्तीची विषम वांटणी अशक्य करणें. समाजांतील बहुतेक कलहांचें मूळ पैसा आहे, संपत्ति आहे. कारण त्यामुळें समाजांत प्रत्यक्ष सुखोपभोगाचे दृष्टीनें विषमता उत्पन्न झालेली आहे. सुखाचें साधन पैसा, हा अनुभव आहे. जगाचा व्यवहार अर्थमूल आहे. समाजांत मनुष्यांचें महत्त्व संपत्तीनें ठरत आहे तोंपर्यंत 'सर्व सुखिनः सन्तु' हें कठीण आहे. प्रत्येकजण दुसऱ्याचें 'भद्रच' पाहील असें नाहीं. 'धन' हेंच सर्वस्व असल्यामुळें तें मिळाल्यास कोणी घेणार नाहीं असें होणार नाहीं. उलट धनप्राप्तीसाठीं—कारण त्यामुळें सुख व सन्मान प्राप्त आहे हें जाणून वाटेल तें करणारीं माणसें समाजांत उत्पन्न होतात. द्वेष, मत्सर, अहंकारादिक भावना यामुळें समाजांत साहजिक वाढतात व समाजांतील एकी कमी होते. एकीचा भाव लोकांचे मनांत कमी कमी होत जातो. ज्याला मिळेल त्यालाच महत्त्व

असल्यामुळें तो स्वतःसाठींच व स्वतःचेच दृष्टीनें मिळविण्याचा प्रयत्न करील. सर्व लोकांनीं मिळून मिळवावें हा भाव या वातावरणांत व्यक्तीचे मनांत येणार नाहीं. संपत्तीला समाजांत श्रेष्ठत्व देणें व तिचे इषाऱ्यावर राजकीय सत्ता चालणें, म्हणजे समाजांत व्यक्तींच्यामधील स्वार्थी व वैयक्तिक भावनांनाच आवाहन देणें आहे. सामाजिक दृढतेपेक्षां व्यक्तीव्यक्तींमधील पृथक्त्वाला या परिस्थितीत महत्त्व मिळतें, वेगळेपणाच्या भावाची जोपासना अधिक होते. आपण मिळवून आपण मोठे होऊं, कारण मिळविण्यावरच मोठेपण आहे अशी भावना सर्वत्र पसरते. समाजांतील मान्यता व सुख संपत्तीवर नाहीं हें घडवून आणण्यासाठीं संपत्तीची वांटणी समाजांत सारख्या प्रमाणांत, निदान जास्तींत जास्त सारख्या प्रमाणांत होणें जरूर आहे. तसें झालें म्हणजे लोकांना त्यांच्या गरजेचा विचार होऊन मिळेल. संपत्ति अगर प्राप्ति ही सर्वांना साधारणपणें सारखी असल्यामुळें तिचें वैशिष्ट्य नष्ट होईल. ही आर्थिक समता घडवून आणण्याचें साधन म्हणून राजकीय समतेला महत्त्व आहे. मतदानाचा हक्क सर्वांना आहे तर सुखाचा हक्क सर्वांना कां नसावा ? तो जर आहे तर लोकमतावर चालणारी राज्यसत्ता तिनें तो सर्वांना उपभोगितां येईल अशी परिस्थिति कां निर्माण करूं नये ? राज्यसत्तेला योग्य ती व्यवस्था अमलांत आणून सर्व लोकांच्या प्राथमिक व आवश्यक गरजा भागवितां येतील—राज्यसत्तेवर विवक्षित वर्गाचेंच वर्चस्व असेल तर हें होणें अशक्य आहे. प्रत्यक्ष राज्यसत्तेवर, राज्यकारभारावर कोणा एका हिताचें अगर वर्गाचें वजन न राहातां राज्यकारभारांत सर्वसामान्य जनतेचें वजन राहील तर हें शक्य आहे. तसें झालें म्हणजे सर्वांच्या प्राथमिक गरजा सारख्या मानल्या जातील व खरें सार्वजनिक हित डोळ्यांपुढें ठेवून समाजांतील सामुग्रीचा विनियोग होईल. व्यक्तींनाही मग आपोआपच आपल्या गरजा समाजहिताशीं जुळवून घ्याव्या लागतील. अधिक मिळवून जर सत्ता अगर सन्मान मिळणें अशक्य झालें तर अधिकाधिक मिळविण्याचा व्यक्तींमधील हव्यास खास कमी होईल. संपत्ति ही सन्मानाची प्रवेश-पत्रिका नसेल, सत्ता मिळवण्याचें साधन नसेल, समाजांत मनुष्यांच्या योग्य त्या गरजा राज्यव्यवस्थेनें भागत आहेत, अशी परिस्थिति उत्पन्न झाली म्हणजे केवळ संपत्तीसाठीं संपत्ति मिळविणारे—या 'धनकाव्यां'त मस्त राहाणारे क्वचितच उत्पन्न होतील. लायकी अगर महत्त्व हें संपत्तीवर ठरत नाहीं हें निश्चित झालें म्हणजे संपत्ती-चेंही महत्त्व नाहींसें होतें.

सर्वांजवळ सारखी संपत्ति, अगर जास्तींत जास्त प्रमाणांत सारखी संपत्ति व्हाव-याची म्हणजे संपत्तीच्या उत्पादनाची व्यवस्थाही त्याला अनुकूल अशीच असणें

अपरिहार्य आहे. तेथें समाजांत होणारें उत्पादन व समाजाची गरज यांच्यांत मिलाफ असला पाहिजे. बेजबाबदार कारभार, अनियंत्रित सत्ता उत्पादनकार्यांत राहाणार नाहीं. योजना ही समाजांतील साधनसामुग्री व समाजाची गरज लक्षांत धरूनच आंखली जाईल. उत्पादनांत मजुरांना आपण निव्वळ श्रमविके आहोंत अशी भावना न राहातां त्याचे व्यवस्थेंत आपला भाग आहे अशी जाणीव त्यांच्यांत येईल व त्यामुळें करीत असलेल्या कार्यांत जबाबदारीची वृत्ति उत्पन्न होईल. अधिकारस्थान गुणांमुळें मिळेल, केवळ अधिकाऱ्यानें सांगितलें म्हणून कोणी मानणार नाहीं, कार्याचे दृष्टीनें तें अवश्य आहे याची खात्री पटली म्हणजेच तें मानलें जाईल. मजूर व व्यवस्थापक यांच्या सहकार्यानें व विचारविनिमयानें कारभार चालेल. योग्य कारणाशिवाय कोणालाही ‘ कटविलें ’ जाणार नाहीं. समाजहिताचे दृष्टीनें होणाऱ्या उत्पादनांत अधिकारही कार्यपरत्वेंच राहील. तो कोणा व्यक्तीला केवळ व्यक्ति म्हणून कधींही असणार नाहीं. केवळ व्यक्ति म्हणून अधिकार आला म्हणजे तेथें बेजबाबदार कारभार आलाच. मग तेथें समताभावही नाहीं व आर्थिक समताही उत्पन्न होणार नाहीं. काम करणारे व काम सांगणारे, यांच्यांत अखंड वैरभाव, हितैक्य नसल्यामुळें उभा असतो. उत्पादन म्हणजे मालक व मजूर यांच्यांतील रणभूमि असें स्वरूप त्याला येतें; केव्हां भडका उडेल याचा नेम नसतो. समाजाला ज्या गोष्टी अगदीं आवश्यक आहेत अशांचें उत्पादन खाजगी मालकीचें ठेवणें यांत तर अत्यंत धोका असतो. वीज, वाहातूक वगैरेसारखे धंदे खाजगी मालकीचे ठेवण्यांतला धोका समाजाचे अनुभवाला चांगलाच आला आहे. ज्या ज्या गोष्टींचें उत्पादन समाजाला आवश्यक आहे तें सर्व समाजाचे व समाजाच्या नियंत्रणाखालीं आलें पाहिजे. वास्तविक समाजांतील सर्वच उत्पादन सामाजिक मालकीचें झालें तर खरी आर्थिक समता उत्पन्न होणें शक्य आहे. निदान महत्त्वाच्या बाबींचें उत्पादन समाजाच्या मालकीचें व अन्य सर्वांवर नियंत्रण तरी असलें पाहिजे. समाजाचें संरक्षण ही एक महत्त्वाची बाब आहे, ती जर खाजगी व्यक्तींच्या हवालीं केली अगर त्यांचेवर सोंपविली तर गांवोंगांव संघ व दलें निघून समाजांतील शांतता संपेल. संरक्षण जसें राज्यसत्तेनेंच आपले हातीं महत्त्व जाणून सर्वस्वीं घेतलें आहे तसेंच वाहातूक, वीज, कोळसा, विमा, बँका, वगैरे महत्त्वाचे, आवश्यक व कटीचे ( Key industries ) धंदे सरकारी मालकीचे व सरकार नियंत्रणाखालीं आले पाहिजेत. तत्संबंधींची व्यवस्था कशी असावी हें परिस्थितीप्रमाणें ठरलें जाईल. स्वातंत्र्याच्या दृष्टीनें सामाजिक मालकी व नियंत्रण पाहिजे येवढें महत्त्वाचें आहे. उद्योगधंद्यांत कामकरणाऱ्यांना त्यांचे व्यवस्थेंत भाग पाहिजे.

त्यांच्याशीं विचारविनिमय होऊन मग धोरण ठरलें पाहिजे हें अत्यंत महत्वाचें आहे. यामुळें काम करणाऱ्यांना स्वातंत्र्य वाटतें, विचारलें गेल्यामुळें आपलेपणा वाटतो. सहकार्यानें व्यवस्था होत असल्यामुळें समताभाव उत्पन्न होतो. समतेमुळें व्यक्तित्व मारलें न जातां विकसित होतें. करीत असलेलें कार्य, अनिवार्य म्हणून न केलें जातां, त्यांत कामगाराला रस उत्पन्न होतो, त्याच्या मनाला मोकळेपणा वाटतो. त्याचे प्रयत्नांत प्रसन्नतेमुळें कार्यक्षमता वाढते, अधिकारशाही नसल्यामुळें मन विषण्ण होत नाहीं. स्वातंत्र्य व समता यांनीं समाजांतील संपत्ति, कार्यक्षमता व समाधान—सर्व कांहीं वाढतें.

स्वातंत्र्य व समता यांचा विचार येथपर्यंत फक्त अंतर्गत दृष्टीनें झाला. राज्यांत समता व स्वातंत्र्य कसें असावें, त्याचें स्वरूप व मर्यादा यांचा विचार झाला. परंतु आधुनिक जगांत कुठलेंही राज्य निरपेक्षपणें अलग अगर अलिप्त राहूं शकत नाहीं. व्यक्तीव्यक्तींनीं मिळून असा राज्यांतील समाज तयार होतो व त्याचें नियमन करण्याचें कार्य राज्याला करावें लागतें. तशीच परिस्थिति जगांतील एकंदर राज्यांराज्यांतील संबंधांबाबत आहे. आंतरराष्ट्रीय समाज म्हणून कांहीं एक भाव उत्पन्न झालेला आहे. राज्यभाव उत्पन्न झाल्याबरोबर कांहीं संकेत उत्पन्न होतात; तसेंच आंतरराष्ट्रीय भाव ( International sense ) उत्पन्न झाल्याबरोबर होतात. आंतरराष्ट्रीय कायदा म्हणून कांहीं नियमन उत्पन्न होतें. राज्यांराज्यांतील संबंध या कायद्याला धरून नियमित केले जातात. राज्याराज्यांतील संबंधांत अनेक गोष्टी सर्वसाधारण असतात व सर्वसाधारण गोष्टींचें नियमन होणें इष्ट असतें. व्यापार, वाहातूक, नागरिकांची ये—जा, युद्धांतील कैद्यांना द्यावयाची वागणूक वगैरे प्रश्नांबाबत अनेक शतकांपासून कांहीं संकेत, कांहीं नियम ठरत आले आहेत. अर्थात् आंतरराष्ट्रीय जगांत हें जें कांहीं घडून आलें तें करार करून, परंपरा मान्य करून, थोडक्यांत म्हणजे संमतीनें घडून आलें. जसजशी मान्यता वाढत गेली व वागणूक जुनी होत गेली, तसतसें या नियमनाला जवळजवळ कायद्याचें महत्त्व आलें. कायदा म्हणजे विद्यमान व्यवहाराचें राज्यसत्तेनें केलेलें नियमन. त्या नियमनाविरुद्ध वर्तन झालें तर राज्यसत्ता शासन करते म्हणून कायद्याचा प्रभाव व प्रतिष्ठा. आंतरराष्ट्रीय कायद्याला अंमलांत आणणारी राज्यसत्ता नसल्यामुळें तो प्रभावी नाहीं. त्याला मानणें न मानणें व्यक्तिगत राज्याचे इच्छेवर अवलंबून आहे. समाजांत पुष्कळ गोष्टी कायद्याच्या स्वरूपांत नसतात. तथापि त्याही बाबतींत समाजांत कांहीं नियंत्रण असतें, कांहीं परंपरा असते, कांहीं संकेत असतात व त्याप्रमाणें समाजांत सामान्यतः वर्तन होत असतें. हें जें नियमन होतें तें करणारी शक्ति

म्हणजे नीति. योग्यायोग्य ठरविणारी समाजांतील व्यवस्था म्हणजे नीति. तिचा कांहीं भाग कायद्यांत समाविष्ट झालेला असतो, कांहीं नसतो. तथापि, नीतीचें महत्त्व राज्य-सत्तेच्या मान्यतेवर नाहीं. तिचें महत्त्व व तिचें श्रेष्ठत्व हें अंगभूत आहे. ती सापेक्ष आहे म्हणजे समाजजीवनांतील परिवर्तनें लक्षांत घेऊन तिची घडण घडत जाते. तिच्यांतील कांहीं भाव प्राचीन परंपरेनें शाश्वत मूल्यें अगर स्थायी भाव झालेले असतात. कांहीं मौलिक असें तिच्यांत ठरलेलें असतें. समाजव्यवहार लक्षांत घेऊन तिच्यांत अनुरूप बदल होत असतो व नंतर कायदा अगर राज्यमान्यता येते. नीति ही कायद्याचे आधीं व त्याहून अधिक आहे. तिची प्रतिष्ठा ती केवळ अग्रज म्हणून नाहीं तर विवेकानें तिला मान्यता मिळते म्हणून. ही दृष्टि ठेवून विचार केला म्हणजे आंतरराष्ट्रीय कायदे म्हणजे नीतिनियमच आहेत. व्यक्तिगत राज्यें मान्यता देतात म्हणून त्यांची प्रतिष्ठा. आंतरराष्ट्रीय नियम करणारी अशी संघटना नाहीं असें नाहीं. हेग येथील आंतरराष्ट्रीय कोर्ट हा त्या संघटनेचा भाग आहे. आज मृतप्राय झालेला राष्ट्र-संघ ( League of nations ) हें त्याचें मुख्य स्वरूप आहे. राष्ट्रसंघ अस्तित्वांत येण्यापूर्वी राज्याराज्यांतील बहुतेक प्रश्न तीं राज्यें आपासांत सोडवीत. कांहीं प्रश्न उपलब्ध असलेल्या तहनाम्याप्रमाणें आंतरराष्ट्रीय कोर्टाकडे निकालाला देत. विचारविनिमय करून ठरलें अगर आंतरराष्ट्रीय कोर्टानें निवाडा दिला तरी काय करावयाचें हें त्या त्या राष्ट्राचे इच्छेवर अवलंबून होतें. नीतिनियम होते, आंतरराष्ट्रीय कायदा होता पण त्याप्रमाणें न वागणारास शासन देणारी सत्ता नव्हती. प्रत्येक राष्ट्रांतील शक्ति हीच अखेरी प्रभावी ठरे. तात्पर्य, आंतरराष्ट्रीय समाजांत कांहीं मूल्यें, कांहीं नीतिनियम वाढत्या व्यवहारांबरोबर ठरत आले. आंतरराष्ट्रीय व्यवहार नियमित व्हावा म्हणून मार्गदर्शन करणारा कायदाही निर्माण झाला. अर्थात् कोणीं राजसत्तेनें तो केला नाहीं. या आंतरराष्ट्रीय कायद्यांत सर्व राज्यें सारखीं मानलीं जात. तथापि, जे प्रबल ते त्याविरुद्ध निकाल गेल्यास त्याला क्वचितच मान्यता देत. जे निर्बल, त्यांना आपला पक्ष सत्पक्ष आहे याचें समाधान मिळे; पण आक्रमणापासून, स्वारीपासून संरक्षण मिळत नसे. जगांतील राष्ट्रें जेथें बलानें व विस्तारानें विषम आहेत, तेथें सर्वमान्य व शक्तिमान् आंतरराष्ट्रीय राज्यसत्तेचे अगर संघटनेचे अभावीं समता ही थट्टा आहे.

आंतरराष्ट्रीय समाजांत व व्यवहारांत येणाऱ्या राज्याराज्यांत समता व स्वातंत्र्य हे भाव नांदावयाचे, तर प्रथम युध्दानें प्रश्नांचा निकाल करून घेण्याची प्रथा बंद झाली पाहिजे. सबल राष्ट्र अगर राज्य जर आपलें म्हणणें दुसऱ्या निर्बल राष्ट्रावर अगर निर्बल राज्यावर शक्तीचे जोरावर मान्य करण्यास मोकळें असेल तर तेथें

स्वातंत्र्य व समता यांना अर्थ नाहीं. युध्दाची प्रथा बंद करणें सोपें नाहीं. नुसत्या सरनाम्यांत युध्दाची प्रथा बंद करणें जरूर आहे असें म्हणून भागत नाहीं. नुसत्या अनेक राज्यांनीं जथीमथीनें केलेल्या घोषणांनीं भागत नाहीं. आंतरराष्ट्रीय व्यवहार-नियमन करणारें संघटन हेंच प्रभावी व प्रबळ असलें पाहिजे व जें राज्य विवेकानें न वागतां तरवारीला हात घालील त्याचें पारिपत्य करण्याची शक्ति व सोय त्यांत असली पाहिजे. त्याचबरोबर सदरहू संघटनेंत न्याय व नीतीला अनुसरून प्रश्नांचा विचार होईल असा विश्वास सर्वत्र उत्पन्न झाला पाहिजे. जर हें संघटन केवळ दोन-चार प्रमुख राष्ट्रांच्या सोयीचा वस्तुतः विचार करणारें असेल तर हा विश्वास उत्पन्न होणार नाहीं. राज्य जर ठराविक वर्गाचें हित पाहाणारें असेल, त्यांच्याच इशाऱ्यावर चालणारें असेल, तर तें सामाजिक हित यथार्थतेनें पाहाणार नाहीं, रक्षिणार नाहीं. अगदीं तसेच परिणाम आंतरराष्ट्रीय नियमन करणारें संघटन जर २।४ श्रेष्ठी राष्ट्रांचे इशाऱ्यावर चालले तर होतील. जगांतील शांतता हेंच खरें आंतरराष्ट्रीय समाजाचें व नियमनाचें ध्येय आहे, तें या परिस्थितींत साध्य होणार नाहीं. ज्यांच्या हातांत सत्ता ते तिचा उपयोग आपल्याजवळ जे आहे तें कायम ठेवण्यासाठीं, व जमल्यास अधिक मिळविण्यासाठीं करतात, हा राज्याचे व्यवहारांत येणारा अनुभव, आंतर-राष्ट्रीय व्यवहारांतही येतो. १९२७ सालीं स्थापन झालेला राष्ट्रसंघ जागतिक शांतते-साठीं, न्यायाचे प्रतिष्ठेसाठीं झाला. सदरहू संघाचा उपयोग इंग्लंडादिक प्रमुख राष्ट्रांनीं स्वार्थानेंच केला. जगांतील शांतता संघानें वाढली नाहीं. मागील महायुद्धांत ज्यांना अन्याय झाला त्यांना राष्ट्रसंघामार्फत न्याय मिळाला नाहीं. ज्यांनीं राष्ट्र-संघाच्या आज्ञा धुडकावल्या, त्यांनाच त्यांतील प्रमुख राष्ट्रांनीं गौरविलें. युध्दाची प्रथा तर बंद नाहींच पडली, उलट राष्ट्रसंघामुळें, त्याचे कारवाईमुळें, चालू महा-युद्ध जन्मास आलें. राष्ट्रसंघाविरुद्ध तो ज्यांनीं घडवून आणला तेच वागूं लागले. राष्ट्रसंघ निघण्यापूर्वी जी स्थिति होती, ती राष्ट्रसंघ निघून अधिक वाईट झाली. हा सर्व अनुभव लक्षांत घेतां, आंतरराष्ट्रीय नियमन करणारें संघटन करणें किती दुर्घट आहे हें लक्षांत येईल. तथापि, त्याची आवश्यकता चालू युध्दानें अधिकच तीव्र भासूं लागली आहे. जगाचे व्यवहारांत जंगलचा एकमेव कायदा जारी झाला तर लाठीवाल्यांचेंच शिजूं लागेल, जगाची प्रतिष्ठा संपेल, प्रगति व सुधारणा यांना पूर्णविराम मिळेल. दर पिढीला जागतिक युध्द व कोट्यवधि लोकांचा संहार होऊं लागला तर मानवसमाज फार काळ टिकणारही नाहीं. मनुष्य व इतर प्राणिसृष्टि यांत मनुष्य विचारशील असून त्याच्यांत बुद्धि आहे हा फरक आहे. मनुष्याचें वैशिष्ट्य

जर बुद्धि, विचारशीलता, तर त्या वैशिष्ट्याला त्याच्या जीवनांत, त्याच्या व्यवहारांत प्रथम स्थान दिलें पाहिजे. नक्की तेंच घडत नाहीं. अन्य प्राणिसृष्टीशीं असलेले साधर्म्य त्याला सोडावेसें वाटत नाहीं. समाज जसा व्यक्तीला अवश्य व अपरिहार्य झाला आहे, तसेंच जगांतील राष्ट्राराष्ट्रांतील, व्यवहारांत, कांहीं तरी नियमन अवश्य व अपरिहार्य झालें आहे. नियमन करणारें संघटन असलेंच पाहिजे. प्रत्येक पिढीला त्याची आवश्यकता अधिकाधिक तीव्र वाटत आहे. अनुभव लक्षांत घेऊन, अपयशानें न बुजतां जगानें पुढें पाऊल या दृष्टीनें टाकलेंच पाहिजे. भावी संघटन कसें राहील हें आजच्या अथिर परिस्थितींत सांगणें कठीण आहे. तथापि, कांहीं स्थूल गोष्टी इष्ट व आवश्यक म्हणून सांगतां येतील. व्यक्तिस्वातंत्र्य व समाजनियंत्रण यांचा जसा समन्वय घडवून आणणें शक्य झालें, तसाच समन्वय, प्रत्येक राज्याच्या व्यक्तिगत बाबी व जागतिक नियंत्रण यांचा घडवून आणणें इष्ट आहे ही गोष्ट महत्त्वाची मानली पाहिजे. ज्या बाबी, जो व्यवहार सामान्य आहे, त्याचें नियमन करतांना, प्रत्येक घटक-राज्याला आपलें म्हणणें सांगण्यास, आपला अभिप्राय देण्यास सारखीच संधि मिळाली पाहिजे. सदरहू संघटनांत आपण आहों ही भावना त्यांच्यांत उत्पन्न झाली पाहिजे. सारखी संधि म्हणजे प्रत्येक राज्याचें पूर्णपणें ऐकलें जाऊन, त्याचा पूर्ण विचार होऊनच निकाल घेतला जाईल. सर्व राज्यें सारखीं मानलीं पाहिजेत. सर्वांना समता याचा अर्थ कोणालाही शक्तीचे जोरावर आपलें म्हणणें लादतां येणार नाहीं. युध्दाची प्रथा बंद करील असें प्रभावी संघटन तयार करणें जरूर आहे. या आंतरराष्ट्रीय-नियमन-संघटनेच्या नियंत्रणाबाहेरील व्यवहारांत प्रत्येक राष्ट्राला, प्रत्येक राज्याला पूर्णपणें मोकळीक राहील. ही मोकळीक म्हणजे त्यांचें स्वातंत्र्य. या अवस्थेंत, राज्याचे अमर्याद प्रभुत्वावर, पूर्णस्वरूपी प्रभुत्वावर मर्यादा आली; पण त्या मर्यादेनेंच त्याच्या स्वातंत्र्याचें संरक्षण होणार व त्याला तितकेंच स्थैर्य येणार हेंही तितकेंच खरें. व्यक्तीचें स्वातंत्र्य, समाजाचे बाहेर राहून तिला लाभत नाहीं, त्याच न्यायानें राज्याचें स्वातंत्र्यही या आंतरराष्ट्रीय व्यवस्थेंतच आहे. त्याबाहेर राहून तें धोक्यांत येईल इतकेंच नव्हे तर राहाणारही नाहीं. सामान्य नियमांचें पालन करण्यानेंच दोघांचे स्वातंत्र्याला मर्यादा आली, संयम आला, तरी त्यांतच स्वातंत्र्याची खरी शक्ति आहे व त्याचें संरक्षण आहे.

व्यक्ति ही आपला थोडा थोडा अधिकार, कणकण सत्ता देऊन राज्य तयार करते, राज्यसत्ता निर्माण करते व त्यांत आपण आहोंत असें मानते. आणि राज्यांत राहाण्यांत अगर राज्याचें नियम पाळण्यांत कमीपणा मानीत नाहीं. व्यक्तींचे बाब-

तींत, हा भाव वस्तुस्थितीशीं जुळतो कीं नाहीं, ऐतिहासिक सत्य त्यांत आहे कीं नाहीं, याचा विचार बाजूला ठेवून एवढें म्हणतां येईल कीं, राज्यांत राहाण्यांत व्यक्ति कमीपणा मानीत नाहीं व नियमांचें परिपालन करण्यांतही कमीपणा मानीत नाहीं हें सामान्यपणें खरें आहे. आंतरराष्ट्रीय नियमांचें संघटन हें वस्तुतः प्रत्येक राज्यानें घटक होऊन निर्माण झालेलें असतें, त्याचें सभासदत्व केव्हांही सोडतां येतें. त्याचा अधिकार व त्याची सत्ता खरोखर प्रत्येक घटकानें कणकणानें दिली म्हणूनच निर्माण झाली. सर्वस्वीं मान्यतेवर, संमतीवर आधारलेलें हें संघटन नैतिक दृष्टीनें जास्त प्रतिष्ठेचें ठरतें; मग त्याचें न ऐकण्यांत कोणता मोठेपणा आहे, व ऐकण्यांत कोणता कमीपणा आहे? आपलेंच आपण ऐकतों अशी वस्तुस्थिति असते. कारण होणाऱ्या निर्णयांत प्रत्येक राज्यानें भाग घेतलेला असतो. तो निर्णय-सामुदायिक अभिप्राय असतो. सर्वांचे अभिप्राय त्यांत समाविष्ट असतात. या बंधनांत प्रभुत्व कमी झालें, पण जेवढें दिलें तें खुषीनें दिलें, व्यापकहितार्थ दिलें व त्या मोबदल्यांत स्वातंत्र्याला स्थैर्य व संरक्षण मिळालें. अगदीं स्वार्थी दृष्टीनेंही प्रत्येक राज्याला हें संघटन हितावह आहे. जगांतील सर्व लहानमोठ्या राज्यांचें असें संघटन झालें, सर्व प्रश्न विचारविनिमय होऊन विवेकानें सोडविले जाऊं लागले, युद्ध हद्दपार झालें, तर जगाचें कल्याण व वैयक्तिकदृष्ट्या राज्यांचेंही कल्याण होईल. सर्व जगाचें असें एक योग्य संघटन, अगर एक संयुक्त राज्य होईल कीं नाहीं हें कोणी सांगू शकत नाहीं. तसें झालें तर त्यांत कांहीं कमीपणा आहे अगर धोका आहे असें मात्र नाहीं. योग्य संघटनांत समता व स्वातंत्र्य राहील. खास व वैयक्तिक बाबी पूर्णपणें राज्याच्या अधिकाराखालीं राहतील, त्यांत त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य राहील. या संघटनेचे निर्णयांत सर्वांना म्हणजे राज्यांचे प्रतिनिधींना भाग घेतां येईल व प्रत्येक राज्याच्या गरजेप्रमाणें जगांतील व्यवहारांना, आर्थिक व्यवहाराला व उत्पादनाला वळण देतां येऊन सर्वांची गरज भागवितां येईल; यायोगें सर्वांच्यांत समता राहील. उपस्थित झालेले प्रश्न विचारासाठीं मांडले पाहिजेत अशी परंपरा उत्पन्न झाली, न्यायानें व नीतीनें निकाल होतात असा विश्वास वाढला म्हणजे जगभर स्वातंत्र्य व समता यांना अनुकूल असें वातावरण उत्पन्न होऊन दोन्हींची वाढ होईल. आज, स्वातंत्र्य व समता यांचे अभावीं, जगांत मुबलक सामुग्री असूनही बेकारी व उपासमारी वावरत आहेत, व जीवन कष्टी करीत आहेत. चतुर्विध स्वातंत्र्य जें रूझवेल्ट यांनीं जाहीर केलें, तें नुसत्या घोषणेनें जगाला मिळणार नाहीं. जगाचें योग्य असें संघटन झालें, आंतरराष्ट्रीय व्यवहाराचें योग्य असें संघटन झालें, आंतरराष्ट्रीय व्यवहाराचें योग्य असें नियमन झालें, तर हें

शक्य आहे. सर्वांना स्वातंत्र्य व समता त्या संघटनांत लाभली तरच तें टिकेल. वर्ण-परत्वें, वंशपरत्वें, अगर प्रदेशपरत्वें कोणी वंचित झाला, वगळला गेला तर जगांत शांतता राहाणार नाहीं. एका राष्ट्रांत कांहीं स्वतंत्र व कांहीं गुलाम असे राहूं शकत नाहींत. तीच स्थिति आधुनिक जगाला आज आली आहे. सर्वांना स्वातंत्र्य व समता ही आज जागतिक गरज आहे.

जगांतील प्रश्न युद्धानें न सोडवितां विवेकानें, विचारविनिमयानें, सोडवितां येण्यासारखे आहेत ही गोष्ट तत्त्वतः कोणी नाकबूल करीत नाहीं. तथापि राष्ट्र-संघाचा जो अनुभव आला आहे, तो आशाजनक नसल्यामुळें, सर्वत्र अस्थिर वाता-वरण उत्पन्न होऊन त्याचा शेवट महायुद्धांत झाला. महायुद्धानें प्रश्न सुटतील असें नाहीं, उलट त्यांत भर पडेल असेंच दिसतें. तडजोडीनें घेण्यांत राष्ट्राला कमीपणा आहे, लवाद नेमून एखादे राष्ट्राविरुद्ध निकाल गेल्यास त्यांत त्याचा अप-मान आहे, असें मानण्यानें युद्धाचें वातावरण निर्माण होतें. युद्धानें हा अपमान भरून निघतो अगर न्याय मिळतो असेंही नाहीं. मानापमानाच्या क्षुल्लक गोष्टीवरून कोणी युद्धांत उतरत नाहींत. युद्ध पुकारण्याला जीं कांहीं अन्य कारणें आहेत तीं विचारविनिमयासाठीं मांडल्यानें कांहीं नुकसान होत नाहीं. ज्यांना तीं मांडल्यानें आपला पक्ष असत्य आहे, अन्यायाचा आहे हें उघड होईल असें वाटतें तेच माना-पनाच्या ताना मारून युद्धाची धमकी देत असतात. रणभूमीचा निकाल मानावाच लागतो पण तो महाग पडतो, अनिश्चित असतो, व त्यांत न्याय मिळेल याची शाश्वति नसते. राष्ट्राराष्ट्रांतील प्रश्न विवेकानें तरी सोडविले पाहिजेत, नाहीं तर युद्धानें त्याचा जो काय निकाल होईल तो तरी मान्य केला पाहिजे. पहिल्या पद्धतींत स्वातंत्र्य व समता हीं जगांत नांदणें शक्य होतें, किंबहुना आज जगांत स्वातंत्र्य व समता सर्वत्र नाहीं म्हणूनच पुनःपुनः युद्धें उद्भवतात. हींच युद्धाचीं खरीं कारणें आहेत. साम्राज्य म्हणजे अंकित देशांची गुलामगिरी, विषमता व पारतंत्र्य हीं त्याचीं मुख्य लक्षणें आहेत. कांहीं मागासलेल्या राष्ट्रांचा उद्धार करण्याचा आपला हेतु जाहीर करतात, कांहीं अंकित राष्ट्रांना स्वातंत्र्याला लायक करण्याचा दावा सांगतात. कांहीं जरी सांगितलें तरी प्रत्यक्ष अनुभव अंकित राष्ट्रांना गुलामगिरीचाच येतो. नुसती राज-कीय नव्हे तर आर्थिक गुलामगिरीही अनुभवास येते. राष्ट्रसंघानें कांहीं देश मागास-लेले म्हणून कांहीं पुढारलेल्या राष्ट्रांचे हातीं उन्नतीसाठीं आज्ञापत्रानें ( **Mandate** ) दिले. तथापि आज्ञापत्रानें साम्राज्यभावच उत्पन्न झाला. ज्या राष्ट्राला जेथें आज्ञा-पत्र मिळालें तेथें त्याला खास हक्कच मिळाले, तेथें त्याचा खास अधिकार आहे

असेंच मान्य करण्यांत आलें. आज लेबॅनॉनचें उदाहरण हीच गोष्ट स्पष्ट करीत आहे. मॅंडेटचे नवीन नांवाखालीं जुनाच खेळ चालू राहिला. उलट केलेल्या लूटमारीला मॅन्डेटनें कायदेशीर स्वरूप देण्याचा प्रयत्न केला. जगांतील सर्व राष्ट्रें, सर्व लोक स्वतंत्र झाले म्हणजे साम्राज्याचा अभिलाष नाहींसा होईल व युद्धाचें मुख्य कारणही नाहींसें होईल. समाजांत आर्थिक विषमता हें जसें सर्व अनर्थांचें व संकटांचें मूळ आहे, तसेंच आंतरराष्ट्रीय जगांत राज्याराज्यांतील विषमता हीच अनर्थांचें मूळ आहे. सर्व जगांतील राष्ट्रांना समता व स्वातंत्र्याचा लाभ झाला, आंतरराष्ट्रीय संघटनेनें तें संरक्षित झालें, म्हणजेच जागतिक शांतता प्रस्थापित होईल व तिचें ध्येय साध्य होईल. मागासलेले म्हणून स्वातंत्र्याला नालायक अगर समतेला अपात्र हें चूक आहे. स्वातंत्र्याची पात्रता ते भोगण्यानेंच येते. आंतरराष्ट्रीय संघटनेचें संरक्षण व मार्गदर्शन असलें म्हणजे पुरे आहे. साम्राज्यवादी राष्ट्रें हीं अंकित राष्ट्रांचा प्रश्न आंतरराष्ट्रीय संघटनेपुढें मांडण्यास कधींही तयार नसतात. त्यांत ते आपला अपमान समजतात, ते तो प्रश्न खाजगी समजतात. जर तो विचारविनिमयासाठीं मांडला तर त्यांचा पक्ष असत्य ठरेल, अन्यायाचा ठरेल हीच भीति मुळाशीं असते. यामुळें जगांतील विषमता राहाते, स्वातंत्र्य व समता वाढीस लागत नाहीं, व युद्धें होऊन मानवजातीचा संहार होतो. सर्वत्र समता व स्वातंत्र्य असेल तर जगांत शांति व जगाची प्रगति निश्चित आहे.

स्वातंत्र्य व समता हीं राज्यांत काय अगर आंतरराष्ट्रीय जगांत काय, नुसत्या घोषणेवर अवलंबून मिळणार नाहींत व टिकणारही नाहींत. स्वातंत्र्य व समता यांचा विचार करतां, राज्यसत्तेचा अधिकार व तिचें संघटन हे विशेष महत्त्वाचे आहे. हीं दोन्ही स्वातंत्र्य व समता यांना अनुकूल व अनुरूप असलीं पाहिजेत. तीं जर विरोधी अगर विसंवादी असतील तर नुसत्या कायद्यानें दिलेलें स्वातंत्र्य अगर जाहीर केलेली समता कागदोपत्रीं राहील, त्यांचा अभावच अनुभवाला येईल. म्हणून आतांपर्यंत जे वातावरण, ज्या मर्यादा राज्यव्यवस्थेत असल्या पाहिजेत म्हणून सांगितलें, त्या सर्व राखल्या जातील तरच समाजांत स्वातंत्र्य व समता नागरिकांना अनुभवावयास मिळेल. मनुष्याला सार्थकता वाटून त्याचें कर्तृत्व फुलावयाचें तर अवश्य तें वातावरण निर्माण झालें तर शक्य आहे. स्वातंत्र्य व समता समाजांत असली म्हणजे सामान्य माणसांना सुद्धां एक प्रकारचा आत्मविश्वास वाटतो. आपण अगदींच उपेक्षित नाहीं, आपल्याला कोणी तरी विचारीत आहे, या जाणिवेनें मनुष्यांतील आत्मसन्मानभाव जागृत होतो व त्याचा त्याच्या वर्तनावर परिणाम होतो. त्याला समाजांत अभिमानाचें स्थान आहे

असें वाटूं लागतें. आपल्याला महत्त्व आहे हें जाणून त्याची वागणूक होते. लहान मुलानें पगडी डोक्यावर घातली व हातांत काठी घेतली कीं, त्याच्या चालण्यांत लागलीच ऐट येते व रुबाब येतो. स्वातंत्र्य व समता समाजांत आली म्हणजे मनांत उन्नत भाव येतात एवढेंच नव्हे तर वर्तनांतही प्रौढता येते, एक प्रकारची प्रसन्नतेची ऐट येते. समाजांत विषमता आहे, स्वातंत्र्याचा अभाव आहे, या परिस्थितींत मनुष्याचें व्यक्तिमत्व कोंडलें जातें, मारलें जातें. स्वातंत्र्य व समता असली म्हणजे अनुरूप वातावरण व अनुकूल साधनें उपलब्ध असतात. स्वातंत्र्य व समता असली म्हणजे काय नसतें व ते नसलें म्हणजे काय असतें हें नुसत्या शब्दांनीं पूर्णपणें सांगतां येणार नाहीं. अमृताची गोडी शब्दांनीं वर्णन करणें अशक्य; अनुभवानेंच ती यथार्थपणें कळत असते. समाजांतील स्वातंत्र्य व समता राखण्याचें व निर्माण करण्याचें काम राज्याचें आहे. समाजांत समता राज्यानें निर्माण केली व अमलांत आणली म्हणजे ती संरक्षित राहाते. कुणालाही विषमतेचा फायदा घेऊन दुसऱ्याचें अनहित करणें अवघड होतें. समाजांतील स्वातंत्र्य यामुळें अधिक वाढतें. खाजगी व्यक्तींच्या सद्भावनेनें समाजांत संपूर्ण समता उत्पन्न होणार नाहीं व जी कांहीं होईल तिला शाश्वति नसल्यामुळें व्यक्तिविकासालाही ती निरर्थक ठरेल.

आधुनिक राज्याचा विस्तार व विविध व व्यापक कार्यक्षेत्र लक्षांत घेतां सर्वस्वरूपी समता राज्यसत्तेनेंच अमलांत आणली पाहिजे हे अपरिहार्य ठरतें. तसें तिनें करावयाचें म्हणजे राज्यसत्तेच्या अधिकारांत अधिकांत अधिक भर पडते. राज्यसत्तेला अधिक अधिकार म्हणजे त्यांचा दुरुपयोग होण्याची अधिक भीति. अधिकार अगर सत्ता चांगली कीं वाईट हें तिच्या केलेल्या उपयोगावरूनच ठरणार. अधिकार म्हणजे दिलेले हुकूम अमलांत आणण्याची सत्ता, तसें करावयाचा कायदेशीर हक्क. योग्यायोग्य ठरविण्याचाही कायदेशीर हक्क राज्यसत्ताच सांगणार. या परिस्थितींत सर्वव्यापी व सर्वशक्तिमान् राज्ययंत्रापुढें व्यक्ति निर्बल ठरते. राज्यकारभारांतील गुंतागुंत व त्याचें व्यापक स्वरूप पाहून ती हतबल होते. राज्यकारभाराचें क्षेत्र वाढत गेल्यानें जें मध्यवर्ती क्षेत्र त्याला पुढें महत्त्व येतें, किंबहुना सर्व सत्ता, सर्व चालना, तेथेंच केंद्रित होतात. व्यक्तीला महत्त्वाचे निर्णय घेतांना विचारलेंही जात नाहीं. जें कांहीं होत आहे, त्यांत आपण आहोंत, आपला अभिप्राय मानला जातो असें वाटण्यासारखी परिस्थिति राहात नाहीं. समाजांत कोणी कोणावर आक्रमण करीत नाहीं पण सर्वांवरचा राज्यसत्तेचा ताबा वाढत जातो. व्यक्तींच्या आक्रमणांतून सुटलेला नागरिक राज्यसत्तेच्या सामुदायिक आक्रमणाखालीं अधिकाधिक येत जातो व त्याचें

स्वातंत्र्य आकसत जातें. ही परिस्थिति अनेक ठिकाणीं दिसून येते, परंतु ती अपरिहार्य नाहीं. प्रदेशानें अगर आर्थिक घटनेनें राज्य व्यापक असलें म्हणजे स्वातंत्र्य घटलेंच पाहिजे हें मानणें चुकीचें आहे. जनतेनें राज्यकारभारांत भाग घ्यावा, प्रत्येक नागरिकाला तें शक्य व्हावें, यासाठीं राज्य अगदीं लहान अगर एखाद्या शहरापुरतेंच असावें अशी जरुरी नाहीं. तसें असेल तर स्वातंत्र्य राहील हेंही बरोबर नाहीं. राज्यकारभारांत सर्व नागरिकांनीं जास्तींत जास्त लक्ष घातलें व ते दक्ष राहिले म्हणजे स्वातंत्र्य टिकतें हें उघड आहे. सत्ता ही प्रसरणशील आहे म्हणून तिला मर्यादेत ठेवलें पाहिजे. ती उन्माद आणते व विषवत् होते म्हणून प्रमाणांत वापरली जाईल अशी व्यवस्था केली पाहिजे. तिचा दुरुपयोग होण्याचा संभव जास्त म्हणून अधिक पाहारा तिच्याभोंवतीं ठेवला पाहिजे. जें कार्य करील त्याचे परिणामावरून तिला अग्रहक्क व अग्रपूजेचा मान मिळाला पाहिजे. केवळ राज्यसत्तेनें केलें म्हणून युक्त अगर इष्ट मानणें चूक आहे. राज्यसत्तेला मर्यादा घालणें याचा अर्थ तिच्या कृत्यावर अभिप्राय देण्याचा नागरिकांचा हक्क मान्य करणें होय. सत्तेचा उपयोग जेव्हां व जेथें होईल तेव्हां तेथें योग्यायोग्यतेचा विचार होऊन झाला पाहिजे व तो विचार व्यक्तींनीं, नागरिकांनीं केला पाहिजे. म्हणजे राज्यकारभाराची व्यवस्था व संघटन असें असलें पाहिजे कीं हें शक्य झालें पाहिजे. हें घडवून आणण्यांत खरी समता व ही व्यवस्था अंमलांत ठेवण्यांत खरें स्वातंत्र्य आहे. हें सर्व राज्यकारभारांत विकेंद्रीकरण करण्यानें साध्य होईल.

विकेंद्रीकरण कार्यपरत्वें असो अगर प्रदेशपरत्वें असो, त्यायोगें अनेक लोकांना राज्यकारभारांत भाग घेण्याची संधि मिळते. त्यांच्यावर जबाबदारी टाकली म्हणजे त्यांच्या कर्तृत्वाला साहजिक आव्हान मिळतें. राज्यकारभारांत अधिकाधिक लोक अधिकाधिक प्रमाणांत लक्ष घालतात. लक्ष घालणारा व दक्ष राहाणारा नागरिक हाच स्वातंत्र्याचा खरा रक्षक आहे. ग्रामपंचायती, जिल्हाबोर्डें, प्रांतिक विधिमंडळें, या प्रमाणें प्रादेशिक विकेंद्रीकरण झालें म्हणजे हजारों नागरिक सत्तेच्या उपयोगाबाबत दक्ष असतात. निरनिराळ्या उद्योगधंद्यांचा कारभार त्यांनीं त्यांनीं चालवावा असें विकेंद्रीकरण झालें म्हणजे तेथेंही हजारों लोक व्यवस्थेंत येतात, कारभारांत लक्ष घालतात. विकेंद्रीकरणानें सत्तेचा उपयोग अयोग्य होणार नाहीं हें पाहाणारें लोकमत व्यापक व प्रभावी होतें. गांवचा कारभार ग्रामपंचायत करीत असली म्हणजे ते करणारे डोळ्यांपुढें असतात, उलट सर्व सूत्रें लांबून हालत असलीं म्हणजे कसा कारभार चालतो याचें ज्ञानही लोकांना नसतें. त्यांचें म्हणणें तेथपर्यंत पोहोंचत नाहीं. त्यांचा

अभिप्राय हवेंत खलास होतो. त्यांना फक्त हुकूम ऐकावे लागतात; निर्णय कळतात. कारभारांत विकेंद्रीकरण झालें म्हणजे गांवापासून लोकांना कारभार काय आहे, कसा होतो, याचें प्रत्यक्ष ज्ञान मिळतें, निर्णयांत ते प्रत्यक्ष भाग घेतात. कार्यांत खरी जबाबदारी उत्पन्न होते. राज्यकारभारांत केंद्रीकरण असलें म्हणजे कामाचे व्यापामुळें अधिकारी गोंधळतात व साहजिक कार्यांत संकुचितपणा व किचकटपणा येतो. कार्यपद्धति त्रोटक राहाणें, संपूर्ण स्थानिक अनुभवाचे अभावीं अपरिहार्य होतें. विलंब लावणें, निर्णय टाळणे, एका खात्यानें तो दुसऱ्या खात्यावर लोटणें, साधकबाधक विचार न करतां जे आरडाओरड करतील त्यांचें समाधान करणें, व्यापक जनहिताकडे दुर्लक्ष करणें, उगीच तात्त्विक पाठ देणें व ढोबळ आणि अर्थशून्य सूचना देणें हा सर्व अनुभव केंद्रित स्वरूपाच्या राज्यकारभारांत येतो. यामुळें लोकांचे चालनाबुद्धीला वाव मिळत नाहीं. कुठलाही प्रयोग करावा व पुढें पाऊल टाकावें हेंही अशक्य होतें; सर्व काम दाखले पाहून चालतें ! ! यामुळें उपस्थित प्रश्नाचा निकाल लवकर लागत नाहीं इतकेंच नव्हे, तर न लावण्याच्या दृष्टीनेंच पुष्कळ वेळां प्रयत्न होतो व शेवटीं प्रश्नाचें महत्त्व कमी झाल्यानें आपोआप तो मिटतो, आणि धीरवर्तनाचें शहाणपण मिरविलें जातें ! ! मात्र कामाची धांदल व धांवपळ येवढी दिसते कीं, जणूं कांहीं राज्यकारभाराला कंपवात होऊन तो सारखा हालत आहे. केंद्रांत अपस्मार व कडेला पंडुरोग असें विनोदानें असल्या कारभाराचें वर्णन करतां येईल. म्हणून जेथें सत्तेचा योग्य उपयोग होईल तेथें ती असली पाहिजे म्हणजेच विकेंद्रीकरण झालें पाहिजे. यायोगें सत्तेचा योग्य उपयोग होईल, बहुसंख्यकांना राज्यसत्तेवर मोठ्या प्रमाणांत लक्ष ठेवतां येऊन स्वातंत्र्य राखतां येईल. स्वातंत्र्य म्हणजे लोकांचे चालनाबुद्धीला सतत व सारखा वाव, तो या व्यवस्थेंत मिळेल. कारभार व कायदा यांत लोकांचा अभिप्राय व्यक्त झाला नसेल, त्यांचे नियमनांत व निर्मितींत लोकांचा भाग नसेल तर त्यांच्या दृष्टीनें दोन्ही व्यर्थ आहेत. लोकांनीं दोन्हींत भाग घ्यावा यासाठीं त्यांना जरूर तें शिक्षण मिळालें पाहिजे. कोणते कायदे करावे, कारभार कोणत्या धोरणानें चालावा याचें ज्ञान त्यांना असलें पाहिजे. कारभार चालविण्याला कायद्याची बजावणी करण्यासाठीं अवश्य तें शील त्यांच्यांत असलें पाहिजे. सर्वच लोकांनीं तपशीलवार राज्यकारभारांत भाग घ्यावा असें नाहीं व तसें होणें शक्यही नाहीं. लोकांना कोणावर तरी विश्वास टाकावा लागतो. पण खुद्द लोक राज्यकारभाराशीं निगडित असले, म्हणजे राज्यकारभारांत ते जातीनें भाग घेत असले म्हणजे ते बिनधोकपणें असा विश्वास टाकूं शकतात. कारण त्याचा दुरुपयोग झाल्यास परिस्थिति सुधारून घेण्याची शक्ति त्यांच्यांत असते व तिचा

उपयोग करून इष्ट तें पुनः घडवून आणतां येतें. अयोग्य झालें, सत्तेचा दुरुपयोग झाला, जनमताविरुद्ध झालें म्हणजे त्याचा विरोध करण्याची शक्ति समाजांत असणें म्हणजे स्वातंत्र्य. सत्तेचें केंद्रीकरण न होतां समाजांत ती पसरलेली असली म्हणजे तिचा दुरुपयोग ठळकपणें व व्यापकपणें होत नाहीं व दुरुपयोग झाल्यास विरोधी शक्तीही व्यापक व प्रभावी असते. समाजांत सत्ता विभागलेली, पसरलेली असली म्हणजे स्वातंत्र्य अधिक संघटित व अधिक प्रभावी असतें. इष्ट ते साधण्याची व अनिष्ट तें विरोधण्याची शक्ति म्हणजे स्वातंत्र्य तें या व्यवस्थेंत लाभतें.

घटना उत्तम असली, राज्यव्यवस्था आदर्श असली, तरी जोंपर्यंत नागरिक उदासीन आहे तोंपर्यंत ती व्यर्थ आहे. गंगा वाहात आली आणि आळशी दूर राहूं लागला, तर तो पुनीत होणार नाहीं हें उघड आहे. शुद्धतेसाठीं आंघोळ ही ज्याची त्यानेंच केली पाहिजे. आचार्यद्वारां कांहीं गोष्टी होत नाहींत. तीच परिस्थिति स्वातंत्र्याबाबत आहे. आचार्यद्वारां तें प्राप्त होत नाहीं. तें प्रत्येक व्यक्तीला स्वतःचे प्रयत्नानें व प्रेरणेनें आत्मसात् करावें लागतें. स्वातंत्र्याचे मार्गावर दुसऱ्याच्या पावलानें गति प्राप्त होत नाहीं. ज्याचें त्यानें, खुरडत, लंगडत, हळू अगर जोरानें चालावें लागतें. राज्याचें स्वरूप अखेरीस नागरिकांचे शीलावर त्यांचे प्रवृत्तींवरच अवलंबून असतें. राज्यकारभाराकडे दक्षतेनें लक्ष देऊन, त्यांत मन घालून ते जशी घडण त्याला देतील तसा तो होईल. त्यांच्या इच्छेप्रमाणें राज्याचा घाट घडत जाईल. ते उदासीन राहातील. निष्क्रिय राहातील तर राज्यकारभारांत सत्तेचा दुरुपयोग होणें अपरिहार्य आहे,मग घटना कितीही आदर्श असो. लोकमताचे पाहाऱ्यांत नसलेली सत्ता घातुक ठरते. सत्ता प्रथम सदसद्विवेकबुद्धि मलिन करते, नंतर अंतःकरण निष्ठुर करते व शेवटीं अविवेकी व अंध करते. सत्तेचा म्हणजे सत्ता चालविणाऱ्यांचा हा अधःपात नागरिक जागृत राहातील तरच टळेल. राज्य म्हणजे आपण, त्याचीं कृत्यें म्हणजे आपलीं कृत्यें ही जाणीव नागरिकांत असली पाहिजे. ते जबाबदारीनें वागले म्हणजे राज्यकार्यांत जबाबदारी येईल. ते दक्ष राहिले म्हणजे राज्यकारभारांत दक्षता येईल. त्यांनीं न्याय मिळाला पाहिजे असे प्रयत्न केले म्हणजे न्याय मिळेल. त्यांनीं आपला अनुभव व आपला अभिप्राय राज्यकारभारांत आणला म्हणजे राज्यकारभार त्यांच्या गरजेचा विचार करील. त्यांनीं हांक मारली म्हणजे तो साद घालील. त्यांनीं स्वातंत्र्याची इच्छा नेटानें धरली तरच ते स्वतंत्र होतील. नागरिक विवेकी असतील तरच राज्यांत व राज्यकारभारांत विवेकाला स्थान राहील. पाणी पात्राचा रंग घेतें, राज्य पात्रतेचा, नागरिकांच्या शीलाचा. राजकीय सुखदुःखांचा दाता वस्तुतः मनुष्य स्वतःच असतो. त्यानें

आपल्या कर्मानें राज्य ग्रथित केलेलें असतें. त्याच्या स्वातंत्र्याचा तोच कारागीर असतो. भाग्यविधाता आपणच आहोंत, आपण करूं तसें होईल, यांतील अहंभाव वृथा नाहीं, ही आत्मशक्तीची जाणीव आहे, हें श्रेष्ठतम आत्मज्ञान आहे. म्हणून व्यक्ति ही तुच्छ अगर त्याज्य नाहीं, तिचें महत्त्व व तिचा मान राखण्यांत, तिची कदर करण्यांत राज्याचें शहाणपण व सुज्ञता व्यक्त होत असते. राज्यकार्यांत मदांधपणा आला, विवेक लोपला म्हणजे स्वातंत्र्य तुरुंगांत जातें, ज्ञान अज्ञानवासांत जातें. स्वाभिमानी व्यक्तींचा हाच श्रेष्ठतम मार्ग ठरतो. राज्यांत, राज्यकार्यांत शहाणपण, सुज्ञता यावी यासाठीं समाजांत समता पाहिजे. समता असली म्हणजे, सत्ता संपत्तीचे आधारें न चालतां, तिचा अधिकार सेवेनें, सेवाबुद्धीनें वापरला जातो म्हणजे सर्वांच्या हिता-ची काळजी अधिक वाहिली जाते, साहजिकच सर्वांबद्दल सारखेपणाचा भाव उत्पन्न होतो. सर्वांचे ऐकावें, कोणालाही तुच्छ मानूं नये येवढी सुज्ञबुद्धि निर्माण होते. एका वर्गाचें हित अगर उन्नति हें ध्येय न राहातां सर्वांची उन्नति, अगदीं साधारण माणसाचीसुद्धां उन्नति करण्याकडे राज्यकार्यांत प्रवृत्ति दिसून येते. संपत्तीची जोपा-सना हें सत्तेचें कार्य न राहातां, समाजाचे संस्कृतीची जोपासना व त्यांतील सर्वांची सर्वांगीण उन्नति हें कार्य करण्यांत ती प्रतिष्ठा मानूं लागते. समाजांत अशी परिस्थिति उत्पन्न झाली म्हणजे व्यक्ति व राज्य दोघांचाही गौरव होतो. परस्परांबद्दल भाव दाखवून परमश्रेय प्राप्त करतां येतें. सत्तेंतच शहाणपण आलें म्हणजे सत्तेपुढे शहाण-पण चालत नाहीं हें म्हणण्याचा प्रसंग येत नाहीं. सत्तेंत संपत्तीची दुर्गंधि व दर्प असेपर्यंत शहाणपण तेथून दूर असतें, ती जातांच तें येतें, त्याबरोबर व्यक्तीची प्रतिष्ठा येते, स्वातंत्र्य व समता नांदूं लागतात.

---

# : संपत्ति स्वामित्व व समाज :

आतांपर्यंत विचार करतांना संपत्तीचा प्रभाव समाजकार्यांत, राज्यकार्यांत कसा पडतो याचा उल्लेख अनेक वेळां आला. संपत्तीची विषमता ही समाजांतील सर्व अनर्थांचें मूळ आहे असेंही ढोबळ मानानें दिसून आलें. समाज व राजकारणांत एवढें महत्त्व पावलेली ही बाब, हिचा विस्तारशः विचार होणें आवश्यक आहे. मनुष्यांत आत्मसंरक्षणाची बुद्धि अगदीं नैसर्गिक आहे. डोळयांत कचरा जाण्याची भीति उत्पन्न होतांच, आपोआप डोळा झांकला जातो. पायाखालीं कांहीं वळवळलें असें वाटल्याबरोबर मनुष्य चटकन् उडी मारून बाजूला होतो. त्याच्या शारीरिक क्रिया, संकटाची चाहूल लागतांच संरक्षणाच्या दृष्टीनें होऊं लागतात. वारा, पाऊस, ऊन लागूं नये म्हणून अन्य कांहीं साधन नसलें तर हातानें तो कान झांकील अगर शरीर घट्ट करून बसेल, डोळयांपुढें हात धरील, ह्या सर्व क्रिया तो सहज करीत असतो. निवाऱ्यासाठीं जागा पक्षी तयार करतात व एकाचे घरट्यांत दुसरा जाऊं लागला तर लागलीच कलह उत्पन्न होतो. घरटें बांधणें व त्यांत दुसऱ्यास येऊं न देणें या गोष्टी पक्षी अगदीं स्वाभाविक प्रवृत्तीनेंच करतात. आत्मसंरक्षणासाठीं ते घरटें बांधतात व त्याच प्रवृत्तीनें त्याचें परक्यापासून संरक्षण करतात. मुंग्या मोठाल्या किड्यांना मारतात व त्यांना आपल्या वारुळांत नेतात आणि तेथें ठेवून सावकाश त्यांवर ताव मारतात. या दोन्ही क्रियांत त्यांची साहजिक प्रवृत्ति दिसून येते. आत्मसंरणासाठींच दोन्ही गोष्टी—म्हणजे संहार व सांठवण—या केल्या जातात. अन्य प्राणिसृष्टींत दिसणारी ही आत्मसंरक्षणबुद्धि मनुष्यांतपण निसर्गतः आहे. मनुष्यांत अनुभव व अनुमान हीं दोन अधिक असल्यामुळें त्यांच्यांतील या आत्मसंरक्षणबुद्धीचा विकास अधिक झाला आहे. आत्मसंरक्षणासाठीं मिळवावें व सांठवावें हा त्याच्या जीवनाचा एक सिद्धांत झाला आहे. संपादन व सांठवण करण्याची वृत्ति अगर परिग्रहबुद्धि, आधुनिक समाजरचनेचा, समाजव्यवस्थेचा एक मौलिक भाग झाला आहे. ज्याच्याजवळ आहे त्याला साहजिक उद्यांची काळजी नसणार व ज्याच्याजवळ नाहीं त्याला आजची व उद्यांचीही

काळजी लागणार. उद्यांची काळजी नसावी म्हणून तर आज सांठवावयाचें हाच परिग्रहबुद्धीचे पोटीं खरा भाव आहे. पावसाळ्यांत मिळालें नाहीं हा अनुभव ध्यानांत धरून पुढील पावसाळ्यांत मिळणार नाहीं असें अनुमान काढून मनुष्यानें वागणूक केली. जास्त मिळालें, जास्त संपादन केलें म्हणून सांठविलें, यापेक्षां उद्यां मिळणार नाहीं या भीतीनें तसा पूर्वी अनुभव आल्यानें सांठविलें, हें अधिक खरें. आजच्या समाजांत परिग्रहबुद्धीच्यामागे केवळ उद्यांची काळजी एवढाच हेतु आहे असें मात्र नाहीं. आजच्या परिग्रहबुद्धीनें समाजांत "आहे रे" व नाहीं रे" असे दोन वर्ग केले आहेत. ज्यांच्याजवळ जीवनाची साधनसामुग्री आहे, ते 'आहे रे' व ज्यांच्या-जवळ कांहीं नाहीं, उद्यांची भ्रांत आहे ते 'नाहीं रे.' कमीजास्त प्रमाणांत जगभर ही स्थिति आज दिसून येत आहे.

ज्यांचेजवळ आहे त्यांना संपत्ति व साधनसामुग्री जवळ आहे म्हणून जीवनांत स्थैर्य व स्वास्थ्य वाटतें यामुळें एकप्रकारचें समाधान जीवनांत लाभतें. उद्यांची काळजी नाहीं, उपासमार डोळ्यांसमोर नाहीं म्हणून ते निभ्रांत असतात. यामुळें पोटासाठीं वाटेल ते व वाटेल तितके श्रम करण्याची गरज राहात नाहीं. पसंत पडेल तो रोजगार अगर तितका रोजगार ते करूं शकतात. पोटासाठीं परिश्रम करण्यांत वेळ—फारसा वेळ—जात नसल्यामुळें मुबलक विश्रांति मिळून त्यांना तिचा उपयोग जीवनांत प्रसन्नता आणण्यासाठीं करतां येतो. अहोरात्र पोटासाठीं श्रम करणारांना विश्रांति मिळाली तरच कांहीं जीवन सार्थ व्हावें म्हणून ते प्रयत्न करणार. त्यांना विश्रांतीचें अधिक महत्त्व पण ती मिळते कमी. "आहेरे ना" विश्रांति मुबलक, सार्थकतेसाठीं साधनें विपुल, कलाविलासाला परिस्थिति अनुकूल, धोपट मार्ग सोड-ल्यानें धोका नाहीं. विधायक प्रवृत्तींना नवनिर्मिति करण्यास, प्रतिभेला नवनवो-न्मेषशालिनी होण्यास सर्वथैव अनुकूलता त्यांना असते. बुद्धीला व विचारांना पूर्ण वाव देऊन, शोध व बोध घेऊन, ज्ञानक्षेत्राच्या मर्यादा त्यांना विस्तारतां येतात. प्रयोगानुकूलतेमुळें कुतूहल व उत्साह यांना कार्यक्षेत्र मिळतें. क्षणाक्षणाला नवता उत्पन्न करण्याची संधि असल्यामुळें ते जीवनाला रमणीयता आणूं शकतात. संपत्तीचे साहा-य्यानें समाजांतील जेवढें श्रेष्ठ व संस्कृतिपूर्ण म्हणून उपलब्ध असेल, तें त्यांना सहज प्राप्त करून घेतां येतें. संपत्ति काय करूं शकते हें सांगितलें म्हणजे संपत्तिमान् प्रत्येक गृहस्थ ह्याप्रमाणें करतो अगर वरील सर्व गोष्टी त्याला मिळतात असें मात्र अनुमान काढणें चुकीचें होईल. तसेंच संपत्ति नसलेल्या मनुष्याला वरील गोष्टी मिळणार नाहींत अगर साध्य होणार नाहींत असेंही अनुमान काढणें चुकीचें होईल. किती

तरी संपत्तिमान् माणसें अर्थहीन व हिणकस आयुष्यांत लोळत असतात. जीवनांतील उत्कट, उन्नत व भव्य भावनांशीं त्यांची तोंडओळखसुध्दां नसते. उलट किती तरी दरिद्री माणसें जीवनभर दारिद्र्याशीं झगडून अमौलिक व अलौकिक अशी ज्ञान-साधना, ध्येयसाधना करून जीवनांतील श्रेष्ठतम आनंद व सुख भोगतांना समाजांत दिसतात. तथापि गरिबांच्या कोरडवाहू काळींत आधिभौतिक व अध्यात्मिक दोन्ही सुखांचे पीक नाममात्रच येतें. गरिबी व बहुसंख्यांक समाज अजूनही सर्वत्र गरीबच आहे—म्हणजे धडपडत, चांचपडत, व चरफडत आयुष्याचा प्रवास करणे आहे. क्षणभर थांबून सुखाचा श्वासही मिळणेंच कठीण असतें. हात टाकूं तेथें मिळेलच असें क्वचित् होतें. सफलतेचा, समाधानाचा क्षणही लाभत नाहीं. जीवनांतील लग्ना-सारख्या उदात्त प्रसंगींसुद्धां प्रसन्नतेवर सावकारी छाया पडलेली असते. कर्जपाण्या-शिवाय लग्नही अशक्य असतें. पुत्रजन्माचा आनंद, खाणाऱ्या तोंडांत भर पडली या जाणिवेनें विरघळून जातो. गरिबांचें आयुष्य म्हणजे पहिल्या प्रवेशापासून ते अखेरचा पडदा पडेपर्यंत एक शोकपर्यवसायी नाटक असतें. अतिरेकानें विनोद उत्पन्न होतो, तेच काय ते क्षण, त्यांच्या आयुष्यांत हास्य उत्पन्न करतात. पण तें हास्य सुखाचे नाहीं, आनंदाची लकेर त्यांत नाहीं. एखादा दुसरा सुखाचा किरण गडद अंधःकारच स्पष्ट करतो. अशा परिस्थितीत एखादा दुसरा प्रगति शिखर गांठूं शकला तर ते विशेष आहे. नियम म्हणजे गरिबांचें सर्व आयुष्य पोटासाठीं श्रम करण्यांतच खर्च होतें, अन्य गोष्टींसाठीं त्यांना विश्रांतीच मिळत नाहीं. उलट संपत्ति-मान् लोकांना पोटाची काळजी नसते. पण मुबलक विश्रांति असूनसुद्धां त्यांच्यांतील अनेकांची जीवनें अभिरुचिशून्य व अर्थहीन असतात. निभ्रांतता व स्वास्थ्य असून-सुद्धां त्यांचें जीवित अयथार्थच राहातें. आयुष्यभर ते करंटेच राहातात.

संपत्तिमान् म्हणतां येईल असा वर्ग समाजांत लहानच असतो. या थोड्या लोकां-जवळ असलेली संपत्ति ते कांहीं समाजांत उपयुक्त कार्य करीत असतांना मिळालेली असते अगर मिळत असते असें नाहीं अगर ज्यांचेजवळ ती आहे अगर येत आहे ती त्यांच्या गुणांमुळे असेंही नाहीं. बापजाद्यानें पराक्रम केला म्हणून अगर राष्ट्रद्रोह करून वतन राखलें म्हणून, वारस्यानें अनेकांना मिळत असते. कोणाजवळ व्याजबट्टा करून, गरिबांना लुबाडून त्यांना नाडवून ती जमलेली असते. ज्यांचेजवळ संपत्ति ते साहजिक पुंजी बाळगून असतात, भांडवल त्यांचे ताब्यांत असतें. व्यापारांत व उद्योग-धंद्यांत भांडवलवाल्यांचें प्रस्थान बसलेलें असतें. उत्पादनतंत्रांत झालेली प्रगति, त्यांतील यांत्रिकपणा, त्याची व्यापक प्रमाणावर झालेली संघटना, या सर्वांचा परि-

णाम भांडवलाचें महत्त्व वाढविण्यांत झालेला आहे, भांडवलवाल्यांना अफाट सत्ता मिळण्यांत झालेला आहे. उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं लागल्यामुळें, भांडवलाची आवश्यकता अधिकाधिक होत गेली, त्याजबरोबर समाजाचें स्वरूप बदलत गेलें आहे. भांडवल अधिकाधिक प्रमाणांत थोड्या थोड्या लोकांचे हातीं आले व मोठ्या मोठ्या संख्येनें लोक मजूर झाले, कारखान्यांतील रोजगारावर त्याचें जीवन अवलंबून राहूं लागलें. शहरांतील वस्ति वाढली, शहरें वाढलीं, लहानलहान उद्योगधंदे, व्यक्तिगत उद्योगधंदे हल्लींच्या शास्त्रीय युगांत नामशेष होत आहेत. मोठा कारखाना म्हणजे मुबलक भांडवल म्हणजे भांडवलवाल्यांना मुबलक सत्ता म्हणजे त्याचें राज्यकारभाराबर वर्चस्व असा अनुभव सर्वत्र आला आहे व येत आहे. उद्योगधंदे खाजगी मालकीचे, भांडवलाला सर्वत्र मोकळीक, खाजगी मालकी अनियंत्रित, या परिस्थितींत राज्यांत, संपत्तिमान् वर्गाचें, मालकवर्गाचें महत्त्व जास्त हें स्पष्ट आहे. राज्यसत्ता त्यांच्याच हिताची पाहारेकरी होते, त्यांच्या इच्छेवर व इशाऱ्यावर ती चालत असते. ज्यांचेजवळ मिळकत, ज्यांचेजवळ संपत्ति, त्यांनाच हक्क, त्यांनांच राज्यव्यवस्थेंत स्थान असें जरी उघड उघड नसलें तरी वस्तुतः तसेंच असतें व होतें. संपत्ति म्हणजे सत्ता हें गणित बिडतोड ठरतें. मजूरसंघ काढून किमान वेतनप्रमाण मान्य करण्यास लावून कामाचे तास, सुट्या, अपघात–विमा, बेकारी–विमा वगैरे बाबतींत कायदे करवून घेऊन कामगारवर्गानें कांहीं मिळविलें आहे. पण त्यामुळें संपत्तिमान्वर्गाचा राजकारणावरील कबजा अगर राज्यसत्तेवरील महत्त्व कमी झालेलें नाहीं. देशांतील उद्योगधंदे जोंपर्यंत खाजगी मालकीचे आहेत, समाजाचीच रचना जेथें मालकी हक्कांवर आधारलेली आहे, तेथें समाजांत श्रीमंत व गरीब हे दोन वर्ग राहणारच व तेथें गरिबांना जीवनाला पूर्ण असें मिळणार नाहीं. उत्कृष्ट व प्रभावी नागरिक होण्याला अवश्य तें वातावरण उपलब्ध होणार नाहीं.

खाजगी मालकीला वाव देणारा, संपत्तिसंपादनाला अनिर्बंधितपणें वाव देणारा समाज, परिग्रहबुद्धीलाच चालना देणारा असतो. वाटेल तसें व वाटेल त्या मार्गानें मिळवावें असा संदेशच तो व्यक्तींना देत असतो. या परिग्रही समाजांत (Acquistive Society) उत्पादनांत योजना नसते,समाजाचे गरजेसाठीं उत्पादन करावें व तशी योजना असावी असें न होतां कमाल नफा कसा मिळेल या दृष्टीनें उत्पादनाचीं चक्रें फिरतात. सामुग्रीचा पुरा उपयोग केवळ नफा होत नाहीं म्हणून केला जात नाहीं. कमी उत्पादन केल्यानें भाव वाढतो म्हणून कमी उत्पादन केलें जातें. समाजाला अवश्य असणाऱ्या वस्तु व सोयी यांची वांटणी गरजा लक्षांत न घेतां होते. जास्तींत जास्त प्रमाणांत जास्तींत

जास्त लोकांची सोय करावी अगर गरज भागवावी ही दृष्टीच मुळीं वांटणी करतांना नसते. लोकांना तूप मिळालें नाहीं तरी चालेल पण तोफा अधिक ओतल्या जातात; कारण कारखानदारांना त्यांत अधिक नफा मिळतो. शाळागृहांची गरज आहे पण तीं न बांधतां आरमारी जहाजें बांधलीं जातात. गरिबांना राहाण्याला झोपड्यामुद्धां नाहींत हें माहीत असूनही नवी दिल्ली १५ कोटि रुपये खर्च करून वसविली जाते. राज्यसत्ताच असें वागते असें नाहीं, संपत्तिमान् व्यक्तीसुद्धां असेंच करतात. मजुरांना पुरेसें देणार नाहींत पण एका स्वागतसमारंभाला लाखांनीं खर्च करणारे मालक आहेत. समाजांतील साधनसामुग्री समाजोपयोगी व समाजाला आवश्यक अशा वस्तु व सोयी उत्पादन करण्यांत खर्च न होतां अधिक नफा मिळतो म्हणून श्रीमंत व गुलहौशी लोकांच्या चैनीच्या वस्तु निर्माण करण्यांत खर्च होते. या लोकांजवळ पैसा असतो म्हणून यांची मागणी बाजारांत परिणामकारक ठरते. गरिबांना आवश्यक वस्तूंची गरज असते, पण त्यांची मागणी जर त्यांचेजवळ पैसा नसेल तर, क्रयशक्ति नसेल तर बाजारावर परिणाम करणार नाहीं. उत्पादक नुसत्या मागणीचा विचार करीत नाहीं, मागणाराजवळ पैसा आहे का ? तें विकत घेणारें गिऱ्हाईक आहे का ? हें पाहून तो उत्पादन करतो. साधें कापड गरिबांसाठीं काढलें पण त्यांना गरज असून क्रयशक्ति नसेल तर पडून राहील म्हणून उत्पादक काढणार नाहीं. उलट उंची कापड, ज्याला गिऱ्हाइक आहे म्हणजे विकत घेणारें गिऱ्हाइक आहे, ज्याला परिणामकारक मागणी आहे, तें काढील. श्रीमंत, आपल्या क्रयशक्तीचे जोरावर जरूर तें वळण उत्पादनाला देऊं शकतात. ते समाजांत राहातात त्यामुळें त्यांचा किती गिरवावा व मोठेपण मिळवावें असें अनेकांना वाटतें. संपत्ति ही मान्यता पावत असल्यामुळें तीच लायकीचें गमक समजलें जातें, सर्व गुण कांचनाचे आश्रयला जातात. विद्वत्ता नसतांनासुद्धां विश्वविद्यालयें कांचनाला पदवीनें विभूषितात. बुभुक्षित संस्था मानपत्रांनीं गौरवितात. संपत्तिमान् वर्ग, ज्यांच्याजवळ संपत्ति नाहीं त्यांना आदर्श वाटतो. कारण त्यांचा होणारा सन्मान, त्यांची चालणारी सत्ता ही पाहिल्यानंतर त्यांचे प्राप्तीसाठीं संपत्ति हेंच साधन आहे हें उघड असल्यामुळें गुरुपद साहजिकच श्रीमंतवर्गाकडे येतें. श्रीमंतीला याप्रमाणें सामाजिक नेतृत्व प्राप्त होतें. संपत्ति ही नुसती गरज भागविण्यासाठीं मिळवावी येवढाच हेतु न राहातां तिच्या जोरावर सत्ता, सन्मान व नेतृत्व मिळतें म्हणून ती मिळवावी हा हेतु प्रबल होतो. नुसतीच वित्तेषणा त्यांच्यांत न राहातां लोकेषणा त्याच्यांत उत्पन्न होते. संपत्ति—संपादनांत त्यांना आत्मसन्मान वाटतो. तिच्या संपादनानें सत्तेची अभिलाषा तृप्त होते. तिच्या जोरावर ते समाजाचे आदर्श होऊन समाजाला वळण

लावूं शकतात. परिग्रही समाजांत या परिस्थितींत नैतिक मूल्यें महत्त्वहीन ठरतात. त्यांतील आदर्शांना त्यांची गरजही वाटत नाहीं.

जेथें आदर्श व नैतिक मूल्यें यांचा संबंधच नाहीं तेथें अगर नाममात्र आहे तेथें परिग्रहबुद्धि अप्रतिहतपणें काम करते. तेथें वस्तु आणि सोयी यांचें उत्पादन समाजाच्या गरजेसाठीं न होतां नफ्यासाठीं होतें, संपत्तीचे संपादनासाठीं होतें. समाजाचें सरक्षग—गरजेपासून संरक्षण—हा हेतु न राहातां संपत्तीचें संपादन, अधिक संपादन, कमालसंपादन हीच बुद्धि काम करीत असते. समाजाचे मागणीचा विचार न होतां धनवानांची परिणामकारक मागणीच उत्पादनानें पुरी केली जाते. त्यासाठीं समाजांतील सामुग्रीचा दुरुपयोग केला जातो. नफ्यासाठीं मालांत भेसळ करणें ही एक मामुली गोष्ट होते. कंपन्या काढणें व बुडविणें, कारखाने काढणें व बुडविणें हा एक संपत्तिसंपादनाचा सन्माननीय मार्ग म्हणून चोखाळला जातो. राज्यसत्तेवर श्रीमंतांचा अग्रहक्क आहे हें गृहीतकृत्य मानलें असल्यामुळें विधिमंडळांतील प्रतिनिधींना आपले मुखत्यार समजून त्यांची संभावना करणें हें गैर ठरत नाहीं. ज्ञानाचा पुरस्कार करून त्याला मिंधें करणें म्हणजे गुणग्राहकता समजली जाते. कृतज्ञ ज्ञान त्यांचे परिग्रहवृत्तीला अनुकूल राहील अशी विद्या समाजाला शिकविते. उत्पादकांचें संघटन करून, विक्रीसंघ काढून भाव वाढविणें, म्हणजे संघस्वातंत्र्याचा हक्क बजावणें एवढाच अर्थ घेतला जातो. भांडवल देशांत योग्य नफा देत नाहीं म्हणून परदेशीं नेणें यांत देशाच्या कर्तृत्वाला वाव देणें आहे असें मानलें जातें. मागासलेल्या राष्ट्रांत भांडवल घालून, कारखाने काढून त्यांची पिळवणूक करणें, याचा अर्थ त्यांची उन्नति करून त्यांना प्रगतिपथावर आणणें असा केला जातो. त्यांनीं विरोध केला तर कायदा व सुव्यवस्था बिघडेल म्हणून तो हाणून पाडला जातो. परदेशीं भांडवल सुरक्षित राहावें, तेथील व्यापार किफायतशीर व्हावा, म्हणून, युद्ध करावें लागलें, राष्ट्राला युद्धांत ओढावें लागलें तर तें तहाच्या पावित्र्यासाठीं, मोठमोठ्या व उदात्त तत्त्वांसाठीच झालें असें मानलें जातें. चीनमध्यें अफूला बंदी केली म्हणून युद्ध झालें तें चीनला व्यसन लागून तो निकालीं लागावा म्हणून नव्हे, तर व्यापारस्वातंत्र्यासाठीं व चीनचे उन्नतीसाठींच. परिग्रहबुद्धि समाजांत संपत्तीचे संपादनासाठीं सर्व नीतिनियम झुगारून देतें. खुद्द संपादनाचे कामांत, उत्पादनांत खपणाऱ्या मजुरांनासुद्धां आपल्या समाजविद्रोही व विषारी विचारसरणीनें भारून टाकण्याचा प्रयत्न करते. मुद्दाम संप घडवून आणून, उत्पादनाला हरकत उत्पन्न करून पुरवठा कमी करणें व तो कमी आला व भाव वाढला म्हणजे नुकसान भरून काढणें अगर नफा वाढविणें ही गोष्ट करण्यास तिला

प्रत्यवाय वाटत नाहीं. परिग्रही समाजांतील उत्पादनपद्धति ज्यांचे श्रमावर चालली आहे त्यांना मात्र त्यांत स्थान असें नाहीं. या उत्पादनपद्धतीमुळें संपत्तीचें संपादन झालें तरी राज्यांत स्थैर्य उत्पन्न होत नाहीं. कारण या पद्धतीचा परिणाम अगर उत्पादन म्हणजे अल्पसंख्य श्रीमान् व बहुसंख्य गरीब हें असतें व जेथें समाज असा दुभागला व दुभंगला गेला आहे तेथें त्याचा पाया अस्थिर झाला असाच इतिहासाचा अनुभव आहे.

अशा दुभंगलेल्या राज्यांत खरोखर एक समाज अगर एक राष्ट्र नांदत नसून दोन समाज अगर दोन राष्ट्रेंच नांदत असतात. श्रीमंतांची श्रीमंती साहजिक रागमत्सरादिक भावना उत्पन्न करते. गरिबांना पुरेसें मिळत नसल्यामुळें, त्यांच्या गरजा भागत नसल्यामुळें, श्रीमंतांच्या संपत्तीवर आक्रमण करण्याची प्रवृत्ति उत्पन्न होते. राज्याचे बंदोबस्तामुळें ही प्रवृत्ति दाबली जाते. राज्य नसेल तर मिळविलेली संपत्ति टिकणार नाहीं हें जाणून श्रीमंतवर्ग राज्याचे बाजूला असतो, राज्यांत वर्चस्व स्थापन करतो. गरिबांना दाबून ठेवणें म्हणजे शांतता व सुव्यवस्था ठेवणें हें राज्याचें प्रमुख कार्य ठरतें. न्याय म्हणजे मिळकतीचें संरक्षण. गरिबांना, खालच्या वर्गाला गरिबींत ठेवलें नाहीं तर ते आळशी होतील असा वेदांत सांगणारेही असतात. समाजांतील सर्वांच्या गरजा भागविण्याचें काम राज्याचें नाहीं आणि राज्य तें करूंही शकणार नाहीं. राज्यानें अन्याय होऊं देऊं नये म्हणजे संपत्तीचें अपहरण होऊं देऊं नये. राज्याच्या कार्याचें स्वरूप संरक्षक आहे, संवर्धक नाहीं. राज्य म्हणजे पाहारेकरी, पालक नव्हे ही विचारसरणी अजूनसुद्धां सर्वस्वीं इतिहासजमा झालेली नाहीं. या 'द्विराष्ट्र' राज्यांत खासगी मालकी हीच समाजाची धारणा करणारी शक्ति असते. 'स्वामित्व' हें समाजमंदिराची कोनशिला मानली जाते.' या 'काबाचें' पूजन सर्व 'इमानदार' करीत असतात. जे हें मानीत नाहीत त्यांना राज्य साहजिक 'काफीर' मानते. काफरांना निकालीं लावणें, त्यांचा निःपात करणें हा श्रेष्ठ राज्यधर्म मानला जातो. सुव्यवस्था म्हणजे आज जो समाजांत संपत्तीचा तोल आहे, जी वांटणी आहे ती कायम ठेवणें असा अर्थ आहे. जे या व्यवस्थेंत वंचित झाले आहेत, वगळले आहेत, ते साहजिक तिजविरुद्ध धडपडणार, प्रयत्न करणार आणि त्यांना तसें करूं देणें म्हणजे हा समतोल बिघडविणें आहे. म्हणून विद्यमान समाजव्यवस्था, अर्थव्यवस्था, सुव्यवस्थेचे नांवाखालीं, सामाजिक शांततेच्या नांवाखालीं, कायम ठेवणें हें राज्य आपलें पवित्रतम कर्तव्य मानतें. संपत्ति हें सर्व अनर्थांचें मूळ आहे, सर्व कलहांचे आदिकरण आहे, हें राज्यकर्ते जाणतात; पण त्यांचे प्रयत्न व प्रवृत्ति, तें मूळ

कायम ठेवण्याकडेच असते. यामुळें जें श्रेष्ठतम ध्येय त्याकडे दुर्लक्ष होतें, राज्याचा प्रधान हेतु बाजूला राहातो. सर्वांसाठीं म्हणून असलेलें राज्य थोड्यांसाठीं आहे हा अनुभव येतो. सर्वांना सारखी मदत व सारखी संधि देण्याऐवजीं, थोड्यांचेच वांट्याला ही प्रभुकृपा येते. वंचितांचे प्रयत्न शासनसंस्थांमार्फत कायद्याचे जोरावर हाणून पाडले जातात. संघ बेकायदेशीर ठरतात अगर कायद्यानें संप करणें गुन्हा ठरविण्यांत येतो. मजूरसंघांना संप न करण्याबाबत कोर्टामार्फत मनाईहुकूमपण प्रसंगीं देण्यांत येतात. राज्यव्यवस्थेंत भाग घेण्याचा, मतदानाचा हक्क मिळकतीवर आधारून असंख्यांना वगळण्यांत येतें. लोकशाहीचा मुखवटा ठेवून संचितवाले (Vested Interests) संरक्षिले जातात. चालू समाजपद्धतीला उचलून धरणारी टीका विधायक व जबाबदार असा संकेत ठरवून, विरोधी टीका समाजांत कलह उत्पन्न करणारी म्हणून राज्यद्रोही असें ठरविलें जातें. लोकशाही घटना असूनसुद्धां सनदशीर मार्गानें कायदे करून संपत्तीची विषम वांटणी कमी करणें अशक्य करण्यांत येतें. जेथें लोकशाही नांवालासुद्धां नाहीं, त्या राज्यांत बहुसंख्यांक जनतेचे प्रयत्न निष्ठुरपणें हाणून पाडले जातात. अन्नाच्या गोळयांची मागणी बंदुकीच्या गोळयांनीं पुरी केली जाते. भाषणस्वातंत्र्याचे मागणीचा जबाब गळफांसानें दिला जातो. क्षणभर जनता भिते, भांबावते, समाजांत भीषण शांतता दिसते, आपल्यावरील संकट टळलें, नवीन समता-धर्म सांगणारा विचार राज्यसत्तेनें नेस्तनाबूद केला, त्याचे दफन केलें या आनंदांत लक्ष्मीपुत्र मग्न असतात आणि थोड्याच काळांत स्वातंत्र्याची अमर इच्छा, समतेचा धीरगंभीर विचार पुनः प्रगट होतात; त्यांचें पुनरुत्थान होतें. त्यांना नवेनवे अनुयायी, नवेंनवें क्षेत्र मिळत जातें. कांहीं ठिकाणीं संपत्तिमान् वर्ग थोडा अधिक धोरणी असतो. बहुसंख्यांक जनतेला राजकीय हक्क देण्यांत त्याची ना नसते. लोकमतावर राज्यकारभार चालला पाहिजे हेंही तो मान्य करतो. मात्र लोकमत, सामदामदंडभेद या साधनचतुष्टयांनीं तो आपले कबजांत ठेवतो. राज्यांतील लोकांचें लक्ष अंतर्गत गोष्टींकडे न वेधतां दुसरीकडे लागावें म्हणून राष्ट्राला युद्धांतही खेचण्यास हे लोक कमी करीत नाहींत. बहुसंख्यांकांच्या मागण्यास भांडवलशाही समाजरचना कायम ठेवून जितक्या पुऱ्या करतां येतील तितक्या पुऱ्या करण्याची त्यांची तयारी असते, पण तेवढ्यानें राज्यांतील 'द्विराष्ट्र'—गरीब व श्रीमंत हे दोन वर्ग—नाहींसे होत नाहींत. मर्यादेबाहेर सवलतीपण त्यांना देणें अशक्य होतें. आहे ही आर्थिक व्यवस्था आमूलाग्र बदलली पाहिजे व शेवटीं समाजरचनाच बदलली पाहिजे असें स्पष्ट होतें. दडपशाही अगर सवलतशाहीनें जनता फार काळ दबली नाहीं अगर

बनली जात नाहीं, जागृत व संघटित जनता स्वस्थ बसत नाहीं, तिच्या विचारसरणीनें समाज हादरतो, तिच्या यत्नांनीं राज्यव्यवस्था डळमळूं लागते व घटका भरतांच विद्यमान व्यवस्था कोलमडून पडते. क्रांतीच्या आवाजानें संपत्तिमान् भयभीत होतात, जनता चेतविली जाते. जुन्या समाजक्षेत्राच्या सीमा, खुणेचे दगड, बांधबंदिस्ती, सर्व उध्वस्त होतात. नवीन समाज जन्माला येतो, नवा समतोल उत्पन्न होतो, प्रसूतिवेदना व नवनिर्मितीचा आनंद यांचा उदात्त अनुभव समाजाला लाभतो.

भांडवलशाही समाजरचनेला कोणी उचलून धरणारे नाहींत अगर ती श्रेष्ठ आहे असें प्रतिपादणारे नाहींत असें नाहीं. त्यांचें म्हणणें असें कीं, समाजहितासाठीं लोकांनीं प्रयत्न केले पाहिजेत. कोणीही उगाच श्रम करणार नाहीं. मनुष्याला कांहीं तरी चेतना देणारें, प्रेरणा देणारें असेल तरच तो श्रम करील. श्रम करून संपत्ति मिळेल व ती आपलेजवळ राहील असें कांहीं असेल तर तो श्रम करील. निष्कामकर्म हें समाजांत अशक्य आहे. म्हणून समाजांत संपत्ति, परिग्रह असूं देणें जरूर आहे. समाजांतील सर्व उत्पादनानें व त्याचे वांटणीनें, समाजहित साधले जात नाहीं. ज्या उत्पादनानें खरोखर समाजहित साधलें जातें, ज्या वांटणीनें समाजहित साधलें जातें, त्यांतील श्रम समाजहितासाठीं आहेत असें म्हणतां येईल. मद्याचें उत्पादन करून कोणतें समाजहित साधलें जातें? गांजा, अफू, चरस, चंडोल, यांच्या उत्पादनापासून कोणतें समाजहित साधलें जातें? जे या व्यापारावर, या उद्योगावर श्रीमंत झाले, त्यांनीं कोणतें समाजहित साधलें? त्यांचे श्रम समाजहितविरोधीच आहेत. असल्या उद्योगधंद्यांत श्रीमंत होऊन वारसांना इस्टेट ठेवली म्हणजे वारसांना श्रमही करावयास नकोत असें होईल. म्हणजे संपत्ति ही श्रमांना प्रोत्साहन देणारी न ठरतां उलट परिणाम करणारीच ठरते. समाजहितासाठीं परिग्रहाची जरुरी नाहीं, उलट परिग्रही समाजांत श्रमविन्मुखताच जास्त होण्याचा संभव आहे. परिग्रहबुद्धि असेल, तदनुकूल समाजव्यवस्था असेल तरच समाजहित साधेल. लोक श्रम करतील हें चूक आहे. आजचे पद्धतींत तसें होतें म्हणून तें अपरिहार्य आहे अगर योग्य आहे असें ठरत नाहीं. मानसशास्त्राचेही दृष्टीनें वरील विचारसरणी बरोबर ठरत नाहीं. परिग्रहबुद्धीनेंच सर्व श्रम होतात हें अनुभवाविरुद्ध आहे. कलानिर्मिति, काव्यनिर्मिति, समाजसेवा यांत होणाऱ्या श्रमांत कोणती परिग्रहबुद्धि असते? प्राप्तीचा विचारसुद्धां तेथें नसतो. जे मिळतें तें श्रमाचें पारितोषिक, मोबदला व तो ज्याचा त्याला मिळणें व त्याचेजवळ राहाणें इष्ट आहे व न्याय्य आहे म्हणून संपत्ति व परिग्रह योग्य आहेत, समाजांतील त्यांचें स्थान यथार्थ आहे, असें नैतिक दृष्टीनें समर्थन केलें जातें. ज्यांनीं

शोध लावले, ज्यांनीं मेहनत केली, त्यांनीं संपत्ति मिळविली हें ठीक झालें. त्यांच्या श्रमांना मोबदला मिळाला हेंही योग्य झालें. परंतु लाखों लोक अविश्रांत श्रमतात, त्यांना जीवनालासुद्धां पुरेसें मिळत नाहीं, त्यांच्या श्रमाचा मोबदला योग्य आहे का? ज्या समाजांत श्रमाचा मोबदला म्हणून संपत्तीचें समर्थन केले जातें, तेथें हा अन्याय कां! श्रमाप्रमाणें कां मिळूं नये? जेथें मिळेल तेथें न्यायाने मिळालें व न मिळाले नाहीं तेथें तें नालायकीनें मिळालें नाहीं असें म्हणणें निष्ठुर असत्य आहे. लायकी म्हणजे जास्तींत जास्त नफा लुबाडण्याची लायकी असाच वस्तुतः अर्थ असतो. श्रमाचे सामाजिक महत्त्व, समाजाला त्याची गरजही लक्षांत न घेतां, ही लायकी ठरली जाते. असल्या लायकीला मिळालेली संपत्ति नैतिकदृष्ट्या योग्य कशी? समाजाच्या आवश्यक वस्तूंचा पुरवठा जाणून बुजून कमी करून भाव वाढवून कमाल नफा मिळविणें हे काम अंगभूत लायकीचें पारितोषिक? हें कोणत्या नैतिकदृष्टीने योग्य ठरतें? नैतिक दृष्टीनें समाजांत संपत्तीला, परिग्रहाला स्थान असलें पाहिजे हें समर्थनीय ठरत नाहीं, तसेंच समाजांत हें असल्यानेंच समाजाची नीतिमत्ता वाढते, सद्गुणांचें संगोपन होतें अगर तो प्रगतिपर होतो हेही खरें नाहीं. हें असूनसुद्धां बहुसंख्यांक लोक अज्ञानी, दरिद्री, मागासलेले आहेत. संपत्तिमान् माणसें सद्गुणी अगर नीतिमान् असतातच असा अनुभव नाहीं. गरिबींत राहाणारे पण नीतिमान् व सद्गुणी यांचेंच प्रमाण लोकसंख्येंत जास्त दिसून येतें. श्रीमंत माणसें दानशूर असतात, या म्हणण्यांत विडंबन अधिक आहे. समाजाला कोटीनें लुबाडावयाचें व त्यांतून कांहीं द्यावयाचें व तेंही अहंकारवृत्तीनें, यांत दान नाहीं, सौदा आहे. जी पदवी परिश्रम करूनही मिळणार नाहीं ती पैशानें पुरस्कार करून मिळवावयाची हा एक समाजाशीं सौदाच केला जातो. निदान दान दिल्यानंतर लोकमतानें संपत्ति कशी मिळाली याची चिकित्सा करूं नये एवढें तरी अपेक्षिलें जातें. पुष्कळ वेळां अपराधी मन दान करून मानसिक स्वास्थ्य मिळवीत असतें. तेथें दान सद्गुण होऊंच शकत नाहीं. संपत्ति व परिग्रह समाजांत नसेल तर ज्ञान वाढणार नाहीं हें म्हणणें अगदीं हास्यास्पद आहे. गरिबींत व गरिबांनींच आतांपर्यंत ज्ञानाची परंपरा राखली आहे. तात्पर्य, नैतिकदृष्टीनें परिग्रही समाजाचें अगर भांडवलशाही समाजव्यवस्थेचें समर्थन होऊं शकत नाहीं.

संपत्तिसंपादनाचे कामीं नैतिक विचार करण्याचें कारण नाहीं, तो केवळ आर्थिक प्रश्न आहे व त्याच दृष्टीनें समाजांतील संपत्तीकडे पाहिलें पाहिजे असा विचार मांडणाराही एक वर्ग आहे. समाजांत परिणामकारक मागणी आहे, पैसे देऊन विकत घेणारे गिऱ्हाईक आहे म्हणून पुरवठा होतो, वस्तूंचें उत्पादन होतें, नफा मिळतो,

व संपत्ति निर्माण होते. या सर्व क्रियेंत नीतीची भानगड कशासाठीं? जे परिणाम-कारक मागणी करतात म्हणजे ज्यांचेजवळ क्रयशक्ति आहे, त्यांनीं वाटेल ती मागणी करावी असें आहे का? का, त्यांचें मागणीचा समाजाचे गरजेशीं कांहीं संबंध आहे? समजा, मोटारींची परिणामकारक मागणी आहे व ती पुरी करण्यांत उत्पादक गुंग झाले व समाजाला आवश्यक असणारें दुसरें उत्पादन कमी झालें; अगर बंद झालें तर तें योग्य होईल का? समाजाला लॉरीची गरज आहे व कारखानदारांनीं सुंदर व शोभिवंत मोटारी भारी किंमतीच्या, पण, गिऱ्हाईक आहे म्हणून काढल्या; परिणाम असा झाला कीं, समाजांत लॉऱ्या नाहींत, हें योग्य झालें का? असें होऊं द्यावें का? उत्कृष्ट मद्याला परिणामकारक मागणी आहे म्हणून तें तयार करावयाचें का? गलिच्छ वाङ्मयाला गिऱ्हाईक आहे म्हणून ते छापावयाचे का? वेश्यांना मागणी आहे म्हणून त्या पुरविण्याचा धंदा चालू द्यावयाचा का? उत्पादनाला मागणी आहे म्हणून तें करावयाचें अगर करू द्यावयाचें असें असत नाहीं. कांहीं तरी विधिनिषेध समाजांत या बाबतींत असतातच, कांहीं कायदे असतात. वाटेल ती मागणी कां होते व ती पूर्ण करण्याचे परिणाम काय होतात हें पाहावें लागतें. म्हणजे योग्यायोग्यतेचा, नीतीचा विचार तेथें होतो. मग जे आज घडत आहे, तें नीतीचे दृष्टीनें पाहाणें योग्य ठरतें. जें संपादन होत आहे, त्याचे समर्थन तें चालू आहे म्हणून नैतिकदृष्ट्या पुरेसें ठरत नाहीं. समाजहिताचे दृष्टीनें विचार करतांना परिणामकारक मागणीनें संपत्तीचे संपादन व्हावें व त्यांत समाजाचे गरजांचा विचार होऊं नये अगर सामाजिक न्यायाचा विचार होऊं नये हें अनिष्ट ठरतें.

आजपर्यंत समाजानें चालू दिलें तेव्हां त्यांत समाजाचा कांहीं तरी फायदा असेल, समाजाला उपयुक्तता पटली असेल, त्याशिवाय कसें चालू दिलें असतें असा प्रश्न कोणी उपस्थित करतात. समाजाला न पटणाऱ्या अनेक गोष्टी चालतात. विरोधशक्ति पुरेशी समाजांत नसते. लाखोंनीं भूकें मरावे व थोड्यांनीं चैन करावी हें समाजाला पटतें म्हणून समाजानें चालू दिले असें कोणी म्हणणार नाहीं किंवा थोड्यांनीं शिक्षण घ्यावें व अनेकांनीं अज्ञानांत राहावें यांतील उपयुक्तता समाजाला पटली म्हणून तसें होतें असें कोणी म्हणणार नाहीं, किंवा चालू आहे म्हणून उपयुक्त आहे अगर नैतिकदृष्ट्या समर्थनीय आहे असें मानणें चूक आहे. तसेंच जी प्रगति आजपर्यंत झाली ती ही पद्धति होती म्हणून झाली हेंही म्हणणें बरोबर नाहीं. ज्या समाजांत खाजगी मालमत्ता हा एक मौलिक भाग आहे ते प्रगतिपर समाज आहेत असें सांगण्यांत येतें. मागासलेल्या समाजांत सामुदायिक उत्पादन असे, त्यामुळें त्यांची प्रगति

झाली नाहीं. जेथें व्यक्तीला संपादनाला पूर्ण वाव आहे तेथें त्याचे व्यक्तिविकासाला अधिक वाव मिळतो व व्यक्तींची प्रगति झाली म्हणजे समाजाचीही प्रगति अधिक झपाट्यानें होते हें सर्व खरें मानलें तरी सामुदायिक उत्पादनपद्धतींत व्यक्तीला लाभणारें सुख खाजगी मालकीच्या उत्पादनपद्धतींत तिला लाभणाऱ्या सुखापेक्षां कमी आहे असें सिद्ध होत नाहीं. उलट, असें म्हणतां येईल कीं, सामुदायिक उत्पादनपद्धतींत होणारी संपत्तीची अगर उत्पादनाची विभागणी अधिक न्यायाची असणार. कारण सर्वांनीं उत्पादन केलें आहे म्हणून त्यांत सर्वांचा भाग आहे हा विचार तेथें साहजिक प्रभावी व प्रमुख असतो. प्राचीनकाळच्या सामुदायिक उत्पादनांचा अनुभव अगर माहिती कदाचित् पुरेशी नाहीं म्हणून ती जरी बाजूला ठेवली तरी गेल्या २५ वर्षांत सोव्हिएट रशियांत खाजगी मालकीनें उत्पादन होत नसतांना झालेली प्रगति नाकारणें शक्य नाहीं. तेथील विभागणींत निःसंशय अधिक सामाजिक न्याय आहे. खाजगी मालकी असेल तरच समाजाची प्रगति होईल हें कोणीही मान्य करणार नाहीं. मालकी व प्रगति यांत कार्यकारणभाव नाहीं.

खाजगी मालकी असली म्हणजे प्रगति होते याचेमागें प्रत्येक व्यक्ति आपलें हित उत्तम तऱ्हेनें जाणते व तिला मोकळीक दिली म्हणजे ती आपले हित साधील व समाजाची ही उन्नति होईल हें गृहीत धरलेलें आहे. परंतु इतिहासाकडे पाहातां व्यक्तीला पूर्ण मोकळीक दिलेली दिसत नाहीं. तसेंच खाजगी मालकीचीही कल्पना कायम व अमर्याद राहिलेली दिसत नाहीं. एके काळीं गुलाम ही संपत्ति मानली जात होती आतां नाहीं. कांहीं देशांत स्वतःची सर्व संपत्ति मरणानंतर वाटेल त्याला मृत्युपत्रानें सर्वस्वीं देतां येत नाही. इस्लामी कायद्यानें तिसरा हिस्साच फक्त वाटेल त्याला देतां येतो, खाजगी मालकीच्या जमिनीवर वाटेल तशी इमारत बांधतां येत नाहीं, त्याबाबत सर्वत्र कायदे आहेत. खाजगी मालकीची जमीन अगर अन्य मिळकत नुकसानभरपाई देऊन राज्यसत्ता सर्वत्र घेऊं शकते. हयातींत अगर मृत्यूनंतर व्यक्तीची मालकी सर्वत्र मर्यादित झालेली आहे. त्याचे इच्छेप्रमाणें तिचा सर्वस्वीं त्याला उपभोग घेतां येत नाहीं अगर आपल्यानंतर कोणीं घ्यावा किंवा कसा घ्यावा हेंही ठरवतां येत नाहीं. राज्यसत्तेनें जी मर्यादा घातली असेल त्या मर्यादेत तिचा उपभोग तिची वासलात करणें व्यक्तीला भाग पडतें. तथापि ही गोष्ट खरी आहे कीं, मर्यादा असूनसुद्धां बरीच मोकळीक व्यक्तीला याबाबत मिळाली आहे. परंतु नुसती मोकळीक असून प्रत्येक व्यक्ति आपलें हित साधूं शकत नाहीं, तें साधण्यासाठीं पुरेशी शक्ति अगर साधनसामुग्री तिजजवळ असेल तरच शक्य आहे. म्हणजे योग्य

परिस्थिति अगर पुरेशी संधि असेल तरच व्यक्ति आपलें हित साधूं शकेल. व्यक्तीची योग्य परिस्थिति म्हणजे, समाजांतील साधनसामुग्रीचे दृष्टीनें व ती ज्यांच्या ज्यांच्या हातांत असेल त्यांच्या तुलनेनें; सापेक्षतेनें व्यक्तीला योग्य परिस्थिति अगर पुरेशी संधि आहे कीं नाहीं, याचा विचार करावयाचा म्हणजे समाजांत संपत्तीचे अधिकार किती, मालकी हक्काच्या मर्यादा किती यांचाच विचार करावा लागतो. मालकीहक्क केव्हांही अमर्याद होते असें दिसून येत नाहीं. मालकीहक्क अमर्याद झाले तर पुरेशी संधि केव्हांही, कोठेंही कोणाही व्यक्तीला मिळणार नाहीं. हें जाणूनच सर्व धर्मांनीं, संपत्तिसंपादनाबाबत मर्यादा उत्पन्न केलेल्या आहेत. इतिहासांतील सर्व समाजव्यवस्थांतून याच दृष्टीनें प्रयत्न केलेले दिसून येतात. समाजांत हें माझें व हें तुझें, हा भाव उत्पन्न झाला, स्वामित्वाची जाणीव समाजांत रुजली. आणि एकदां हें बीज रुजलें म्हणजे त्याचा विस्तार होणें अपरिहार्य होतें. समाजांत कलहाचें पीक सारखें येत जातें याला आळा बसावा म्हणून, कांहीं नियमन बसावें म्हणून सर्व काळीं सर्व समाजांत धर्मवेत्त्यांनीं, नीतिविदांनीं प्रयत्न केलेले आहेत. ग्रीक पंडित व राजनीतिशास्त्रज्ञ प्लेटो यानें तर खाजगी संपत्ति नसावीच असें प्रतिपादलें आहे. हिंदुधर्मानें अपरिग्रह हा श्रेष्ठतम गुण मानला आहे ! नव्या करारांत एक वेळ सुईच्या नेढ्यांतून उंट जाईल, पण श्रीमान् माणसाला स्वर्गप्राप्ति होणार नाहीं म्हणून येशूनें बजाविलें आहे. धन हें दानासाठीं संपादावें असें स्मृतिधर्म सांगतो. धनवान् केवळ विश्वस्त आहेत. त्यांनीं आपल्या धनाचा उपयोग परोपकारार्थ केला पाहिजे, असें आजही गांधीजी सांगतात. विश्वस्त झाल्यानें जबाबदारी येते, पण तिचें नियमन व्यक्तिगतच राहातें. धनसंपादन हें सामाजिक परिस्थितीचा परिणाम आहे आणि त्या दृष्टीनें त्याचें नियमन समाजानें करणें न्याय्य व इष्ट आहे. व्यक्ति दान देईल पण समाज अगर राज्य न्याय देईल म्हणून त्यांत शाश्वति व निश्चिति जास्त. धनवान् दानी अगर विश्वस्त झाल्यानें समाजांतील विषमता दूर होत नाहीं. ती धनसंपादनपद्धतीनें उत्पन्न झालेली असते. दान न्यायाची बरोबरी करूं शकत नाहीं. दानानें अन्याय कायम राहून घेणाराचें व्यक्तिमत्व व कर्तृत्व मारलें जातें, देणारांत अहंकार उत्पन्न होतो. देणारा व घेणारा या दोघांचाही अधःपात होतो. जे वंचित आहेत व ज्यांचा समाजावर पुरी संधि मिळण्याचा हक्क आहे, त्यांना पोटासाठीं अन्नछत्रांत जाण्यास सांगणें हा त्यांच्या नागरिकत्वाचा अपमान आहे. धर्माचें नियमन व आज्ञा यांनीं विषमता दूर झालेली नाहीं. उलट संपत्तिमान् लोकांनीं धर्मसंस्थांना सर्वत्र संपत्ति देऊन त्यांचा पुरस्कार करून त्यांना मिंधें केलें आहे. व्यक्तीला पुरेशी संधि मिळवून देण्याचे कामीं धर्म निष्फळ

ठरला आहे. दलितांना स्वातंत्र्याचा व समतेचा संदेश, कर्तृत्वाला उत्तेजन देणारा संदेश, विद्यमान अन्याय उलथून पाडण्यास सांगणारा संदेश न देतां आजचा धर्म त्यांना दैववादी संदेश देत आहे. मानवनिर्मित विषमता दैवावर लोटून जनतेची दिशाभूल करण्याचें काम आज धर्म करीत आहे.

मागील जन्मांत सुकृत केलें म्हणून " शुचीनाम् श्रीमतां गेहे " जन्म झाला. दैवानें संपत्ति मिळते, भाग्योदय होणें हें देणें ईश्वराचें, असें तत्त्वज्ञान समाजांत पसरवून विषमता कायम ठेवण्याचे प्रयत्न केले जात आहेत. निष्काम कर्म करावें मग संपत्ति कशीही व कशाही मार्गानें मिळाली तरी हरकत नाहीं, तिचा उपभोग घ्यावा, वाटेल तसा घ्यावा, मात्र तिचे ठायीं अनासक्ति असावी, येवढें असलें म्हणजे व्यक्ति निर्दोष ठरते, समाज न्यायी ठरतो असेंही प्रतिपादिलें जात आहे. व्यक्तीचें चारित्र्य कितीही चांगलें असलें अगर तिचा हेतु कितीही उच्च असला तरी तिनें संपादन केलेल्या संपत्तीचे सामाजिक परिणाम टळत नाहींत. धर्मानें व्यक्तिशः संपत्तीचा विनियोग दान करून करावा म्हणून सांगितलें अगर अन्य कांहीं मर्यादा सांगितल्या तरी त्यानें समाजांतील व्यक्तींना पुरेशी संधि मिळूं शकत नाहीं, व मिळालीही नाहीं. सर्वांना धनोत्पादनाला मोकळीक आहे येवढ्यानें समाजव्यवस्था न्याय्य ठरत नाहीं. तशी मोकळीक व जरूर तीं साधनें व्यक्तीला प्रत्यक्ष मिळालीं पाहिजेत; तसेंही घडून आलें नाहीं व येत नाहीं. उलट संपत्तीचे उत्पादनांत समाजानें अगर राज्यानें हस्तक्षेप न केल्यानें भांडवलशाही जन्माला आली आहे. समाजांत संपत्तीचे उत्पादनाला स्वातंत्र्य मिळाल्यानें, ज्याला कोणाला मिळेल तें त्याच्या श्रमाचा मोबदला समजला जाऊं लागलें. यश पात्रतेचा पुरावा ठरला. स्वहितासाठीं ज्यानें त्यानें प्रयत्न करावा व यशोमंदिर गांठावें. राज्याचा त्यास अडथळा नाहीं. प्रयत्न करावे, पराक्रम करावा, धन व सुख मिळवावें, या व्यक्तिस्वातंत्र्यवादी तत्त्वज्ञानाची पक्कड समाजव्यवस्थेवर सर्वत्र अजूनही दृढ आहे. व्यक्तींना आत्मोत्कर्षासाठीं, आत्मोन्नतीसाठीं स्वातंत्र्य असलें पाहिजे, याचा अर्थ त्यांच्या प्रयत्नांत राज्यसत्तेनें अडथळा आणूं नये एवढाच अजूनही कांहीं ठिकाणीं केला जात आहे. राज्याचें कार्य निराकरणीच (Negative) असलें पाहिजे असें अद्यापि कांहीं ठिकाणीं प्रतिपादिलें जात आहे. राज्य हें प्रयोजक असलें पाहिजे, संरक्षणाबरोबर संवर्धनपण त्यानें केलें पाहिजे, हें तत्त्वज्ञान मान्य झालें असलें तरी, सर्वत्र व्यापक प्रमाणावर तें अमलांत आलेलें नाहीं. व्यक्तीचें हित तेंच समाजाचें हित, पहिलें साधलें म्हणजे दुसरें साधतेंच, हा सिद्धांत निरपेक्ष आहे असा अजूनही समज आहे. समाजव्यवस्था ही सर्वांनीं सहकार्यानें करावयाची आहे, व

त्यांतील सुखदु:खें हीं सर्वांचीं सुखदु:खें आहेत, हा नैतिक भाव व जबाबदारीची जाणीव, व्यक्तिस्वातंत्र्यवादी तत्त्वज्ञानाचे वातावरणांत उत्पन्न होत नाहीं. व्यक्तीनें अप्रतिहतपणें मिळवावयाचें व राज्यानें तटस्थ राहून मिळवूं द्यावयाचें व मिळवलेलें संरक्षण करावयाचें, या परिस्थितींत समाजव्यवस्थेचा व समाजस्वास्थ्याचा आधार व्यक्तींची मिळकत व तिची मालकी हें होणें क्रमप्राप्त आहे. समाजाचें हें स्वरूप धर्म टाळूं शकला नाहीं. अनासक्तिबुद्धीनें, वास्तूला 'पर्णकुटी' म्हटल्यानें तिचें प्रासादत्व कमी झालें नाहीं, धनवानाला मेल्यानंतर स्वर्ग नाहीं या भीतीमुळें कोणी धनत्याग केला नाहीं. उलट धनानेंच 'याच देहीं याच डोळां' सत्तेचें स्वर्गसुख भोगतां येतें असा अनुभव आलेला आहे.

खाजगी मालकीवर आधारलेल्या समाजव्यवस्थेंतील दोष व अन्याय गुप्त होते अगर ते कोणाला कळले नाहींत असें नाहीं. धर्मानें आपल्या परीनें त्याविरुद्ध आवाज काढला. रूसो वगैरे विचारवंतांनीं समाजांत सामुदायिक योजनेचें महत्त्व ओळखून तिची नैतिक आवश्यकता आहे असेंहि प्रतिपादलें. तथापि फ्रेंच राज्यक्रांतीनें या समाजव्यवस्थेला पहिला धक्का दिला. दुसरा धक्का उत्पादनांत, उद्योगधंद्यांत जी क्रांति झाली तिनें दिला. फ्रेंच क्रांतीनें समाजांत मनुष्याला मनुष्य म्हणून स्थान प्राप्त करून दिलें. स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, याचा मिळकतीशीं संबंध नाहीं, मनुष्याशीं आहे, समाजांतील हक्क मनुष्यांना मनुष्य म्हणून मिळाले पाहिजेत, या तत्त्वज्ञानानें खाजगी मालकीवर पहिला वार बसला. आर्थिक-क्रांतीनें, आर्थिक समतेचे तत्त्वज्ञानाला निर्माण केलें. आर्थिक समता असल्याशिवाय कामगारांचें हित होणार नाहीं हें उघडपणें तेव्हांपासून प्रतिपादलें जाऊं लागलें. खाजगी मालकीचे हक्क मान्यता पावले आहेत म्हणून समाजांत विषमता उत्पन्न झाली हें तेव्हांपासून अधिक स्पष्ट झालें. खाजगी मालकीचे मागील व्यक्तिस्वातंत्र्यवादी तत्त्वज्ञानावर मग उघड उघड हल्ले सुरू झाले. वरील दोन्ही क्रांतींतून जे विचारप्रवाह निघाले, त्यांनीं मालकी हक्कांवर आधारलेल्या राज्यमीमांसेवरही परिणाम केला. समाजांत होणारें संपत्तीचें उत्पादन हें व्यक्तीच्या श्रमाचें केवळ फळ नव्हे, तर समाजांतील सर्व श्रम व शक्तींचा तो परिणाम आहे, हें त्याचें स्वरूप हळूहळू पटूं लागलें. समाजामुळें संपादन शक्य होतें व समाजांतील सर्व शक्तींचा हातभार त्याला लागतो. म्हणून मिळकतीचें स्वरूप, संपत्तीचें स्वरूप, सामाजिक आहे, तिचे परिणामही सामाजिक आहेत. या विचारसरणीनें संपत्तीची मालकी खाजगी रहावी, तिला कांहींही समाजहितार्थ मर्यादा असूं नयेत या तत्त्वज्ञानांतील अन्याय अधिक स्पष्ट झाला. फ्रेंच राज्यक्रांतीनें

सरंजामशाही नष्ट केली, जन्मानें राज्यकारभार करण्याचा, राज्यसत्ता चालविण्याचा अधिकार नाकारून तो नष्ट केला व मध्यमवर्गाचे हातांत सत्ता दिली. स्वातंत्र्याबरोबर समतेची व बंधुभावाची घोषणा झाल्यामुळें, समतेची मागणी पुरी व्हावी म्हणून लोकांचे प्रयत्न साहजिक सुरू झाले. समतेचा कितीही मर्यादित अर्थ केला तरी त्याचा परिणाम व्यक्तिगत मालकी हक्काचे व्यवस्थेवर व तत्त्वज्ञानावर होणें अपरिहार्य होतें. राजकीय स्वातंत्र्य आलें, त्यांतील विषमता कमी झाली, तर आर्थिक विषमता कां कमी होऊं नये, असें वाटणें साहजिक होतें. राजकारणांत जर कोणी वडिलोपार्जित हक्क सांगणें गैर तर आर्थिक व्यवस्थेंत तें न्याय्य कसें ? चालू व्यवस्था कायम ठेवणें म्हणजे विद्यमान विषमता कायम ठेवणेंच आहे. उलथून पाडलेल्या राज्यव्यवस्थेंत जर कांहीं दैवी मानलें नाहीं, तर या व्यवस्थेंत तरी कांहीं दैवी आहे असें मानण्याचें काय कारण ? ज्या व्यक्तिस्वातंत्र्यवादी तत्त्वज्ञानावर अर्थशास्त्र आधारलेलें होतें व जे अर्थशास्त्र विद्यमान व्यवस्था आदर्श आहे असें सांगत होतें, त्यांचेच सिद्धांत अचूक अगर अमर आहेत हें मान्य करण्यास फ्रेंच क्रांतीनंतर लोक तयार नव्हते. या मान्यवंत अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें तपासण्यास त्यांनीं सुरुवात करावी हें अगदीं साहजिक होतें.

औद्योगिक क्रांतीमुळें संपत्तीचें केंद्रीकरण झपाट्यानें होतें. मोठ्या प्रमाणावर उत्पादन होऊं लागल्यामुळें व तें यांत्रिक झाल्यामुळें कारागीरवर्गाचें स्वातंत्र्य नष्ट झालें होतें. कारागीरवर्ग उत्पादक न राहतां केवळ श्रमविक्या झाला. एकीकडे थोड्या लोकांचे कबजांत उत्पदनाचीं साधनें अधिक अधिक येत गेलीं व दुसरीकडे स्वातंत्र्य नष्ट झालेल्या बेकार कारागिरांची, कामगारांची संख्या वाढत गेली. वस्तु विकत घ्यावी त्याप्रमाणें कामगारांचे श्रम विकत घेणें सुरू झालें. मागणी–पुरवठ्याचा निष्ठुर सिद्धांत मजुरीची किंमत ठरविण्याचें कसाईकाम करूं लागला. उत्पादनांत केवळ नफा हाच हेतु प्रबळ व प्रमुख झाल्याने गरजेचा विचार न करतांच तें होऊं लागलें. समाजांत एकाच वेळीं विपुलता व विवंचना नांदूं लागली. मूठभर श्रीमंत व बहुसंख्यांक गरीब असे दोन तट समाजांत उघड दिसूं लागले. या सर्व अवस्थेंतून मार्ग काढण्याचे दृष्टीनें, अनेक राष्ट्रांतील विचारवंतांनीं विचार केला. मार्क्स, एन्जेल्स, प्रौढोन, ब्लॅंक वगैरेंनीं विद्यमान अर्थव्यवस्थेच्या मुळाशीं जाऊन तिचे मूलभूत सिद्धांत तपासले. आपापल्या परीनें दोषदर्शन करून मार्गही त्यांनीं सुचविले. एक गोष्ट स्पष्ट झाली कीं, विद्यमान अव्यवस्थेंतून व्यवस्था निर्माण करणें झाल्यास समाजरचनेंत पुनः सांधमोड झाली पाहिजे. व्यवस्थेंतील तोल अगर हितसंबंधाचा मेळ, नवीन निर्माण केला

पाहिजे. जुना मेळ निरर्थक ठरल्याचें, जुन्या संस्था, जुने संकेत अर्थहीन ठरल्याचें स्पष्ट झालें. ही नवीन सांधमोड, हा नवीन मेळ, बहुजनसमाजाचे, बहुसंख्याकांचे हक्क मान्य केल्याशिवाय शक्य नाहीं याची स्पष्ट कल्पना आली. राज्यानें व्यक्तींना मोकळीक देणें व स्वतः अलिप्त राहाणें, अलग राहाणें यापुढें शक्य नव्हतें याची जाणीव पटली. राज्य संपत्तिसंपादनाचे क्षेत्रांत तटस्थ राहाणें, अशक्य आहे हें जाणून समाजसत्तावादाशीं कशी तडजोड करून भांडवलशाही किती टिकवितां येईल याचा विचार ते करूं लागले व त्या दृष्टीनें त्यांचीं पावलें पडूं लागलीं. समाजवादाचा अर्थ राज्यांतील उत्पादनानें सर्वांची गरज भागवावी, मनुष्यांचे नैसर्गिक हक्कांचा त्यांना उपभोग घेतां येईल अशी व्यवस्था असावी व हें सर्व राज्यानें करावें हा होता. पहिलें पाऊल म्हणून राजकारणांत सर्वत्र मतदानाचा हक्क जास्त जास्त व्यापक प्रमाणावर देण्यांत येऊं लागला. बहुतेक राज्यांतून तो सार्वत्रिक करण्यांत आला. करपद्धतींत कांहीं न्याय, व कांहीं समता असावी या दृष्टीनें, ऐपतीप्रमाणें कर घेण्याचें सुरू झालें. त्यांत वाढत्या प्रमाणपद्धतीचा समावेश करण्यांत येऊं लागला. अनेक ठिकाणी शिक्षण हें मोफत करण्यांत येऊं लागलें. बेकारी, आजार, अपघात, वार्धक्य, यांची सोय विमा योजना अंमलांत आणून अनेक राज्यांतून सुरू झाली. राज्यांतील लोकांची चांगली निवासव्यवस्था असावी, हें राज्याचें कार्य आहे याची जाणीवपण कित्येक ठिकाणीं झाल्याचें दिसून येऊं लागलें. हें सर्व घडवून आणावयाचें म्हणजे राज्याला पैसा पाहिजे व तो पैसा अर्थात् कांहीं तरी अधिक प्रमाणांत संपत्तिमान वर्गाकडूनच वसूल करून उभा करणें प्राप्त झालें. राज्यानें आपलें कार्य केवळ संरक्षणाचें नाहीं, संवर्धनाचें आहे हें मान्य करून तें करण्यास सुरुवात केली. संपत्तिसंपादन थांबलें नाहीं, माणसें श्रीमंत होण्याचेंही बंद झालें नाहीं, मात्र सर्व व्यक्तींना पुरेशी संधि मिळावी या दृष्टीनें राज्याचें कांहीं कर्तव्य आहे हें राज्यानें मान्य केलें. संपत्तीचे मूलभूत कल्पनेंत् बदल होत गेला. ती केवळ व्यक्तीचे प्रयत्नाचें फळ नाहीं तिचें सामाजिक स्वरूप आहे, म्हणून सामाजिक जबाबदारी पण तिजवर आहे, याची थोडीशी जाणीव होऊं लागली व त्याचाच परिणाम म्हणून राज्याचें स्वरूप वरीलप्रमाणें बदलून तें प्रेरक व प्रयोजक झालें, समाजसेवा हें त्याचें कार्य झालें.

आधुनिक राज्याचे कार्यांत याप्रमाणें बदल होण्यास १९ वे शतकाचे मध्यापासून सुरुवात झाली. समाजसत्तावाद नको; सवलती देऊन जेवढी व जितका वेळ तडजोड करून भागेल, तेवढें करण्याचा प्रयत्न चालू होता. उत्पादन वाढवून, नफा

वाढवून सवलती देणें भांडवलवाल्यांना कांहीं काळपर्यंत परवडतें. एक मर्यादा अशी येते कीं, उत्पादन वाढवून नफा मिळत नाहीं; उत्पादन कमी करून पुरवठा कमी होतो, भाव वाढतो; नफा राहातो, नुकसान टळतें; पण यानें समाजांत क्षोभ निर्माण होतो. राजकीय सत्ता मिळालेला व जागृत बहुजनसमाज ही अव्यवस्था सहन करण्यास तयार नसतो. तथापि, मागील महायुद्धाचे सुरवातीपर्यंत सवलतीचें धोरण चालू होतें व समाजाचे सोयी निर्माण करण्याचे प्रयत्न हळूहळू पण नेटानें चालले होते. १९१४ सालीं सुरू झालेल्या महायुद्धानें मनुष्यसंहार तर केलाच, पण अनेक कल्पनांचा संहार केला. सिंहासनाबरोबर सिद्धांतही कोलमडून पडले. महायुद्धांतून बाहेर पडलेल्या जगांत नवीन मानसिक सृष्टि उत्पन्न झाली. जुन्या तत्त्वांवर जुन्या प्रणालींच्या आधारें पुनर्घटना करणें अशक्य झालें. संपत्तिविषयक कल्पना रशियांतील क्रांतीनें आमूलाग्र बदलल्या. मालक मजूर, घरवाला भाडेकरी, जमीनदार कूळ, यांचे संबंध जुन्या मापानें मोजणें अशक्य ठरलें. युद्धांत राज्यासाठीं मरावयाचें हें नागरिकांचे कर्तव्य ठरलें, मग शांततेच्या काळांत राज्यासाठीं जगणें व चांगल्या रीतीनें जगणें हा त्यांचा हक्क कां ठरूं नये? अशी साहजिक विचारणा सुरू झाली. लोक देशासाठीं मेले. देशांतील संपत्तिमान् लोकांचें आहे तें राहावें म्हणून मेले नाहींत असा आवाज सर्वत्र निघूं लागला. देशासाठीं लोक हें जर बरोबर, तर लोकांसाठीं देश कां नसावा? हा प्रश्न प्रस्तुत व प्रभावी ठरला. मनुष्यांना युद्धकालांत महत्त्व आलेलें पाहिल्यानंतर शांततेच्या काळांत तें कां नसावें याचा खुलासा राज्यसत्तेला सर्वत्र विचारण्यांत आला. युद्धांत प्राण घेतांना, श्रीमान् गरीब, विद्वान् अडाणी, हा भेद रणदेवतेनें मानला नाहीं, मग राज्यदेवतेनें प्राणरक्षणांत कां मानावा? उद्योगधंद्यांत जे श्रम करीत नाहींत त्यांना अधिक कां मिळावें? मालकवर्गानें त्यांना अधिक प्राप्ति व्हावी असे कोणतें समाजाचें कार्य केलें? केवळ संपत्ति आहे, म्हणून वाटेल ती प्राप्ति तिच्या साहाय्यानें समाजविद्रोह करून मिळावी हें कसें न्याय्य आहे? राष्ट्रांतील सर्वजण युद्धार्थ खपले, अनेक बळी गेले, म्हणून राज्य राहिलें, समाज राहिला, म्हणून संपत्ति राहिली, व तिचें संपादन पुढें शक्य झालें. समाज आहे म्हणून संपत्ति आहे, तिजबद्दलचे हक्कही समाजानेंच निर्माण केले आहेत. मग या हक्कांचा समाजहितविरोधी उपभोग व्यक्तींना कां असावा? समाजांत बहुसंख्याकांच्या प्राथमिक व अवश्य त्या गरजासुद्धां पुऱ्या होत नाहींत या स्थितींत थोड्यांनीं चैन कां करावी? युद्धोत्तर जगांत सर्व राष्ट्रांतून वरीलप्रमाणें जनता प्रश्न विचारूं लागली, राज्याचें मूळ शोधून काढूं लागली. जीवन व राज्य यांचें मूळ शोधूं नये, तो अनादर होतो, हा बर्कचा

हितोपदेश मान्य होण्यासारखा नव्हता. समाजांतील अन्याय, समाजांतील विद्यमान व्यवस्था राज्यामुळें चालते तर त्याचाच विचार केला पाहिजे, त्याचा पाया, त्याचे सिद्धांत, तपासले पाहिजेत, त्याचें जीवनतत्त्व निरीक्षिलें पाहिजे, त्याचें गतिशास्त्र समजावून घेतलें पाहिजे असें सर्वत्र वाटूं लागलें. राज्यांतील कार्यकारी सत्ता विषमतापूर्वक कां वागते, विधिमंडळें संपत्तिमानवर्गाला अनुकूल असे कायदे कां करतात, न्यायदानांतही कांटा गरिबांविरुद्ध कां झुकतो, याचा विचार करणारांना या सर्वांचें एकच कारण सांपडलें आणि तें म्हणजे संपत्तींतील अमर्याद खाजगी मालकी. या स्वामित्वानें राज्यव्यवस्थेला गुलाम केल्याचें दिसून आलें. समाजपुरुषाचे पायांत ही शृंखला आहे, मानाचा तोडा नाहीं. ती असेपर्यंत स्वातंत्र्य नाहीं, सुख नाहीं, हें निश्चित कळलें. परिग्रही समाजांत असंख्य व्यक्तींना अविश्रांत परिश्रम हा सिद्धांत अटळ असल्याचें कळून चुकलें. मालकी म्हणजे संपत्तीवरील ताबा, तिची वामलात लावण्याचा, तिचा विनियोग करण्याचा हक्क, हा अगदीं सरळ अर्थ आहे. पण ताब्यांतील संपत्तीचा उपयोग करावा, विनियोग करावा या भावापेक्षां तिचा उपयोग दुसऱ्या कोणाला करून द्यावयाचा नाहीं हा प्रतिबंधक भाव मालकी हक्काचे कल्पनेंत अधिक आहे. ही गंजींतील कुत्र्याची वृत्ति परिग्रही समाजांतील मालकींत आहे. एवंगुणविशिष्ट खाजगी मालकी अनैतिक आहे म्हणून ती नष्ट झाली पाहिजे असें निश्चित मत प्रतिपादलें जाऊं लागलें. रशियन क्रांतीनें व रशियांत होत असलेल्या सामाजिक पुनर्घटनेमुळें खाजगी मालकीची अनिष्टता अधिक स्पष्ट होऊं लागली. समाजाचे प्रगतीला समाजस्वास्थ्याला खाजगी मालकी अवश्य व अपरिहार्य आहे हा तिचा दावा रशियांतील घडामोडींनें खोटा ठरूं लागला. तेथील समाजसत्तावादाचें प्रात्यक्षिक व त्या प्रयोगांत मिळणारें वाढतें यश पाहून जगांतील भांडवलशाही राष्ट्रांतून भीतीचें वातावरण उत्पन्न झालें. १९ व्या शतकांत फ्रेंच राज्यक्रांतीनें राजकीय समता जगांत शक्य आहे हें दाखवून दिलें. २० व्या शतकांत सोव्हिएट रशियानें आर्थिक समता शक्य आहे हें दाखवून देण्यास सुरुवात केली.

साहजिकच भांडवलशाही राष्ट्रांवर रशियांतील घडामोडींचा परिणाम होणें अपरिहार्य होतें. जें महत्त्व १९ व्या शतकांत फ्रान्सला होतें, तें या शतकांत रशियाला प्राप्त झालें आहे. सोव्हिएट तत्त्वज्ञानावर, तेथील राज्यव्यवस्थेवर, राज्यमीमांसेवर जगभर टीका–टिपण्या सुरू झाल्या. रशियांतील समाजसत्तावादाचें राष्ट्रकुटुंबवादी, साम्यवादी स्वरूप (Communism) हें आत्यंतिक आहे. तेथें व्यक्तीला स्वातंत्र्य नाहीं येवढेंच नव्हे, तर समाज अगर राज्य हेंच सर्व. त्याविरुद्ध अगर त्याचेवर कोणाही व्यक्तीला

अधिकार नाहीं. त्याचे हितांतच व्यक्तिहित, त्याचे उत्कर्षांत व्यक्तीचा उत्कर्ष. या परिस्थितींत राज्यांतील मान्य सिद्धांताविरुद्ध बोलणें अशक्य. खरें भाषणस्वातंत्र्य नाहीं. अधिकृत मानावें अगर मरावें याशिवाय विकल्प नाहीं. पूर्वी एका व्यक्तीची अगर एका लहान वर्गाची समाजावर हुकमत होती, आतां एका पक्षाची, मोठ्या संख्येंत असलेल्या पक्षाची हुकमत झाली. राज्य म्हणजे तो एकच एक पक्ष. अन्य पक्षांना वाव नाहीं. सत्ता आली म्हणजे व्यक्ति जें करतात तेंच पक्ष करतो. अधिकार म्हणजे अचूकपणाचा दावा आलाच, असहिष्णुता आली. विरोध म्हणजे राज्यद्रोह मानण्याची प्रवृत्ति आली. व्यक्तीनें केला म्हणजे जुलूम व पक्षानें किंवा बहुसंख्याकांनीं तेंच केलें तरी जुलूमच; त्याचें स्वरूप कसें बदलेल ? अनियंत्रित राज्यसत्ता असतांना वधस्तंभ जसा तिचा आधारस्तंभ होता, त्याच आधारावर सोव्हिएट व्यवस्था कायम केली आहे. स्वयंभू निष्ठेपेक्षां मृत्यूचे भीतीनेंच राज्याला मान्यता मिळत आहे. या धर्तीवर व या स्वरूपाची टीका करून सोव्हिएट पद्धतींतील दोष अतिरंजित करण्यांत येऊं लागले. तथापि, रशियावर टीका करून परिग्रही समाजाचें नैतिक समर्थन होणें शक्य नव्हतें. परिग्रही समाजांतील मूलभूत खाजगी मालकीचे तत्त्वज्ञानाला कांहीं तरी नैतिक अधिष्ठान देणें जरूर वाटूं लागलें. नैतिक दृष्टीनें अधिष्ठान उत्पन्न करण्या-करतां व्यक्तीचें महत्त्व वाढविणें जरूर होतें. मालकी म्हणजे संपत्तीवरील ताबा. मग कोणत्या वस्तूंवर व्यक्तींचा सर्वस्वीं ताबा असावा, कोणत्या वस्तु सार्वजनिक महत्त्वा-च्या म्हणून त्यांवरील त्याची मालकी अगर ताबा मर्यादित करावा हा विचार सुरू झाला. मनुष्याला हक्क आहेत व ते त्यांचे जीवनविकासाच्या दृष्टीनें जरूर आहेत, म्हणून त्या दृष्टींनें, कोणत्या गोष्टींवर त्याची मालकी असली पाहिजे हें ठरविणें जरूर झालें. विचार हा स्वभावतःच क्रांतिकारक आहे. तो सुरू झाला म्हणजे परिस्थितीवर परिणाम करीत असतो व त्याचेवर परिस्थिति परिणाम करीत असते. खाजगी मालकीला नैतिक अधिष्ठान देण्यासाठीं सुरू झालेल्या विचाराला मर्यादा घालणें अशक्य झालें. नैतिक अधिष्ठान देण्यांत खाजगी मालकीच शिल्लक राहात नाहीं असा धोका दिसतांच फॅसिझमचें तत्त्वज्ञान उदयास आलें.

समाज आणि व्यक्ति यांच्यांतील मौलिक ऐक्य लक्षांत घेतां दोघांचेंही महत्त्व कमी मानण्याचें कारण नाहीं. राज्य हें सर्वस्व नाहीं व त्याचें प्रभुत्वही पूर्णस्वरूप नाहीं. राज्य हें व्यक्तीच्या जीवनांत पूर्णपणें प्रवेश करूं शकत नाहीं. त्यांतील कांहीं क्षेत्र राज्याचे अधिकाराबाहेर आहे, म्हणून व्यक्ति ही आपले परीनें महत्त्वाची आहे. सामाजिक हिताचें काय हें ठरविल्यानें व्यक्तीचे हिताचें काय, व्यक्तीच्या उत्कर्षाला

आवश्यक काय, हें व्यक्तीनें ठरविण्याचा हक्क नाशाबीत होत नाहीं अगर त्यांतील आवश्यकता कमी होत नाहीं. समाज व व्यक्ति यांच्यांतील हितविरोधाचे प्रसंग हे अपवाद असून हितैक्य हा सामान्य नियम आहे. व्यक्तीला विकासाला, आत्मोन्नतीला योग्य संधि पाहिजे. यांत निव्वळ व्यक्तीचेंच हित नाहीं, समाजाचेंही आहे. समाजाचें हित तरी व्यक्तींमार्फतच अनुभविलें जावयाचें असतें. त्याबाबतचा अखेरचा अभिप्राय व्यक्तीच आपल्या अनुभवानें देतात. हें सर्व लक्षांत घेऊन समाजांतील संपत्तिविषयक, मालकीविषयक कल्पनेचा विचार केला पाहिजे. व्यक्तीचे उन्नतीला अवश्य असलेल्या हक्कव्यवस्थेचा संपूर्ण फायदा व्यक्तीला मिळण्यासाठीं जेवढें नियंत्रण मालकी हक्काचें करणें जरूर आहे तें प्रथम झालें पाहिजे. राष्ट्रांतील उत्पादनांतून प्रथम सर्वांच्या प्राथमिक गरजा, आवश्यक गरजा भागल्या पाहिजेत. अन्नवस्त्रनिवासादिक प्राथमिक गरजा न भागल्या तर व्यक्तींचें जीवन अपुरें आहे, त्यांना विकासाचे प्रयत्न करावेसेसुद्धां वाटणार नाहींत. या गरजांची योग्य व्यवस्था ही राष्ट्रांतील उत्पन्नावर पहिला बोजा आहे. आवश्यक गरजा भागण्यासाठीं पुरेसें मिळणें हा हक्क अगदीं व्यक्तिस्वरूप आहे. यासाठीं आवश्यक त्या वस्तु अगर क्रयशक्ति व्यक्तीला मिळणें आवश्यक आहे. याचा अर्थ असा नव्हे कीं, सर्वांना सारखें अन्न दिलें पाहिजे. योग्य व पुरेशी क्रयशक्ति दिल्यानंतर प्रत्येक व्यक्तीला रुचिपरत्वें राहाण्याचा अगर खाण्याचा, पोषाख घालण्याचा हक्क असला पाहिजे, स्वातंत्र्य असलें पाहिजे. तसें नसेल तर तुरुंगाप्रमाणें सारखें अन्न, सारख्या खोल्या, सारखे पोषाख होऊन आयुष्यांतील आनंद नष्ट होईल. आयुष्यांत विविधता असली म्हणजे रस उत्पन्न होतो, जीवनांत वैचित्र्य असलें म्हणजेच विचाराला चालना मिळते. सारखेपणानें विचार मारले जातात. काव्य, कला, साहित्य, या सर्वांचें प्रेरक तत्त्व विरोध व वैचित्र्य आहे. उदात्त आनंद, नाट्य क्षण, हे अनुभवांचे विविधतेंतून निर्माण होतात. व्यक्तीचें वैशिष्ट्य विविधता असली म्हणजेच विकसतें, त्यांतच व्यक्तीला प्रसन्नता वाटते. काय निवडावें, असे विकल्प असले म्हणजे स्वतःला काय आवडतें याचा शोध लागतो, स्वतःची ओळख होते. मनुष्याचे मनाला शिक्षण मिळतें, म्हणून किमान प्रमाण ठरवून तेवढें प्रत्येकाला मिळालें पाहिजे. त्यांत त्यानें काय घ्यावें, काय घेऊं नये याबाबतींत त्याला स्वातंत्र्य असलें पाहिजे.

किमान प्रमाण हें सर्वांसाठीं आहे, तें मिळण्याचा हक्क सार्वत्रिक आहे. समाजांतील घडामोडींमुळें, कोणीही लाचार अगर निराधार राहाणार नाहीं असें झालें म्हणजे प्रत्येकाला आपले विकासाला, समाजक्षेत्रांत वाव आहे, आपण कोणी तरी

आहोंत असा विश्वास वाटेल. करंटें व कंटाळवाणें आयुष्य, भीक व बेकारी हीं हद्दपार होतील. किमान प्रमाण मिळण्याचा हक्क आहे म्हणजे त्याबरोबर कर्तव्यपण आलें. प्रत्येक व्यक्तीनें समाजाकडून घ्यावें पण त्याबरोबर द्यावेंही. काम न करतां व्यक्तींना पोसावें असें बंधन समाजावर असूं शकत नाहीं, समाजाला तें शक्यही नाहीं. प्रत्येकानें मिळविलें पाहिजे. श्रम करण्याची तयारी व्यक्तीची व ते घेण्याची व्यवस्था समाजाची असावी. प्रत्येकानें कार्य करून पोषणापुरतें मिळविलें पाहिजे. जें मिळेल तें श्रमाचें फळ असलें पाहिजे, तो कार्याचा मोबदला असला पाहिजे. श्रमाशिवाय मिळालेलें हें अनैतिक आहे, असामाजिकपण आहे, श्रम केल्याशिवाय फुकट जगण्याचा कोणालाही अधिकार नाही. दुसऱ्यानें मिळविलेल्यावर जगण्याचाहि कोणाला हक्क नाहीं. स्वतःचे श्रमानें प्रत्येकानें मिळविले पाहिजे व जे स्वतःचे श्रमानें मिळविलेले असेल तेच स्वतःचें, तेवढ्यापुरताच त्याचा नैतिक अधिकार. कष्टार्जित मिळकतीवर व तेवढ्यापुरतीच मालकी मर्यादित असली पाहिजे. स्वतः न मिळविलेल्या मिळकतीवर जगणार हे समाजावरील बांडगुळें आहेत. स्वतःचे कष्टानें समाजांत कांहींही भर न टाकतां दुसऱ्याचे श्रमावर जगून हे समाजद्रोह करीत असतात. आजच्या समाजांत दुसऱ्याच्या श्रमानें निर्माण झालेल्या मिळकतीवर मालकी दिली जाते. त्याला कायदेशीर मान्यता आहे म्हणून श्रम न करतां जगणारे आज हजारों आहेत. मालकी आली म्हणून त्यांना नैतिक मान्यता अगर मोठेपण आलें असें मात्र नाहीं. ज्यानें श्रम करून, झगडून यशोमंदिर गांठलें, संपत्ति मिळविली त्याचें जे कौतुक समाज करतो, तें अगर तेवढें कौतुक त्याच्या मुलाचें करीत नाहीं. वारसाकायद्यानें अगर मृत्युपत्रानें मिळकत येईल, मोठेपणा येणार नाहीं. कर्तृत्व व नेतृत्व नेहमींच स्वसंपादित असतात. वडिलोपार्जित संपत्तीबरोबर गुणसंपत्ति तदंगभूत वस्तु नसल्यानें येत नाहीं; यामुळें वारसांना समाजानें आदर न दाखविला तर अयोग्य नाहीं, उलट दाखविला तर चूक होईल. वडिलोपार्जित श्रीमंती असूनसुद्धां समाजदृष्ट्या संपत्तीचा योग्य विनियोग करणारे असे कांहीं असतातही, पण हे थोडे प्रल्हाद अपवादच असतात. वारस्यानें संपत्ति आली म्हणजे त्याचे सामाजिक परिणाम काय होतात हें पाहणें महत्त्वाचें आहे. पहिली गोष्ट म्हणजे वारसांना जगण्यासाठीं श्रमावें लागत नाहीं व दुसरें म्हणजे श्रम करावे लागत नसल्यामुळें रिकामपणाच्या त्यांच्या उद्योगामुळें अनेक प्रकारें समाजांत अनर्थ उत्पन्न होतात; समाजांतील सामुग्रीही अनवश्यक उत्पादनाकडे खर्चिली जाते. पोटासाठीं उद्योगाची जरुरी नाहीं, मग मिळालेल्या वेळाचा व वित्ताचा दुरुपयोग सामान्यतः या वर्गाकडून होतो. एखादा

दुसरा कर्तृत्ववान् निघाला म्हणून ही पद्धत न्याय्य ठरत नाहीं अगर त्या कर्तृत्वाची एवढी जबर किंमत समाजानें द्यावी हेंही योग्य ठरत नाहीं. या वर्गातील बहुसंख्याक चैनींत व ख्यालीखुशालींत वेळ घालवीत असतात. समाजकारणांत अगर राजकारणांत आले तर सेवेसाठीं येत नाहींत, मानासाठीं व पुष्कळ वेळां करमणुकीसाठीं येतात. मनाचा उदासपणा घालविण्यासाठीं प्रवचनें देतील, कीर्तनें करतील, पण धर्माची शिकवण आचरणांत आणणार नाहींत, पुराणांतील वांगीं पुराणांत ठेवण्याची परंपरा ते कधींही मोडणार नाहींत!! धर्मपरिषदेचे अध्यक्ष होतील, धार्मिक ग्रंथांच्या अर्पणपत्रिकाही स्वीकारतील, धर्मवीर म्हणवूनही घेतील, पण त्यांचीं विलासी मनें, कधींही विरागी झालेलीं दिसणार नाहींत. कला व साहित्य यांचा पुरस्कार करतील पण या पुरस्कृत कलेंत कलावंत अवमानित झालेला असेल, साहित्यिक लक्ष्मीपूजक झालेला असेल. अनेक वेळां दुसऱ्यांची कला व दुसऱ्यांची साहित्यनिर्मिति यांच्यातील कोणाचे तरी नांवावर होऊन मिरविली जाते. समाज गरीब, विकत घेऊं शकत नाहीं म्हणून खपणारीं काव्यें व कादंबऱ्या निर्माण होतात. जहागिरदारांचे 'वसंतराव' इनामदारांच्या 'कमूताई' यांच्या प्रेमविलासाभोंवतीं साहित्यिकांची प्रतिभा फिरत असते. तिला अहोरात्र श्रमणाऱ्या मजुरांचें जीवन दिसत नाहीं. आपण उपाशी राहून मुलांसाठीं मरणारी 'श्यामची आई' दिसत नाहीं, गरिबींतून उन्नतीकडे जाणारीं, धडपडणारीं मुलें दिसत नाहींत; स्वातंत्र्यासाठीं, ध्येयासाठीं, स्वसुखांवर अग्नि ठेवणारे, समाजांत उदात्त भावना निर्माण करणारे दिसत नाहींत. प्रेरक व प्रक्षोभक वाङ्मय, पुरस्कृत साहित्य निर्माण करूं शकत नाहीं. श्रीमंतांचे पुरस्कारानें, सामाजिक सामुग्रीचा किती दुरुपयोग होतो याला प्रमाण नाहीं. समाजाच्या सांस्कृतिक गरजा न भागतां त्यांच्या विलासप्रियतेसाठीं ती खर्चिली जाते. ज्या समाजांत दुसऱ्याच्या कष्टार्जित मिळकतीवर मालकी मान्य केली जाते, तेथें गरिबांच्या "नाहींरेच्या" गरजा दुर्लक्षिल्या जातात हा अनुभव आहे. संपत्तीमुळें, क्रयशक्ति असल्यामुळें, परिणामकारक मागणी करून उत्पादनाला ते वळण लावूं शकतात. समाजांतील चालीरीतींनाही आपल्या वागणुकीनें ते वळण देतात. त्यांचे हावभाव, त्यांचे पोषाख, त्यांचें बोलणें यांचीं वर्णनें करणारे वृत्तपत्रकार हे त्यांचेच आश्रित असतात. संपत्ति ही कलहाचें कायम कारण असल्यामुळें, समाजांतील कज्जेदलालीवर जगणारा वकीलवर्ग हाही एकप्रकारें त्यांच्यावर अवलंबून असतो. संपत्ति म्हणजे प्रतिष्ठा. म्हणून संपत्तिमान् वर्गाचा आदर्श, या 'खानदानीं'त स्वश्रमानें मिळवून येऊं इच्छिणारे, अनेक आपल्यापुढें ठेवीत असतात. कर बसविणें असो, कर्ज काढणें असो, हा वर्ग

कसा वागेल हें लक्षांत घेऊन राज्य वागत असतें. संपत्तीचे जोरावर हा वर्ग राज्याची चाल ठरवीत असतो.

वरील वर्णनांत अतिशयोक्ति नाहीं हें सोव्हिएट रशियाशिवाय कोणत्याही देशाकडे सूक्ष्मपणें पाहिलें म्हणजे कळून येईल. विधिमंडळांत जावयाचें म्हणजे निवडणुकीचे वेशींतून. निवडणूक म्हणजे पैसा. याचा परिणाम बहुसंख्याक प्रतिनिधि श्रीमान् अगर त्यांचे दडपणाखालचे असतात. इंग्लंडमधील कॉमन्ससभेचें वास्तविक स्वरूप "टोरी एम्. पी." या पुस्तकांत चित्रित केलें आहे. निम्मे सभासद ठराविक कुटुंबांतून आलेले, नात्यागोत्याचे, श्रीमंत व सरदारवर्गातील आहेत. निम्म्यावर सभासद या नाहीं त्या उद्योगधंद्यांतील कंपन्यांचे चालक आहेत. हिंदुस्थानांतील विधिमंडळें पाहिलीं तर हाच अनुभव येईल. जमीनदारवर्गाला, सरदारवर्गाला तर कायद्यानेंच प्रतिनिधित्व दिलें आहे. व्यापार व उद्योगधंद्यांच्या संस्थानांहि प्रतिनिधित्व दिलें आहे. जातवार प्रतिनिधित्व असलें तरी 'फकीर' न येतां अमीरच निवडून आलेले आहेत. सर्वसामान्य मतदारसंघांतून निवडून येणें हें खर्चाचें काम असल्यामुळें, अनेक निष्ठावंत पण 'नाहीरे' कार्यकर्ते यांना मागें ठेवून लक्ष्मीवंतांना शुभ्रवस्त्रांकित करून, पक्षाची दीक्षा देऊन निवडून आणावें लागलें. आधुनिक जगांतील राजकारण म्हणजे महागाईचें राजकारण आहे. लोकशाही—खरी असो अगर बेगडी असो—म्हणजे निवडणूक. तिच्या राजकारणाचा उपक्रम व उपसंहार निवडणुकीनेंच होतो. निवडणूक म्हणजे खटाटोप व खर्च. आधुनिक राजकारण म्हणजे एक वेळ प्रणयाराधन करून प्रेयसीची प्राप्ति होत नाहीं. सारखें व सतत जनतेचें प्रणयाराधन करावें लागतें, संपूर्ण वेळ या कामास देणें जरूर असतें. स्वतःसाठीं मिळवून हें करण्यास वेळ सांपडेल—पुरेसा सांपडेल हें कठीणच. पक्षसंघटनेनेसुद्धां या सर्व अडचणी दूर होत नाहींत. पक्षाचें द्वार गुणाबरोबरच पैशासाठींपण उघडें ठेवावें लागतें. कुणाची गर्दी आंत होईल हें परिस्थिति व पक्षाच्या गरजा ठरविणार. हें राजकारणाचें झालें. शिक्षण मिळणें न मिळणें हें बहुशः आईबापांचे सांपत्तिक परिस्थितीवरच अवलंबून आहे. मोठ्या नोकऱ्यांना आवश्यक लागणारें शिक्षण पैशाभावीं अनेकांना घेतां येत नाहीं. शिक्षण मिळालें तरी, परीक्षेंत उत्कृष्ट यश आलें तरी, मुलाखतींत अपयश येतें. कारण निवड करणारे कुलशील पाहातात, सामाजिक प्रतिष्ठा पाहातात. सैन्यभरती जातिभेदावर. लष्करी व बिनलष्करी जाति येथें आहेत. मनूला सुचलें नाहीं तें येथें घडत आहे!! जे भरती होतात, जे अधिकारी म्हणून निवडले जातात, ते शूरही असतील, पण सर्व कांहीं नैपुण्य अगर प्रसंगावधान दाखवितात

असें नाहीं. चालू महायुद्धांतच या गोष्टीचा पुरेसा पुरावा मिळेल. हिंदुस्थानची गोष्ट बाजूला ठेवून इंग्लंडमध्यें पाहिलें तर हाच अनुभव आहे. मुलकी अगर लष्करी अधिकाऱ्यांच्या जागा नाणावलेल्या व श्रीमान् घराण्यांतील लोकांना मोठ्या प्रमाणांत जातात. दरबारी वकीलवर्गांत ( Dipeomatic service ) तर शेंकडा ७५ जागा सुमारें १२० कुटुंबांतील माणसांतून गेल्या १०० वर्षांत भरल्या गेल्या आहेत. किंबहुना सरदारवर्गांतील बेकारीसाठीं हें अन्नछत्र आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. समाजकारणाकडे पाहिलें तर उद्घाटनसमारंभ, कोनशिलासमारंभ, "सकल श्रीमंत सकल गुणालंकार" या नाहीं तर त्या 'राजा'शिवाय अगर या नाहीं तर त्या 'दानशूर' अगर 'त्यागवीर' श्रेष्ठीशिवाय क्वचितच होतो. पुरस्काराचे आशेनेंच दरिद्री व गरजू चालक असे करीत असतात. दुष्काळफंड जमविण्यासाठीं यांचाच खास आश्रय घ्यावा लागतो. कांहीं तरी मोठेपण दिल्याशिवाय अन्यथा चंचल असलेली लक्ष्मी आपण होऊन दानार्थ फारशी हालचाल करीत नाहीं. यांना गरिबांचें दर्शन फारसें होत नाहीं, मग त्यांच्या दुःखाची जाणीव लांबच राहिली. उन्हाळ्यांत उटी, पावसाळ्यांत पुणें व शर्यतीच्या मोसमांत मुंबई याप्रमाणे फिरत राहून हे कारभार पाहात असतात. वर्तमानपत्रांत चाळीतील घाण वस्ति दाखविणारें चित्र मिळणार नाहीं, पण कोणत्या घोड्यानें शर्यत जिंकली याचें चित्र दिसेल. त्याच्या चार पिढ्यांचा इतिहास सांगितला जाईल. पण चार पिढ्या लंगोटीशिवाय ज्याला वस्त्र भेटलें नाहीं, त्याची करुण कहाणी सांगण्याला जागा मिळणार नाहीं. घोड्याकुत्र्यांची निगा नोकरांपेक्षां अधिक घेतली जाते. गरिबांचीं दुःखें व त्यांचा कळवळा, गरिबी आल्याशिवाय येत नाहीं ती अनुभवाची हांक आहे. समाजांतील दुःखें पाहून गौतम समाजविन्मुख झाला, संपत्ति व सत्ता यांचा त्याग त्यानें केला व तेथेंच ही परंपरा संपली. आतां समाजांतील दुःखें पाहून कोणी बुद्ध होत नाहीं, अधिकाधिक संपत्तिबद्धच होतात !!

अकष्टार्जित संपत्तीवर जगणारा वर्ग समाजहिताचे दृष्टीनें कोणीही उपयुक्त अगर अवश्य आहे असें मानणार नाहीं. त्यांत अपवादभूत अशी एकादी दुसरी व्यक्ति चांगली निपजेल, पण त्यायोगें वर्गाची उपयुक्तता सिद्ध होत नाहीं अगर या पद्धतीचें नैतिक समर्थनही करतां येत नाहीं. समाजाची रचना अपवादावर आधारणें घातुक आहे, व अनिष्ट आहे. समाजाचे उच्च स्थानीं, कांहींही सामाजिकदृष्ट्या उपयुक्त काम न करणारा वर्ग ठेवणें म्हणजे समाजांतील अन्य वर्गांना अन्याय करणें आहे. समाजांतील संपत्ति हा सर्वांचा वारसा असला पाहिजे, तीवर सर्वांचा

हक्क असला पाहिजे. एकाच वर्गाला दुहेरी फायदा देणें सरळ अन्यायाचें आहे. अकष्टार्जित संपत्तीची मालकी मान्य करणें म्हणजे या भाग्यवंतांची श्रम करण्याची जरुरी अगर गरज नाहींशी करणें व त्यांच्या गरजा समाजानें भागविण्याची जरुरी उत्पन्न करणें आहे. क्रयशक्तीच्या जोरावर त्यांच्या गरजा समाजाला भागविण्यास ते भाग पाडतात. जन्मामुळें वारसा आला, संपत्ति आली म्हणून अपरिमित सत्ता, समाजविद्रोही सत्ता मिळावी हा अन्याय आहे. समाजशक्तीवर, समाजप्रयत्नांवर हा अखंड बोजा बसणें हें गैर आहे, असह्य आहे. ज्यानें प्रत्यक्ष मिळविलें त्याचा मान समाजानें केला, त्यांचें ऐकलेंही. पण त्याची संपत्ति ज्याचे ज्याचेकडे जाईल त्याचेसाठीं समाजानें श्रमावें हें कोणी मान्य करणार नाहीं. त्याचे हातांत ही अकष्टार्जित संपत्ति ठेवणें म्हणजे समाजाला त्याचेसाठीं श्रम करण्यास सांगणें आहे. विद्वान्, शीलवान् व्यक्तींच्या मुलांना जो अधिकार समाज देत नाहीं, तो श्रीमंतांचे मुलांना, वारसांना मिळावा, हें अयोग्य आहे; यांत समाज मोठी विसंगति करीत आहे, यांत विषमता आहे, समाजांतील नैतिक बुद्धीचें विडंबन आहे. या मालकी व्यवस्थेंत कांहींही न्याय नाहीं. मालकी हक्काच्या कल्पनेंत या व्यवस्थेला स्थान दिल्यास कुणाचीही नैतिक मान्यता तिला मिळणार नाहीं. अकष्टार्जित संपत्तींत मालकी असणें अनवश्यक, अन्याय्य व अनीतिमान् आहे.

मनुष्यानें श्रम करून मिळवावें व जगावें हें मान्य केल्यानंतर त्यानें आपल्या मुलाबाळांसाठीं कांहींच ठेवूं नये का? असा प्रश्न उपस्थित होतो. श्रमविरहित मिळालेली संपत्ति मग ती वारसानें, मृत्युपत्रानें, दानानें अगर देणगीनें असो, सर्वस्वीं व निरपवाद रीतीनें वर वर्णन केल्याप्रमाणें मानावी कीं नाहीं, का प्रमाणांत व कांहीं प्रकारांत तिला अपवाद असावेत असा प्रश्न उपस्थित होतो. आजच्या समाजांत मुलांबाळांना शिक्षण मिळावें, ते चांगल्या स्थितींत राहावेत, आपल्या पश्चात् आपली पत्नी व आपलीं मुलें यांची आबाळ होऊं नये, हा एक हेतु मनुष्याचे श्रमास कारणीभूत असतो. आपण काढलेले हाल मुलांस काढावे लागूं नयेत ही साहाजिक इच्छा मनुष्याला असते. प्रयत्नाची प्रेरणा विद्यमान समाजांत केवळ स्वतःसाठीं स्वतःपुरतेंच मिळवावें येवढी मर्यादित नसते. प्रत्यक्ष प्रयत्नानें काय मिळतें हा प्रश्न नाहीं, कां मिळवावें हा प्रश्न आहे. विद्यमान समाज जन्मास आल्यापासून नागरिकांची सर्वस्वीं जबाबदारी स्वतःवर घेत नाहीं. मूल झाल्याबरोबर सार्वजनिक दाईनें त्याची काळजी वाहाण्यास सुरुवात करून तें योग्य काळीं वृद्ध होऊन मेल्यानंतर सार्वजनिक खर्चानें व सार्वजनिक व्यवस्थेखालीं त्याचें दहन अगर दफन झालें, तर मनुष्याला त्याचे

पश्चात् वारसासाठीं, मुलांबाळांसाठीं कांहींही ठेवण्याचें कारण नाहीं. जी काळजी व कळकळ व्यक्तीला आपल्या अपत्यांबद्दल वाटते, तिची नैतिक आवश्यकता या व्यवस्थेनें नाहींशी होते. समाज अगर राज्यव्यवस्था, जन्मास आलेला प्रत्येक जीव ही समाजाची प्रभावी वस्तु नव्हे अमोलिक संपत्ति आहे, तिची निगा राखणें, तिची सर्वथैव व्यवस्था ठेवणें, हें स्वतःचें कर्तव्य आहे असें मानूं लागली व त्याप्रमाणें घडूं लागलें, म्हणजे मनुष्यानें स्वतःपुरतें व स्वतःचें पाहाणें एवढेंच त्याचें कार्य ठरतें. राज्य हें सर्वांचा पिता. त्यांचे पिते हे 'केवलं जन्महेतवः' ही रघुवंशांत वर्णन केलेली परिस्थिति मग उपलब्ध होते. पण जोंपर्यंत असें होत नाहीं, तोंपर्यंत मनुष्यानें मुलांबाळांसाठीं ठेवणें अनिष्ट आहे का, अन्याय्य आहे का, असा प्रश्न उद्भवतो. श्रम करून मिळावावें, यांत श्रम करण्याचें वय व ताकद गृहीत धरली आहे. अज्ञानांनीं व वृद्धांनीं श्रम करून मिळवावें असें कोण म्हणेल? त्याचप्रमाणें श्रम करण्यास तयार असतां, समाजव्यवस्थेंत श्रम घेणारें संघटन नाहीं, म्हणून उपाशीं मरावें असेंही कोणी म्हणणार नाहीं. श्रम करण्याची ताकद व वय आहे, समाजांत राज्यव्यवस्थेंत श्रम घेण्याची व्यवस्था आहे अगर अपरिहार्य परिस्थितींत श्रम घेतां येत नसतील तर बेकारभत्ता वगैरे व्यवस्था आहे, या परिस्थितींत मनुष्यानें काम केलें पाहिजे अगर काम करण्यास तयार असलें पाहिजे. अकष्टार्जित वित्त आहे म्हणून काम करण्यास तयार नाहीं हें म्हणण्याचा त्यास हक्क नसावा; तशी परिस्थिति उत्पन्न करणारी अकष्टार्जित संपत्ति त्याचेजवळ राहतां कामा नये. मुलाबाळांची सर्व व्यवस्था जर राज्य करूं शकत नसेल, तर मनुष्याला आपल्या मुलाबाळांस कांहीं तरी मागें ठेवण्याचा अधिकार असणें न्याय्य ठरेल. अज्ञानाचें पालन राज्यानें तरी केलें पाहिजे, नाहीं तर पितरांनीं तरी केलें पाहिजे; म्हणून मनुष्याला या परिस्थितींत मुलांचें शिक्षण व संगोपन यापुरतें ठेवण्याचा अधिकार देणें गैर नाहीं. त्यांना शिक्षण मिळेल व वयांत येतांच ते श्रम करून मिळविण्यास लायक व कार्यक्षम होतील इतकी त्यांची तयारी होण्यासाठीं जेवढें लागेल तेवढें त्यांना ठेवल्यास हरकत नसावी. यापेक्षां जास्त ठेवणें म्हणजे श्रम न करतां जगण्याचा हक्क, हा असामाजिक हक्क त्यांस बहाल करणें आहे. यापेक्षां कमी ठेवावें अशी मर्यादा घालणें म्हणजे स्वतः राज्यानें कर्तव्य करावयाचें नाहीं व दुसऱ्यांस करूं द्यावयाचें नाहीं, असें खुनशीपणाचें व अन्यायाचें ठरेल. मरतांना मनुष्यास आपल्या अज्ञान अपत्यांची व्यवस्था स्वतःकडून झाली आहे अगर राज्य करीत आहे असा विश्वास असला पाहिजे. शिक्षण व अनाथांचें पोषण यासाठीं जर वारसाधनखर्च होणार असेल, तर वारसा समर्थनीय ठरेल. याचा अर्थ

मनुष्याला आपले नातू, पणतू यांची व्यवस्था करण्याचा हक्क आहे असा नव्हे. शिक्षणापुरती व श्रमाचे वय नाहीं तोंपर्यंत सोय करण्याचा हक्क व तोही स्वतःचे अपत्यांपुरतांच असावा. या मर्यादेबाहेर तो ठेवणें असमर्थनीय व अन्यायाचें आहे, अनैतिक आहे. स्मारकभूत किरकोळ पण जंगमवस्तु, उदाहरणार्थ मनुष्याचे फोटो, त्याचा पुस्तकसंग्रह अगर अन्य गोष्टी ज्यांचा भावनांशीं संबंध आहे अशा, वारस्यानें दिल्या गेल्यास हरकत घेण्याचें कारण नाहीं. या संपत्तीचा उपयोग दुसऱ्याचे श्रम घेण्याकडे होणार नसल्यानें ती वारसांचे हातीं ठेवण्यास अन्याय नाहीं; तिच्या संग्रहामुळें त्याला श्रम करण्याची जरुरी नाहींशी होईल असे नसल्यानें या संग्रहांत अनैतिक कांहीं नाहीं.

वरील दृष्टीनें विचार केल्यानंतर कोणत्या परिस्थितींत मालकी मर्यादित राहून, समर्थनीय ठरेल हें स्पष्ट होतें. श्रमानें मिळविलेली संपत्ति श्रम करणाराजवळ राहाणें मग योग्य ठरतें. कांहीं तरी कार्य करून ती निर्माण झाली असेल तर ती समर्थनीय ठरेल; मात्र तें कार्य समाजाचे दृष्टया उपयुक्त असलें पाहिजे. शिक्षक, वैद्य, न्याया-धीश, सैनिक, शिपाई, खलाशी हे सर्व आपल्या श्रमानें कार्य करून मिळवितात. जें मिळतें तें त्यांनीं श्रम केले, कांहीं तरी समाजाची सोय व सेवा केली त्याचा मोबदला म्हणून मिळतें. शोधक, लेखक, हे श्रम करतात, समाजाला उपयुक्त असें कांहीं आपल्या कार्यानें निर्माण करतात म्हणून ते जें मिळवितात, तें त्यांच्या श्रमांचे पारि-तोषिक होय. श्रम करून ते जगतात, जे श्रम समाजाला आज उपयोगी आहेत अगर उद्यां उपयोगी पडणार आहेत, ते करून जे मिळवितात ते समाजहित, समाजसेवा करीत असतात. त्यांच्यासाठीं समाजानें जें कांहीं खर्च केलें असेल त्याची फेड ते याप्रमाणें करीत असतात. समाजांत श्रम न करतां राहाणारे, हे समाजविद्रोही व बांडगुळें आहेत. जे प्रत्यक्ष श्रम करून समाजाच्या उत्पादनांत भर टाकतात ते, व जे आपल्या कार्यानें समाजांतील उत्पादनशक्ति वाढवितात, समाजाचे संस्कृतींत भर टाकतात ते, हें सर्व समाजांतील त्यांचे नागरिक या नात्यानें कर्तव्य करीत असतात. ते यथार्थपणें नागरिकधर्म आचरितात. जे श्रम न करतां जगतात त्यांचा बोजा समाजास सोसावा लागतो, त्यांच्यासाठीं समाजाला श्रम करावे लागतात. जे समाजाला उपयुक्त असें कार्य करितात, त्यांचा बोजा समाजांवर असत नाहीं. समाजधारणेला अवश्य व उपयुक्त अशीं कार्यें करणारे आपलें कर्तव्यच करीत असतात म्हणून त्यांना जें मिळतें तें समर्थनीय ठरतें. केवळ कांहीं तरी कार्य करून संपत्ति मिळाली म्हणजे तिचे संपादन योग्य अगर समर्थनीय ठरतें, हा सिद्धान्त चूक आहे. संपत्ति ही श्रमाचा

योग्य मोबदला तरी असला पाहिजे अगर कर्तव्य–पालनाचें कार्य केल्याचें पारितोषिक असलें पाहिजे. मग प्रश्न असा उपस्थित होतो कीं, योग्य मोबदला म्हणजे काय व कसा ठरवावा? कोणतें कार्य समाजदृष्ट्या कर्तव्य ठरतें व पारितोषिकाला पात्र ठरतें व तें ठरविण्याची कसोटी कोणती? त्याचप्रमाणें मिळालेल्या संपत्तीचा उपयोग व उपभोग मालकानें काय मर्यादेंत घ्यावा हाही प्रश्न महत्त्वाचा होतो. श्रमाची मोजणी कशी करावयाची, प्रत्यक्ष परिश्रमानें का पात्रतेनें? भिंत रचणारा गवंडी व ग्रंथरचना करणारा ग्रंथकार यांच्या श्रमाची किंमत कशी करावयाची? मिळालेल्या संपत्तींतून खर्च करून शिल्लक राहिली व ती व्याजीं लावून उत्पन्न आलें तर या संपत्तीचें स्वरूप काय? तिलाही श्रमाचा मोबदला अगर कर्तव्याचें पारितोषिक म्हणावयाचें का? असल्या संपत्तीचे हक्क काय, तिच्या मालकीच्या मर्यादा कोणत्या? समाजांतील शिल्लक व्यक्तींच्या हातीं असावी का? राहिल्यास व ती गुंतविल्यास कायम दरानें व्याज मिळावें, का कमी जास्त? कुठें गुंतवावी याला कांहीं मर्यादा आहे का?

महत्त्वाचे दृष्टीनें श्रमाला काय मोबदला मिळावा हा प्रश्न प्रथम घेणें योग्य आहे. सर्वांना सारखें मिळावें, सर्वांची प्राप्ति सारखी असावी ही कम्युनिस्टांची–राष्ट्र-कुटुंबवादी लोकांची–विचारसरणी आहे. मनुष्याजवळ जी संपत्ति असेल, जी क्रय-शक्ति असेल त्या मानानें तो समाजावर प्रभाव टाकूं शकतो, त्याची मागणी त्या प्रमाणांत परिणामकारक असते. सर्वांचा समाजावरील प्रभाव सारखा करावयाचा तर सर्वांजवळील संपत्ति व क्रयशक्ति सारखी केली पाहिजे, सर्वांची प्राप्ति सारखी असली पाहिजे. अपवाद म्हणून त्यांत फरक केला तर, अपवाद वाढतच जातात व होणाऱ्या फरकांचेंपण कांहीं तरी समर्थन केलें जातें. फरक अगर विषमप्राप्ति काय तत्त्वांवर करावी हें निश्चितपणें अगर न्यायानें ठरविणें केव्हांही अशक्य आहे. न्हाव्याला कमी व न्यायाधिशाला जास्त, गवंड्याला कमी व ग्रंथकाराला जास्त, यांत निश्चित-पणें असें माप आहे व त्यानें मोजून हें होत आहे असें नाहीं. कांहीं निश्चित वजनें आहेत व तीं टाकून प्रत्येकाचे श्रम तोलून हें होत आहे असें नाहीं. कांहीं तरी दड-पून ठरविलें जातें व नंतर परंपरा म्हणून मानलें जातें. पुनः एकसारखे म्हणजे ते करीत असलेल्या उत्पादनाचे कार्याचे दृष्टीनें, श्रम केले तरी सारखी प्राप्ति न मिळतां त्यांतही फरक केला जातो तोही बिनमापानें. न्यायाधीश व न्यायाधीश यांतही सारखी प्राप्ति नसते व त्यांतील फरकाचे कारणही असेंच बिनहिशोबी. श्रमाश्रमांत मोबद-ल्याचे दृष्टीनें असलेलें प्रमाण तेंही सर्वत्र सारखें नसतें. गवंडी व इंजिनियर यांच्या

प्राप्तींतील प्रमाण सर्वत्र सारखेंच असतें असें नाहीं. येथील न्यायाधिशांना, मुलकी अधिकाऱ्यांना, जगांतील कोणत्याही देशांतील तत्सम कार्य करणाऱ्या लोकांपेक्षां अधिक मिळते. शेवटचा कारकून, व खात्याचा मुख्य, यांचे येथील प्राप्तीचे प्रमाणांत जो फरक आहे, तो इतर कोठेंही इतका मोठा नाहीं व याला सयुक्तिक असें कारण नाहीं. प्राप्तीतील विषमता कुठल्याही गुणावर निश्चितपणें अगर न्यायानें आधारलेली आहे असें म्हणतां येणार नाहीं. जे भेद आज समाजांत दिसतात त्यांचे मुळाशीं संपत्ति हें कारण आहे. आनुवंशिक संस्कारामुळें वर्ग पडले जातात हें वर्गभेदाचें खरें कारण नसून खरें कारण आर्थिक विषमता हें आहे. याचा उत्कृष्ट पुरावा समाजांत श्रीमंतवर्गांतील लग्नें कशीं ठरतात हें पाहिलें म्हणजे मिळेल. वर्गाबाहेरील सोयरीक श्रीमंती पाहूनच होते. तेथें मग सनातनधर्म मानला जात नाहीं. जातकुळी, मानली जात नाहीं, जातिभेद व वर्गभेद नष्ट करण्याचा खात्रीचा उपाय म्हणजे समान प्राप्ति. समाजांत सर्वांना सारखें मिळूं लागलें म्हणजे लग्नाचे दृष्टीनें निवड करण्याला व्यापक क्षेत्र वधुवरांना उपलब्ध होईल; रूप व गुण पाहून स्वभावानुसार स्वयंवरें होतील, संसार अधिक सुखी होईल. निर्माण होणारी पिढी अधिक बलवान् व बुद्धिमान् निघेल.

समाजांत समान प्राप्ति असावी हें घडवून आणणें अतिशय बिकट आहे. त्यामागील आदर्श व श्रेष्ठतम न्याय अमान्य करतां येणार नाहीं. तथापि आज जो समाज विद्यमान आहे तो कांहीं कोऱ्या कागदासारखा नाहीं, की ज्यावर पाहिजेल तें व पाहिजेल त्या लिपींत लिहितां येईल. त्याच्या चरित्रग्रंथाची पानें लिहिलेलीं आहेत, त्याची भाषा रूढ झालेली आहे, समाजपरत्वें त्याची लिपी पण निरनिराळी आहे. नवीन व्याकरणाचे दृष्टीनें बरीच खोडाखोड करावी लागेल. कांहीं ऱ्हस्व तें दीर्घ करावें लागेल, अनुच्चारित म्हणून निरुपयोगी अनुस्वार काढावे लागतील. ते शद्बाची व्युत्पत्ति सांगत असतील, पण आज ते केवळ शोभा म्हणून आहेत व निरर्थक आहेत. तात्पर्य, समाजांतील विद्यमान भाव, ज्यांची मुळें जुनी आहेत ते लक्षांत घेऊन विचार केला पाहिजे. एकदम एकहाती नवीन रचना करणें अवघड आहे; अनिष्ट असल्याचा अनुभव सोव्हियटला आला आहे. प्रत्येकानें श्रमानें जगलें पाहिजे येवढे म्हटल्याबरोबर प्रत्येकाला पुरेसें मिळालें पाहिजे हें आलेंच. पण कमीजास्त श्रमांना सारखी प्राप्ति यांतील कार्यकारणभाव सर्वांनाच पटणार नाहीं. कांहींना तर त्यांत अन्यायहि वाटेल. तसेंच ज्यांच्या गरजा प्रमाणानें अगर प्रकारानें सारख्या नाहींत त्यांना सारखी प्राप्ति मिळावी यांतही न्याय नाहीं. बायकामुलें

नसलेला विधुर अगर ब्रह्मचारी व कुटुंबवत्सल गृहस्थ, दोघेही सारखे श्रम करतात म्हणून सारखी प्राप्ति कशी न्याय्य ठरेल? दोघांच्या गरजा सारख्या नाहींत. त्यांना पुरेसें मिळावयाचें म्हणजे प्राप्तींत विषमता आलीच. एकसारखी प्राप्ति सर्वांना मिळेल याचा विचार करतांना अनेक गोष्टींचा विचार करावा लागेल; गरजांची प्रतवारी करावी लागेल हें सगळें खरें; या अडचणी सर्व खऱ्या असल्या तरी आजची विषमता समर्थनीय व न्याय्य ठरत नाहीं. कुठल्याही नीतीनें अगर तर्कानें तिचा पाठपुरावा करतां येणार नाहीं. समान प्राप्तीचें ध्येय व्यवहारांत आणतांना कांहीं मुरड घालावी लागेल हें सोव्हियटमध्यें घडलें त्यावरून स्पष्ट होत आहे. क्रांतीनंतर समाजाची पुनर्घटना करतांना सुरवातीला तेथें विषम प्राप्ति कांहीं प्रमाणांत अपरिहार्य म्हणून स्वीकारावी लागली, व आजही २५ वर्षांनीं संपूर्णतया समान प्राप्तीचें धोरण तेथें स्वीकारलें गेलें नाहीं. तथापि मनुष्याचें मूल्य, त्याची लायकी, त्याचे संपत्तीवर ठरविणें, हें अन्यायाचें व अनैतिक आहे हा सिद्धान्त मात्र तेथें मौलिक असून समाजरचनेचा तो एक आधार आहे.

समान प्राप्ति तत्त्वांतील अडचणी व आजचे दृष्टीनें त्यांतील अन्याय हा विचारांत घेतल्यानंतर आजच्या स्थितींत ही विचारसरणी सर्वस्वी स्वीकारार्ह वाटत नाहीं. मागणी व पुरवठा तत्त्वांवर, बाजारभावावर वेतनप्रमाण, प्राप्तिप्रमाण ठेवावें ही विचारसरणीही स्वीकारार्ह नाहीं. या विचारसरणींतील अनवस्था व अन्याय हे तर उघडउघड ढोबळ आहेत. समाजाला ज्या श्रमाची जरुरी आहे त्याचा पुरवठा होतो व जो भाव या परिस्थितींत श्रमांना येईल तो त्या श्रमांची किंमत म्हणून समाज मानतो. मनुष्याचे श्रमाला या व्यवस्थेंत योग्य व अनुरूप मोबदला मिळतो असें प्रतिपादण्यांत येतें, पण वस्तुस्थिति तशी नसते. मागणी व पुरवठा हा सिद्धान्त लागू होण्यासाठीं जी निर्मळ परिस्थिति असावी लागते ती बहुशः उपलब्ध नसते. सरकारी नोकरांचे पगार 'स्केलनें' ठरतात. मागणी व पुरवठा हा न्याय तेथें नसतो. वकीलफी कायद्यानें ठरविली जाते, मागणी व पुरवठा या सिद्धान्तानें सर्वस्वीं नव्हे. अनेक कामें 'पर्सेंटेज बेसिस'वर म्हणजे शेकडा ठराविक प्राप्ति घेऊन केलीं जातात. तेथें मागणी–पुरवठा सिद्धान्त लावला जात नाहीं. कांहीं धंद्यांतून खास करारमदार करून वेतन ठरलें जातें. उघडउघड स्पर्धेला वाव देऊन माणसें घेतलीं जात नाहींत. कांहीं कामांचें वेतन परंपरेनें ठरलेलें असतें. गांवांतील बलुतेदारांचें वेतन मागणी-पुरवठ्याचे सिद्धांतानें ठरत नाहीं. कांहीं कामांचे वेतन कमी असून लोक त्यांतील सन्मान लक्षांत घेऊन तें करीत असतात. वास्तविक अन्य ठिकाणीं त्यांना जास्त

प्राप्ति मिळणें शक्य असतें. वकीलीत जास्त मिळत असतां न्यायाधीश होणें हे सन्मानाचें म्हणून कमी प्राप्ति स्वीकारून लोक तें पद घेतात. सर्वत्र संपूर्णपणें स्पर्धा विद्यमान नसते. मागणी व पुरवठ्याचा सिद्धान्त निर्भेळ वातावरण नसल्यानें श्रमाचा खरा भाव निश्चित करूं शकत नाहीं. म्हणून श्रमाला आज मिळणारी किंमत सर्वस्वीं योग्य अगर अनुरूप मानणें चूक आहे. जी मिळते त्यांत न्याय असते हें म्हणणें अधिक चुकीचें आहे. मनुष्याचे श्रमाची किंमत बाजारभावानें जी केली जाते, ती योग्य व नीतिदृष्ट्या ही कसोटी योग्यता ठरविण्यास पुरेशी आहे हें त्याहूनही अधिक चुकीचें आहे. भांडवलशाही उत्पादनाचें मुख्य उत्पादन म्हणजे मोठ्या प्रमाणांवरील बेकारी. मागणी–पुरवठा सिद्धान्तानें, बाजारभावानें बेकाराच्या श्रमाला शून्य किंमत ठरते हें बरोबर कसें ठरेल? बाजारभावानें किंमत येत नाहीं म्हणजे त्या वस्तूला कांहींच किंमत नाहीं, कांहीं मूल्य नाहीं असें झालें. यांतील अनैतिकता उघड आहे. जर बाजारभावावर मजुरांचे वेतन सर्वस्वी ठेवलें गेलें तर अनर्थ कोसळेल. किमान वेतनाचा कायदा जेथें आहे तेथें कांहीं तरी बरें आहे, जेथें नाहीं तेथें मजुरांचे हाल आहेत. मजुरांना रोजगार नसेल तर मरावें लागेल. त्यांचेजवळ शिल्लक क्वचितच. ते फार काळ बेकारींत राहूं शकत नाहींत. त्यांच्या असहाय्य स्थितीचा फायदा बाजारभावाचे तत्त्वानें मालकांना मिळतो. भाव ठरविण्यांत, दर ठरविण्यांत उभय पक्षांना स्वातंत्र्य आहे, करारस्वातंत्र्य आहे हें म्हणणें व्यर्थ आहे. दोन्ही पक्षांची निकड व गरज सारखी नसते, त्यांच्यांतील ही विषमता करारस्वातंत्र्याला व्यर्थ ठरविते. ही विषमता म्हणजे भांडवलशाहीचा प्राण आहे; ही नसेल तर भांडवलशाही कोलमडून पडेल. जे अधिक गरजू व असहाय्य म्हणजे मजूर, त्यांना जे मिळेल तें घ्यावें लागतें. बाजारभावानें मजूरी ठरणें, श्रमाची किंमत ठरणें म्हणजे विषमतेला स्वराज्यप्राप्तीच आहे. ही व्यवस्था सर्वथैव अनिष्ट आहे, अस्वीकारार्ह आहे.

बाजारभावानें श्रमाला मिळालेल्या मोबदला श्रमाचें सामाजिकदृष्ट्या मूल्य अगर महत्त्व ठरवूं शकत नाहीं. अश्लील वाङ्मयाला बाजार भावानें खूप किंमत आली म्हणून त्याचें सामाजिक महत्त्व शाबित झालें असें नाहीं अगर त्यांतील श्रम समाजाचे दृष्टीनें मूल्यवान् आहेत असेंही ठरत नाहीं. समाजाचें मानसिक–स्वास्थ बिघडलें आहे येवढेंच सिद्ध होतें. जाहिरातीचे धंद्यावर आज अनेक जगतात. त्यांचे श्रम समाजाचे दृष्टीनें मूल्यवान् आहेत हें म्हणणें चूक होईल. आधुनिक धंद्यांना जाहिरातबाजीचा रोग जडला आहे. हा रोग किती विविध प्रकारचा व किती व्यापक आहे हें रस्त्यांतून जातांना, वर्तमानपत्रें वाचतांना, सिनेमा पाहातांना, सहज लक्षांत

येतें. या कामीं होणारे श्रम व त्या श्रमांना मिळणारा मेहनताना मोठ्या प्रमाणावर असला तरी त्यांचें सामाजिक मूल्य व महत्त्व कोणी विशेष मानीत नाहीं. जाहिरात म्हणजे अतिशयोक्ति करून गिऱ्हाइकास बनविणें आहे. उत्कृष्ट विक्रेता म्हणजे गिऱ्हाइकाला नको असतां वस्तु गळयांत बांधणारा. उत्कृष्ट वकील म्हणजे अपराध्याला वांचविणारा, कोर्टाचे हुकूम यशस्वी रीतीनें व्यर्थ करणारा. यांचे श्रम समाजाचे दृष्टीनें मूल्यवान् कसे ? यांची प्राप्ति मोठी असेल पण तिला सामाजिक मूल्य काय ? आरोग्यहीन व अव्यवस्थित घरें अगर चाळी बांधून, त्यांचे भाड्यांतून अनेक श्रीमंत झाले आहेत व होत आहेत; पण या मालकांनीं जेवढें मिळविलें त्याच्यापेक्षां किती तरी अधिक समाजाला त्यांनीं केलेल्या समाजाचे नुकसानीबद्दल खर्च करावें लागलें आहे. गलिच्छ वस्तींत राहिल्यानें राहणारांचें आरोग्य बिघडतें. त्यांचें बिघडलें म्हणजे अन्य ठिकाणीं राहणाऱ्यांचें बिघडतें. अनेक साथींचा उगम असलेल्या गलिच्छ वस्तींतूनच होत असतो. साथींपायीं समाजाला प्राणहानि व वित्तहानि सोसावी लागते. अशा मालकांची प्रगति म्हणजे समाजाला खर्चाची बाब होऊं शकते. त्यांची प्राप्ति समाजाला कांहीं देत नाहीं, उलट परिणाम करणारी होते. तिला सामाजिक मूल्य आहे असें कसें म्हणावें ? समाजाला अनुपयुक्त अशा अनेक गोष्टींचें उत्पादन करून अनेक लोक श्रीमंत होतात, संपत्तिमान् होतात. परिणामकारक मागणी असली, विकत घेणारें गिऱ्हाईक भेटलें कीं, त्या वस्तूचें उत्पादन होतें. तिची समाजाला जरूर आहे अगर ती समाजाला उपयुक्त आहे याचा विचारच होत नाहीं. बाजारभावामुळें आलेली किंमत परिणामकारक मागणीमुळें आलेली आहे. ही किंमत आली म्हणजे समाजाचे दृष्टीनें त्या उत्पादनाला ‘ किंमत ’ आली अगर मूल्य आलें असे नाहीं. किंबहुना बाजारभावानें ठरलेल्या किंमतीचा, मूल्याचा, सामाजिक मूल्याचा सामाजिक मूल्याशीं संबंध असतोच असें नाहीं. जें सामाजिकदृष्ट्या मूल्यवान्, तें जर बाजारभावानें तितकेंच मूल्यवान् अगर मूल्यवान् असेल असें नाहीं. समाजाच्या आवश्यक गरजा अन्न, वस्त्र, निवास वगैरे यांचें सामाजिक महत्त्व व मूल्य स्वयंसिद्ध आहे. पण त्यांचें उत्पादन करणारे सामाजिक महत्त्वाकडे न पाहातां बाजारभाव पाहून वागतात, बाजारभावानें हें उत्पादन त्यांना कमी महत्त्वाचें, कमी मूल्याचें वाटतें. आज जें उत्पादन समाजांत होत आहे त्याचें कारण त्याला मागणी म्हणजे परिणामकारक मागणी आहे म्हणून. त्या उत्पादनाची किंमत, समाजाची गरज लक्षांत न घेतां अगर त्याचें सामाजिक महत्त्व लक्षांत न घेतां ठरली जाते. याचा अर्थ समाजांत संपत्तीची वांटणी, अशा स्वरूपाची होत आहे कीं, तिचा उपयोग परिणामकारक

मागणीच्या द्वारें समाजहिताला बाधक असा होत आहे. म्हणून कोणत्या मागण्या परिणामकारक व्हाव्यात व त्यांना काय किंमत यावी याची समाजाच्या दृष्टीनें तपासणी झाली पाहिजे. ज्या इष्ट मागण्या असतील त्या परिणामकारक ठरविल्यानंतरसुद्धां तद्विषयक उत्पादनाला काय किंमत यावी हेंही ठरविलें पाहिजे. समाजाचे दृष्टीनें उपयुक्त असें उत्पादन झालें पाहिजे व त्याची किंमतही समाजाचे हिताचें दृष्टीनें ठरली पाहिजे. ही व्यवस्था म्हणजे योजनापूर्ण व्यवहार होय. त्यांत सर्वांच्या गरजा, श्रम करण्याची पात्रता, समाजांतील विद्यमान व भावी सामुग्री व सरंजाम, आजच्या व उद्यांच्या गरजा वगैरे गोष्टींचा विचार होऊन न्यायाचे दृष्टीनें प्रत्येक गोष्ट होईल. उपभोगासाठीं उत्पादन व श्रमानें जीवन हा तेथें मुख्य संकेत राहील. आजच्या भांडवलशाही व्यवस्थेंत भाव पाहून नफ्याचे दृष्टीनें उत्पादन करावयाचें, स्वस्त घेऊन महाग विकावयाचें हा अगदीं साधा दंडक आहे. सामाजिक न्याय अगर नीति यांचा येथें संबंध नाहीं. नफ्यावर आधारलेल्या व्यवस्थेंत न्याय व नीति यांना नकार असतो. समाज धारणेला अवश्य असणारे वरील मौलिक विचार जेथें नांदत नाहींत ती व्यवस्था फार काळ टिकूं शकत नाहीं.

भांडवलशाही समाजव्यवस्थेत श्रमांना मिळणारें मूल्य अगर मोबदला, योग्य, अनुरूप नसतो व मिळणाऱ्या मोबदल्यावरुन श्रमाचें सामाजिक महत्त्व अगर मूल्यही सिद्ध होत नाही, हें सहज समाज कसा वागतो याकडे पाहिलें म्हणजे कळून येईल. ज्यानीं मोठमोठे शोध लावले, ज्यानीं कलानिर्मिती केली, काव्य व साहित्य यांत ज्यांनीं प्रतिभाविलास केला त्यांचा जो सन्मान समाज करतो, त्यांच्याबद्दल जो आदर समाज दाखवितो, तो त्यांच्या प्राप्तीसाठी खास नाहीं. कारण त्यांना मिळणारी प्राप्ति त्यांच्या योग्यतेचे मानानें क्षुद्र असते. बाजारांतील चलनी नाण्यापेक्षां कांहीं तरी निराळ्या नाण्यांत समाज त्यांची किंमत करीत असतो. ज्यानें देश आसेतुहिमाचल जागा केला, ज्यानें रानोमाळ हिंडून वर्षानुवर्षे लढत राहून स्वातंत्र्य टिकविलें, ज्यानें सर्वत्र निराशा व अपजय दिसत असतां आपल्या दिव्य नेतृत्वानें जखमी व घायाळ झालेल्या, मारामुळें झांपड आलेल्या राष्ट्राला उभें केलें व कृतनिश्चय करून स्वातंत्र्यार्थ लढावयास लावलें, त्या धीरवीर महात्म्यांच्या श्रमांची किंमत जगांतील कोणत्याही चलनांत करतां यावयाची नाहीं. समाज कधीं तसा प्रयत्नही करीत नाहीं. आजही समाज आपल्या आदरानें व आचरणानें दारूचा गुत्तेवाला व शिक्षक, सटोडिया व वैद्य, उद्योगधंदेवाले व बौद्धिक श्रमावर जगणारे, यांच्यांतील फरक स्पष्ट करून श्रमाचें सामाजिक मूल्य निव्वळ प्राप्तीवर नाहीं हें दाखवीत

असतो. कांहीं श्रमांची किंमत त्यांचे उत्पादनावर अवलंबून असते, तर कांहीं श्रमांची किंमत ते जनतेची जी सोय करतात, जी सेवा करतात, जें कार्य करतात त्यावरून ठरते. उद्योगधंदे व व्यवसाय ( Industri·s and Professions ) असें त्यांचें वर्गीकरण केलें तर पहिल्यांत नैतिक विचारांचा प्रश्नच उद्भवत नाहीं. कायद्यानें जें मना केलें नसेल तें उत्पादन करावे व त्याचें ध्येय नफा कमाल नफा. दुसऱ्यांत कांहीं आचरणाचे संकेत ठरलेले असतात, त्यांविरुद्ध जाऊन मिळविणे अयोग्य ठरतें. वकील, वैद्य वगैरे व्यवसायांत धंद्यांतील प्रतिष्ठा व तिचे संकेत मानावे लागतात. गैरशिस्त वर्तन झालें तर धंद्यांतून हकालपट्टी होते, सनदा रद्द होतात. कांहीं तरी नैतिक बंधन व्यवसायांत असतें, कांहीं तरी समाजविषयक सेवाभाव त्यांत असतो, निव्वळ प्राप्तीसाठीं तो करावयाचा नाहीं, हा विचार त्यांत असतो, म्हणून व्यवसायांतील दर्जा तो करणारास राखावा लागतो. उद्योगधंद्यांत दर्जा, प्रतिष्ठा वरील अर्थानें नसते. कांहींही केलें तरी उद्योगधंद्यांतून हाकालपट्टी होत नाहीं. नादारीनें पुष्कळ वेळां नुकसानी निकालांत लावून मनुष्य उद्योगधंद्याचे सृष्टींत पुनर्जन्म घेतो, मागील अनुभव कायम ठेवून!! गुन्हे केले तरी हाकालपट्टी होत नाहीं, दंड देऊन अगर शिक्षा भोगून पुनः काम सुरू होतेंच. उद्योगधंद्यांत कोण श्रम करतो याकडे समाज पाहात नाहीं. श्रमाचे उत्पादनाशीं त्याचा संबंध येतो. माल चांगला असला म्हणजे झालें, मालकाची चौकशी तो करीत नाहीं, कोण उत्पादक आहे हा प्रश्नच तेथें येत नाहीं. व्यवसायांत कोण काम करणार याला महत्त्व असतें. खटला कोण चालविणार, तो वेळेवर हजर असतो कीं नाहीं, औषध कोण देणार, त्याचें लक्ष काम करण्यांत असतें कीं नाहीं हें साहजिकपणें गिऱ्हाईक पाहातें. यामुळें व्यवसायांत श्रमणारांना समाज अधिक महत्त्व देतो, त्यांच्या श्रमाचें मूल्य अधिक मानतो. समाजाच्या हिताचे दृष्टिनें त्यांचे श्रमाला बाजारभावाची किंमत लावणें चूक आहे व समाज आपल्या आचरणानें हें जाणतोही.

उद्योगधंद्यातील प्राप्तीकडे समाज कसा पाहातो याचें आणखी स्पष्ट उदाहरण विद्यमान युद्धपरिस्थितींत दिसून येत आहे. युद्धपरिस्थितीचा फायदा घेऊन जे उद्योगधंदेवाले व व्यापारी फायदा घेत आहेत, जनतेचें संकट म्हणजे ज्यांना आपल्या भाग्योदयाची संधि वाटते, त्यांना आज समाज कसें संबोधतो हें पाहाण्यासारखे आहे. 'नफेबाजी,' 'नफेखोर' हे 'दरवडेखोरां'बद्दल सभ्य प्रतिशब्द आहेत. 'समाजशोषक' वगैरे शद्बांनीं समाज उद्योगधंद्यांतील वर्तनाचें वर्णन करीत आहे. बाजारभावावर किंमत ठेवल्यास सर्व काळा बाजार होतो हा अनुभव आला आहे. चोर-

बाजारांत वस्तु स्वस्त मिळते, काळ्या बाजारांत महाग मिळते, दोन्ही नैतिकदृष्ट्या सारखेच प्रतिष्ठित आहेत!! बाजारभावावरून सामाजिक महत्त्व व मूल्य ठरतें असें जर म्हटलें तर आज अनर्थ होईल. भावनियंत्रण, अनुक्रमयोजना ( priority Schemes ) याची मागणी समाज करीत आहे व ती राज्याला सर्वत्र मान्य करावी लागत आहे, याचा अर्थ स्पष्ट आहे. जें समाजाला मूल्यवान् व महत्त्वाचें वाटतें त्यांची योग्य किंमत राज्यसत्तेनें ठरवून समाजाला तें उपलब्ध करून दिलें पाहिजे. बाजार-भावावर ही व्यवस्था सोपविणें म्हणजे कसायाला 'कपिला' विकणें आहे. तिचें मूल्य-मापन सेवेनें तो करीत नाहीं, सुरीनें करतो. जे या युद्धांत स्वातंत्र्यरक्षणार्थ लढत आहेत, त्यांची जी कदर समाज करीत आहे, त्यावरूनही समाज सेवेला महत्त्व देतो व प्राप्तिवार योग्यता ठरवीत नाहीं हें उघड होतें. ज्या श्रमानें, ज्या सेवेनें देशकार्य होतें, समाजहित होतें, तिचे महत्त्व विशेष मानलें जातें. युद्धमानकालीं राष्ट्रासाठीं जनतेला प्राणार्पण करण्यासाठी आवाहन केलें जातें तें प्राप्तीची आशा दाखवून नव्हे, राष्ट्रांसाठीं प्राण देणें यांतील कर्तव्यनिष्ठा व प्रतिष्ठा दाखवूनच केलें जातें. हातांवर शीर घेऊन लढणारांची योग्यता, त्यांच्या हातांवर काय पडतें यावरून ठरविरा समाज कृतघ्न व करंटा समजला पाहिजे. समाजहितार्थ युद्धकाळी नागरिकांचे जीवितावर हक्क सांगणारी राज्यसत्ता, त्याच ध्येयासाठीं शांततेच्या काळीं त्यांचे वित्तावर जर हक्क सांगणार नाहीं व तेवढ्याच निश्चयानें ते घेणार नाहीं तर तीही कृतघ्न व करंटी समजली पाहिजे. समाजहितासाठीं म्हणून समाजांतील संपत्तीवर राज्याचा अधिकार असला पाहिजे व तिची निर्मिती व नियमन, सामाजिक मूल्य व महत्त्व लक्षांत घेऊन झालें पाहिजे. समाजव्यवस्थेंत माणसें खुपीनें नांदलीं पाहिजेत. त्यांची निष्ठा समा-जांत न्याय मिळत आहे या विश्वासावर आधारलेली असेल तर ती खरी. परिग्रही समाजांत हा विश्वास लोकांत असत नाहीं; हा विश्वास येण्यासाठीं श्रमाचा मोबदला योग्य व न्याय्य मिळाला पाहिजे. बाजारभावावर हें काम सोपवून समाजांत हा विश्वास कधींही येणार नाहीं.

बाजारभावानें श्रमाची किंमत ठरविणारी विचारसरणी त्याज्य ठरविल्यानंतर आणखी एक विचारसरणी जी नेहमीं मांडली जाते तिचा विचार करणें जरूर आहे. या विचारसरणींत प्रत्येकाकडून शक्त्युनुसार घ्यावें व गरजेनुसार द्यावें हें मुख्य सूत्र आहे. हें व्यवहारांत आणतांना काय अडचणी उत्पन्न होतील हें पाहिलें पाहिजे. प्रत्येकानें आपली गरज ठरवावी का समाजानें त्याबाबतींत निर्बंध घालावेत? मामलेदार कचेरींत एखादा रसिक कारकून आहे, त्याला अनेक कवींचे काव्यग्रंथ

हवे आहेत, त्यांची त्याला गरज आहे, ती वेतनाचे विचारांत धरावी का ? गिरणींत काम करणारा एखादा मजूर तालमीचा शोकी आहे व त्याकरतां त्याला तालमीच्या सामानाची गरज आहे, ती योग्य धरून त्यावरून वेतन ठरवावें का ? एखादा नाटककार असा आहे कीं, मद्यपान केल्याशिवाय त्याची प्रतिभा काम करत नाहीं, ही त्याची गरज लक्षांत घेऊन समाजानें त्याचे श्रमाचा मोबदला त्याला द्यावा का ? प्रत्येकानें आपल्या गरजा ठरविल्या व त्याप्रमाणे वेतन मागितलें तर अशक्य परिस्थिति होईल. ज्या गरजा सर्वांना समान आहेत त्यांचीच दखल घेणें न्याय्य आहे व योग्य आहे. या समान गरजांतसुद्धां एक कमाल प्रमाण ठरविलें पाहिजे, त्यापलीकडे गरज मानली जाऊं नये. कायद्यानें परवानगी आहे म्हणून, मनुष्यानें अनेक विवाह करावे, घराला प्रजापरिषदेचें स्वरूप द्यावें व समाजाकडे समान गरजेचे तत्त्वावर मोबदल्याची मागणी करावी हें न्याय्य ठरणार नाहीं. समान गरजांचा विचार करतांना सर्वसाधारणपणें काय असावें याचा विचार करून एक सरासरी प्रमाण ठरविलें पाहिजे व या सरासरी प्रमाणाला अनुसरून मोबदल्याचा विचार केला पाहिजे. अधाशी व अल्पभुकी यांच्यांतील मध्य काढून इष्ट असे साधारण व सरासरी प्रमाण अन्नाबाबत ठरवितां येईल.

भुत्याप्रमाणे कपडे घालणारा, व भुताप्रमाणें नागवा राहाणारा यांच्यातील मध्य काढून वस्त्राचें तसेंच सरासरी प्रमाण हवामान विचारांत घेऊन ठरवितां येईल. वीस दालनी बंगल्यांत राहाणारा व एका खोलींत १०।२० राहणारे हे दोन्ही बाजूला सारून मनुष्याला त्याचा एकांतप्रिय स्वभाव लक्षांत घेऊन किती असावें याचें साधारण प्रमाण तयार करतां येईल. समान गरजांबाबत साधारण व सरासरी प्रमाण ठरविल्यानंतर, त्या प्रमाणांत प्रत्येकाला मिळेल अशी वेतनव्यवस्था करतां येईल. हें प्रमाण–वेतन ठरवितांना विशिष्ट व्यक्तींची गरज लक्षांत घेतली जाणार नाहीं अगर व्यक्तींची विशिष्ट गरजही लक्षांत घेतली जाणार नाहीं. सर्वसाधारणपणें ज्या समान गरजा आहेत त्याचा सर्वसाधारण विचार होऊन हें प्रमाणवेतन ठरलें जाईल. यापेक्षां कोणाला अधिक पाहिजे असेल, तर त्याचा विचार सामुदायिक दृष्टीनें होणार नाहीं व करणेंही शक्य नाहीं. त्या विशिष्ट गरजांचा विचार करणें हें समाजाचे कर्तव्यक्षेत्रांत येत नाहीं. व्यक्तींनीं या गरजा समाजाच्या मर्यादा सांभाळून, भागवून घेण्यासाटीं शक्य असल्यास श्रम करावे. या गरजा भागविण्याची जबाबदारी समाजावर नाहीं.

गरजेनुसार मिळावें यांतील मर्यादा व अडचणीप्रमाणेंच शक्त्युनुसार घ्यावें

यांतही मर्यादा व अडचणी उपस्थित होतात. शक्तीप्रमाणें काम करावें, शक्तिप्रमाणें श्रम करावें म्हणजे नक्की काय? जितकें चांगलें करतां येईल तितकें आपलें काम चांगलें करावें येवढें म्हणण्यानें प्रश्न सुलभ होत नाहीं. कामाला अथवा श्रमाला कांहीं कमाल मर्यादा आहे, का प्रत्येकानें आपली कमाल मर्यादा गांठली म्हणजे तें काम त्याच्या शक्तीप्रमाणें झालें असें म्हणावयाचें? एखादा कामगार १२ तास काम करील, दुसरा एखादा १४ तास करील, तिसरा आणखीही जास्त करील म्हणून प्रत्येकाची शक्ति त्याला कमाल मर्यादेपर्यंत वापरण्यास सांगणें व नंतरच त्याचें काम शक्ती-प्रमाणेंच झालें असें मानणें उघड अन्यायाचें आहे. कमाल मर्यादेप्रमाणे कांहीं किमान मर्यादा आहे, कीं जी किमान मर्यादा अगर प्रमाण गांठल्याशिवाय कोणीही शक्तीप्रमाणें काम केलें असें मानलें जाणार नाहीं? जर एखादा तितकें करूं शकत नसेल तर त्याचें नशिबीं काय? तसेंच बौद्धिक शक्तींचे बाबतीत शक्तीप्रमाणें काम केलें हें कसें ठरवावयाचें? ती मोजावयाची तरी कशी? एखादा वकील २ मिनिटांत जें पटवून देतो तें दुसऱ्याला २ तासांत करतां येत नाहीं; म्हणून या दोघांत कोण शक्तीप्रमाणें काम करता झाला हें सांगणें कठीण आहे. पहिल्यानें थोडक्यांत आटो-पून आपली शक्ति शिल्लक ठेवली असें कां म्हणूं नये? तात्पर्य, मानसिक शक्ति मोजणें कठीण आहे, व्यक्तीवर सोपवावें तरी अडचण; सर्वसाधारण प्रमाण काढावें तर तेंही शक्य नाहीं. शारीरिक श्रम मोजणें जेथें कठीण आहे तेथें मानसिक श्रम मोज-ण्याची गोष्टच सोडून द्यावी लागते. दोन गिरण्यांत तेंच काम तितकाच वेळ कर-णारे कामगार, सारखें उत्पादन करूं शकत नाहींत असेंही आढळून येतें. निष्ठुर देख-रेख, आरोग्यविघातक परिस्थिति यामुळें हा फरक होऊं शकतो. या स्थितींत एकानें शक्तीप्रमाणें काम केलें नाहीं असें म्हणणें गैर होईल. कामावरून अगर श्रमाचे उत्पादनावरून शक्ति मोजणें बिनचूक ठरणार नाहीं. कामगारानें प्रामाणिकपणें मीं शक्य तेवढें केलें असें म्हटल्यानें त्याच्या पुरतें तें खरें ठरेल पण या धोरणानें समाज-व्यवस्था चालणार नाहीं. कांहीं तरी दृश्य कसोटी असणें जरूर आहे. मनाच्या प्रामाणिकपणापेक्षां कामाचें प्रत्यक्ष प्रमाण ही अधिक चांगली कसोटी ठरते व तींत व्यवहार्यताही आहे. उद्योगधंद्यांत अधिकाधिक यंत्रें उपयोगांत येत आहेत व उत्पादनप्रमाणही वाढत आहे या परिस्थितींत कामगारांच्या दृष्टीनें अधिक दक्षता घेणें इष्ट आहे. कामांत गोडी उत्पन्न झाल्याशिवाय कोणीहि जास्तींत जास्त चांगलें काम करणार नाहीं. गोडी उत्पन्न करण्याकरितां, मन घालून काम करण्याकरितां, गोडी उत्पन्न करणारें वेतन अगर मोबदला श्रमाला मिळाला पाहिजे.

वरील तीन्ही विचारसरणींतील अडचणी पाहिल्यानंतर हा मोबदल्याचा प्रश्न किती बिकट आहे याची कल्पना येईल. मोबदल्याचा विचार करतांना दोन गोष्टींचा विचार केला पाहिजे. एक व्यक्तीचे दृष्टीनें व एक समाजाचे दृष्टीनें. व्यक्तीचे दृष्टीनें त्याचे श्रमाचा मोबदला इतका असला पाहिजे कीं, त्याला त्याचें जीवन पूर्ण वाटलें पाहिजे. आपलें आयुष्य सफल करण्याला पुरेशी संधि त्यायोगें मिळाली पाहिजे. समाजाचे दृष्टीनें ही व्यवस्था अशी असली पाहिजे कीं, समाजांतील अवश्य कार्यें चांगल्या रीतीनें त्यायोगें चालतील, वाढीला लागतील. समाज व व्यक्ति यांच्या हिताचा समन्वय ह्या योजनेने साधला पाहिजे. व्यक्तींच्या गरजा त्यांचें त्यांचें महत्त्व जाणून भागविल्या पाहिजेत. त्याचप्रमाणें समाजांतील उत्पादनव्यवस्था हें करीत असतांना जुळवून घेऊन कार्यक्षम राखिली पाहिजे, तिच्यांतील तोल संभाळला पाहिजे. समाजांत जे श्रम करूं शकत नाहींत असें अज्ञान, अपंग, वृद्ध इत्यादिकांची व्यवस्था केली पाहिजे. ज्यांचें श्रमाचें वय आहे व ज्यांच्यांत शक्ति आहे त्यांनीं श्रम केलेच पाहिजेत. जे पतित असतील त्यांना योग्य मार्गावर आणून श्रमाची दीक्षा दिली पाहिजे. गुन्हेगार असतील त्यांचेकडे सूडबुद्धीनें न पाहातां समाजानें त्यांचा उद्धार करण्याचे दृष्टीनें त्यांच्याशीं वर्तन ठेवून त्यांना श्रम केल्यानें समाजांत पुन्हां स्थान मिळेल, जीवनांत नवीन आशा उत्पन्न होईल असा विश्वास त्यांच्यांत निर्माण केला पाहिजे. प्रत्येक नागरिकाला त्याच्या सर्वसाधारण व सरासरी गरजा भागतील इतकें मिळेल अशी व्यवस्था झाली पाहिजे. हें किमान प्रमाण ठरवितांना प्राथमिक व अवश्य गरजांचा विचार करून मग तें ठरविलें पाहिजे. ज्या गरजा भागल्या नाहींत तर मनुष्याला सर्वत्र उणेपणा भासेल, जें त्याच्यांत उत्कृष्ट व उत्कट आहे त्याला वाव मिळणार नाहीं, तो प्रभावी नागरिक होऊं शकणार नाहीं, त्या सर्वांची प्रथम व्यवस्था झाली पाहिजे. एवंगुणविशिष्ट व्यवस्था म्हणजे किमान वेतनप्रमाण अगर किमान मोबदलाव्यवस्था. या किमान वेतनप्रमाणापेक्षां कोणाही नागरिकाला कमी मिळतां कामा नये. त्याचबरोबर ज्या श्रमांना या प्रमाणांत अगर जास्त वेतन मिळणार असेल ते श्रम समाजाचे दृष्टीनें उपयुक्त असें कार्य करणारे असले पाहिजेत. श्रमाबद्दलचा मेहनताना म्हणजे व्यक्तीचे श्रमाबद्दलचा मोबदला झाला; पण त्याच्या श्रमानें जें निर्माण होईल, जें कार्य होईल, त्या योगानें समाजाचे संपत्तींत भर पडली पाहिजे, समाजाचे संपन्नतेंत कांहीं अधिक पडलें पाहिजे. केवळ श्रम करतो म्हणून मनुष्याला मोबदला मिळावा ही घातुक विचारसरणी आहे. त्याचे श्रमाचें उत्पादन हें समाजोपयोगी असेल तरच त्याच्या श्रमाचा मोबदला मिळेल. उपयुक्त असें कार्य

त्याचे श्रमानें होणार असेल तरच त्याला श्रम करण्याची संधि मिळाली पाहिजे, तरच त्याच्या जीवनाची व्यवस्था समाजानें आपले शिरावर घेतली पाहिजे. गुन्हेगार कांहीं शारीरिक अगर बौद्धिक श्रम कमी करीत नाहींत; पण केवळ श्रमाने त्यांना सामाजिक व्यवस्थेंत स्थान दिल्यास अनर्थ कोसळेल. उत्पादनाचे सामाजिक उपयुक्ततेवर श्रमाच्या मोबदल्याचा अधिकार अवलंबून आहे. जें समाजानें उपयुक्त म्हणून मान्य केलें असेल ते कार्य करणाऱ्या प्रत्येकाला योग्य मोबदला मिळून जीवनाला सफलता व पूर्णता आणण्याची संधि मिळाली पाहिजे. मनुष्याच्या सर्वसामान्य आकांक्षा तृप्त करतां येतील इतका मोबदला मिळण्याची आशा असली पाहिजे. सुदृढ शरीर, सुसंस्कृत मन, कांहीं कर्तृत्व करण्याची संधि हें तर योग्य मोबदल्यानें साधलेंच पाहिजे. पण याहीपेक्षां कांहीं जास्त करतां येईल इतकी माया त्यांत असली पाहिजे. आकांक्षापरिपूर्ती ही श्रमसाध्य आहे व यथायोग्य मोबदला हा श्रमाचा अधिकार आहे.

काय कार्य केलें असता किती मिळालें पाहिजे हें वर सांगितलें. हें मोबदला-प्रमाण मानलें तर समाजांत कठीण प्रसंग येईल, अनेक अडचणी उत्पन्न होतील. हें करणें अव्यवहार्य आहे असा आक्षेप येणें साहाजिक आहे. इतकी मजुरी मिळविणें कठीण व देणें कठीण. परिणामीं बेकारी वाढेल अशीही भीति व्यक्त करणें अशक्य नाहीं. पगारवाढ अगर वेतनवाढ झाल्याबरोबर बेकारींत वाढ होते हें खरें नाहीं. भांडवलशाही व्यवस्थेंतसुद्धां असा अनुभव नाहीं. पगारवाढ अगर वेतनवाढ होऊन अनेक देशांत बेकारींत भर पडलेली नाहीं. वास्तविक वेतनाचा व बेकारीचा असा कार्यकारण संबंध नाहीं. झालेलें उत्पादन घेण्यास गिऱ्हाईक नसते म्हणून योजकवर्ग उत्पादन आंखडत घेतो व त्याचा परिणाम बेकारींत होतो. गिऱ्हाईक घेत नाहीं याचा अर्थ गिऱ्हाईकाजवळ क्रयशक्ति नाहीं हा आहे. समाजांत क्रयशक्ति असते पण तिची वांटणी अशी विषम झालेली असते कीं ज्यांना जरूर आहे त्यांचेजवळ ती नसते, ज्यांच्याजवळ आहे त्यांना झालेलें उत्पादन नको असते. समाजांतील ही विषम वांटणी हें बेकारीचे एक प्रमुख कारण आहे. मजुरींत वाढ केल्यानें कामगार अधिक कार्यक्षम होतो व त्याचा परिणाम उत्पादनावर चांगला असाच होतो. तसेंच कामगारांना अधिक मिळूं लागलें म्हणजे त्यांच्या गरजा वाढतात; जुन्यांत प्रमाण वाढतें तर कांहीं नवीन प्रकारच्या गरजा उत्पन्न होतात, त्या भागविण्यासाठीं समाजांत साहाजिक अधिक उत्पादन होतें. समाजांत घेणारें गिऱ्हाईक भेटलें कीं मालाचा पुरवठा होत जातो. पगारवाढ म्हणजे अधिक क्रयशक्ति मजुरांचे हातीं येणें व त्याचा

परिणाम व्यक्तिशः व उत्पादनाचे दृष्टीनेंही चांगलाच होतो. भागीदारांना अधिक नफा वांटण्यापेक्षां मजुरांना अधिक वेतन देण्यानें भांडवलवाल्यांचेंसुद्धां अधिक कल्याण होतें. मजुरांची राहाणी पगारवाढीनें सुधारते; त्याचबरोबर धंद्यांत उत्पादनखर्च वाढल्यामुळें अव्यवस्थितपणें होणारा खर्च कमी करण्याकडे प्रवृत्ति उत्पन्न होते व धंद्यांतील कार्यक्षमता व व्यवस्थेतील टापटीप अधिक वाढते. उत्पादनखर्चांत मजुरी हा एक मोठा भाग आहे. पण मजूर हा उत्पादनांतील प्रमुख घटक आहे. त्याची कार्यक्षमता राखणें, तो संतुष्ट ठेवणें, हे सर्वांत जास्त महत्त्वाचें आहे. उत्पादनपद्धतींत मजुरांना संतुष्ट ठेवून अन्यत्र काटकसरीला पुष्कळ जागा असते तेथें ती करण्यास हरकत नसावी. नफा नियंत्रित करून, विक्रीची व्यवस्था संघटित करून, मजुरांचे श्रम वायां जाणार नाहींत अशी कामाची व्यवस्था करून मजुरांची मजुरी वाढविणें व ती वाढ कायम करणें अशक्य कोटींतील नाहीं. मजुरीत अगर वेतनांत वाढ केल्यानें उद्योगधंदे खालीं येतील, बेकारी वाढेल, सर्वत्र अव्यवस्था पसरेल ही भीति अस्थानीं आहे. निदान अन्यत्र काटकसर करणे हें अशक्य आहे असें ठरेपर्यंत तरी ही भीति समर्थनीय नाहीं. भांडवलशाही उत्पादनव्यवस्थेंत मजुराचें महत्त्व ओळखिलें जात नाहीं. त्याचे श्रम म्हणजे बाजारांत बाजारभावानें घेण्याची एक वस्तु आहे असें मानलें जातें. वास्तविक समाजधारणेसाठीं, समाजाचे सुस्थितीसाठीं देशांतील उद्योगधंद्यांची परिस्थिति पाहून, उत्पादनाची साधनसामुग्री, संच व सरंजाम लक्षांत घेऊन जास्तींत जास्त दरानें श्रमाला मावेजा मिळेल अशी व्यवस्था करणें इष्ट आहे व अशी व्यवस्था कायम ठेवणें हें प्रत्येक समाजाचें आद्यकर्तव्य आहे. भांडवलशाही समाज हें मान्य करीत नाहीं समाजसत्तावादी समाज तें मौलिक कर्तव्य मानतो.

समाजांतील साधनसामुग्री लक्षांत घेऊन जितकें मोबदल्याचें किमान प्रमाण वाढवितां येईल तितकें वाढविलें पाहिजे. पण हें किमान प्रमाण सर्व धंद्यांत, तसेंच समाजांतील सर्व लोकांना सारखें ठेवलें पाहिजे असें नाहीं. शारीरिक श्रमाचे धंद्यांत काम करणारांना अधिक अन्न लागेल हें लक्षांत घेऊन त्यांतील किमान प्रमाण ठरविलें पाहिजे. लोहारकाम करणारास व लेखणीनें काम करणारास प्रकारानें व प्रमाणानें सारखें अन्न देऊन भागणार नाहीं. लोहाराचें अन्न अधिक असलें पाहिजे, अधिक सकस अन्न असलें पाहिजे हें उघड आहे. धंद्यांतील श्रमाचें स्वरूप लक्षांत घेऊन हें किमान प्रमाण ठरविलें पाहिजे. तसेंच धंद्यांत श्रम करण्याची पात्रता येण्यासाठीं करावा लागलेला खर्चही धंद्यांतील किमान प्रमाण ठरवितांना लक्षांत घेतला पाहिजे.

धंदे–शिक्षण घेऊन तयार झालेला कारागीर व निव्वळ घण मारणारा मजूर यांना सारखें किमान प्रमाण ठेवणें योग्य होणार नाहीं. प्रत्यक्ष श्रम किती खर्च करावे लागतात हें तर प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे. कोणत्या कामांत शारीरिक परिश्रम किती होतात हें पाहून त्याला अनुरूप असें किमान प्रमाण ठरविलें पाहिजे. लेखणीनें एक ओळ लिहिण्यापेक्षां अधिक शारीरिक शक्ति एक घण मारण्यास खर्ची घालावी लागते ही गोष्ट दृष्टिआड करून भागणार नाहीं. श्रमांतील प्रत्यक्ष शारीरिक श्रमाची दखल प्रथम घेतली पाहिजे. त्यानंतर जे धंदे व रोजगार समाजाला अवश्य आहेत अशांत ते चांगले चालावे या दृष्टीनें उत्कृष्ट कारागीर येतील, बुद्धिमान् माणसें येतील अशी व्यवस्था असली पाहिजे. गिरणींत साध्या मजुरापासून उत्कृष्ट कारागीर, कार्यक्षम व्यवस्थापक यांपर्यंत सर्वांची जरुरी असते. बांधकामाचे धंद्यांत मजुराप्रमाणें सुतार, पाथरवट, इंजिनीयर या सर्वांची जरुरी असते. तसेंच समाजाला गवंड्यांबरोबर, ग्रंथकारही हवेत. शेतकऱ्यांप्रमाणें न्यायाधिशांची पण जरुरी आहे. वैद्याशिवाय तर त्याला अडचण वाटेल. निव्वळ शारीरिक श्रमाचे दृष्टीनें पाहिलें तर यांतील अनेकांचे श्रम सारखे असतील. न्यायाधीश ८ तास खपतो. रेल्वेमजूरही ८ तास खपतो म्हणून त्या दोघांना सारखें वेतन मिळणें अयोग्य ठरेल. निव्वळ शारीरिक परिश्रमानें श्रम मोजले जाऊं नयेत. तसें झालें तर सर्वांना सारखें मिळेल व जर सर्वांना सारखें मिळणार तर जास्त चांगलें करण्याकडे प्रवृत्ति राहाणार नाही. हुषार कारागीर व साधा मजूर यांना सारखें मिळणार असेल तर कारागीर काम यथातथाच करील. म्हणून श्रमाचें मूल्य त्याच्या कार्याचें सामाजिक स्वरूप लक्षांत घेऊन ठरविलें पाहिजे. मोबदल्यांत तफावत करणें सर्व दृष्ट्या समर्थनीय ठरलें पाहिजे व समर्थनीय ठरेल इतकेंच त्या तफावतीचें, विषमतेचें स्वरूप असलें पाहिजे. परिश्रम व प्रयत्न सारखे असून त्यांचे परिणाम म्हणजे कार्य समाजाचे दृष्टीनें कमीजास्त महत्त्वाचें असूं शकेल. वैद्य, न्यायाधीश यांचें सामाजिक महत्त्व, रेल्वे–कामगार खाणी–कामगार यांच्यापेक्षां समाजकार्याचे दृष्टीनें अधिक आहे. हें जर मान्य तर समर्थनीय विषमता मोबदल्यांत असण्यास हरकत नसावी व असा मोबदला न दिला तर जें कार्य होईल, त्यापेक्षां दिल्यानें जास्त होईल असा विश्वास असेल, अशी शक्यता असेल तर ही विषमता समर्थनीय ठरेल.

मनुष्यस्वभाव ही एक घडत घडत आलेली घटना आहे, एक बनाव आहे व तो बदलूं शकेल. परिस्थितीप्रमाणें तो बदलूं शकतो असा अनुभवही आहे. तथापि, आजच्या समाजांत सर्वस्वीं समाजसेवेचे हेतूनें मोबदल्याकडे न पाहातां सर्वजण आप-

आपलें काम करतील अशी आशा करणें व्यर्थ आहे. प्राप्तीचा हेतु हा प्रभावी आहे, तथापि, प्राप्तीवर भर देऊन, या सकाम हेतूस प्रधान मानून विचार करणें योग्य नाहीं. आजही समाजांत अनेक व्यक्ति स्वकर्म करतांना प्राप्तीचा विचार करीत नाहींत. अनेक प्रसंगीं माणसें केवळ सेवाबुद्धीनें श्रमत असतात व हे क्षण आयुष्यांतील अमोलिक ठेवा समजतात. स्वातंत्र्यासाठीं अहोरात्र श्रमणारा देशभक्त, स्वातंत्र्य रक्षणार्थ मरणाचें मोल देणारे लक्षावधि सैनिक यांच्यापुढें प्राप्तीचा हेतु क्वचितच असतो. कलावन्त व प्रतिभासंपन्न साहित्यिक हे आपलें कार्य पैशानें मोजीत नाहींत व त्या हेतूनें प्रेरित होऊन करीत नाहींत. अहोरात्र रसायनशाळेंत प्रयोग करून शोध लावणारा संशोधक, लक्ष्मीचें संशोधन करीत नाहीं; त्याच्या मनाला तिचा स्पर्शही नसतो. समाजांत अनेक कार्ये प्राप्तीचे हेतु धरून न होतां कार्यामुळें मिळणारा जीवनसाफल्याचा आनंद हाच तेथें प्रयत्नांचा प्रेरक असतो. अनेक कार्यांत समाजांत मिळणारा सन्मान प्रयत्नांना चालना देत असतो. अधिकाराची अभिलाषा, सत्तेचा मोह कित्येक महत्त्वाकांक्षी धडपडींचें चैतन्य असतें, जे केवळ धनच पाहिजे, पैसाच पाहिजे म्हणून त्यासाठीं मरत असतात, त्यांच्या मनांत संपत्ति मिळाल्याने प्रतिष्ठा व सत्ता मिळते हा भाव जागृत असतो. हें सर्व खरें असलें तरी कांहीं प्राप्ति असेल तर अधिक श्रम, अधिक प्रयत्न, अधिक कौशल्य माणसाकडून अपेक्षिणें आजच्या स्थितींत योग्य होईल. अधिक शिकून, अधिक कौशल्य संपादन करून पुढें अधिक प्राप्ति होईल म्हणून अनेकजण कष्टमय उमेदवारी करीत असतात, दीर्घकाल शिक्षणक्रम घेत असतात. आयुष्यांत ठराविक व बहुजन चोखाळीत असलेला सोपा व सुरक्षित मार्ग सोडून पुढें सुखाचा मुक्काम भेटेल या आशेवर अनेकजण धाडस करून नवीन व अज्ञात मार्गाचा अवलंब करीत असतात. किनाऱ्याला बेताबेतानें काम करून मिळविण्यापेक्षां भर दर्यांत जाऊन कोणी आपल्या नशिबाचा ठाव घेतात, कोणी या प्रयत्नांत मरतात तर कोणाला यशो-मौक्तिक मिळतें. सर्वच धाडशी खलाशांना कोलंबसाचें भाग्य लाभत नाहीं. मृत्युखंड अनेकांचे वांट्यास येतो. तथापि, जे यशस्वी होतात, कृतकृत्य होतात, त्यांची प्राप्ति केवळ त्यांच्या परिश्रमाचे फळ मानणें चूक होईल. ते त्यांच्या पराक्रमाचें फळ आहे. त्यांचें कर्तृत्व त्यांनीं किती तास काम केलें यानें मोजणें व्यर्थ आहे. किती श्रम केले यापेक्षां काय कार्य केलें ही दृष्टि ठेवून येथें विचार करावा लागतो. कार्याचे स्वरूपावरून त्याचें पारितोषिक ठरलें जाते. या दृष्टीनें विचार केला म्हणजे मनुष्यांना ते जें कार्य करतात, जें उत्पादन करतात त्याला अनुरूप असें वेतन देणें इष्ट ठरतें. कितीही कमी कारागिरी अंगीं असो प्रत्येकाला जें किमान प्रमाण

ठरविलें जाईल त्याप्रमाणें मिळेलच; त्यापेक्षां अधिक मिळवावयाचें तें जें कार्य अगर जें उत्पादन केलेल्या श्रमानें होत असेल तें लक्षांत घेऊन मिळेल, तेथें सिद्धि ही कसोटी राहील, साधना नव्हे. पराक्रमानें मिळेल केवळ परिश्रमानें नाहीं. जेथें कार्य अगर उत्पादन मोजतां येण्यासारखें आहे, तेथें त्याप्रमाणें मोबदलाव्यवस्था करणें अवघड नाहीं. पण जेथें मनुष्यानें केलेलें कार्य बौद्धिक श्रमाचें आहे तेथें किमान प्रमाणापेक्षां जास्ती देतांना अनेक अडचणी उत्पन्न होतील. महत्त्वाचे दृष्टीनें अनुक्रम लावणें अत्यंत कठीण आहे. न्यायाधिशाचे कार्यापेक्षां फडणिसाचें कार्य कमी कीं अधिक? फौजदारापेक्षां महालकऱ्याचें काम जास्त महत्त्वाचें कीं कमी? तलाठ्याचें महत्त्व कार्याचे दृष्टीनें कसें ठरवावयाचें? हें सर्व यथायोग्य रीतीनें ठरविणें निःसंशय अवघड आहे. यांतून मार्ग म्हणजे अगदीं शेवटच्या दर्जाचें काम करणारा व उच्च दर्जाचें काम करणारा यांत फारसा फरक न ठेवतां काम करणारे अवश्य त्या प्रमाणांत मिळतील इतकें वेतन-प्रमाण ठेवणें हा होय. आज कारकुनाचा पगार व खात्याचे मुख्याचा पगार यांत भयंकर अंतर आहे. हें तर कमी केलेंच पाहिजे. त्याजबरोबर प्रत्येक काम करण्यास पुरेशीं माणसें येतील इतकें वेतन असलें पाहिजे. कामाचा प्रकार व त्याचें वेतन यांत कांहीं तरी मेळ असला पाहिजे. सर्व कामें सारखीं नाहींत म्हणून वेतनही सारखें ठेवणें इष्ट नाहीं. त्याजबरोबर कामाकामांत फरक आहे, येवढ्याच मुद्द्यावर वेतनांत वाटेल तो फरक होतां कामा नये. किती वेतन ठेवलें म्हणजे पुरेशीं माणसें मिळतील हें पाहूनच तें प्रमाण कायम ठेवलें पाहिजे. व्यवसायांतूनही याच दृष्टीनें विचार करून प्राप्तीचें प्रमाण ठरविलें पाहिजे. आजच्या समाजांत शिक्षक, वकील, वैद्य यांच्या प्राप्तींत कांहीं मेळ नाहीं. काय घ्यावें, काय मिळावें याला कांहीं प्रमाण नाहीं. शिक्षक अगर आचार्य याला कांहीं कमी परिश्रम करावे लागत नाहींत, अगर त्याचें कार्यही कमी महत्त्वाचें नाहीं. पण आजच्या परिग्रही समाजांत वकिलाला त्याच्यापेक्षां अधिक प्राप्ती होते. यशस्वी वकील काय मिळवील याला मर्यादा नाहीं व ते कसें मिळवील याला तर नाहींच नाहीं. तीच गोष्ट वैद्य व डॉक्टर यांची. ही अन्याय्य व्यवस्था दूर करणें जरूर आहे. समाजव्यवस्था अशी असली पाहिजे कीं, संधीचे अभावीं कोणाचेही प्रयत्न जागच्याजागीं थंड होऊं नयेत. कोणाही लायक माणसाच्या आशा जागचेजागीं विरघळून जाऊं नयेत. समाजव्यवस्थेंत पराक्रमाचें मैदान सर्वांना मोकळें असलें पाहिजे. जीवनाचें शर्यतींत सर्वांना सुरवातीस सारखी परिस्थिति असली पाहिजे. कुणाचे डोक्यावर दारिद्र्याचा बोजा, कुणाच्या पायांत अज्ञानाची शृंखला, कुणाला वडिलोपार्जित श्रीमंतीनें लाभलेलें गतिचापल्य

अशी विषमता असतां कामा नये. सुरवातीस एका रेषेंत सारख्या परिस्थितींत सर्वांनीं असलें पाहिजे. शेवटीं जो आपल्या पराक्रमावर पुढें जाईल तो जाईल. समाजांत संपत्तीचें संपादन समाजोपयोगी कार्य केल्यानेंच शक्य असलें पाहिजे. प्रत्येकाला श्रमाचा योग्य मोबदला मिळून त्यायोगें त्यांच्यांतील उत्कृष्ट प्रयत्नांना प्रोत्साहन मिळालें पाहिजे व त्याला आपल्या आकांक्षांची परिपूर्ति करण्यासाठीं योग्य संधि मिळाली पाहिजे. कमी जास्त वेतन देणें जरूर झालें तर ती विषमता केवळ प्रयत्न व लायकी यांवरच आधारलेली असावी. तथापि, कोणालाही इतकें जास्त मिळूं नये कीं, त्यायोगें इतरांवर त्याला सत्ता गाजवितां येईल. कोणाजवळही इतकें साठतां कामा नये, कीं त्यानें त्याचे सहाय्याने लोकांवर वजन मारावें अगर लोकांना बिनश्रमानें त्याचा फायदा द्यावा. कांहीं तरी केल्याशिवाय कोणालाही मिळतां कामा नये. श्वासो-श्वासाइतकेंच व्यक्तीला जगण्यास श्रम अवश्य झाले पाहिजेत. अशी समाजव्यवस्था असली म्हणजे समाजाला कांहीं दिल्याशिवाय कोणाला कांहीं मिळणार नाहीं. सर्वांना सारखी संधि सर्व क्षेत्रांत असल्यामुळें ज्याला जे प्रयत्न करावेसे वाटतील ते तो करूं शकेल. या व्यवस्थेंत वडिलोपार्जित श्रीमंतीबरोबर वडिलोपार्जित दारिद्र्यपण नष्ट होईल.

श्रमाचा मोबदला मिळाल्यानंतर मनुष्यानें तो कसा खर्च करावा यावर निर्बंध नसावेत. सर्वांनीं सारखेंच खावें, सारखेच पोशाख घालावेत, सारखींच पुस्तकें वाचा-वींत अशी परिस्थिति उत्पन्न करणें अगर उत्पन्न होणें समाजाचे उन्नतीचे दृष्टीनें व व्यक्तीचें विकासाचे दृष्टीनें इष्ट नाहीं. विविधता व वैचित्र्य यांना अनुरूप वाव असावा. एखाद्याला अन्नावर कमी खर्च करून पुस्तकसंग्रह करावासा वाटेल, एखाद्याला वस्त्रावर जादा खर्च करावासा वाटेल, करमणुकीसाठीं एखाद्याला बालघाटी लावणी ऐकावीशी वाटेल, एखाद्याला बैठकी गाणें आवडेल; कोणी विश्रांतीचा वेळ बैठे खेळ खेळण्यांत घालवील, कोणी त्या वेळांत नाना देश, नाना क्षेत्रें पाहून येईल. भिन्न-रुचिर्हि लोकाः हें तत्त्व समाजांत असलें म्हणजे समाजाच्या दृष्टीनेंही हितावह आहे. शिस्तीचा ताण मनावर असला म्हणजे मन नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेला विन्मुख होतें, शिस्तीचे वातावरणांत विचार करपतो, त्याची वाढ होत नाहीं. खाण्यापिण्यांत कप-ड्यालत्त्यांत, विचारांत, वाङ्मयांत शिस्त बोकाळली म्हणजे जीवनांतील प्रसन्नता मालविली जाते. लोकांना मोकळीक असली म्हणजे लोक अभिरुचिप्रमाणें वागत असतात. जीवन ही कला आहे व ती व्यक्तिगत अनुभवांतून प्रफुल्लित होत असते. संपत्तीचें समाजीकरण म्हणजे व्यक्तींच्या वैयक्तिक जीवनाचें समाजीकरण नव्हे. लोक-

शाही म्हणजे वैयक्तिक आयुष्यांत व अनुभवांत सारखेपणा आणणें नव्हे. वाजवितां येवो अगर न येवो प्रत्येकानें बाजाची पेटी घेतलीच पाहिजे, ठराविक व्यक्तींचे ग्रंथ घेतलेच पाहिजे, घराची रचनाव्यवस्था अगदीं ठराविक रीतीनें केलीच पाहिजे असें नियंत्रण समाजानें घालणें इष्ट नाहीं. काय उत्पादन व्हावें यावर समाजानें नियंत्रण घातलें पाहिजे. कोणत्या वस्तूचा कसा उपभोग घ्यावा हें क्षेत्र व्यक्तीला मोकळें असावें. मद्याचें उत्पादन चालू ठेवून मद्यपानबंदी करणें चूक आहे. त्याचें उत्पादनच बंद केलें पाहिजे. जी बंदी पडेल ती सर्वांना पडली पाहिजे. विशिष्ट वर्गाला उपयोगीं पडेल असें उत्पादन चालू देणें म्हणजे विषमता उत्पन्न करून समाजाचे गरजेकडे दुर्लक्ष करणें आहे. विशिष्ट वर्गाची विशिष्ट राहाणी असें स्वरूप समाजांत न येईल अशी दक्षता उत्पादन व उपभोग या दोन्ही क्षेत्रांत घेतली गेली पाहिजे. दर्जाबाजी समाजांत सुरू झाली म्हणजे प्रत्येकाला आपला दर्जा ओळखून वाग असा इशाराच समाज देत असतो. समाजांतील महत्त्व हें केवळ केलेल्या कार्यानें मिळालें पाहिजे.

वर वर्णन केलेली मोबदला—व्यवस्था समाजसत्तावादी अगर भांडवलशाही कोणत्याही स्वरूपाच्या समाजांत अमलांत आणतां येण्याजोगी आहे. प्रत्यक्ष समाजघटना कशी जरी असली तरी वरील योजनेंतील न्याय सर्वसामान्यपणें मान्य होण्यासारखा आहे. प्रत्येकानें श्रम करून मिळवावें, प्रत्येकाला जीवनाला पुरें पडेल इतकें मिळावें, यापेक्षां जास्त समाजहिताचे दृष्टीनें जरूर असेल तरच मिळावें, या व्यवस्थेंतील न्याय स्वयंसिद्ध आहे. ही व्यवस्था व ही विचारसरणी मान्य केल्यानें जीवनांतील अपुरेपणा व अस्थिरता नष्ट होईल. श्रम केले असतां जीवनाला पुरें पडेल इतकें नक्की मिळेल असा विश्वास प्रत्येकांत उत्पन्न होईल. आज लाखों लोक उद्यांचें कसें होईल या चिंतेंत व्यग्र असतात, जन्मभर उदास व विषण्ण मनानें काळ घालवीत असतात. त्यांच्या आशा करपून गेलेल्या असतात, महत्त्वाकांक्षांनीं त्यांना सोडून दिलेलें असतें. या व्यवस्थेंत प्रत्येकाला प्रयत्नांत हुशारी वाटेल, काम करण्यांत ईर्षा उत्पन्न होईल. कारण, अधिक चांगलें कार्य केल्यानें 'चढती, बढती, पदवी' मिळणार हें निश्चित असतें. मनुष्यानें निष्काम हेतूनें काम करून समाजसेवा करावी, कार्यासाठी कार्य करावें हा आदर्श श्रेष्ठ आहे. तथापि, वस्तुस्थितीला अनुसरून आदर्शाकडे जास्तींत जास्त प्रमाणानें नेणारी ही विचारसरणी आहे. लोकांचे संमतीवर वेतनव्यवस्था आधारण्याचा हा एक प्रकार आहे. यांत जास्तींत जास्त सामाजिक न्याय साधला आहे. सोव्हियट रशियांतसुद्धां २५ वर्षांचे प्रयत्नानंतर समान प्राप्तीचें तत्त्व संपूर्णपणें अमलांत येऊं शकलें नाहीं. प्राप्तींतील ही विषमता समाजाचे हिताचे दृष्टीनें

अवश्य व अपरिहार्य वाटल्यानें ती तेथेंही दूर झाली नाहीं. या व्यवस्थेंत सोव्हिएट-प्रमाणें श्रमानेंच मिळविलें पाहिजे व श्रमानेंच जगलें पाहिजे ही मौलिक बाब मानली आहे. ज्ञानाचे प्रगतीबरोबर श्रमाचे प्रकार वाढत आहेत. श्रमविभागणीवर तर समाज आधारलेला आहे व प्रगतीबरोबर ही श्रमविभागणी अधिक अधिक होत जाते. श्रमाचा मोबदला काय असावा हा प्रश्न मग अधिक अधिक बिकट होत जातो. तो काळजीपूर्वक सोडविला नाहीं तर माणसें लोभी होतात व त्यांचे नैतिकदृष्ट्या अधः-पतन होतें. हें टळावें या दृष्टीनें वरील विचारसरणी मार्गदर्शक आहे.

वरील विचारसरणीनें समाजांत मोबदला देण्याची व्यवस्था करून श्रम करणा-रांना न्याय मिळाला तरी तो समाज तेवढयानें आदर्श होत नाहीं. अनेक बंधनेंही हा न्याय असून असूं शकतात. भांडवलशाही समाजांतसुद्धां हा न्याय देणें शक्य आहे हें वर सांगितलेंच आहे. शारीरिक सुखांची व्यवस्था झाली, अन्नवस्त्रादिक गरजा चांगल्या रीतीनें भागल्या कीं, मनुष्यें समाजांतील आपला अधिकार, आपलें स्थान कोणतें, राज्यांत आपली सत्ता काय याची मग फारशी चौकशी करीत नाहींत. भांडवलशाही समाजांत नफा मिळावा ह्या मुख्य सूत्राचे आधारें कार्य होत असतें. त्याला अनुसरून राजकीय तत्त्वज्ञान जुळवून घेतलें जातें. समाजांतील जीवनक्रम ज्यांच्या हातांत उत्पादन व त्याचीं साधनें, ते निश्चित करतात. समाजाचे गरजांना ते वळण लावूं शकतात. त्यांच्या महत्त्वाच्या दृष्टीनें अनुक्रम ठरवूं शकतात. कोणत्या विद्येला भाव असावा हें ते घडवून आणतात. चांगला व्यापार म्हणजे सर्वत्र सुबत्ता, मुबलक रोजगार, पुरेशी मजुरी; व्यापार पडला म्हणजे बेकारी, पगारकाट, सर्वत्र अस्वस्थता व चणचण असें दृश्य दिसत असतें व त्यामुळें चांगल्या स्थितींत व्यापार ठेवणें, उद्योगधंदे ठेवणें म्हणजे शहाणपण आहे, त्यांतच समाजाचें कल्याण आहे असा सार्वत्रिक समज होतो. चांगल्या स्थितींत व्यापार व धंदे ठेवणें म्हणजे त्यांतील मालकांना नफा मिळूं देणें हाच खरा अर्थ असतो. नफा हा भांडवलशाही व्यवस्थेचा प्राण आहे, तो तिचें चैतन्य आहे, त्याशिवाय ती हलूं शकत नाहीं, जिवंत राहूं शकत नाहीं. ती राहील तर समाजांत सुबत्ता असा समज असल्यानें ती जें करील व राज्यसत्तेमार्फत करवील तें हिताचेंच असणार असें मानण्यापर्यंत मजल जाते. राज्यसत्ता सर्वस्वीं भांडवलवाल्यांचे इशाऱ्यानें चालते. मजुरांबाबतचे कायदे त्यांचें हित डोळ्यांपुढें ठेवून केले जातात. त्यांना ' परवडणार नाहीं ' तें होणार नाहीं. ताणतां येईल तेवढें जरी ताणलें तरी मर्यादेबाहेर राज्यसत्तेला ते ढवळाढवळ करूं देणार नाहींत. भांडवलशाही समाजांत भांडवलवाले व त्यांचे साथीदार, म्हणजे राज्य-

कर्त्यांचा वर्ग, हे सर्व व्यक्तिशः दुष्ट, अनीतिमान्, 'रक्तशोषक' असतात असें नाहीं. ते प्रेमळ असतात, दयाळू व दानी असतात, सुविद्य असतात, सार्वजनिक हितबुद्धिही त्यांच्यांत असते. परंतु हे सद्गुण प्रथम त्या वर्गांतील सर्वांना गडगंज प्राप्ति झाली, मनाजोगता नफा मिळाला म्हणजे प्रकट होतात. याप्रमाणें प्राप्ति व नफा मिळविण्याचा त्यांचा कृतनिश्चय असतो व त्या कामीं मजुरांना घाण वस्तींत राहावें लागलें, अर्धपोटीं राहावें लागलें, अज्ञानांत राहावें लागलें तरी ते पर्वा करीत नाहींत. कामगारांच्या चळवळी कायदा व सुव्यवस्थेचे नांवाखालीं दडपडण्यास त्यांचें दास झालेलें सरकार कचरणार नाहीं. टीकेला राज्यद्रोह, निषेधाला बंड मानून खटले, फटके, फांशी, गोळीबार यांच्या जोरावर अंमल कायम ठेवण्यांत कांहीं पाप मानीत नाहींत उलट समाजाचें संरक्षण केलें असा दावा ते सांगतात. हें सर्व टाळावयाचें असेल तर नुसती न्याय्य वेतन व्यवस्था करून भागणार नाही तर या वेतनव्यवस्थेप्रमाणें औद्योगिक व्यवस्थेंत न्याय राहील, तिचें संघटन योग्य रीतीनें होऊन राजकीय क्षेत्रांत ज्याप्रमाणें सार्वत्रिक मतदानाचे हक्कानें प्रत्येक व्यक्तीला महत्त्व प्राप्त झालें आहे, प्रतिष्ठा मिळाली आहे, तसें प्रभावी स्थान त्यांत प्रत्येक कामगाराला मिळेल अशी व्यवस्था निर्माण केली पाहिजे. कामगार उद्योगधंद्यांत प्रभावी झाला म्हणजे बेशिस्तपणा आला हें खोटें आहे. कामगार प्रभावी होणें म्हणजे समाजाचे गरजेचा विचार होऊन ते उत्पन्न होणें, समाजहिताचा विचार त्यांत प्रभावी होणें आहे. समाजहिताचा विचार आला म्हणजे त्यांत काय उत्पादन करावयाचें व तें कसें करावयाचें या दोहोंचाही विचार आला.

मजुरांचे श्रम खपतात म्हणून त्यांना मोबदला हें योग्य आहे. भांडवलवाल्यांना मोबदला कशाबद्दल मिळतो, तो मिळावा का, व किती मिळावा याचा विचार केला पाहिजे. मजुरांचे श्रम ही त्यांची संपत्ति व त्यांवर त्यांचें स्वामित्व. या स्वामित्वाचे अधिकारांचा जसा विचार केला, तसा भांडवलवाल्यांची उद्योगधंद्यांतील संपत्ति व तिचें स्वामित्व, यांचे अधिकारांचा विचार केला पाहिजे. उद्योगधंद्यांत घातलेलें भांडवल व त्याचें स्वामित्व हें भांडवलवाल्यांचें असतें. याचा विचार करावयाचा त्यांना किती अधिकार असावेत याचा विचार करावयाचा म्हणजे ज्यांनीं भांडवल पुरविलें त्यांचा अधिकार काय, याचाच विचार करावयाचा. मजुरीचा विचार म्हणजे मजुरांचा विचार, तसेंच भांडवलाचा विचार म्हणजे भांडवलवाल्यांचा विचार हें स्पष्ट आहे. मनुष्यानें जी स्वकष्टानें मिळविली असेल तीच त्याची संपत्ति हें तर येथपर्यंत स्वीकारलेल्या विचारसरणींतील मुख्य सूत्र आहे. म्हणून जे स्वतः मिळ-

विलेलें नाहीं असें कोणाजवळही असणार नाहीं म्हणून असें भांडवल कुणालाही गुंत-वितां येणार नाहीं, ते 'भाड्यानें' देतां येणार नाहीं, ही पहिली मर्यादा आली. वारशानें अगर अन्य रीतीनें संपत्ति एकाकडून दुसऱ्याकडे जाणार नसल्यानें अकष्टार्जित संपत्ति कुणाकडेही असणार नाहीं. कष्टानें मिळवून जर कोणी शिल्लक टाकील तर ती शिल्लक गुंतविण्याचा प्रश्न उपस्थित होतो. बापाचे संपत्तीप्रमाणें बापाचा दर्जाही वारशानें जाणार नाही. बाप व्यवस्थापक होता म्हणून मुलगा व्यवस्थापक होणार नाहीं, कारण लायकी वारशानें येत नाही. गुणाशिवाय स्थानप्राप्ति ही अन्याय्य गोष्ट टरली असल्यामुळें वारशानें नोकरी मिळण्याचा प्रश्नच उपस्थित होत नाहीं. उद्योगधंद्यांकडे केवळ व्यक्तिगत प्राप्तीचे दृष्टीनें न पाहातां समाजसेवेचे दृष्टीनें पाहाणें अत्यंत जरूर आहे. वैद्य, वकील, शिक्षक, यांच्या व्यवसायांत प्राप्ति असते म्हणून तर लोक त्यांत जातात, पण प्राप्तीबरोबर कांहीं समाजकार्य आपण करीत आहों, हीही भावना कमीजास्त प्रमाणांत त्यांच्यांत असते. न्यायासाठीं झगडतों असा दावा वकील करतो. समाजाचें आरोग्य आपण संरक्षितों असें वैद्य सांगत असतो, भावी नागरिक आपण तयार करीत असतों, हा अभिमान शिक्षक बाळगतो. उद्योगधंद्यांतील मजूर व मालक यांच्या मनांत कोणते समाजसेवेचे विचार आजच्या परिस्थितींत उत्पन्न होतात ? कांहीं तरी तसे विचार उत्पन्न होतात का ? असा प्रश्न विचारल्यास नकारार्थीच उत्तर द्यावें लागेल. मजूर बिचारा मजुरीसाठीं श्रमतो, अन्य विचार करण्यास त्याला वेळच नसतो. आपल्या उत्पादनाचें पुढें काय होतें याची त्याला काळजी करावी लागत नाहीं. समाजाला तें उपयुक्त आहे, का त्याचें अधःपतन करणारें आहे याचा विचार तो करीत नाही; कारण उत्पादनांत त्याची सल्लामसलत कोणी घेत नाहीं. मालक नफ्याकडे बघतो. भागांवर किती नफा पडला, किती टक्के व्याज सुटलें, हाच विचार तो करतो. उत्पादनाकडे नैतिक दृष्टीनें तो बघत नाहीं. तो नफा होत असेल तर मद्याचें उत्पादन करील व त्याजबरोबर मद्यपानाचे निषेधाचा पुरस्कारही करील; गोसेवामंडळाचे कार्याचा पुरस्कार करील, पण त्याचबरोबर धंदा म्हणून कसाईखाना बांधण्याचें कंत्राटही घेईल. धंदा म्हणजे धंदा असा दंडक सांगून त्याचा नीतिमत्तेशीं संबंध जोडण्याचें अमान्य करील. धंद्यांत नीतिमत्ता, समाजसेवाभाव या अडचणीच तो मानतो. त्याचें कर्तृत्व नफ्याचे प्रमाणावर ठरतें, त्याचें यश प्राप्तीनें मोजलें जातें. वकील, वैद्य वगैरेंच्या रोजगारांत कसें वागावें याचा कांहीं दर्जा ठरविलेला असतो त्या दर्जाप्रमाणें त्यांना वागावें लागतें, कांहीं परंपरा असतात त्याप्रमाणें त्यांना वर्तन ठेवावें लागतें. उद्योगधंद्यांत कसें वागावें याला मर्यादा नाहीं व

प्रमाण नाहीं आणि कोणी त्यांत शिरावें याबद्दलही कसोटी नाहीं. किमान लायकीसुद्धां प्रवेशाला अवश्य नाहीं, परीक्षा नाहीं, परवाना नाहीं, सनद नाहीं, फक्त भांडवल पाहिजे; तें असलें म्हणजे झालें. वैयक्तिक नालायकीनें अगर अज्ञानानें अपयश येण्याचें कारण नाहीं अगर गैरवर्तनाबद्दल हकालपट्टी होण्याचा प्रसंग नाहीं. कारखान्यांतील भांडवलवाल्यांना मालाच्या जाती ओळखतां येत नाहींत किंवा मालामध्यें काय काय असतें याची जाणीवही कारखान्यांना भांडवल पुरविणारांना नसते. आपल्या शेतांत काय पिकतें याची जाणीव जमिनदारांना नसते, ते फक्त खंडाकडे नजर ठेवतात व वाटेल तेथें राहून चैन करूं शकतात. तीच स्थिति उद्योगधंद्यांत भांडवल गुंतविणारांची असते. भागांवरील नफा अगर कर्जावरील व्याजाकडे फक्त त्यांचें लक्ष असते. कारखान्यांत कसें काम चालतें याकडे ते बघतही नाहींत, मजुरांशीं त्यांचा संबंधही येत नाहीं, उत्पादनांत सरभेसळ झाली तरी त्यांना कोणी जबाबदार धरत नाहींत, किंबहुना खुशाल ती करूं देण्यांत येते. 'गिऱ्हाइकानें पाहून घ्यावें' हें गिऱ्हाइकाचें काम आहे या सिद्धान्ताचें समर्थन करण्यांत येतें. वकील, वैद्य वगैरे व्यवसायांत चूक झाली कीं, कायदा गिऱ्हाइकाला नुकसानभरपाई करून देतो. निष्काळजीपणा तेथें गुन्हा ठरतो. समाजाचे सेवेकरी म्हणून त्यांचेकडे समाज बघतो व त्यांनीं प्राप्तीपेक्षां सेवेचे प्रतिष्ठेकडे अधिक लक्ष द्यावें अशी अपेक्षा करतो. ही सेवेची अपेक्षा, उद्योगधंद्यांकडे पाहतांना असली पाहिजे. उद्योगधंदे समाजसेवेचे दृष्टीनें चालविले गेले पाहिजेत. तसें झालें म्हणजे त्यांतील प्राप्तीचें महत्त्व कमी होईल.

ज्या कार्यांत प्राप्तीला महत्त्व न देतां समाजसेवेला महत्त्व दिलें जातें, त्यांना जर व्यवसाय ( Profession ) म्हटलें तर सर्व उद्योगधंद्यांत ही व्यवसायप्रवृत्ति उत्पन्न केली पाहिजे. प्राप्तीपेक्षां कार्याची प्रतिष्ठा ही दृष्टि ठेवून उद्योगधंद्यांतील चक्रें फिरलीं पाहिजेत. समाजसेवाभावानें त्यांतील वातावरण प्रसन्न झालें पाहिजे. येवढें झाल्यानें सर्वच भांडवलवाले इष्ट असें वागतील असें मानण्याचें कारण नाहीं. आजही न शोभणारें वर्तन करणारे कांहीं तरी शिक्षक आहेत, वकील आहेत, वैद्य आहेत. तथापि, हे व्यवसाय केवळ प्राप्तीचे आशेनें सर्व करतात असें नाहीं. उलट आजच्या स्थितींत समाजाला उपयोगीं पडावयाचें येवढ्याच दृष्टीनें उत्पादन करणारे क्वचितच. समाजसेवेचें ध्येयानें तें ध्येय ठेवलें म्हणजे कांहीं तरी प्रमाणांत याप्रमाणें वागणारे निघतीलच. तथापि, या दृष्टीनें कांहीं व्यवस्था निर्माण करावयाची झाल्यास, कांहीं गोष्टी तावडतोब अवश्य ठरतात. भांडवल म्हणजे जे स्वकष्टार्जित मिळकतींतून शिल्लक असेल तें ज्या उद्योगधंद्यांत गुंतविलें जाईल तेथें तें मालक असणार नाहीं. श्रमाचा

मोबदला जसा निश्चित तसें भांडवलवालाचें 'भाडें' निश्चित ठरलें जाईल. धंद्यांतील मालकी भांडवलवाल्यांची राहाणार नाहीं, त्यांचा ताबाही धंद्यावर राहाणार नाहीं. कर्ज देणाराचा संबंध व्याजापुरताच असला पाहिजे. बजेटांत तूट आली किंवा शिल्लक राहिली तरी रोखेदारांचें व्याज कमीजास्त होत नाहीं अगर केवळ रोखेदार म्हणून हक्कानें राज्यकारभार कसा चालावा हेंही तो सांगूं शकत नाहीं. बाजारभावानें भांडवल घेतलें जाईल व ठरलेलें व्याज फक्त तें पुरविणारांना मिळेल. धंद्यांत नफा झाला तरी तो आजचेप्रमाणें शेषाधिकारी या नात्यानें त्यांना मिळणार नाहीं अगर नुकसान झालें म्हणून ठरलेलें व्याज बुडविलें जाणार नाहीं. लग्नासाठीं कर्ज काढलें म्हणजे सावकाराला वधूपरीक्षेचा हक्क प्राप्त होत नाहीं किंवा लग्नानंतर संसारांत खडाष्टक उत्पन्न झालें म्हणून त्याचें कर्ज बुडविलें जात नाहीं. धंद्यांत होणारा नफा चांगल्या व्यवस्थेमुळें होईल, भाव वाढल्यानें होईल, अगर अन्य कारणानें होईल. त्याचप्रमाणें अव्यवस्थेनें, भाव घसरल्यानें अगर अन्य कारणानें नुकसानही होईल. पण दोन्हीशीं भांडवलवाल्यांचा संबंध राहाणार नाहीं. भांडवल व मालकी यांतील नातें तोडलें जाईल. आज भांडवल म्हणजे मालकी आहे हें दृश्य राहाणार नाहीं. आज मालकी व व्यवस्था या अलग असल्या तरी व्यवस्थेवर अखेरचा अधिकार मालकीचा म्हणजे भांडवलाचाच असतो. म्हणून व्यवस्थेचें स्वरूप आमूलाग्र बदललें जाईल. धंद्यांत व्यवस्था कशी राहावी, तो कसा चालविला जावा, हें त्यांत जे प्रत्यक्ष काम करणारे असतील ते ठरवतील. व्यवसायांत जशा परंपरा, प्रमाणें व संकेत असतात, तसें धंद्यांतही होईल. त्यांतील नियम, त्यांत काम करणारांच्या सल्लामसलतीनें तयार होतील. न खपतां खाणारा भांडवलवाला कटला म्हणजे कांहीं व्यवस्थितपणा धंद्यांत निर्माण होईल. त्याची जुळवणूक, त्यांत कार्य करणारे असतील त्यांचे श्रम व श्रमांचें महत्त्व लक्षांत घेऊन होईल. त्यांत काम करणारे हे सर्व मालक असा भाव निर्माण होईल. कारण मालकी सांगणारा पण कांहींही कार्य न करणारा असा भांडवलवाला तेथें असणार नाहीं. खाजगी मालकीचा दर्प जाऊन, सार्वजनिक सेवेचा सुवास तेथील वातावरणांत उत्पन्न झाला म्हणजे मजूर व व्यवस्थापक यांचे संबंध सहकार्याचे राहातील. एकतेचें वातावरण तेथें निर्माण होईल. न्याय्य वेतनव्यवस्थेनें संघर्षाला जागा राहाणार नाहीं. भांडवलवाला राहिला तरी त्याची मालकी नाहीं, व्यवस्थेशीं संबंध नाहीं, बाजारभावानें त्याचे भांडवलाचें भाडें दिल्यानें, त्याला कांहीं जास्त दिलें असें वाटण्याचें कारण नाहीं व जास्त देण्याचेंही कारण नाहीं. व्यवस्था तेथें काम करणाऱ्यांवर सोंपविली म्हणजे त्यांच्यांत जबाबदारी उत्पन्न होते व

जबाबदारीनें कर्तृत्वाला वाव मिळतो, विधायक प्रवृत्तींना योग्य वातावरण उपलब्ध होतें. अधिकार व्यक्ति म्हणून न दिला जातां कार्यामुळें प्राप्त होईल. यामुळें कांहीं अस्वाभाविक अगर अन्यायाचें असें वाटत नाहीं. विद्यमान व्यवस्थेंत भांडवलाला मालकी व ताबा आहे व त्यामुळें उत्पादनांत सामाजिक, हिताकडे त्याचे महत्त्वाकडे लक्ष दिलें जात नाहीं व ही खाजगी मालकी संतुष्ट ठेवण्यांत समाजाचें शहाणपण आहे असा वेदान्त सांगितला जातो. उत्पादनक्षेत्रांत खाजगी मालकी समाजाचे सुखासाठीं आवश्यक नाहीं. उलट ती समाजहिताविरुद्ध वागते हे आतांपर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट दिसून येतें.

विद्यमान भांडवलशाही उत्पादनपद्धतींत समाजहिताचा विचार गौण असतो. वर वर्णन केलेल्या व्यवस्थेंत त्याला प्रथम व प्रमुख स्थान मिळेल, किंबहुना सर्व उत्पादन हें समाजाच्या गरजेकरतां, उपभोगाकरितांच निर्माण झालें पाहिजे हें तत्त्व मूलभूत राहील. कांहीं उत्पादन कीं ज्यावर समाजाचें स्वास्थ्य, आरोग्य, आवश्यक सोयी अवलंबून आहेत तें सर्व समाजाच्या मालकीचें होईल. वीज, वाहातुक, कोळसा वगैरे गोष्टींचें उत्पादन हें केव्हांही खाजगी मालकीचे ठेवणें इष्ट नाहीं. जेवढे जेवढे उद्योगधंदे हे कटीचे उद्योगधंदे [Key industries] आहेत कीं ज्यांवर ताबा असला म्हणजे अन्य धंद्यांवर प्रभुत्व चालवितां येतें ते सर्व समाजाचे मालकीचे झाले पाहिजेत. त्यांत होणारा नफा कोणा व्यक्तींना न मिळतां राष्ट्राला मिळाला पाहिजे. हे सर्व सामाजिक मालकीचे धंदे कोणत्या तत्त्वावर संघटित व्हावे हा दुय्यम प्रश्न आहे. मुख्य प्रश्न त्यांत होणारा नफा संपूर्णपणें समाजाला, राष्ट्राला मिळाला पाहिजे. महत्त्वाचे व मोठे धंदे याप्रमाणें सामाजिक मालकीचे झाल्यानंतर राहिलेले धंदे वाटेल तसे चालविले जातील असें नाहीं. सामाजिक मालकीचा असो अगर नसो, प्रत्येक धंद्यांत संघटना राहील. कांहीं मूलभूत तत्त्वांप्रमाणें कारभार चालेल. प्रत्येक धंद्यांत प्रमाणें ठरविण्यांत येतील; वेतनप्रमाण, कामाच्या तासांचें प्रमाण हें धंद्यागणिक ठरलें जाईल. कारखान्याची व्यवस्था लोकशाही तत्त्वावर आधारली जाईल. व्यवस्थापक व कामगार यांचे सहकार्यानें सर्व गोष्टी ठरल्या जातील. लहरीवर नोकरी हें जाईल. बढती–बदली वशिल्यांवर राहाणार नाहीं. कामगारप्रतिनिधि व व्यवस्थापक यांच्या संयुक्त कमिट्यांकडे हें काम जाईल. पगार, कामाचे तास, मुकादमांचें वर्तन, त्यांच्या नेमणुका व बडतर्फी या सर्वांबाबत तंटा उपस्थित झाल्यास संयुक्त कमिट्या त्यांचा निकाल करतील. मॅनेजरची हुकूमशाही नष्ट होईल. मॅनेजरचे मर्जीवर मुकादम नेमला न जातां संयुक्त कमिटीचे मंजुरीनें व मान्यतेनें नेमला जाईल. या व्यवस्थेनें अनेक

तंटे नाहींसे होतील. उद्योगधंद्यांत मालकाचा मेहुणा म्हणून कोणी मॅनेजर होणार नाहीं. प्रत्येक इसमाची लायकी परीक्षून, ठरलेल्या प्रमाणाबरहुकूम असेल तर ती जागा त्याला मिळेल. किमान लायकी असल्याशिवाय वकील, वैद्य वगैरे व्यवसायांत प्रवेश नसतो तेंच तत्त्व उद्योगधंद्यांत स्वीकारलें जाईल. वशिलेबाजी नष्ट झाली म्हणजे व्यक्तींचें अन्याय्य व गुणहीन महत्त्व कमी होतें. सामुदायिक व सार्वजनिक दृष्टीनें मग विचार व्हावा असें वातावरण निर्माण होतें. खाजगी मालकीव्यवस्था असली म्हणजे वाटेल तीं माणसें नेमावी, वाटेल त्या तऱ्हेनें कारभार चालवावा, लोकमत मानूं नये, नवे शोध, नवें ज्ञान यांचा उपयोग करूं नये, काय व्यवहार करतों हें कोणास समजूं नये अशी परिस्थिति असते. धंद्यांतील व्यवहाराचे हिशोब गुप्त न ठेवतां जाहीर केले पाहिजेत. असें झालें म्हणजे कोठें व कसा खर्च होतो हें जनतेला कळेल. त्यावरून धंदा करणारांची कार्यक्षमता अंदाजतां येईल. येवढेंच नव्हे तर कोणते धंदे प्रामाणिकपणें चालले आहेत, कोणत्या धंद्यांत निव्वळ सट्टेबाजी चालू आहे याचा तपास लागेल. कामगारांना ही माहिती अत्यंत उपयुक्त आहे. कोणत्या धंद्यांत स्थैर्य आहे हें त्यांना कळेल. सर्व धंद्यांवर हिशोब व कारभारवृत्त प्रसिद्ध करण्याची सक्ति असली म्हणजे पद्धतशीर व शास्त्रीय दृष्टीनें उत्पादनाचा विचार करणें सुलभ होईल. शास्त्रीयपद्धतीवर उत्पादनाची मांडणी व शास्त्रीय पद्धतीवर उत्पादनाची घडण आणि शास्त्रीय दृष्टीनें त्यांचा विचार होऊं लागला म्हणजे समाजाचें हित उत्कृष्टपणें साधलें जाऊन सामाजिक जीवनाला मारणारें, त्याचा हेतु विफल करणारें असें उद्योगधंद्यांचें स्वरूप नाहीसें होऊन सामाजिक जीवनांत सफलता, संपन्नता व समाधान निर्माण करणारी एक शक्ति असें तें ठरेल.

उद्योगधंद्यांतील जें क्षेत्र खाजगी मालकीचें राहील त्यांतही मालकीबरोबर व्यवस्था पाहाण्याचा हक्क राहाणार नाहीं हें वर स्पष्ट झालें आहे. मालकी असली तरी नियंत्रणाचा हक्क प्राप्त होत नाहीं असा अर्थ स्पष्ट झाला. कारखान्यांतील प्रत्यक्ष व्यवस्थेवर मालकाचें नियंत्रण राहाणार नाहीं; मालक म्हणून व्यवस्थेचा हक्क मिळणार नाहीं. मालकी व व्यवस्था यांच्यांतील संबंध तोडतांना कांहीं ठिकाणीं अडचणीही येतील. बांधकामाचा धंदा असा आहे कीं, प्रत्यक्ष व्यवस्थेशीं त्यांत भांडवल घालणाऱ्याचा सारखा संबंध येतो. घरें कशीं असावींत, कोणता माल वापरावा वगैरे गोष्टींचा निर्णय त्यानेंच घ्यावयाचा असतो. त्याचा व्यवस्थेशीं संबंध न ठेवला तर अन्याय होईल. परन्तु येथेंही त्याचें स्थान मालक म्हणून मानण्याचें कारण नाहीं. वस्तुतः व्यवस्थेंत तो प्रत्यक्ष देखरेखीचें काम करीत असतो, व्यवस्थेंतील एक म्हणून

त्याचें स्थान मानण्यास हरकत नाहीं. लहान लहान प्रमाणांवरील धंद्यांत बहुतेक ठिकाणीं मालक जातीनें खपत असतो, देखरेख करीत असतो. आपल्या छोट्या कारखान्यांत सारखा उभा असतो. अशा स्वरूपाच्या धंद्यांत केवळ त्यानें भांडवल घातलें म्हणून व्यवस्थेंत त्याला स्थान नसावें हें योग्य ठरणार नाहीं. जर तो प्रत्यक्ष व्यवस्थेंत खपत असेल, श्रमत असेल, तर त्याला व्यवस्थेंत स्थान असलें पाहिजे. परन्तु ज्या धंद्यांत भांडवलवाल्याचा उत्पादनाच्या क्रियेशीं संबंध येत नाहीं तेथें व्यवस्थेंत त्याला केवळ मालक म्हणून स्थान मिळतां कामा नये. विद्यमान उत्पादन-पद्धतींत म्हणजे भांडवलशाही उत्पादनपद्धतींत आजही मालक व व्यवस्थापक या भूमिका एकत्र क्वचितच असतात. मालक म्हणजे भांडवल पुरविणारे. हे कारखान्या-पासून दूर, त्यांतील प्रत्यक्ष उत्पादनक्रियेबाबत अज्ञानी, व्यवस्थेपासून अलिप्त असे असतात. त्यांचा संबंध नफ्यापुरताच असतो. प्रत्यक्ष कारखान्याची, उत्पादनाची व्यवस्था पाहाणारे निराळेच असतात. भांडवलवाले म्हणजे मालक; यांचा व प्रत्यक्ष काम करणारे मजूर व देखरेख करणारे मॅनेजर यांचा संबधही येत नाहीं. असले मालक व मजूर यांच्या सहकार्याचा प्रश्न अगर त्यांच्याशीं सल्लामसलत करण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. त्यांनीं व मजुरांनीं संयुक्तपणें नियंत्रण करावें हेंही शक्य नाहीं; कारण प्रत्यक्षपणें त्यांचा व्यवस्थेशीं कांहींही संबंध नसतो. कसें उत्पादन होतें, कसें केलें जातें यांच्याशीं त्यांचा संबध नसतो. अनेकजण गोळा होतात. कुणी कारकून, कुणी कामगार, कुणी मुकादम, कुणी मॅनेजर व हे सर्व आपआपल्या श्रमानें खपून उत्पादन करतात. श्रम देतात व मोबदला घेतात. मालक मात्र या व्यवस्थेत घेण्या-साठीं फक्त असतो व त्यानें किती घ्यावें याला मर्यादा नसते. वास्तविक व्याजापुरता त्याला हक्क असला पाहिजे. तसें झाल्यास त्याला व्यवस्थेंत स्थान मागण्याचा कायदे-शीर हक्क नाहीं व देण्याचें कारण नाहीं. केवळ नफा घेण्यापुरताच त्याचा संबंध असेल तर जोंपर्यंत नफा मिळत आहे, तोंपर्यंतही त्याला व्यवस्थेंत स्थान देणें जरूर नाहीं. जर उत्पादनाचे कामीं त्याचा प्रत्यक्ष उपयोग होत असेल, तेथें तो श्रमत असेल तर व्यवस्थेच्या नव्या स्वरूपांत, नव्या घटनेंत साहजिक स्थान त्याला मिळेल.

भांडवलवाले प्रत्यक्ष उत्पादनाशीं किती संबंध ठेवतात हें पाहिल्यानंतर त्यांना त्यांच्या भांडवलावर बाजारभावानें ठराविक तेवढें व्याज मिळावें, अधिक कांहीं मिळूं नये यांतील न्याय सहज पटण्यासारखा आहे. आज त्यांना वाटेल त्या प्रमाणांत नफा मिळतो व त्यासाठीं ते श्रमही करीत नाहींत. या नफेबाजीचें समर्थन कुठल्याही दृष्टीनें होऊं शकत नाहीं. भांडवलशाहीतर्फे जें समर्थन करण्यांत येतें त्यांतील मुख्य

भर त्यांतील योजक—व्यवस्थेवर आहे. समाजांत नाना लोकांच्या नाना गरजा आहेत, त्या भागविण्याचे दृष्टीनें नाना प्रयत्न होत असतात, त्यांत स्पर्धा असते, समाजांतील साधनसामुग्री हातीं येण्यासाठीं सारखी धडपड असते, सर्वत्र अव्यवस्था असते. या अव्यवस्थेंत वाढत्या श्रमविभागणीनें भर पडत असते. यांतून योग्य तऱ्हेनें श्रम व सामुग्री यांची जुळणी करून उत्पादनसंघटनेची योग्य मांडणी करून, समाजाच्या गरजा भागविण्याचें महान् कार्य योजकवर्ग (Entreprenur) करीत असतो असें सांगितलें जातें. उत्पादनाचे घटक एकत्र आणून उत्पादनाचे कार्यांत तो पद्धत निर्माण करतो असा दावा त्याचेतर्फे सांगितला जातो. बाजारभावाचें सूक्ष्म निरीक्षण करून मागणी पुरी होईल अशी पुरवठाव्यवस्था तो करीत असतो. हा वर्ग नसेल तर काय पुरवठा करावा, कसा, केव्हां करावा हें ठरविणें कठीण होईल आणि प्रगतिमान समाजांत मागण्या प्रमाणानें व प्रकारानें सारख्या वाढत असतात. तेथें तर या वर्गाची जरुरी अधिक आहे. हा वर्ग जें कार्य करतो तें उत्पादनाला अवश्य आहे म्हणून त्यांना मिळणारी प्राप्ति ही उत्पादनखर्चाची एक बाब समजली पाहिजे, त्यांना जें मिळतें तें त्यांच्या कार्याचें—आणि हें कार्य अवश्य आहे—पारितोषक समजलें पाहिजे. तो वर्ग कार्य न करतां मिळवितो हें म्हणणें चूक आहे व वस्तुस्थितीला सोडून आहे. जर समाजाच्या गरजा पुरेशा भागत नसतील तर तो दोष या वर्गाचा नाहीं. पुरेशी सामुग्री व सरंजाम असून गरजा भागत नाहींत असें होत नाहीं. आज या वर्गाचे श्रमाला जें मिळतें तें आदर्श व्यवस्थेचे दृष्टीनें कदाचित् जास्त असेल, मिळणारा नफा, सामाजिक मूल्याचे दृष्टीनें प्रमाणाबाहेरही असेल. पण जगांत जर सर्वत्र आदर्शाप्रमाणें होत नाहीं तर येवढेंच बाबतींत भर कां द्यावा व देणें न्याय्य नाहीं. उलट अनेक अडचणी व अडथळे यांना तोंड देऊन हा वर्ग काम करीत आहे. आणखी अडथळे उत्पन्न करणें म्हणजे त्याचे कार्यांत व्यत्यय आणणें आहे. कुणी तरी हें कार्य अवश्य असल्यानें केलेंच पाहिजे, मग करीत आहेत त्यांनाच करूं देणें इष्ट नाहीं का ?

वरील प्रश्नाचें उत्तर अगदीं स्पष्ट आहे. हा वर्ग ठेवल्यानें उत्पादन हें नफ्यासाठीं होणार, समाजाचे सेवेसाठीं, केवळ समाजाचे गरजेला अनुसरून होणार नाहीं. भांडवलशाही उत्पादनांत परिणामकारक गरजांचाच विचार घेतला जातो. त्या पुरविण्याकडे उत्पादनाचीं सर्व चक्रें फिरत असतात. ज्याच्याजवळ क्रयशक्ति तो आपली मागणी परिणामकारक करूं शकतो व त्याची गरज नफ्यासाठीं उत्पादन करणारा भागवीत असतो. असंख्य लोकांना अनेक गोष्टींची गरज असते पण क्रयशक्तीचे

अभावीं ते मागणी करूं शकत नाहींत. त्यांचे मागणीस उत्पादक अगर योजकवर्ग मोजीतही नाहीं, त्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करतो. बाजारांत श्रीमंत व गरीब दोघे आले म्हणजे श्रीमंताचें समाधान करण्याकडे योजक लक्ष देतो, नव्हे त्याला द्यावें लागतें. क्रयशक्तीचे जोरावर श्रीमंत आपली मागणी परिणामकारक करून योजकाला उत्पादन त्यांच्या मागणीस जुळेल असें घडवून आणावें लागतें. गरिबांची गरज, त्यांची मागणी त्यांच्याजवळ क्रयशक्ति नसल्यानें जागचे जागीं राहाते. ज्या मालाला गिऱ्हाईक आहे तो माल उत्पादक काढणार. कोणता माल काढावा हें बाजारभाव पाहून योजक ठरविणार. भांडवलशाही पद्धतींत बाजारांतील भावयंत्र मागणी–पुरवठ्याचें नियमन करीत असतें, उत्पादनाचें मार्गदर्शन करीत असतें. किंमत येऊं लागली, वाढूं लागली कीं योजकवर्ग तो माल काढूं लागतो, कमी झाल्यास कमी करूं लागतो. हें भावयंत्र ऐपतवालें गिऱ्हाईक, घेणारें गिऱ्हाईक कोणत्या मालाला आहे हें दाखवितें, त्या मालाची समाजाला आवश्यकता आहे अगर उपयुक्तता आहे हें तें दाखवीत नाहीं. आरशाप्रमाणें चेहरा दाखवील, चारित्र्य दाखविणार नाहीं. समाजाला जें खरोखर जरूर आहे, ज्याची आवश्यकता आहे त्याकडे योजकवर्ग पाहात नाहीं. तो भावयंत्रावरून परिणामकारक मागणी हेरतो व ती पुरविण्यासाठीं झटतो, ज्यांच्याजवळ पैसा आहे तेच या व्यवस्थेंत प्रभावी ठरतात. लोकांचें कल्याण हा या व्यवस्थेंतील हेतु नाहीं. ज्या मालाला गिऱ्हाईक आहे व ज्यापासून नफा आहे तो उत्पादन करणें हें यांतील मुख्य सूत्र आहे. यामुळें समाजहिताचे दृष्टीनें या व्यवस्थेंतील उणेपणा स्पष्ट आहे. समाजांतील मागण्या या व्यवस्थेंत पुऱ्या केल्या जात नाहींत व त्याचें कारण समाजांतील मागणी करणारें गिऱ्हाईक ऐपतीचे दृष्टीनें, क्रयशक्तीचे दृष्टीनें सारखें नसतें. जर सर्वांची क्रयशक्ति सारखी असती तर या व्यवस्थेंतही सर्वांच्या मागण्यांना सारखा मान दिला गेला असता. समाजांत आर्थिक विषमतेमुळें गरीब व श्रीमंत असे वर्ग पडले आहेत व श्रीमंतवर्ग आपल्या क्रयशक्तीचे जोरावर सर्व उत्पादनसृष्टीवर प्रभाव चालवितो. या विषमतेचा फायदा सारखा श्रीमंतवर्गालाच मिळत असतो. उत्पादनव्यवस्थेवर या सुखी व संपत्तिमान् वर्गाची पक्कड असल्यामुळें त्यांच्या हिताचे दृष्टीनें, त्यांच्या गरजा भागविण्याचे दृष्टीनें ती काम करीत असते. त्यांच्या गरजा भागविण्यांत तिला जास्त जास्त नफा मिळतो. गरिबांची मागणी क्रयशक्तीचे अभावीं प्रभावी नसते. नफ्याचे दृष्टीनें योजकवर्ग काम करीत असतो. नुकसानासाठीं त्यानें पसारा मांडलेला नसतो. त्याच्या प्रयत्नांचा हेतु उघडपणें नफा असतो. समाजांत निव्वळ पैसे गुंतविणारेही लोक असतात. म्हणजे त्यांच्या पैशांवर

व्याज मिळालें अगर नफा मिळाला म्हणजे झालें, यापलीकडे ते ज्या व्यवहारांत पैसा गुंतविला असेल त्याकडे पाहात नाहींत. कांहीं आपला पैसा ज्या व्यवहारांत अगर धंद्यांत गुंतवितात त्याची व्यवस्था जातीनें पाहातात. हे मालक व व्यवस्थापक दोन्ही भूमिका स्वतःचे ठिकाणीं आणतात. आधुनिक युगांत उत्पादन मोठ्या प्रमाणावर होत आहे. त्यांत यंत्रें अधिक अधिक येत आहेत. साहजिक या परिस्थितींत भांडवल मोठ्या प्रमाणावर लागतें, मग अनेकांकडून तें गोळा करावें लागतें. जे गोळा करतात ते साहजिक महत्त्व पावतात. भांडवल एकाचें, गोळा करणार दुसरा व प्रत्यक्ष त्याचे सहाय्यानें उत्पादनची उभारणी करणारा व त्यावर व्यवस्था पाहाणारा तिसरा अशी वांटणी होते. या वांटणीमुळें मालक व व्यवस्थापक एक हें दृश्य क्वचितच दिसून येतें. या व्यवस्थेत भांडवल उभारणें व त्याची व्यवस्था पाहाणें यांचें महत्त्व वाढतें. हें काम करणारे म्हणजे पैशाचा पुरवठा करणारे ( Financiers ) यांच्या हातांत औद्योगिक क्षेत्रांतील सर्व सत्रें व सर्व चालकत्व जातें व त्यांचा उद्देश कमाल नफा मिळविण्याचा असतो व त्याच दृष्टीनें ते नियंत्रण करीत असतात. योजक केवळ पगारी नोकर, व्यवस्थापक होतो. असें स्वरूप आजच्या उत्पादनव्यवस्थेचें आहे. जो कार्य करतो तो पगारी व्यवस्थापक होतो व जे कार्य करीत नाहींत ते धंद्यांतील सर्व नफ्यावर मालकी सांगतात व तो घेतात. म्हणून त्यांना मिळत असलेला नफा त्यांच्या कार्याचें पारितोषिक होऊं शकत नाहीं. धंद्यांतील या चालकांना धंद्याला आवश्यक असें कांहीं कार्य नसतें कीं, ज्याबद्दल मिळणारा नफा मेहनताना समजतां येईल. त्यांनीं पुरविलेल्या भांडवलावर फक्त बाजारभावानें व्याज घेण्याचा त्यांचा वास्तविक हक्क आहे. मालक व उत्पादनांतील प्रत्यक्ष कार्य यांच्यांत या व्यवस्थेत कांहींही संबंध नसतो व त्यामुळें मजूर व मालक यांच्यांत संघर्ष उत्पन्न होतो. ही पार्श्वभूमि कायम ठेवून समाजहितकारक उत्पादनव्यवस्था निर्माण होणें अशक्य आहे.

उत्पादनावर भांडवलशाहीपद्धतींत वर दर्शविल्याप्रमाणें ज्या वर्गाचें नियंत्रण आहे, ज्या मालकी व्यवस्थेचें नियंत्रण आहे तें केवळ अन्यायाचें आहे. कार्यान्वयें अवश्य तें कार्य ते करतात म्हणून त्यांना हा अधिकार प्राप्त झालेला नाहीं. केवळ संपत्तीचे जोरावर हा अधिकार प्राप्त झालेला आहे व हा अन्याय दूर होणें अत्यंत जरूर आहे. हे नियंत्रण, हा संपत्तीचा अधिकार कसा नष्ट करावा हें त्या त्या समाजांतील, त्या त्या राष्ट्रांतील परिस्थितीवर अवलंबून राहील. फ्रेंच राज्यक्रान्तीनें एका दिवसांत सरंजामशाही नष्ट केली, त्याप्रमाणें क्रांतीच्या मार्गानें हे मालकी हक्क नष्ट होऊं शकतील. सोव्हिएट क्रांतीनें हें घडवून आणलेंही आहे. कोठें क्रांतीचा मार्ग

शक्य आहे तें त्या देशांतील परिस्थितीवरून ठरणार आहे. क्रांति यशस्वी न झाली तर मालकशाही सूड घेईल, विरोधकांचीं पाळेंमुळें खणून काढील हें तितकेंच खरें आहे. विचारविनिमयानें, सामोपचारानें होत असेल तर कोणी नाकारीत नाहीं. तथापि सामोपचाराचें बोलणें म्हणजे संघटनेचा अभाव समजला जातो, तडजोडबुद्धि ही दुर्बलतेचें लक्षण समजलें जातें. बहुसंख्यांक वंचित लोक जेव्हां न्यायबुद्धीला आवाहन करतात, तेव्हां मालकशाही व तिचे पाहारेकरी म्हणजे विद्यमान राज्यसत्ता त्याला राजद्रोह समजतात, समाजाची उलथापालथ करण्याची चिथावणी समजतात व सुव्यवस्थेच्या नांवाखालीं बहुसंख्यांकांना चिरडण्यांत येतें. समजूतदारपणा एकतर्फी असून भागत नाहीं. मर्यादेपलीकडे भांडवलशाही मजुरांना जास्त देऊं शकत नाहीं व अधिकारसंन्यास करण्याचा तिचा स्वभाव नाहीं. असह्य परिस्थिति झाली कीं, जनतेचा असंतोष विद्यमानाच्या मर्यादा तोडतो व आपल्या भवितव्याचें दान क्रांतीचे फाशानें टाकतो. योग्य दान पडलें कीं राज्यसत्तेच्या कटा ताब्यांत घेतो, न पडलें तर तीन तेरा होऊन देशोधडीला लागतो. धोका आहे म्हणून तो पत्करण्याचा हक्क नाहीं असें कोणास म्हणतां येणार नाहीं. सामानें जर यश मिळत नसेल तर न्यायाला समरभूमींत उतरण्याचा पूर्ण हक्क आहे. न्याय मिळावा म्हणून अवश्य पडेल तर जनतेला क्रांतीचा मार्ग स्वीकारण्याचा पूर्ण हक्क आहे. त्यांत अनैतिक अगर असनदशीर असें कांहीं नाहीं. क्रांतीनें यश महाग पडतें, पण कार्य अविलंबें करून होतें असा इतिहासाचा दाखला आहे. हळूहळू कायदे करून नुकसानभरपाई देऊन मालकी हक्क कमी करावेत असेंही सांगणारी विचारसरणी आहे. जेथें जेथें खाजगी भांडवल असेल तेथें तेथें त्यावर ठराविक दरानें व्याज मिळण्याचा फक्त हक्क असावा, उत्पादनावर भांडवलवाल्यांचा ताबा नसावा व त्यांतील नफ्यावरपण त्यांचा हक्क नसावा, या शर्तीवर त्यांना त्यांचे भांडवलावर ठराविक व्याज देण्याची हमी राज्यसत्तेनें घ्यावी असें या विचारसरणींतील मुख्य सूत्र आहे. धंद्यांतील नफा, मग जे यांत काम करणारे आहेत त्यांना व यांत कामगार, व्यवस्थापक, संशोधक सर्व आले, मिळावा. कशा पद्धतीनें हा वांटला जावा हा गौण प्रश्न आहे व शिवाय धंद्यांगणिक त्यांत भेदही होतील. तथापि, या व्यवस्थेमुळें धंद्यांत काम करणारांना धंदा व्यक्तीचे मालकीचा नाहीं, सार्वजनिक मालकीचा भाव त्यांत आहे असें वाटूं लागेल व त्यामुळें जबाबदारीनें व व आपुलकीनें सर्वजण काम करतील. समाजाला या व्यवस्थेंत स्थान देतां येईल. काय उत्पादन करावें याचा विचार करतांना उत्पादकाबरोबर उपभोगी म्हणजे तें उत्पादन विकत घेणारा येऊन, सहकार्यानें निर्णय घेतां येतील. असें झालें म्हणजे समाजाच्या

गरजेचा विचार होईल व समाजहिताचे दृष्टीनें उत्पादन होईल. आजच्या व्यवस्थेंत नफा हाच उत्पादनाचा प्रधान हेतु असल्यानें समाजाच्या हिताकडे दुर्लक्ष होतें. समाजसेवा हा त्याचा हेतु नसतो.

धंद्यांतील भांडवलवाल्यांना त्यांचे भांडवलावर ठराविक व्याज देणें व त्यांचा उत्पादनावरील ताबा उडविणें या व्यवस्थेंत कांहीं साधतें व कांहीं साध्य होत नाहीं. समाजांत श्रमाशिवाय मिळूं नये, कार्य केल्याशिवाय कोणास कांहीं मिळूं नये हें साध्य होत नाहीं. गुंतविलेलें भांडवल श्रमानें मिळविलेलें आहे हें खरें तरी पण श्रम करून मिळविलें व तें गुंतवून निव्वळ राहिलेलें आयुष्य त्यावरील व्याजावर गुजारा करून घालविणें म्हणजे श्रम न करतां जगणें असा त्याचा अर्थ होतो. श्रमाशिवाय संपत्तीचें संपादन नाहीं इतकी व्यवस्था केल्यानंतर श्रम करून मिळवून त्यावर पुढें जन्मभर काम न करतां राहाण्याची सवड ठेवली तर तें तर्काला धरून होणार नाहीं. पण त्यांत व्यवहारीपणा आहे व अगदींच अन्याय नाहीं. सर्वत्रच खाजगी मालकी नाहींशी करून सर्व उत्पादन समाजाचे मालकीचें केलें म्हणजे हा प्रश्न उद्भवणार नाहीं. तेथें भांडवल जमविण्यापासून उत्पादनाची विभागणी करण्यापर्यंत सर्व व्यवस्था समाजामार्फत राज्य करील, कुणालाही शिल्लक टाकण्याइतकें मिळणार नाहीं व त्यामुळें तें गुंतविण्याचा प्रश्नच उपस्थित होणार नाहीं. २५ वर्षांनंतरसुद्धां ही व्यवस्था सोव्हिएटमध्यें झालेली नाहीं. कांहीं तरी विषमता प्राप्तीमध्यें ठेवणें भाग पडलें आहे, कांहीं तरी क्षेत्रांत खाजगी मालकी ठेवणें अपरिहार्य झालें आहे. तिचा व्याप मर्यादित करणें, तिच्या जोरावर कुणालाही कुणावर ताबा सांगतां येणार नाहीं येवढें करणें जरूर आहे व त्याप्रमाणे तेथें होत आहे. हा अनुभव लक्षांत घेतां स्वतः केलेल्या श्रमापासून मिळवून, त्यांतील शिल्लक गुंतवून त्यावरील व्याज त्या व्यक्तीला हयातीपर्यंत मिळाल्यास फारसें बिघडेल अगर अन्यायाचें होईल असें मानण्याचें कारण नाहीं. जें प्रथम मिळवावें लागेल, तें श्रम करून शिवाय त्या व्यक्तीचे पश्चात् तें कोणालाही मिळणार नाहीं. कारण अकष्टार्जित असें संपादन नाहीं. श्रमानें मिळविलेल्या भांडवलाचा मिळविणारांचे हयातीपर्यंतचा व नंतरचा विचार झाला. पण येथपर्यंत वर्णन केलेली व्यवस्था अंमलांत आणतांना ज्यांचें भांडवल स्वकष्टार्जित नाहीं पण सर्वत्र गुंतलेलें आहे त्यांची व्यवस्था काय करावयाची हा महत्त्वाचा प्रश्न आहे. क्रांतीच्या मार्गानें नवनिर्मिति केली तर हा प्रश्न उपस्थित होत नाहीं. तिच्या भूकंपानें खाजगी मालकीची सर्व चिरेबंदी इमारत पायासुद्धां ढासळून पडते. मग हा अस्ताव्यस्त पडलेला मालमसाला कसा वापरावा याचा प्रश्न उरत नाहीं.

परन्तु जो विचार करावयाचा आहे तो नवीन व्यवस्था शांततेनें व समजुतीनें अमलांत आणण्याच्या दृष्टीनें. जे विद्यमान मालक आहेत त्यांच्या पश्चात् संपत्ति त्यांचे वारसाला जाणार नाहीं अगर अन्य कोणालाही त्यांना मृत्युपत्रानें देतां येणार नाहीं. अशा हयातीनंतरच्या व्यवस्थेला फारसा विरोध येणार नाहीं. समाजांत जे आहेत त्यांना कष्टाशिवाय जगण्याचा हक्क नाहीं हें सिद्ध असलें म्हणजे वारसा मिळेल या भरवंशावर कोणी राहाणार नाहींत, प्रत्येकजण स्वतः मिळविले पाहिजे हें उमगून वागूं लागेल. मग जे आज केवळ वडिलोपार्जित भांडवलावर जगत आहेत, त्यांच्या हयातीपर्यंतचाच प्रश्न शिल्लक राहातो. अकष्टार्जित संपत्ति म्हणून राज्यानें ती कांहीं न देतां घ्यावी, का कांहीं देऊन त्यांचे मालकी हक्क उडवावेत हा प्रश्न आहे. संपत्ती बाबत मनुष्याची प्रवृत्ति इतकी तीव्र असते कीं, मरेपर्यंत तो ती सोडण्यास तयार नसतो. इतकेंच काय मेल्यानंतर ती कायम राहावी व आपल्या वारसाकडे राहावी म्हणून तिच्या हयातीनंतरच्या व्यवस्थेवरही हक्क सांगतो ! ! मृत्युपत्र करण्याचा अधिकार याचा अर्थ मेल्यानंतरही संपत्तीवर नियंत्रण करण्याचा हक्क हा आहे. संपत्तीबाबत मनुष्याची भावना लक्षांत घेऊन हा प्रश्न सोडविला पाहिजे. शरिरावर दरवडेखोरानें केलेल्या जखमा मनुष्य विसरतो, पण त्यानें लुबाडून नेलेल्या धनाची आठवण जात नाहीं, त्याचीच त्याला हळहळ वाटत असते. राज्यानें दिलेला देहदंड मनुष्य कालांतरानें विसरतो, पण जप्त केलेल्या संपत्तीबद्दलचा राग कधींही जात नाहीं. या परिस्थितींत कांहींही न देतां मालकांना उखडून काढणें अन्यायाचें ठरणार नाहीं, पण थोडें अव्यवहार्य ठरेल. समजुतीच्या व शांततेच्या वातावरणांत हें व्हावयाचें आहे हें लक्षांत घेतां कांहीं तरी त्यांची व्यवस्था करणे जरूर आहे. अगदीं बाजारभावानें त्यांना नुकसानभरपाई देणें हें चूक आहे. जरी त्यांचे पश्चात् त्यांची संपत्ति त्यांचे वारसाकडे जाणार नसली तरी या प्रमाणावर देणें चूक आहे. मालकांना त्यांच्या हयातीपर्यंत त्यांची व्यक्तिशः परिस्थिति लक्षांत घेऊन योग्य तेवढें सालोसाल द्यावें; त्याजबरोबर जे श्रम करण्याचे वयांत असतील त्यांना श्रम करण्यास सांगून त्याचा मोबदला म्हणून हें मिळावें. अर्थात् हा मोबदला कदाचित् त्यांच्या श्रमाचें मानानें जास्त असेल पण हा अपवाद करण्यास हरकत नाहीं, सर्वसाधारण व्यवस्थेस त्यानें बाध येत नाहीं. याप्रमाणें विद्यमान मालकांची व्यवस्था केल्यास त्यांना विशेष तक्रार करण्यास जागा राहाणार नाहीं. समाजावर थोडा काळ थोडा बोजा बसेल पण अनेक कटकटी त्यानें टळतील हाही कांहीं कमी फायदा नाहीं. समाजांतील हा मौलिक बदल किंबहुना त्याचा पुनर्जन्म अगदींच सुखासुखी होत नाहीं. रक्तदाना-

ऐवजीं हें थोडें द्रव्यदान देऊन मालकी हक्काचे खग्रास ग्रहणांतून जर समाज सुटत असेल तर हा व्यवहार स्वस्तांत पडला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

मालकांचा ताबा याप्रमाणें उडविल्यानंतर उत्पादनाचे व्यवस्थेवर राज्याचें नियंत्रण राहील हें उघड आहे. प्रत्यक्ष व्यवस्थेबाबत जे त्यांत काम करणारे आहेत त्यांच्यावर जबाबदारी टाकण्यांत येईल. प्रत्येक धंद्याचें अनुरूप असें संघटन होईल, यामुळें नोकरशाही बळावणार नाहीं. नोकरशाही म्हणजे विलंब, चिकटपणा, ठराविक साच्यांतून जाण्याची प्रवृत्ति, प्रयोगविन्मुखता, हा अनुभव सर्वत्र आहे. म्हणून सर्व उत्पादनांत सारखें संघटन अगर सर्वत्र एक ठश्याचा कारभार न ठेवतां, धंद्यागणिक एक प्रकारें स्वायत्तता निर्माण करून सर्व उत्पादनाचें संयुक्त पद्धतीनें संघटन करणें जरूर आहे. केंद्रीकरण, योजना आंखण्यापुरतें, सामान्य मार्गदर्शनापुरतें, सामान्य नियंत्रणापुरतें मर्यादित करून साधनसामुग्री, नैसर्गिक सोयी, वाहातुकीची सोय, समाजाची गरज लक्षांत घेऊन उत्पादनासाठीं निरनिराळे प्रादेशिक घटक निर्माण करणें इष्ट ठरेल. योजना केंद्रांत ठरेल, त्याची बजावणी घटक करतील, प्रत्यक्ष व्यवस्था, प्रत्येक कारखान्यांत, उत्पादनक्षेत्रांत, त्यांतील काम करणारे ठरवतील. योजना ठरविण्यापूर्वी खालपासून, अगदीं अखेरचें कारखान्यापासून सल्लामसलत विचारली जाईल, अडचणींचा विचार केला जाईल, अखेरची योजना आपली आहे असें प्रत्येकाला वाटेल. कारण ती लादलेली नाहीं व कोणा व्यक्तीचे हितार्थ नाहीं. शिवाय तिचे अंमलबजावणींत ती पुरी करण्यांत कामगारांचें सहकार्यच मूलभूत आहे. ही नवीन व्यवस्था सुखासुखी समाजांत येणार नाहीं हें उघड आहे. पण त्याजबरोबर विद्यमान व्यवस्था, भांडवलशाही व्यवस्था असह्य झाली आहे हें विसरून चालणार नाहीं. मजुरांचें तींत सहकार्य नाहीं, त्यांच्या सुखाची तेथे पर्वा केली जात नाहीं, व त्यांना तें भेटतही नाहीं. केवळ श्रम विकणारे हेंच त्यांचें स्वरूप असल्यानें त्यांचे मन कामांत असत नाहीं, त्यांना त्यांत उत्साह नाहीं. आपुलकीचा भाव नसल्यानें ते उत्पादनाकडे उदासीन वृत्तीनें पाहातात. प्राप्तीची विषम वांटणी त्यांचे मनावर आघात करीत असते. जादा वेतन, बोनस, व्यवस्थेंतील वाढती कार्यक्षमता या उपायांनीं कांहींही फरक पडत नाहीं. नफ्यांत हिस्सा देऊन मूलभूत फरक होत नाहीं व जेथें हा प्रयोग झाला तेथें असा अनुभवही आला आहे. विद्यमान पद्धत सुवास संपून निर्माल्यावत् झाली आहे येवढेंच नव्हे तर ती सडली असून समाजभर तिची दुर्गंधी सुटली आहे. ती आवश्यक नाहीं हें विचारान्तीं कळून चुकलें आहे. तिच्याशिवाय अधिक चांगली, अधिक न्यायी व्यवस्था असूं शकते हें

सोव्हिएट रशियानें अनुभवानें प्रत्यक्ष दाखविलें आहे. ती अपरिहार्य आहे हें असत्य हें वाढत्या ज्ञानानें बहुजन समाजाला पटलें आहे. तींत वरवर सुधारणा करून सुखाची न्याय्य वांटणी होत नाहीं हा अनुभव सर्वत्र आला आहे. ती आमूलाग्र बदलली पाहिजे हा सिद्धान्त झाला आहे व त्याच दृष्टीनें प्रयत्नांची पावलें संघटित मजुरांचीं पडत आहेत. त्यांची चाहूल मालकांना लागली असून शक्य तेथें मालकी हक्काचा किल्ला लढविण्याचे दृष्टीनें त्यांची तटबंदी चालू आहे. कोठें फॅसिस्ट पथकें उभारलीं जातील, कोठें राष्ट्रीय सरकार स्थापन केलें जाईल, कोठें कोर्टमार्फत मजुरांसाठीं केलेले कायदे असनदशीर ठरविले जातील; तथापि कांहीं केलें तरी भवितव्यता टळ-णार नाहीं. कुठल्याही संजीवनीनें हें मढें आतां जिवंत होणार नाहीं. नवनिर्मिति अनिवार्य आहे. जुन्याला शरण किंवा मरण याशिवाय विकल्प नाहीं. दोन्हींतही कष्ट आहेत, दोन्हींतहि स्वत्त्वनिवृत्ति आहे. होणार तें आकर्षक, आल्हादकारक आहे, त्याची ओढ समाजाला लागली आहे. हा प्रवास शक्य तर फरफटत, ठेंचाळत न व्हावा म्हणून इच्छा असणें साहजिक आहे. तथापि, नवनिर्मितींतील वेदना, त्यांतील आनंद व मांगल्य यांकडे लक्ष देऊन समाज सहन करतो. किंबहुना या वेदना अ-परिहार्य आहेत हेंही तो जाणतो.

नव्या व्यवस्थेचें, नवनिर्मितीचें स्वरूप कसें असावें याचें दिग्दर्शन येथपर्यंत केलें आहे. ज्या भावना व जे विचार भांडवलशाही व्यवस्थेचे मुळाशीं होते व ज्यांमुळें कांहीं काळ ती यशस्वी झाली ते आतां राहिले नाहींत. व्यक्तिस्वातंत्र्यवादाची नैतिक प्रतिष्ठा कमी झाली आहे. भांडवलशाहीमुळें समाजाला प्रगति लाभली व पुढें लाभेल हें मानण्याइतकें जग आतां अज्ञानी राहिलें नाहीं. भांडवलशाही गेली तर अनर्थ ही भीति राहिली नाहीं. भीतीवर आधारून कांहींही कायम होत नाहीं. राज्य अगर समाजव्यवस्थाही भीतीवर आधारून कायम राहात नाहीं. संपत्ति व निष्ठा हे खरे आधार आहेत व हें लक्षांत घेऊन नवीन व्यवस्थेचें स्वरूपदिग्दर्शन केलें आहे. व्यक्तीचे सुखाबद्दलची काळजी हा तर तिचा पाया आहे. तींत नफ्यासाठीं उत्पादन याचें उच्चाटन झालेलें आहे, खाजगी नफ्याला तेथें स्थान नाहीं. कोणी विशेष जास्त मिळवील व सांठवील हें अशक्य केलें आहे. श्रमाशिवाय कोणाला मिळण्याचा हक्क नाहीं व जगण्याचाही हक्क नाहीं हा तर तिचा जीवनसिद्धांत आहे. एवंगुणविशिष्ट व्यवस्था आदर्श व वास्तवता यांचा प्रभावी समन्वय आहे. या व्यवस्थेला मान्यता मिळण्यास अडचण नसावी. मजुरांना योग्य वेतन मिळून उत्पादनांत मानाचें व मालकीचें स्थान यांत आहे. उद्योगधंदे श्रम न करणाऱ्या मालकीचे गुलाम

नाहींत. त्यामुळें समाजांत न्यायाचें वातावरण उत्पन्न होईल. ऐतखाऊ कोणीही राहणार नाहीं. याचा परिणाम चांगलाच होईल. श्रमाला किंमत आल्यानें ते जास्त प्रसन्न व प्रभावी होतील. अन्यायानें वांटणी नसल्यानें अधिक श्रम करून अधिक मिळूं शकतें हा विश्वास असल्यानें आजच्या विषमतेच्या वातावरणांतील उदासीनता व उद्विग्नता नाहींशी होऊन कामगार मोकळ्या व आनंदी मनानें काम करतील. समाजांत उत्पादन प्रमाणानें व प्रकारानें वाढेल. या व्यवस्थेंत आपण बळेंच गुरफटलेले आहोंत असें कामगारांना वाटण्याचें कारण नाहीं. त्यांच्या सहकार्यानें व सल्लामसलतीनें उत्पादन होत असल्यामुळें त्यांची निष्ठा, त्यांचा नैतिक पाठिंबा हें त्याचें चैतन्य आहे व हें कायम राखण्याची सारखी प्रयत्नपरंपरा पण चालू राहील. मोठमोठ्या कारखान्यांतून काम करणारांचें व्यक्तित्व मारलें जातें. ते निव्वळ यंत्रें होतात, या आक्षेपांत तथ्य आहे. परन्तु त्याला उपाय म्हणजे सर्व कारखाने, सर्व गिरण्या मोडून सर्वत्र ग्रामोद्योग सुरू करणें हा नाहीं. ग्रामोद्योगानें यंत्रयुगापूर्वीची कारागिरी सुरू केली म्हणजे सर्वत्र सुख व समाधान अवतरेल अगर कला नैपुण्य वाढेल हें खरें नाहीं. त्या योगानें उत्पादन नक्की कमी होईल. काम करणारांना विशेष मानसिक समाधान लाभेल, त्यांच्या व्यक्तिविशेषाला, वाव मिळेल याची खात्री नाहीं. कलाविकासाला व व्यक्तिविकासाला अनुकूल वातावरण असावें लागतें व तें वातावरण उत्पन्न करणें शक्य आहे. आज कांहीं गरजा अपरिहार्य व अवश्य झाल्या आहेत. त्यांचा पुरवठा करणें झाल्यास यांत्रिक उत्पादन हें टाकून चालणार नाहीं. या उत्पादनांतच अनुकूल वातावरण उत्पन्न करतां येईल.

मानसिक प्रसन्नता व अनुकूल आणि अनुरूप माध्यम असलें म्हणजे कलानिर्मिति होते, गुणविकास होतो. न्याय्य व योग्य मोबदलाव्यवस्थेनें मानसिक प्रसन्नता येण्याला खास मदत होईल. योग्य शिक्षणानें करीत असलेल्या कामाचें रहस्य मनुष्याला समजतें व तो कामाचे आहारीं न जातां तो आपल्या श्रमांना, आपल्या कार्याला आयुष्यांत योग्य तें स्थान देतो. गुरें वळणें व मुलें वळणें हें सारखें न समजतां विवेकी शिक्षक आपल्यावर भावी नागरिक तयार करण्याची जबाबदारी आहे असें समजतो. देशाचे भवितव्यतेला वळण देण्याची संधि आपणास आहे या जाणिवेनें व अभिमानानें त्याच्या कार्यांत त्याचे गुणविशेष विकसित होतात. ज्ञानानें कार्याचें सामाजिक स्थान कळतें, म्हणजे समाजहित, समाजसेवाभाव कर्त्याचे मनाला उन्नत करीत असतात, त्याच्या अनुरूप गुणांना हलुवारपणें आवाहन करीत असतात. कामगारांना योग्य शिक्षण मिळालें म्हणजे करीत असलेलें कार्य यांत श्रमापेक्षां कांहीं तरी

अधिक आहे असें त्यांना खास वाटेल. आजचे उत्पादनव्यवस्थेंत योग्य विश्रांति कामगारांना मिळत नाहीं. काम अधिक करावें लागतें. तेंच तें काम करून श्रमांबरोबर कंटाळाही अधिक येतो. गर्दीत व गडबडींत काम करावें लागतें यामुळें मानसिक ताण व त्रास अधिक पडतो व अधिक थकवा येऊन त्याचें मन हतबल होतें, उदासीन होतें. नवीन व्यवस्थेंत योग्य विश्रांति मिळणें हा कामगारांचा हक्क मौलिक मानला आहे. उत्पादनाची, कारखान्याची मांडणी योग्य प्रकारें करून गर्दी व गडबड घालविणें शक्य आहे. एका ठिकाणीं काम करणाऱ्यांचें प्रमाण आटोपशीर ठेवलें म्हणजे परस्परांचा परिचय अधिक होईल. त्यांच्यांत एकतेचें वातावरण निर्माण होईल. या योगानें कामही चांगलें होईल. १०० माणसांचे डब्यांत बसून प्रवास करण्यापेक्षां आटोपशीर १० माणसांचे कंपार्टमेंटमध्यें बसून प्रवास करणें माणसाला साहजिक आवडतें व तो प्रवास अधिक सुखकर होतो. परिचयाला आटोपशीर प्रमाण चांगलें, सामुदायिक भावही तेथें लौकरच निर्माण होतो. याच तत्त्वावर सैन्याची रचना केली जाते. आधुनिक शिक्षणशास्त्राप्रमाणें विद्यार्थ्यांचे वर्ग आटोपशीर असावेत यांतील रहस्य तरी हेंच आहे. 'अभ्यासवर्तुळें' काढण्यामागील तत्त्वज्ञान याच स्वरूपाचें आहे. संख्या आटोपशीर असली म्हणजे संघशक्ति अधिक प्रभावी असते व आपुलकी अधिक वाढते. आज कोणी कामगार कारखान्याकडे प्रेमानें, अभिमानानें पाहात नाहीं. 'हा माझा कारखाना' असें न म्हणतां 'येथें आम्ही पोट जाळतों' 'येथें मरतों' हीच भाषा ऐकूं येते. खाजगी मालकी नाहीं. योग्य मोबदला, पुरेशी विश्रांति, प्रत्यक्ष काम करण्याची जागा आटोपशीर व आरोग्यपूर्ण, सहकारी कामगार परिचयाचे, इतकें झाल्यानंतर अवश्य ती मानसिक प्रसन्नता व अवश्य तें अनुकूल वातावरण व्यक्तिविकासाला, गुणविकासाला उपलब्ध झाल्यावांचून राहाणार नाहीं. व्यवस्थेंत कामगारांना स्थान असल्यामुळें आपलेंच कार्य आहे असें त्यांना वाटेल. अधिक श्रम करून, अधिक काम करून अधिक मिळविणें हें सर्वांना शक्य असल्यामुळें कांहीं तरी विशेष करून दाखवावें अशी प्रेरणा होईल. गुणाला प्रतिबंध नाहीं हा विश्वास असला म्हणजेच त्यांचा विकास होतो. सर्वांना सारखा न्याय मिळेल असा अनुभव असला म्हणजे प्रत्येकाला न्यायानें वागावें असें वाटतें. न्याय मिळेल, गुणाला प्रतिबंध नाहीं, येवढेंच नव्हे तर प्रयत्नानें उच्चतम स्थानसुद्धां प्राप्त करून घेणें शक्य आहे हा विश्वास असला म्हणजे कर्तृत्व उफाळतें. अवश्य त्या गरजा भागतील येवढें वेतन तर निश्चित मिळणार असल्यानें कामगाराला पोटासाठीं स्वाभिमान सोडण्याचें कारण पडणार नाहीं, कर्तृत्वासाठीं प्रयत्न व अभि-

मान त्याजवळ भरपूर शिल्लक राहील. शिक्षण व विश्रांतीमुळें व सर्वत्र समतेचें वातावरण निर्माण झाल्यामुळें एक नवी प्रतिष्ठा तो स्वत:चे जीवनांत निर्माण करूं शकेल, आयुष्यांत विधायक कर्तृत्वाचें मांगल्य त्याला आणतां येईल. भांडवलशाही व्यवस्थेंत, आजच्या विद्यमान व्यवस्थेंत हें कांहींही त्याला शक्य नाहीं. त्याच्या मानव्याचा सन्मान राखण्याइतकीसुद्धां व्यवस्था आज नाहीं. समाजाबद्दल आपलेपणा वाटावा अशी आज त्याची स्थिति नाहीं. नवीन व्यवस्थेंत त्याचें व समाजाचें मौलिक ऐक्य पुन्हां खरेंखुरें प्रस्थापित होतें, समाजांत त्याला स्थान प्राप्त होतें. आज जसा एखादा प्राध्यापक पाहुण्याला अभिमानानें आपली शिक्षणसंस्था दाखवितो, एखादा सैनिक आपल्या पलटणीचा गौरव जसा खुलवून सांगतो, त्याचप्रमाणें नवीन व्यवस्थेंत कामगार 'हा आमचा कारखाना; यांत आम्ही अशी व्यवस्था केली आहे,' हें स्वाभिमानानें व कर्तृत्वाचें जाणिवेनें सांगेल; कारण कारखाना व कामगार हे येथें एकजीव झालेले असणार.

येथपर्यंत जो विचार केला तो प्रामुख्यें करून जे शारीरिक श्रम करणारे आहेत त्यांच्या दृष्टीनें. तथापि, आमूलाग्र मनुष्यस्वभाव बदलला आहे हें गृहीत धरून विचार केलेला नाहीं. मनुष्यस्वभावांतील विशेष गोष्टी लक्षांत घेऊन, त्यांचें महत्त्व जाणून हा विचार केला आहे. म्हणून ही व्यवस्था बौद्धिक श्रम करणाऱ्यांनासुद्धां अमान्य होण्याचें कारण नाहीं. त्यांचा स्वाभिमान यांत दुखविला जात नाहीं. उलट आज 'कारकुंडे' म्हणून त्यांचा अपमानच होतो. 'व्ह. फा.' म्हणून त्यांना हिणविलें जातें. त्यांना मिळणारें वेतन हुशार कारागिरापेक्षां जास्त नसतें. सामाजिक राहाणी त्यांची खर्चाची असते व प्राप्ति बेताची असते व त्याचा परिणाम ते सदैव कष्टी व सचिंत असतात. कुठल्या तरी पतपेढीचे अगर सावकाराचे देणेदार ते बहुश: असतातच. प्रत्यक्ष कामाचें स्वरूप पाहिलें म्हणजे आज कारकून म्हणजे हरकाम्या असा अर्थ झाला आहे. मालकानें सांगावें व यानें निमूटपणें ऐकावें हा अनुभव सार्वत्रिक आहे. कारखान्यांतील मजुरांना अन्य काम सांगितलें जात नाहीं व कारकुनांना वाटेल तें काम केल्यावांचून भागत नाहीं. न केलें तर बडतर्फी, एक गेला तर ५६ मिळतात व तेही कमी पगारावर व वाटेल तें काम करण्यास तयार. त्यांच्या जीवनांतील लाचारीला मर्यादा नाहीं. कारकून व स्वाभिमान हें आजच्या जमान्यांत दुर्मिळ दृश्य आहे. लायकी नसतां नात्यानें व वशिल्यानें नेमणुका व बढती त्यांना स्थितप्रज्ञता ठेवून पाहावीं लागतात. संघ काढून मालकशाहीविरुद्ध तोंडसुख घेण्याचेंसुद्धां धैर्य त्यांच्यांत नसतें. पांढरपेशांची फक्त प्रतिष्ठा त्यांना लाभते, प्राप्ति मात्र नाहीं.

वास्तविक त्यांचें स्थान श्रमजीवी जनतेंत आहे व त्यांच्यांत उघड येण्यानें पोकळ प्रतिष्ठा फक्त जाईल, पण स्वाभिमान, संघशक्ति, दिलदारपणा ही भरीव प्राप्ति होईल. परिग्रही समाजांत त्यांचें जें स्थान कार्यान्वयें आहे तें कार्यनिष्ठ समाजांत, श्रमजीवी व्यवस्थेंत बदलणार नाहीं. नव्या व्यवस्थेंतही त्यांना कार्य करून राहातां येईल. पूर्वी मालकासाठीं, मालकाचे अनुरोधानें ते करीत, तर आतां समाजासाठी, नव्या तत्त्वांचे अनुरोधानें त्यांना करावें लागेल. पूर्वी त्यांचा विचार न घेतां हुकूम मिळत व तेही कुणाचा विचार न घेतां हुकूम देत. आतां दोन्ही बाबतींत त्यांचा सल्ला घेतला जाईल व त्यांना सल्ला घ्यावा लागेल. विचारविनिमयानें व सहकार्यानें व्यवस्था होत असल्यामुळें त्यांचें स्थान मानाचें राहील. प्राप्ति कार्य व लायकी यांचे-वर अवलंबून राहील व त्यांत अन्याय होणार नाहीं. शिवाय मालकाच्या लहरीची तलवार त्यांचे डोक्यावर लटकत राहाणार नाहीं. नोकरींत स्थैर्य येईल. त्यांना व्यव-स्थेंत स्थान आहे म्हणून कामांत आपुलकी वाटेल. स्वातंत्र्याचें वातावरण तेथें निर्माण होईल. समाजाची सेवा व सोय हा हेतु उत्पादनाचा असल्यामुळें त्याचाही परिणाम या बौद्धिक श्रम करणाऱ्यांवर चांगला होईल. समाजाचे सेवेंत मिळणारा सन्मान हा अनेकांना प्रयत्न करण्यास प्रेरणा देत असतो. कांहीं उदार आत्मे समाजसेवेसाठीं वाटेल तें निष्काम बुद्धीनें करतात. कांहींच्या कर्तृत्वाची फणा केवळ प्राप्तीच्या पुंगी-नेंच उभारते, पण कांहींचे प्रयत्न जनसेवेच्या आनंदांत डुलत असतात. समाजांतील लोभाचें उच्चाटन कोणी करूं शकत नाहीं. मनुष्याचे षड्विकार प्रबल आहेत. प्रत्यक्ष शंकरानें काम जाळला पण तो अनंग होऊन अमर झाला !! जेथें देव थकले तेथें मानव व मानवी संस्था किती पुऱ्या पडणार! तथापि, निर्लोभी प्रयत्नांना सामा-जिक सन्मानतेचें आधिक अधिक फल देऊन समाजांतील अनगड लोभ कमी करतां येईल. आजही लाखों लोक उदात्त भावनेनेंच ध्येयासाठीं मृत्यूचें मोल देत आहेत, हा अनुभव मनुष्याचे सत्प्रवृत्तीवर विश्वास वाढविणारा आहे व याच विश्वासावर नवी व्यवस्था आधारलेली आहे.

आजची समाजव्यवस्था ही कार्यनिष्ठ ( Functional ) नाहीं. समाजाचें कांहीं ऋण श्रम करून फेडावें अशी सक्ति नाहीं. हिंदुधर्मांतील वर्णव्यवस्था कार्य-निष्ठ होती. कार्यपरत्वें प्रत्येकाला स्थान होतें व सर्व समाज त्यावर आधारलेला होता. संपत्तीप्रमाणें कार्यही वारशानें, जन्मानें जाई. यामुळेंच तो जातिनिष्ठ झाला, परंपरा-निष्ठ झाला, व त्याचा परिणाम तो प्रगतिविन्मुख व परतंत्र झाला. समाजांत कोणीं कोणाची सेवा मालकी हक्कानें घेतली म्हणजे ती गुलामगिरीच होय. पिढ्यानुपिढ्या

ठराविक मार्गानें जाऊन अन्य मार्ग स्वीकारल्यास अधर्म ही भीति उत्पन्न करून विद्यमान हें दैवायत्त व अनिवार्य हा सिद्धान्त प्रचलित करण्यांत आला. संपत्तीचे विषम वांटणीनें जे अन्याय व अडथळे उत्पन्न होतात, त्यांत जातिनिष्ठ समाजव्यवस्थेनें येथें अधिक भर पडली. वर्णाश्रम व्यवस्थेविरुद्ध ब्र काढणें हा अधर्म, हें पाखंड आहे असें अजूनही मानण्यांत येतें. परिग्रही समाजातील संपत्तीचे मालकीबद्दल अवाक्षर काढणें म्हणजे समाज उलथून पाडण्याचा प्रयत्न करणें समजलें जातें. जे यशस्वी होत नाहींत, ज्यांच्यांत कर्तृत्व नाहीं पण महत्त्वाकांक्षा आहे, त्यांचा मत्सर समानप्राप्तीचा पुरस्कार करीत असतो असा आक्षेप घेण्यांत येतो. संपत्तीवर नियंत्रण घालणें, तिचे स्वामित्वावर नियंत्रण घालणें हें चूक आहे. कारण त्यापासून अव्यवस्था माजेल अशी भीति सर्व परिग्रही समाजांत उत्पन्न होणें अगदीं साहजिक आहे. संपत्तीची व प्राप्तीची समान वांटणी करणें व्यर्थ आहे, त्यापासून सर्वजण सुखी होणार नाहींत असे आंकडे देऊन व आकांडतांडव करूनही कांहीं ठिकाणीं सांगितलें जातें. परिग्रहव्यवस्था समाजांत नसेल, कर्तृत्वानें जें मिळेल त्यावर जर व्यक्तीचें स्वामित्व राहाणार नसेल तर प्रयत्नांना चालना राहाणार नाहीं, पराक्रमाला प्रेरणा राहाणार नाहीं असा धाक घालण्यांत येतो. शिवाय असें करणें म्हणजे मनुष्यस्वभाव लक्षांत न घेतां कांहीं तरी एकांगी वागणें आहे अशी टीका होते. वास्तविक संपत्ति व स्वामित्व ह्या कांहीं निरपेक्ष, निराकार दिक्कालातीत वस्तु नाहींत. युगायुगांचे ठायीं त्यांचें स्वरूप व तद्विषयक कल्पना बदलत आल्या आहेत. गुलाम मनुष्य खरा, पण वस्तूप्रमाणें त्यावर मालकाची मालकी ही व्यवस्था एके काळीं समाजांत होती. ज्यावर पूर्वी मालकी होती तेच आज मालक झाले आहेत. हा फरक लक्षांत घेण्यासारखा आहे. कालच्या संपत्तीच्या कल्पना आज नाहींत, आजच्या उद्यां राहाणार नाहींत. सामाजिक व राजकीय संस्था या संपत्ति व स्वामित्व यांना जन्म देत असतात. त्याच त्यांचें पोषण करतात. सामाजिक व राजकीय संस्था बदलल्या, त्यांचे हेतु बदलले, त्यांचें कार्य बदललें तरी संपत्तिविषयक कल्पना अचल अगर अमर राहाव्यात असें म्हणणें गैर ठरेल. संपत्ति ही समाजानें जन्म दिलेली, समाजानें मानलेली आहे म्हणून आहे. ती एक सामाजिक वस्तुस्थिति आहे. माझी मिळकत मी माझी मानली तरी समाजानें ती माझी मानली तरच ती आहे. माझ्या मालकीची कल्पना व वस्तुस्थिति याप्रमाणें केवळ सामाजिक आहे, समाजमान्यतेवर तिचें अस्तित्व अवलंबून आहे. सामाजिक वस्तुस्थिति ही नेहमीं बदलत असते हा तिचा स्वभावधर्म आहे, म्हणून तींत बदल व्हावा हें म्हणण्यांत मनुष्यस्वभावाविरुद्ध कांहीं नाहीं,

इतिहासाला सोडून सांगितलें जातें असेंही नाहीं. बदललेल्या परिस्थितीला अनुरूप असा बदल संपत्तिविषयक कल्पनेंत व्हावा येवढीच अपेक्षा सांगणाराची असते.

हा बदल किती अवश्य आहे हें विद्यमान व्यवस्था किती अपुरी व किती अन्यायाची आहे हें पाहिलें म्हणजे सहज पटतें. आजची भांडवलशाहीव्यवस्था भीतीवर आधारलेली असल्यामुळें मनाचा मोकळेपणा कामगारांत राहात नाहीं व त्यांचें आयुष्य त्यांना विफल वाटतें, व्यर्थ वाटतें. प्राप्तीची विषम वांटणी होत असल्या-मुळें श्रमांना योग्य तें मिळत नाहीं. कांहींना श्रम न करतां प्राप्ति होऊन ते समाजा-वर प्रभुत्व गाजवितात. सुखाची वांटणी विषम होऊन कांहीं चैनींत तर कांहींना खाण्याची भ्रान्त अशी परिस्थिति उत्पन्न होते. जगण्याला अवश्य येवढेंसुद्धां होत असलेल्या वांटणीमुळें अनेकांना मिळत नाहीं. सर्व दृष्टीनें विद्यमान व्यवस्था अपुरी व अन्यायाची आहे. तिजबद्दल कोणालाही आतां प्रेम राहिलें नाहीं. 'भांडवलशाहीचा नाश होवो' हा आवाज सर्व देशांतील बहुसंख्यांक वंचित समाज सारखा काढीत आहे. या परिस्थितींत संपत्तीचे व स्वामित्वाचे कल्पनेंत आमूलाग्र बदल होणें व घडवून आणणें इष्ट आहे, नव्हे अपरिहार्य आहे. खाजगी मालकी यापुढें समाज धारणेचा धर्म राहूं शकत नाहीं. ती समाजाची धारणा करण्याऐवजी समाजाचे तुकडे करीत आहे. जी मौलिक एकता व्यक्ति व समाज यांत पाहिजे ती खाजगी मालकीनें नष्ट केली आहे. तिनें समाजाचें संघटन न होतां विघटन होत आहे, नाश होत आहे. समाजधारणेसाठीं नव्या धर्माची आवश्यकता आहे. नवीं दैवतें आज पाहिजे आहेत, कारण जुनीं निष्फल ठरलीं आहेत; नवे मंत्र पाहिजे आहेत, कारण जुने स्फूर्ति देऊं शकत नाहींत. नवी मूल्यें पाहिजे आहेत, कारण जुन्यांची किंमत शून्य झाली आहे. नव्या धर्मांत शास्त्र व श्रम हे जनतेचे श्रेयस् व प्रेयस् हित साध-णारे ठरणार आहेत. यत्नदेव, श्रमदेव हें नवीन दैवत आहे. ' कष्टेंविण दरिद्रता ' ही नवी घोषणा आहे. श्रम व आराम यांत आतां कार्यकारण भाव आहे. सुख हें सर्वांचें साध्य पण श्रम ही त्याची साधना हा नवा संकल्प आहे. काय आहे, किती आहे हें पाहून माणसाची योग्यता आतां मोजली जाणार नाहीं; काय कार्य केलें यानें ती मोजली जाईल. जें जो मिळवील तें तो स्वश्रमानें व त्यांत त्याचे कर्तृत्वाचा परिमल असेल, त्याचे गुणाची ती साक्ष असेल, समाजाला कांहीं देऊनच मग त्यानें कांहीं घेतलें याची त्यांत ग्वाही असेल. जें मिळेल तें जीवनविकासाला कधींच कमी पडणार नाहीं. जें अधिक कोठें मिळेल तें इतकें थोडें असेल कीं, त्यानें कोणावर प्रभाव टाकतां येणार नाहीं. जें मिळेल तें शोभा म्हणून कोणी मिरविणार नाहीं तर

त्याचा सदुपयोग होईल. समाज व व्यक्ति हे एका महान् कार्यांत सहभागी आहेत, हा भाव उत्पन्न होऊन मौलिक एकता पुन्हा प्रस्थापित होईल. सामाजिक व्यवहारांत कार्यावर प्रतिष्ठा आधारलेली असल्यानें गुणांनाच पूजास्थान मिळेल. आजचा संघर्ष लुप्त होऊन सहकार्याचें स्वरसंमेलन समाजाचे जीवन संगीतांत ऐकूं येईल. विविध-तेला विधायक क्षेत्र मिळेल. मनुष्य, मनुष्य म्हणून मान्यता पावेल. कोणी कुणाचे आश्रयाखालीं राहाणार नाहीं. मन मारणारा मिंधेपणा समाजांतून हद्दपार होईल. विचार, विवेक वाढेल, पण त्यानें निष्क्रियता वाढणार नाहीं. प्राप्ति ही श्रमाची पुण्याई असल्यामुळें दारिद्य हें कष्टविन्मुखतेचें पाप ठरेल. यत्न हा देव व श्रमणें हा धर्म या योगानें नवीन अध्यात्मभाव उत्पन्न होईल. जीवनाचें व्याकरण नियम-बद्ध होवून सकर्मक कर्तरी प्रयोगाचें महत्त्व सर्वांना पटेल. आर्ष प्रयोगाचे नांवा-खालीं कोणी अपवादभूत संपत्तीचें समर्थन करूं शकणार नाहीं. ज्ञानयुक्त सेवाप्रधान कर्मयोग, श्रमयोग ही समाजगीता होईल. समाजहिताबद्दल अमर्याद आसक्ति व व्यक्तींचे आसक्तीला मर्यादा राहून उभयतांचें कल्याण करणारा नवा अनासक्तियोग प्रभावी ठरेल. सर्व सारखे म्हणून सर्व सुखी व म्हणून सर्व एकमेकांचें कल्याण इच्छि-तील. एवंगुणविशिष्ट समाज होण्यासाठी कोण विरोध करील ? ज्यांच्या जवळ नाहीं त्यांचें दारिद्य व दुःखच जाणार आहे; ज्यांच्या जवळ आहे त्यांचा तो डोक्यावरील बोजा गेल्यानें मनांतील भीतीच जाणार आहे व दोघांनाही पुरेसें मिळून त्यांत स्थैर्य व न्याय राहून संरक्षण मिळेल.

---

# : राज्य, राष्ट्र व जग :

कुठल्याही विषयाचा विचार दोन दृष्टींनीं होत असतो. एक तत्संबंधींचें शास्त्र व एक तत्संबंधींचा व्यवहार. राजकारणाचाही विचार दोन दृष्टींनीं करणें जरूर आहे. व त्याप्रमाणें आधुनिक राजकारणावर विचार करणारांनीं केला आहे. राजकारणांतील मीमांसक अगर शास्त्रीय बाजूचा ज्यांत विचार होतो त्याला जर राज्यशास्त्र म्हटलें तर प्रत्यक्ष राज्यसंघटन, राज्याचीं कार्यें, त्यांतील संस्था यांचा विचार ज्यांत होईल त्याला राज्यव्यवहार–विचार अगर राज्यव्यवहार–स्मृति म्हणणें योग्य होईल. राज्यशास्त्रांत राज्याची उत्पत्ति, ऐतिहासिक व तात्त्विक यांचा विचार होईल. प्रभुत्व व त्याचें स्वरूप कसें असावें यांची चिकित्सा होईल. राज्याचें संघटन-स्वरूप कसें असावें व कोणत्या संघटनांत प्रभुत्वाचें अधिष्ठान कोठें असतें, राज्य-संघटनेचा हेतु काय असावा, त्या दृष्टीनें अवश्य अशी हक्कव्यवस्था काय असावी व कशी असावी, प्रभुत्वाची मर्यादा, स्वातंत्र्य व समता हे सर्व प्रश्न राज्यशास्त्रानें चर्चिले पाहिजेत. कायदे कशासाठीं, त्यांना कोणीं मान्यता द्यावी, त्यांचा व नीतीचा संबंध, न्यायदानाचीं तत्त्वें यांचाही समावेश राज्यशास्त्रांतच झाला पाहिजे. विद्यमान राज्यें, विद्यमान राज्यव्यवस्थेचे नमुने, संयुक्त अगर एकमुखी राज्यें, घटनात्मक प्रश्न व परंपरा, राज्य करीत असलेलीं कार्यें संरक्षणात्मक व संवर्धक, विधिमंडळें व त्यांतील कार्यपद्धति, न्यायदानाची व्यवस्था, कार्यकारी व्यवस्था व तत्सम प्रश्नांची चर्चा राज्यव्यवहार विचारांत घेतो. राज्यशास्त्र तात्त्विक दृष्टीनें विचार करतें, तें करतांना विद्यमान संस्था व संघटना यांची चिकित्सा करील; त्यांचें पृथक्करण करून त्यामागें लपलेले भाव स्पष्ट करील, त्याचप्रमाणें इतिहासांत जमा झालेल्या घटना त्यांची तपासणी करील, त्यांची दखल घेईल. आजच्या संस्था या कांहीं एकदम उत्पन्न झाल्या नाहींत. त्यांतून जशा उद्यांच्या उत्पन्न होणार आहेत त्याच न्यायानें काल-च्यांतून आजच्या उत्पन्न झाल्या आहेत हेंही स्पष्ट आहे, याची दखल राज्यशास्त्र घेतें. राज्यशास्त्र हें सामाजिक शास्त्र असल्यामुळें त्यांत आग्रहीपणाला जागा नाहीं. झालेल्या

घटना, आलेले अनुभव, यांच्यांत तुलना करून, समालोचन करून कांहीं कार्य-कारणभाव शोधून, त्यांचा पडताळा घेऊन, राज्यशास्त्र कांहीं सिद्धांत काढीत असतें. विद्यमान शासनामध्यें या सिद्धांताचा आविष्कार किती झाला, कसा झाला हा राज्य-व्यवहारविचार पाहातो. राज्याचे अंतर्गत स्वरूपासंबंधीं जसे राज्यशास्त्रानें सिद्धांत काढले आहेत व ते काढावे हें जसें त्याचे विचारक्षेत्रांत येतें तसेंच राज्याराज्यांतील संबंधांत झालेले व होत असलेले व्यवहार व घटना यांचा विचार करून त्यांबाबत कांहीं सिद्धांत काढणें, त्यांचा विचार करणें हेंही त्याचे क्षेत्रांत येतें. राज्यांतील अंतर्गत संघटन कसें असावें याचा विचार तें जसें करतें त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय संघटन कसें असावें याचाही विचार करतें. राज्यशास्त्र व्यक्तीपासून जगापर्यंत मनुष्यामनुष्यांत, त्यांच्या समूहासमूहांत होणाऱ्या व्यवहारांचा सिद्धांतिक दृष्टीनें विचार करतें.

आतांपर्यंतच्या लिखाणांत अंतर्गत दृष्टीनें राज्याचा विचार केला आहे. राज्य कसें व कसकसें अस्तित्वांत आलें अगर आलेलें असावें याबद्दल नाना मतें आहेत. राज्याचा आंतरराष्ट्रीय दृष्टीनें विचार करावयाचा तर या मतांचा थोडा परामर्श घेणें जरूर आहे. मानवसमाज कसा निर्माण झाला व त्यांत राजकीय भाव कसा निर्माण झाला हें विस्तारानें सांगण्याचा उद्देश नाहीं. प्रत्यक्ष जगाचे सुरवातीस काय घडलें याची नोंद नाहीं. जेथपासून नोंद आहे तेथपासून समाज ही संस्था आधींच अस्तित्वांत आलेली दिसते. कसें घडून आलेलें असावें याबाबत अनेक तर्क आहेत. कसें असावें याबद्दलही प्राचीन काळापासून अनेक आदर्श विचार-वंतांनीं समाजापुढें ठेवलेले आहेत. ॲरिस्टॉटल याचे मतें राज्य म्हणजे समाज. समाजाचे, व्यक्तीचे हितार्थ समाज आहे. व्यापक हिताचे दृष्टीनें विचार करणारा समाज म्हणजे राज्य. मनुष्यप्राणि एकाकी नाहीं व एकटा राहूं शकत नाहीं. संगति व सहवास हा त्याचा स्वभाव आहे. स्त्रीपुरुषसंयोग हा जीवनाचा आधार आहे. ती त्यांची प्रवृत्ति आहे. हे दोन एके ठिकाणीं आले म्हणजेच समाजाचे आयुष्यास सुरवात झाली. दोन माणसें एके ठिकाणीं आलीं म्हणजे कुणी तरी कोणाचें तरी ऐकलें पाहिजे, म्हणजे राज्याचे आयुष्यास सुरवास झाली. कुटुंबांत, कुटुंबसंस्थेंत बापाचा अधिकार, जमातींत, टोळींत पुढाऱ्याचा अधिकार, राज्यांत एकाचा अगर अनेकांचा अधिकार याप्रमाणें झालें. आज्ञा व आज्ञापालन ही व्यवस्था समाजाचे संरक्षणासाठीं अवश्य आहे. म्हणून राज्याची आवश्यकता भासून तें निर्माण झालें, संरक्षणासाठीं निर्माण झालें व संवर्धनासाठीं तें कायम राहिलें पाहिजे. कोणाच्या मतावर अगर मर्जी-वर आधारलेला संकेत असें त्याचें स्वरूप नाहीं. राज्य हा मनुष्यांना स्वाभाविक असा

भाव आहे, ही एक नैसर्गिक संस्था आहे. मनुष्य जन्मतो तो मुळीं राज्यांतच. तो जन्मतःच त्याचा नागरिक असतो. या दृष्टीनें आधीं राज्य मग व्यक्ति असा क्रम लागतो. राज्य म्हणजे एक मोठें कुटुंब नव्हे तें एक संघटन आहे. प्रत्येक नागरिकाला राज्यकारभारांत भाग घेण्याचा अधिकार आहे. सर्वांचें हित साधणारी घटना तीच योग्य घटना होय. एका वर्गाचें अगर थोड्या लोकांचें हित पाहाणारें राज्य अयोग्य, याप्रमाणें ॲरिस्टॉटलची विचारसरणी आहे. हॉब्जचे मत यापेक्षां अगदीं निराळें आहे. राज्याचें प्रभुत्व अमर्याद आहे. प्रत्येक समाजांत एक सत्ता अशी असली पाहिजे कीं, जिला मर्यादा नाहीं व जिचें सर्व ऐकतात व जी स्वतः कोणाचें-ही ऐकत नाहीं. ही सत्ता ज्याचेजवळ तो प्रभु, त्याचेपेक्षां राज्यांत कोणी श्रेष्ठ नाहीं अगर बरोबरीनें हक्क सांगणाराही नाहीं. तो अनियंत्रित, अमर्याद, सत्ताधीश आहे. राज्यांतील प्रभुत्व या स्वरूपाचें असतें व तें योग्य आहे हें दाखविण्यासाठीं हॉब्जनें राजकीयसमाज कसा अस्तित्वांत आला याबद्दल एक विचारसरणी मांडली व तसें घडून आलें असें प्रतिपादिलें. जर कोणी शास्ता नसेल, सर्वांच्यावर हुकमत गाजविणारा नसेल तर मनुष्यें शांततेनें राहाणार नाहींत. नित्य संघर्ष तेथें राहील, वैर व भीति सर्वत्र वरचढ होतील; तेथें कायदा नाहीं, न्याय नाहीं, संपत्ति नाहीं म्हणजे राहूं शकत नाहीं. शांतता हवी असते पण जीव अधिक प्रिय असतो. म्हणून सर्व मार्गांनीं ती संरक्षण करण्याचा प्रयत्न होतो व असा प्रयत्न करणें नैसर्गिक आहे. शांतता पाहिजे असेल तर जे व जितके शांततेला विरोधक व विसगत असतील ते व तितके नैसर्गिक हक्क मनुष्यानें सोडून दिले पाहिजेत. तसें करावयाचें म्हणजे सर्वांनीं विचार करून, ठरवून व जें ठरेल त्याप्रमाणें प्रामाणिकपणें वागूनच होणें शक्य आहे. जीवनसंरक्षणासाठीं याप्रमाणें होतें, कारण हीही एक मनुष्याची उपजत प्रवृत्ति आहे. परंतु येवढ्यानें भागत नाहीं. हें जें कांहीं ठरलें असेल तें चालू राहाण्यासाठीं मनुष्यांचें वर्तन समाजहिताविरुद्ध न होतां त्यास अनुकूल व्हावें म्हणून कोणी तरी सर्वांना मर्यादेंत ठेवून त्यांवर हुकमत चालविण्यासाठी अवश्य लागतो व तो सर्वांसाठीं असावा लागतो. यासाठीं समाजांतील लोकांनीं आपले नैसर्गिक हक्क सर्वांवर अधिकार चालविण्यासाठीं एकाचे अगर अनेकांचे स्वाधीन केले. प्रत्येकानें, बाकीच्यांनींहीपण दिले म्हणून व त्याच शर्तीवर आपले हक्क वरीलप्रमाणें स्वाधीन केले. ज्यांना मिळाले तो प्रभु झाला. त्याची सत्ता म्हणजे राज्याचें प्रभुत्व, त्याशिवाय बाकी सर्व प्रजा झाले. संमतीनें सत्ता मिळाली, सार्वजनिक हितासाठीं मिळाली पण ती परत घेण्याचा अगर तिच्यांत कमीजास्त करण्याचा अधिकार कुणालाही नाहीं. तसें करणें म्हणजे

'मूळ करारा' विरुद्ध वागणें आहे. हा 'प्रभु' जें जें करील तें तें करण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे. तो करील तें कदाचित् गैरशिस्त असेल, पण गैरकायदा कधींच असणार नाहीं. नीतिविषयक विचार त्याचे कृत्याबद्दल अप्रस्तुत ठरतो. हत्ती दिल्यानंतर अंकुशाबद्दल वाद घालणें इतकें तें हास्यास्पद आहे. या प्रभूचा कायदा म्हणजे सल्ला नव्हे, तो हूकूम आहे व अमान्य केल्यास प्रायश्चित अटळ आहे. जें कायद्याला मान्य तेंच बरोबर, जें कायद्यानें प्रतिबंधित केलें आहे तें चूक. कायदा प्रभूचा म्हणून पाळलाच पाहिजे. तो सयुक्तिक आहे म्हणून पाळला पाहिजे हा विचार अप्रस्तुत आहे व अनवश्यक आहे. जो नागरिक विरोध करील तो करारान्वयें अस्तित्वांत आलेला राजकीय समाज उलथून पाडीत असतो. जें संघटित झालें आहे तें विघटित व विलग करण्याचा प्रयत्न करीत असतो. त्याचें वर्तन मूळ कराराविरुद्ध असतें. याप्रमाणें हॉब्जची विचारसरणी, राज्याचे, राजकीय समाजाचे उत्पत्तीबद्दल आहे.

हा 'मूळ करार' म्हणजे एक कल्पित कथा होय. तथापि हॉब्जनें तत्कालीन राज्यव्यवस्थेंतील राजाचें स्थान सर्वश्रेष्ठ करण्याकरितां आपला ग्रंथ [ Leviathan ब्रह्मराक्षस ] लिहिला राजा हा प्रभु व तें योग्य ठरविण्यासाठीं मूळ कराराची कथा निर्माण केली. हॉब्जचे राज्यमीमांसेचा परिणाम झाला. पुढें इंग्लंडमध्यें १६८८ ची क्रांति होऊन एका राजाला काढून दुसरा पार्लमेंटने आणला. प्रजेला, पार्लमेंटला याप्रमाणें करण्याचा अधिकार आहे हें दाखविणें जरूर होतें. झालेल्या घटनेचें तात्त्विक समर्थन करणें जरूर होतें. तें लॉकेनें केलें. राजा हा परमेश्वराचा अंश आहे, त्याचे अधिकार परमेश्वरानें त्याला दिले आहेत, त्याचें प्रभुत्व अमर्याद आहे ही समाजांत प्रबल असलेली विचारसरणी हतबल करावयाची होती. राजा म्हणजे प्रभु, कदाचित परमेश्वरानें निर्माण केला असेल, पण त्याचा अर्थ ती जागा, ती भूमिका त्यावर असलेला मनुष्य नव्हे, तो तेथें अचल नाहीं तें स्थान पवित्र आहे, स्थानापन्न व्यक्ति पवित्र नाहीं. गादी राहावी, राहिली पाहिजे पण वाटेल तसा वागणारा गादीवर ठेवावा हें चूक आहे. मुळारंभीं कोणी शास्ता नव्हता, परंतु सर्वत्र अराजक होतें असें मात्र नाहीं. मनुष्याची उपजतबुद्धि, त्याला एकमेकाला दुखवूं नये, सर्व समान व स्वतंत्र आहों, कोणी कोणाचा जीव अगर स्वातंत्र्य हरण करावें हें योग्य होणार नाहीं असें सांगतें. कोणी या उपजत बुद्धीविरुद्ध या विवेकबुद्धीविरुद्ध वागेल तर त्याविरुद्ध वाटेल तो उपाय योजण्याचा प्रत्येकाला अधिकार आहे, प्रत्येकाला या नैसर्गिक हक्काची बजावणी करण्याची सत्ता आहे. आपलें जीवित व वित्त यांचें संरक्षण करण्याचा त्यावर आक्रमण करणाराचा समाचार घेण्याचा व त्यावर अभिप्राय देऊन शिक्षा करण्याचाही प्रत्ये-

काला हक्क आहे. कुठलाही राजकीय समाज हा अधिकार असल्याशिवाय व्यक्तींचें जीवित व वित्त सुरक्षित ठेवूं शकणार नाहीं. म्हणून जेथें जेथें व्यक्तींनीं ही नैसर्गिक सत्ता व हक्क समाजाच्या हवालीं केले आहेत व समाजाचे कायदे त्यांचें संरक्षण करीत आहेत तेथें तेथें राजकीय समाज आहे. व्यक्तींनीं आपला व्यक्तिशः अभिप्राय देण्याचा व शिक्षा करण्याचा हक्क समाजाला दिल्यानें, समाज कांहीं ठराविक नियमान्वयें जें सर्वांना सारखें आहे, हें काम तिऱ्हाईत [umpire] या नात्यानें करीत असतो. व्यक्तींनीं हक्क दिले, पण कायमचे नाहींत व ठराविक बाबतींतच दिले आहेत. जो या समाजाचा फायदा घेईल, तो 'मूळ कराराला' पक्षकार होतो. मूळ करारांत निवाडा देण्याचें काम तिऱ्हाईत म्हणून समाज करतो. जर राजाचे अधिकार अमर्याद मानले, त्याला सर्वश्रेष्ठ मानलें तर त्याच्यांत व प्रजेंत उत्पन्न होणाऱ्या वादांचा निकाल लावण्यास कोणी तिऱ्हाईत अधिकारयुक्त निवाडा देण्यास राहात नाहीं. असा तिऱ्हाईत नसेल तर तो राजकीय समाज नाहीं. मग त्याचे अभावीं समाजांत अराजक असणार, 'निसर्गावस्था' असणार. ज्या अर्थीं राजकीय समाज आहे त्याअर्थीं राजा व प्रजा यांच्यांतील निवाडा करणारा तिऱ्हाईत ही भूमिका समाजाला दिली पाहिजे. म्हणजेच राजा सर्व श्रेष्ठ नाहीं, त्याचे अधिकार अमर्याद नाहींत. तो सर्वश्रेष्ठ असेल तर राजकीय समाज नाहीं आणि राजकीय समाज तर आहे. याचा अर्थच तो सर्वश्रेष्ठ असणें शक्य नाहीं. लॉकेचे मतें बहुसंख्यांकांनीं अधिकार चालवावा हें व्यवहार्य आहे व त्याप्रमाणें होत आहे. त्यांचा अधिकार म्हणजे सर्वांचा अधिकार असाच त्याचा अर्थ आहे. तथापि, राज्याची सत्ता मग ती कुणीही वापरो, तिचें अधिष्ठान कोठेंही असो, अमर्याद नाहीं. राज्याचे हेतूनें ती मर्यादित आहे. सामाजिक भांडवलावर काढलेल्या कंपन्यांना जसें त्यांचे घोषित हेतूला विसंगत असें कांहीं करतां येत नाहीं, तशीच स्थिति राज्याची आहे. विधिमंडळाचा अधिकार श्रेष्ठ आहे व राज्यसत्ता आहे तोंपर्यंत तो आहे. मूळ करारांत दिलेले अधिकार जोंपर्यंत संरक्षण मिळत आहे तोंपर्यंतच आहेत. ते बंद झाले अगर अशक्य झाले अगर अधिकारांचा दुरुपयोग झाला तर ते रद्द होतात. राज्यसत्तेचें स्वरूप कसेंही असो, प्रत्येक समाजाला आत्मसंरक्षणाचा हक्क आहे व तो सर्वश्रेष्ठ आहे. कारण समाज हा राज्यसत्तेपेक्षां [Government] श्रेष्ठ; समाजच संपला, विखुरला तर राज्यसत्ता आपोआप लोपते. पण राज्यसत्ता लोपली तरी समाज संपुष्टांत येत नाहीं. म्हणून राज्यसत्तेंत बदल घडवून आणणें शक्य आहे. मूळ करारांत राजकीय समाज व्हावा म्हणून अधिकारत्यागाला व्यक्तींनीं मान्यता दिली. याचा अर्थ अधिकाराचें अधिष्ठान, राज्य

अमुकच स्वरूपाचें असलें पाहिजे असा नाहीं. राजकीय संस्था, राज्यसत्ता निरनिराळ्या स्वरूपाच्या असूं शकतील. करारानें फक्त राज्य असावें येवढेंच बंधन कायमचें व निरंतर आहे. तेवढा भाग बदलतां येणार नाहीं. राज्यसत्तेचा अधिकार दिक्-कालातीत नाहीं. परिस्थितीप्रमाणें तो कमीजास्त होईल, त्याचें स्वरूप बदलेल. राजा 'ईश्वरी' अंश मानला अगर त्याला जगाचा मूळ पुरुष आदाम याचा वारस म्हणून अधिकार मानला तरी अधिकाराचा दुरुपयोग झाला, सरकार असह्य झालें म्हणजे जनता तें सहन करणार नाहीं हें निश्चित आहे. राज्याचे प्रभुत्वाबद्दल कांहींही मीमांसा लावली तरी जनतेच्या या वर्तनांत फरक पडणार नाहीं.

सर्व सत्ताधीश राज्य हेंच मूळ करारांतून निघतें असें हॉब्जचें म्हणणें, तर मर्यादित प्रभुत्व असलेलें सदनशीर राज्य त्यांतून निघतें असें लॉकेचें म्हणणें. कायदेशीर म्हणून योग्य असें एक म्हणतो तर योग्य म्हणून कायदेशीर असें दुसरा म्हणतो. या मूळ कराराचे कल्पनेचा परिणाम तिसऱ्या तऱ्हेनें रूसोचे विचारसरणींत दिसून येतो. करारानें समाज व सार्वजनिक सत्ता निर्माण झाली. लोकांनीं तिला अधिकार दिले, पण प्रत्येक व्यक्ति करारानतरही स्वतंत्र राहिली व स्वतःशिवाय कोणाचें ऐकण्याचेंपण कारण तिला नाहीं अशी रूसोची विचारसरणी आहे. सर्वांनीं आपलें अधिकार दिलें; पण एकाला अगर अनेकांना नव्हे तर सर्व समाजाला दिलें. आपल्यापैकीं प्रत्येकजण आपलें तनमन समाइकींत देतो. सार्वजनिक बुद्धि (General will)चे प्रभुत्वाखालीं, नेतृत्वाखालीं ती समाइकी आहे आणि या समाइकींतून प्रत्येकजण त्या सार्वजनिक बुद्धीचा अविभाज्य भाग या नात्यानें घेतो." समाजांतील प्रत्येक व्यक्तीला प्रभुत्वांत भाग आहे म्हणून ती 'नागरिक' आहे. राज्यानें केलेले कायदे 'प्रजाजन' म्हणून तो पाळतो. जो या समाजाचें प्रभुत्व दर्शविणाऱ्या सार्वजनिक बुद्धीचे विरुद्ध जाईल, त्याला सर्व समाज आज्ञा पाळण्यास भाग पाडील, म्हणजेच त्याला स्वतंत्र होण्यासाठीं त्याचेवर सक्ति करण्यांत येईल. समाजाचें प्रभुत्व अदेय आहे, अविभाज्य आहे. सार्वजनिक बुद्धि यथार्थ असेल तर ती अप्रमादी व अचूक आहे. सर्वांचें प्रभुत्व म्हणून तें अन्यायी असणारच नाहीं. जो सर्वांसाठीं असेल तोच कायदा. राज्यांत कोणतीही विशिष्ट सत्ता श्रेष्ठ नाहीं. विधिमंडळ हें प्रभुत्वपूर्ण अशा समाजाचें सेवक आहे. सरकार अगर राज्यसत्ता हें प्रभु नाहीं तर समाजरूपी प्रभु व व्यक्तिरूपी त्याचे प्रजाजन यांच्यातील मध्यस्त आहे. त्याला कायदे करण्याचा अधिकार नाहीं व हा प्रभु प्रत्यक्ष कारभार करूं शकत नाहीं. प्रत्येक वेळेस सर्व समाजानें जमून ठरवावयाचें हें अशक्य आहे. राज्यसत्ता मग प्रबल होते

व समाजाचे प्रभुत्वावर हक्क सांगते. तसें झालें म्हणजे मूळ करार मोडतो. रूसोच्या सामाजिक, कराराचा (Social contract) हा सारांश आहे. सर्व लोकांनीं एके ठिकाणीं येऊन कारभार पाहावयाचा, कायदे करावयाचे सर्वांनीं प्रत्यक्ष भाग घ्यावयाचा हें आधुनिक राज्यांतून अशक्य आहे. सर्व समाज जमला म्हणजे सरकार अगर राज्य-सत्ता (Government) तहकूब ठेवली जाते. कारण मुख्य मालक जातीनें हजर असतो. प्रतिनिधिद्वारां मालकानें हें काम करणें म्हणजे कांहीं तरी थातुरमातुर प्रकार आहे. त्यांना संपूर्ण मुकत्यारी सर्व सत्ता असणार नाहीं; शिवाय त्यांनीं केलेल्या कार्याला मान्यतेची जरुरी राहतेच. इंग्लंडमध्यें जनता पार्लमेंट निवडून देते पण तिचें गुलाम होते, खरें स्वातंत्र्य तेथें नांदत नाहीं. समाजाची खरीखुरी सार्वजनिक अगर सामुदायिक बुद्धि काम करीत नसल्यानें जे विद्यमान कायदे आहेत ते खरेखुरे कायदे नाहींत; कारण यच्चयावत् समाजानें ते केले नाहींत. आधुनिक राज्यांतील हे दोष कसे टाळावे हें मात्र रूसोनें सांगितलें नाहीं. प्रतिनिधिक व्यवस्था हीच एक तोड यावर आहे हें त्याला मान्य नव्हतें. सरकार अगर राज्यसत्ता ही कांहीं करारानें निर्माण होत नाहीं, तर प्रभुत्वपूर्ण समाजानें ती निर्माण केलेली असते. सामाजिक करारसुद्धां कुणी राजा व लोक यांच्यामध्यें झालेला नाहीं. कराराला कोणी तिऱ्हाइतानें मान्यता दिलेली नाहीं. एका अर्थानें तो नैसर्गिक आहे. कारण नैसर्गिक अगर उपजत बुद्धीनें लोकांनीं तो अस्तित्वांत आणला. जो एकदां करार झाला त्यांत सर्व जनतेचे हक्क समाविष्ट झालेले आहेत, प्रभुत्व अदेय आहे, पण अधिकार कारभार चालविण्याचा अधिकार देय आहे. प्रसंगीं हा अधिकार सर्वाधिकारी नेमून चालविला गेला तरी रूसोला हें अमान्य नव्हतें.

रूसोच्या विचारसरणींत दोष असतील, विसंगति असेल, पण रूसोचे विचारसर-णीचा मुख्य परिणाम जो सर्व युरोपभर झाला तो डोळ्यांआड करतां येत नाहीं. सर्व मनुष्यें जन्मानें स्वतंत्र व सारखीं आहेत. राज्यांतील प्रभुत्व हें जनतेचा सामुदायिक वारसा व हक्क आहे. राज्यांतील कायदे म्हणजे जनतेच्या सामुदायिक सार्वजनिक बुद्धीचें प्रतिबिंब असलें पाहिजे, हीं महान् तत्त्वें त्याच्या विचारसरणींतून निघालीं व त्यांचा परिणाम युरोपचे राजकारणावर युगप्रवर्तक ठरला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या सुर-वातीचा 'मानवी हक्कांचा जाहीरनामा' त्याच्या विचारसरणीवर बराच आधारलेला आहे. घटनाभूत मानवीहक्कांच्या घोषणा, जनतेचें प्रभुत्व सांगण्याची प्रथा सुरू होण्याला कारण रूसोची विचारसरणी आहे हें अमान्य करतां येत नाहीं. राजकीय तत्त्वज्ञान व राज्यशास्त्र सिद्धांत हे कांहीं लेखकांचे पुस्तकांत पडून राहात नाहींत.

त्यांचा परिणाम राज्यकारभारावर, राज्याच्या कार्यावर होत असतो. राज्य कसें अस्तित्वांत आलें, राजकीय समाज कसा अस्तित्वांत आला याबाबतचे विचार लॉकेनंतर इंग्लंड-मध्यें थांबले नाहींत. प्रसिद्ध कायदेपंडित ब्लॅकस्टोननें समाज 'निसर्गावस्थेंत' होता ही गोष्ट अमान्य केली. कांहीं करारमदार होऊन समाज अस्तित्वांत आला ही कथा त्यानें अमान्य केली. समाजाचा घटक व्यक्ति नव्हे, कुटुंब आहे व मनुष्यांचा संगति-प्रिय स्वभाव लक्षांत घेतां समाजाशिवाय राहाणें त्याला अशक्य होतें, म्हणून समाज निर्माण झाला असें प्रतिपादिलें. "प्रत्येक राज्यव्यवस्थेंत सर्वश्रेष्ठ, अप्रतिकार्य, अनि-यंत्रित असा अधिकार कोणाला तरी असतो व असला पाहिजे व त्याचे ठिकाणीं प्रभुत्वाचे हक्क समाविष्ट झालेले असतात." हा अधिकार इंग्लंडमध्यें पार्लमेंटला आहे असें ब्लॅकस्टोनचें म्हणणें आहे. "जें पार्लमेंट करील अगर करतें तें कोणालाही या जगांत अन्यथा करतां येणार नाहीं." ब्लॅकस्टोननें लॉकेच्या तत्त्वप्रणालीवर आपली विचारसरणी कांही अंशांनीं उभारली. तथापि मूळ करार वैचारिक दृष्टीनें अर्थशून्य करण्याचें कार्य ह्यूमनें केलें. फ्रान्समध्यें रूसोचे विचारसरणीनें क्रांतिकारकांचे विचार भारले होते व फ्रान्सची राजकीय परिस्थितिपण रूसोचे विचारसरणीला उपयुक्त भूमि ठरली. इंग्लंडमध्यें राजकीय परिस्थिति इ. स. १६८८ नंतर स्थिर स्वरूपाची होती म्हणून व झालेल्या क्रांतीचें समर्थन करावयाचें होतें म्हणून एक विशिष्ट विचारसरणी लॉकेनें प्रतिपादिली. लॉकेचे विचारसरणींतील अनेक हेत्वाभास ह्यूमनें स्पष्ट केले. ह्यूमचें म्हणणें कीं, मनुष्यें विवेकबुद्धीनें वागतात हा सिद्धान्त निरपेक्ष नाहीं. विवेकाच्या कल्पनेंत असलेला घोटाळा त्यानें स्पष्ट केला. विवेकानें वागणें म्हणजे कार्यकारणभाव लक्षांत घेऊन वागणें. अमुक एक असेल तर अमुक परिणाम होईल याचा अर्थ जें गृहीत प्रमेय आहे तें सिद्ध झालें असें नाहीं व त्याज-बरोबर जें अनुमान परिणामस्वरूपी म्हणून काढलें तेंही इष्ट आहे असें नव्हे. दोन कल्पनांची तुलना करून अगर एकापासून दुसरी निघते येवढें म्हटल्यानें सर्व सिद्ध झालें असें होत नाहीं. भौतिक शास्त्रांतील कार्यकारणभाव जास्त नियमित, निश्चित असतो तशी गोष्ट सामाजिक शास्त्रांत नाहीं. अमुक परिस्थितींत माणसें असतील तर अमुक रीतीनें वागतीलच असा ठाम सिद्धान्त सांगणें अयोग्य आहे. अमुक एक गोष्ट योग्य आहे अगर इष्ट आहे याचा अर्थ ती विवेकानें तशी ठरविली, कार्यकारणाचा विचार केला म्हणून तशी ठरली असा नाहीं तर ती मनुष्याला तशी वाटते, तसा अनुभव त्याला येतो. म्हणजे त्याचा तो अभिप्राय (Judgement) आहे, विवेक (Reason) नाहीं. विवेक फक्त कोणत्या मार्गानें गेलें असतां इष्ट तें मिळेल अगर अनिष्ट ते

टळेल हें सांगतो. जो परिणाम असेल त्याचा विवेकाशीं संबंध नाहीं. चांगला अगर वाईट हें व्यक्ति अभिप्राय देऊन ठरविते. अमुक गोष्ट योग्य, न्याय्य अगर उपयुक्त हा अभिप्राय आहे, अमुक गोष्टीपासून अमुक गोष्ट निघते हा कार्यकारणभाव आहे, अनुमान काढणें हा विवेक आहे, या तीन क्रिया निरानिराळ्या आहेत व तशा स्पष्ट केल्या पाहिजेत. अभिप्राय हा मनुष्यांच्या अनुभवांवर, प्रवृत्तींवर अवलंबून असतो. विवेक व कार्यकारणभाव, हे निरपेक्ष अगर निश्चित असूंच शकत नाहींत. पुष्कळ वेळां अनुमानाप्रमाणें घडतें, कार्यकारणभाव दिसून येतो म्हणून ते अनिवार्य आहे अगर अवश्य आहे, असें सिद्ध होत नाहीं. उलट असूं शकेल व होतेही. कांहीं गोष्टी होतात म्हणून गृहीत धरून त्यांना संकेत मानून समाज चालतो. भाषा जशी समाजाची मनुष्य स्वीकारतो तसेंच हे संकेत स्वीकारतो. त्याचे स्वहिताचे विरुद्ध असल्यास तो ते बदलील, मानणार नाहीं. असे संकेत समाजांत पाहिजेत हें मान्य, पण ते "नैसर्गिक" आहेत अगर ती शाश्वत तत्त्वें आहेत हें खरें नाहीं. निसर्गनियम व समाज यांतील संगतीवर आधारलेले तत्त्वज्ञान या विचारसरणीनें निष्फळ ठरविलें. नैसर्गिक हक्क, नैसर्गिक न्याय वगैरे कल्पनांवर आधारलेली मीमांसा या विचारसरणीनें डळमळली. समाजांत माणसें स्वहिताचे दृष्टीनें अगर समाजांत स्वास्थ्य राहावें म्हणून केलेले संकेताचे दृष्टीनें बहुशः वागतात, पण हे संकेत निरंतर व निरपेक्ष नाहीत. ह्यूमच्या या 'अतितार्किक' विचारसरणीनें विध्वंसक काम केलें, विधायक अशी राज्यविषयक मीमांसा त्यानें सांगितली नाहीं असा त्याचेविरुद्ध आक्षेप आहे.

मॉन्टेस्क्युनें विवेकबुद्धि, नैसर्गिक न्याय, करार वगैरे कल्पना स्वीकारल्या, पण एकंदरींत त्याचे विचारसरणींत कराराला त्यानें दुर्लक्षिलें हें स्पष्ट दिसून येतें. त्याचे विचारसरणींत देश, काल, परिस्थिति याला त्यानें महत्त्व दिलें आहे. राजकारण हे कांहीं कल्पनेचे खेळ नव्हेत. राजकारणाचा संबंध चालत्या बोलत्या, बुद्धि व भावना असणाऱ्या मनुष्यांशीं असतो. म्हणून ज्या घटना घडल्या आहेत त्यांचा परामर्ष घेऊनच कांहीं सिद्धांत मांडले पाहिजेत. देशाची भौगोलिक स्थिति ही सुद्धां देशांतील लोकांच्या प्रवृत्तीवर परिणाम करीत असतें. देशांतील कायदे व देशांतील राज्यसत्तेचें स्वरूप हे कांहीं निरपेक्ष स्वयंसिद्ध अशा सिद्धांतावर आधारलें नसून त्या त्या देशांतील परिस्थिति, परंपरा वगैरे गोष्टींचा तो परिणाम असतो. "वस्तूंच्या स्वभावधर्मातून निघणारे आवश्यक संबंध म्हणजे कायदा" अशी कायद्याची त्यानें व्याख्या केली आहे. भौतिक शास्त्रांत आवश्यक संबंध म्हणजे वस्तूंचें सारखें वर्तन. उदाहरणार्थ,

एखादा पदार्थ वर फेकला कीं तो खालीं जमिनीवर पडतो. सर्व पदार्थांचें वर्तन याप्रमाणें होतें. समाजांत कायदा हा सर्वांचें सारखें वर्तन असावें, एक नमुना अगर प्रमाण कीं ज्याला धरून सर्वांनीं वागावें म्हणून आहे. अज्ञानानें अगर अतिशिष्ट-पणानें कांहीं तसे वागणार नाहींत, विचारस्वातंत्र्य, क्रियास्वातंत्र्य यांचे नांवांखालीं कांहीं वागणार नाहींत; तथापि, सर्वसामान्यपणें लोकांनीं तसें वागावें हा त्याचा हेतु आहे. कायदा झाला म्हणजे योग्य कोणतें अगर अयोग्य कोणतें कळतें असें मात्र नाहीं. योग्यायोग्यतेच्या कल्पना कायद्याचे आधीं असतात. निसर्गानेंच या कल्पना निर्माण केलेल्या असतात. समाजांत सर्वच बाबतींत कायदा नसतो तरीसुद्धां अमुक एक गोष्ट अयोग्य झाली, अन्यायाची झाली असें समाज म्हणतो, तें कशाचे आधारें? समाजांत, मनुष्यांत एक उपजत बुद्धि असते व ती विवेकपूर्ण असते. तिला अनुसरून हें योग्य कीं अयोग्य हें मनुष्य ठरवीत असतो. ही विवेकबुद्धि देशकालपरि-स्थितीप्रमाणें कायद्यांत प्रतिबिंबित होत असते. ॲरिस्टॉटल व बॉडीनप्रमाणें समाजां-तील कायदे, समाजांतील संस्था, संकेत व परिस्थिति यांना अनुसरून असले पाहिजेत. चालीरीती व परंपरा योग्य कारणाशिवाय समाजांत उत्पन्न होत नाहींत. म्हणून प्रत्येक समाजानें परिस्थितीचें योग्य आकलन करून कायदे केले पाहिजेत. कांहीं तरी निरपेक्ष तात्त्विक अशा कल्पना डोळ्यांपुढें ठेवून कायदा करणें योग्य होणार नाहीं. सारासार विचारबुद्धीनें तुलनात्मक पद्धतीनें राजकीय तत्त्वज्ञानाकडे पाहाण्याची प्रथम सुरवात बॉडीननें केली. परिस्थितीप्रमाणें समाजांतील संस्था बनतात व बदलतात व तसें घडवून आणण्याचा जनतेला हक्क आहे. लोक राजकारण करण्याला लायक नसतात, या आक्षेपाला त्यानें स्पष्ट उत्तर दिलें आहे. लायकीची जरुरी नाहीं, लोक राजकार-णांत लक्ष घालीत असले म्हणजे पुरे. अनुभव व विचारविनिमय या साधनांनीं चुका दुरुस्त होतात व योग्य तें घडून येतें. जुन्या घटनांचें संशोधन करून ऐतिहासिक दृष्टीनें राजकारणाचे अभ्यासाकडे पाहण्याचें महत्त्व त्यानें ओळखिलें म्हणूनच कराराचे कल्पनेला त्यानें महत्त्व दिलें नाहीं.

रूसोनें आपल्या विचारसरणींत समाजाला नैतिक प्रतिष्ठा दिली होती, त्याचे-बद्दल दृढ श्रद्धा उत्पन्न केली होती. ह्यूमचे विचारसरणींत सर्वत्र स्वहिताचा पुरस्कार दिसत होता. भावनांचेमागेसुद्धां स्वहितच प्रभावी असतें असें त्याचे विचारसरणीं-तून निघत होतें. धर्म, नीतिशास्त्र, परंपरा या सर्वांविरुद्ध त्याची विचारसरणी होती. पण तिचा परिणाम न होतां उलट फ्रेंच क्रांतीनें परंपरा, धर्म, नीतिमत्ता यांबाबतचा आदर इंग्लंडमध्यें अधिक जागृत झाला. परंपरेचा पुरस्कार बर्कइतका कोणी केला

नाहीं. प्रथम अतितार्किकपणा याविरुद्ध त्याची विचारसरणी आहे. "मानसिक व सामाजिक शास्त्रांत शब्दांच्या व्याख्या असणें जरूर आहे. तथापि, सारासारविचारानें व्याख्या करण्याचे कामी थोडी दक्षताच घ्यावी." स्वत: त्याचे विचारसरणींत यामुळें विसंगति दिसून येते. आयर्लंडमधील जुलमी कायद्यांचा निषेध करतांना त्यानें सांगितलें, "देशांतील यच्चयावत् लोकांविरुद्ध असणारा कायदा योग्य व विवेकपूर्ण असूं शकत नाहीं आणि म्हणून त्याला अधिकारही नाहीं. राज्यसत्तेचें स्वरूप कसेंही असो, लोक हेच खरे कायदे करण्याचे अधिकारी आहेत; प्रत्यक्ष कायदा करणारा एक असो अगर अनेक असोत, कायदा करण्याची सत्ता अखेरची लोकांची आहे व त्यांची संमति असल तरच तो कायदा होईल." तथापि सर्व लोकांनासुद्धां समाजाविरुद्ध कायदा करण्याचा अधिकार नाहीं असें त्याचें मत होतें. फ्रेंच क्रांतीनंतर झालेल्या घटनामुळें त्याचे विचारसरणींत निराळा दृष्टिकोन दिसून येतो. "जर राजकीय समाज हा कांहीं संकेत ठरून अस्तित्वांत आला असेल तर ते संकेत समाजाला शिरोधार्य असले पाहिजेत. कोणा व्यक्तीला त्याविरुद्ध हक्क सांगतां येणार नाहीं. न्याय मिळावा म्हणून स्वत: प्रत्येक गोष्टीवर अभिप्राय देण्याचा हक्क व्यक्ति सोडून देते, कांहीं स्वातंत्र्य सुरक्षितपणें राहील म्हणून सर्वच सर्व विश्वासानें व्यक्ति बहाल करते." प्रत्यक्ष सामाजिक करार झाला कीं नाहीं हें कोणी सांगूं शकत नाहीं असें म्हणून समाजांतील कांहीं संकेत हे सनातन आहेत, पवित्र आहेत व त्यांना कोणींही हात लावतां कामा नये असें त्याचें मत होतें. पण हे संकेत कोणते हें त्यानें सांगितलें नाहीं. कदाचित् संपत्ति, धर्म व घटनेंतील प्रमुख भाग हे ते असावेत. तथापि हे संकेत कांहीं निसर्गापासून निर्माण झाले नाहींत अगर मनुष्य स्वभावांतच ते आहेत असेंही नाहीं हें त्याला मान्य होतें. परंपरेने व दीर्घकालीन वहिवाटीने समाज, राजकीय समाज झालेला असतो. "निसर्गावस्थेंत लोक अशी कांहीं वस्तु नाहीं, केवळ माणसें जमलीं म्हणजे त्यांना सामुदायिक असा भाव अगर अस्तित्व येतें असें नाहीं. लोक या कल्पनेमागें संघ ही कल्पना आहे. ही कल्पना सर्वस्वीं कृत्रिम आहे व म्हणून ती कांहीं समजुतीनें, कांहीं संकेतानेंच उत्पन्न होते. हे संकेत काय आहेत हें त्या समाजाचे स्वरूपावरून ठरविलें जातें." अज्ञात कालापासून हा समाज चालत आलेला आहे. वहिवाटीवर त्याचा अधिकार उभारलेला आहे. संपत्ति, सत्ता, शासन या सर्वांवर जास्त अधिकार वहिवाटीनेंच सांगतां येतील. राष्ट्र ही कांहीं लहानशा क्षेत्राबाबतची कल्पना नाहीं अगर क्षणभर जमलेला मनुष्यांचा जमाव नाहीं. ती एक अविरत व अनंत काल सातत्यानें राहाणारी कल्पना आहे. ती क्षणिक अगर

स्थानिक नाहीं, व्यापक व चिरायु आहे. क्षणासाठीं यांत कोणी येत नाहीं, भावना-वश होऊन यांत कोणी येत नाहीं. विचार करून अनंत काल व अनंत पिढ्यासाठीं हा निर्णय घेतला गेलेला आहे. देशकालपरिस्थितीप्रमाणें समाजाची घटना घडत आलेली आहे. व्यक्ति मूर्ख आहे, समूह अविचारानें वागतो तेव्हां मूर्ख असतो, पण मनुष्यजात शहाणी आहे व वेळ मिळाला म्हणजे विचार करून योग्य तेंच करते. सर्व माणसें सारखीं आहेत हें खोटें आहे. समाजधारणेसाठीं विषमता व विविधता जरूर आहेत. व्यक्तिहिताचे कल्पनेवर समाज आधारलेला नाहीं. कुटुंब व शेजार याबद्दल असलेल्या प्रेमांतून देशप्रेम, राष्ट्रभक्ति निर्माण झालेली असते. मनुष्याची ही साहजिक प्रवृत्ति झालेली असते. परंपरागत कर्तव्य करण्याची बुद्धि व समाजाचे आपण एक भाग आहोंत ही जाणीव या योगानें समाज टिकत असतो. परंपरागत संस्था व कर्तव्यें नसतील तर समाज टिकणार नाहीं. या संस्था कोणीं एकानें निर्माण केलेल्या नाहींत, त्या वाढत वाढत आल्या आहेत व प्रभावी आहेत. जुन्या संस्था म्हणजे अनुभवांचा सांठा असतो, समाजाला त्यांचा परिचय असतो. त्या आदराचें स्थान असतात. वाटेल त्यानें उठावें व लोकांचे नांवावर, नैसर्गिक हक्काचे नांवावर त्यांचेवर हल्ला करावा हें वेडेपणाचे आहे, घातुक आहे. समाजघटनेंत समाजाच्या संस्थांत अवश्य तो बदल करावा हें त्यांतूनच दिसून येत असतें. धुरंधर मुत्सद्दी योग्य बदल घडवून समाजधारणा टिकवीत असतात. मनुष्याची प्रतिष्ठा, रीतीरिवाज, परंपरा व समाजांतील स्थान यांवर आहे. संस्कृति व सुधारणा हा समाजाचा ठेवा आहे व समाजांत राहण्यानें व्यक्तीला तो मिळणार असतो. ज्ञान, कला, नैतिक आदर्श या सर्वांचा पाठीराखा समाज व सामाजिक परंपरा या आहेत. समाजाचें नियंत्रण म्हणजे अडचण नव्हे, तर तें स्वातंत्र्याचें प्रवेशद्वार आहे. "होय, समाज हा एक करार आहे. पण राज्य कॉफी, तंबाखू, लवंगा वेलदोडे यांचा व्यापार करण्याची भागीदारी नाहीं, कीं जी वाटेल तेव्हां रद्द करतां येईल. ही एक आदरणीय भागीदारी आहे. क्षणभंगुर नफ्यासाठीं अगर क्षणिक कालासाठीं ही नाहीं. सर्व शास्त्रें, सर्व कला, सर्व सद्गुण, सर्व कांहीं श्रेष्ठ यांतील ही भागीदारी आहे. ज्यासाठीं ही भागीदारी आहे ते एका पिढींत प्राप्त होत नाहीं म्हणून जे विद्यमान आहेत त्यांच्यांतीलच ही भागीदारी नसून जे मृत व विद्यमान व जे जन्मावयाचे आहेत या सर्वांत ही भागीदारी आहे. विशिष्ट समाजांतील करार हा त्या अनंत मानवी समाजाचे करारांतील एक कलम आहे व यामुळें दृश्य व अदृश्य जग, लघु व महान् आत्मे एकमेकाला जोडले जाऊन दृढ प्रतिज्ञेनें निर्धारित झालेल्या योजनेप्रमाणें जगांतील सर्व नैतिक व भौतिक विचार नियत केलेल्या भूमिकेवर राहून वागत आहेत."

"तसा कांहीं असाधारण व बिकट प्रसंग नसतांना केवळ मूलभूत हक्क, नैसर्गिक हक्क आहे म्हणून शासनसंस्थेचीं पाळेंमुळें उखडून टाकणें योग्य नाहीं. जनतेच्या सार्वभौमत्वासाठीं अगर प्रभुत्वासाठीं याची जरुरी नाहीं. केवळ माणसें मोजल्यानें ते 'लोक' या संज्ञेला पात्र ठरत नाहीत. जी संघभावना त्यांत आहे ती कृत्रिम आहे म्हणून ती उत्पन्न होऊन दृढ होण्यास वेळ लागतो. राष्ट्र मोडणें सोपें, घडवून आणणें कठीण आहे. आणि बदल तरी बहुमताचे जोरावर घडवून आणणार. बहुमताला बाकींच्यावर बंधन घालण्याचा काय अधिकार आहे? बहुमत म्हणजे राष्ट्राचें मत मानणे ही एक आणखी चुकीची समजूत आहे. कृत्रिम सत्तेवर व चुकीच्या कल्पनेवर कायदा आधारून चालणार नाहीं. जर परंपरा व वहिवाट यांना कांहीं किंमत नाहीं, कांहीं अधिकार नाहीं तर आज जे 'गुंड व पुंड' क्रांतीच्या गर्जना करीत आहेत त्यांना फ्रान्सच्या भूमीवर हक्क सांगण्याचा काय अधिकार आहे?" फ्रान्सच्या क्रांतीमागील विचारसरणी भ्रममूलक आहे असे त्यांचे स्पष्ट मत होतें. अनेक प्रसंगीं लोक परंपरेला, वहिवाटीला योग्य आहे म्हणून मानीत नाहींत तर भीतीमुळें मानतात, अज्ञाताबद्दल धास्ती वाटते म्हणून आहे तें वाईट असलें तरी चालवून घेतात. जेव्हां ते परंपरा तोडून, वहिवाट सोडून वागूं लागतात तेव्हां त्याचा अर्थ जें आहे तें केवळ अपुरें व अमान्य आहे येवढेंच नव्हे, तर असह्य झालेलें आहे असाच असतो. परंतु बर्कनें त्याचा विचारच केला नाहीं. राज्य ही एक पवित्र वस्तु मानून त्याची प्रतिष्ठा त्यानें वाढविली. समाज, सरकार व राज्य या वास्तविक तीन पृथक् कल्पना अगर भाव आहेत. बर्कनें 'राज्य' याला सर्व संस्कृतींचें, सुधारणांचें विश्वस्त बनविलें. फ्रान्समधील क्रांतिकारक राज्यसत्ता उलथून पाडून, फ्रेंच समाजाचा द्रोह करून सर्व संस्कृति व सर्व सुधारणांचा नाश करीत आहेत हे त्याला दाखवावयाचें होतें. राजकारणांतील स्थायी भाव म्हणजे राज्य, त्यावर आक्रमण करून क्रांतिकारकांनीं प्रक्षोभ निर्माण केला, सर्वत्र उलथापालथ केली ही मोठी चूक केली हें त्याला सांगावयाचें होतें व इंग्लंडला ह्या तत्त्वज्ञानापासून वांचवावयाचें होतें. वास्तविक समाज हा संस्कृतीचा व सुधारणेचा विश्वस्त आहे, राज्य नव्हे. सरकार उलथून पाडणें म्हणजे समाज उलथून पाडणें हें खरें नाहीं. तसेंच केवळ राज्यावर संस्कृति व सुधारणा अवलंबून आहेत हेंही खरें नाहीं. राज्याचें महत्त्व व प्रतिष्ठा वाढविणारी विचारसरणी त्याचेपासून सुरू झाली. समाज व त्याचें शासन ही केवळ मनुष्याचे अधिकारांतील बाब आहे असें तो मानीत नसे. या सर्वांत परमेश्वराचा हात आहे असें त्याचें मत होतें. प्रत्येक राष्ट्रानें स्वतःचे मर्जीप्रमाणें वागून चालणार नाहीं, तर

व्यक्तीनें ज्याप्रमाणें समाजांत आपलें स्थान असेल त्याला अनुरूप वर्तन केलें पाहिजे, त्याचप्रमाणे राष्ट्रानेंसुद्धां जागतिक संस्कृति व सुधारणानिर्मितीचे कामीं आपलें जें स्थान असेल त्याप्रमाणे वागलें पाहिजे. "दैवी योजनेप्रमाणें" हें सर्व झालें पाहिजे. अनंत काळासाठीं केलेल्या योजनांपैकीं भूत व भविष्य यांच्यामध्यें काम करणारा एक दुवा आपण आहों असें तो म्हणे. समाजांत स्थैर्याची आवश्यकता किती आहे व ती परंपरेवर कशी आधारलेली आहे हें सांगणें त्याच्या विचारसरणीचें मुख्य सूत्र आहे. क्रांतिकारक विचारसरणीला जाब देणारी त्याची विचारसरणी होती . धनवान् वर्गाला ती एक देणगीच मिळाली. समाजाचें स्थैर्य म्हणजे राज्याचे स्थैर्य म्हणजे जे विद्यमान आहे ते राज्यसत्तेमार्फत सुरक्षित ठेवणें हा त्याचा व्यावहारिक अर्थ होतो.

रूसोची विचारसरणी व फ्रान्समधील राज्यक्रांति यांचे परिणाम फार दूरवर झाले. फ्रान्सची राज्यक्रांति फ्रान्सपुरती मर्यादित राहिली नाहीं. नेपोलियन क्रांतींतून निर्माण झाला, आणि त्यानें फ्रान्सचा अम्मल युरोपभर बसविण्याचा प्रयत्न केला. लहान लहान राष्ट्रांवर त्यानें केलेल्या आक्रमणाचा परिणाम राष्ट्रीय भावना, राष्ट्रीय परंपरा, राष्ट्रीय संस्कृति यांना जागें व स्पष्ट करण्यांत झाला. फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी विशिष्ट गोष्टीसाठीं बंडे होत व सर्वत्र मान्यता पावलेल्या तत्त्वांना आवाहन करण्यांत येई. जुलमाविरुद्ध आवाज काढतांना जुने कायदे यांचा आधार घेतला जाई. फ्रेंच राज्यक्रांतीपासून हे सर्व बदललें. समाजांतील अन्यायामुळें उत्पन्न झालेल्या भावना, यावरच यापुढें सर्व प्रयत्नांचा आधार देण्यांत येऊं लागला. लोकांच्या इच्छा आणि लोकांच्या गरजा यांवर योग्य कीं अयोग्य हें ठरविण्यांस सुरवात झाली. लोकांना सर्व हक्क आहेत, लोक हेंच खरे प्रभु आहेत इत्यादि तत्त्वें फ्रेंच राज्यक्रांतीमुळें सर्वत्र पसरलीं. परंपरा कांहीं सार्वत्रिक नीतिप्रमाण, नैसर्गिक न्याय व कायदा यांचे महत्त्व राहिलें नाहीं. क्रांतीपूर्वी देशाच्या मर्यादा राष्ट्रीय दृष्टीनें ठरत नव्हत्या, तर राज्यकर्त्यांच्या हिताहिताचे दृष्टीनें, नात्यागोत्याचे दृष्टीनें ठरत असत. राष्ट्र म्हणून कांहीं मानण्यांत येत नव्हतें. लोकांना राज्यकारभारांत फारसें विचारण्यांत येत नव्हतें. जेथें सर्वत्र स्वातंत्र्य नष्ट झालें होतें तेथें राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्नच शिल्लक नव्हता. वारसा म्हणून, स्त्रीधन म्हणून एका देशाचें राज्य दुसऱ्याकडे जाई. ज्या देशाच्या राजाचे संबंध सोयरिकीनें गुंतलेले नव्हते तो वेगळा पडे व याच कारणामुळें पोलंडचें स्वातंत्र्य नष्ट झालें. त्याचे तीन तुकडे करून तिघांनीं वांटून घेतले. राष्ट्र म्हणून भावना युरोपचे राजकारणांत महत्त्व पावण्याला सुरवात तेथून झाली. फ्रेंच क्रांतीपूर्वी परंपरा व वहिवाट म्हणून अधिकार चाले. फ्रेंच क्रांतीनें या दोन्हींचा नायनाट केला. क्रांतीनंतर

अनेक घडामोडी झाल्या, अनेक देशांतून वारंवार राज्यसत्ता बदलल्या, कुठेंही कुठल्याही व्यवस्थेला स्थैर्य लाभेना अशी स्थिति झाली. पराभूत झालेला पक्ष लोकांच्या भावनांना चेतवी व पुनः उलथापालथ होई. समाजाचे अस्थिर वातावरणांत तत्त्वज्ञान व तदनुसार वर्तन यांचा एकमेकांवर परिणाम होऊन परस्परविरोधी विचार उत्पन्न होतात. आत्यंतिक व अतिरेकी मतें प्रतिपादिलीं जातात. ध्येयाचे आकर्षणानें प्रवृत्त झालेले भावनोद्भव प्रयत्न यांना सारासार विचार, व्यवहार्यतेची इष्टता, विवेक हे फारसे पटत नाहींत. अतिरेक व अतिशयोक्ति यांतील चूक दुसऱ्या टोंकांतील अतिरेक व अतिशयोक्तीनें दुरुस्त होते. क्रांतीचे वातावरणांत थोडे पण विचारवंत यांना बहुतांच्या मदतीशिवाय कांहीं विशेष करतां येत नाहीं व बहुत आले म्हणजे बहुतांची बुद्धि तेथें आली, भावनावशता आली व मग विवेकाची मर्यादा तेथें राहात नाहीं. सभोंवतालचें वातावरण क्रांतीचें असतें. या वातावरणांत उत्साहाचें व आकांक्षांचें पीक अमाप येतें. सर्वत्र हिरीरी उत्पन्न होऊन एक प्रकारच्या उल्हासांत अशक्यता, अव्यवहार्यता अदृश्य होतात. सिद्धि माळ घालण्यास वधूप्रमाणें वाट पाहात आहे असें वाटतें. जेथें नाना लोकांची नाना दुःखें आहेत, तेथें सर्वांना एकत्र आणण्यासाठीं तात्त्विक ध्येय हेंच एक प्रभावी साधन आहे. अर्थात् त्याची प्राप्ति सर्व दुःखें निवारण करील अशीच अपेक्षा असते. तथापि, नुसतें तात्त्विक ध्येय, केवळ तात्त्विक कल्पना ही कांहीं समाजरचनेचा पाया होऊं शकत नाहीं. नुसतें 'स्वातंत्र्य', नुसतें 'पाकिस्तान' ही एक तात्विक, एक निरक्षेप कल्पना झाली. तात्त्विक कल्पना औषध म्हणून ठीक आहे पण अन्न म्हणून तिचा उपयोग होत नसतो. समाजधारणेसाठीं, नवनिर्मितीसाठीं त्या कल्पनेला व्यावहारिक स्वरूप द्यावें लागतें. वर्गशः व्यक्तिशः तिचा काय अर्थ होईल हें कळावें लागतें, ध्येयानें प्रयत्नाची दिशा, प्रगतीची दिशा फक्त निश्चित केली जाते. विद्यमान व्यवस्था असह्य आहे, अनैतिक आहे येवढेंच फक्त त्यायोगें निश्चित सिद्ध होतें. विद्यमानाला उचलून धरणाऱ्या विचारसरणीलाही तिचे पुरस्कर्ते अतिरेकाला नेतात. जें आहे तें सर्वोत्कृष्ट आहे असें तात्त्विक दृष्टया सांगूं लागतात. दोहोंच्या संघर्षांत विद्यमान व्यवस्थेचे संरक्षक व्यवहारांत अतिरेकानें व अविचारानें वागतात, जाणूनबुजून अन्याय करतात, त्यांचीं कृत्यें जाणून बुजून हिंसात्मक असतात. त्याचे उलट विद्यमानाचे विरोधक यांची स्थिति असते. त्यांचे हातून अन्याय झाले तर ते अपरिहार्य म्हणून होतात, त्यांचीं कृत्यें क्रांतिकारक खरीं पण त्यांतही कांहीं उपायकारक, कांहीं उपयुक्त असतें. फ्रेंच राज्यक्रांति या गोष्टींना अपवाद नव्हती. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तीन घोषणा

फ्रेंच राज्यक्रांतीच्या होत्या. नेपोलियननें अनेक राज्यें फ्रान्सला जोडलीं, पण जेथें जेथें त्याचे सैन्य गेलें त्याबरोबर या कल्पना पण गेल्या हें तितकेंच खरें आहे. प्राचीन काळीं राज्यें लहान होतीं, नगरराज्यें होती. त्यांचा उद्देश काय असे, त्यांचा हेतु काय असे याचा उल्लेख पूर्वींच केला आहे. एखादें शहर अगर लहानसा प्रदेश यापेक्षां जास्त विस्तार राज्याचा नसे. त्या राज्याचा संस्था त्याचे विस्ताराचे दृष्टीनें पुरेशा होत्या. राज्यविषयक मीमांसा त्या वेळचे विचारवंतांनीं जी केली तीही त्याच दृष्टीनें केली. याचा अर्थ असा नव्हे कीं, प्लेटो व ॲरिस्टॉटल यांच्या तत्त्वज्ञानाचा उपयोग फक्त नगरराज्यापुरताच होता. मनुष्यांचे परस्परांतील संबंध व व्यवहार यांचा अभ्यास करून त्यांचें नियमन करावें ही प्लेटोची विचारसरणी प्रत्येक सामाजिक शास्त्रांचा एक मूलभूत सिद्धांत आहे. त्याचप्रमाणें ॲरिस्टॅटलच्या तत्त्वज्ञानाचे मुख्य सूत्र म्हणजे सर्व नागरिक नैतिक दृष्ट्या सारखे; राज्याचा आधार, शक्तिपेक्षां संमति हा अधिक आहे व संमतीनें विचारविनिमय होऊन कायदे व्हावेत व त्याप्रमाणें राज्याचा कारभार चालावा. हे अद्यापीही राजकीय तत्त्वज्ञानाचें प्रमुख सिद्धांत आहेत. परंतु नगरराज्यांपलीकडे त्यांची दृष्टि गेली नाहीं. नागरिक म्हणजे त्याला प्रत्यक्ष कारभारांत भाग घेतां आला पाहिजे. राज्याचा विस्तार मोठा असेल तर हें शक्य नाहीं. प्रतिनिधिद्वारां हें शक्य आहे याचा शोध त्या वेळी व पुढें कित्येक शतकें लागला नव्हता. राज्य म्हणजे असें असलें पाहिजे कीं, एका टोकाला कांहीं झालें कीं लागलीच सर्वत्र कळलें पाहिजे. बॅबिलोन एका कोटांत वसलें होतें पण एका बाजूचें शहर शत्रूनें घेतलें तरी दुसऱ्या बाजूस तें कळलें नाहीं म्हणून बॅबिलोन हे खरें राज्य नव्हतें. त्याच स्थानांत, तीच जमात अगर त्याच जातीचे लोक सारखे पिढ्यानु पिढ्या राहिले तरी तेंच राज्य राहिले असे ॲरिस्टॅटलचें मत नव्हतें. एकाच नटवर्गानें आनंदपर्यवसायी व शोकपर्यवसायी अशीं दोन नाटकें केलीं म्हणून तीं दोन, एक नाटक होऊं शकत नाहींत. राज्यघटना जोंपर्यंत एक आहे तोपर्यंत राज्य आहे. क्रांति झाली कीं राज्य बदललें, जुनें गेलें नवें आले. म्हणून जुनें व नवें एक नव्हे असें त्याचें म्हणणें असे. आंतरराष्ट्रीयदृष्ट्या हें जर खरें मानलें तर आज अनेक अनर्थ घडून येतील. कांहींही शाश्वति आंतरराष्ट्रीय तहनामे व तडजोड याबाबत राहाणार नाहीं. पण त्या वेळीं राज्याराज्यांतील व्यवहाराचे नियंत्रणाचा अगर नियमनाचा प्रश्न फारसा उपस्थित झाला नव्हता. त्या वेळचे पंडितांपुढें राज्य म्हणजे नगरराज्यें एवढींच कल्पना होती. स्वयंपूर्णता, आपल्या गरजा आपणच भागवावयाच्या व सर्व नागरिकांनीं राज्यकार-भारांत भाग घ्यावयाचा या दोन मुख्य आधारभूत कल्पना नगरराज्याच्या होत्या

व त्या दृष्टींनीं त्यांनीं विचार केला; पण स्वयंपूर्णता पुढें पुढें अशक्य झाली. एक तर अलग राहावे अगर अन्य राज्यांशीं व्यवहार करावा. व्यवहार सुरू झाला म्हणजे तहनामे आले, संघ आले म्हणजे स्वातंत्र्य थोडेसे मर्यादित झाले. अलग राहिले तर शेवटीं नाश होणार हें स्पष्ट होतें. आजही राष्ट्रांची तीच स्थिती आहे. स्वयंपूर्णता ठेवावी तरी अडचण. आंतरराष्ट्रीय व्यवहार वाढवावा तर आंतरराष्ट्रीय नियमन व त्याबरोबर 'प्रभुत्वास' मर्यादा आलीच. ग्रीस देशांत लहान संघ मग निर्माण झालें. पण त्यांतून कायम व स्थैर्यशील अशी राज्यें निर्माण झाली नाहींत. राज्यकारभारांत भाग घेणें म्हणजे श्रेष्ठ जीवन तेही जसजसे संघ आले तसतसे अशक्य झालें. शिकंदरनें नाना प्रदेश जिंकले व त्यांची व्यवस्था राजसत्ता (Monarchy) स्थापून केली पण सामाजिक व राजकीय प्रश्न जें नगरराज्य सोडवूं शकले नाहीं ते राजसत्ता स्थापून पण सुटले नाहींत. नगरराज्यांत मनुष्य हा नागरिक म्हणजे राज्याचा एक अंश होता. शिकंदरच्या राज्यांत मनुष्य म्हणजे एक व्यक्ति असे स्वरुप आले. त्याचें-पुढें स्वतः कसें वागावें व जगांत इतरांशीं कसे वागावे असे विचार उभे राहिले. दोन्हीसाठीं दोन तत्वज्ञाने निर्माण झाली. नगरराज्यांत अगदी एकाकी असें त्याला वाटत नसे, कारण प्रत्येक कारभारांत तो सहभागी असे. आतां त्याला स्वतःचें जीवन एका अर्थानें एकाकी झालें असें वाटणें साहजिक होतें. नसेंच इतरांशीं वागतांना जी परिस्थिति लहानशा नगरराज्यांत होती ती आतां राहिली नाहीं. समाज मोठा झाला, व्यापक झाला व त्यामुळें त्यांतील व्यक्तिगतपणा साहजिक कमी झाला. प्रत्येकजणाला अलग अलग असें वाटूं लागले व या परिस्थितींत समाधानप्राप्तीसाठीं त्याचे लक्ष अधिक अधिक तत्त्वज्ञानाकडे व शेवटीं धर्माकडे लागलें. अधिक अंतर्मुख तो झाला. कांहीं तरी चिरंतन, कांहीं तरी उदात्त हवे अशी तीव्र जाणीव होऊन मनुष्यें स्वतः-साठीं 'आत्मा' ही उदात्त कल्पना रचत होतीं; तो भाव जागृत होत होता.

एकीकडे व्यक्तिजीवनाबाबत नवें तत्त्वज्ञान तयार होत होतें तर त्याजबरोबर त्यानें समाजांत कसें राहावें याचाही विचार होत होता. सर्व लोकांच्यांत कांहीं तरी समान आहे व तें सार्वत्रिक आहे हें स्पष्ट होऊं लागलें. नगरराज्यांत व्यक्ति, नागरिक कारभारांत भाग घेई. त्यामुळें त्याचें महत्त्व कार्यावर होतें. आतां कार्याव्यतिरिक्त मनुष्याची मान्यता उभी करावयाची होती. व्यक्तीचें महत्त्व राखून समाजाचे प्रचंड अस्तित्वाशीं त्याची सांगड घालावयाची होती. नगरराज्यांतील सर्व व्यक्ति सारख्या ही समता जशींचे तशी येणें शक्य नव्हतें. म्हणून परमेश्वरापुढें सर्व सारखे, कायद्यापुढें सर्व सारखे, काळा गोरा, श्रीमंत गरीब असा कांहीं भेद वस्तुस्थितींत असेल, पण

परमेश्वर व कायदा यापुढें तो नाहीं अशी विचारसरणी आली. या दृष्टीनें मनुष्यें सारखीं आहेत येवढाच विचार सिद्ध झाला असें नाहीं. कायदा हा संमतीवर असला पाहिजे, बलावर आधारलेला तो नसावा हीही कल्पना स्वीकारली गेली. नगरराज्याचा कायदा मोठ्या व्यापक कायद्याचा एक भाग झाला. राज्यसत्ता ही एक केंद्रीकरण करणारी शक्ति ठरली. राजा राज्याचा प्रमुखच नव्हे, तर राजा म्हणजे राज्य असें हळूहळू झालें. सर्व मुलुख एकत्र ठेवील, एकसंधि ठेवील अशी दुसरी शक्ति नव्हती. स्थानिक कायदे, स्थानिक रीतिरिवाज राहिले, पण राजाचा असा स्वतंत्र कायदा होता व राजा म्हणजे एकीचें व सुराज्याचे प्रतिक जाहलें. ग्रीक व अन्य प्रजा यांना एकत्र ठेवणें या कामासाठीं राजसत्ता अनियंत्रित होणें अपरिहार्य ठरलें. राजसत्तेला पौर्वात्य देशांत दैवी प्रतिष्ठा होती तशीच येथेही आली. राजा एक देवता समजण्यांत येऊं लागला व हीच भावना पुढें रोमन सम्राटाविषयीं पण आस्तित्वांत आली. राजा हा दैवी अंश आहे, त्याचा राज्य करण्याचा दैवी हक्क ही कल्पना आधुनिक युगाचे सुरवातीपर्यंत कायम राहिली. या कल्पनेनें राजाच्या अधिकाराला एक भक्कम आधार मिळाला. त्याचा कायदा हा केवळ त्याचा हुकूम नव्हे, केवळ त्याची इच्छा नव्हे असा भाव उत्पन्न होऊन त्याला अधिक महत्त्व प्राप्त झालें, त्याला सातत्य व सनातनत्व आलें. या तात्त्विक वातावरणांत व्यक्तींना राजाला मानणें, त्याच्या आज्ञा पाळणें यांत अप्रतिष्ठा अगर अनैतिक असें कांहीं वाटण्याचें कारण नव्हतें. परमेश्वर सर्व सत्ताधीश व सर्वांचें चांगले करणारा, त्याचा अंश राजा तोही त्याच स्वरूपाचा असणार. परमेश्वरानें सर्व सृष्टींत एक व्यवस्था निर्माण केली आहे, त्या व्यवस्थेला अनुरूप असें वर्तन व्यक्तींनीं ठेवलें पाहिजे. जगांत एकंदर विवेक, सौजन्य व सद्‌भावना यांचेंच महत्त्व आहे. सर्व मनुष्यें परमेश्वराचीं लेंकरें आहेत म्हणून सर्व बंधुबंधु आहेत. या विचारसरणींतून जागतिक राज्याची कल्पना उद्‌भूत झाली. कायदा हा सर्वांच्या वर्तनाला नियमन करणारा, योग्य कोणतें अयोग्य कोणतें हें सांगणारा, म्हणून न्याय्य कोणतें, अन्याय्य कोणते याचें तो प्रमाण आहे. काय करावें व काय करू नये हे समाजाला सांगण्याचें काम त्याचें आहे. राज्यांत असलेल्या निरनिराळ्या शहरांतील रीतिरिवाजांत विरोध आला म्हणजे त्यांचा निर्णय करावा लागे व तो करतांना ज्या तत्त्वांचा, ज्या कल्पनांचा विचार होई, त्यांतून हळूहळू एक सार्वत्रिक स्वरूपाचा कायदा तयार होऊं लागला, कांहीं न्यायाचे सिद्धान्त प्रतिष्ठित होऊं लागले. जे शहराचें कायदे न्यायाचे दृष्टीनें अपुरे पडत त्यांना पुरे करण्याचें काम या सिद्धांतांनीं केलें. या सिद्धान्तांवर आधारलेला न्याय म्हणजे नैसर्गिक कायदा असें म्हणण्यांत

येऊं लागलें. व्यापक व विस्तारपूर्ण असलेल्या राज्याला अनुरूप अशी न्यायविषयक व्यवस्था अस्तित्वांत येऊं लागली.

रोमन साम्राज्यांत अनेक प्रांतांतून व प्रदेशांतून नाना रीतीरिवाजांचे लोकांशीं व्यवहार सुरू झाले, तेव्हां त्यांचें नियमन करणारा कायदा रचतांना या नैसर्गिक कायद्याचे तत्त्वांची फार मदत झाली असे दिसून येतें. न्याय सर्वांना मिळाला पाहिजे, सारखा मिळाला पाहिजे वगैरे नैसर्गिक कायद्याचे तत्त्वांचा प्रभाव राज्याचे कायद्यां-वर पडला. राज्याचा विस्तार वाढला. तें अधिराज्य जरी झालें तरी त्यांतील मनुष्येंही सर्व निसर्गतः सारखीं आहेत. सामाजिक परिस्थिति विषम असली तरी न्याय सर्वांना सारखा मिळाला पाहिजे. प्रजेची निष्ठा सक्तीनें न मिळवितां स्वसंतोषानें मिळविली पाहिजे, ही विचारसरणी कायम राहिली. शिकंदरनें प्रवर्तित केलेल्या राज्यसत्तात्मक व्यवस्थेचा वारसा रोमकडे गेला. सिसरोनें नैसर्गिक कायद्याचे कल्पनेला स्वीकारलें. जग परमेश्वरानें निर्मिलें आहे व परमेश्वराकडून जगाचा व्यवहार चालू आहे, त्या-साठीं परमेश्वराचा कांहीं कायदा आहे व मनुष्यें हीं परमेश्वरानें निर्माण केलेलीं आहेत व तीं स्वभावतः विवेकी व सामाजिक प्रवृत्तींचीं आहेत हें लक्षांत घेऊनच तो परमे-श्वरी कायदा निर्माण झाला आहे असें प्रतिपादून तो म्हणतो, "हा कायदा बदलण्या-चा कोणत्याही सेनेटला अगर लोकांना अधिकार नाहीं, हा सर्वत्र सारखा आहे. रोममध्ये एक, अथेन्समध्यें दुसरा असें त्याचें स्वरूप नाहीं. तो एक सनातन व अनंत काल राहाणारा आहे. तो सर्वांवर बंधनकारक आहे आणि सर्वांचा मालक व शास्ता एक व तो परमेश्वर आहे. तो या कायद्याचा निर्माता आहे. त्याचा अर्थ सांगणारा व त्याचा आधारही तोच आहे. हा कायदा अमान्य करणाराला मानवी शिक्षा मिळणार नाहीं, पण तो अमान्य करणारा पतित होईल." "राज्य ही लोकांची बाब आहे, पण वाटेल ते लोक एके ठिकाणीं आले म्हणून तें होत नाहीं. कायदे व हक्क यांबद्दल ज्यांच्यांत एकमत आहे व त्यानें एकत्र झालेले व एकमेकांचें हित साधण्याची इच्छा असलेले लोक म्हणजे राज्य." याचाच अर्थ कायदा व सत्ता यांवर लोकांचा अधिकार, राज्याची सत्ता लोकांकडून सामुदायिक रीतीनें मिळालेली. सिसे-रोनें कायदा व न्यायाधीश यांचें वर्णन अनुक्रमें 'मूक न्यायाधीश' व 'बोलका कायदा' याप्रमाणें केलें आहे. राज्य व राज्याचा कायदा या दोहोंवर परमेश्वराचें अगर नैतिक अगर नैसर्गिक कायद्याचें श्रेष्ठत्व आहे व असले पाहिजे असें त्याचें मत होतें. रोमन कायदेपंडितांनीं मुलकी कायदा, सार्वत्रिक कायदा व नैसर्गिक कायदा असे ३ भाग केले. विशिष्ट राज्याचा त्या राज्याचे हुकमानें अमलांत आलेला

तो कारक कायदा [ Positive Law ] होय. दुसऱ्यांत व तिसऱ्यांत त्यांना भेद फारसा दाखवितां येत नसे. तथापि, राज्याचे कारक कायद्यांपेक्षां कांहीं तरी श्रेष्ठ असा कायदा पाहिजे व आहे असें त्यांचें निश्चित मत होतें. त्याचें स्वरूप सिसरोनें वर्णन केल्याप्रमाणेंच आहे असेंही ते मानीत. कारक कायद्यापेक्षां श्रेष्ठ असा नैसर्गिक कायदा [ Natural Law ] आहे व तो मनुष्याचे उपजत अशा विवेकबुद्धीवर व त्याचे सामाजिक स्वभावप्रवृत्तीवर आधारलेला असून त्याच्याशीं तुलना करून राज्यांतील कारक कायदा योग्य ठरला पाहिजे ही कल्पना प्राचीन काळापासून अगदीं आधुनिक युगापर्यंत चालू होती. नैसर्गिक कायदा म्हणजे न्यायाचें प्रमाण व तें साधण्याचा, त्याचेबरोबर येण्याचा प्रयत्न कारक कायद्याचा असला पाहिजे. नैसर्गिक कायद्याचे तत्त्वांत समता, सारखेपणा, व्यवहारांतील सचोटी, क्रियेपेक्षां कार्याचे हेतूचें महत्त्व, तांत्रिकतेपेक्षां न्यायबुद्धीनें न्यायदान वगैरेंचा समावेश असे. नैसर्गिक कायद्याची प्रतिष्ठा उभारून समाजजीवनांत खरें न्यायदान मिळण्यास रोमन कायदेपंडितांनीं मदत केली. त्याचप्रमाणें राजाची सत्ता त्याला लोकांनीं दिलेली आहे व लोकांकडून प्राप्त झालेल्या अधिकारान्वयें रोमन बादशहा कायदे करतो हें तत्त्वही त्यांनीं स्वीकारलेलें होतें. कायद्याचें श्रेष्ठत्व हें व्यक्तिगत नाहीं, तात्त्विक आहे म्हणून कायदेशीर सरकारचा कायदा मानण्यांत अप्रतिष्ठा नाहीं, अनैतिक कांहीं नाही. उलट बेकायदेशीर पण यशस्वी जुलमी सत्तेपुढें मान वांकविणें अगर तिचा कायदा मानणें यांत अप्रतिष्ठा व अनैतिकपणा आहे हा भाव स्पष्ट झाला होता. 'आम्ही स्वातंत्र्यासाठीं कायद्याचे सेवक आहोंत' हें सिसरोचें वाक्य अर्थपूर्ण आहे. ही विचारसरणी रोमन साम्राज्य जुलमी झालें तेव्हांही टिकून राहिली व त्यानंतरही टिकून होती.

रोमन तत्त्वज्ञ सेनेकानें राज्य या कल्पनेला नवीन कलाटणी दिली. ॲरिस्टॉटलपासून राज्य हें व्यक्तिविकासाला, प्रगतीला आवश्यक असा सिद्धांत होता. माणसें शुद्ध राहिलीं, सदाचरणी राहिलीं तर राज्याची आवश्यकता नाहीं आणि पूर्वी नव्हती असें प्रतिपादून त्यानें राज्य हें समाजांतील दुष्टपणा घालविण्यासाठीं अवश्य झालें असें मत मांडलें. त्याचे विचारसरणीनें नागरिकत्वाचें वैभव व प्रतिष्ठा जाऊन एक सब घोडे बारा टक्के स्वरूपाची समता येते. राज्य हें मनुष्याचे विकासाचे पूर्णत्वाचें साधन न राहातां शक्तीचे जोरावर समाजांत कांहींतरी जीवन शक्य करणारी एक घटना होतें. सेनेकाची ही विचारसरणी खिश्चन उपदेशक व धर्मवेत्ते यांनी एक विशिष्ट अर्थानें स्विकारून समाजधारणेसाठीं तिचा उपयोग केला. खिश्चन धर्म हा मुक्तिधर्म आहे, राजकीय तत्त्वज्ञान नाहीं, हें जरी खरें असलें तरी वाढत्या प्रसारा-

बरोबर एक राजकीय तत्त्वज्ञान त्यांतून निघालें हेंही पण खरें आहे. सुरवातीस विद्य मान तत्त्वप्रणालीप्रमाणें ख्रिस्ती धर्मोपदेशकाचें मत होतें हें स्पष्ट आहे. नव्या करारातील न्याय, आज्ञापालन, समता वगैरेंच्या कल्पना हेंच दर्शवितात. ज्यूंचा ईश्वरप्रणित कायदा व रोमन लोकांचा नैसर्गिक कायदा यांत फरक नाहीं असें स्वच्छ मत अनेक धर्मोपदेशक यांनीं मांडलें आहे. " सीझरचें (राजाचे) असेल तें सीझरला द्या व देवाचें असेल तें देवाला द्या. " अशी खुद्द ख्रिस्तांची आज्ञा आहे. सेंट पॉल म्हणतो, " जी सत्ता आहे ती परमेश्वराची आहे, ती त्यानें दिली आहे. तिला विरोध करणें म्हणजे त्याला विरोध करणें आहे. जे विरोध करतील ते शापित होतील. राज्यकर्ते हे सत्कृत्यासाठींच आहेत. राजा दुष्कृत्यांना शासन करण्याकरितां आहे. देवाचा तो सेवक आहे. म्हणून शासनभयास्तव व सदसद्विवेकबुद्धीनेंही त्याचें माना. करभार ज्याचा त्याला द्या, रीतीचे असेल तें रीतीनें द्या. भीतीचे असेल तें भीतीनें द्या, मान ज्याचा असेल त्याला तो द्या, सर्वांचें जें असेल तें त्यांना द्या. " तत्कालिन समाजांत असलेली अस्वस्थता जाऊन सुव्यवस्था व्हावी म्हणूनही हा उपदेश केला असण्याचा संभव आहे. आज्ञापालन हें देवानें सांगितलेलें कर्तव्य आहे, ही मुख्य गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. देवानें आज्ञापालन सांगितलें यातून राजा हा दैवी आहे हा भाव निघतोच. तथापि, राजा म्हणजे संस्था; तो अधिकार दैवी आहे, ती चालविणारी व्यक्ति दैवी नाहीं ही गोष्ट सेंट पॉलचे लिखाणांत स्पष्ट दिसून येते. वाईट राजा असेल तर तें पापाचें प्रायश्चित आहे म्हणून त्याचें ऐकून भोगलें पाहिजे असें प्रतिपादलें जात होतें. रोमन तत्त्वज्ञानाप्रमाणें लोकसंमतीनें कायदा होत असल्यामुळें तो सनदशीर व योग्य असाच होईल हा भाव त्यांत होता. आज्ञापालनामागील तत्त्वज्ञानांत याप्रमाणें उघड फरक होता. ख्रिस्तीधर्माप्रमाणें राजाचें ऐकावें हें खरें, तथापि राजाज्ञा व देवाची आज्ञा यांत विरोध आल्यास देवाची आज्ञा मानावी हा सिद्धांत स्पष्ट होता. या जगापेक्षां श्रेष्ठ अशा मुक्तिसाठीं सत्यधर्म देवानें सांगितलेला आहे. त्या कामीं कोणी राजा अडथळा घालूं शकत नाहीं. राजाज्ञेचें पालन धर्माविरोधेन करावयाचें हें अगदीं सरळ होतें. कांहीं तरी अध्यात्मिक जग आहे ही भावना पूर्वीपासून होतीच. तथापि राज्याशीं तिचा संबंध नव्हता. अनेक शहरें, अनेक जाती अनेक प्रदेश एकसूत्रांत आणण्यासाठीं अर्वाचीन एकराष्ट्रीयत्वाचे अभावी धर्म हीच एक प्रभावी शक्ति होती. शिकंदर व त्याचे पश्चात् आलेले राज्यकर्ते यांनीं या शक्तीचा प्रत्यक्ष प्रभाव पौर्वात्य देशांत पाहिला होता. थोडेसें अनुकरण रोममध्यें सुरूही झालें होतें. नीति व धर्म हे दोन्ही राज्यांत एकत्र झालेले असून राजा हा सत्ता

धीश व धर्माचाही अधिकारी अशी त्याची भूमिका झालेली होती. खिस्तीधर्म राजाला धार्मिक श्रेष्ठता व अधिकार देण्यास तयार नव्हता. राजा खिश्चन असला तरी तो खिस्ती-धर्मात आहे त्यापेक्षां अधिक नाहीं. खिस्तीधर्मानें (Church) राज्याचें क्षेत्र हळूहळू निश्चित केलें. धर्मात त्याचा अधिकार नाहीं. धर्मपीठांच्या जमिनीवर व संपत्तीवर त्याचा अधिकार नाहीं. मनुष्याची प्रवृत्ति द्विविध असते, ऐहिक व परमार्थिक; त्याचे जीवनांत हे दोन प्रवाह सारखे वाहात असतात. एका प्रवृत्तिसाठीं, ऐहिक समाज त्यांतील वैभव व त्यांतील आसक्तीच्या भावना; दुसरे प्रवृत्तीसाठीं दुसरा समाज देवाची नगरी' (City of God) जेथें आध्यामिक जीवन व दैवी शांति मिळणें शक्य आहे. एकांत सैतानाचें राज्य, दुसरें प्रभु येशूचें राज्य. या दोन राज्यांत अनंत कालापासून चालत आलेला संघर्ष म्हणजे इतिहास, अखेरचा विजय दुसऱ्यास मिळणार हें निश्चित म्हणून रोमचें पतन झालें, याप्रमाणें सेंट ऑगस्टीननें रोमच्या नाशाचा अर्थ लावला. खिस्ती धर्माचा इतिहास म्हणजे परमेश्वराचा सैतानावरील मोर्चाचा इतिहास ठरला. सर्व मानव-वंश म्हणजे एक कुटुंब. मनुष्याचें जीवन म्हणजे परमेश्वर व त्याचे शत्रु यांच्यांतील लढ्याची रणभूमि, इतिहास म्हणजे सर्वाचे मोक्षाची हळू हळू स्पष्ट होणारी दैवी योजना म्हणून सर्व मानववंशानें खिस्ती होऊन खिस्ती धर्माचें नेतृत्व स्वीकारलें पाहिजे असें प्रतिपादलें जाऊं लागलें. अखेर राज्य हेंही खिश्चन राज्य असलें पाहिजे. सर्व समाज खिस्ती असला पाहिजे व खिस्तीधर्म अध्यात्मिक मुक्तीसाठीं आहे म्हणून राज्यापेक्षां श्रेष्ठ असला पाहिजे ही विचारसरणी प्रभावी झाली. हीच विचारसरणी पुढें झालेल्या 'पवित्र रोमन साम्राज्याचे,' (Holy Roman Empire) बुडाशीं होती. ज्या राज्यांत परमेश्वराचें परमेश्वराला दिलें जात नाहीं, तेथें न्याय असूंच शकत नाहीं. म्हणून राज्य खिस्ती असलें पाहिजे म्हणजेच तें न्याय्य असेल. राज्याचे अस्तित्व व आवश्य-कता न्यायासाठीं या तत्वज्ञानाचा असा अर्थ लावण्यांत आला. सर्व समाज खिस्ती तत्त्वावर संघटित होऊं लागल्यानंतर राज्यही त्याचे परिणामापासून अलिप्त राहाणें अशक्य होतें. धर्माप्रमाणें राज्यांतही सर्व मानवजात आली पाहिजे. धर्माचें स्वरूप सार्वत्रिक मानल्यानें राज्यालाही सार्वत्रिक स्वरूप आलें. पूर्वी सार्वत्रिक राज्याची कल्पना नव्हती असें नाहीं. पण आतां त्याला धर्माचा आधार मिळाला, नगरांतील संकुचित प्रदेशांतील राज्य धर्माचे प्रतिष्ठेवर व्यापक झालें. पवित्र रोमन साम्राज्य हें त्याचें स्वरूप होतें.

पवित्र रोमन साम्राज्याचा नाश झाल्यानंतर मोठ्या विस्ताराचें राज्य युरोपांत राहिलें नाहीं. या साम्राज्याचा नाश करणाऱ्या जर्मन रानटी टोळ्यांच्या कल्पना, त्यांचे

रीतिरिवाज हळूहळू सर्वसामान्य राजकीय विचारांशी सांधमोड होऊन जुळूं लागले. टोळीचा कायदा म्हणजे ‘ लोककायदा ’ रीतिरिवाजावर आधारलेला असे. टोळींतील सर्वांना तो लागू असे. त्याचें स्वरूप यामुळें व्यक्तिगत होतें. फिरणाऱ्या टोळ्या जेथें जातील तेथें ते आपले रीतिरिवाज घेऊन जात, आपला कायदा घेऊन जात. या टोळ्या स्थायिक नसल्यामुळे प्रादेशिक स्वरूप असें त्यांचें कायद्याला आलें नव्हतें. जिंकलेल्या प्रदेशांत स्थायिक झाल्यानंतर स्थानिक समाजांत ते कालांतरानें मिसळून गेले व मग कायदा स्थानिक, प्रादेशिक झाला. कायदा व्यक्तिगत असला म्हणजे त्यांत सारखेपणा नसतो. धर्मागणिक जमातीगणिक कायदा निराळा असला म्हणजे व्यवहार सुलभ होत नसतात. कायद्याची अंमलबजावणीही अडचणीची असते. कायदा स्थानिक असला म्हणजे त्यांत सारखेपणा असतो. त्यानें व्यवहारांत सुलभता येते, त्याची बजावणी करणेंही सुलभ जातें. ‘ लोककायदा ’ हा पुढे स्थानिक झाला तरी त्याचेमागील कल्पना बराच काल कायम होती. लोककायदा म्हणजे लोकांनीं तयार केलेला व त्यांत लोकांना बदल करण्याचा अधिकार आहे अशी कल्पना त्याचेमागें नव्हती. तो न बदलणारा, सनातन स्वरूपी आहे अशी श्रद्धा होती. तो काय आहे हें सांगण्याचें काम ‘ लोकांचे ’ आहे व राजा जेव्हां काय कायदा आहे हें जाहीर करी त्या वेळीं सर्व लोकांचे सल्ल्यानें जाहीर करतो कीं, असा मंत्र म्हणे. काय कायदा आहे हें ज्यांच्यावर त्याची अमलबजावणी होणार आहे त्यांचा कायदा आहे व त्यांचे सल्ल्यानें तो जाहीर झाला पाहिजे. हें तत्वज्ञान मध्ययुगांतील व्यवहारांत स्पष्ट दिसून येतें. कायदा जाहीर करण्यांत राजाचा एक भाग आहे. पूर्वी जाहीर केलेले कायदे बंधनकारक म्हणून विद्यमान राजाला मानावे लागे; नवीन जाहीर करतांना जनतेची संमति व सल्ला घ्यावी लागे. कारण त्यांचा कायदा जाहीर करावयाचा असे. कायद्याला, न्यायाला धरून वागेन अशी शपथ राज्यारोहणाचे वेळीं घ्यावी लागे. या रीतीनें राजा कायद्याचे अंमलाखालीं असे. रोमन कायदेपंडिताचे मतानें राजाचा, बादशहाचा कायदेशीर हक्क रोमनजनतेचे संमतीवर आधारलेला. मात्र एकदां अधिकार दिल्यानंतर तो कायमचा बादशहाला मिळे. मध्ययुगीन राजाचा अधिकार त्याला सतत जनतेशीं सहकार्य करूनच चालविणें जरूर होतें; कारण प्रत्येक कायदा जाहीर करतांना जनतेचा सल्ला ही आवश्यक शर्त होती. राजा हा राज्याचा एक भाग होता, प्रमुख अगर प्रभु नव्हता. एकसूत्रीपणाची आवश्यकता नव्हती. कारण राज्याचा विस्तार मोठा नव्हता. राजा वारसाहक्कानें येई, तथापि त्याची निवडणूकपण होत असे. वारसच निवडला जाई हें खरें, पण निवडणुकीचा समारंभ होई हेंही खरें. म्हणजे लोकसंमतीची आव-

श्यकता मानली जाई. केवळ वारशानें राज्यावर हक्क सांगतां येत नसे. वारशानें हक्क उत्पन्न होई, निवडणुकीनें त्याला मान्यता मिळे व प्रभुकृपेनें तो राज्य चालवी अशी परिस्थिति होती. या तीन तत्त्वांना विरोधक अशी परिस्थिति असेल तर राज्यसत्तेला विरोध करण्याचा नैतिक हक्क नव्हे तर कायदेशीर हक्कही आहे हें मानलें जाई.

कायदा म्हणजे लोकांचे मालकीचा, त्याचा संबंध लोकांशीं, यामुळें आणखी कांहीं राजकीय कल्पना त्यापासून निर्माण झाल्या. रोमन साम्राज्याचा नाश झाल्यानंतर मोठ्या विस्तारानें राज्य राहाणें शक्य झालें नाहीं. सर्वत्र अव्यवस्था व अस्वस्थता उत्पन्न झाल्यामुळें व्यवस्था ठेवतां येईल इतक्या बेतानें राज्याचा विस्तार राहूं लागला. जमिनीचें महत्त्व सर्वांत जास्त म्हणून व तीवर सर्व अवलंबून असल्यामुळें ज्यांचे हातांत जमीन त्यांचें महत्त्व वाढलें. गांवांतील जमीन वहिवाटीप्रमाणें ज्यांचे हातांत होती त्यांचें—व्यक्ति अगर जमात—महत्त्व वाढलें. प्रत्येक गांव आपले मामुली रक्षणाची व्यवस्था करी. समाज व राज्यव्यवस्था याप्रमाणें स्थानिक दृष्टीनें संघटित झालेली होती. मध्यवर्ती राज्यसत्ता दूरवरचे जीवित व वित्त यांचें संरक्षण करण्यास असमर्थ होती. कोणावर तरी गांवच्या लहानसहान खातेदार लोकांना अवलंबून राहाणें आवश्यक झालें व यांतून सरंजामशाहीचें संघटन उभारलें गेलें. उत्पन्न झालेले संबंध दोन प्रकारचे होते. एक व्यक्तिविषयक व एक संपत्तिविषयक. मोठे खातेदाराची चाकरी करून व आपली जमीन मालकीहक्कानें त्याला देऊन, खंडकरी म्हणून ती कसून व खंडाबद्दल चाकरी करून अगर माल देऊन लहान खातेदाराला रहाणें भाग पडलें. संरक्षण मिळालें पण मालकी गेली व चाकरी आली. कांहीं इसम संपत्तीनें व सत्तेनें गबर झाले व त्यांनीं लहानांचें संरक्षण करावें असें झालें. ज्यांच्याजवळ अफाट जमिनी होत्या तेही लहान लहान भागानें खंडानें देऊं लागले. सरंजामशाही म्हणजे जमिनीच्या भोगवट्याची एक पद्धत असें तिचे स्वरूप होतें. मालकी थोड्यांची, वहिवाट करणारे अनेक पण सर्व कुळें व खंड देणारे असें तिचें स्वरूप होतें. राजानें राज्यांतील जमीन सरदारांना, त्यांनीं आणखी कोणाला, त्यांनीं आणखी कोणाला याप्रमाणें एखाद्या पिरॅमिडप्रमाणें या व्यवस्थेचें स्वरूप होतें. पाया विस्तृत व शिखर अगदीं बिंदुवत्. जमिनीचा खंड म्हणून सरदारांना राजाला सैन्य द्यावे लागे व तीच गोष्ट क्रमाक्रमानें खालचे थरापर्यंत जाई. जमिनीबरोबर त्या त्या क्षेत्रांत न्यायदानाचा हक्कही सरदारांना मिळे. सरदारांचे नजराण्यावर, खंडावर राज्याचें उत्पन्न विशेषें करून अवलंबून असे. सैन्य, पैसा व न्याय या तिन्ही गोष्टींत राजा व प्रजा यांत अनेक पायऱ्या या व्यवस्थेनें उत्पन्न झाल्या. राजाचा अंमल अप्रत्यक्ष झाला, सत्ता जास्त प्रमाणांत विभागलेली व

विकेंद्रित झाली. जमिनीबाबतची ही व्यवस्था सर्वत्रच पसरली. सरकारी हुद्दा, सरकारी चाकरी ही सुद्धां वारसहक्कानें जाऊं लागली. चाकरी हें वतन झालें. सरकारनें नेमणूक केली म्हणून अधिकार अगर चाकरी हें न राहातां मालकी हक्कानें वडिलोपार्जित वतनानें, वहिवाटीनें ती आहे असें झालें. काम करावयाचें येवढीच जबाबदारी फक्त या वतनी लोकांवर असते. राजा सर्व दृष्टीनीं नियंत्रित असा या व्यवस्थेनें झाला. सरदारांना त्यानें शर्तीवर जमिनी दिल्या तरी त्याला राज्याचे प्रमुख मानण्याकडे प्रवृत्ति होती. त्याला तसें न मानलें तर राजा व प्रजा हें नातें राहाणार नाहीं. त्याच्या बरोबरीची सत्ता अन्य कोणाला आहे असें मानलें तर तीच आपत्ति येते म्हणून कायदेपंडित तो श्रेष्ठ आहे असें प्रतिपादित. पण परमेश्वर व कायदा हे त्याचेपेक्षां श्रेष्ठ आहेत असें बजावत. कायद्यानें त्याला राज्य व सत्ता दिली म्हणून त्यानें कायद्याला त्याचें योग्य तें दिलें पाहिजे. कायद्याऐवजीं जर राजाची इच्छा राज्य करूं लागली तर तो राजाच होऊं शकत नाहीं हा सिद्धांत स्पष्टपणें सांगण्यांत येत असे. कायदा हा त्याचा लगाम आहे तो नसेल तर घातला पाहिजे असें स्पष्ट मत ब्रॅकटननें दिलें आहे. राजा राज्यांतील जमिनीचा मालक होता व सरदार, त्याचीं कुळें व त्याचबरोबर न्यायदान करणारे न्यायाधीश असत. राज्यांतील तो प्रमुख अधिकारी होता पण हा अधिकार तो सहकार्यानें चालवी. खाजगी कामांत, खाजगी संबंधांत सार्वजनिक अधिकार समाविष्ट झालेला दिसत असे; त्याचबरोबर परंपरेप्रमाणें राज्याचें प्रमुख पद, राज्याचा प्रमुख न्यायाधीश म्हणूनही तो होता. परंतु सर्व अधिकार त्याचे हातांत केंद्रित झाले नव्हते हें उघड होतें. या परिस्थितींतून पुढें राजाचें सल्लागार मंडळ व शेवटीं विधिमंडळ वगैरे संस्था निर्माण झाल्या.

ख्रिस्तीधर्म हा रोमन बादशाहीचा धर्म झाला, पण त्यानंतर राज्य व धर्म यांच्यांतील तंट्यास सुरवात झाली. ऐहिक व पारमार्थिक कल्पनेच्या बाण्या व ताण्यानें ख्रिस्तीधर्मबुद्धीचें महावस्त्र विणलें होतें. मनुष्याच्या जीवनाचे दोन भाग आहेत म्हणून त्यावर नियंत्रण ठेवणाऱ्या दोन सत्ता आहेत. एक राज्य व एक धर्मपीठ; व दोन्ही सत्ता एकवटणें हे धर्मदृष्ट्या अशक्य होतें. नैसर्गिक कायद्याप्रमाणें एका सत्तेनें चालावें व परमेश्वरी कायद्याप्रमाणें दुसरीनें चालावें असें झालें म्हणजे उभयतांत संघर्ष येण्याचें कारण नव्हतें. उलट या महान् योजनेच्या दोन भागांत सहकार्याची अपेक्षा ठेवली होती. दोन्ही सत्तेचे प्रजाजन एकत्र होते. सर्व समाज ख्रिश्चन होता. तथापि प्रसंगानें एकमेकांनीं एकमेकांचा अधिकार चालविला होता. रोमच्या पडत्या काळांत सर्वस्वीं पोप ग्रेगरी यानें राज्याचा कारभार पाहिला होता. त्याचप्रमाणें

शार्लमेननें धर्माधिकारी व सामान्य प्रजा या सर्वांवर आपला अधिकार आहे असें समजून वर्तन केलें. धर्मगुरूंनीं राज्याभिषेक केला म्हणून धर्माचें श्रेष्ठत्व सांगावें हें पुढें वाद सुरू झाल्यावर सुरू झालें. पोपच्या निवडणुकींत अनेक वेळां बादशहांनीं हात घालून ढवळाढवळ केली होती हीही गोष्ट अधिकाराचा दाखला म्हणून वाद सुरू झाल्यानंतर पुढें आली. राज्याचे, बादशाहीचे तंत्रानें वागण्यांत धर्माविरुद्ध वर्तन होतें असें म्हणणारा वर्ग प्रथम कॉस्टँटिनोपल येथील धर्मोपदेशकांत निघाला. धर्माचा उद्देश मुक्ति आहे, ऐहिक सुख नाहीं अगर ऐहिक राज्यव्यवस्था पाहाणें हाही नाहीं. धर्मोपदेशक हा राजाला जबाबदार नाहीं, देवाला आहे अशी त्यांची विचारसरणी होती. धर्माची प्रगति जशी युरोपभर होत गेली त्यामानानें धर्मपीठांचें संघटन अधिक दृढ झालें, त्यांतील सत्ता केंद्रित झाली. धर्मपीठाचा मुख्य, धर्मगुरु पोप याचें महत्त्व वाढलें, सत्ता वाढली. देशोदेशीं मठ स्थापन झाले. जमिनी मिळाल्या. संपत्तीचा संग्रह धर्मपीठांत होऊं लागला. 'अखंड कलहाचें कारण' संपत्ति हें पुनः अनुभवास आलें. वादाचें स्वरूप तात्त्विक दिसत असलें तरी ज्या वेळीं वाद रंगांत आला त्या वेळीं तें तसें राहिलें नाहीं. राजा झाला तरी तो खिश्चन आहे म्हणून तो धर्मसत्तेखालीं येतो. तो जर धर्मपीठाचे निर्णय न मानील तर त्याला बहिष्कृत करण्याचा हक्क धर्मपीठाला आहे. तो खिश्चनच राहिला नाहीं तर प्रजेनें त्याला निष्ठावन्त राहण्याचें कारण नाहीं, म्हणजेच राजाला पदच्युत करण्याचा अधिकार धर्मपीठाला आहे असा दावा सांगण्यांत येऊं लागला, प्रत्येक खिश्चन मनुष्यावर धर्म व नीति या क्षेत्रांत धर्मपीठाचा एकमेव अधिकार आहे. या उलट राजसत्तेतर्फे असें प्रतिपादण्यांत येई कीं, सत्ता परमेश्वराची आहे, परमेश्वरानें राजाला सत्ता दिली म्हणून राजा परमेश्वराला जबाबदार आहे. परमेश्वरच त्याला पदच्युत करूं शकतो. जोंपर्यंत राजा खिस्ती आहे तोंपर्यंत त्याला पदच्युत करण्याचा कोणालाही अधिकार नाहीं. रोम हें साम्राज्याचें केंद्र होतें म्हणून पोपचें महत्त्व वाढलें. वास्तविक पोप हें धर्मपीठ नव्हे, तो धर्मगुरू नव्हे. जे खरोखर महात्मे आहेत व देवपुत्र आहेत तें खरें देवाचें धर्मपीठ. धर्मगुरूंनीं ऐहिक बाबतींत लक्ष घालण्याचें कारण नाहीं. त्यांचें तें क्षेत्र नाहीं. 'राजाचा अधिकार कोणीही काढूं शकत नाहीं.' राजातर्फे मांडलेल्या विचारसरणीला उत्तर म्हणून राज्यमीमांसक अशी विचारप्रणाली पुढें करण्यांत आली. सत्ता व कायदा हे न्याय देणारे असले पाहिजेत. राजाचे अधिकार म्हणजे त्या पदाचे अधिकार नष्ट करतां येतात. ज्या कार्याकरितां राजा हें पद निर्माण झालें तें कार्य जर विद्यमान व्यक्तीकडून होत नसेल तर न्याय्य वर्तन करण्याचा करार त्या व्यक्तीनें मोडला. तेव्हां "विवेकी

बुद्धि असें सांगते कीं, प्रजेनें त्याला निष्ठावंत राहाण्याचे कारण नाहीं, त्याच्या आज्ञा पाळण्याचें कारण नाहीं." अशी परिस्थिति झाली म्हणजे वस्तुस्थिति जाहीर करण्याचें काम पोपचें आहे. कारण सदसद्विवेकबुद्धीचें श्रेष्ठ न्यायालय म्हणजे पोप अशीं विचारसरणी मॅनेगोल यानें मांडली होती. जें अप्रामाण्य व अयोग्य झालें तेंच पोपनें रद्द करून टाकलें असा अर्थ यांतून निघतो. पण जें अयोग्य अगर अप्रामाण्य होणार अगर होत असेल त्याच्याशीं पोपचा संबंध नाहीं, क्रियेशीं संबंध नाहीं, कृत्य झाल्यानंतर त्याचा अधिकार येतो. म्हणून राजसत्ता ही पोपवर अवलंबून नाहीं, ती स्वतंत्र आहे असा त्यांतून श्लेष निघाला. एकमेकांविरुद्ध दाखले, परंपरा दाखविण्यांत येऊं लागल्या. राजा व परमेश्वर यांत कोणी मानवी मध्यस्थ नाहीं असें एक प्रतिपादी, तर समाजाला परमेश्वराचे छत्राखालीं राज्यसंघटन करण्याचा पूर्ण हक्क आहे, त्यांत राजाचे मध्यस्थीची जरुरी नाहीं असें दुसरा प्रतिपादी. या विचारसंघर्षांत विद्वत्तेपेक्षां वावदूकताच अधिक होती, श्रद्धेपेक्षां अंधविश्वासच जास्त दिसून येत होता. सामान्य जनता या वादविवादापासून अलिप्त होती. माळ्याचे मक्याबद्दल कोल्ह्यांचें हें भांडण ४।५ शतकें चाललें होतें!!

वरील वादविवाद चालू असतांना युरोपमध्यें विश्वविद्यालयें सुरू झालीं व विद्येला उत्तेजन मिळालें. पॅरिस व ऑक्सफर्ड येथील विश्वविद्यालयें लवकरच बौद्धिक क्षेत्रें झालीं, ग्रीक विद्येचे पुनर्जीवन झालें. एक नवीन बौद्धिक वातावरण उत्पन्न झालें. ॲरिस्टॉटलचे ग्रंथ प्रथम ख्रिस्ती धर्मपीठानें मना केले होते, पण पुढें ते वाचण्यांत येऊं लागले. पुनः ॲरिस्टॉटलचे राजकीय तत्त्वज्ञानाची छाप युरोपचे राजकीय विचारांवर पडूं लागली. जॉन ऑफ सॅलिसबरीनें राजा हा कायद्यानें बांधला गेलो आहे, त्यानें कायद्याप्रमाणें वागले पाहिजे. जर तो कायदा टाकून 'हातांत तलवार घेऊन वागेल तर तलवारीनें त्याला मरण येणें योग्य आहे' असें निर्भीडपणें आपल्या ग्रंथांत प्रतिपादिलें. टॉमस एक्विनास यानें ॲरिस्टॉटलचे तत्त्वज्ञानाला ख्रिश्चन तत्त्वज्ञानांत बेमालूम सामील करून घेतलें. ईश्वर व निसर्ग हे व्यापक आहेत, सर्वव्यापी आहेत, त्यांच्यांत सर्व तऱ्हेच्या विविधतेला जागा आहे. सहकार्य व संमेलन यानें सर्व कांहीं एकत्रित करतां येण्यासारखें आहे. ज्ञान आणि श्रद्धा यांत विरोध असण्याचें कारण नाहीं. बुद्धीपेक्षां श्रेष्ठ ईश्वरप्रणित ख्रिश्चन–धर्ममीमांसा आहे पण ती बुद्धीचे विरुद्ध नाहीं. शास्त्र व मीमांसा यांनीं जे विचार स्थापित केले आहेत त्यांना धर्ममीमांसा पूर्णता देते, ती त्यांची परंपरा राखते; पण त्यांचे विचार कधींही नष्ट करीत नाहीं. बुद्धीचें, ज्ञानाचें पूर्ण स्वरूप म्हणजे श्रद्धा आहे, त्यांच्यांत विरोध

नाहीं. दोघांनीं मिळून ज्ञानमंदिर उभे करावयाचें असतें. सर्व जगाचे रचनेंत कांहीं हेतु आहे, कांहीं साध्य करावयाचे आहे, तेथें प्रत्येक व्यक्तीला स्थान आहे. प्रत्येकानें सार्वजनिक हितांत आपलें काम करून भर टाकली पाहिजे. यांत राजा आला, भिक्षुक आला, सुतार आला, शिक्षक आला. राजा जोंपर्यंत आपल्या कार्यानें समाजहित करीत आहे तोंपर्यंत त्याचें वर्तन योग्य आहे. त्याला ईश्वरानें सत्ता दिली पण लोककल्याणाकरतां. जरुरीपेक्षां जास्त कर घेण्याला त्याला हक्क नाहीं. सर्व लोक सुखी व सद्‌गुणी होतील अशा रीतीनें त्यानें राज्य चालविलें पाहिजे. कारण तोच हेतु व्यक्तीचा व समाजाचा आहे. हा राज्याचा नैतिक हेतु असल्यामुळें साहजिकच सत्तेला मर्यादा असली पाहिजे आणि ती कायद्याप्रमाणें चालली पाहिजे. समर्थनीय विरोध म्हणजे सार्वजनिक विरोध. जनतेचा विरोध समजला पाहिजे व जे प्रत्यक्ष करती ऽ त्यांनीं आपल्या कृत्यांनीं जे विद्यमान अन्याय दूर व्हावेत म्हणून प्रयत्न चालविले आहेत त्यापेक्षां अधिक त्रास सार्वजनिक हिताला उत्पन्न होणार नाही येवढी जबाबदारी स्वीकारली पाहिजे, येवढी दक्षता घेतली पाहिजे. राज्यद्रोह हें महान् पाप आहे पण जुलमी सत्तेचा समर्थनीय विरोध हा राज्यद्रोह नाहीं. कारण जुलमी राज्यसत्ता मुळीं कायदेशीरच नसते. जेथें प्रजेनें राजाला हक्क दिले असतील तेथें प्रजेनें त्याला दूर करावें. जेथें हें नसेल तेथें राजा ज्याचे अधिकाराखालीं असेल त्याचेकडे दाद मागावी. सत्ता, राजकीय अधिकार कसा निर्माण होतो याबद्दल त्याचें स्वतःचें असें तत्त्वज्ञान नव्हतें. मानवी कायदा हा एक दैवी कायद्याचाच भाग आहे. सनातन कायदा, निसर्गाचा कायदा, दैवी कायदा, मानवी कायदा असे ४ भाग त्यानें केले हें खरें. सनातन कायदा म्हणजे परमेश्वराची बुद्धि, जिच्या योगानें जगाचे सर्व व्यवहार चालतात; तो मानवी बुद्धीपलीकडील आहे पण तिच्याशीं त्याचा प्रतिरोध नाहीं. प्रत्येक मनुष्याचे मनांत योग्य तऱ्हेनें राहावें, स्वभावाप्रमाणें वर्तन करावें हें ज्यायोगे येतें तो नैसर्गिक कायदा होय. समाजांत राहावें, संसार करावा, ज्ञान मिळवावें वगैरे प्रवृत्ति सर्व नैसर्गिक कायद्यामुळें उत्पन्न होतात. दैवी कायदा म्हणजे साक्षात्कार, ईश्वरप्रणित गोष्टी. बुद्धीनें अप्राप्य पण प्राप्त झालेलें असें सर्व यांत येतें. मानवी कायदा हा वरील तिन्ही कायद्यांना अनुसरून असतो. मुलकी व सार्वत्रिक असे दोन भाग त्याचे त्यानें कल्पिले. कायदा म्हणजे कसें वागावें अगर वागू नये हें सांगणारें प्रमाण. मनुष्य हा विचारी प्राणी आहे, बुद्धीनें तो वागतो, सारासार विचार तो करतो म्हणजे सामाजिक प्रवृत्तीनें तो वागतो, म्हणून कायदा हा व्यक्तीसाठीं नाहीं, समाजासाठीं आहे. समाजाचा अधिकार त्याचे मागें आहे,

व्यक्तीची बुद्धि नव्हे. लोकांनीं अधिकार दिलेली व्यक्ति तो जाहीर करील, अगर रीतिरिवाजांत तो असूं शकेल. तथापि तो समाजहितासाठीं व सर्व लोकांसाठीं असेल. तो जाहीर झाला म्हणजेच प्रभावी होतो. नैसर्गिक कायद्यांतूनच मानवी कायदा निर्माण होतो. देशपरत्वें कमी जास्त फरक त्यांत राहील पण त्याचीं मूलतत्त्वें सर्वत्र सारखीच असतील, कारण सर्वत्र मनुष्यप्रवृत्ति सारख्याच असतात. राज्याचें स्वरूप नाना तऱ्हेचें असलें तरी मूलभूत कल्पना व तत्त्वें सारखींच आहेत; न्याय्य, योग्यायोग्य विचार हे सर्वत्र सारखेच असतात. मानवी जीविताचें साध्य एकच आहे, साधनें अनेक आहेत.

टॉमस् एक्वीनासची ही विचारसरणी त्याचे कालांत युगप्रवर्तक ठरली. कायदा व राज्यसत्ता यांचा इतक्या नैतिक प्रतिष्ठेवर आधार आहे हें त्या काळीं सांगणें विशेष होतें. मानवी कायदा नैसर्गिक कायद्याला धरून असला पाहिजे म्हणजेच राज्यांतील कारक कायदा ( Positive Law ) न्यायावर आधारलेला असला पाहिजे हें उघड होतें. कायदे करणें म्हणजे मनाला वाटेल तें करणें असें नव्हे, तर काल व परिस्थिती- प्रमाणें समाजहितासाठीं आदेश तयार करणें होय. न्यायानें व विवेकानें राजा व प्रजा या दोघांनीं वागलें पाहिजे. न्यायाविरुद्ध वागणाऱ्या जुलमी सत्तेचा नाश करणें हा नुसता हक्कच नव्हे तर या विचारसरणीनें कर्तव्य ठरतें व तसा अर्थही काढण्यांत येत असे. टॉमसचें मतें सर्व युरोप एकधर्मी ख्रिस्ती समाज व्हावा व त्यावर एक राज्य असावें असेंच होतें. ऐहिक सत्ता व धार्मिक सत्ता या दोहोंनीं आपापल्या क्षेत्रांत ईश्वरी संकेताप्रमाणें वागावें असें त्यानें प्रतिपादिलें, प्रत्यक्ष वस्तुस्थितींत युरोपवर एक राज्य नव्हतें. डान्टे हा कवि होता. त्यानें हें एक राज्य कसें असावें याचें चित्र काढलें आहे. त्यानें सर्वत्र अस्वस्थता, लहान लहान राज्यें व कायम तंटेबखेडे ही परिस्थिति पाहिली व यांतून मार्ग म्हणजे बादशाहीखालीं सर्व संघटना केली म्हणजे शांतता व सुव्यवस्था नांदेल असा अभिप्राय व्यक्त केला. मनुष्याला बुद्धि आहे, समाजाचें ध्येय सर्वांनीं विवेकानें वागावें हें आहे व जर सर्वत्र शांतता असेल तर हें शक्य आहे. सार्वत्रिक शांतता ही या दृष्टीनें आवश्यक आहे, त्याविना समाजांत सुख लाभणार नाहीं. समाजांत कोणी तरी नाना व्यवहारांसाठीं मार्गदर्शक पाहिजे म्हणून राज्य याची आवश्यकता आहे. सर्वत्र शांतता ठेवण्यासाठीं, सर्वत्र ज्याची सत्ता राहील असें एकराज्य पाहिजे. एका राज्याखालीं आले म्हणजे सर्व एक होतात. एकराज्य करण्याचें हें काम रोमन लोकांनीं करावयाचें आहे, कारण तो ईश्वरी संकेत दिसतो. रोमन साम्राज्याखालीं जगाचें नियंत्रण व कल्याण व्हावें असा इतिहासाचा

संदेश आहे असें डान्टेनें मांडले. इतकेंच नव्हे तर रोमन साम्राज्याचा हा दावा खुद्द येशूखिस्तानें मान्य केला आहे असा निष्कर्ष त्यानें काढला. खिस्तानें मनुष्य जातीच्या पापाचें क्षालन करण्यासाठीं सुळावर चढून शिक्षा भोगली. हें क्षालन झालें याचा अर्थ योग्य शिक्षा भोगली म्हणजेच ज्यानें शिक्षा केली त्याला अधिकार होता म्हणूनच खिस्तानें ती भोगली. म्हणजेच त्यानें न्यायाधीश पायलट व रोमन बाद-शाहा अगस्टस यांचा अधिकार मान्य केला. क्षालन झालें नाहीं असें म्हणणें शक्य नव्हतें; मग रोमचा अधिकार मानणें अगदीं तर्काला धरून होतें, खिस्ती धर्मानेंही त्याचे मतें रोमचा सार्वत्रिक सत्ता चालविण्याचा, एकराज्य स्थापन करण्याचा हक्क मंजूर केला होता. डान्टे पोपचें श्रेष्ठत्व ऐहिक कारभारांत मानण्यास तयार नव्हता. खिस्ताप्रमाणें धर्माचें राज्य म्हणजे ऐहिक राज्य नव्हे; देवाचें राज्य म्हणजे धर्माचे आहे म्हणून ऐहिक बाबतींत कांहींही अधिकार सांगणें धर्माविरुद्ध आहे असा विचार त्यानें मांडला. एक राज्य टॉमस व डान्टे या दोघांनाही हवें होतें दोघांनींही राज्याची बैठक ॲरिस्टॉटलचे तत्त्वज्ञानाला धरून उभारली होती. ॲरिस्टॉटलचे तत्त्वज्ञानांत राजकीय समाज स्वयंपूर्ण होता व त्याला कुठल्याही दैवी मान्यतेची जरुरी नव्हती. वरील दोघांच्या विचारसरणींत परमेश्वरी कर्तृत्व महत्त्वाचे स्थानावर राखण्यांत आले होतें. हाच त्याच्यांतील दोष होता आणि म्हणून एकराज्य होणें अशक्य होतें.

राज्य व पोप यांचे वादाचा परीणाम खिस्ती धर्मपीठाचे संघटनेवर एका विशिष्ट प्रकारें झाला. धर्मोपदेशक देशपरत्वें स्थानिक राज्याची बाजू घेणें शक्य वाटलें म्हणून पोपचा अधिकार केवळ नैतिक राहून भागणार नाहीं हें स्पष्ट झालें. सर्व धर्मोप-देशकांनीं पोपचे शिस्तींत राहावें हें केवळ नैतिक बंधन न राहातां त्याला कायद्याचें स्वरूप आलें. धर्मपीठाची संघटना ही अधिकारी स्वरूपाची झाली. पोपला धर्म-संघटनेचें नियंत्रण करण्याचा अधिकार कायदेशीर आहे असें प्रतिपादलें जाऊं लागलें. पोप व राजा यांचीं भांडणें वाढूं लागलीं व त्याचा परिणाम दोन्ही बाजूनीं नवी नवी मंडळी, नवे नवे विचार मांडूं लागली. जगांत दोन्ही सत्ता ऐहिक व परमार्थिक व त्यांपैकीं कोण श्रेष्ठ ही वादाची भूमिकाच नाहींशी झाली. पोपच दोन्ही सत्तांचा अधिकारी, पोप सोयीसाठीं निरनिराळे राजे नेमतो येथपर्यंत विचासरणी पोंहोंचली. उलट फ्रेंच पंडित डयूब्रॉय यानें फ्रान्सनें युरोपचें नेतृत्व स्वीकारावें, सर्व धर्मपीठांची संघटना राजाचे नियंत्रणाखालीं असावी, पोपचे अधिकाराखालील जमिनी घ्याव्यात व त्याला वर्षासन द्यावें, शिक्षणाचें काम धर्मोपदेशकांकडून काढावें अशी विचार-सरणी मांडली. फ्रेंच राजा फिलीपनें धर्मपीठाच्या जमिनीवर कर बसविण्यास सुरवात

केली. पोपनें कर देऊं नये म्हणून फतवा काढला, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. फ्रेंच धर्मोपदेशक राजाचे बाजूचेच दिसून आले. धर्मपीठाचे जमिनीवर कर बसविण्याचा राजाला अधिकार आहे कीं नाहीं हा प्रमुख प्रश्न झाला. हक्क आहे, धर्मपीठाचे अधिकार फक्त परमार्थिक बाबतींत आहेत व धर्मपीठ ऐहिक सत्तेवर अवलंबून आहे असें एक पक्ष म्हणे, हा हक्क नाहीं असा दुसरा पक्ष म्हणे, व तें शाबित करण्याकरितां सर्व सत्ता प्रथम पोपची आहे व नंतर त्यानें राजाला दिली अशी भूमिका घेणें त्याला भाग पडलें. वादविवादांत पोपला पारमार्थिक बाबतींत तरी किती अधिकार आहेत याचीच चिकित्सा सुरू झाली व त्याचा परिणाम प्रॉटेस्टंट पंथ निघण्यांत झाला. पोपचा व त्याचे नेतृत्वाखाली असलेल्या धर्मोपदेशकांचे संबंध काय आहेत याचाही विचार होऊं लागला. एकीकडे खिस्तानें पीटर व त्याचे वारस यांचे हवालीं स्वर्गाच्या राज्याच्या किल्लया दिल्या असल्यामुळें पोपला सर्व सत्ता सर्व अधिकार देवाकडून मिळाले आहेत असें सांगण्यांत येऊं लागले. सर्व कायदेशीर हक्क पोपला आहेत, निव्वळ नैतिक अधिकार त्याचे नाहींत, सर्व कायदेशीर सत्तेचें उगमस्थान पोप, जगांतील श्रेष्ठ न्यायालय पोप, जगांतील प्रभुत्व पोपचें असा दावा सांगण्यांत येऊं लागला. जें श्रेष्ठ तें श्रेष्ठ असलें पाहिजे. जगांतील पार्थिव वस्तूंवर अपार्थिव व आध्यात्मिक शक्तीचा प्रभाव आहे. शब्दापेक्षां अर्थ श्रेष्ठ आहे. म्हणून ऐहिक सत्ता ही पारमार्थिक सत्तेच्याखालीं राहिली पाहिजे. वस्तूची मालकी तिचे सदुपयोगावर अवलंबून आहे असें ॲरिस्टॉटलचें म्हणणें आहे. राजकीय सत्तेची मालकी ही सदुपयोगावर अवलंबून आहे. मानवी हित म्हणजे त्यांचें पारमार्थिक हित म्हणून राजकीय सत्तेची मालकी पोपकडे असली पाहिजे !! पोपचें हें प्रभुत्व म्हणजे ‘ मृत रोमन साम्राज्याच्या समाधीवर बसलेलें त्याचें मुकुटधारी भूत ’ असें त्याचें वर्णन हॉब्जनें केलें आहे. दुसरीकडे रोमचे बादशहाला जे अधिकार होते ते सर्व राजाला आहेत असें फ्रेंच कायदेपंडितांनीं सांगण्यास सुरवात केली. धर्मपीठाचा अधिकार केवळ नैतिक आहे. मर्सिलिओनें तर तो केवळ शिक्षण देण्याचा आहे असें प्रतिपादिलें. खुद्द धर्मपीठाचे संघटनेंत, धर्मोपदेशाचे दृष्टीनें सर्व सारखेच आहेत. जो अधिकार क्रांतींत आहे तो केवळ सोयीसाठीं, कारभारासाठीं आहे. पोप, त्याचे संघटनेंतसुद्धां श्रेष्ठाधिकारी नाहीं. धर्मापलीकडे धर्मपीठाला अधिकार नाहीं. म्हणून त्याचे ताब्यांत असलेल्या जमिनीवर राजाला कर बसविण्याचा अधिकार आहे. जॉन ऑफ् पॅरिसचें म्हणणें धर्म सर्वत्र असला पाहिजे. पण सर्वत्र एकराज्य पाहिजे असें नाहीं. धर्मदृष्टीनें मानव सारखे म्हणून तो सार्वत्रिक असणें ठीक आहे. पण मनुष्याचे

हितसंबंध विविध असतात, प्रवृत्तींत वैचित्र्य असतें म्हणून सर्वत्र एकराज्य असणें बरोबर नाहीं. जगभर एकसत्ता असणें जरूर नाहीं. प्रांत अगर राजाचें राज्य हाच विस्तार अगर क्षेत्र राज्याला पुरेसें आहे, कारण त्यांत स्वयंपूर्णता आहे. धर्मपीठाचे योगक्षेमासाठीं जमिनी त्यांना असाव्यात, पण त्यांची मालकी पोपची नव्हे, समाजाची आहे. तिचा दुरुपयोग करण्याचा पोपला अधिकार नाहीं. योगक्षेमासाठीं संपत्ति हवी म्हणून तिजवर मालकी सांगण्याचें कारण नाहीं. पोप जर अयोग्य वागत असेल तर त्यांचे अधिकाराखालील धर्मोपदेशकांना त्यांना विरोध करण्याचा हक्क आहे. पोप जर अन्यायानें वागेल तर त्याला समाजाचा शत्रु समजून राजानें योग्य तें त्याचें पारिपत्य केलें पाहिजे. पोपला कायदेशीर हक्क नाहीं, त्याचा अधिकार नैतिक आहे.

मार्सिलिओ यानें पोपचे अधिकारावर आणखी हल्ला चढविला. इटालियन असल्यामुळें आधींच पोपचे सत्तेविरुद्ध त्याचा राग होता. त्यानें राज्यसत्तेवर पोपचा अधिकार नाहीं येवढेंच सांगितलें नाहीं तर पोपची सत्ता, धर्मसत्ता राज्याचे नियंत्रणाखालीं असावी असें प्रतिपादलें. धर्म जरूर आहे व ख्रिस्ती धर्म खरा आहे. त्यांतील सत्याची कसोटी बुद्धी नाहीं श्रद्धा आहे. पाद्र्याचें काम फक्त त्यांतील गोष्टी शिकविण्याचें आहे. धर्मपीठाला कांहीं ऐहिक अधिकार नाहींत. धर्माविरुद्ध वर्तन झालें तर त्याबद्दल प्रायश्चित या आयुष्यांत नाहीं व तें परमेश्वर देत असतो. परमेश्वरी कायदा ऐहिक शिक्षा देत नाहीं. ऐहिक शिक्षा देणारा कायदा मानवी कायदा आहे व तो मनुष्यानें केला पाहिजे. मानवी कायदा म्हणजे या जगांतील व्यवहाराबद्दल कसें वागावें अगर वागूं नये व तो म्हणजे सर्व लोकांची अगर जे सत्ताधीश असतील त्यांची आज्ञा आहे व ती न मानणारास शासन अटळ आहे. दैवी कायदा ही देवाची आज्ञा पण त्यामागें व्यवहारनियंत्रण हा हेतु नाहीं तर मरणोत्तर श्रेष्ठ जीवन मिळावें हा हेतु आहे. मानवी कायद्यांत धार्मिक गुन्ह्यांचा संबंध नाहीं. जर त्यांचा संबंध असला तर ते मानवी कायद्याविरुद्ध गुन्हे होतील, दैवी कायद्याविरुद्ध नव्हे. ते गुन्हे दैवी कायद्याविरुद्ध मानले तर मरणोत्तर देव शिक्षा देईल; मानवी कायद्याविरुद्ध मानले तर राज्य शिक्षा देईल. धर्मपीठाला, पोपला कुठेंही अधिकार नाहीं. नास्तिकपणा, धर्मद्रोह, याबद्दल जर या जगांत शिक्षा द्यावयाची असेल तर तो अधिकार राज्याचा आहे. धर्मबाह्य करणें हाही अधिकार राज्याचा आहे. धर्माचा संबंध कायद्याशीं नाहीं, म्हणून कुठलाही ऐहिक अधिकार अगर सत्ता म्हणजे बलनिष्ठ सत्ता, ( Coercive Power ) सक्तिसत्ता याची जरुरी धर्माला नाहीं. धर्मोपदेशकाचें कार्य म्हणजे वैद्याचें कार्य, पथ्यपाणी सांगावें, सल्ला द्यावा पण सक्ति करतां येणार नाहीं. योगक्षेमापुरतें उत्पन्न

धर्मपीठाला असावें; पोपपासून पाद्र्यापर्यंत काढून टाकण्याचा हक्क राज्यसत्तेला आहे. थोडक्यांत म्हणजे पोपच्या प्रभुत्वावर जबरदस्त व सर्व बाजूंनीं त्यानें हल्ला केला. राज्यसत्तेला धर्मावर अधिकार देऊन एकमुखी धर्मसत्ता असावी यावरही त्याचे विचारसरणीनें आघात झाला. सर्व उपदेशक सारखे आहेत. पीटर हा त्याचे इतर सहकाऱ्यापेक्षां श्रेष्ठ नव्हता. सेंटपीटरचा वारसा पोपला येतो हें खरें नाहीं. येवढें सांगून न थांबता तो म्हणतो, "योग्य पुराव्याचे अभावीं पीटर रोममध्यें होता अगर रोमचा बिशप तो होता हें मानणें चुकीचें आहे." केवळ रोम शहर हें साम्राज्याची राजधानी होती म्हणून तेथील धर्मपीठाचें महत्त्व वाढलें. पोपला अन्यथा कांहींही महत्त्व नाहीं. देशोदेशींच्या ख्रिश्चन लोकांनीं राज्यसत्तेच्या मसलतीनें प्रतिनिधि निवडावे व त्यांचें एक मंडळ असावें व या मंडळानें सर्व धार्मिक बाबतींतील निवाडे द्यावेत अशी योजना त्यानें मांडली. विल्यम ऑफ् ओक्याम या ऑक्सफर्ड पंडितानें तिला सर्वसामान्य पाठिंबा दिला. मात्र हें मंडळ अप्रमादी आहे अगर त्याचे निवाडे निर्दोष असतीलच असें मानण्यास तो तयार नव्हता. अभ्यास व निरंतर शोध करीत राहाण्यानें धार्मिक सत्यें स्पष्ट होत जातात असें त्याचें म्हणणें होतें. चौकशी व चिकित्सा करण्याचा प्रत्येकाला हक्क आहे, नव्हे तें कर्तव्य आहे असेंच तो मानी; अधिकारी सत्तेला निर्णय घेण्याचा अधिकार नाहीं, तें कार्य जे ज्ञानी व विचारवंत आहेत त्यांचे आहे.

पोपचें जगावरील प्रभुत्व तर कोणीच मानीना, उलट खुद्द धर्मसंघटनेंत त्याचें प्रभुत्व मानण्यास लोक नाखूष होते, हाच अर्थ प्रतिनिधिमंडळानें धर्मनिर्णय द्यावा या योजनेंतून निघत होता. अनियंत्रित सत्ता का सनदशीर सत्ता हा वाद धार्मिक सत्तेच्या संघटनांत याप्रमाणें सुरू झाला. विक्लिफनें पोपला परमेश्वरानें सत्ता दिली नाहीं असें सांगून ती सत्ता सर्व ख्रिश्चन समाजाला दिली आहे असें प्रतिपादलें. 'मुगुट डोक्यावर ठेवल्यानें अगर झगा घातल्यानें धर्मगुरुत्व येत नाहीं' ते ख्रिस्तानें सत्ता देऊन दिलें पाहिजे. सत्ता सर्व ख्रिस्ती समाजाला आहे म्हणून सर्व ख्रिस्ती समाजानें धर्मगुरु निवडले पाहिजेत अशी विचारसरणी प्रादुर्भूत झाली. धर्मपीठाची सुधारणा करणें हा विषय लोकचर्चेचा विषय झाला. धर्मांतसुद्धां सुधारणा करण्याचा हक्क सर्व जनतेला आहे या विचाराचा परिणाम सामाजिक व राजकीय क्षेत्रांतही होऊं लागला. अन्याय्य कर व कायदे, छळ व गांजणूक यांनी बहुजन समाजांत बेदिली सर्वत्र पसरली होती. अनेक देशांतून शेतकऱ्यांनीं उठाव केले होते. जन्मानें सर्व लोक सारखेच असतात. जगभर मनुष्यस्वभाव सारखाच आहे. समा-

जांतील विषमता अन्यायमूलक आहे असें अनेकजण प्रतिपादूं लागले. आदाम विणी व इव्ह कातीं त्या वेळीं कोणी शिष्टजन नव्हते, मग आतांच कां ? असेंही प्रश्न लोक विचारूं लागले. ख्रिस्ताचे आज्ञेप्रमाणें सर्व सारखे असले पाहिजेत, तेथें भेदभाव असूं नयेत अशी मागणी सुरू झाली. धर्मसंघटनेंतच फक्त सुधारणा व्हावी हें म्हणणारांना जें होत होतें तें पसंत नव्हतें म्हणून त्यांनीं विक्लिफ वगैरे मंडळींचा निषेधही केला. प्रतिनिधीमंडळामार्फत सुधारणा व्हावी म्हणून तपशीलवार योजनापण मांडण्यांत आली, पण कांहींही सुधारणा झाली नाहीं. जो वादविवाद झाला त्यांतून अनियंत्रित सत्तेविरुद्ध व सनदशीर सत्तेच्या बाजूनें जी विचारसरणी मांडण्यांत आली त्याचा उपयोग मात्र युरोपमधील पुढील राजकारणांत झाला, त्यांतील कल्पना सर्व युरोपभर पसरल्या. धर्मसत्ता सर्व लोकांची, पोपची नव्हे, पोप फक्त तिचा विद्यमान उपयोग करणारा, लोक या संस्थेचा केवळ एक मुकत्यार. काय कायदा करावा हा लोकांचा अधिकार आहे, लोकांचेतर्फे त्यांचे प्रतिनिधि म्हणून प्रतिनिधिमंडळ आहे, त्याची संमति असेल तर निर्णयाला प्रामाण्य आहे, येरवीं नाहीं. लोकसंमति रीतिरिवाजांतूनही दिसून येते, पण त्याबाबतींत मंडळ हें अधिक अधिकारवाणीनें बोलूं शकतें. लोकांनीं न मानल्यामुळें पोपचे अनेक फतवे निरर्थक ठरले आहेत. प्रांतवार, राज्यवार मान्यता असेल तर निर्णयाला महत्त्व व प्रामाण्य; म्हणून देशकालपरिस्थितीप्रमाणें कायदा असावा. राज्यसत्ता लोकसंमतीवरच अवलंबून आहे. सर्व जन सारखे व स्वतंत्र निसर्गतः असतात म्हणून कुणी कुणावर सुव्यवस्थेसाठीं अधिकार चालविणें झाल्यास, तो संमतीनें व सहकार्यानेंच शक्य आहे. म्हणून राज्यसत्ता ही लोकसंमतीवर आहे. जसा कायदा हा मानला तर कायदा आहे, तसेंच राज्यसत्ता मानली तर आहे. मान्यता हेंच तिचे प्रामाण्य आहे. सर्व जनता कांहीं प्रत्यक्ष संमति देऊं शकत नाहीं. म्हणून मंडळामार्फत, प्रतिनिधीमार्फत ती असावी, मंडळांत पोपला स्थान आहे पण मंडळ त्याचेपेक्षां श्रेष्ठ आहे. कायद्याला अनुसरून त्यानें वागलें पाहिजे. कायद्यापेक्षां तो श्रेष्ठ नाहीं. त्याची निवड व्हावी याचा अर्थ तो धर्मसंस्थापनेचे कार्याला उपयोगी आहे व म्हणून जर तो तसा नसेल तर त्याची आज्ञा मानण्याचें कारण नाहीं. या कल्पना जरी धर्मसत्तेच्या वादविवादांत निर्माण झाल्या, स्पष्ट केल्या गेल्या तरी त्यांचा फैलाव राजकीय क्षेत्रांत सर्वत्र झाला.

राजकारण व धर्मकारण यांत वादविवादाच्या लाटा कमीजास्त उठत होत्या तरी समाजांत आर्थिक घडामोडी सारख्या अविरतपणें चालू होत्या. एकराज्य असावें, एकसमाज असावा हें प्रतिपादलें जात असतां प्रत्यक्ष राज्यव्यवस्था स्थानिक स्वरू-

पाची होती, व्यापार हळूहळू विस्तृत होत होता, वाढत्या व्यापाराला स्थानिक राज्यसत्ता उत्तेजन देत होत्या, व्यापार राज्यांतील व राज्याबाहेरील वाढवावा अशी भावना सर्वत्र होती. राज्य म्हणजे एक प्रादेशिक एकता अशी भावना उत्पन्न होऊं लागली. त्यांतील हितसंबंध त्याहून निराळे असा स्पष्ट फरक व्यापाराबरोबर अन्य बाबतींतही दिसूं लागला. पैसा व धाडस दोन्ही जवळ असणारा व्यापारीवर्ग सर्वत्र महत्त्व पावूं लागला. या वर्गाचे हितसंबंध जमीनदारवर्ग, सरंजामवर्ग यांच्याशीं जुळेनात. सरंजामवर्गाला स्वतःचे वर्चस्वासाठीं व महत्त्वासाठीं अव्यवस्था व अस्वस्थता ही अनुकूल होती तर व्यापारीवर्गाला सुव्यवस्था व स्थैर्य यांची जरुरी होती म्हणून व्यापारीवर्ग सुव्यवस्था राखणाऱ्या राज्यसत्तेच्या बाजूचा झाला. हळूहळू राज्यसत्ता अधिक अधिक अधिकार आपलेकडे घेऊं लागली; राज्यकारभार सुधारला पण राज्यसत्ता अनियंत्रित झाली. लोकांना सरदारी जुलमापेक्षां राजाचा जुलूम बरा वाटला. १६ वे शतकाचे आरंभीं राज्यसत्तेवरील जुन्या मर्यादा मोडून पडल्या होत्या, नियंत्रणें निःसत्त्व झालीं होतीं, अनियंत्रित राज्यसत्ता सर्वत्र तलवारीला साक्ष ठेवून राज्य करीत होती. सरंजामशाही व लहान पण स्वतंत्र शहरें या मध्ययुगीन राजकीय संस्था राज्यसत्तेनें चिरडून टाकल्या व हें सर्व नवोदित प्रादेशिक भावनेच्या, राष्ट्रभावनेच्या जोरावर तिनें केलें होतें. राज्याची प्रगति, राज्याचा व्यापार, राज्याची सुव्यवस्था, त्याचा जगांतील लौकिक या सर्वांत रस घेणारी, अभिमान बाळगणारी भावना ही प्रादेशिक होती. ती अमुक धर्माचा अगर अमुक वंशाचा राजा राज्य करीत आहे म्हणून ती नव्हती. राजे लोकांनीं या भावनेचा पूर्ण फायदा घेतला. धर्मसंस्थांनासुद्धां त्यांनीं चिरडलें. धर्मांत पुढें उत्पन्न झालेले पक्ष हे राजाचे सहाय्यानेंच यशस्वी झाले. ल्यूथरनें राजाश्रय मिळविला म्हणून जर्मनींत प्रॉटेस्टंटपंथ विजयी झाला. स्पेनमध्यें कॅथॉलिक पंथानें राजाश्रय मिळविला म्हणून तेथें तो प्रभावी झाला. इंग्लंडमध्यें प्रॉटेस्टटपंथाला राजाश्रय मिळाला म्हणून तेथें तो प्रभावी ठरला. तात्पर्य, धर्म राज्यसत्तेचा आश्रित झाला. राजसत्तेनें सर्वत्र आपला प्रभाव बसविला, राजा म्हणजे राज्य हें सूत्र सर्वत्र सत्य ठरलें. व त्या सूत्राला अनुरूप असे राजकीय तत्त्वज्ञान सांगणारे पण निर्माण झालें. जुन्या संस्था नाहींशा झाल्या त्याबरोबर त्यांतील मान व मर्यादापण लोपल्या. नैतिक भाव जो कांहीं जुन्या संस्कृतींत होता तोही संपुष्टांत आला.

मॅकेव्हेलीनें सत्य व सौजन्य यांना भाव नाहीं हें पाहिलें. साधनाला प्रतिष्ठा नाहीं. साध्य साधलें म्हणजे साधनें यथार्थ ठरतात हा अनुभव घेतला. बल व छल ( कपट ) हीं यशाचीं अचूक अस्त्रें आहेत असें स्पष्टपणें समाज त्याला सांगत होता.

परिस्थितींत यशस्वी राज्यव्यवस्था कशी करावी या दृष्टीनें त्यानें आपलें पुस्तक 'राजा' हें लिहिलें हें उघड आहे. तत्त्वज्ञान असें त्यानें सांगितलें नाहीं तर राज्य कसें बलवान् करावें, कोणतें धोरण स्वीकारून सत्ता वाढवावी, कोणत्या चुका टाळाव्यात या गोष्टींवर त्यानें भर दिला. राजकारणाचा प्रधान हेतु सत्ता टिकविणें व वाढविणें हा आहे व त्यांत यश हीच एकमेव कसोटी आहे असें समजूनच त्याचें लिखाण आहे. राजकारणाचा विचार करतांना दुसऱ्या कशाचाही विचार करणें अप्रस्तुत आहे. राज्य चांगले किंवा वाईट याचा विचार न करतां टिकविलें पाहिजे या मताचा अनुवाद त्यानें केला आहे. पोप इटलीचा शत्रू तो समजत असे म्हणून प्रभावी राज्य निर्माण करून इटली संघटित करावा असें त्याला वाटे. ख्रिस्ती धर्मानें लोकांना बलहीन केलें असा त्याचा आरोप. व्यक्तीनें नैतिक असावें कारण त्याचे वर्तनावर समाजाची शक्ति अवलंबून आहे, पण राजाला ज्यायोगें सत्ता राहील व वाढेल असेंच वर्तन श्रेयस्कर आहे. राजा नीतिनियमापलीकडे आहे व असला पाहिजे. शास्त्रीय व निर्विकारबुद्धीनें राजकारणावर त्यानें लिखाण केलें असें म्हणून त्याचें समर्थन कांहींनीं केलें आहे. जनतेला संरक्षण व स्थैर्य हवें असतें व राजाला सत्ता हवी असते, दोन्ही स्वार्थी आहेत असें मानून तो चालतो. व्यक्तीचा अपुरेपणा व असमर्थता ही राज्य-सत्तेचा आधार आहे. मनुष्यस्वभाव आग्रही व परिग्रही आहे, आहे तें ठेवून आणखी कमवावेसें त्याला वाटतें. सत्ता व संपत्ति याला कुठें तरी मर्यादा आहे पण मानवी इच्छा व अभिलाषा यांच्या मर्यादा अद्यापि कोणाला सांपडल्या नाहींत. त्यांना मर्यादेंत ठेवण्यासाठीं बलवान् प्रभावी राज्यसत्ता अवश्य आहे. जीवित व वित्त यांचें संरक्षण सर्वांना हवें असतें. त्यांतले त्यांत वित्तावर मनुष्याची आसक्ति विशेष. एक वेळ बापाचा प्राण घेणारास मनुष्य क्षमा करील पण त्याची मिळकत जप्त करणाऱ्यास क्षमा करणार नाहीं. म्हणून मॅकॅव्हेली म्हणतो. राजानें प्रसंगीं जीव घ्यावा पण लुटूं नये. मनुष्यांत आक्रमणप्रवृत्ति असते व म्हणून स्पर्धा व संघर्ष हे समाजांत नित्य ठाण मांडून असतात. राज्यसत्तेला यापासून उपद्रव असतो. म्हणून सर्व हितांची जुळवणूक करण्यांत राज्यसत्तेचें कौशल्य असतें. कायदा हा सर्व समाजाचें नियमन करतो, त्यांतूनच समाजधारणेचें कार्य होत असतें. जो धोरणी, मुत्सद्दी आहे, ज्याला मुत्सद्दीपणाचें यथार्थ ज्ञान आहे, त्याचे कर्तृत्वाला मर्यादा नाहीं. कायदा व राज्य-सत्ता यांचे योग्य उपयोगानें राष्ट्राचा भाग्यविधाता तो होऊं शकतो. तो नीतिनियमा-बाहेर आहे. क्रियेंत कोणी दोष काढील तर झालेल्या कार्यानें तो मान्यवंत ठरेल. प्रसंगाप्रमाणें वर्तावें, राज्य राखावें, राज्य वाढवावें, राज्य स्थापावें व हें करतांना

साध्याकडे लक्ष द्यावें. कारण सिद्धीनेंच जग माणसाची किंमत ठरवितें. क्रांतिकाला-साठीं एक तत्त्वज्ञान व प्रस्थापित राज्यसत्तेसाठीं दुसरें असा अर्थ या विचारसरणींतून निघतो.

मॅकॅव्हेलीचें तत्वज्ञान आचरणारे राजे इटलींतच होते असें नव्हे तर इंग्लंड, स्पेन, फ्रान्समध्येंही होते. चांगल्या हेतूसाठीं वाममार्ग स्वीकारण्यास सांगणाऱ्या तत्त्वज्ञानाचा उपयोग फक्त वाममार्ग स्वीकारण्यांत झाल्यास नवल नाहीं. अनियंत्रित राजसत्तेचें वर्चस्व वाढविण्याकडे या तत्त्वज्ञानाचा उपयोग झाला. वास्तविक मॅकॅव्हेली याला अनियंत्रित राजसत्ता पाहिजे होती असें नाहीं. बेकायदेशीर वर्तन सरकारी अधिकाऱ्यांकडून होऊं नये हें त्यानें स्पष्ट सांगितलें आहे. धन व दारा याबाबत मनुष्यें वाटेल तो प्रतिकार करण्यास तयार होतात म्हणून राज्यकर्त्यांनीं या बाबतींत व्यवस्थित वागावें. ज्या राज्यसत्तेंत अनेकजण सहभागी आहेत ती जास्त टिकते. राजासुद्धां वारशानें गादीवर न येतां निवडणुकीनें यावा. पण जर लोक अगदींच भ्रष्ट व भांड असतील तर सुव्यवस्थेसाठीं बलवान् राजसत्ता असणें इष्ट आहे. सरदारवर्गाचे नालायकीबद्दल तर त्यानें स्पष्ट शेरा दिला आहे. राजा व प्रजा, दोघांचे ते शत्रु आहेत असें त्याचें मत होतें. संरक्षणासाठीं त्यांचेवर व भाडोत्री सैन्यावर विसंबून न राहातां राजानें नागरिकसैन्य उभारावें. राज्याचे संरक्षणासाठीं बाकी सर्व विचार बाजूला सारून वागलें पाहिजे. " मान, अपमान, न्याय, अन्याय सर्व बाजूला सारून दृढ निश्चयानें वागलें तरच संरक्षण होईल. देशाचें स्वातंत्र्य व जीवन कसें राहील हाच प्रश्न डोळ्यांपुढें ठेवून वागलें पाहिजे. " इजिप्तमध्यें ज्यूनां ज्या बंधनांत पडावें लागलें त्यापेक्षां जास्त बंधनांत त्यानें विद्यमान इटलीला पाहिलें. मीडच्या गुलामगिरींत पर्शिया होता, त्यापेक्षां तीव्र गुलामगिरींत इटली जखडलेला त्याला दिसत होता. अथेनियन्सपेक्षां जास्त पांगापांग त्याला इटालींत दिसली. " कोणी नेता नाहीं, कसलीही सुव्यवस्था नाहीं, पराभूत व पीडित, घायाळ व हतबल सर्वत्र दबलेले दीन, हीन व करंटे " लोक पाहून त्यांतून बलवान् इटालियन राज्य निर्माण व्हावें हा हेतु मनाशीं धरून त्यानें आपला ग्रंथ लिहिला असा अभिप्राय कित्येकांनीं व्यक्त केला आहे. धर्म व राजकारण यांची त्यानें केलेली फारकत पुढें पुढें राजकारणी विचारांत मान्यता पावली.

प्रादेशिक एकीची भावना, एकराज्य होऊन प्रभावी व्हावी याचे मुळाशीं इतिहास परंपरा होती. पूर्वीं एकराज्याखालीं सर्व प्रदेश होता. एकराज्यांतून प्रादेशिक निष्ठा उत्पन्न झालेली होती. राज्य गेलें तरी प्रादेशिक एकीचा भाव राहिला. संघटन विस्कटलें तरी संस्कृति कायम होती. लोकांचे मनांत इटली म्हणजे एक असा भाव

कायम होता. व त्याचेंच प्रतिबिंब मॅकेव्हेलीचे ग्रंथांत दिसून येतें. खिस्ती धर्मांत जे दोन पंथ, कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट झाले व ज्यांच्या भांडणांत युरोप २०० वर्षे निमग्न होता, त्यांनीं आपल्या भांडणांनीं राष्ट्र या कल्पनेला मूर्त स्वरूप दिलें. राष्ट्र या भावनेला आळवून राजांनीं आपला अंमल सर्वत्र अनियंत्रित केला. ख्रिस्ती धर्मांत फूट पडण्यापूर्वीं ख्रिस्ती धर्मांतील तत्त्वांचें संरक्षण राजकीय सत्तेनें करावें व सर्वत्र सुव्यवस्थेसाठीं एकधर्म असावा हें अगदीं स्वयंसिद्ध असें मानण्यांत येई. पण जेव्हां रोमचें धर्मपीठांत भांडणें सुरू झालीं, धर्मदृष्ट्या खरा पंथ कोणता, खरें तत्त्व कोणतें हें सांगण्याचें काम राज्यसत्तेकडे आल्याबरोबर त्या परिस्थितीचा फायदा राज्यकर्त्यांनीं घेतल्यास नवल नाहीं. ल्यूथरला त्याचे धर्मस्थापनेसाठीं राजाश्रयाची जरुरी भासली. इंग्लंडमध्यें धर्मसुधारणा करण्याचें काम अत्यंत धार्मिक (?) अशा ८ व्या हेन्रीकडे आलें. तसेंच अन्यत्र झालें. सर्वत्र राज्यसत्ता अधिक प्रभावी झाली. युरोपभर धार्मिकवाद माजला, त्या वेळीं लोक राजाभोंवती गोळा होऊं लागले व एकीची अपेक्षा करूं लागले. राज्यसत्तेनें ज्या पंथाला आश्रय दिला तो तेथें विजयी ठरला. कोणताही पंथ हरो अगर जिंको, राजा सर्वत्र विजयी झाला. अनियंत्रित राज्यसत्ता या धर्मपंथाचे भांडणांत उत्कर्षाला पोंहोंचली. राजाश्रय मिळाला म्हणून राजनिष्ठा ही अव्वल धार्मिक बाब झाली. आपल्या धर्मपंथाचें संरक्षण करणें म्हणजे विरुद्ध धर्मपंथाला आश्रय देण्याऱ्या राजावर हल्ला करणें हा अर्थ झाला. यामुळें धर्मविरोधाला राजकीय विरोधाचें स्वरूप प्राप्त झालें. राज्यांतील अन्य पंथांचे अल्पसंख्यांक धर्मद्रोह, व राज्यद्रोह दोन्ही करतात असें वाटणें साहजिक झालें. अन्यायी राजा व अधर्मी राजा म्हणून त्याला दोन्ही नात्यांनीं विरोध करणें तितकेंच साहजिक झालें. धर्मासाठीं राज्यसत्ता अनियंत्रित झाली व धर्मासाठींच तिचें नियंत्रण होणें अपरिहार्य ठरलें. विरोध विकासवादाचा हा एक दाखला आहे. यातून पुढें धार्मिक सहिष्णुता व मर्यादित राज्यसत्ता निर्माण झाल्या. तथापि, वादाचे प्रसंगीं प्रजेला राजाला विरोध करण्याचा योग्य परिस्थितींत हक्क आहे का अजिबात नाहीं हा प्रश्न महत्त्व पावला. अजिबात हक्क नाहीं असें म्हणणारा पक्ष अनियंत्रित राजसत्तेचा वाली होता. लोकांकडून राजाला सत्ता प्राप्त होते म्हणून योग्य परिस्थितींत त्याला विरोध करण्याचा जनतेला हक्क आहे असें निव्वळ राजकीय दृष्टीनें म्हणतां आलें असतें, पण तसें न म्हणतां धर्मदृष्टीनें तोच विचार मांडण्यांत येत होता. ल्यूथर व कॅलव्हिन हे दोघे राजाज्ञा निमूटपणें मानाव्यात या मताचे होते. परंतु त्यांच्या पंथांनीं पुढें धार्मिक सुधारणेसाठीं राजकीय विरोध हें एक साधन म्हणून उपयोगांत आणलें. ल्यूथरचे दृष्टीनें धर्माचें खरें तत्त्व

आत्मानुभावांत होतें. वैयक्तिक श्रद्धा व अनुभव यांचें महत्व तो मानी. त्याचे दृष्टीनें प्रत्येक ख्रिश्चन हा स्वतःचा पुरोहित होता. धर्मप्रसारासाठीं म्हणून बलाची आवश्यकता त्याला वाटत नव्हती. पाद्रयाचें जीवन, स्वातंत्र्य व वित्त हें धर्मानें अधिक मानावें हें तो गैर मानी. त्याचे मतें प्रत्येक ख्रिश्चन हा धर्मानें सारखाच असला पाहिजे. ख्रिस्ती धर्मपीठांत सहज सुधारणा होण्याचें चिन्ह त्याला दिसेना म्हणून लोकांनीं, सरदारांनीं, राजांनीं ती घडवून आणावी असें त्यानें मत मांडलें. धर्मपीठांतील अव्यवस्था व अनीति पाहून तो म्हणे कीं, राजा हा आपत्तीमुळें धर्मगुरु होतो. राजकीय सत्तेच्या साहाय्यानें त्यानें रोमवर विजय मिळविला व त्याचा परिणाम राष्ट्राचें असें धर्मपीठ निर्माण झालें. त्याजबरोबर राजाची आज्ञा पालन करणें हें श्रेष्ठ कर्तव्य आहे असें सांगणें प्राप्त झालें. " राज्यकर्ते म्हणजे सामान्यतः जगांतील अति मूर्ख व अति पाजी लोक असतात " असें म्हणणारा ल्यूथर " राजा हा जगाचा देव आहे, सामान्य जनता सैतान आहे व लोकांना प्रायश्चित मिळावें म्हणून त्याचेकडून परमेश्वर प्रसंगीं बंड करवीत असतो. " असें म्हणूं लागला ! ! राजाज्ञा न पाळणें हा खून, चोरी, व्यभिचार इत्यादि गुन्ह्यांपेक्षां अधिक पापमय गुन्हा आहे असें त्यानें प्रतिपादिलें. सविनय आज्ञापालनाचा तो प्रमुख पुरस्कर्ता ठरला. राजाला विरोध करणें हें पाप मानल्यानंतर त्याचे सत्तेवर ज्या कांहीं मर्यादा होत्या त्याही संपल्या. ल्यूथरचे तत्त्वज्ञानानें धर्मांत अध्यात्मिकता वाढली पण राजाला बेसुमार आधिभौतिक सत्ता मिळाली. तो राष्ट्रनेता व धर्मनेता झाला, राजा तर तो होताच.

कॅलव्हिन तर राजा कसाही असो त्याचें ऐकलें पाहिजे असें प्रतिपादी. लोक व्यक्तीची आज्ञा पाळत नाहींत, पदाची पाळतात. वाईट राजा येणें हें प्रजेच्या पातकाचें फळ. राजा वाईट वागेल तर तो प्रजाद्रोह नव्हे तर देवद्रोह आहे. देव त्याला शिक्षा करील, लोकांनीं शिक्षा करावयाची नाहीं. धर्मतत्त्वें सांगण्याचा हक्क धर्मपीठाला आहे व खऱ्या धर्माचें संरक्षण राजकीय सत्तेमार्फत व्हावें हें त्याचें मत फ्रान्समध्यें, स्कॉटलंडमध्यें राजकीय परिस्थितीमुळें निराळें परिणाम देणारें ठरलें. फ्रान्समध्यें त्याच्या पंथीयांनीं राजाश्रय मिळणें अशक्य झाल्यामुळें राजकीय विरोध स्वीकारला व तेंच स्कॉटलंडमध्यें झालें. जॉन नॉक्सनें स्पष्ट सांगितलें कीं, "अधर्में वर्तावें असें सांगणाऱ्या राजाचें ऐकावें असें परमेश्वरानें सांगितलें आहे असें म्हणणें म्हणजे परमेश्वर अधर्माचा व पापाचा रक्षणकर्ता आहे असें म्हणण्यासारखें आहे. असें जे म्हणतील ते देवाचे निंदक असून प्रायश्चित्त भोगतील." धार्मिक भांडणामुळें राजसत्ता राष्ट्राचें नेतृत्व सांगूं लागली, एकीचें प्रतीक ती ठरली, राज्यकारभाराचें केन्द्रीकरण ती करूं शकली. इंग्लंडचे राजसत्तेला

विरोध पूर्वीपासून विशेष नव्हता म्हणून धर्मामुळें तो अधिक वाढला नाहीं. इंग्लंड-मध्यें स्थानिक अगर प्रांतिक सत्ताकेंद्रें प्रभावीं नव्हतीं म्हणून राजसत्तेला प्रभावी विरोध नव्हता. राज्यकारभारांत लवकर एकसंधीपणा आला, राष्ट्रांत जूट लवकर झाली. राजाचे अनियंत्रित सत्तेला विशेष उचलून धरण्याचें कारण पडलें नाहीं व पुढें राजसत्तेला विरोध झाला तो पार्लमेंटचे द्वारें. म्हणजे राजकीय दृष्टीनें फ्रान्समध्यें प्रांतिक सत्ता विशेष होती. यादवी होऊन मगच फ्रान्समध्यें एकसंधी सत्ता राजानें स्थापन केली. राजाचे अनियंत्रित सत्तेचे पुरस्कर्ते या परिस्थितींत पुष्कळ निर्माण होणें साहजिक होतें. एकसंधी राष्ट्र फ्रान्समध्यें राज्यानें निर्माण केलें व ते अनियंत्रित सत्ता होती म्हणूनच झालें हें उघड दिसतें. धार्मिक भांडणाबरोबर राजकीय व धार्मिक विरोध एकमेकांत निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या तऱ्हांनीं समाविष्ट झालेले होते. अनियंत्रित राजसत्ता ही पूर्वापार परंपरेला व इतिहासाला सोडून आहे व त्याचप्रमाणें न्यायाविरुद्ध व निसर्गाचे कायद्याविरुद्ध आहे असें फ्रेंच प्रॉटेस्टंटपंथीयांची विचार-सरणी होती. नैसर्गिक कायदा व जुने व कदीम हक्क सांगून राजसत्तेला मर्यादा आहे असें अन्यही म्हणत. तथापि, पद्धतशीर विचार ह्युजेनॉट-फ्रेंच प्रॉटेस्टंटपंथ-लेखक हॉटमन, लेव्युट, मार्ने वगैरेनीं मांडले. दैवी कायद्याविरुद्ध राजाज्ञा असल्यास ती मानावी का ? वरीलप्रमाणें वर्तन करणाऱ्या राजाविरुद्ध प्रतिकार करणें कायदेशीर आहे का ? व तो कोणी कसा व कोठपर्यंत करावा ? त्याचप्रमाणें राज्यांत तो अन्य रीतीनें जुलूम करीत असेल तर प्रतिकार करणें योग्य आहे का व तो कोणी, कसा व कोठपर्यंत करावा ? एका राज्यांत लोक धर्मासाठीं अगर जुलमाविरुद्ध राजसत्तेला प्रतिकार करीत असतील तर दुसऱ्या राजांनीं त्यांना मदत करणें कायदेशीर आहे का ? त्यांनीं ती केलीच पाहिजे का? असे प्रश्न उपस्थित करून मॉर्नेनें आपल्या ग्रंथांत त्यांचें विस्तारानें विवेचन केलें आहे. राजा व प्रजा एक पक्ष व परमेश्वर दुसरा पक्ष यांच्यांत एक करार अगर संकेत झाला. यामुळें समाज हा एक धर्मसंघ झाला, लोक देवाचे लाडके झाले व त्यांचेवर खरा व योग्य धर्म आचरण्याचें बंधन आलें. राजा व जनता यांच्यांत दुसरा करार अगर संकेत झाला. त्यामुळें जनता राज्य झाली. राजानें चांगलें वागलें पाहिजे व तो चांगला वागेल तोंपर्यंत लोकांनीं त्याचें ऐकावें असें बंधन त्याचेवर आलें असें मॉर्नेचें म्हणणें आहे. दुसऱ्या करारावरून राज्य हें समाजासाठीं आहे व निष्ठा ही सशर्त आहे हें स्पष्ट होतें. तथापि, राजाचा देवाशीं संबंध लावण्यांत तत्कालीन परिस्थिति कारणीभूत झाली होती हें उघड दिसतें. धर्माप्रमाणें वागण्याची हमी राजा व जनता यांचेकडून देवानें जणूं कांहीं जथीमथीनें घेतली होती ! ! राजाला देवाकडून व जनतेकडून सत्ता

मिळाली होती म्हणून देव व जनता ही राजापेक्षां श्रेष्ठ आहेत व दोघांची सेवा त्यानें केली पाहिजे असा निष्कर्ष काढण्यांत आला. सत्धर्म त्यानें चालवावा व त्यासाठीं सत्ता आहे, न चालविल्यास तो कराराविरुद्ध वागतो म्हणून प्रत्येक ख्रिश्चनानें त्याला विरोध करावा, प्रत्येक ख्रिश्चनाचा धर्म देवाचें ऐकावें हा आहे म्हणून धर्मविरोधी राजाचा प्रतिकार करणें हें त्याचें कर्तव्य ठरतें. जनतेचें कर्तव्य सत्धर्म राखण्याचें आहे व राजा त्याविरुद्ध जात असतां जनता स्वस्थ राहील तर दोषी ठरेल. दुसऱ्या कराराविरुद्ध वागून राजा जुलूम करील तर त्याला जनतेनें विरोध करावा. जनतेची निष्ठा सशर्त व तीही न्याय्य व कायदेशीर राजसत्ता असेल तर. राजानें मात्र आपली वर्तणूक बिनशर्त चांगली ठेवली पाहिजे. वहिवाटीचा हक्क जनतेविरुद्ध राजाला सांगतां येणार नाहीं. मनुष्य स्वभावतः स्वातंत्र्यप्रिय आहे व ज्याअर्थीं दुसऱ्याचे ऐकण्यास तयार होतो, कांहीं मर्यादा स्वीकारतो, त्याअर्थीं कांहीं तरी चांगले होईल, फायदा मिळेल म्हणूनच हें तो करीत असला पाहिजे व यांत जर अपेक्षाभंग झाला तर मूळ भूमिकाच नाहिंशी होते हें उघड आहे. राजापेक्षां कायदा श्रेष्ठ आहे. कायदा म्हणजे मूर्तिमंत विवेक व शहाणपण होय. विचारी मन म्हणजे कायदा आणि विचारी मन म्हणजे परमेश्वरी अंश. म्हणून कायद्याचें ऐकणें म्हणजे देवाचें ऐकणें होय. कायदा हा लोकांचा ठेवा आहे, राजाचा नव्हे. त्यांचे संमतीनें तो बदलतां येतो. कायद्याप्रमाणें राजानें चालले पाहिजे. कायद्याविरुद्ध व जुलमानें वागणारा राजा आपला हक्क गमावितो. जो बेकायदेशीर रीतीनें राजा होऊन जुलूम करीत आहे तो मुळीं राजाच नव्हे म्हणून कोणाही नागरिकाला त्याचा प्राण घेण्यापर्यंत प्रतिकार करण्याचा हक्क आहे. जो राजा कायदेशीर आहे पण पुढें कायद्याविरुद्ध वागूं लागला तर त्याला विरोध करण्याचा हक्क वाटेल त्या नागरिकाला व्यक्तिगत नाहीं, तर राज्यांतील सर्व जनतेला एक संघ या नात्यानें तो आहे. जनतेचा विरोध हा तिचे नेत्यामार्फत व्हावयास पाहिजे असें मॉर्नेचें म्हणणें आहे. त्याचे ग्रंथांतून तो लोकशाहीचा पुरस्कार करणारा होता असें विधान कांहीं करतात. तें चूक आहे. त्याची व त्यावेळची विचारसरणी केवळ प्रतिकाराचा हक्क आहे याच्या पलीकडे गेली नाहीं,कारण परिस्थितीची मागणी तेवढीच होती.

स्कॉटिश पंडित बुकॅननें आपल्या ग्रंथांत दोन्ही करारांचा उल्लेखही केला नाहीं. त्याचें म्हणणें, सत्ता ही समाजाची देणगी आहे व म्हणून सत्तेचा उपयोग समाजाचे कायद्याप्रमाणें झाला पाहिजे. मनुष्यें स्वभावतः सामाजिक प्रवृत्तीचीं आहेत म्हणून सर्वसामान्य नियंत्रण करण्यासाठीं उत्पन्न झालेलें शासन हें नैसर्गिक आहे.

प्रतिकाराबाबत त्याची भूमिका मॉर्नेप्रमाणेंच आहे. खुद्द फ्रान्समधील पार्लमेंटनें ( States-General ) कायदा करून राजाबद्दलची निष्ठा रद्द केली. ' जर राजा संरक्षणाचें कर्तव्य बजावीत नसेल, जुलूम करीत असेल, जनतेचे प्राचीन हक्क व स्वातंत्र्य नष्ट करीत असेल आणि त्यांना गुलाम समजत असेल तर तो राजा नाहीं, जुलमी सत्तावान् आहे; आणि तो तसा आहे म्हणून राज्यांतील संस्थांना त्याला पद-च्युत करून त्याचे जागीं दुसरा निवडण्याचा हक्क आहे ' असें सरनाम्यांत जाहीर करून सदरहू कायदा पास करण्यांत आला. या सरनाम्यांत त्या वेळचें राजकीय तत्त्व-ज्ञान पूर्णपणें प्रतिबिंबित झालेलें आहे. खुद्द कॅथॉलिकपंथी जेसुयिस्ट लेखकसुद्धां प्रतिकाराचा हक्क आहे असें प्रतिपादित होते. विशेषतः स्पॅनिश जेसुयिस्टांत ही विचार-सरणी अधिक प्रभावी होती. जुआन डी मरीयानाचें मतें राजाला सत्ता लोकांकडून करारानें मिळाली. लोकांचे प्रतिनिधिसंस्थांना कायदा बदलण्याचा हक्क आहे. करारा-पूर्वीं लोक केवळ पशुवत् राहात होते. स्वतःचें स्वतःला असावें, संग्रहबुद्धि, मालकी भावना ही सुरू झाल्याबरोबर त्यांनीं समाजरचनेकडे पहिलें पाऊल टाकलें. आपली वस्तु आपल्याला राहावी म्हणून प्रत्येकाला वाटूं लागले म्हणजे आपोआपच संकेत उत्पन्न होतात. दिल्याशिवाय कोणीं घेऊं नये, जो मिळवील त्याचा त्यावर मालकी हक्क वगैरे भाव निर्माण होणें म्हणजे समाजांत नियमनाचा जन्म झाला, म्हणजे कायदा जन्मला, म्हणजे शासन आलें. याप्रमाणें त्यानें समाजाचें व शासनाचें जन्म-रहस्य सांगितलें. प्रतिकाराचा हक्क तर प्रतिपादलाच; पण जुलमी राजाचा वध हेंही समर्थनीय म्हणून सांगितलें. जेसुयिस्ट ग्रंथकार स्वॅरेज यानें प्रतिकाराच्या हक्कांचें निराळ्या रीतीनें समर्थन केलें. निसर्गांत व मनुष्य स्वभावांत कांहीं गुणविशेष असे आहेत कीं, त्या योगानें कांहीं वर्तन हें चांगलें होतें व कांहीं वाईट होते. या परिस्थितींत योग्य अगर अयोग्य, चांगले अगर वाईट हें कांहीं परमेश्वराचे अगर मनुष्याचे लहरीवर अवलंबून नाहीं तर कांहीं नियमानें तें ठरलें जातें. मनुष्यांचें संबंध व त्यांच्या वर्तनाचे परिणाम यांवर राज्यांतील कारक कायदा व त्यांचे नियम यांची यथार्थता अवलंबून असते. जो नैसर्गिक कायदा आहे तो परमेश्वर अगर पोप कोणीही बदलूं शकत नाहीं. जें त्यानें अयोग्य ठरविलें असेल तें परमेश्वराला सुद्धां योग्य म्हणतां येणार नाहीं, म्हणून जो कायदा अगर जो आचार या नैसर्गिक कायद्या-विरुद्ध आहे तो अयोग्य आहे, तो बदलण्याचा अगर त्याला प्रतिकार करण्याचा जनतेला हक्क आहे. व्यक्तीप्रमाणें राजानेंही नैसर्गिक कायद्याप्रमाणें चाललें पाहिजे. म्हणजे राज्याराज्यांतील संबंधसुद्धां नैसर्गिक कायद्याचे आधारावर नियमित केले

पाहिजेत. तात्पर्य, प्रतिकाराचे हक्कामागें राजाला सत्तादान लोकांनीं केलें त्यानें राज्य न्याय व समाजहित यांकडे पाहून चालविलें पाहिजे. निष्ठा ही सशर्त आहे. राजा कायद्याविरुद्ध वागल्यास त्यास प्रतिकार करण्याचा हक्क आहे, येवढें तत्त्वज्ञान उभें राहिलें.

प्रतिकाराचे तत्त्वज्ञानाविरुद्ध राजाची सत्ता दैवी आहे हें तत्त्वज्ञान येणें अपरिहार्य होतें. ही विचारसरणी मांडण्याला कारणपण धार्मिक भांडणेच झालीं. अल्पसंख्यांकांनीं विरुद्ध धर्माच्या राजाविरुद्ध प्रतिकाराची मीमांसा सांगितली, तर बहुसंख्यांकांनीं राजाचे बाजूनें विधर्मी अल्पसंख्यांकांना चिरडून टाकण्यासाठीं राजसत्तेला दैवी प्रतिष्ठा दिली. सुरवातीला धर्मभेदामुळें होणारी यादवी टळावी म्हणून स्थैर्य व सुव्यवस्थेचें बाजूनें राजसत्ता दैवी आहे हें सांगण्याचा उपक्रम झाला. दैवी आहे असें म्हटलें म्हणजे विरोध करणें देवाविरुद्ध वर्तन होतें म्हणून टळेल अशी आशा होती. फ्रान्समध्यें दोन्ही पंथ जोरकस होते, त्यांच्या लढ्यांत देशाचा नाश होत होता व फ्रेंच राज्यसत्ता व फ्रेंच सभ्यता व संस्कृतीचा नाश होईल हें दिसूं लागलें होतें. फ्रान्सबाहेर, फ्रेंच वर्चस्व कमी होत होतें. यांतून एकच मार्ग राष्ट्राचे अभ्युदयासाठीं होता व तो म्हणजे राजाला राष्ट्राचें नेतेपद देऊन सर्वांनीं त्याच्याशीं निष्ठावन्त राहावयाचें. धर्म पृथक् असून राजा एक मानणें केवळ राष्ट्रभावनेनें शक्य झालें. राजा दैवी हक्कानें आहे हें म्हणणें या परिस्थितींत अधिक सोयीचें होतें. शिवाय अधिकार, राजकीय अधिकार याला पूर्वींपासून एक धार्मिक प्रतिष्ठा होतीच. सेंट पालपासून ही विचारसरणी चालू होतीच व राजाची सत्ता दैवी आहे व तिचा दुरुपयोग झाल्यास प्रसंगीं विरोध करण्याचाही हक्क आहे हे दोन्ही विचार प्राचीन काळापासून परिचित होते. दोहोंमध्यें जुळणी करून वागणें शक्य होतें. परंतु तीव्र धार्मिक मतभेद झाल्याबरोबर दोन्ही विचार अतिरेकाला गेले. धर्मासाठींसुद्धां बंड करावयाचे नाहीं, प्रतिकार करावयाचा नाहीं, विनशर्त सविनय आज्ञापालन हा व्यक्तीचा धर्म आहे, राजाला विरोध म्हणजे देवाला विरोध आहे, राजा देवाचा या जगीं प्रतिनिधि आहे असें एक पक्ष म्हणूं लागला. दुसरा पक्ष काय म्हणे याचें विवेचन मागें केलें आहे. अस्वस्थता व अव्यवस्था यांचे भीतीमुळें लोक या पहिल्या विचारसरणीकडे वळले. राजाश्रयानें आपला पंथ प्रभावी होईल म्हणून त्या पंथानें ही विचारसरणी उचलून धरली. राष्ट्रीय एकी, राष्ट्रीय स्वातंत्र्य, देशाभिमान या भावनांनीं या विचारसरणीला महत्त्व आलें व राजा मागें सांगितल्याप्रमाणें धर्मनेता, राष्ट्रनेता व सर्वसत्ताधीश झाला. बौद्धिक समर्थन या विचासरणीचें करणें अशक्य होतें. धर्मवचनें घेऊन जों-

पर्यंत राजकारणाचा विचार होत होता तोंपर्यंत या दैवी हक्काला कांहीं आधार होता. राजकारणाचा, राज्याचा विचार केवळ बौद्धिक दृष्टीनें होऊं लागल्याबरोबर हें दैवी हक्काचें भूत सद्‌गति घेतें झालें. नैसर्गिक कायद्यावर जर हा हक्क सांगावा तर अनावस्था होते. वारससंबंधींचे कायदे निरनिराळ्या देशांत निरनिराळे होते. फ्रान्समध्यें स्त्री राजा होऊं शकत नव्हती; म्हणजे देशादेशांतील कायदे पाहून देव सत्तादान करतो असें ठरतें, म्हणजे देशांतील कायदाच देवापेक्षां श्रेष्ठ ठरला, तेथील रीतिरीवाज त्याचेपेक्षां प्रभावी ठरले !! बौद्धिक दृष्टीनें कांहीं असो प्रत्यक्ष व्यवहारांत दैवी हक्कांची विचारसरणी कांहीं काल लोकप्रिय होती हें खरें. 'कायद्याचें निवासस्थान राजाचें अंतःकरण' आहे, राजा म्हणजे 'चालती बोलती देवाची प्रतिमा आहे' असें सांगण्यांत येत असे. इंग्लंडचा राजा पहिला जेम्स तर असें म्हणे की, "पार्लमेंटापूर्वी राजा होता, कायद्यापूर्वी राजा होता, फार काय राजानें दिली म्हणून जमिनींत मालकी लोकांना आहे. राजा कायदा करतो, कायदा राजाचा निर्माता नाहीं; देवरहस्य व राजरहस्य पाहूं नये. दोन्ही पवित्र आहेत" !! इंग्लंडमध्यें अव्यवस्थेची भीति नव्हती म्हणून राजाचे अनियंत्रित सत्तेला दैवी हक्काची जोड फारशी प्रभावी ठरली नाहीं. राष्ट्रीय एकी का यादवी हा प्रश्न तेथें उत्पन्न झाला नाहीं, तर राष्ट्रीय एकीचें प्रतीक कोण ? राजा कीं पार्लमेंट ? कायदा करणार कोण ? राजा कीं पार्लमेंट ? असें तेथील वादाचें स्वरूप स्पष्ट झालें. युरोपमध्यें राष्ट्रीय स्थैर्यासाठीं लोकांनीं दैवी हक्काचें महत्व मान्य केलें व म्हणूनच तद्‌विषयक विचारसरणी लोकप्रिय झाली.

दैवी हक्क केवळ राजाला राज्यांत सुव्यवस्था व शांतता राखण्याचे कामीं अधिक यश यावें या हेतूनें बहाल केला गेला असे दिसतें. सर्व पक्षातीत राष्ट्रीय एकीचे केंद्र ही राजाची भूमिका सर्वत्र मान्यता पावली. राज्यांत या रीतीनें धर्मकलह बंद पडत चालले व सहिष्णुता मान्यता पावत चालली. सहिष्णुता व राष्ट्रीय एकी झाल्याबरोबर राजकीय विचार धर्मविषयक विचारांतून अलग झाले. राज्याचें प्रभुत्व याचा धर्मापासून संबंध तुटला व तत्संबंधींचे विचार केवळ राजकीय भूमिकेवरून होऊं लागले. बॉडीन या फ्रेंच पंडिताची विचारसरणी या दृष्टीनें महत्त्वाची आहे. संट बार्थलोमोची कत्तल झाल्यानंतरचा त्याचा महत्त्वाचा ग्रंथ प्रजातंत्र ( Republic ) हा प्रसिद्ध झाला. या क्रूर कत्तलीचा परिणाम त्याच्या व अनेकांच्या विचारावर झाला. सहिष्णुता व सुव्यवस्था यांचा पुरस्कार येवढा झाला कीं, या विचाराचे मंडळींना 'राज्यांतील शांतता व सुव्यवस्था आत्मोद्धारापेक्षां अधिक वाटते व परमेश्वराची बाजू घेऊन लढत राहाण्यापेक्षां त्याला सोडून हे शांतता स्वीकारण्यास अधिक

तयार आहेत ' अशी टीका त्यांचेवर झाली. बॉडीनवर तर कायदेपंडितांनीं पण टीका केली. कारण बॉडीनचे मतें कायदा व राजकारण नुसतें ऐतिहासिक दृष्टीनें न पाहातां राष्ट्रांतील भौतिक परिस्थिति, हवापाणी, वंश वगैरे गोष्टींचाही त्यांत संबंध आहे म्हणून त्यांचाही त्यांत विचार व्हावा. मध्ययुगीन दृष्टिकोन बॉडीनचा नाहीं, पण त्यांत संपूर्णपणें आधुनिक दृष्टिकोनही नाहीं. इतिहास व मीमांसा यांचा संयोग घडवून आणण्याचें काम आपण करीत आहोंत असें त्याचें म्हणणें होतें. इतिहासाचें चैतन्य त्यांत जर नसेल तर मीमांसेचीं सर्व प्रमेयें निःसत्व व निर्जीव आहेत असे तो म्हणे. सर्वसामान्य सिद्धांतांचे चौकटींत उपलब्ध होणारा अनुभव बसविण्याचा त्याचा प्रयत्न असे. वस्तुस्थितीनें सिद्धान्ताला बाळसें यावें व बुद्धीनें त्यांतून अर्थ लावावा अशी त्याची योजना होती. केवळ सुखासाठीं व लोकांच्या भल्यासाठीं राज्य आहे असें त्याचें मत नव्हतें. “ राज्याला शरीर व आत्मा दोन्ही आहेत व आत्मा श्रेष्ठ आहे; ' तथापि या आत्म्यासाठीं काय करावें हें नक्की त्यानें सांगितलें नाहीं. समाजांतील मुख्य संस्था कुटुंब व कुटुंबाला खाजगी मालकीचे हक्क आहेत. कुटुंबांतूनच समाज व राज्य यांचें संघटन होतें. नाना कुटुंबें संरक्षणासाठीं व सोयी-साठीं संघटित होतात. ही संघटना म्हणजे गांवें, शहरें, निरनिराळ्या संस्था व हीं सर्व एका सत्तेखालीं आली म्हणजे राज्य निर्माण होतें. या विचारसरणीनें त्यानें कुटुंब व खाजगी मालमत्ता यांचे महत्त्व वाढविलें. खाजगी क्षेत्रांत कुटुंबाचें महत्त्व, सार्व-जनिक क्षेत्रांत राज्याचें महत्त्व. संपत्तीची मालकी कुटुंबाची, प्रभुत्व राज्याचें मालकीचें. खाजगी मालकी ही कुटुंबाचे नैसर्गिक हक्काची बाब त्यानें मानली. राज्याला प्रभुत्व हें नैसर्गिक आहे असें मात्र त्यानें म्हटलें नाहीं. बलाचे जोरावर राज्य निर्माण झालें असें त्याचें मत आहे. पण बल हें एकमेव राज्याचें लक्षण आहे असें त्यानें म्हटलें नाहीं. बलाचे जोरावर दरवडेखोरांचीपण संघटना प्रभावी असते, पण तिला कोणी राज्य म्हणत नाहीं. लोक राज्याचें कां मानतात हें नक्की त्यानें सांगितलें नाहीं. प्रभुत्व, अखेरची सत्ता असल्याशिवाय राज्य सुव्यवस्थित राहाणार नाहीं येवढें त्याने स्पष्ट केलें आहे. देवाचा संबंध प्रभुत्वाशीं नाहीं हें त्यानें स्पष्ट केलें, पण प्रभुत्व कशावर आधारलेलें आहे याचें स्पष्टीकरण त्यानें केलें नाहीं. राज्य म्हणजे ज्यांत राजा व प्रजा असा संबंध आहे असें संघटन. राजा म्हणजे प्रभुत्व हें नातें ज्यांत आहे तें राज्य. प्रजा व राजा यांमध्यें अनेक नातीं असतील. ते एक धर्माचे असतील नसतील. एक भाषा असेल नसेल. एक वंश असेल नसेल, या सर्व गोष्टींचा राज्य या तात्त्विक कल्पनेशीं संबंध नाहीं. राजा व प्रजा हें नातें असणें म्हणजे राज्य. या विचारसर-

णीनें त्यानें राजकीय विचारांत क्रांतिकारक भर टाकली. नाना पंथ, नाना वंश, नाना रीतिरिवाज, नाना कायदे असले तरी राजा व प्रजा हें एक राजकीय बंधन असले म्हणजे राज्य झालें. समान प्रभुत्व असलें म्हणजे एक राजकीय समाज होतो असा या विचारसरणीचा निष्कर्ष आहे. प्रभुत्व म्हणजे नागरिक व प्रजा यांच्यावरील सर्व श्रेष्ठ सत्ता, ती कुठल्याही कायद्यानें मर्यादित होत नाहीं. ती तात्पुरत्या स्वरूपाची नसून कायम स्वरूपाची असते. बिनशर्त असणें हें तिचें लक्षण आहे. ती अदत्त नसली तरी अदेय आहे. वहिवाटीनें तिला बाध येत नाहीं. तिचेपासून कायदा निर्माण होतो म्हणून ती त्यापेक्षां श्रेष्ठ आहे. ही सर्व श्रेष्ठ सत्ता अनिर्बंधित असून कायद्यानें कोणाला जबाबदार नाहीं. राज्यांतील कायदा म्हणजे राजाचा हुकूम. रीतिरिवाजसुद्धां राजाज्ञेचे परवानगीनेंच जारी राहातात. राजा कायदा करून ते बदलूं शकेल पण रीतिरिवाजानें कायदा बदलतां येणार नाहीं. कायदा करण्याचा हक्क हा एकट्या राजाला आहे, कारण प्रभुत्वाचे तें मुख्य लक्षण आहे. प्रत्येक सुव्यवस्थित राज्यांत ही कायदे करण्याची सत्ता कुठें तरी असली पाहिजे. हे प्रभुत्व, ही अविभाज्य सत्ता कुठें तरी राज्यसंघटनेंत असली पाहिजे, राज्याचा तो आत्मा आहे. ती नसेल तर राज्य नाहीं. राज्यसत्तेचें स्वरूप या प्रभुत्वाचे अधिष्ठानानें बदलेल पण राज्याचें स्वरूप बदलणार नाहीं. राज्य म्हणजे ही सत्ता ज्यांत आहे तें संघटन. जर ही सत्ता एका माणसाकडे असेल तर ती राज्यसत्ता ( Government ) राजसत्तात्मक ( Monarchy ) ठरेल; जर कायदे करतांना सरदार वगैरे संस्थांची संमति अवश्य असेल तर ही सत्ता त्या संस्थांत आहे म्हणून ती राज्यसत्ता महाजनसत्तात्मक ( Aristocracy ) ठरेल. जर ही अखेर निर्णयाची सत्ता लोक प्रतिनिधींच्या संस्थांचे हातांत असेल तर ती राज्यसत्ता लोकशाही ( Democracy ) स्वरूपाची ठरेल. राज्यसत्तेचें कांहींही स्वरूप असलें तरी राज्यांचें स्वरूप एकच राहातें. राज्याचें स्वरूप व प्रभाव कायद्यानें प्रजेला कळतो. कोण कायदा करतो, यानें कायद्याचें काय स्वरूप राहील याचा अंदाज बांधतां येईल. बॉडीननें राज्य व राज्यसत्ता अगर सरकार यांतील भेद एक प्रकारें स्पष्ट केला. राज्य म्हणजे प्रभुत्व, निर्णयात्मक सत्ता; राज्यसत्ता अगर सरकार म्हणजे त्या सत्तेच्या आविष्काराचें साधन; राज्य म्हणजे अर्थ व राज्यसत्ता म्हणजे वाणि असा त्यांतील संबंध दाखवतां येईल.

राज्यांतील सर्व संस्था, धार्मिक, व्यापारी वगैरे राजाचे मर्जीवर अवलंबून आहेत. त्याचेपासून त्यांना हक्क व प्रतिष्ठा प्राप्त होतात. प्रभुत्व जरी अमर्याद व बिनशर्त म्हणून त्यानें वर्णिलें तरी व्यवहारांत त्याला मर्यादा बसतात असें त्यानें

सांगितलें. कायदा करण्याचा हक्क जरी राज्याला आहे तरी नैसर्गिक कायद्याची त्याला मर्यादा आहे. मानवी कायद्यापेक्षां हा श्रेष्ठ आहे व ज्या प्रमाणांत मानवी कायदा हा कायद्याला अनुसरून असेल त्या प्रमाणांत राज्य हें यथार्थ आहे, येरवीं ती केवळ जबरदस्तांची संघटना होईल. वचनें पाळावींत, खाजगी संपत्ति हिरावूं नये ह्या गोष्टी नैसर्गिक कायद्यानें सांगितल्या आहेत. त्यांची कदर मानवी कायद्यानें केली पाहिजे. या दृष्टीनें नैसर्गिक कायदा अमर्याद प्रभुत्वाला मर्यादा घालतो. राजाला गादीचा वारसा बदलतां येत नाहीं. ही एक मर्यादा त्यानें सांगितली. त्याचप्रमाणें कांहीं बाबी कीं ज्यांना घटनात्मक महत्त्व असतें अशांत त्याला बदल करतां येणार नाहीं असें त्यानें प्रतिपादलें. राजाचें प्रभुत्व हें अमर्याद, सर्व कायद्यांचें उगमस्थान, पण त्याचबरोबर त्याला कांहीं घटनात्मक कायदे जे त्यानें केले नाहींत, ते बदलतां येणार नाहींत असें राज्यसत्तेचें विरोधात्मक स्वरूप त्याचे विचारसरणींत दिसून येतें. याचें कारण त्याला राजा राष्ट्राचे एकीसाठीं, सुव्यवस्थेसाठीं हवा होता, ती परिस्थिति राजाला अमर्याद प्रभुत्व दिल्याशिवाय शक्य नव्हती. जुनीं स्वातंत्र्यें व हक्कपरंपरा, जुन्या संस्था व संकेत तर त्याला हवे होते. त्या दृष्टीनें राजाला अमर्याद सत्ता देणें धोक्याचें होतें. म्हणून नैसर्गिक कायद्याच्या मर्यादा त्यानें राज्यसत्तेला घातल्या, घटनात्मक बाबींचा कोट त्याच दृष्टीनें उभारला. राजा हें राज्यांतील लोकांच्या प्रभुत्वाच्या आविष्काराचें एक साधन आहे असें सरळ म्हणण्याचें त्यानें टाळलें. तथापि, राजानें निःपक्ष राहावें, दडपशाही न करतां समजुतीचे व सहकार्याचे धोरणानें वागावें, तहनामे व वचनें पाळावीत म्हणजे सुव्यवस्था राहील, क्रांति होणार नाहीं असें प्रतिपादलें. क्रांति म्हणजे प्रभुत्वाचें अधिष्ठान बदलणें असा त्यानें अर्थ केला आहे. नुसते कायदे बदलून क्रांति होत नाहीं. कायदे करणारें बदललें, ती निर्णयात्मक सत्ता स्थान बदलती झाली म्हणजे क्रांति झाली असें ॲरिस्टॉटलप्रमाणें त्याचें मत होतें. अमर्याद प्रभुत्वाची फ्रान्सचे परिस्थितींत आवश्यकता होती म्हणून तिला इष्ट ठरविण्यासाठीं ही तत्त्वप्रणाली मांडली असा त्याचेवर आक्षेप आहे. इतिहास व तत्त्वज्ञान यांची जोड घालण्याचे प्रयत्नांत आवश्यक तें इष्ट वाटणें अपरिहार्य आहे. साधारण गोष्टींना महान् तत्त्वांचें महत्त्व देण्याची संवय तात्त्विक दृष्टीनें इतिहासाकडे पाहाणारांना असते. इतिहास म्हणजे नानाविध अनुभव आहेत, कार्यकारण सांगणारा तर्क ग्रंथ नव्हे अगर प्रमेयांचें विवेचन करणारी सिद्धांत कौमुदी नव्हे. दोन गोष्टी मात्र बॉडीनचे विचारांतून स्पष्ट झाल्या. एक, प्रभुत्व म्हणजे राजकीय सत्ता, राज्य म्हणजे सत्ता असणारें व ज्यावर ती चालते यांच्यांतील संबंध, कायदा म्हणजे त्या सत्तेची आज्ञा. व दुसरें म्हणजे ही सत्ता कशानें तरी मर्यादित असावी.

धर्मशास्त्राचे पकडींतून राजकारणशास्त्राची सोडवणूक करण्यास बॉडीननें सुरवात केली. त्यानंतरच्या विचारवंतांनींही तोच उपक्रम स्वीकारला. खुद्द जेसुयिस्ट पंथाच्या लेखकांनीं राज्याची मीमांसा धर्मदृष्टया लावण्याचें सोडून दिलें. त्यांचा हेतु धर्माची प्रतिष्ठा फक्त पोपमहाशयांना राहून त्यांच्या अधिकाराचें वैशिष्ट्य वाढावें हा होता. समाज करारानें अस्तित्वांत आला असें सांगण्यांत येई, पण त्यांत धर्माचा अगर देवाचा भाग नसे. कसें वागावें हें ठरविणें अगदीं नैसर्गिक आहे, ही सामाजिक प्रवृत्ति आहे व तिला अनुसरून माणसें कसें वागावें हें ठरवितात. या ठरावांतून समाज निर्माण होतो. संगतींत व समाजानें राहाणें ही एक नैसर्गिक गोष्ट आहे, मनुष्याच्या अनेक नैसर्गिक गोष्टींप्रमाणें ही एक आहे असे प्रत्यक्ष कोणीं म्हटलें नाहीं तरी करारप्रवृत्ति ही नैसर्गिक आहे व करारानें समता होते हें म्हणणें जवळजवळ तसेंच आहे. अलथ्युसीयसनें ( Althusius ) प्रभुत्व ज्यांत आहे हें राज्य व हें प्रभुत्व लोकांतच संघदृष्टया राहातें असें स्पष्ट सांगितलें. हें प्रभुत्व त्यांना दुसऱ्या कोणालाही देतां येत नाहीं असें त्यानें सांगून लोकसंस्थेचे उद्देश सफल व्हावे म्हणून करारानें कांहींना प्रत्यक्ष कारभार करण्यासाठीं सत्ता दिली जाते अशी विचारसरणी मांडली. जर तिचा दुरुपयोग झाला तर तें सत्तादान रद्द होते व ती पुनः मूळ मालकाकडे येते. या विचारसरणींत प्रभुत्व व कारभार करणारी सत्ता अलग दाखवून दोन्हींचें अधिष्ठान निराळें असतें असें त्यानें विशद केलें. प्रभुत्वावर याप्रमाणें विसंगति न येतां व्यवहारांत मर्यादा बसते. माणसें संमतीनें संघांत येतात व राज्य ही एक संमतीवर आधारलेला संघ आहे या विचारसरणींत उत्पन्न झालेला अधिकार हा त्या संघाच्या संघटनेंतूनच निघतो हें स्पष्ट होतें व त्याजबरोबर तो संमतीवर आधारलेला असल्यामुळें मर्यादित करतां येतो व प्रसंगीं त्याला विरोध करणें योग्य ठरतें हेंही उघड होतें. ग्रोशियसनें ( Grotius ) जवळजवळ हीच विचारसरणी मांडली. राज्याराज्यांतील संबंधांत त्यानें मांडलेली विचारसरणी विशेष महत्त्वाची मानली जाते. मनुष्य हा विशेष प्रवृत्तीचा प्राणि आहे. त्याला संगति व समाज हवा असतो ही त्याची प्रवृत्ति अनिवार्य असते व समाजांत येण्यांत त्याचा स्वार्थ असला तरी त्यांतून समाजाचें हितही साधतें. त्यानें निर्बंध स्वीकारल्यानें समाजांत सुव्यवस्था व शांतता राहाते. ही सुव्यवस्था ठेवणें अवश्य आहे व या आवश्यकतेंतून सर्व कायद्यांचा उगम आहे. ही सुव्यवस्था राहावी म्हणून संपत्तीचें स्थैर्य, शहाजोग व्यवहार, वचनपूर्ती वगैरे बाबतींत कांहीं तरी नियम अगर संकेत होणें जरूर असतें. मनुष्याच्या आकांक्षा व आचार यांची जुळवणूक नियमानें व संकेतानें

होणें जरूर होतें. तसें न झालें तर अनर्थ होईल. पण मनुष्याची प्रवृत्ति सामाजिक असल्यामुळें या आवश्यकतेला अनुसरून तो वागत जातो. ही जी वागण्याची मनुष्याची प्रवृत्ति तीच नैसर्गीक कायद्याची जननी आहे. नैसर्गिक कायद्यांतून राज्याचा कारक कायदा ( Positive Law ) निर्माण होतो. राज्य या संघटनेंत असण्यानें हा मानण्याचें मनुष्यांनीं मान्य केलेलें असतें. कांहीं कांहीं गोष्टी सर्वत्र न्याय्य व योग्य मानल्या जातात. ह्या सर्व गोष्टी म्हणजे नैसर्गीक कायदा. सयुक्तिक व विवेकपूर्ण बुद्धि, रास्त व निसर्गधर्माला अनुसरून जें सांगते तें म्हणजे नैसर्गिक कायदा. कोणतें योग्य अगर अयोग्य हें हा कायदा सांगतो. निसर्गाला धरून असल्यामुळें देवालासुद्धां त्यांत फरक करतां येणार नाहीं. दोन अधिक दोन म्हणजे चार हें देव कसें बदलूं शकेल ? असें सांगून नैसर्गिक कायद्यांतील अचूकपणा ग्रोशियसनें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. राज्याराज्यांतील संबंधांत त्यानें हीच विचारसरणी मांडली. दोन भिन्न धर्मीय समाजाचे नियंत्रण कांहीं एका धर्माचे कायद्यानें होणार नाहीं. त्याचप्रमाणें एकाच धर्माचे भिन्न झालेले पंथ यांचें नियंत्रण एकाच कायद्यानें होणार नाहीं हें उघड आहे. कॅथॉलिक, प्रॉटेस्टंट, ख्रिस्तेतर समाज या सर्वांच्या परस्परांतील संबंधांचें नियमन करणारा कायदा अगर संकेत हवे होते. याचा अर्थ पूर्वीं हे संबंध नव्हते असा नव्हे, त्याचें नियमनही होत होतें. त्या नियमनाचे मागें नैसर्गिक कायदा आहे, त्याला अनुसरून तें होतें असें त्यानें प्रतिपादलें. आंतरराष्ट्रीय कायदा नैसर्गिक कायद्यावर आधारलेला आहे व असला पाहिजे असें त्याचें मत दिसून येतें. नैसर्गिक कायदा हा एक मानदंड झाला. राजकारण व राज्यांतील व आंतरराष्ट्रीय जगांतील कायदे योग्य कीं अयोग्य हें ठरविण्याची तो एक कसोटी झाला. तो एक नमुना म्हणून डोळ्यांपुढें ठेवून कायदे व्हावेत असें त्याचें महत्त्व ठरलें व त्या दृष्टीनें तो उपयुक्तही झाला. व्यवहारांत प्रभुत्वावर मर्यादा त्यानें घातली.

नैसर्गिक कायदा हा साधा, स्वयंसिद्ध व गणिताप्रमाणें अचूक आहे इतकें महत्त्व त्याला या वेळीं प्राप्त झालें. वास्तविक त्यांत अशी परिस्थिति नव्हती. कित्येक गोष्टी केवळ तर्कनिष्ठ होत्या म्हणून सत्य मानल्या होत्या. कांहीं गोष्टींपासून कांहीं परिणाम होतात हें खरें असलें तरी मूळ कांहीं गोष्टी सिद्ध कशा झाल्या ? त्या सत्य कशा ठरतील ? सत्य म्हणजे वस्तुनिष्ठ परिस्थिति. तर्कानें सिद्ध झालेली गोष्ट, अनुमान बरोबर आहे येवढेंच सांगेल. विवेकबुद्धीला अनुसरून नैसर्गिक कायदा आहे पण ही बुद्धि जें गृहीत धरील तें सत्य कसें ? त्या वेळचे मतप्रणालीप्रमाणें विवेकबुद्धी जे गृहीत धरील तें स्वयंसिद्धच असेल, त्याशिवाय ती तें गृहीत धरणारच नाहीं, असा तिचा

प्रभाव आहे असें मानलें जाई. गृहीत धरलेल्या सिद्धान्तांचे चौकटींत अनुभवानें, निरीक्षणानें काम करावें असें त्याचें मत होतें, म्हणूनच मानवी कायदा अगर कारक कायदा याला वाव आहे. कायदा अगर न्याय यांतील फरक या रीतीनें दिसून येतो. कायद्यापेक्षां न्याय अधिक आहे व अगोदरचा आहे. न्यायाची कल्पना अधिक व्यापक आहे. नैसर्गिक कायदा अगर न्याय ही एक शुद्ध अशी भूमितींतील सिद्धान्ता-प्रमाणें कल्पना आहे. जिला लांबी आहे पण रुंदी नाहीं, ही शुद्ध रेषेची व्याख्या आहे. प्रत्यक्ष अशी रेषा काढतांच येणार नाहीं. पण रेषा काढतांना शक्य तितकी रुंदी कमी ठेवण्याचे प्रयत्न व्हावेत या दृष्टीनें या व्याख्येची उपयुक्तता आहे, त्याच दृष्टीनें वस्तुस्थितींत शुद्ध, निर्भेळ, निरपेक्ष, न्याय येणार नाहीं, पण तो जास्तींत जास्त तसा आणण्याचा प्रयत्न करण्यासाठीं या शुद्ध कल्पनेची उपयुक्तता आहे. सर्व-सामान्य प्रघात याचें या दृष्टीनें महत्त्व आहे. जें योग्य आहे, त्याचा तो एक पुरावा आहे. तसें नसतें तर सार्वत्रिक मान्यता तो पावला नसता. ही विचारसरणी स्वीका-रूनच ग्रोशियसनें आंतरराष्ट्रीय कायद्याची मीमांसा केली. जें योग्य असेल त्याला अनुसरून राज्यांतील कायदा असला पाहिजे. अनुमानानें योग्य असणें व वस्तुस्थि-तींत योग्य असणें यांतील फरक स्पष्ट असून उमगला नव्हता. तथापि नैसर्गिक कायद्याचे कल्पनेनें राजकारणांतील भिन्न तात्त्विक दृष्टींत एकता उत्पन्न केली. एखादी गोष्ट यथार्थपणें बंधनकारक व्हावयाची असेल तर तिला ज्यांच्यावर बंधन पडणार आहे त्यांची संमति पाहिजे, हें एक स्वयंसिद्ध तत्त्व नैसर्गिक कायद्याचें होतें व हें स्वयंसिद्ध तत्त्व सर्व विचारवंतांनीं मान्य केल्यामुळें राजकारणांत एकता उत्पन्न झाली. कांहीं तरी मनुष्याला स्वीकारावें लागतें, पण त्यातल्यात्यांत स्वहिताचे दृष्टीनें व स्वमतानें जें तो स्वीकारील तेंच तो खरोखर स्वीकारतो. भीतीनें, जबरदस्तीनें अगति-कत्वानें स्वीकारलेलें याला नैतिक बंधन नसतें. खुशीनें स्वीकारणें म्हणजे ठरल्या-प्रमाणें वागूं असें वचन देणें असतें व वचन पुरें करावें ही नैसर्गिक प्रवृत्ति आहे. सयुक्तिक बंधन म्हणजे जें खुषीनें स्वीकारलेलें असतें तें. समाज कसा का अस्तित्वांत आला असेना हें तत्त्व स्वयंसिद्ध आहे. कांहीं तरी करार अगर संकेत झाल्याशिवाय सर्व सारख्याच, सर्व स्वतंत्र माणसांनीं कुणाचे तरी ऐकावें व कांहींही ऐकावें व कुणी तरी सांगावें असें होणें शक्य नाहीं, असें गृहीत धरून अलथ्युसीयस, ग्रोशियस प्युफेन्डार्फ यांनीं आपले विचार मांडले आहेत. करारामुळें प्रभुत्वाला मर्यादा येते असें प्रतिपादलें आहे. जनतेची संमति ही एक महत्त्वाची बाब याप्रमाणें सर्व विचारां-मागें आहे हें स्पष्ट झालें. नैसर्गिक कायद्याचे आधारावर राजकीय सिद्धान्त उभारल्या-

मुळें व्यक्तीचें महत्त्व जास्त ठरतें. व्यक्ति ही प्रथम व्यक्ति होती व संमतीनें समाजांत, राज्यांत नागरिक झाली, व तसें होणें अपरिहार्य होतें असें नैसर्गिक कायदा सांगे. समाज, राज्य हें मनुष्यासाठीं आहे. मनुष्य राज्यासाठीं नाहीं; व्यक्ति हें ध्येय व तिचे विकासासाठीं समाज व राज्य हीं साधनें आहेत. तर्क व नीति या दोन्ही दृष्टींनीं व्यक्ति, समाज अगर राज्य यांचे आधींची आहे, अग्रज आहे. व्यक्ति हें सत्य आहे, राज्य अगर समाज हा एक संबंध आहे. एक भरीव आहे, दुसरें कल्पनानिष्ठ आहे, असें मानण्याकडे त्या वेळीं प्रवृत्ति होती, व्यक्तिस्वातंत्र्यवादाचीं बीजें या प्रवृत्तींत दिसून येतात.

प्रभुत्व लोकांचें, त्यांनीं राज्यकारभारासाठीं ज्यांना दिलें, त्यांनीं दिलेल्या सत्तेचा दुरुपयोग केल्यास काढून टाकण्याचा हक्क आहे, ही विचारसरणी अधिक अधिक प्रभावी होऊं लागली. धर्मपंथांतील भांडणें जोंपर्यंत जोरांत होतीं तोंपर्यंत स्थैर्यासाठीं, एकी व संरक्षण यांसाठीं राजाचें महत्त्व वाढविलें जात होतें. त्या दृष्टीनें राजकीय विचार चालू होते. बहुजन समाजाचे आर्थिक हीनतेकडे, त्यांच्या दुःखाकडे कोणी बघतही नसे. तथापि मोअरनें ( More ) या गोष्टींचा परामर्ष आपल्या ग्रंथांत ( Uthopia ) केलेला आहे. समाज कसा परीग्रही झाला आहे याचें वर्णन त्यांत सांपडतें. संपत्तीची विषम वांटणी इतकी आहे कीं, अनेकांना चोरीशिवाय उपजीविकेचें साधन नाहीं असें सांगून आदर्श राज्याचें चित्र त्यानें रेखाटलें आहे. मनुष्यांतील सद्भावनांचा तो पुरावा होता, पण प्रत्यक्ष व्यवहारांत नीतिमत्तेला पाशवी बलापुढें हार खावी लागत होती. तथापि, बहुजन समाजाचा विचार हळूहळू होऊं लागला. गरजा भागाव्यात यासाठीं समाज निर्माण झाला, व्यवस्थेसाठीं राज्य निर्माण झालें, राज्यसत्ता अस्तित्वांत आली; राज्यसत्ता आली म्हणजे कारक कायदा आला. हा मानावा, कारण तो संमतीवर आधारलेला आहे, असा वेदांतही आला. पण क्लेश, दुःखें जाऊन समाधान लाभेल, समाजांत शांतता नांदेल अशी अपेक्षा कदाचित् असली तरी ती पुरी मात्र झाली नाहीं. नैसर्गिक कायद्याला अनुसरून मानवी कायदा असावा हें मान्य होऊनही पहिल्यांतील समताभाव दुसऱ्यांत आला नव्हता. उलट विद्यमान विषमता कायद्याचे आधारावर प्रतिष्ठा पावत होती. धर्माचें राष्ट्रीयकरण करून राज्यांत सर्वत्र एक धर्म असावा असें हुकूरनें प्रतिपादलें. त्याविरुद्ध जे जातील ते सुव्यवस्था व शांतता विरोधी आहेत असें समजावें असें त्यानें प्रतिपादलें. पण धर्मविरोधाशिवाय अशांततेचीं, अव्यवस्थेची कारणें झपाट्यानें उत्पन्न होत होतीं याकडे त्यानें अगर अन्य विचारवंतानीं फारसें लक्ष दिलें नाहीं. वैचारिक क्षेत्रांत मात्र

जनतेचें प्रभुत्व सिद्ध करण्याची परंपरा वाढत चालली होती. इंग्लंडमध्यें राजाला धर्मनेता केल्यामुळें राजकारणांतील तोल ढांसळला. खरी सत्ता कुठें आहे, खरें प्रभुत्व कोणाचें हा प्रश्न तेथें प्रस्तुत झाला; कुठें तरी तें असलें पाहिजे हें निश्चित आणि तें राज्यांतच असलें पाहिजे पण कोणत्याहि संघटनेच्या एका भागांत असणें शक्य नाहीं असे विचार पुढें येऊं लागले. राजा अगर पार्लमेंट अगर अन्य संस्था, यापैकीं कोणा एकाचें प्रभुत्व नाहीं तें राज्याचें आहे, पार्लमेंट ही अखेरची सत्ता आहे. कारण पार्लमेंट हें सर्वश्रेष्ठ न्यायालय आहे. न्यायदानाचा हक्क राजाला नाहीं असें एक पक्ष म्हणे. या उलट बेकनची विचासरणी होती, "न्यायाधीश हे सिंह, पण सिंहासनाखालील सिंह." राजा हें अखेरचें न्यायालय असें तो प्रतिपादी. जज्ज कोकनें "राजाला वटहुकूम काढून अगर बंदी करून जें कृत्य पूर्वीं गुन्हा नव्हतें तें गुन्हा ठरवितां येत नाहीं" असा निकाल देऊन राजाला त्याच्या सत्तेची मर्यादा स्पष्ट सांगितली. इतकेंच नव्हे तर खुद्द पार्लमेंटनें कायदा योग्य रीतीनें पास केला तरी तो जर सारासार विचार व विवेक याला धरून नसेल तर तो निरर्थक आहे, रद्दबातल आहे असे त्यानें आपलें मत दिलेलें आहे. साधारण कायदा कीं ज्यांत लोकांचे परंपरागत हक्क, राजाचे अधिकार, पार्लमेंटचे अधिकार यांचा समावेश आहे व विवेक जो सारासार विचाराला धरून आहे तो सर्व श्रेष्ठ असें त्याचें मत होतें. एका अर्थानें साधारण कायदा (Common Law) म्हणजे ज्याला घटनात्मक कायदा म्हणतां येईल इतका अर्थ कोकच्या मतांत दिसून येतो. घटनात्मक कायदा अगर घटनात्मक बाबी बदलण्याचा हक्क कोणालाही नाहीं असा अर्थ यांतून निघतो. या सगळ्या वादविवादांत अखेरची सत्ता कोणाची याचा निर्णय लागणें जरूर झालें. यादवी झाली व इंग्लंडमध्यें अखेर-निर्णयाची कायदेशीर सत्ता लोकांची प्रातिनिधिकसभा म्हणजे पार्लमेंट तिजकडे आहे असें ठरलें. या वादविवादांत हॉब्जची भूमिका काय होती हें मांग आलें आहे. प्रभुत्व हें अविभाज्य आहे. यांच्यांत थोडें, त्यांच्यांत थोडें, असें तें राहूं शकत नाहीं. अखेरचा निर्णय घेण्याची सत्ता निश्चितपणें कोणाकडे तरी असली पाहिजे. हॉब्जचें मत ती राजाकडे आहे, असें होतें. कायदेशीर प्रभुत्त्व पार्लमेंटचें आहे अखेरची सत्ता पार्लमेंटची आहे, हा निर्णय यादवींतील यशानें पार्लमेंटनें मिळविला.

इंग्लंडमधील यादवीच्या घटनांत व तद्विषयक वादविवादांत लोकमत ज्याला म्हणतां येईल त्यानें बराच भाग घेतला होता असें दिसतें. अनेक चोपडीं अनेक तऱ्हांनीं विचार करणारीं प्रसिद्ध झालीं. राजाचे व पार्लमेंटचे हक्कांबरोबर 'जनतेचे हक्क' आहेत अशी विचारसरणी मांडणारा एक गट होता. ज्या सैन्याचे जोरावर

क्रॉम्वेल यशस्वी झाला होता त्या सैन्यांतील पलटणीपलटणींतून चर्चा होई. कमिट्या नेमल्या गेल्या होत्या. त्यांचे विचार बहुजनसमाजाचें दुःख व दारिद्र्य नष्ट करण्याचे दृष्टीनें मांडले जात होते. जन्मानें सर्व सारखे आहेत, सर्वांना सारखे स्वातंत्र्य व सारखी संपत्ति मिळाली पाहिजे व हे मिळणें हा प्रत्येकाचा जन्मसिद्ध हक्क आहे. सर्वांची सत्ता व प्रतिष्ठा जन्मतः सारखी आहे व खुषीनें आणि संमतीनें अधिकार कमीजास्त झाले आहेत. प्रत्येकानें संमति देऊन राज्य स्वीकारलें आहे. ज्याला संमति नसेल अगर ज्यानें संमति दिली नसेल त्या ठिकाणीं बंधन अगर निष्ठा उत्पन्न होण्याचे कारण नाहीं. परंपरागत हक्क अगर कायदा बंधनकारक नाहीं. मॅग्नाचार्टाची सनद त्या वेळेला चांगली असेल, पण तिच्या जोरावर आजचा अन्याय न्याय ठरत नाहीं. या युगाचे आम्ही आहोंत; परंपरा, प्रतिबंध, जुलमी अधिकार या सर्वांपासून आम्ही सर्वस्वीं स्वतंत्र असलो पाहिजे. कायद्यानें स्वामित्व निर्माण झालें आहे, निसर्गानें नव्हे, या आक्षेपाला, कायदाच बेकायदेशीर आहे असें उत्तर देण्यांत येई. "निसर्गाचे कायद्यानें या देशावर जसा आमचा हक्क नाहीं तसा तुमचाही नाहीं" असें सांगण्यापर्यंत वादाची सीमा पोंहोंचली होती. जुनें तेवढें होता होईतोंपर्यंत ठेवावें असें क्रॉम्वेलचें व अन्य नेत्यांचें मत होतें. परंपरा मोडूं नये असें त्यांना वाटे. उलट 'स्वतंत्र लोकांना काळिमा आणणारे या देशाचे कायदे आहेत' असें समतावादी क्रांतिकारक म्हणत होते. व हे सर्व रद्द होऊन न्याय व विवेक यांना धरून सर्वांच्या संमतीनें त्यांची मांडणी झाली पाहिजे अशी मागणी ते करीत होते. क्रॉम्वेल व कांहीं क्रांतिकारक राजाशीं तडजोडीस तयार होते, पण कांहीं 'राजसत्ता ही सर्व जुलमांचें उगमस्थान आहे' या मताचे होते. ज्यांचे हितसंबंध राज्यांत आहेत त्यांनाच मताचा हक्क असावा असा एक पक्ष म्हणत होता, तर समतावादी क्रांतिकारक समान प्रतिनिधित्व म्हणजे सर्व व्यक्तींना मताधिकार, सर्व हितसंबंधांना मताधिकार, असें बजावून त्याची मागणी करीत होता. कायदा व्यक्तींवर चालतो, संपत्तिवर नाहीं, वस्तूवर नाहीं म्हणून संपत्तीला प्रतिनिधित्व असण्याचें कारण नाहीं. व्यक्तींना पाहिजे असें ते प्रतिपादित. कुणी काय करावें अगर करूं नये हें मनुष्यांना कायदा सांगतो, निर्जीव वस्तूंना नाहीं, म्हणून त्यांना महत्त्व देण्याचें कारण नाहीं. केवळ मनुष्य आहे म्हणून जर मताधिकार दिला तर तो संपत्तीचे कायदेशीर हक्कांवरही नैसर्गिक हक्क आहे म्हणून सांगू लागेल अशी भीति व्यक्त करण्यांत येई. नैसर्गिक हक्क असे कुणालाही नाहींत, जे आहेत ते कायद्यानें दिले आहेत असें जेव्हां मांडलें गेलें, तेव्हां कायदा जेव्हां समर्थनीय असतो व संमतिपूर्ण असतो तेव्हांच न्याय्य

समजला जातो असें उत्तर देण्यांत आलें. समतावादी क्रांतिकारकांनीं प्रतिनिधि परिषद भरवून घटना तयार करण्याचाही प्रयत्न केला. घटनाकायदा करून खुद्द पार्लमेंटची सत्ता सुद्धां मर्यादित व्हावी हा त्यांचा उद्देश उघड होता. दुसरा एक गट तसाच क्रांतिकारक होता. त्यांच्यापैकीं कांहींनीं जमिनदारांच्या जमिनी जबरदस्तीनें घेऊन त्यांचें उत्पन्न गरिबांना वांटण्यास सुरवात केली. बहुजनसमाजाचे दृष्टीनें तें अधिक प्रिय होतें. निसर्गानें जमीन सर्वांना दिली आहे म्हणून तिची मालकी सर्वांची हवी. खाजगी मालकी अनैसर्गिक व दुष्ट प्रवृत्तींचें लक्षण आहे. 'तुमचीं वस्त्रें भारी आहेत, तुमचीं पोटें भरलीं आहेत, समाधान व सन्मान तुमचें पुढें हात जोडून उभें आहेत, तथापि निर्णयदिन ( Day of Judgement ) जवळजवळ येत आहे. ज्या गरीब जनतेवर तुम्ही जुलूम करीत आहां तीच देशाचे पांग फेडील, तीच उद्धार करील. मालकीचे बंध तोडा, जर कांहीं दया असेल तर इस्त्रायेल ( जनता ) बंधनांतून मोकळा होऊं दे " ही भावना चेतविणारी विचारसरणी त्यांची होती. विद्यमान इंग्लंड हा त्यांचे मतें एक तुरुंग असून कायदे हे त्याचे गज व वकील हे त्यावरील अधिकारी होत. ख्रिस्तीधर्म हा खराच बंधुभावाचा धर्म आहे अशी त्यांची समजूत होती, म्हणून ख्रिस्ताला ते आपल्या पक्षाचा प्रमुख मानीत. या खळबळीचे वातावर णांत राजाशीं तडजोड न झाल्याने तो फांशी गेला व प्रजासत्ताक राज्य इंग्लंडमध्यें स्थापन झालें.

प्रजासत्ताक राज्यस्थापनेमुळें बहुजन समाजाचा आर्थिक दृष्टीनें विचार सुरू होणें अपरिहार्य झालें. संपत्तीची विषम वांटणी हें क्रांतीचें मूळ आहे असें ॲरिस्टॉटलचें मत आहे. देशांतील जमीन मूठभर लोकांचे हातांत असेल व हे जमीनदार प्रबळ असतील तर प्रजातंत्र अगर प्रजासत्ताक राज्य होणार नाहीं असा मॅकेव्हेलीनें अभिप्राय नमूद करून ठेवला आहे. ज्यांच्या हातांत जमिनी त्यांचेवर आर्थिक व राजकीय दोन्ही दृष्टींनीं जनतेला अवलंबून राहावें लागतें हें तत्कालीन पंडित हॅरिंग्टननें ओळखून तिची जास्त लोकांत वांटणी व्हावी असें प्रतिपादलें. 'कायदा हा शक्तीवर आधारलेला आहे. शक्ति म्हणजे राज्यांतील सैन्य. सैन्य पोसावें लागतें, म्हणून जमिनी हव्यात, आणि जर त्या मूठभर लोकांचे हातीं असतील तर कायदा ही एक लांकडी तलवार ठरेल. सत्ता या अर्थानें एक सामाजिक शक्ति आहे व ती उपजीविकेच्या साधनावर नियंत्रण असेल तर आहे. नुसती कायदेशीर सत्ता आहे येवढयानें कांहीं होत नाहीं. लोकराज्य अगर प्रजासत्ताक राज्य यथार्थ व्हावयाचें असेल तर उपजीविकेच्या साधनावर राज्यसत्तेचें नियंत्रण पाहिजे. अशी त्याची विचारसरणी

होती. प्रजातंत्र म्हणजे कायद्याचें राज्य, मनुष्यांचें नव्हे असें तो म्हणे. सर्व लोकांच्या संमतीनें लोकांच्या हितासाठीं प्रजातंत्र राज्य असलें म्हणजे कायदा होतो, अन्यत्र तें शक्य नाहीं. विषमतेचा नमुना विद्यमान व्यवस्थेंत कसा असतो हें वडील मुलाला वारसा जातो यानें दाखवून तो म्हणतो, "मुलांना आपण कुत्र्याच्या पिल्लांप्रमाणें मानतों, एकाला मांडीवर खेळवितों व बाकीच्यांना बुडवून टाकतो !!" राज्यांतील जमीन फार थोड्या लोकांच्या हातांत होती, अनेक जण नाराज होते व त्याचा परिणाम म्हणून क्रांति झाली असें त्यानें विवरण करून राज्यसत्तेचें स्वरूप संपत्तीचे वांटणीव्यवस्थे-वर अवलंबून आहे असा सिद्धांत मांडला. राजकीयदृष्ट्या प्रजासत्ताक राज्याच्या कल्पनांना मिल्टननें अधिक महत्त्व दिलें. वारसा हक्कानें सत्ता जावी हें निसर्गाविरुद्ध आहे; सुज्ञांनीं राज्य करावें, मूर्खांनीं नाहीं असा निसर्गाचा आदेश आहे असें मिल्ट-नचें मत होतें. लोकांनीं देशांतील शाहाण्या व सुज्ञ लोकांना एकदांच निवडावें व त्यांनीं हयातीपर्यंत अधिकार चालवावा अशी त्याची योजना होती. फिल्मरनें वडील मुलाला वारसा यावा हें नैसर्गिक आहे असें मानण्याचा बाहाणा केला. नंतर ॲडम हा पहिला राजा, मग वारसा हा जर वडील मुलाला तर केव्हांही एकच वारस असला पाहिजे व हा एक नक्की कोण हें सांगतां येत नाहीं म्हणून सर्व राजे हे राजे नाहींत, त्यांना कुणालाही कायदेशीर हक्क नाहीं अशी बिनतोड विचारसरणी मांडली. पण इंग्लंडमधील प्रजातंत्र–राज्य हें एका क्षणाचे स्वप्नच ठरलें, पुन्हां रक्तहीन क्रांति होऊन राजसत्ता अर्थात् मर्यादित राजसत्ता प्रस्थापित झाली.

एका राजाला वधस्तंभ दाखवून व एकाला वनवास दाखवून राजाचे प्रभुत्व हें अम-र्याद नाहीं, तें लोकांचें धन आहे, प्रतिनिधिसंस्था ही कायदेशीरपणें अखेरची सत्ता आहे ही गोष्ट इंग्लंडमध्यें सिद्ध झाली. वादविवाद होऊन विशेष कंठशोष न होतां हा तत्त्वबोध झाला, धार्मिक सहिष्णुता ही एक प्रस्थापित संकेत झाली. जे इंग्लंड-मध्यें घडून आलें त्याचें तात्त्विक समर्थन लॉकेनें केलें हें मागें आलें आहे. जें इंग्लंड-मध्यें झालें, तसें फ्रान्समध्यें न होतां, राष्ट्रांतील एकीसाठीं जें महत्त्व व जे अधि-कार राजाला मिळाले त्याचा परिणाम तेथील राज्यसत्ता कमालीची अनियंत्रित व जुलमी होण्यांत झाला. 'मी म्हणजे राज्य' हें १४ व्या लुईचें वाक्य प्रसिद्ध आहे. यशानें कारकीर्दीला सुरवात झाली पण त्याचे मृत्यूचे वेळीं सर्व फ्रान्स जवळ जवळ विटला होता, संपूर्णपणें गांजला, होता. बाहेर सर्वत्र फ्रान्सला शत्रु उत्पन्न झाले होते. प्रस्थापित झालेली धार्मिक सहिष्णुता मोडली गेली होती. अनियंत्रित सत्ता कार्य-क्षमही राहिली नव्हती. असमाधान व असंतोष सर्वत्र पसरला होता. प्रथम या असं-

तोषाला वाङ्मयांत वाचा फुटली. काव्य, कादंबरी, नाटक हीं सर्व उघडउघड सार्वजनिक प्रश्नांच्या चर्चेचीं व प्रचाराचीं साधनें झालीं. व्हाल्टेअरसारखा कवि, रूसोसारखा कादंबरीकार, डिडेरो ( Diderot ) सारखा शास्त्रज्ञ, फार काय टरगो ( Turgot ) सारखा मुलकी अधिकारी हे सर्व आपापल्या परीनें राज्याविषयक मौलिक विचार प्रकट करूं लागले. जे राजकारणाचा तात्त्विक दृष्टीनें विचार करणारे होते, तेही उघडउघड लिहूं लागले. नैसर्गिक कायदा, नैसर्गिक हक्क, करारमीमांसा, प्रभुत्व, मानवी कायदा—सर्व कांहीं जुनीं मतें निरनिराळ्या दृष्टिकोनांतून मांडलीं गेलीं. बदललेल्या परिस्थितींत जुन्याच कल्पना अगदीं तशाच राहात नाहींत; सर्वसामान्य चर्चा सुरू झाली म्हणजे प्रत्येक विचारसरणींतील वेंचक तेवढें घेण्याकडे प्रवृत्ति असते. पण त्यामुळें जी तर्कप्रतिष्ठा पृथक् पृथक् विचारसरणींत असते ती नाहींशी होते. ३०।४० वर्षें प्रत्यक्ष क्रांतीपूर्वीं जी चर्चा झाली, जी ग्रंथनिष्पत्ति झाली तींतून कांहीं आवेशी, कांहीं अभिनिवेशी, कांहीं अतिरेकीही विचार मांडले गेले होते. परंपरेला आवाहन करावें तर १४ वा लुई दिसे, म्हणून विवेकाला महत्त्व मिळालें व बुद्धिप्रामाण्यावर भिस्त ठेवण्यांत आली. प्रतिनिधिसंस्थेचा अभाव व त्यामुळें प्रत्यक्ष राजकारणाचा अनुभव नसल्यानें, राजकीय विचारांत व्यवहार्यता नसे. विचारसरणींत आग्रहीपणा होता. वस्तुस्थिति उपेक्षणारी कल्पनारम्यता पण त्यांत असे. उत्कट भावना पुष्कळ वेळां विचारांतील विसंगति दृष्टीआड करीत. मॅन्टेस्क्यूची विचारसरणी काय होती याचा उल्लेख पूर्वींच आला आहे. व्हॉल्टेअरनें नागरिक-स्वातंत्र्यावर अधिक भर दिला. सहिष्णुतेचा तो पुरस्कर्ता होता. तथापि, राजकीय स्वातंत्र्याशिवाय नागरिकस्वातंत्र्य नाहीं हें त्यानें नीटसें ओळखलें नाहीं. 'कांहीं माणसें बुद्धि चुकीनें चालवितात, कांहीं ती चालवीतच नाहींत व कांहीं केवळ जुलूम करण्यासाठीं ती चालवितात ' असें सांगून जुलूम करणारे व असहिष्णु लोक यांची टर त्यानें सर्वांत जास्त उडविली आहे. लोकांना तो दुष्ट व मूर्ख समजे. जे ज्ञानी आहेत त्यांना संपूर्ण विचारस्वातंत्र्य पाहिजे यावर त्याचा विशेष आग्रह होता. उलट हेल्व्हेटियस ( Helvetius ) हा सर्व व्यक्तींचा विचार करणारा होता. त्याचें म्हणणें प्रत्येक व्यक्ति आवश्यकतेमुळें स्वहिताकडे पाहाते. पदार्थविज्ञानशास्त्रांत 'गति ' ( Motion ) या कल्पनेला जें महत्त्व आहे तितकेंच महत्त्व नीतिशास्त्रांत स्वहितप्रवृत्तीला आहे. जें स्वहिताचें तें मनुष्याला योग्य व चांगलें असें वाटतें; त्याच न्यायानें मनुष्यांचें समूहाला अगर राष्ट्राला त्याच्या हिताचें असेल तें योग्य व चांगलें वाटतें. नीतिमान लोक जनता वाईट असें म्हणत असतात. पण लोक वाईट नाहींत.

ते स्वहिताकडे पाहून वागतात. ही प्रवृत्ति बदलणार नाहीं म्हणून चांगले कायदे करून जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त हित साधलें पाहिजे. पुष्कळांचें पुष्कळ हित हाच खरा सिद्धांत आहे. विद्यमान कायदे थोड्या लोकांचे हितार्थ असून बहुजनांचे हिताविरुद्ध ते असतात. ते करणेंच मुळीं खऱ्या नीतिविरुद्ध आहे. वाईट कायदे असले म्हणजे लोक तसे होतात म्हणून चांगले कायदे होणें जरूर आहे. लोकांनीं त्यांचे स्वहिताचे दृष्टीनेंच सर्वांचे हितास जपणें योग्य आहे हें पटवून देण्यांतच खरें कौशल्य आहे. इंद्रियांना होणाऱ्या सुखदुःखांच्या भावनांतूनच स्वहिताची बुद्धि मनुष्यांत निर्माण झाली आहे व या स्वहिताचे बुद्धीवरच मानवी वंशाचें सातत्य आधारलेलें आहे. स्वयंभू अशी कांहीं नीति नाहीं. परिस्थितीवर तिच्या कल्पना आधारलेल्या असतात. योग्य कायदे करून व्यक्तिहित व सामाजिक हित यांचा समन्वय करतां येतो. जें उपयुक्त तें योग्य ही एकमेव कसोटी त्याचे विचारसरणींत मानली आहे.

उपयुक्तता ही कसोटी मानली, म्हणजे प्रत्येक गोष्ट उपयुक्त असेल तरच योग्य असें म्हणणें प्राप्त होतें. मग नैसर्गिक हक्कांचें महत्त्व जातें. त्याचप्रमाणें संमतीनें राज्य आहे व चाललें पाहिजे हाही सिद्धांत निरर्थक ठरतो. कारण उपयुक्त असेल तेंच कायद्यानें करावयाचें असें ठरविल्यानंतर संमतीचा प्रश्न येतो कोठें ? मानवी कायदा योग्य तें प्रायश्चित्त देऊन सर्व लोकांच्या हिताचा समन्वय करूं शकेल. लोकांना स्वहितबुद्धीनें व शिक्षेच्या भीतीनें त्या कायद्याला मानावेंसें वाटेल. हेल्व्हेटियसचा उपयुक्ततावाद कायद्यानें सार्वजनिक हित साधणारा होता. नैसर्गिक कायद्याचे कल्पनेप्रमाणें सर्व लोक स्वतंत्र असले म्हणजे आपोआप सार्वजनिक हित साधतें, समाजांत एक सूर उत्पन्न होतो. कारण मनुष्यांची प्रवृत्तीच जुळवून घेण्याकडे असते. म्हणून शक्य तितका राज्यसत्तेचा हस्तक्षेप व्यवहारांत नसावा असा सिद्धांत त्यांतून निघतो व हीच विचारसरणी भौतिकवादी तत्त्वज्ञांनीं ( **Physiocrats** ) मांडली. सुख आणि दुःख या मनुष्याच्या मूलभूत प्रवृत्ति आहेत. त्याच्या सर्व आचारांचें उगमस्थान या प्रवृत्तींत आहे. सुव्यवस्थित समाजांत मनुष्यें स्वहितबुद्धीनें वागतात, पण ही स्वहितबुद्धि अगदींच पराकोटीची नसते. थोडा विवेक तींत असतो. या विवेकी अगर सभ्य स्वहितबुद्धीनें मनुष्याला त्याच्या स्वहिताचें काय आहे हें कळतें म्हणून कायद्यानें त्याच्या स्वातंत्र्यांत शक्य तितका कमी हस्तक्षेप करावा. राज्यसत्तेनें व्यवहारांत हस्तक्षेप केला नाहीं म्हणजे झालें; मग तिचें स्वरूप अनियंत्रित राजसत्तात्मक असलें तरी चालेल अशी या भौतिकवादी तत्त्वज्ञांची विचारसरणी होती. राजकीय स्वातंत्र्य

असल्याशिवाय, राजकीय हक्क असल्याशिवाय, व्यक्तीचें आर्थिक स्वातंत्र्य व्यर्थ आहे असें त्यांना वाटत नव्हतें. हॉलबॅच ( Holbach ) यानें नैसर्गिक हक्क व उपयुक्ततावाद यांचा मेळ घातला. त्यानें धर्म व राज्यसत्ता दोन्हीवर हल्ला चढविला. त्याच्या ग्रंथाला ( System of Nature ) टीकाकारांनीं 'नास्तिकाचा धर्मग्रंथ' म्हणून संबोधलें आहे. त्याचे मतें लोक वाईट नाहींत, राज्यसत्ता त्यांना वाईट करते. सार्वजनिक हित हें सरकारचें ध्येय नसतें. कारण सरकार अगर राज्यसत्ता ही जुलमी राजे व भिक्षुक यांचे हातांत असते. त्यांचा उद्देश लोक–कल्याण नसून लूट हा असतो. याला उपाय म्हणजे समाजांतील सार्वजनिक बुद्धीला वाव देणें हा आहे. कारण त्या योगानें समाजांत हितसमन्वय व एकसूर उत्पन्न होईल व तसें होणें अगदीं नैसर्गिक आहे. समाजातर्फे समाजविरोधी वर्तन करणारास शासन करण्याकरितां त्याचा मुखत्यार म्हणून राज्यसत्ता आहे. मनुष्याला स्वहित साधण्यासाठीं समाज आवश्यक आहे. त्याचे स्वातंत्र्य हा त्याचा अदेय हक्क आहे. कारण स्वातंत्र्याशिवाय अभ्युदय नाहीं. सर्व राष्ट्रांचा मिळून आंतरराष्ट्रीय समाज होतो व युद्ध म्हणजे लूट व खून यांची आंतरराष्ट्रीय आवृत्ति आहे. सार्वजनिक हिताविरुद्ध जेव्हां राज्यकर्ते वागतात तेव्हां ते राज्यसत्तेचा विपर्यास करतात. वर्गावर्गांतील हितविरोध यांतून सर्व दोष उत्पन्न होतात. लोकांना अधिक शिक्षण दिलें म्हणजे ते अधिकाधिक विवेकी होतील, वेडगळ धर्म व जुलमी सत्ता दूर सारतील व स्वहित साधून सार्वजनिक हितही साधतील.

फ्रेंच राज्यक्रांतीच्या पूर्वीच्या वाङ्मयांत जगाची प्रगति सारखी होत आहे, समाजाची उन्नतीही होत आहे. जसजसा काळ जाईल तसतसा अनुभव वाढेल, ज्ञान वाढेल, जग प्रगतिपर होईल असा एक विचार दिसून येतो. टर्गोनें व कॉन्डॉरसेनें ( Condorect ) या प्रगतीच्या विचाराला एक ऐतिहासिक सिद्धांताचें स्वरूप दिलें. भौतिक शास्त्रें पुनःपुनः होणाऱ्या गोष्टींचा विचार करतात, त्यांतील कार्यकारणभाव शोधून काढतात. इतिहास हा कधीही समाप्त न होणारा 'अनुभव ग्रंथ' अगर 'अनुभवामृत' असून त्यांतूनच सभ्यता ( Civilization ) निर्माण होत असतें, वाढत जातें. इतिहासाचीं निरनिराळीं पर्वें वरील दोघांनींही मांडून फ्रेंच क्रांति म्हणजे नव्या युगाची सुरवात असें प्रतिपादलें. फ्रेंच क्रांतीचा उपक्रम आणि उपसंहार यानीं त्यांच्या मनांतील अर्थापेक्षां निराळ्या अर्थानें नवें युग सुरू केलें. राष्ट्राराष्ट्रांत समता होईल, वर्गभेद नाहींसे होतील, लोकशाहीनें मागासलेल्या लोकांना लुबाडणें बंद होईल, शिक्षण व संधि सर्वांना सारखी मिळेल, युद्धें नष्ट होतील, एका शब्दांतच म्हणजे स्वर्ग पृथ्वीवर येईल अशी त्यांची कल्पना होती. समाजांत ही विचारसरणी

अधिक प्रिय होती. शास्त्राची व ज्ञानाची प्रगति सारखी होत होती. स्वातंत्र्य व संधि लोकांना मिळून सामाजिक व राजकीय उन्नति होईल अशी आशा सर्वत्र वाटत होती. नैसर्गिक हक्क, राज्यसत्तेवरील मर्यादा, समता व स्वातंत्र्य या सर्वांचा पुरस्कार मोठ्या हिरिरीनें होत होता. रूसो यानें या वातावरणांत प्रक्षोभ उत्पन्न केला. बुद्धीनें सांगण्यापेक्षां भावनेनें सांगण्याकडे त्याचा कल होता. विचारी माणसांपेक्षां सर्वसामान्य माणसांचे विचार, भावना व प्रवृत्ति यांना त्यानें अधिक महत्त्व दिलें. श्रद्धा व सद्‌गुण यांचा नाश तत्त्वज्ञानी लोकांनीं केला आहे असा त्यांवर त्याचा आरोप आहे. देश व धर्म यांना कमी लेखून त्यांची विडंबना करून जें कार्य चाललें होतें त्याविरुद्ध त्यानें निषेध प्रदर्शित केला आहे. कांहीं श्रद्धा, कांहीं आदर, कांहीं नैतिक प्रवृत्ति असल्याशिवाय शील अगर समाज शक्य नाहीं. निव्वळ बुद्धि व शास्त्र यांवर अवलंबून भागणार नाहीं. तसेंच विवेकी स्वहितबुद्धीनें माणसें प्रेरित होतात हें त्याला मान्य नव्हतें. समाज म्हणजे मूठभर शिकलेले लोक नव्हेत, तर समाज म्हणजे सर्वसामान्य लोक. मानवी वंश म्हणजे सर्वसामान्य लोक. मनुष्य सर्व वर्गांत सारखाच असतो म्हणून जेथें बहुसंख्याक लोक तेथेंच आदर दाखविला पाहिजे, त्याचाच विचार केला पाहिजे. नीति म्हणजे सामाजिक परिस्थितीनें ठरेल ती. व्यक्तीचें सुख म्हणजे समाजाचें सुख. समाज हाच खरा नीतीचा नियंता आहे. उन्नतीचा उत्पादक, नैतिक मूल्याचें प्रतीक तोच आहे. स्वहितबुद्धि, सुखाभिलाषा, स्वामित्वभाव, परस्पर व्यवहार व करार करून राज्यसत्ता स्थापन करण्याची बुद्धि हीं सर्व मनुष्यांत आहेत असें गृहीत धरून आतांपर्यंत विचारवंतांनीं विचार मांडले, पण या सर्व गोष्टी मनुष्याला आल्या कशा? हा प्रश्न रूसोनें विचारून त्याला उत्तर 'समाजामुळें' असे त्यानें दिलें. समाजांत व्यक्तीच्या सद्‌गुणांना व भावनांना वाव आहे, समाजाबाहेर नैतिक असें कांहीं नाहीं. म्हणून विचारवस्तु व्यक्ति ही नसून नागरिक म्हणजे समाजाचा घटक ही आहे, समाजविरहित व्यक्ति अर्थशून्य आहे असें तो म्हणे.

मनुष्यांत विवेकबुद्धि आहे व त्यामुळे नैसर्गिक न्याय त्याला पटतो; नैसर्गिक कायद्यावर मानवी कायदा आधारलेला आहे या रूढ कल्पना रूसोला पसंत नव्हत्या. नैसर्गिक कायदा हा नागरी कर्तव्यें न करण्यासाठीं काढला आहे असें तो म्हणे. सर्व मानववंश हा एक समाज आहे व सर्वांना सार्वत्रिक असे कांहीं नैसर्गिक हक्क आहेत हें त्याला मान्य नव्हतें. सर्व माणसें सारखीं, पण जो ऐक्यभाव 'समाज' या कल्पनेत आहे तो 'सर्व मानवजातीचा एक समाज' या कल्पनेंत नाहीं. समाज अशी एक वस्तु आहे, समाज हा एक सामुदायिक भाव आहे, केवळ त्यांतील व्यक्तींची तो

बेरीज नव्हे; त्यापेक्षां अधिक व अलग असा भाव समाज या कल्पनेंत आहे. एक भाषा, हितैक्यता हें जसें समाजांत आहे तसें मानववंशांत नाहीं म्हणून मानववंश हा एक समाज होऊं शकत नाहीं. निव्वळ स्वहिताची दृष्टि माणसानें ठेवली तर माणसें एकत्र येणारच नाहींत. स्वतःचे हिताबरोबर इतरांच्या हिताची काळजी घेतली म्हणजेच समाजाचे हिताची काळजी घेतली तरच तीं एकत्र येतात. याचाच अर्थ सामाजिक गरजेमुळें तीं एकत्र आलीं व हेंच जास्त स्वाभाविक आहे, यांतच अधिक नैसर्गिक वर्तन आहे अशी त्याची विचारसरणी होती. समाज अशी कांहीं बुद्धि आहे व तिला रूसोनें सार्वजनिक बुद्धि ( General will ) असें म्हटलें आहे व ही सार्वजनिक बुद्धि सर्व कायद्यांचें उगमस्थान आहे, समाजाचें संरक्षण व संवर्धन करण्याकडे तिची प्रवृत्ति असते, राज्यांत न्याय्य काय, अन्याय्य काय, योग्य काय, अयोग्य काय, हें ही बुद्धि ठरविते. सार्वजनिक बुद्धि कशी अस्तित्वांत येते, सामाजिक करारांतील सारांश व एकंदर रूसोचे विचारसरणींतील विसंगति याचा परामर्ष या प्रकरणाच्या सुरुवातीस घेतला आहे. राज्यसत्तेंत कोणालाही वारसाहक्क नाहीं, कोणी त्यावर परंपरेनें हक्क सांगूं शकत नाहीं, राज्य व त्याचें प्रभुत्व हें जनतेचें आहे या स्फोटक कल्पना फ्रेंच क्रांतीच्या वेळीं फ्रेंच क्रांतिकारकांना उपयोगीं पडल्या एवढेंच नव्हे, तर त्या निरंतर क्रांतीचें तत्त्वज्ञान झाल्या आहेत (Doctrine of permanent revolution ). सार्वजनिक बुद्धीचे यथार्थचे दृष्टीनें नगरराज्यें जरी रूसोला योग्य वाटलीं तरी होणें शक्य नव्हतें व त्याचे विचारसरणीचा परिणाम, त्यानें जागृत केलेल्या भावनांचा परिणाम राष्ट्रीयत्वाला महत्त्व मिळण्यांत झाला. संपूर्णपणें स्वतंत्र नागरिकत्व म्हणजे प्रत्येकानें जातीनें राज्यकारभारांत भाग घेणें हें आधुनिक राज्याचा विस्तार लक्षांत घेतां शक्य नव्हतें. परंतु जी एक स्वतंत्र नागरिकत्वाबद्दल सर्वत्र भावना निर्माण झाली, तिनें स्वतंत्र राष्ट्राचें नागरिकत्व या कल्पनेंत क्रांतीनंतर झालेल्या ऐतिहासिक घटनेमुळें प्रवेश केला. राष्ट्र स्वतंत्र झालें पाहिजे म्हणजे तें राज्य झालें पाहिजे हा विचार प्रभावी झाला. राज्य हें राष्ट्राचें प्रभावी लक्षण होऊन त्याचे ठिकाणीं अफाट भक्तिभाव वाढला. खुद्द त्याचे हयातींत युरोपची स्थिति त्याचे शब्दांत सांगावयाची म्हणजे "आज कुणीही फ्रेंच, जर्मन, स्पॅनियर्ड, अगर इंग्लिशमन नाहींत, हे सर्व युरोपियन आहेत व जेथें लुटण्यास धन व भोंदण्यास स्त्रिया आहेत तेथें त्यांचा मायदेश आहे." फ्रेंच क्रांतीपूर्वीचा व क्रांतीनंतरचा युरोप राजकीयदृष्ट्या एक राहिला नाहीं.

नगरराज्य व त्यास आनुषंगिक असें राजकीय तत्त्वज्ञान यांपासून विचारानें

एक ख्रिश्चन समाज, सर्वत्र एक राज्य व त्याला आनुषंगिक असें तत्त्वज्ञान येथपर्यंत मजल मारली. या प्रवासांत धर्माचें ओझें बरोबर घेतल्यानें त्याचे नशिबास आदर्श-प्राप्ति, आकांक्षासिद्धि येण्याऐवजीं, कलह, कलकलाट हीं आलीं. धर्म दुभंगला, धर्मानें एकीऐवजीं वैर उत्पन्न केलें. 'मी भूतलावर तलवार घेऊन आलों आहें' ही देवपुत्राची, शांतिदूताची वाणी निराळ्या अर्थानें खरी ठरली. स्थैर्यासाठीं, सरक्षणा-साठीं राज्य, पण तें धर्मकलहासाठीं उपयोगिलें जाऊं लागलें. संमतीवर आधारलेलें राज्य राजानें संमतीनें अनियंत्रित व जुलमी केलें. अस्वस्थता व अव्यवस्था या जनते-च्या संकटांतून राजानें सण साधला. स्थैर्य व संरक्षण आलें पण स्वातंत्र्य गेलें याची जाणीव झाली. स्वातंत्र्याची प्रवृत्ति मनुष्यांत अखंड आहे, अनादि आहे, अनंत आहे. धर्माचे नांवावर, राष्ट्राच्या एकीच्या नांवावर अनियंत्रित सत्ता, स्वातंत्र्य दडपून टाकणारी सत्ता, चिरस्थायी होत नाहीं. धर्म ही भांडणाची बाब नाहीं, व्यक्तीनें आचरण्याची बाब आहे ही जाणीव होतांच, सहिष्णुता सद्गुण ठरला. एक उपयुक्त तत्त्व ठरलेली धर्मासाठीं राज्यसत्ता अनियंत्रित असण्याचें कारण नाहीं हें स्पष्ट झालें. धार्मिक भावनेच्या तीव्रतेतून सुटका झालेलें मन अनियंत्रित सत्तेच्याबद्दल विचार करूं लागलें. स्वातंत्र्याच्या जुन्या ध्येयांनीं तें स्फुरूं लागलें. पुन्हां जुने आदर्श नव्या कल्पनांचे शिक्के घेऊन विचारांच्या व्यापारांत पसरूं लागले. राज्य हें लोकांचें, प्रभुत्व लोकांचें, राष्ट्र लोकांचें, हे आदर्श डोळ्यांपुढं ठेवणारी जनता मुकी राहात नाहीं, ती हजारों मुखांनीं बोलते व हजारों हातांनीं काम करतें; तेंच तिनें फ्रान्समध्यें केलें. लोकांना कशाचें तरी वेड लागतें. धर्माचें गेलें तर स्वातंत्र्याचें आलें. धर्म राष्ट्रा-पुरता मर्यादित झाला होता. स्वातंत्र्यपण राष्ट्रनिष्ठ झालें. नगरराज्य गेलें, विश्वराज्य गेलें, राष्ट्र-राज्य आलें. फ्रेंच क्रांतीपूर्वीं राज्यामुळें राष्ट्र एक झालें. क्रांतीनंतर राष्ट्र एक म्हणून राज्य एक असलें पाहिजे. एका राज्यांत राष्ट्रें हें चूक नव्हे असह्य आहे असे विचार सुरू झाले. राज्यांत दोन धर्म नकोत म्हणणारी प्रवृत्ति दोन राष्ट्रें एका राज्यांत राहूं देणार नाहीं हें अगदीं उघड होतें. आधुनिक राजकीय विचारांची मौलिक वस्तु राष्ट्र ही बनली. मग राजकीय तत्त्वज्ञानही त्याला अनुषंगिक असें उभारलें जाऊं लागलें.

नियंत्रित राजसत्ता असतांना राज्याच्या मर्यादा राजाच्या नात्यागोत्यानें ठरल्या जात होत्या, राज्यकारभाराचा व लोकमताचा संबंध नसे. सरदारवर्गाचे विशेष हक्क व धर्मपीठाच्या जमिनी जोंपर्यंत सुरक्षित तोंपर्यंत हे वर्ग बेफिकीर होते. विचारवंतां-पैकीं कांहीं राज्याचाच विचार करीत तर कांहीं केवळ व्यक्तींचा आणि जोंपर्यंत

प्रादेशिक चिरफाड झाली नव्हती तोंपर्यंत सर्वसामान्य जनता प्रत्यक्ष कोण अगर कोणतें घराणें राज्य करतें याबद्दल उदासीन होती. युद्धें होत पण त्यांत जनतेचा संबंध नसे. मल्लांच्या कुस्तींत जितका रस घ्यावा तितका रस जनता घेई. युरोपच्या सर्व राजकारणावर निरनिराळ्या राजघराण्यांचा वारसाहक्काचा प्रभाव होता व त्यांतूनच तंटेबखेडे होत. पोलंडला या सोयरीकीची सुरक्षितता नव्हती म्हणून बिनवारशी माल वांटून घ्यावा त्याप्रमाणें त्याची वांटणी करण्यांत आली. न वांटतां अखंड पोलंड एखाद्या राजानें घेतला असता तर कदाचित् युरोपचा इतिहास निराळा झाला असता. परंतु या चिरफाडीनें राष्ट्रीयत्वाची भावना युरोपभर पसरली, जो अस्पष्ट भाव होता तो स्पष्ट व स्फोटक आदर्श झाला, जी एक आशा होती तिला राजकीय हक्क, राजकीय अधिकाराची तीव्रता आली. राज्याच्या मर्यादा या अन्यायी व अनैसर्गिक आहेत अशी ओरड सुरू झाली. राष्ट्रीय एकीच्या भावनेवर अनियंत्रित झालेली राजसत्ता राष्ट्रीय एकीची, राष्ट्रीयत्वाची शत्रू बनली. फ्रेंच राज्यक्रांतीनें जुनें फ्रेंच-राज्य नष्ट केलें. जुनी चौकट तोडून, फोडून, फेकून देण्यांत आली. राजा हा राज्यकारभाराचा मध्यबिंदु होता, सत्तेचें केंद्रीकरण त्याचे ठिकाणीं झालें होतें. परंपरेनें राज्याच्या मर्यादा ठरल्या होत्या ही सर्व रचना नष्ट झाली. सर्व भाग जे संघटित होते ते विखुरले गेले. कारण जुनें संघटनेचें तत्त्व मोडून काढलें होतें. राज्याची मर्यादा परंपरेऐवजी वंशदृष्ट्या ठरविली गेली. एकजातीचे, एकवंशाचे लोक हा आधार झाला व राजसत्ता अगर ऐतिहासिक परंपरेशिवाय त्यांच्यांत एकी व सामुदायिक भाव असूं शकतो हें दिसून आलें, इतकेंच नव्हे तर त्यांची सार्वजनिक बुद्धि ही सर्व सत्ताधीश आहे, ती राज्यापेक्षां श्रेष्ठ आहे असा सिद्धांत ठरला. फ्रेंच जनता, फ्रेंच लोक, ही फ्रेंच राज्यापेक्षां निराळी वस्तु आहे, निराळी शक्ति आहे व ती राज्यापेक्षां श्रेष्ठ आहे. राष्ट्र या कल्पनेचा हा तात्त्विक आविष्कार प्रथम फ्रेंच क्रांतीच्या वेळीं झाला. खरें महत्त्व लोकांचें व तें परंपरेनें मर्यादित नाहीं हें तत्त्व स्फोटक होतें पण त्याबरोबर विधायकही होतें. जेथें जेथें लोक एकजिनसी होते तेथें तेथें राष्ट्र निर्माण झालें. राज्य व परंपरा यांना बाजूस सारून राष्ट्रभाव संघटित झाला. राज्याच्या मर्यादा म्हणजे राष्ट्राच्या मर्यादा नव्हत हें स्पष्ट झालें. राष्ट्राला मर्यादा निसर्गानें पडतात असें मानलें जाऊं लागलें. फ्रेंच क्रांतींतून हें सर्व निर्माण झालें पण सुरवातीस फ्रेंच क्रांतीचें स्वरूप निराळें होतें. कांहीं सर्वसामान्य तत्त्वांनुसार राज्यसत्ता असावी, व्यक्तींना स्वातंत्र्य असावें, समता असावी असें तिचें प्राथमिक स्वरूप होतें. स्वातंत्र्यासाठीं झालेल्या क्रांतीतून जेव्हां नेपोलियन निर्माण

होऊन साऱ्या युरोपभर स्वातंत्र्य नष्ट करीत चालला तेव्हां त्याला झालेल्या विरोधांतून फ्रेंच क्रांतींतील राष्ट्रविषयक भूमिका व तत्त्वज्ञान स्पष्ट झालें. फ्रेंच राज्यकारभाराला जिंकलेल्या प्रदेशांतून लोक विरोध करूं लागले. कारण राजे नष्ट अगर दुर्बल झाले होते. परकी राज्यकारभार, परकी संस्था यांना हा विरोध होता म्हणून त्याचें स्वरूप राष्ट्रीय होतें. क्रांतिकारक फ्रेंचांबद्दल त्यांच्या नव्या विचारांबद्दल, त्यांच्या क्रांतीबद्दल अन्य लोक स्वतः विचार करूं लागले. क्रान्ति कशी झाली यापेक्षां क्रांतीमुळें फ्रेंच राष्ट्र कसें यशस्वी होत गेलें, युरोपभर नेपोलियनच्या पराक्रमामागें फ्रेंच जनता कशी होती, याचे विचारानें फ्रेंच लोक अगर फ्रेंच राष्ट्र यांचें क्रांतिविषयक महत्त्व अधिकाधिक स्पष्ट झालें. राजकीय-स्वातंत्र्य, राष्ट्रीय स्वातत्र्य, व धर्म या तिघांवर नेपोलियननें आघात केला व तिघेही तात्पुरते एक होऊन नेपोलियनचा त्यांनीं नायनाट केला. त्यानंतर कांहीं काळ जुना जमाना पुनः सुरू करण्याचे प्रयत्न झाले. तथापि राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेचें महत्त्व वाढत गेलें. प्रथम कायदेशीर राजा पदभ्रष्ट केला गेला म्हणून लोक नेपोलियनविरुद्ध होते. फ्रेंच राज्यकारभार चांगला असला तरी तो परकी होता. म्हणून त्याला विरोध होता. विरोध राष्ट्रीय भावनेनें पण कायदेशीर राजाच्या हक्कप्राप्तीसाठीं. नेपोलियनच्या पाडावानंतर झालेल्या व्यवस्थेंत लोकांच्या नव्या जागृतीची दखल घेतली गेली नाहीं. परकी अंमलाखालील बेबंदशाहीविरुद्ध लोक उठले. परके म्हणून आतां विरोध न होता अन्याय्य कारभार आहे म्हणून विरोध सुरू झाला. पुढें सत्ता कायदेशीर असली, राज्यकारभार मर्यादेनें चालत असला तरी जोंपर्यंत सत्ता चालविणारे परकी आहेत तोंपर्यंत सर्व राज्यकारभार असनदशीर आहे म्हणून विरोध सुरू झाला. एका राष्ट्रावर दुसऱ्या राष्ट्राला अगर परक्यांना राज्य करण्याचा अधिकार नाहीं हें शुद्ध तत्त्व प्रतिष्ठा पावलें.

राष्ट्रीयत्व हें सबंध १९ व्या शतकांत नुसतें क्रांतीचें सारसर्वस्व होतें. एका राज्यांत दोन राष्ट्रें नसावींत, राज्य व राष्ट्र यांच्या मर्यादा सारख्याच असाव्यात, एका राष्ट्रावर दुसऱ्या राष्ट्राचा राज्य करण्याचा अधिकार नाहीं हीं तत्त्वें मान्यता पावलीं व त्यांना आवाहन करून अनेक युद्धें, अनेक क्रांत्या, युरोपमध्यें झाल्या. परकी अमलांखालील असलेल्या राष्ट्रांतील निर्वासित देशभक्तांनीं ही विचारसरणी वाढविली. राष्ट्रीयत्वाचे विचार हद्दपारींत वाढतात व स्वातंत्र्याचे विचार दडपशाहींत फोफावतात हा इतिहासाचा अनुभव आहे. राष्ट्रीयत्वाला वैचारिक प्रतिष्ठा मॅझिनीनें दिली. “लोक एकविचारानें भरले आहेत, त्यांना एकी पाहिजे, एकराष्ट्र पाहिजे आहे. राज्याचें स्वरूप कसें असावें हा कांहीं आंतरराष्ट्रीय प्रश्न नाहीं. इतरांना त्यांत हात घालण्याचें

कारण नाहीं, तो केवळ राष्ट्रीय प्रश्न आहे," असें त्यानें स्पष्ट सांगून आंतरराष्ट्रीय काळजी वाहाणारांना मर्यादेंत वागण्यास सांगितलें. प्रभुत्व लोकांचें आहे, त्यांची सार्वजनिक बुद्धि ही सर्वसत्ताधीश ( Soveregn ) आहे, हें मान्य केल्यानंतर "लोकांनीं कसें राहावें कोणत्या जमावाशीं कसें वागावें हें त्यांनीं ठरवावयाचें नाहीं तर कोणी ? तें त्यांनीं ठरवावयाचें नाहीं तर मग त्यांना स्वातंत्र्य कसलें आहे ?" हे मिल्सचे विचार अर्थपूर्ण आहेत. कोणाशीं जमाव करून राहावें हा लोकांचा हक्क आहे व हा अधिकार चालवून लोक राष्ट्र निर्माण करीत असतात. लोकांचे प्रभुत्वाला राष्ट्र ही संघटना अत्यंत अवश्य आहे. निरनिराळ्या राष्ट्रांचे लोक एका राज्यांत असल्यानें हें प्रभुत्व प्रभावी होत नाहीं व राज्यसत्तेचें स्वरूप लोकशाही राहाणार नाहीं अशी भीतिपण अनेकांनीं व्यक्त केली आहे. कायदा आणि क्रांति यांतून राष्ट्रीयत्वाचें तत्त्वज्ञान निर्माण होतें. कायदेशीर सत्ता ही राष्ट्रीय, त्याला विरोध करणारी व क्रांति तें मान्य करणारी म्हणून राष्ट्रीयत्वाचे शस्त्राने क्रांति कायदेशीर सत्तेवर हल्ला करते अशी ॲक्टन याची विचारसरणी आहे. अनियंत्रित सत्तेमुळें युरोपांत राष्ट्रीय एकी झाली पण तीच पुढें राष्ट्रीय एकीच्या व राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या विरुद्ध होती. राष्ट्रीयत्वाकडे दोन दृष्टींनीं पाहातां येतें. एक एकीचे व एक स्वातंत्र्याचे दृष्टीनें. एकीचे दृष्टींत राष्ट्रीयत्व हें लोकांच्या सामुदायिक बुद्धीच्या शक्तीवर आधारलेलें आहे. लोकांची उच्चतम आकांक्षा म्हणजे ही एकी कायम ठेवणें, अखंडत्व राखणें, हें श्रेष्ठतम ध्येय असल्यामुळें अन्य कोणत्याही विचाराला महत्त्व राहात नाहीं. अखंडत्वाला विरोध म्हणजे जुलूमजबरदस्ती अगर राष्ट्रद्रोह मानला जातो. विद्यमान हक्क, परंपरा, इतिहास, हीं सर्व बाजूला सारून, केवळ वंशदृष्ट्या एकजिनसीपणा हा प्रमाण ठरून तोच राष्ट्राचा पाया होतो. राष्ट्रीयत्व हें वंश अगर धर्म यांवर केवळ न आधारतां, अधिक व्यापक, अधिक उच्च अशा भावनांवर आधारणें हें प्रगतीचें लक्षण न मानतां स्वजनद्रोह मानला जातो. केवळ धर्म अगर वंश यांवर राष्ट्रीयत्व आधारलें म्हणजे अखंडत्वाची व एकीची आवश्यकता एवढी वाटते कीं, नागरिकहक्क, नागरिकस्वातंत्र्यें हीं त्यापुढें रद्द ठरतात. अखंडत्व हा त्या राज्याचा एकमेव हेतु होतो व जेथें राज्याचा हेतु असा निरपेक्षपणें एखादीच विशिष्ट गोष्ट होऊन बसते, तेथें तें अनियंत्रित होणें अपरिहार्य होतें. राष्ट्रीयत्वाकडे स्वातंत्र्याचे दृष्टीनें पाहिलें म्हणजे राज्यावर स्वातंत्र्याच्या दृष्टीनें मर्यादा घालणें जरूर होतें. कारण अमर्याद व अनियंत्रित शासनसत्ता असेल तर प्रजेला स्वातंत्र्य नाहीं हें उघड आहे. स्वातंत्र्य हीच एक वस्तु राष्ट्रांत अशी असते कीं, जिचा फायदा

सर्वांना मिळूं शकतो व जिला कोणाचाही खराखुरा विरोध नसतो. केवळ अखंडत्व पाहिजे असेल तर परकी सत्तेखालील सुराज्यावर स्वराज्याची व स्वातंत्र्याचीही तहान भागवून तें ठेवलें पाहिजे अगर स्वराज्यांत तें टिकवावयाचें असेल तर राज्य हें अ-नियंत्रित स्वरूपाचें अपरिहार्य म्हणून स्वीकारणें मान्य केलें पाहिजे. राष्ट्र हें केवळ वंश अगर केवळ धर्म या भावनांवर आधारलें म्हणजे एकी, अखंडत्व हाच एक प्रधान हेतु होतो व तें राष्ट्र राज्य झालें, स्वतंत्र राज्य झालें तरी स्वातंत्र्याचे दृष्टीनें तें अनियंत्रित सत्ताधारी होणें अपरिहार्य होतें. पाकिस्तान केवळ धर्मावर आधारलेलें राष्ट्रीयत्व असल्यामुळें त्यांतील अखंडत्व टिकविण्यासाठीं राज्यसत्ता अनियंत्रित सत्ता होणें अपरिहार्य आहे. स्वातंत्र्याचे दृष्टीनें राष्ट्रीयत्वाकडे पाहिलें म्हणजे एकी अगर अखंडत्व हा राज्याचा प्रधान हेतु राहात नाहीं. स्वातंत्र्य म्हणजे विविधता. ती असली म्हणजे स्वातंत्र्य संरक्षणाचें संघटनपण निर्माण होतें. एक-धर्म अगर एक वंश यांवर केवळ राष्ट्रीयत्व व केवळ राष्ट्रीयत्वावर राज्य आधारलेलें असलें म्हणजे राज्यांत विविधता कमी म्हणून स्वातंत्र्यही कमी. राज्यांत एकापेक्षां अधिक हितसंबंध असले म्हणजे तें अनियंत्रित राहात नाहीं, सर्व हितांचें जुळवून घेण्यासाठीं प्रयत्न करतांना साह-जिक मर्यादा उत्पन्न होतात. विद्यमान हितसंबंध तें लक्षांत घेतें, ध्येयामागें धुंद होऊन न लागतां वास्तववादी असतें, विविधतेमुळें लोकमत अधिक प्रभावी व चौकस असतें. व्यक्ति ही महत्त्वाची मानली जाते. एकजिनसी राष्ट्रराज्यांत राज्याला महत्त्व मिळून, राज्य म्हणजे सर्वस्व ! त्यापुढें व्यक्ति यःकश्चित् ठरतात. विविध हितसंबंध ज्यांत आहेत तें राष्ट्र लोकशाहीकडे झुकलेलें असतें, लोकशाहींत त्याची परिणति होते. विविध हितामुळें सहिष्णुता ही आवश्यक होते व मतसहिष्णुता ही लोकशाहीची दाई आहे, तिची संरक्षणदेवता आहे. राज्यांत राष्ट्रीयत्व हें प्रमुख असणें योग्य आहे पण राज्याचें तें सारसर्वस्व झालें तर स्वातंत्र्य लोपतें, कमी होतें, सत्ता अनियंत्रित होते असा १९ व्या शतकांतील युरोपच्या इतिहासाचा दाखला आहे.

अनेक राष्ट्रें मिळून एक राज्य व्हावें, असावें म्हणजे प्रगतीकडे जग जास्त जोरानें जाईल असें ॲक्टन याचें म्हणणें आहे. पूर्वी राष्ट्राराष्ट्रांतील फरक ठळक होते. भाषा निराळी, धर्म निराळा, रीतिरिवाज निराळे व वंशही विशेषतः भिन्न होते. राष्ट्रां-राष्ट्रांत इतकें अंतर आधुनिक काळांत राहिलें नाहीं. वंशमिश्रण मोठ्या प्रमाणावर जगभर झालें आहे. येथील विद्यमान मुसलमान ही मिश्रप्रजा आहे. अमेरिका ही तर मिश्र प्रजेचा आदर्श आहे. सबंध युरोपमध्यें एक धर्म आहे. आधुनिक राजकीय विचारांची प्रगति लक्षांत घेतां, एक राज्यांत अनेक धर्मांचे, अनेक भाषा बोलणारे,

आपआपले खास रीतिरिवाज व खास कायदे सुरक्षित ठेवून चांगले व दक्ष नागरिक म्हणून लोकांना राहाणें शक्य आहे असा प्रत्यक्ष अनुभवही आज जगांत मिळत आहे. एक मूळ पुरुषापासून कूळ सांगणारे म्हणून एक राष्ट्र ही प्राचीन कल्पना आतां हास्यास्पद ठरेल. नद्या, पर्वत, दरीखोरीं यावरून राष्ट्र ही केवळ प्रादेशिक कल्पना कोणी मान्य करणार नाहीं. भूगोलानें राष्ट्र निर्माण केलें नाहीं इतिहासानें तें निर्माण केलें आहे. या निर्मितींत राज्य याचा भाग आहे. एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रापासून पृथक् ही भावना, पृथक् राज्यसत्ता असल्याशिवाय निर्माण होत नाहीं. राज्यभाव निर्माण झाल्याशिवाय राष्ट्रभाव स्पष्ट होत नाहीं. विगत स्वातंत्र्यावर राष्ट्रांचे हक्क सांगितले जातात याचा अर्थ हाच आहे. पूर्वी स्वतंत्र होतों म्हणून स्वातंत्र्याचा हक्क राष्ट्राला आहे या विचारसरणींत राज्यानें राजकीय सत्तेनें, राष्ट्र निर्मिलें, निश्चित केलें असें स्पष्ट होतें; म्हणून अनेक राष्ट्रें एका राज्यांत येण्यानें उच्चतम राष्ट्रीयत्व निर्माण होईल, जगाची प्रगति होईल या ॲक्टनच्या विचारसरणींत बरेंच तथ्य आहे. विविध हितसंबंध एकत्र येण्यानें स्वातंत्र्यपण राहील नव्हे वाढेल. एक नवी निष्ठा उत्पन्न होईल. जातिनिष्ठा, वंशनिष्ठा ही नैतिकदृष्ट्या कमी प्रतीची आहे. सुसंस्कृत व सुधारलेल्या जमान्यांत व्यापक पायावर आधारलेल्या राष्ट्रांवरील निष्ठा ही अधिक नैतिक आहे. धर्मांत जें स्थान श्रद्धेला आहे तें राजकारणांत राष्ट्रप्रेमाला, राष्ट्रनिष्ठेला आहे. व्यक्तिगत त्यागावर, आत्मसमर्पणावर दोन्हींचा आधार आहे. स्वतःसाठीं, कुटुंबासाठीं त्याग करणें ही मनुष्याची नैसर्गिक प्रवृत्ति, राष्ट्रभक्तींत तर असतेच, पण राष्ट्रासाठीं त्याग करण्यांत तिला नैतिक कर्तव्याची प्रतिष्ठा प्राप्त होते. राष्ट्रप्रेम म्हणजे भौगोलिक राष्ट्राबद्दलचें प्रेम नव्हे, राष्ट्र ही एक नैतिक व राजकीय भावना आहे. त्याचें प्रादेशिक स्वरूप म्हणजेच सारसर्वस्व समजणें हें चूक आहे. देशांतील नद्या, पर्वत, मैदानें, दरीखोरीं हीं सर्व कोणीही आले तरी कायम आहेत. देशांतील लोकांना त्यांवर प्रेम उत्पन्न होण्यासाठीं प्रादेशिक सृष्टीपेक्षां कांहीं तरी अधिक असावें लागतें. अन्य लोकांपेक्षां देशवासीयांना कांहीं तरी अधिक वाटण्यासारखें असल्याशिवाय राष्ट्रप्रेम उत्पन्न होणार नाहीं. हें अधिक म्हणजेच राष्ट्र या कल्पनेंतील राजकीय व नैतिक भाव. प्रदेश कायम राहून राष्ट्र नाहींसें होईल. राष्ट्र म्हणजे केवळ आधिभौतिक जीवन नव्हे तर आध्यात्मिक जीवनही त्यांत आहे. दगडमाती, इमारती म्हणजे संस्था नव्हेत, आदर्श म्हणजे संस्था. इमारतींना संस्था मानणें व प्रदेशालाच केवळ राष्ट्र मानणें सारखेंच चुकीचें आहे. केवळ प्रादेशिक निष्ठा व अंध राज्यनिष्ठा हीं दोन्ही सारखींच घातकी

आहेत. एकीमुळें जगांतील शांतता अशक्य झाली आहे व दुसरीमुळें स्वातंत्र्य आकसलें आहे. दोन्ही जेथें एकत्र झालीं तेथें व्यक्ति क्षुद्र झाली. तिचें स्वातंत्र्य व अभ्युदय यांपेक्षां राष्ट्राची अस्मिता व अहंकार श्रेष्ठ ठरला. राज्य व्यक्तिविकासाचें साधन होण्यापेक्षां राष्ट्राचें वर्चस्व स्थापन करणारें शस्त्र झालें. व्यक्तींचें स्वातंत्र्य व जगाची शांति दोन्ही धोक्यांत आलीं.

१९ व्या शतकांतील राजकारणाला राष्ट्रवादाचें राजकारण म्हणणें अयथार्थ नाहीं. प्रत्येक राष्ट्र मग तें कितीही लहान असो, स्वतंत्र राज्य झालेंच पाहिजे व तसें करण्याच्या प्रयत्नांचा इतिहास म्हणजे युरोपचें न संपणारें शोकगीत आहे. एक महा-युद्ध सुरू झालें असतांनासुद्धां राष्ट्रीयत्वाचा क्रांतिकारक स्फोटकपणा कमी झालेला नाहीं. मागील कुठल्याही तहानें अगर आंतरराष्ट्रीय व्यवस्थेनें राष्ट्रीयत्व संतुष्ट झालें नाहीं. लोकांच्या मनावरील राष्ट्रीयत्वाची पकड दोन महायुद्धें होऊनसुद्धां कमी झाली नाहीं. राष्ट्रीयत्वाचे दृष्टीनें सर्वत्र सर्वांना समाधान होईल अशी व्यवस्था होणें अशक्य आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्य कायम ठेवून अनेक राष्ट्रांना एकराज्याखालीं आणणें ही गोष्ट घडवून आणण्याची धमक अगर सामर्थ्य लोकशाही तत्त्वज्ञानांत नाहीं, राज-सत्तेच्या उध्वस्त झालेल्या परंपरेंत नाहीं, क्रांतिकारी अवस्थेंत तर नाहींच नाहीं. चालू महायुद्धांत आंतरराष्ट्रीय लक्षणें असलेल्या सोव्हिएट रशियाच्या पोटांतसुद्धां राष्ट्रीयत्वाचीं आंतडीं सांपडलीं. तेथें राज्यरक्षणार्थ हात उगारतांच राष्ट्रीयत्वाचीं वाघनखें जगानें पाहिलीं. फ्रेंच क्रांतींतील तत्त्वज्ञानाचा शेवट राष्ट्रीयत्वाचे तत्त्वज्ञानांत झाला. फ्रेंच क्रांतींतून उत्पन्न झालेल्या समतेंतून, लोकशाही समतेंतून समाजसत्ता-वाद निर्माण झाला. समाजसत्तावादानें राष्ट्रीयत्वाला निदान आळा बसेल असें गेल्या महायुद्धानंतर रशियाकडे पाहून वाटत होतें. कामगरांना मायदेश नाहीं, जग हा त्यांचा वारसा आहे हें सांगणारें तत्त्वज्ञान आज राष्ट्रीयत्वापुढें बलहीन ठरलें आहे. राष्ट्रीयत्वापुढें लोकशाही तत्वज्ञान निस्तेज बनलें आहे. लोकमतापेक्षां राष्ट्रीयत्वाची छाप राज्यावर अधिक पडते यावरून ही गोष्ट स्पष्ट आहे. युद्धानें राज्यें तोडून अगर जोडून जगांत शांतता प्रस्थापित करण्याचे सर्व प्रयत्न राष्ट्रीयत्वानें, राष्ट्रवादानें हाणून पाडले आहेत. जगाला कायम युद्धयमान स्थितींत ठेवण्याचें कार्य राष्ट्रीयत्व अजूनही करीत आहे. लोकांच्या मनांत उत्साह उत्पन्न करणारें हें तत्त्वज्ञान खरोखर प्रतिगामी होणें अपरिहार्य आहे का? ॲक्टनच्या म्हणण्याप्रमाणें राष्ट्रीयत्व म्हणजे इतिहासांतील मागचें पाऊल हा सिद्धांत अटळ, निरक्षेप आहे का? जगांतील आंतरराष्ट्रीय व्यव-हारांतसुद्धां अटळ आहे का? या प्रश्नांचा विचार विस्तारानें करणें जरूर आहे.

आधुनिक कालांतील राष्ट्रीयत्व राज्यामार्फत प्रकट होऊं इच्छितें म्हणजे प्रत्येक राष्ट्र स्वतंत्र व स्वयंशासित राज्य झालें पाहिजे. राष्ट्र स्वतंत्र आहे म्हणजे राष्ट्र व राज्य हीं एक आहेत. राष्ट्र–राज्यामुळें संरक्षणाला एक विशिष्ट महत्त्व आलें. सरहद्दीकडे युद्धशास्त्राचे दृष्टीनें पाहाणें भाग पडलें. क्रांतींतून, युद्धांतून राष्ट्रें राज्यें झालीं. तथापि सर्व राष्ट्रें कांहीं राज्यें झालीं नाहींत. तसेंच जीं झालीं त्यांना सर्वांना प्रादेशिक पूर्णता राष्ट्रीयत्वाचे दृष्टीनें मिळाली नाहीं. राष्ट्रांतील कांहीं भाग परक्या राज्याखालीं राहिला असें अनेक ठिकाणीं घडून आलें. राष्ट्र राज्य झाल्याबरोबर नवा उत्साह उत्पन्न झाला, नवें कर्तृत्व स्फुरूं लागलें. प्रगति म्हणजे जिवंतपणा हें पटून त्या दृष्टीनें पावलें टाकतांना राष्ट्राला परिपूर्णता यावी असें सर्वांना वाटूं लागलें. प्रत्येक गोष्ट आपल्या राष्ट्रांत व्हावी व तें घडवून आणण्यासाठीं, राज्य हें उत्कृष्ट साधन हातीं आल्यानें, प्रत्येक राष्ट्र हें आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण होण्याकडे वळलें. यशस्वी महत्त्वाकांक्षा राज्याच्या सरहद्दींत क्वचितच राहातात, नवीं कार्यक्षेत्रें शोधिलीं जातात. वसाहती, संरक्षित प्रदेश, वगीखालचे प्रदेश मिळविण्याची खटपट सुरू होते. युरोपमधल्या प्रत्येक प्रबल राष्ट्रानें हें केलें आहे. वसाहती मिळविल्या व घालविल्या आहेत. राज्याबाहेर मिळविलेल्या प्रदेशांवर व वसाहतींवर गैरवाजवी अंमल करून त्या हातच्या घालवल्या आहेत, युद्धें करूनही त्या गेल्या आहेत. बाहेरील प्रदेशांवर, वसाहतींवर अंमल असतांना राष्ट्रीयत्वाचे दृष्टीनें खुषीनें कोणीं तेथें राष्ट्र निर्माण होऊं दिलें अगर तें स्वतंत्र होऊं दिलें असें क्वचित्च झालें आहे. एका राष्ट्राचा दुसऱ्यावर अंमल नसावा म्हणणारांनींच तो सर्वत्र चालविला आहे. राष्ट्रीयत्वाचें शत्रु राष्ट्रीयत्वच या अर्थानें झालेलें आहे. यशस्वी राष्ट्रीयत्वांतून निर्माण झालेला साम्राज्यवाद हा राष्ट्रवादाचा कट्टा वैरी झाला आहे.

आधुनिक राष्ट्रीयत्वाची व्याख्या करणें अवघड आहे. अमुक एका गोष्टीनें राष्ट्रीयत्व येतें हें सांगणें सोपें नाहीं. एकवंश असेल तर त्या लोकांचें राष्ट्र होतें असें म्हणावें तर अमेरिका म्हणजे अनेक वंशांचें व जातींचें कडबोळें असून राष्ट्रीयदृष्ट्या स्वादिष्ट व बलवर्धक आहे. वंशदृष्ट्या सर्वत्रच कमीजास्त प्रमाणांत मिश्रण आहे. नाझींचा 'आर्य' तर्कांत शुद्ध असेल, वस्तुस्थितींत तो तसा नाहीं. येथील प्रजा आर्य, अनार्य, शक, द्रविड, मोंगल, वगैरेंच्या मिश्रणापासून झाली आहे असें म्हणण्यास फारशी हरकत नाहीं. एकभाषा असेल तर एकराष्ट्र हेंही चुकीचें आहे. तसें असल्यास राष्ट्र एक होण्यास मदत होते हें खरें. स्वित्झर्लंडमध्यें तीन भाषा असूनही पूर्ण एकोपा असलेलें राष्ट्र तेथें आहे. कॅनडा व अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें हीं एकभाषिक

व संलग्न असूनही दोन पृथक् राष्ट्रें आहेत. केवळ एक राज्य आहे अगर एका राज्य-सत्तेखालीं आहे म्हणून राष्ट्रीयत्व येतें अगर राष्ट्र होतें असेंही नाहीं. राष्ट्र ही भावना परिपूर्ण होण्यास राज्य हें अवश्य आहे हें खरें. इंग्लंड व आयर्लंड एका राज्याखालीं होतीं म्हणून तीं एकराष्ट्र झालीं नाहींत. एका राज्याखालीं खुषीनें येण्यानें, ते अनेक निरनिराळ्या राष्ट्रांत एक समन्वय होऊन नवें राष्ट्रीयत्व निर्माण होईल हें शक्य असलें तरी आजचें राष्ट्रीयत्व एकराज्यसत्तेखालीं लोक आहेत म्हणून निर्माण होत नाहीं. हिंदुस्थान व ब्रह्मदेश एका राज्यसत्तेखालीं असतांना एक-राष्ट्र झाले नाहींत. ऑस्ट्रियाचे अंमलाखालीं अनेक राष्ट्रें होतीं पण त्यांचें एकराष्ट्र झालें होतें असें कोणी म्हणणार नाहीं. एकधर्म असेल तर एकराष्ट्र होतें हेंही अनुभवाविरुद्ध आहे. युरोपभर एकधर्म असूनही एकमेकांचे प्राण घेणारे हल्ले करणारीं राज्यें तेथें आहेतच. मुसलमानधर्म मानणारी प्रजा सलग प्रदेशांत कोटींनीं राहात असूनही एकराष्ट्र झालेली नाहीं. तुर्क, मिसर, अरब, अफगाण, हीं स्वतंत्र राष्ट्रें आहेत. लक्षावधि मुसलमान रशियाचे नेक—नागरिक आहेत. या सर्वांचा एकधर्म आहे. सर्व स्वतंत्र आहेत. परंतु एक राष्ट्रीयत्वाचा विचारही तेथें नाहीं. धर्मानें राष्ट्रीयत्व येत नाहीं, येण्याला थोडीशी मदत होते. राष्ट्राला भौगोलिक प्रदेश पाहिजे, मायभूमि अगर पितृदेश ज्याला म्हणतां येईल असा भूभाग पाहिजे हें उघड आहे. तथापि, हजारों वर्षें मूळ मायभूमीपासून हद्दपार झालेले कोट्यवधि ज्यू हे प्रत्यक्ष प्रदेश नसतांनाही एक-राष्ट्रीयत्वाची भावना बाळगून आहेत हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. ही राष्ट्रीयत्वाची 'अशरीरिणी वाक्' त्यांना अद्यापि, सुखवीत आहे, उत्तेजित करीत आहे. त्यांच्या आकांक्षांना कधीं तरी प्रत्यक्ष प्रदेश मिळेल असें सांगत आहे. राष्ट्रीयत्व हें लग्नसंस्थे-प्रमाणें नैतिक व भौतिक अशा द्विविध प्रवृत्तींचा संगम आहे. नुसता प्रदेश म्हणजे राष्ट्र नव्हे त्यापेक्षां तें अधिक आहे. कांहीं नैतिक, कांहीं आध्यात्मिक भाव त्यांत आहेत. दोन प्रदेश पृथक् मानल्यानें दोन राष्ट्रें निर्माण झालीं येवढ्यानें भागत नाहीं. प्रादेशिक पृथक्पणाबरोबर कांहीं भावनेची एकी अशी असते कीं, ती अन्य लोकांपासून स्वतःचा अलगपणा स्पष्ट करीत असते. ही भावनेची एकी परंपरेनें उत्पन्न झालेली असते. समान इतिहास, कीं ज्यांतील सुखदुःखें, जयापजय हे सामुदायिक आपुलकीनें भोगिलेले असतात, अनुभविलेले असतात, ही भावना जोपासित असते. मिळून, जुळून केलेल्या प्रयत्नांची स्मृति, त्यांतून निर्माण झालेल्या रोमहर्षक प्रसंगांच्या आठवणी, या भावनेला संघटित करीत असतात. एक आपुलकीचें नातें निर्माण होऊन तें लोकांना एकत्र आणीत असतें. आपण एक आहोंत, परंपरेनें, संस्कृतीनें, इतरांपेक्षां आपण

भिन्न आहेत, आपलीं स्फूर्तिस्थानें, उत्तेजक नैतिकभाव, हे दुसऱ्यांपेक्षां निराळे आहेत ही जाणीव या एकीला एक नैतिक प्रतिष्ठा देत असते, एक आध्यात्मिक तेजोवलय तिच्याभोंवतीं निर्माण करीत असते. राष्ट्रीयत्वाची भावना, राष्ट्रांतील व्यक्तीमधील समानत्व अधिक स्पष्ट करते. त्याबरोबर राष्ट्राबाहेरील लोकांशीं असलेलें आपलें पृथक्त्वही अधिक अधिक स्पष्ट करीत असते. आपलें साहित्य, कला, काव्य हें कांहीं विशिष्ट आहे, त्याचा वारसा आपला असून तें इतरांच्या साहित्यबलापेक्षां वेगळे, निराळें आहे हें दाखविण्याकडे सदर भावनेची प्रवृत्ति असते व तसे प्रयत्नही होत असतात. घरें सर्वत्र असतात, पण प्रत्येकाला स्वगृहासंबधीं कांहीं विशेष वाटत असतें व त्यांत तो स्वतःचें व्यक्तित्व दर्शविणारें कांहीं तरी आणतोच. तीच गोष्ट राष्ट्राचे बाबतींत दिसून येते. साहित्य, कला, काव्य, संगीत यांत सार्वत्रिक स्वरूप आहे, तथापि त्यांतूनही कर्त्याचें, निर्मात्याचें राष्ट्रीयत्व चकाकत असतें.

राष्ट्रीयत्व यांत आपुलकीचा व अलगपणाचा असे दोन्ही भाव समाविष्ट आहेत. मनुष्य संगतिप्रिय आहे, जमावानें राहावें ही त्याची प्रवृत्ति आहे म्हणून तर समाज निर्माण झाला. टोळ्या टोळ्या करून भटकणारीं माणसें कुठें तरी कुठल्या तरी प्रदेशांत स्थिर झालीं, विशिष्ट ठिकाणीं राहाणें त्यांना बरें वाटूं लागल्यामुळें तेथें राहूं लागलीं, तो प्रदेश त्यांना आपला वाटूं लागला. तेथें त्यांचे हितसंबंध सहवासानें उत्पन्न झाले. त्यांतील मृत तेथें गाडले गेल्यामुळें, जमीन साफसूफ करून घरें बांधल्यामुळें, देवदेवता तेथें स्थापन केल्यामुळें, या नाहीं त्या तऱ्हेनें त्या प्रदेशाबद्दल त्यांना आपुलकी वाटूं लागली. तेथें त्यांच्यावर हल्ला झाला असतां जीविताबरोबर घरदारें, पशु व अन्य वस्तु यांचें ते संरक्षण करूं लागले. तात्पर्य, ज्या प्रदेशांत त्यांची वास्तु होती, वस्ति होती, त्याचें संरक्षण तें आपुलकीनें करूं लागले. ती पितृभू, पुण्यभू झाली. प्रदेशाबरोबर पराक्रमाच्या स्मृति संलग्न झाल्या. जें केलें, जें जिंकलें त्याच्या कथा सामाजिक झाल्या. त्यांतील व्यक्ति हे त्या समाजाचे वीरपुरुष झाले. समाजाचा इतिहास, समाजाची परंपरा निर्माण झाली. रक्त सांडून, देहार्पण करून जतन केलेला वारसा तसलीच किंमत देऊन ताब्यांत ठेवणें हें साहजिक कर्तव्य आहे असें वाटूं लागलें. परकयांशीं लढून कायम ठेवलेलें वतन हें आपलें आहे, त्यावर आपल्या पूर्वजांपासून आपला हक्क आहे व तें वतन भावी पिढीसाठीं अखंड ठेवलें पाहिजे ही विचारप्रणाली उत्पन्न झाली. बहुतेक राष्ट्रें संघर्षांतून, युद्धांतून निर्माण झालीं आहेत, स्पष्ट झालीं आहेत. होणाऱ्या हल्ल्यामुळें आपुलकीची भावना संघटित होऊन अंतर्गत राष्ट्राच्या मर्यादा पडतात तर त्याचबरोबर या मर्यादांच्या बाहेरचे हे

परके, मग हल्ला करणारे असोत अगर नसोत हेंही स्पष्ट होतें. अलगपणाचा भाव स्पष्ट होतो. राष्ट्रीयत्वाचा हा अलगपणाचा भाव अधिक प्रभावी असतो. त्याचें हें लक्षण अधिक महत्त्वाचें मानलें जातें. उत्पादनाचे दृष्टीनें, आर्थिक दृष्टीनें, हा अलगपणा येतो असें नाहीं पण त्याचा उपयोग त्या दृष्टीनें करण्यांत येतो हें खरें आहे. केवळ आर्थिक दृष्टीनें पाहिले तर लहानसहान राष्ट्रें आधुनिक जगांत टेवणें हें विडंबन आहे. आर्थिकदृष्ट्या प्रत्येक राष्ट्र, मग त्याचे क्षेत्र किती का लहान असेना, स्वयंपूर्ण होऊं इच्छील तर ते अशक्य आहे. आर्थिकदृष्ट्या राष्ट्रीयत्वाचा विचार करणें म्हणजे भावनांचा, पवित्र भावनांचा व्यापारी भाव करणें असा आरोप केला जातो. बाल्कन्समधील लहानलहान राष्ट्रें स्वयंपूर्ण होणें अशक्य आहे. तथापि त्यांचे राष्ट्रीयत्व कायम राहाण्यासाठीं केवढे प्रचंड उद्योग चालले आहेत हें स्पष्ट दिसत आहे. पाकिस्तान झालें तर 'फाकस्थान' होऊन उपाशी राहावें लागेल हे समजत असूनही लोकांचीं मनें ज्योतीवर झडप घालणाऱ्या पतंगांप्रमाणें धुंद झालीं आहेत. 'फारचि बरी निरयगति, परवशता शतगुणें करी जाच' हाच अनुभव सर्वत्र येत आहे. गुलामींतील आरामापेक्षां स्वातंत्र्यांतील दारिद्र्य श्रेष्ठतर हाच इतिहासाचा कौल आहे. लहान असूं पण स्वतंत्र असूं हीच प्रत्येक राष्ट्रभक्ताची घोषणा आहे. या पृथक्पणाचे भावनेसाठीं, इतरांपासून स्वतंत्रपणें अलग राहाण्यासाठीं वाटेल ती किंमत देण्यास राष्ट्र तयार होतें.

राष्ट्राला आधुनिक जगांत पृथक् राहाणें, स्वतंत्र राहाणें म्हणजे राज्यपद मिळवूनच राहिलें पाहिजे. हें राज्य सकलगुणालंकृत, सर्वलक्षणोपेत असें असेल तरच राष्ट्र स्वतंत्र राहील. हें राष्ट्र—राज्य आपल्या प्रदेशांत सर्व सत्ताधीश राहील, संपूर्ण प्रभुत्वयुक्त राहील. राष्ट्रांतील सर्व जीवनोपयोगी साधनसामुग्रीवर तें नियंत्रण घालूं शकेल. त्याच्या आज्ञा अटळ असतील. अवज्ञा, अमान्यता दंडिली जाईल. तें सर्वांचा शास्ता पण त्याचा कोणी शास्ता असणार नाहीं. अंतर्गत व्यवहारांत राज्य जसें कुणाचे हुकूम मानीत नाहीं, त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय व्यवहारांत त्याला कोणी हुकूम करूं शकत नाहीं. बाह्य व्यक्तीला अगर कोणत्याही संस्थेला तें जबाबदार नाहीं. ही बेजबाबदारी राष्ट्राच्या स्वातंत्र्याचें, राज्याचें मुख्य लक्षण आहे. हें राष्ट्र—राज्य स्वतःच्या सरहद्दी स्वतःच ठरविण्याचा दावा सांगतें; राज्यांत आयात कर बसविणें हा त्याचा हक्क आहे. राज्यांतील अल्पसंख्यांकांना कसें वागवावें, कोणा परकीयांना आंत येऊं द्यावें, कोणता धर्म चालूं द्यावा, राज्यसत्तेचें स्वरूप कसें राहावें या सर्व बाबतींत राज्य हें सत्ताधीश आहे. राष्ट्रभाव जागता ठेवणें व तो अधिकाधिक संघटित करणें

हें कार्य पूर्ण जागिवेनें राज्यांत केलें जातें. शिक्षण व परंपरा यांचा उपयोग सर्वत्र याच दृष्टीनें केला जातो. राष्ट्रभाव जागता ठेवून जसा ऐक्यभाव वाढतो तसाच इतरांपेक्षां अलगपणाचा भावही वाढतो. केवळ युद्धामुळेंच हे दोन्ही भाव वाढतात असें नाहीं, उलट त्यांना आत्यंतिक स्वरूप आलें कीं युद्धें अपरिहार्य ठरतात, अटळ होतात. शेजारचें राष्ट्र बलिष्ठ झालें कीं याही राष्ट्राला बल वाढवावें लागतें आणि शेजारच्या राष्ट्राशीं विरोध असला तर अलगपणाचा भाव जास्त जास्त वाढतो. राष्ट्रांतील वाङ्मय व वृत्तपत्रें हितविरोध अधिक अधिक स्पष्ट करीत असतात, राष्ट्रांतील अहंकाराला व अस्मिततेला चेतवीत असतात. हितविरोधाच्या व वाढत्या परकेपणाच्या वातावरणांत, स्वराष्ट्रावरील निष्ठा अधिक तीव्र व त्यामुळें जास्त अविवेकी होते. वेडा, खुळा, नकटा कसा जरी स्वतःचा मुलगा असला तरी त्या गोष्टींचा विचार मनांत न येतां व न आणतां आईबाप त्यावर प्रेम करतात. त्यावर त्यांची माया जशी साहजिक असते, त्याचप्रमाणें स्वतःचा देश चुकत असो अगर बरोबर असो, त्याच्याबद्दलचें प्रेम अखेरीं प्रभावी ठरतें. आपलें राष्ट्र चुकत आहे, अन्याय करीत आहे हें विवेकबुद्धि सांगत असतांनासुद्धां राष्ट्रप्रेमापुढें तें हतबल होतें. युद्धाला विरोध करणारे, राष्ट्र युद्धांत पडल्यावरोबर खांद्यावर बंदुका टाकून जन्मभर सांगितलेलें तत्त्व-ज्ञान क्षणांत दूर सारतात. युद्ध सुरू होतांच सत्याचा पहिला बळी पडतो. विवेक प्रथम जखमी होतो. स्वपक्ष म्हणजे सत्पक्ष हा सिद्धांत स्वयंसिद्ध होतो व याविरुद्ध वागेल तो देशद्रोही ठरतो. राज्याचें म्हणजे राज्यसत्तेचें युद्धधोरण अमान्य करणारा, कर्तव्यविन्मुख नागरिक मानला जातो, येवढेंच नव्हे तर त्याला पंचमस्तंभी मानण्या-पर्यंत मजल जाते. राष्ट्रभावना चेतली असतां विवेक हा शत्रु वाटणें स्वाभाविक होतें. राष्ट्रीयत्वाखालील अलगपणाचा भाव तीव्रतेला गेला म्हणजे असें घडून येणें अनिवार्य आहे.

पोलंडची चीरफाड झाल्यापासून युरोपच्या राजकारणांत राष्ट्र हें राज्य असलें पाहिजे हें तत्त्व प्रभावी ठरून राहिलें आहे. राष्ट्राला स्वातंत्र्याचा हक्क आहे व राष्ट्र हेंच खरें प्रभुत्वाचें, राजकीय सत्तेचें उगमस्थान आहे हीं तत्त्वें त्याच वेळीं अमेरिकेंतील वसाहतींनीं स्वतंत्र होऊन व फ्रान्समध्यें लोकांनीं क्रांति करून प्रस्थापित केलीं. १९ व्या शतकांत युरोपांत एका राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्रावर अंमल असणें हें अनैतिक व अव्यवहार्य आहे हा सिद्धांत प्रभावी ठरला. राष्ट्र व राज्य यांच्या मर्यादा एकच असाव्यात व त्या तशा असल्या म्हणजे सत्ता नियंत्रित राहाते, नागरिक स्वातंत्र्यें फुलतात असें मिलचें म्हणणें आहे. लोकांनीं कोणाशीं मिसळून वागावें,

कशा जमावानें राहावें हें ठरविण्याचा त्यांचा हक्क आहे व यांतच लोकशाहीचें सार-सर्वस्व आहे, निदान हा तिचा मौलिक सिद्धांत आहे, असें तत्त्वज्ञान त्या वेळीं प्रभावी होतें. मागें सांगितल्याप्रमाणें एकी व स्वातंत्र्य हें लोकांचें प्रभुत्व प्रभावी करण्यासाठीं मग अवश्य होतें. एकी म्हणजे संघटित राष्ट्र व स्वातंत्र्य म्हणजे राज्यपद. या दोहोंचा संगम होऊन राष्ट्र–राज्य निर्माण झालें. लोकशाहीवर विश्वास असणाऱ्या तत्त्वज्ञानांतून व तो नसणाऱ्या तत्त्वज्ञानांतून एकच अपत्य जन्माला आलें आहे. हेजेलनें राष्ट्र-राज्य हे राजसत्तात्मक स्वरूपांत कल्पिलें. सरंजामशाही नाहींशी करून राष्ट्रराज्य उभारण्यासाठीं राजसत्ता जरूर आहे असें त्याचें मत होतें. इतकेंच नव्हे तर जर्मनींत राष्ट्र–राज्य निर्माण करणें ही इतिहासाची नियति आहे. गतइतिहास लक्षांत घेतां व होणाऱ्या घटनांची अंतर्गत व अंतःप्रेरणा लक्षांत घेतां काय करावें हें जर्मनीला इतिहासानें सांगूनच ठेवलें आहे. राष्ट्राचें इतिहासांत पुढचें पाऊल कसें व कोठें टाकावें, राष्ट्राचे पुढचें भाग्य काय आहे, हें जें घडून आलें आहे व जें घडत आहे त्यांतून स्पष्ट होत असतें. घटनांतील अंतर्नाद तें सांगत असतें, त्यांच्यांतील प्रेरणा-दिशा दाखवीत असतें. जें कांहीं घडतें तें यदृच्छया घडत नाहीं, त्यामागें ईश्वरी सूत्र असतें. जें आहे तें असलेंच पाहिजे हें उमगलें म्हणजे तेंच असावयास पाहिजे हें लोकांना पटेल. आहे तेंच असावयास पाहिजे हा त्याचा सिद्धांत, म्हणजे स्थिति ही सुस्थिति म्हणण्यासारखी मात्र नाहीं. जें असलें पाहिजे तें नैतिकदृष्ट्या इतिहासानें अपरिहार्य केलें आहे. तें 'ओळखून तें' घडवून आणून तें आहे असें केलें म्हणजे, आहे हें असलें पाहिजे हें स्पष्ट व सुसंगत होतें. जें आहे तें म्हणजे जें दिसतें तें नव्हे तर त्याच्या मागचा भाव, त्यामागील कल्पनेचें इतिहासानें दाखविलेलें सातत्य, हें होय. जर्मनी राज्य झालें पाहिजे म्हणजे जर्मनीनें तसें व्हावयास पाहिजे. त्याकडे जर्मनीचें पाऊल पडणें हें सभ्यता व प्रगतीचे दृष्टीनें इष्ट, पण त्याचबरोबर जर्मन इतिहासानेंही तें संकल्पिलें आहे. जर्मनीच्या इच्छेवर तें अवलंबून नाहीं. तसें होणें अनिवार्य आहे. इतिहास म्हणजे ईश्वरी योजनेचा चित्रपट; 'धाता यथा पूर्वमकल्पयत्'–अशी त्याची विचारसरणी होती. राष्ट्र–राज्याची प्रतिष्ठा हेजेलइतकी कोणीही वाढविली नाहीं. राष्ट्रराज्य हें मनुष्याचे निष्ठेचें अखेरचें प्रमाण आहे, त्यापेक्षां मोठें कांहीं नाहीं हा विचार मॅझिनीनेंही मांडला. राष्ट्र हें एक पवित्र कार्य आहे (Nation is a Mission) हे त्याचे शब्द अर्थपूर्ण आहेत. राष्ट्रापलीकडे मनुष्याच्या निष्ठेवर हक्क सांगणारें कांहीं आहे असें त्या वेळीं कोणाही प्रमुख तत्त्वज्ञानाचें मत नव्हतें.

राष्ट्र–राज्य ज्या काळांत उदयास आलें व ज्या काळांत तद्विषयक राजकीय

विचार महत्त्व पावले त्याच वेळीं, युरोपमध्यें औद्योगिक प्रगति झपाट्यानें होत होती. उद्योगधंदे यंत्रमय झाले होते. आधुनिक औद्योगिक युग सुरू झालें होतें. यंत्रसाहाय्यानें उत्पादन मोठ्या प्रमाणावर होऊं लागलें होतें. वहातुकीच्या साधनांत क्रांतिकारक फरक झाला होता. बाजारपेठ स्थानिक अगर राष्ट्रीय न राहातां जगाची अशी बाजारपेठ अस्तित्वांत आली होती. जगाची बाजारपेठ ही आजचे युगांत महत्त्वाची गोष्ट आहे. ती काबीज करणें सहज नाहीं म्हणून सर्वत्र तीव्र स्पर्धा आहे. बहुतेक देशांतून सदरहू देशाला लागतो त्यापेक्षां जास्त तयार माल उत्पादन केला जातो. शिलकी माल खपविण्यासाठीं बाजारपेठ बघावी लागते. बाजारपेठ आली म्हणजे स्पर्धा आली. इंग्लिश व जपानी कापड हिंदुस्थानांत एकमेकाशीं स्पर्धा करतें. परदेशांतून येणाऱ्या मालावर आयातकर—संरक्षक जकाती—बसवून देशी मालाविरुद्ध असलेली स्पर्धा कमी करतां येते. देशांत संघटन करून अंतर्गत स्पर्धापण कमी केली जाते. वसाहती मिळवून, मागासलेल्या प्रदेशांतून सवलती मिळवून व्यापारी तहांतून एका राष्ट्राला दिलेली सवलत सर्वांना मिळावी अशी योजना करून आंतरराष्ट्रीयदृष्ट्या स्पर्धा कमी करण्याचा प्रयत्न केला जातो. पण सर्वांचा परिणाम म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापार खुला राहात नाहीं. त्याला जें तें राष्ट्र आपल्या हिताच्या दृष्टीनें मर्यादा घालतें. वहातुकींत पूर्णता आली, जगभर व्यापार खुला राहिला म्हणजे जगांतील राष्ट्रें एकमेकांवर अवलंबून राहातील व त्यायोगें युद्ध करणें परवडणार नाहीं. इतकेंच नव्हे तर सर्वत्र व्यापारी हितसंबंध राज्यसत्तेला युद्धापासून परावृत्त करतील अशी विचारसरणी एके काळीं प्रभावी होती. प्रत्येक मनुष्य स्वहित जाणतो म्हणून तें साधण्यासाठीं त्याला स्वातंत्र्य असलें पाहिजे व तसें तें आलें म्हणजे समाजांत जास्तींत जास्त हित साधलें जाईल. म्हणून राज्यसत्तेनें व्यापारांत, व्यवहारांत हस्तक्षेप करूं नये हा व्यक्तिस्वातंत्र्यवादाचा मौलिक सिद्धांत आहे. त्याचें आंतरराष्ट्रीय स्वरूप म्हणजे राष्ट्राराष्ट्रांतील व्यापारांत व व्यवहारांत राज्यसत्तेनें पडूं नये म्हणजे जगाचें हित जास्तींत जास्त साधेल हें आहे. अंतर्गतदृष्ट्या राज्यसत्तेनें हस्तक्षेप केला नाहीं अगर नाममात्र केला याचा परिणाम भांडवलशाही उत्पादन सर्वत्र प्रभावी झालें. भांडवलशाही उत्पादनांत अशी परिस्थिति उत्पन्न होते कीं, गरजेपेक्षां अधिक उत्पादन होतें. होणारें उत्पादन देशांतील लोक पूर्णपणें विकत घेण्यास असमर्थ होतात. प्राप्तीमधील विषमता समाजांत वाढत जाते व त्याचा परिणाम उत्पादक शक्ति व उपभोगाला अवश्य असणारी क्रयशक्ति यांच्यांत अधिकाधिक फरक पडतो. म्हणजे वाढत जाणारी उत्पादकशक्ति अगर भांडवल याला देशीं फायदेशीर रीतीनें

गुंतविण्यास वाव मिळत नाहीं. स्वतंत्र अशा परगण्यांत वाव मिळणें याच कारणा-साठी अशक्य असल्यामुळें वसाहती मिळवाव्यात, संरक्षित प्रदेश मिळवावे, देशा-बाहेर राजकीय अंमल बसवावा, हें राज्यसत्तेमार्फत केलें जातें व भांडवलाची सोय होते. साम्राज्यशाही अशा रीतीनें निर्माण होते. देशांतील भांडवलाला क्षेत्र मिळण्या-साठीं जन्माला आलेली साम्राज्यशाही, मग भांडवलावरील नफा कायम ठेवण्यासाठीं कायम ठेवावी लागते. तलवारी मागें तराजू जातो व तरवारीचे जोरावर वजन मारून वर्चस्व राखतो. पुष्कळ वेळां हा क्रम उलट झालेलाही दिसतो. प्रथम व्यापार सुरू करावयाचा, नंतर भांडणें सुरू करावयाचीं व नंतर राजकीय अंमल बसवावयाचा असेही होतें. कसेंही झालें तरी देशाबाहेर राजकीय सत्ता प्रस्थापित झाली म्हणजे राष्ट्र हें साम्राज्य होते व राज्य जसें भांडवलवाल्यांचे देशांत गुलाम असतें, तसेंच साम्राज्य हें साम्राज्यांत त्यांचेंच गुलाम असतें. त्यांच्याच हिताच्या दृष्टीनें जकातीचें धोरण लादलें जातें. व्यापारविषयक तहनामे अगर योजना या त्यांच्याच हिताच्या दृष्टीनें ठरविल्या जातात. राष्ट्रांतील भांडवलवाल्यांचा स्वार्थ हें साम्राज्याचें मूळ आहे. साम्राज्याची उत्पत्ति, स्थिति आणि लय, हीं सर्व आर्थिक स्वरूपाचीं आहेत. यदृच्छया कोणतेंही साम्राज्य स्थापन झालेलें नाहीं. साम्राज्याचा 'बोजा' कोणी गोरा अगर पिवळा निर्हेतुक अगर निःस्वार्थी बुद्धीनें घेत नाहीं अगर घेतलेला नाहीं अगर त्यांना कोणीं घेण्यास सांगितलेंही नाहीं. इतकेंच नव्हे तर तो बोजाही नाहीं. असेल तर लुटीच्या धनाचाच तो बोजा आहे आणि तो बोजा म्हणून, अजून कोणी खुषीनें दूर केलेला प्रसंग इतिहासांत पडला नाहीं. किती जरी नैतिक आदर्श सांगितले, देशप्रेमाला आळविलें तरी साम्राज्याचें सत्यस्वरूप आर्थिक आहे व म्हणून राष्ट्राचें आर्थिक वर्चस्व साम्राज्यांत व अन्यत्र कायम ठेवण्यासाठीं राष्ट्र-राज्याचा उपयोग केला जातो. राष्ट्र राज्यें याप्रमाणें करूं लागलीं म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापार खुला राहात नाहीं एवढेंच नव्हें तर तेथें स्पर्धा व मत्सर वाढत जातो व त्याचें पर्य-वसान युद्धांत होतें. राष्ट्र-राज्यानें देशांत व्यक्तिस्वातंत्र्याचे नांवाखालीं हस्तक्षेप न करतां भांडवलशाही जोपासिली व राज्यसत्तेनें हस्तक्षेप करूं नये म्हणणाऱ्या भांड-वलशाहीनें राज्यसत्तेला परदेशीं हस्तक्षेप करण्यास भाग पाडून, नव्हे तें तिचें कर्तव्य आहे असें भासवून साम्राज्यशाही निर्माण केली. राज्याला साम्राज्यवाद देऊन संपत्ति स्वतःला ठेवून मान आणि धन यांची यांप्रमाणें वांटणी भांडवल-शाहीनें केली!! साम्राज्यावर आघात म्हणजे राष्ट्राचे मानावर आक्रमण हें मग उघडच झालें. साम्राज्याचें संरक्षण म्हणजे राष्ट्राच्या कीर्तीचें संरक्षण ठरतें आणि

जेथें राष्ट्राच्या मानापमानाचा प्रश्न तडजोडीनें मिटत नाहीं तेथें तो तलवारीनें मिटवावा लागतो.

वरील विचारसरणी बिनचूक असल्याचें अनुभवानें सिद्ध झालें आहे व जोंपर्यंत राष्ट्रराज्य हें व्यापारी वर्चस्वाखालीं आहे, जोंपर्यंत भांडवलवाले वस्तुतः राज्याचें धोरण ठरवीत आहेत, तोंपर्यंत असेंच होणें अपरिहार्य आहे. थोड्यांचे फायद्यासाठीं राष्ट्रीयभावना चेतविल्या जातात. राष्ट्र स्वयंपूर्ण असलें पाहिजे हें ध्येय साध्य करण्यासाठीं जबर आयातजकात बसाविली जाते. बहुसंख्याकांनीं वस्तु महाग घेऊन थोड्यांची धन करणें भाग पडतें. राष्ट्राच्या संरक्षणाचे दृष्टीनें कांहीं धंद्यांना विशेष सवलती दिल्या जातात. उत्पादकांना सोइस्कर पडावें म्हणून देशांत कोणीं यावें, कोणीं येऊं नये हें सरकार ठरवीत असतें. संरक्षणाचे दृष्टीनें अवश्य असलेले धंदे बुडूं नयेत म्हणून त्यांना युद्धोपयोगी सामान तयार करण्यास सरकार सांगतें. हें धंदे तरतात पण युद्धाचें वातावरणही निर्माण होत जातें. युद्धांत वहातुक धोक्याची असते म्हणून शक्य तितक्या प्रमाणांत राष्ट्र स्वयंपूर्ण करण्याचा प्रयत्न होतो. तें करावयाचें म्हणजे संरक्षक जकातीचें धोरण स्वीकारावें लागतें. आधुनिक युद्धाचें स्वरूप इतकें बदललें आहे कीं, कोणतेंही राष्ट्र या दृष्टीनें स्वयंपूर्ण होऊं शकणार नाहीं. स्वयंपूर्णता पूर्णपणें येण्यासाठीं सरहद्दी जितक्या दूरवर नेतां येतील तितक्या नेण्याचा प्रयत्न होतो. रबर, जस्त, लोखंड, कोळसा, गहूं वगैरे वस्तु मुबलक मिळतील इतका प्रदेश ताब्यांत असावा असें वाटूं लागतें, नव्हे अवश्य होतें. ऐपतीबाहेर लष्करी खर्च करणें भाग होतें. संरक्षणासाठीं लोकांच्या सुखसोयी कमी कराव्या लागतात. लोकांना चेतवून लोणी नको, तोफा पाहिजेत असा कौल घेतला जातो. 'खुनांत यश मिळावें म्हणून आम्ही भुकेनें मरूं' या धुंदींत उपासमार सोसून युद्धासाठीं जनतेला तयार करण्यांत येतें. प्रत्येक राष्ट्र हेंच करतें व त्यामुळें सर्वत्र ही स्पर्धा उत्पन्न होते. मग युद्धाचें वातावरण उत्पन्न होणें अपरिहार्य होतें. भीतीचें व धास्तीचें वातावरण पसरूं लागतें. संरक्षणाच्या दृष्टीनें लहान लहान राष्ट्रें सोईप्रमाणें तहनामे करून कुठल्या तरी गटांत जात असतात. युद्धाची भीति, फार काळ भीति म्हणून राहात नाहीं, लवकरच ती वस्तुस्थिति होते. आंतरराष्ट्रीय जग एक दारूचें कोठार झालेलें असतें. ठिणगी पडतांच युद्धाचा भडका होतो. ही आग स्थानिक न राहातां, एकाच खंडांत न राहातां जगभर पसरते. जल—स्थल—आकाश व्यापूनही उरतेच, युद्ध सरहद्दीवर न राहातां व सैनिक भिडले आहेत तेथेंच न राहातां तें सर्वव्यापी व सर्वंकश होतें. देशांतील साधनसामुग्रीवर महत्त्वाच्या कच्च्या मालावर राज्याचें केवळ नियंत्रण ठेवल्यानें

जगांतील युद्धाचें स्फोटक वातावरण सर्वस्वीं नष्ट होईल असें नाहीं. राज्यसत्तेचें वरीलप्रमाणें नियंत्रण असेल तर साधनसामुग्रीचा दुरुपयोग जरा कमी होईल हें खरें. समाजवादी राष्ट्रही आंतरराष्ट्रीयदृष्ट्या राष्ट्रवादी असूं शकतें हें चालू युद्धांत स्पष्ट झालें आहे आणि जोंपर्यंत राज्य, संघटनेनें तें समाजसत्तात्मक का असेना, पण भावनेनें तें राष्ट्रीय आहे, तोंपर्यंत त्याचें प्रभुत्व, त्याची सत्ता, ही राष्ट्र–राज्याचें आंतरराष्ट्रीय व्यवहारांतील गुणदोषांपासून अलिप्त असणार नाहीं. समाजसत्तावादी राष्ट्र–राज्य ( Nation state ) तितक्याच हिरीरीनें सरहद्दी वाढवील, तितक्याच दक्षतेनें संरक्षणाकडे बघेल व प्रत्यक्ष युद्ध तर अधिक कार्यक्षमतेनें लढवूं शकेल. सोव्हिएट रशियानें बाल्टिक राज्यें आपल्या राज्यांस जोडून घेतलीं व तें करतांना जरी लोकशाहीचा मंत्र म्हटला तरी त्याचें शुद्ध साम्राज्यशाहीस्वरूप जगापासून लपून राहिलें नाहीं. चालू युद्धांत तर आंतरराष्ट्रीयत्वाचा मुखवटा रशियानें उघडपणें फेंकून, राष्ट्रीय संस्कृति, स्लाव्ह राष्ट्र, राष्ट्रगीत वगैरे राष्ट्र–राज्याचे सर्व भाव प्रकट केले आहेत. सर्व राष्ट्रें समाजसत्तावादात्मक होऊन जर राष्ट्र–राज्यें राहातील व कोणाचें कोणावर प्रभुत्व नाहीं, प्रत्येकाचें प्रभुत्व परिपूर्ण अशीं राहातील, तरी त्यांच्यांत संघर्ष होणार नाहीं अगर युद्धें होणार नाहींत असें मानण्याचें कारण नाहीं. राष्ट्र–राज्यांतील पृथक्‌पणाचा भाव हा स्वभावतःच शांततेचा शत्रु आहे.

स्वयंनिर्णयाचा व संपूर्ण प्रमुखत्वाचा हक्क सांगणारा राष्ट्रवाद हा जागतिक शांततेच्या मुळावर जन्मलेला आहे. राष्ट्रीयत्वाचे कल्पनेंतून उत्पन्न होणारें राजकारण जगाची शांतता कायम धोक्यांत ठेवील याची कल्पना मिल्, मॅझिनी वगैरेंना खास नव्हती. शांतता निर्माण व्हावी, लोकांच्या आकांक्षा पुऱ्या व्हाव्यात म्हणून एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर अंमल चालवूं नये हा सिद्धांत, हें तत्त्वज्ञान अस्तित्वांत आलें. पण राष्ट्रीयत्वापासून निर्माण झालेलें राष्ट्र-राज्य हें शांतताविरोधी आहे असा अनुभव आला आहे. त्याचें राजकारण मानापमानाचें राजकारण होतें व राजकारण मानापमानाचें झालें म्हणजे भावनेची तीव्रता व अंधता निर्माण होते. या वातावरणांत मग न्याय्यबुद्धि मलिन होते. राष्ट्र हीच कल्पना भावनामय आहे. मग राष्ट्राचे मानापमानाच्या प्रसंगांत सर्वत्र भावनेला चेतविलें जाईल अगर जातें यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. ‘माझा देश’ ही केवढी प्रचंड भावना आहे, याचा पुरावा लक्षावधि लोकांनीं देहार्पण करून दिला आहे आणि जेव्हां राज्यानें युद्ध जाहीर केल्याबरोबर कसलाही विचार न करतां राष्ट्राचें संरक्षण करावयाचें आहे म्हणून प्रत्येकानें निमूटपणें व निष्ठेनें युद्धांत सामील झालें पाहिजे असें सांगण्यांत येतें, नव्हे

फर्मांविण्यांत येतें, तेव्हां हें असें कां व्हावें याचा विचार करणें जरूर होतें. राज्य कशासाठीं आहे हा मौलिक प्रश्न महत्त्व पावतो. प्रत्येक राष्ट्राला जिवंत राहण्याचा हक्क आहे, प्रत्येक व्यक्तीला जिवंत राहण्याचा हक्क आहे, पण तिनें तें कसें राहावें हें ती व्यक्ति ठरवीत नाहीं, समाज ठरवितो व समाजाचें मर्यादेंत राहूनच व्यक्तीला जिवंत राहावें लागतें. राष्ट्राला जिवंत राहण्याचा हक्क आहे पण तें एकाकी जिवंत राहात नाहीं. तें शेजारीं असणाऱ्या राष्ट्राबरोबर जिवंत राहातें. या मोठ्या जागतिक समाजांत त्याला जिवंत राहावयाचें नसतें म्हणून त्यानें कसें जिवंत राहावें हें ठरविण्याचा हक्क त्याला एकट्याला नाहीं. शेजारधर्म हा कांहीं आहे. जगांतील सर्व राष्ट्रांनें मिळून झालेल्या एका सामुदायिक भावाच्या कांहीं मर्यादा आहेत. जगांतील राष्ट्रें जगांत राहातात, त्यांच्यांत व्यवहार होतात, एक प्रकारें जागतिक समाज निर्माण झालेला असतो व त्याचाही कांहीं हेतु असतो, कांहीं आदर्श त्याचे व्यवहारांत उत्पन्न झालेले असतात. या बृहत् समाजाचा राष्ट्र हा एक घटक असतो म्हणून केवळ त्याचें खास असे हितसंबंध गौणच असले पाहिजेत. या बृहत्समाजाचें हित हें श्रेष्ठ असलें पाहिजे व तसें असेल तर हा बृहत्समाज नीट चालेल. राष्ट्रभक्ति ही श्रेष्ठ आहे, पण ती अंधभक्ति झाली कीं तिच्यांत गौणत्व येतें. व्यक्तीला, दुसऱ्या व्यक्तीच्या हक्कास बाध न येतां वागण्याचें स्वातंत्र्य आहे अधिकार आहे. तशीच मर्यादेंत तसाच अधिकार प्रत्येक राष्ट्राला आहे. प्रत्येक राष्ट्राचे हक्काला दुसऱ्या राष्ट्राच्या तत्सम हक्काची मर्यादा आहे. ज्या राजकारणांत हें मानलें जात नाहीं, हा विवेक केला जात नाहीं, ही न्याय्यबुद्धी असत नाहीं, तें राजकारण केवळ मनगटाचें राजकारण, केवळ सत्ताभिलाषी राजकारण आहे. मनगटाचें राजकारण परराष्ट्रीय, आंतरराष्ट्रीय व्यवहारांत सहन करण्याची एकदां संवय झाली कीं, तिचा परिणाम अंतर्गत राजकारणांतही होतो. बिनशर्त निष्ठा ही स्वातंत्र्याला नेहमीच घातक असते. राज्य जर अनीतीनें परराष्ट्रीय व्यवहारांत वागत असेल व त्यामुळें युद्ध ओढविलें असेल तर नागरिकांवर निष्ठा दाखविण्याची नैतिक जबाबदारी नाहीं. अन्याय तेथें सहन केला म्हणजे खुद्द देशांतील अन्याय सहन करण्याकडे प्रवृत्ति होते. राष्ट्र-राज्याला मर्यादेंत ठेवण्याची जबाबदारी प्रत्येक नागरिकावर जागतिक शांततेच्या दृष्टीनेंही आहे. नागरिकाची उदासीनता ही राष्ट्रांत स्वातंत्र्याची व जगांत शांततेची शत्रु आहे.

व्यक्तीला ज्याप्रमाणें समाजांत राहून विकास करावयाचा असतो, त्याचप्रमाणें जगाच्या बृहत्समाजांत राहूनच राष्ट्राला आपली उन्नति करावयाची असते. मनुष्य स्वभावानें संगतिप्रिय आहे, त्याला समाजांत राहावेसें वाटतें, राष्ट्राला तसें राहणें

अनिवार्य असतें व एकत्र राहावें लागतें म्हणून योग्य कोणतें अयोग्य कोणतें हें सामुदायिक दृष्टीनें, सामुदायिक हिताचे दृष्टीनें ठरलें जातें. मी घरांत कसाही वागेन, पण समाजांत कसें वागावें व कोणतें योग्य होईल हें समाज ठरवितो, त्याचे संकेत समाज उभारीत असतो; आणि आतां शास्त्रीय शोधांनीं जग येवढें विशाल असूनही एवढें आटोक्यांत आणलें आहे कीं, एकमेकांवर सारखें अवलंबून राहाणें राष्ट्रांना अपरिहार्य झालें आहे. कोणी आतां चीनसारखी भिंत बांधून जगावेगळा राहूं शकत नाहीं. सामुदायिक व्यवहाराचें, सामुदायिक संबंधाचें क्षेत्र सारखें वाढत आहे. सामुदायिक महत्त्वाचे प्रश्नही सारखे वाढत आहेत म्हणून त्यांचें नियमन करणें जरूर आहे व तें नियमन सामुदायिक स्वरूपाचें असणें हें केव्हांही इष्ट आहे. एका राष्ट्रानें नियमन करणें म्हणजे अन्य राष्ट्रांचें स्वातंत्र्य कमी करणें आहे किंवा तें जें करील तें योग्य आहे असें समजणें आहे. यानें नियमन होणार नाहीं शांततेचा निःपात होईल. म्हणून जें नियमन इष्ट आहे तें सामुदायिक, आंतरराष्ट्रीय स्वरूपाचें असलें पाहिजे व त्यांत प्रत्येक राष्ट्राचें सहकार्य असलें पाहिजे. सक्तीनें लादलें तर जसें सक्ती केली म्हणजे मनुष्य वागतो तसेंच तें राष्ट्र वागेल. त्याच्या प्रवृत्तींत आपुलकीनें कांहीं करावें असें दिसणार नाहीं, नियमन दूर सारण्याची संधीच तें सारखी पाहात राहील. प्रस्थापित नियमनाचा तें गुप्त शत्रूच राहील. नियमन स्वीकारण्यांत कोणाचाही अपमान नाहीं व सर्वांची सोय आहे, फायदा आहे ही खात्री होऊन स्वीकारलेलें नियमन अधिक टिकाऊ असतें. स्वाभिमान व स्वहित यांच्या मिलाफावर आधारलेल्या व संमतीनें शिक्का मोर्तब केलेल्या नियमनाला जें प्रामाण्य येतें, जी मान्यता येते, तीच खरी; तीच शांततेची ग्वाही आहे.

याप्रमाणें सर्वांच्या संमतीनें नियमन होणें याचा अर्थ प्रत्येक राष्ट्राच्या संपूर्ण प्रभुत्वाच्या हक्काला मर्यादा आली हें उघड आहे. सांखळी भक्कम व्हावी म्हणून व प्रत्येक कडी एकमेकांत चांगली बसावी म्हणून थोडी थोडी ती कानसावी लागते. राष्ट्राचें प्रभुत्वही थोडें थोडें कानसावें लागतें. कारण त्याशिवाय एकमेकांशीं जुळणार नाहीं व संघटनेंत शक्तीही येणार नाहीं. आजच्या जगांत कोणी तरी तीनचार बलिष्ठ राष्ट्रांनीं एकत्र यावें व जगाचे चावडींत बसून दमपट्टीनें व्यवहार चालवावा हें दृश्य दिसून येत आहे व त्याचाच परिणाम म्हणजे जगाला युद्धांतून उसंत मिळत नाहीं. सर्वांच्या संमतीनें होणाऱ्या नियमनांत वरील गुंडगिरीला स्थान नाहीं. कोणकोणत्या गोष्टी सामुदायिक आहेत तें ठरविणें, त्यांचे नियमनाच्या दृष्टीनें नियम करणें व त्यांची अंमलबजावणी होण्यासाठीं जरूर त्या संस्था स्थापणें व हें सर्व ठरविण्यासाठीं

सर्व राष्ट्रांचे प्रतिनिधि घेणें इतक्या सगळ्या गोष्टी करणें म्हणजे जगभर एक सत्ता चालविणारें संघटनच निर्माण करणें आहे. पण असलें अगर या स्वरूपाचें संघटन असल्याशिवाय जगाला गत्यंतर नाहीं. किंबहुना घडत असलेल्या व घडलेल्या परिस्थितीप्रमाणें अशाच दृष्टीनें जगाचें पाऊल पडणें हें क्रमप्राप्त होत आहे. राष्ट्राराष्ट्रांत निर्हेतुक व नैतिक सहकार्याची परंपरा नाहीं, जगांत एकभाषा नाहीं, या अडचणी तर आहेतच पण जागतिक संघटनेनें दिलेला निर्णय एखाद्या राष्ट्रानें न मानला तर, त्याला तो कसा मानावयास लावावयाचा हा सर्वांत बिकट प्रश्न मागील अनुभवानें अधिक बिकट झाला आहे. प्रश्नाचा निकाल विचारविनिमयानें न करतां युद्धानें करण्यास हल्लींच्या युद्धाचे स्वरूपाकडे पाहिल्यास राष्ट्रें कचरतात हें खरें व तेवढ्यापुरतें असलें संघटन यशस्वी होईल असें मानण्यास जागा आहे. आधुनिक युद्ध म्हणजे आत्महत्या असें लास्की म्हणतो. तथापि तिला 'हाराकिरी' 'पवित्र आत्महत्या' मानून ती करण्यास राष्ट्रें तयार होतात हेंही खरें आहे. आजच्या जगाचे स्थितींत राष्ट्रांनीं सहकार करावा नाहीं तर स्वाहाकार करावा अशी परिस्थिति असून, राष्ट्रें योग्य निवड करीत नाहींत यांतील अर्थ समजून घेतला पाहिजे. मागील महायुद्धानंतर जगांत शांतता, लोकशाही नांदावी, राष्ट्रीय स्वातंत्र्य व आंतरराष्ट्रीय शांतता शक्य व्हावी म्हणून राष्ट्रसंघ निर्माण झाला. राष्ट्रापेक्षां अधिक अशी ती संघटना निश्चित होती. राष्ट्राराष्ट्रांतील तंटे, विचारविनिमयानें, तडजोडीनें लवादानें मिटवण्यासाठीं निर्माण केलेलें तें एक संघटन होतें. त्याचें कार्यक्षेत्र राष्ट्रापेक्षां व्यापक, त्याचा अधिकारही राष्ट्रापेक्षां व्यापक असा कल्पित होता. असें आंतरराष्ट्रीय संघटन हें अधिराज्य झालें पाहिजे तरच तें यशस्वी होऊं शकतें हा अनुभव राष्ट्रसंघाबाबत आला. अधिराज्य होणें म्हणजे त्याचे निर्णयाला कायद्याचें स्वरूप येणें, त्या ठिकाणीं प्रभुत्व येणें, त्याचा हुकूम अमान्य करणारास शासन मिळणें हें होय. हें प्रभुत्व, ही सत्ता या संघटनेस देण्यास कोणतेंही घटक राष्ट्र तयार नव्हतें. तसें प्रभुत्व देणें म्हणजे स्वतःचें प्रभुत्व कमी करणें, त्याला मर्यादा उत्पन्न करणें, बाहेरचा हुकूम मानणें असा त्याचा सरळ अर्थ होतो. प्रभुत्वाचे अभावीं राष्ट्रसंघाचा अधिकार केवळ नैतिक राहिला. अधिकार हा सत्तेशिवाय अपुरा असतो. 'नायमधिकारो बलहीनेन लभ्यः' हें राजकीय उपनिषदंतांतील महान् तत्त्व आहे. जे बलवान् होते त्यांनीं बलाचे जोरावर राष्ट्रसंघाचा फायदा घेतला व त्या जोरावर त्याला ठोकरलें. राष्ट्राचें अमर्याद प्रभुत्व, हीच जगाचे शांततेच्या मार्गावरील मोठी अडचण आहे. बाहेरील संघटनेचा निर्णय मान्य करणें म्हणजे आपलें स्वातंत्र्य दुसऱ्याचे मर्जीवर अवलंबून ठेवणें आहे

असें वाटतें. सत्तेच्या जोरावर काय शहाणपणाचें आहे, काय बरोबर आहे हे ठरविण्याचा हक्क सोडून देण्यास राष्ट्र-राज्य तयार नसतें. वाटेल त्या मार्गानें हवें आहे तें साध्य करण्यास तयार झालेलें राष्ट्र विचारविनिमयास, लवादास तयार होत नाहीं. कारण विवेकबुद्धि वाटेल तें साध्य करूं देणार नाहीं ही खात्री असते. सहकार करून, विचारविनिमय करून, लवादाकडून निर्णय घेण्यांत वरील धोका असतो म्हणून बलवान् राष्ट्रें तो पत्करीत नाहींत. जपान व इटली यांनीं राष्ट्रसंघाची मध्यस्थी याच कारणाकरितां नाकारली; हिंदुस्थानचा प्रश्न याच कारणाकरितां इंग्लंडनें राष्ट्रसंघापुढें येऊं दिला नाहीं.

आंतरराष्ट्रीय व्यवहारांत किती तरी प्रश्न असे आहेत कीं, त्यांच्याबद्दल आजही विचारविनिमय होतो, थोडेसें नियमनही होतें. वाहतुक, व्यापार, उद्योगधंदे, सार्वजनिक आरोग्य, परदेशगमन, परदेशवस्ति, अल्पसंख्यांकांचें संरक्षण वगैरे प्रश्नांबाबत बरीच प्रगति राष्ट्रसंघानें केली. मजुरांचे कायदे सर्वत्र सारखे असावेत व ते योग्य असावेत म्हणूनही आंतरराष्ट्रीय मजूरकचेरीनें पुष्कळ प्रयत्न केले आहेत. चालू महायुद्धांपूर्वीं जगांतील कांहीं वस्तूंचें उत्पादनाबाबतही, आंतरराष्ट्रीय करारमदार झाले होते. आंतरराष्ट्रीय संघटनेला केवढें क्षेत्र आहे हें यावरून सहज दिसून येईल. त्याजबरोबर राष्ट्रें निरनिराळीं असलीं तरी किती तरी गोष्टी त्यांच्यांत समान आहेत कीं ज्यांचे बाबतींत सारखे कायदे, सारखे संकेत करतां येणें शक्य आहे. राष्ट्राराष्ट्रांत जितकी समानता, समानशीलता येईल तितकें सख्य व सहकार हे वाढतील. जगांतील कच्चा माल जगाचे हिताचें दृष्टीनें उत्पादिला पाहिजे व वांटला पाहिजे हा अधिकार जर आंतरराष्ट्रीय संघटनेनें सांगावयाचा, तर जेथें पारतंत्र्य आहे, जीं राष्ट्रें दुसऱ्या राष्ट्रांचे सत्तेखालीं आहेत, त्यांचाही विचार आंतराष्ट्रीय दृष्टीनेंच झाला पाहिजे. हिंदुस्थान व इंग्लंड यांच्यांतील प्रश्न आंतरराष्ट्रीय झाला पाहिजे. फिलिपाइन व अमेरिका यांच्यांतील प्रश्नही असाच झाला पाहिजे. सर्व राष्ट्रें सारखीं स्वतंत्र असलीं म्हणजे जगांत जास्त सख्य, जास्त शांतता नांदेल हें उघड आहे. जगांतील साधनसामुग्रीचाच फक्त आंतरराष्ट्रीयदृष्ट्या विचार करावयाचा व मनुष्यांच्या भावनांना दूर ठेवावयाचें, यानें आंतरराष्ट्रीय संघटन यशस्वी होणार नाहीं, म्हणजे जगांत शांतता नांदणार नाहीं. जगाचें नियमन करावयाचें म्हणजे एक प्रकारें राज्यसत्ता निर्माण करावयाची, संघटनेला राज्यसत्तेचे कमीअधिक अधिकार द्यावयाचे हें उघड आहे. अटलांटिक सनद जाहीर करून भागणार नाहीं, त्याप्रमाणें घडवून आणणारें व्यक्तिगत राष्ट्रापेक्षां अधिक सत्तेचें संघटन जरूर आहे, तें संघटन म्हणजे राज्यसत्ता स्वरू-

पाचें असलें पाहिजे. म्हणजे त्याचे निर्णय पसंत नसले तरी घटकांनीं ऐकले पाहिजेत. वादविवाद, विचारविनिमय होऊन ते व्हावेत हें ठीक, पण ते झाले म्हणजे सर्वांवर बंधनकारक असले पाहिजेत. तसें नसेल तर राष्ट्रसंघाप्रमाणेंच याही संघटनेचा बोज-वारा उडेल. संघटनेंत कुणाला किती प्रतिनिधि, त्यांतील संस्थांचें स्वरूप हे प्रश्न महत्त्वाचे खरे, पण मुख्य महत्त्वाचा प्रश्न संघटनेला प्रभुत्व असलें पाहिजे, तिचा हुकूम मान्य झाला पाहिजे हा आहे.

राष्ट्रीय स्वातंत्र्य यत्किंचित् न सोडतां जागतिक शांतता व सुव्यवस्था उभारणें हें एक स्वप्न आहे. व्यक्ति व समाज, नागरिक व राज्य, हे विरोधी संबंध नाहींत. त्यांच्यांतील मौलिक ऐक्य प्रस्थापित करतां येतें. योग्य संस्था व संकेत उभारून हे संबंध सुखोत्पादक करतां येतात. व्यक्तिविकास व सामाजिक प्रगति हीं विरोधी नाहींत एकच आहेत, एकमेकांशिवाय दोघेही अपूर्ण आहेत हें अनुभवानें व विचारानें सिद्ध झालें आहे. राज्याचा विचार जसा त्यांतील नागरिकांच्या दृष्टीनें करावा लागतो, तसेंच राज्य हें जगांतील बृहत्समाजाचें एक घटक आहे हें लक्षांत घेऊन त्या समा-जांतील त्याचे स्थान व त्यांच्यामधील असणारे व उत्पन्न होणारे संबंध लक्षांत घेऊन विचार करणें जरूर आहे. किंबहुना तसा विचार न केला तर राज्यविषयक मीमांसेला पूर्णता येणार नाहीं. समाजांत येण्यानें व्यक्तीला आपलें स्वातंत्र्य मर्यादित पण संरक्षित झालें हें जसें वाटतें, तसें राज्याला आंतरराष्ट्रीय समाजांत येण्यानें वाटलें पाहिजे. व्यक्तीला जशी आपल्या हक्कांवर कोणी अतिक्रमण करणार नाहीं अशी ग्वाही कांहीं राज्यामुळें मिळते, तशीच राज्याला आंतरराष्ट्रीय समाजामुळें मिळाली पाहिजे. संरक्षणार्थ व्यक्ति कांहीं अंगावर चिलखत घालून बाहेर पडत नाहीं अगर खिशांत पिस्तूल घालून बाजारांत जात नाहीं, घराभोंवतीं तट उभारीत नाहीं. कारण तिला समाजांत राज्य सुव्यवस्था राखीत आहे असा विश्वास असतो. ही सुव्यवस्था बिघड-विणारांस शासनसंस्था—राज्य—दंडील ही खात्री असते. त्याचबरोबर ही सुव्यवस्था ठेवण्यांत व्यक्तीचें हित आहे हीही तिला खात्री असते. हा विश्वास व ही खात्री आंतराष्ट्रीय व्यवहारांत आली पाहिजे, तरच जगांत सुव्यवस्था व शांतता नांदेल हें उघड आहे. व्यक्ति आपल्या हक्कांचें, आपल्या सत्तेचें थोडें दान करून समाज अगर राज्य निर्माण करते अशी जी विचारसरणी आहे तिचाच स्वीकार करून आंतर-राष्ट्रीय समाज कल्पून त्याला सत्तेचें अधिष्ठान दिलें पाहिजे. तसें झालें म्हणजे प्रत्येक राष्ट्राला आपल्या हक्कांवर कोणी अतिक्रमण करणार नाहीं असा विश्वास उत्पन्न होईल. आज जमाचे राजरस्त्यावर नखशिखांत शस्त्रास्त्रांनीं सजूनच राष्ट्रें चाल-

तात. कारण कोणत्या वेळीं हल्ला होईल याचा नेम नसतो. व्यक्तीला समाजांत जर हित आहे असें वाटतें, त्याचें नियंत्रण स्वतःचे विकासाला जरूर वाटतें, तर व्यक्तींनींच झालेलें राज्य व चालविलेलें राज्य याला जागतिक सुव्यवस्थेंत आपला विकास आहे, आपलें स्वातंत्र्य संरक्षित आहे असें कां वाटूं नये? राष्ट्रप्रेम ही शुद्ध स्वरूपांत अविवेकी भावना खास नाहीं. राष्ट्राचे स्वातंत्र्य कायम राहून जगाची शांतता राहाण्याची हें घडवून आणतांना कांहीं तरी त्याग करणें जरूर आहे हें प्रत्येक व्यक्तीला विचारांतीं पटणारें आहे. विचारांत अनेक निर्बंध व्यक्तींनीं मान्य केले आहेत. निर्बंध सर्वांवरच असले व सर्वांच्यासाठीं असले म्हणजे त्यांत न्यायभाव असतो व संमतीनें ते उभारले असले म्हणजे त्यांत अपमानाचें शल्य राहात नाहीं. प्रत्येक स्वतंत्र राष्ट्रानें संमतीनें निर्बंध स्वीकारण्यांत कमीपणा नाहीं त्यांत सर्वांचे हित आहे; मर्यादा येते पण स्थैर्य व संरक्षणही लाभतें. चिलखत अंगावर घालून जावें लागत नाहीं, तलवारीस हात घालून एक हात निकामी करावा लागत नाहीं आणि हे निर्बंधपण जेवढे सामुदायिक स्वरूपाचे आहेत तेवढ्याच क्षेत्रापुरते राहून, व्यक्तीप्रमाणें राष्ट्रही आपल्या खास क्षेत्रांत संपूर्णपणें स्वायत्त राहूं शकतें. राज्यांतसुद्धां जें सामुदायिक क्षेत्र आहे, त्याबाबत ज्यांच्या ज्यांच्यावर निर्बंधानें परिणाम होणार आहे, त्यांच्याशीं विचारविनिमय करूनच निर्बंध उभारले पाहिजेत, ही जशी इष्ट विचारसरणी तीच आंतरराष्ट्रीय व्यवहारांत स्वीकारली पाहिजे. व्यक्तित्व ठेवून समाज जर राहूं शकतो व नियमन करूं शकतो, तर राष्ट्रीयत्व ठेवून आंतरराष्ट्रीय समाज कां नियमन करूं शकणार नाहीं? उलट आंतरराष्ट्रीय नियमनानें खरोखर बहुसंख्यांक जनतेच्या हिताच्या दृष्टीनें अधिक विचार होणें जास्त संभवनीय आहे. आंतरराष्ट्रीय मजूर-कचेरीनें, ज्या व्यापक बुद्धीनें मजुरांचेबाबत निर्णय घेतले त्यांवरून ही गोष्ट स्पष्ट होते. राष्ट्रांत जर मजुरांचेबाबत कायदे करण्याचा प्रसंग आला म्हणजे मालकांच्या हितसंबंधांचा जास्त विचार होतो; पण आंतरराष्ट्रीयदृष्ट्या विचार करतांना मजुरांचे हिताचा विचार जास्त होतो. कारण विचारविनिमयांत तेथें खाजगी हितसंबंध अप्रस्तुत होऊन राष्ट्राचे हितसंबंध हें विचारांचें प्रमाण होतें. परराष्ट्रीय राजकारण जर नुसतें राज्यानें ठरवावयाचें असें असेल तर तें केव्हांही राज्यसत्ता ज्या वर्गाच्या, ज्या गटाच्या हातांत असेल त्यांच्या हितसंबंधांच्या दृष्टीनें ठरविलें जाईल, त्यांच्या हितार्थ राज्याची शक्ति व प्रतिष्ठा खर्ची पडेल हें उघड आहे व तसा अनुभवही आहे. उलट परराष्ट्रीय राजकारण, म्हणजे आंतरराष्ट्रीय समाजांतील सामुदायिक क्षेत्रांतील हितसंबंध म्हणून त्याचें नियमन जर आंतरराष्ट्रीय समाजानें म्हणजे त्याचे

संघटनेनें करावयाचें असें असलें म्हणजे वर्गहिताचे दृष्टीनें विचार होणार नाहीं. आंतरराष्ट्रीय समाज संघटित व सत्ताधीश होण्यांत वर्गापेक्षां व्यक्तीचें हित अधिक साधलें जाईल.

आंतरराष्ट्रीय समाजाला राज्यसत्ता प्राप्त झाली म्हणजे राष्ट्रीयत्व नाहींसें होईल अगर राष्ट्रप्रेम आटेल वगैरे आक्षेप फोल आहेत. समाज झाल्यानें अगर राज्य झाल्यानें, व्यक्तीचें व्यक्तित्व लोप पावलें नाहीं, उलट त्याचे व्यक्तिमत्वाला अधिक वाव मिळण्याची परिस्थिति उत्पन्न झाली हा अनुभव आहे. तसेंच समाजांत येण्यानें व्यक्तीचा आत्म-सन्मानभाव अगर स्वाभिमान गेला नाहीं, उलट तो राखला गेला आहे. समाजकार्यांत माझाही हात आहे या जाणिवेनें व्यक्तीच्या अभिमानाला प्रतिष्ठा आलेली आहे. याच दृष्टीनें विचार केला म्हणजे राज्याला व्यापक संघटनेंत येण्यानें व्यक्तित्वाला, राष्ट्रीयत्वाला सोडावें लागत नाहीं व राष्ट्रप्रेमालाही धक्का बसत नाहीं आणि पुष्कळ वेळां राष्ट्रप्रेम ही स्वार्थासाठीं कांहीं व्यक्तींनीं व गटांनीं चेतावलेली भावना असते. मागील महा-युद्धांतून रशिया बाहेर पडल्यानंतर रशियावर स्वारी करण्यांत इंग्लंडचें गेलेलें कोणतें मानधन परत मिळवावयाचें होतें ? कांहीं इंग्लिश सावकारांचें कर्ज नवीन रशियन सरकारनें रद्दबातल ठरविलें, त्यांच्या धनासाठीं हजारों इंग्रज बळी देण्यांत आले हें उघड आहे. तेलाच्या कंपन्यांना सवलती मिळाल्या नाहींत, व्यापारी कंपन्यांना प्रवेश मिळाला नाहीं कीं लागलीच राष्ट्राचा अपमान झाला म्हणून गवगवा करण्यांत येतो व खाजगी भांडवलवाल्यांसाठीं, राष्ट्रांची इभ्रत पणाला लावून शेंकडों नागरिकांना बळी देण्यांत येतें हाही अनुभव प्रसिद्ध आहे. आज राष्ट्राच्या नांवावर राज्यसत्ता जें परदेशीं जपतें, जें संरक्षण करतें, तें खरोखर राष्ट्राचें सामुदायिक हित नसून मूठभर लोकांचें खाजगी हित असतें. रबर, तेल, रेल्वे, अफू, चहाचे मळे, थोडक्यांत परदेशांत गुंतविलेलें खाजगी भांडवल संरक्षण करण्यासाठीं राष्ट्राभिमानाला चेतवून, राष्ट्रप्रेमाला भडकावून, भांडवलाची दासी झालेली राज्यसत्ता, हजारों तरुणांचे बळी देते. होणाऱ्या युद्धासाठीं भांडवलवाले दारुगोळा व अन्नसामुग्री तयार करून देऊन त्यांवर नफा मिळवितात, सरकारला कर्ज देऊन व्याज मिळवितात, तरुण पिढीला मरण्याची संधि देऊन आपला स्वार्थ अमर करतात. राष्ट्रीयत्व व राज्य यांच्यांतील भावनेचा व संघटनेचा उपयोग याप्रमाणें मूठभर लोकांच्या स्वार्थासाठीं होतो हें दुर्दैव आहे. आंतरराष्ट्रीयसमाज संघटित होण्यासाठीं व्यक्तिगत राज्याचें स्वरूप यथार्थपणें लोकसत्तात्मक होणें जरूर आहे.

राष्ट्राचें प्रादेशिक स्वरूप हें केवळ यदृच्छेचें निदर्शक आहे. लोकांना पाहिजेल

तेथें नदी, पर्वत अगर समुद्र, येऊन सरहद्द आंखीत नाहीं. लोक भौगोलिक परिस्थिति पाहून परंपरेनें म्हणजे इतिहासानें मर्यादा ठरवीत गेले. आसिंधुपर्यंतच भारतभू कां ? त्यापलीकडे भारतभू कां नसावी ? लहान डोंगराच्या दोन्ही बाजूंचा प्रदेश एकराष्ट्रांत येतो मग मोठ्या डोंगरांच्या दोन्ही बाजूंचा प्रदेश कां येऊं नये ? खाडीचे दोन्ही बाजूस असलेला प्रदेश एका राष्ट्रांत येतो तर केवळ ३० मैल रुंदीचा समुद्र मध्यें असला म्हणून दोन्ही बाजूंचे प्रदेश दोन राष्ट्रें कां व्हावींत ? राष्ट्राचें प्रादेशिक स्वरूप ठरविण्यांत लोकांच्या स्वयंनिर्णयापेक्षां निसर्गाची लहर जास्त प्रभावी ठरली असाच याचा अर्थ होतो. निसर्गाशीं मनुष्यानें जुळवून घेतलें असेंच दिसतें व याचें कारण तसें करणें व्यवस्थेचे दृष्टीनें व संबंध ठेवण्याचे दृष्टीनें आटोपशीर व सोयीचें होतें. जेथें शक्य झालें तेथें अनेक राष्ट्रें एका राज्यांतही आलीं. धर्मदृष्ट्या अनेक राष्ट्रांचें नियमन एकहाती पोपनें व खलिफानें किती तरी शतकें केलेंच कीं नाहीं ? निसर्ग राष्ट्र असें प्रमाण धरून वागला नाहीं व वागतही नाहीं. अमुक एक प्रदेश हें अमुक एक राष्ट्र हें त्यांतील लोकांनीं ठरविलें. सर्व जगाचें एकराष्ट्र होण्यास निसर्गाची खास अडचण नाहीं. एवढी व्यापक व प्रभावी घटना करण्याचा वकूब लोकांनीं दाखविला पाहिजे. मनुष्यें सर्वत्र सारखीं, मनुष्यस्वभाव सर्वत्र सारखा हें म्हणण्यांत अखिल मानवसमाज हा एक आहे हा भावच दिसून येतो. हा भाव व जगांतील सर्व भूप्रदेश यांचा समन्वय करणें हे अवघड पण अशक्य मात्र नाहीं. त्यांतील मोठी अडचण म्हणजे प्रदेशनिष्ठ राष्ट्र व राष्ट्रनिष्ठ राज्य—म्हणजे राष्ट्र—राज्य ही आहे. जगाचें हित व राष्ट्र—राज्याचें हित हा विरोध परिहार करण्याकरितां खुद्द राष्ट्र—राज्यांतील अंतर्गत हितविरोध परिहार होणें जरूर आहे. कारण या राज्याची सत्ता मूठभर लोकांच्या स्वार्थासाठीं खर्ची पडते हा अनुभव आहे. ती सत्ता जर सर्व लोकांच्या हितासाठीं यथार्थपणें खर्ची पडूं लागली तर ती अधिक व्यापक जें जागतिक हित त्याला विरोधी असणार नाहीं. मूठभर लोकांचें हित व जागतिक हित यांतील विरोध राष्ट्रांतील सर्व लोकांचें हित व जागतिक हित यांतील विरोधापेक्षां प्रमाणानें आणि प्रतीनें जास्त असणार हें उघड आहे. राष्ट्रांतील सर्व लोकांचे हित व जागतिक हित यांत अधिक साम्य, मूठभर लोकांचें हित व जागतिक हित यांच्यांतील साम्यापेक्षां खास आहे. कोणीही उपाशीं राहूं नये, कोणींही थकेपर्यंत श्रमूं नये, हें तत्त्व सर्वांना मान्य होईल; कारण त्यांत सर्वांचें हितैक्य आहे. पण राज्य जर भांडवलशाहीचे हातांत असेल तर कामाचे तास कमी करणें अगर किमान वेतन ठरविणें याला तें देशांत व बाहेर दोन्हीकडे विरोध करील, पण तें जर लोकसत्तात्मक

असेल तर त्याला सर्व लोकांचें ऐकून, त्यांच्या दृष्टीनें विचार करून वागावें लागेल. कोणा एका वर्गासाठीं तें झटणार नाहीं व आंतरराष्ट्रीय व्यवहारांतही त्याच दृष्टीनें वागेल. आंतरराष्ट्रीय विचारविनिमयांतही मूठभर लोकांच्या स्वार्थाचे दृष्टीनें विचार न होतां सर्व राष्ट्रांतील सर्व लोकांच्या दृष्टीनें विचार होईल. राज्य या परिस्थितींत प्रभुत्व मिरविणार नाहीं नैतिक श्रेष्ठत्व दाखवील. राज्य जोंपर्यंत एका वर्गाचे हातांत आहे तोंपर्यंत तें सत्ता मिरविण्याकडे झुकलेलें असतें. कारण युद्ध झाल्यास मरणारे या वर्गांतील नसतात. मिरविण्यांतील शोभा ते भोगतात, मरण्यांतील भोग दुसऱ्यांना द्यावा लागतो. न्यायानें, तडजोडीनें न घेतल्यास स्वतःचे प्राण द्यावे लागतील हें जेव्हां सिद्ध असेल तेव्हांच न्यायानें वागण्याची बुद्धि आंतरराष्ट्रीय विचारविनिमयांत मुत्सद्यांना येईल. भांडवलशाही राष्ट्र-राज्याचे प्रतिनिधि बेजबाबदार बोलतात याचें कारण उघड आहे. शांतताभंग होण्यांत भांडवलवाल्यांचें नुकसान नसतें म्हणूनच त्यांची भाषा मानापमानाच्या छंदांत बोलत असते. राष्ट्रसंघाच्या इतिहासांत या गोष्टीचे अनेक दाखले सहज दिसून येतील. राष्ट्र-संघाला कोणीं बलहीन व कर्तत्वशून्य केलें असेल तर भांडवलशाही राज्याचे प्रतिनिधींनींच. यांनींच राष्ट्र-संघाला न्याय देणारी व्यवस्था करण्याऐवजीं स्वार्थी विषमता व विद्यमान अन्याय आंतरराष्ट्रीय जगांत कायम ठेवण्याचें साधन म्हणून उपयोगांत आणलें.

राष्ट्र-राज्यांतील भांडवलशाही वर्चस्वाला आंतरराष्ट्रीय संघटना ही एक मर्यादा आहे. एखादें बलिष्ठ राष्ट्र असलें तरी त्याला आंतरराष्ट्रीय विचारविनिमयांत थोडें विचारानें, थोडें व्यापक दृष्टीनेंच वागावें लागतें. येवढें नैतिक वजन त्यावर पडतेंच. पण जर राष्ट्र-राज्य लोकसत्ताक झालें, लोकहिताचे प्रतिनिधी झालें तर आंतरराष्ट्रीय संघटन अधिक प्रभावी, अधिक हितप्रद होऊन त्याच्या निर्णयांना प्रामाण्यता व मान्यता अधिक मिळेल. आपला अभिप्राय सामुदायिक निर्णयांत समाविष्ट आहे, विचारांत घेतला गेला आहे हा विश्वास व्यक्तीला असला म्हणजे त्याची निष्ठा जशी तेजस्वी असते त्याचप्रमाणें आंतरराष्ट्रीय निर्णयांत प्रत्येक स्वतंत्र राष्ट्राचा अभिप्राय समाविष्ट आहे, विचारांत घेतला गेला आहे असा विश्वास असला म्हणजे त्याची निष्ठाही तशीच तेजस्वी राहील व स्वतंत्र राष्ट्र म्हणजे एखादा वर्ग अगर मूठभर लोक नव्हेत तर सर्व नागरिक अशी परिस्थिति झाली म्हणजे ही निष्ठा अधिक तेजस्वी होईल व प्रभावी होईल हें स्पष्ट आहे. त्याचबरोबर होणारे निर्णयांत अधिक अधिक लोक-हित साधणारे व सयुक्तिक होतील. कारण जास्तींत जास्त अनुभवांवर व अभिप्रायां-वर ते आधारलेले असतील. प्रत्येक मताला मिळणारी प्रतिष्ठा ही तें किती व्यापक

अनुभवांवर आधारलेलें आहे यावर अवलंबून असते. आजही अनेक संस्था आंतरराष्ट्रीय स्वरूपांत काम करून मतप्रचार करीत आहेत. आंतरराष्ट्रीय मजूर संघ, आंतरराष्ट्रीय व्यापारी संघ, आंतरराष्ट्रीय सहकारी संघ वगैरे संस्था आंतरराष्ट्रीय स्वरूपांत काम करून महत्त्व संपादन करीत आहेत. आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत होणाऱ्या व्यवहारांत कांहीं एकसूत्रीपणा आणून कांहीं व्यवस्था निर्माण करण्याचें, सर्व प्रकारें संकलन करण्याचें कार्य जर मध्यवर्ती अशा संस्थेकडून झालें तर अधिक चांगलें हें कोणीही कबूल करील. आंतरराष्ट्रीय समाजाचें असें संघटन असण्यानें व तें राज्यसत्ता स्वरूपाचें असण्यानें व्यवहारांत नियमबद्धता व निश्चिति येईल हेही उघड आहे. कांहीं प्रश्न आंतरराष्ट्रीय असून अशा संघटनेचे अभावीं त्यांचा निकाल राष्ट्रशः करावा लागतो व त्याचा परिणाम अनिष्ट होतो. किती तरी बाबतींत सोय व कार्यक्षमता सहकार्यानें वाढणें शक्य असून तसें न होतां अनेक राष्ट्रांचे श्रम व सामुग्री व्यर्थ खर्ची पडते. सोय, संरक्षण, स्थैर्य व प्रगति या सर्व दृष्टींनीं वरील प्रकारचें संघटन असणें, जगांतील लोकांचे दृष्टीनें इष्ट आहे.

असें राज्यसत्ता स्वरूपाचें संघटन झालें तर तें उद्यां व्यक्तिगत राष्ट्र—राज्य नाहींसें करणार नाहीं कशावरून? अशी शंका येणें स्वाभाविक आहे. हें संघटन समर्थ आहे, बलवान् आहे व त्याचा हुकूम अमान्य करणाऱ्यास शासन अटळ आहे हें तर गृहीत धरलें आहे. मग सर्वसत्ताधीश हे वाटेल तें कां करणार नाहींत? न्यायासाठीं निर्माण झालेले अन्याय करणार नाहींत याची खात्री काय? हा मौलिक प्रश्न आहे. सुव्यवस्थेसाठीं, शासनासाठीं, राज्यसत्ता एका दृष्टीनें समर्थ करावी लागते व दुसऱ्या दृष्टीनें ही समर्थ झालेली राज्यसत्ता स्वतःवर नियंत्रण घालील अशी व्यवस्था करावी लागते. सत्ता समर्थ नसेल तर शासन होणार नाहीं, कोणी तिचें ऐकणार नाहीं व राष्ट्रसंघाचा हा अनुभव ताजा आहे. जर समर्थ झाली तर ती अन्यायानें न वागेल अशी व्यवस्था निर्माण करणें जरूर आहे. राज्याचें प्रभुत्व मर्यादित ठेवण्यासाठीं जी हक्कव्यवस्था असावी असे मागें प्रतिपादिलें आहे, त्याच अनुरोधानें आंतरराष्ट्रीय व्यवस्थेंत हक्कव्यवस्था करणें शक्य आहे. आंतरराष्ट्रीय संघटनांत सुद्धां कांहीं शिष्टांचें प्राबल्य होणें शक्य आहे. राष्ट्रसंघाचा अनुभव तसाच आहे. म्हणून कांहीं मौलिक हक्क घटक राष्ट्रांचे ठरविले पाहिजेत व ते घटनेंत समाविष्ट केले पाहिजेत. घटक होण्याची पात्रता प्रादेशिक राष्ट्रीयत्वावरच आधारलेली असणार हें उघड आहे; निदान आजच्या स्थितींत दुसरें कांहीं शक्य नाहीं हें स्पष्ट आहे म्हणून प्रदेशनिष्ठ राष्ट्र हें स्वतंत्र असलें पाहिजे व तें स्वतंत्र राष्ट्र घटक झालें म्हणजे त्याचे स्वातंत्र्य व

त्याचें प्रादेशिक अखंडत्व हे मौलिक हक्क मानले पाहिजेत. या दोहींत त्याचे संमतीशिवाय कांहींही फरक करण्याचा अधिकार आंतरराष्ट्रीय संघटनेला नसावा. जें प्रादेशिक दृष्टीनें राष्ट्र आहे व लोक त्याप्रमाणें भावना बाळगून आहेत त्यांना स्वातंत्र्य देऊन घटक केलें पाहिजे व जे घटक झाले त्यांचें स्वातंत्र्य व अखंडत्व राखलें पाहिजे. हें दुहेरी काम या संघटनेचें असलें पाहिजे. यानें अशांततेचें मूळ नाहींसें होऊन शांतता कायम ठेवण्याइतके सर्वांचे हितसंबंध महत्त्वपूर्ण राहातील. एवंगुणविशिष्ट आंतरराष्ट्रीय संघटन झालें तर कोणत्याही स्वतंत्र राष्ट्राला भिण्याचें कारण नाहीं. घटक राष्ट्रांचे संमतीशिवाय त्यांचे सरहद्दींत फेरफार होणार नाहींत. लोकांच्या इच्छेविरुद्ध वागण्याचा परिणाम काय होतो, याचा चांगलाच अनुभव सर्वांना आला आहे. सक्तीनें केलेलें कार्य टिकत नाहीं एवढेंच नव्हे तर त्यानें तीव्र प्रतिक्रिया उत्पन्न होते. संमतीवर आधारलेल्या निर्णयांना शाश्वति जास्त आहे हें जाणण्याचें शाहाणपण आजच्या जगांतील मुत्सद्यांना खास आहे. दोन महायुद्धांतून जर एवढा अनुभव पटला नाहीं तर तिसरें महायुद्ध निश्चित आहे. राष्ट्रांनीं आंतरराष्ट्रीय संघटन निर्माण करून त्याला प्रभावी न केले तर तिसरें महायुद्ध अटळ आहे. असल्या संघटनाचे अभावीं संरक्षणासाठीं प्रत्येक राष्ट्राला कायम युद्धाचे तयारीनें राहावें लागेल युद्धांत उपयोगीं पडावे म्हणून साथीदार गांठून अलग अलग संघ करावें लागतील, कांहीं साम्राज्यसंघ राहातील, कांहीं प्रादेशिक संघ राहातील. लहान लहान राष्ट्रांना नाममात्र स्वातंत्र्य मान्य करून या नाहीं त्या संघांत संरक्षणासाठीं जावें लागेल. आंतरराष्ट्रीय राजकारण भावी युद्धाचे दृष्टीनें पावलें टाकतील. जगांतील प्रमुख प्रमुख सत्ता राजकारणांत तोल राहावा म्हणून डावपेंचानें वागून भूमिका घेतील व शेवटीं तोल जाऊन पुनः एकदां जागतिक युद्धाचा वणवा पेटेल व त्यांत कोट्यवधि माणसें, अगणित संपत्ति व सामुग्री यांचा नाश होऊन, सभ्यता व संस्कृति यांचा लोपहि होईल.

या धोक्यापासून बचाव करण्याचें एकच साधन म्हणजे प्रत्येक राष्ट्र–राज्यानें आपलें प्रभुत्व स्वखुषीनें मर्यादित करून घेऊन आंतरराष्ट्रीय संघटन राज्यसत्ता स्वरूपाचें केलें पाहिजे. राष्ट्रापलीकडे मनुष्याचे निष्ठेवर हक्क सांगणारें कांहीं नाहीं इतकें राष्ट्राला महत्त्व देऊन जगाची शांतता राहाणार नाहीं. स्वतंत्र राष्ट्र व जागतिक शांतता यांतील विरोध अटळ नाहीं. विचारानें, विवेकानें योग्य संस्था व संकेत उभारून त्यांचा परिहार करणें शक्य आहे. मानवी विचारानें धर्मदृष्टीनें एकसमाज कल्पिला, मानव्याचे दृष्टीनें एक मानवसमाज आहे हेंही कल्पिलें, मग

जग हें एक आहे, जगांतील शांतता ही सामुदायिक जबाबदारी आहे, हें त्याला आकलन होत नाहीं हें म्हणणें बरोबर नाहीं. राष्ट्राचें स्वातंत्र्य कायम ठेवून त्याला व्यापक संघटनेंत सन्माननीय सहकार्य करतां येईल अशी व्यवस्था निर्माण करणें मानवी बुद्धीचे आवांक्याबाहेर खास नाहीं. राज्यविषयक क्षेत्रांत स्वायत्तता ठेवून आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत सामुदायिक निर्णय मान्य केल्यानें, राज्याचे प्रभुत्वाला कमीपणा नाहीं. अडचण आजचे जगांत जी आहे ती राष्ट्र-राज्य स्वतः स्वतंत्र राहून राष्ट्राबाहेरील प्रदेशावर राजकीय अंमल गाजवूं इच्छिते ही आहे. जगाचे प्रभावी संघटनेला खरी अडचण साम्राज्यशाहीची आहे आणि साम्राज्यशाही म्हणजे भांडवलशाहीचें राजकीय स्वरूप आहे. भांडवलशाही म्हणजे वर्गनिष्ठ लोकांचें आर्थिक संघटन. त्याचें हितसंरक्षण करण्यासाठीं राज्य झटत असतें. त्यासाठीं लष्कर तें उभारतें. लष्करावर खर्च म्हणजे अनुत्पादक खर्च. परदेशी प्रदेशांवर स्वामित्व म्हणजे साम्राज्य. तें टिकविण्यासाठीं हें सर्व अवश्य, म्हणजे देशांतील जनतेच्या सुखासाठीं, सोयीसाठीं कमी कमी खर्च; साम्राज्य नसल्यास भांडवलवाले नुकसानींत जातील म्हणून साम्राज्य टिकविण्याचे दृष्टीनें परराष्ट्रीय राजकारण चालणें अटळ. राज्यांत लोक नाराज होणें मग अपरिहार्य; लोक नाराज झाले म्हणजे जनता–भांडवलवाले यांच्यांतील लढा अटळ व त्याचा परिणाम भांडवलवाल्यांचा बहुशः जय. मग राज्य लोकसत्तात्मक, लोकशाही स्वरूपाचें राहात नाहीं. वस्तुतः अनियंत्रित झालेलें राज्य मग आणखी साम्राज्य वाढविण्याचे दृष्टीनें वागत जातें, शेवटीं दुसऱ्या तसेंच वर्तन करणाऱ्या साम्राज्याशीं युद्ध अपरिहार्य होतें. आंतरराष्ट्रीय शांततेच्या वातावरणाला खाजगी हितसंबंध याप्रमाणें धोका उत्पन्न करतात. आंतरराष्ट्रीय विचारविनिमयाला साम्राज्यशाही राष्ट्राचे प्रतिनिधि हजर राहिले तरी त्यांची दृष्टि भांडवलशाहीच असते. सायमन व अमेरी यांनीं मँचूरियावरील जपानी आक्रमण योग्य मानलें याचें रहस्य यांतच आहे. आंतरराष्ट्रीय न्याय देणाऱ्या व शांतता स्थापन करणाऱ्या समितीवर असल्या राज्यांचे प्रतिनिधींना जागा देणें म्हणजे कसायांना गोरक्षण समितीचे कार्यवाह करणें आहे. नैतिक कर्तव्य व भौतिक हित यांचा विरोध उत्पन्न झाला असतां माणसें दुसऱ्याचे आहारीं जातात हा अनुभव आहे. म्हणून असा पेंचप्रसंग न येण्याकरितां शक्य तें केलें पाहिजे. राज्य भांडवलशाही असतांना त्याचें आंतरराष्ट्रीय धोरण लोकशाहीचें असणार नाहीं, शांततेचें असणार नाहीं. अशांततेंत भांडवलशाहीचा अभ्युदय असतो तर शांततेंतच लोकशाहीचें संरक्षण असतें. शांततेसाठीं झटणें हें लोकशाहीचें स्वाभाविक लक्षण आहे. जगांत शांतता नांदावयाची असेल तर ती व्यवस्था आंतरराष्ट्रीय संघटनेमार्फतच झाली पाहिजे.

ती व्यवस्था प्रभावी व्हावी यासाठीं संघटनेंत येणारें प्रत्येक राष्ट्र खरें लोकसत्ताक असलें पाहिजे. राष्ट्रांत विषमतापूर्ण समाज असतां, भांडवलशाही प्रभावी असतां, आंतरराष्ट्रीय व्यवहारांत समतेचें तत्त्वज्ञान सदरहू राष्ट्र आणू शकत नाहीं. जीवनाचा प्रभाव विचारावर पडतो, याचा अनुभव येथेंही येतो. साम्राज्यांत रस घेणारें राष्ट्र आंतरराष्ट्रीय व्यवहारांत समता हवी, स्वातंत्र्य हवें असें विचार प्रदर्शित करणें व त्याप्रमाणें वागणें कटीणच. म्हणून जगांत आंतरराष्ट्रीय व्यवस्था प्रभावी होण्यासाठीं, राष्ट्रांतील समाज जो आज वर्गनिष्ठ आहे तो बदलला पाहिजे. राष्ट्राचें राज्य हें वर्गस्वार्थाचें साधन व पाहारेकरी न होतां तें सर्व लोकांच्या हिताचें पालक झालें पाहिजे. सर्व लोकांच्या हिताचा विचार करून चालणारें राज्य म्हणजे समाजसत्तावादी समाजाचें राज्य हें उघड आहे. अन्यत्र कमीजास्त प्रमाणांत वर्गदृष्टीनें आर्थिक प्रश्नांचा विचार होतो. सर्व जगांतील समाज एक व सर्वांच्या हिताच्या दृष्टीनें विचार करण्यासाठीं सर्वत्र एकच समाजसत्तावादी समाज झाला तर तें निःसंशय श्रेष्ठ असें संघटन होईल. पण आज ही अशक्य घटना आहे. केवळ भांडवलवाले आंतरराष्ट्रीय दृष्टीनें संघटन करीत होते, म्हणून समाजसत्तावादही आंतरराष्ट्रीय भूमिकेवरून बोलत होता. चालू युद्धांत जेथें समाजसत्तावाद खरोखर प्रभावी आहे तेथें तो राष्ट्रीय वृत्तीचाच निघाला. समाजसत्तावादाचे भूमिकेवरून आंतरराष्ट्रीय संघटन प्रभावी होईल असें आज तरी वाटत नाहीं. राष्ट्र हें समाजसत्तावादी समाजाचें प्रमाण धरून प्रथम सर्वत्र अलग का होईना, पण तसे समाज निर्माण केलें पाहिजेत व ही समाजसत्तात्मक राज्यें आंतरराष्ट्रीय संघटनेंत आलीं म्हणजे तें संघटन प्रभावी होईल, जगांत शांतता नांदेल, खऱ्या प्रगतीला अनुकूल असें वातावरण निर्माण होईल. कारण व्यापक हितार्थ प्रत्येक राष्ट्र–राज्य आपले प्रभुत्वाला खुषीनें मर्यादा घालील.

आज राष्ट्र–राज्य प्रभुत्वाला मर्यादा घालून घेण्यास तयार नाहीं याचें कारण वर्गनिष्ठ समाज हें आहे. नुसत्या राजकीय समतेनें लोकसत्ता यथार्थ होत नाहीं. आर्थिक समता, आर्थिक लोकशाही झाली म्हणजे राज्य कोणा एकाचे हितार्थ आंत अगर बाहेर झटणार नाहीं. राज्याचें प्रभुत्व कुणाचे खाजगी स्वार्थासाठीं अमर्याद राहावें असें वाटणार नाहीं. सर्वांचे हितार्थ खुषीनें मर्यादा स्वीकारण्यास अडचण येणार नाहीं. वर्गनिष्ठ समाज हा संपत्तीनेंच वर्गनिष्ठ होतो. संपत्तीच्या विषमतेंतच त्याचें रहस्य आहे. विषमता ही द्वेष, मत्सर यांची जन्मभूमि आहे. राष्ट्रांत यांना वाव मिळाला म्हणजे त्याच कारणाकरितां आंतरराष्ट्रीय व्यवहारांत त्यांना वाव मिळतो. राष्ट्रांत ते क्रांति घडवितील तर बाहेर ते महायुद्धें घडवून आणतील. म्हणून राष्ट्रांतील

सामाजिक विषमता दूर होणें हें जगतिक महत्त्वाचें आहे असें म्हटलें तर तें अगदींच चुकीचें ठरणार नाहीं. राष्ट्राची प्रतिष्ठा थोड्या लोकांचे श्रीमंतीवर व वैभवावर नाहीं तर जनतेच्या अभ्युदयावर आहे ! जनतेच्या अभ्युदयासाठीं सामाजिक विषमता नष्ट होणें हें जरूर आहे. आधुनिक जगांत उत्पादन वाढलें म्हणून जनतेचा अभ्युदय झाला नाहीं, तिच्या सुखांत म्हणण्यासारखीं भर पडली नाहीं. व्यापार, उद्योगधंदे मोठ्या प्रमाणावर होऊं लागले, त्यांचे आंतरराष्ट्रीय संबंध अधिक येऊं लागले व अधिक निकट झाले म्हणून जगाची अशी एक बाजारपेठ झालीं हें खरें; परंतु तेवढ्यानें जगाचा एक असा आर्थिक समाज कीं ज्यांत सर्वांचें हित राखिलें जातें असा झाला नाहीं. उलट जेथें भांडवलवाल्यांना आंतरराष्ट्रीय संघटन फायदेशीर वाटलें नाहीं तेथें त्यांनीं राज्याचे मदतीनें अनर्थ घडवून आणलें आहेत. व्यापार-व्यवहार इतके गुंतागुंतीचे झाले आहेत कीं युद्ध करणें परवडणार नाहीं, युद्ध होणार नाहीं असें १९१४ पूर्वीं म्हणणारे विचारवंत होते. राजकारणाचें सुकाणूं आर्थिक नफा हा आहे व मनुष्याचे वर्तनावर त्याच्या भावनेपेक्षां त्याच्या खिशाचा प्रभाव अधिक पडतो म्हणून युद्धें होणार नाहींत असें म्हणणारा नॉर्मन एंजल मागील महायुद्धानें खोटा ठरला. कांहीं लोकांच्या नफ्यासाठीं बहुसंख्यांकांच्या भावनांना चेतवून मागील महायुद्ध झालें. रशिया सोडून बाकी सर्व राष्ट्रांत पूर्वींचीच समाजरचना, वर्गनिष्ठ समाज रचना राहिली व पूर्वींचेंच राजकारण राहून अपरिहार्य असें दुसरें महायुद्ध सुरू झालें. सत्यापेक्षां सत्तेला महत्त्व देऊन मागील महायुद्धानंतरचा तह झाला. अन्यायावर आधारलेली व्यवस्था टिकली नाही व अन्यायाची प्रतिक्रिया द्वेषाचे व सूडाचे वातावरणांत प्रलयकाल आणणारी ठरली. मॅकेव्हिलीला टीकाकार फार, पण अनुयायी असंख्य आहेत. पूर्वीं करावयाचें तें बोलावयाचें नाहीं असा शिरस्ता होता. आतां ग्रंथ लिहून पुढें काय करणार, कसें फसविणार हें आगाऊ सांगण्याचा प्रघात सुरू झाला आहे. बायबलचा पुठ्ठा घालून "राजा" (Prince) या ग्रंथाचीं पानें आंत ठेऊन मुत्सद्दी वागत. आतां तेंही बंधन झुगारून दिलेलें आहे. जें आहे, लुबाडलेलें आहे, तें ठेवणार अशी जाहीर घोषणा आतां होते. ताकद असेल त्यानें घ्यावें, धमक असेल त्यानें बाळगावें हा सिद्धांत दोन महायुद्धांतील कालांत नामवंत झाला. राष्ट्राचें प्रभुत्व कमी न केल्यानें राष्ट्रसंघ याला आळा घालूं शकला नाहीं, व्हर्सायला जें पेरलें तें म्युनिकला उगवलें. निर्बल पण न्याय्य आकांक्षाना घरीं व बाहेर मारून टाकणारें राजकारण जबरदस्तापुढें नमलें, सत्तेनें व शक्तीनें केलेलें चिरकालीन नसतें हा अनुभव पुनः एकदां आला. या महायुद्धानंतर अनुभवानें राष्ट्रें शहाणीं होतीलच असा भरंवसा आज तरी दिसत नाहीं.

मूठभर लोकांच्या स्वार्थासाठीं प्रथम देशांत अन्याय्य विषमता ठेवून मग जगभर युद्ध अटल करण्याचें कार्य जगांत साम्राज्य प्रवृत्तीनें केलें. ती जर युद्धोत्तर जगांत प्रभावी ठरली तर पुनः तेंच घडेल हें उघड आहे. साम्राज्य म्हणजे विषमतेचें बृहत्-स्वरूप आहे. विषमता ही बलानेंच कायम राहाते. अन्यायाचा मोठा पाठिराखा म्हणजे अविवेक, व अविवेक म्हणजे अनैतिक बल, पाशवी बल. जगांत शांतता, विषमता राहून टिकणार नाहीं, बलानें प्रस्थापित केलेली शांतता भावी युद्धाची नांदीच ठरते. जगांत शांतता राहाण्यासाठीं विषमता प्रथम नष्ट केली पाहिजे व शांतता राखणाऱ्या आंतरराष्ट्रीय संघटनेला सत्ता देऊन सत्तेचा उपयोग जगांत किमान होईल अशी व्यवस्था केली पाहिजे. युद्धाशिवाय प्रश्न सोडविण्याचा हा एकच मार्ग आहे. युद्धानें युद्ध नष्ट होणार नाहीं. युद्ध होण्याचीं कारणें नष्ट झालीं म्हणजे युद्धें होणार नाहींत. युद्ध म्हणजे मानवी सद्‌गुणांना उत्कर्षाप्रत नेणारी, मानवाला पूर्णता देणारी घटना होय असें मानणारें तत्त्वज्ञान ज्यांच्या नशिबाला युद्ध येतें त्यांच्या अनुभवाशीं तें जुळत नाहीं. लास्की म्हणतो, युद्धाचें आकर्षण हें वारांगनेच्या विकत घेतलेल्या प्रेमाप्रमाणें आहे. अनुभवानें त्यांतील वैफल्य कळून येतें. जे युद्ध घडवून आणतात ते दूरच राहातात. रणक्षेत्रांत लक्षावधि लोक मृत्युमुखीं पडतात. वांचलेलें बहुतेक मनानें अगर शरिरानें पंगु बनतात. विमानी हल्ले, उपासमार, यांनीं लक्षावधि लोक देशांतच बळी पडतात. जे कातडी बचावून राहातात व नफेखोरी करून कमावतात ते नैतिकदृष्ट्या पतितच राहतात. लढाईनंतर पुनः द्वेष, मत्सर, सूडादि भावना कायम राहातात. जे जिंकतात ते हरतात व जे हरतात ते नष्ट होतात व इतकें करून प्रस्थापित झालेली शांतता दोन युद्धांतील स्वल्पविरामच ठरते. युद्धाचा वारसा निराशा व नाश असेंच आढळून येतें.

या सर्व अनर्थांचें मूळ राष्ट्र-राज्याचें प्रभुत्व सर्वसत्ताधीश व अमर्याद ठेवण्याची इच्छा व हक्क हें आहे. या राज्याला बिनशर्त निष्ठा देणें हें व्यक्तीचें, राष्ट्राचे व जगाचे दृष्टीनें धोक्याचें आहे. राज्यावरील निष्ठा तें राज्य आहे म्हणून व्यक्तीनें द्यावयाची नाहीं, तर तें काय करतें यावर ती अवलंबून आहे. सांगीव हेतूवर ती अवलंबून नाहीं, तर राज्याचे कार्याचा जो अनुभव व्यक्तीला येईल त्यावर ती अवलंबून आहे. व्यक्तीची निष्ठा ही राज्याचे आदर्शावरील निष्ठा आहे. ते आदर्श ती मान्य करते म्हणून निष्ठा ही तेथें नैतिक ठरते. सदरहू आदर्श राज्यानें अनुभवांत आणून दिले पाहिजेत ही तिची अपेक्षा असते व राज्य जोंपर्यंत त्या दृष्टीनें कार्य करीत असेल. तोंपर्यंत त्याच्याशीं सहकार्य करणें, नव्हे त्या कार्यांत आत्मसमर्पण

करणें हें व्यक्तीचें परमकर्तव्य आहे. राज्य आदर्शाप्रमाणें वागत नसेल तर तें तसें वागेल अशी सक्ति, असा प्रभाव त्यावर पाडणें हें त्यांतील नागरिकांचें काम आहे. नागरिक जितके दक्ष, विवेकी तितके हें काम त्यांचे हातून जास्त होईल हें उघड आहे. भांडवलशाही समाजव्यवस्थेत राज्याचें प्रभुत्व भांडवलवाल्यांचे नफ्याकरितां, हितसंबंध राखण्याकरितां अमर्याद राहाणें, सत्ताधीश राहाणें अपरिहार्य आहे. कारण भांडवलवाल्यांचे हितसंबंध शेवटीं युद्ध करून रक्षिणें जरूर होतें. राज्याचा आदर्श कांहींही असला व प्रत्यक्ष त्याचें कार्य म्हणजे भांडवलशाही कायम ठेवणें हेंच असलें म्हणजे, त्याचें आंतरराष्ट्रीय धोरण शांततेचें असणार नाहीं. युद्ध हें एक शस्त्र, राष्ट्राचें म्हणजे भांडवलवाल्यांचें हितसंरक्षण करणारें आहे असें तें मानील आणि म्हणून राज्याचें प्रभुत्व कमी करून आंतरराष्ट्रीय संघटनेला प्रभावी तें होऊं देणार नाहीं. राष्ट्र-राज्याचें प्रभुत्व व आंतरराष्ट्रीय व्यवस्था यांच्यांतील विरोध म्हणजे वस्तुतः भांडवलशाही व आंतरराष्ट्रीय व्यवस्था यांच्यांतील विरोध आहे. आंतरराष्ट्रीय व्यवस्था मान्य करणें म्हणजे विवेकाला मान्यता देणें आहे. बेजबाबदार व बेगुमान वागून सत्तेचे जोरावर हक्क सांगणें अगर पाहिजे तें मिळविणें हें आंतरराष्ट्रीय व्यवस्था प्रभावी झाली तर अशक्य होईल म्हणून ती प्रभावी न होऊं देण्यांत भांडवलशाहीचें हित असतें. राष्ट्र-राज्याचे प्रभुत्व भांडवलशाहीला याप्रमाणें उपयुक्त असतें व असा तिचा अनुभव; आहे म्हणून, तिचा आंतरराष्ट्रीय व्यवस्थेला विरोध आहे. पण हा विरोध बहुसंख्यांक लोकांना दिसून येत नाहीं; त्यांच्या राष्ट्रीय भावना चेतवून युद्धाला प्रवृत्त केलें जातें व तरुण पिढीच्या चितेवर भांडवलशाही आपल्या पोळ्या भाजून घेते. लोकांचें अज्ञान हेंच युद्धाचें, कलहाचें मोठें कारण आहे व लोकांच्या अज्ञानाचा फायदा घेऊन स्वार्थी गट आपलें कार्य साधीत असतात. व्यक्तीनें समाज स्वीकारला यांत व्यक्तीचें अकल्याण झालें नाहीं. व्यक्ति लहान लहान नगरराज्यांतून व्यापक राष्ट्र-राज्यांत आले म्हणून तिचें अकल्याण व्हावें असें नाहीं. आज तसें होत असेल तर त्याचें कारण जेवढी दक्षता नगरराज्यांत नागरिक घेत तेवढी घेतली जात नाहीं हें आहे. राज्याचे विस्ताराबरोबर नागरिकांनीं आपली दक्षता वाढविली पाहिजे. जागृत व दक्ष नागरिक असले म्हणजे राष्ट्र राज्यांत येण्यानें व्यक्तीचें अकल्याण होण्याचें कारण नाहीं. नागरिकांना वस्तुस्थितीचें ज्ञान झालें पाहिजे, दिलें पाहिजे. विवेकानें वागण्यानें समाज टिकतो, राष्ट्र टिकतें व जगाची शांतताही टिकूं शकते हें लोकांना ज्ञान झाल्यानें कळून येणार आहे. वहातुकीचीं विशेष साधनें नसतां जगाच्या एकतेची कल्पना प्राचीन काळीं मानवी विचारानें केली आहे. मानवसमाज एक आहे

हें उदात्त तत्त्व कोणी अमान्य करीत नाहीं. आज तर आर्थिकदृष्ट्या जग एक आहे अशी परिस्थिति आहे. जगाची जी एकी धर्म करूं शकला नाहीं ती करण्याची पात्रता आज आर्थिक व्यवहारांत आली आहे. व्यक्ति, राष्ट्र, जग हें एका संघटनेंत आणण्याचें सामर्थ्य आज उपलब्ध आहे मानवी विचार अव्यवस्था, अस्वस्थता उत्पन्न करूं शकतात, पण त्याचबरोबर व्यवस्था व शांतताही उत्पन्न करूं शकतात. आतां राज्य ही कांहीं थोड्या लोकांची मिरास राहिली नाहीं. सर्व जनतेचा तो वारसा आहे आणि विवेकानें सर्व जनतेनें तो वापरला तर आंतरराष्ट्रीय व्यवस्था प्रभावी होऊन जगांतील सर्व दुःख व दारिद्र्य नाहींसें होईल व 'अष्टस्वातंत्र्यें' जीं आज अशक्य वाटतात तीं शक्य होतील.

---

# : राज्य व अधिकार :

आधुनिक राज्याचा हेतु काय असावा व तो साध्य होण्यासाठीं नागरिकांना कोणते हक्क असावेत, समता व स्वातंत्र्य हे आधुनिक राज्यांत किती अवश्य आहेत, संपत्ति व स्वामित्व यांचें स्वरूप काय राहावें, राज्याचें आंतरराष्ट्रीय स्वरूप व कार्य कोणतें असावें वगैरे विषयांची चर्चा येथपर्यंत केली. सदरहू चर्चेंत जें स्वरूप इष्ट म्हणून प्रतिपादिलें आहे त्यांतील अधिकाराचें स्वरूप त्याच दृष्टीनें कसें असावें याचा अधिक विचार करणें योग्य होईल. राज्य व राज्यसत्ता या दोन पृथक् वस्तु आहेत व राज्यसत्ता म्हणजे कांहीं अगम्य अगर अपौरुष असें कांहीं नसून तिचें स्पष्ट व स्थूल स्वरूप म्हणजे जे ती चालवितात तीं माणसें हें होय ही गोष्ट आतां पर्यंतच्या विवेचनांत स्पष्ट झाली आहे. राज्याचा हेतु राज्यसत्तेमार्फत मनुष्यांनीं, अर्थात् कांहीं मनुष्यांनीं अधिकार चालवून, सत्ता चालवून सफल करावयाचा असतो. कायद्यानें ही सत्ता थोड्या माणसांचे हातीं असणें अपरिहार्य आहे. विस्तृत अशा आधुनिक राज्यांत प्रत्यक्ष सत्ता चालविणें सर्व लोकांना शक्य नाहीं म्हणून कायद्यानें ती थोड्या लोकांचे हातांत दिलेली असते. प्रत्यक्ष सत्ता अगर अधिकार कोण चालवितो. किती जण चालवितात हा प्रश्न कमी महत्त्वाचा असून तो अधिकार कसा चालविला जातो, त्याचें निर्णय हे केवळ एखादा दुसऱ्या व्यक्तीच्या इच्छेचें व अभिप्रायाचें प्रतिबिंब आहे का जास्तींत जास्त लोकांच्या अनुभवांवर व अभिप्रायांवर ते आधारलेले आहेत हा प्रश्न मुख्य व अधिक महत्त्वाचा आहे. राज्य म्हणजे नागरिकांव्यतिरिक्त व बाह्य अशा सत्तेचें स्वरूप नाहीं. राज्याचें प्रभुत्व म्हणजे त्यांतील नागरिकांचेंच प्रभुत्व आहे. म्हणून राज्यकारभारासाठीं दिलेली सत्ताही पण त्याच स्वरूपाची म्हणजे लोकांकडून मिळालेली. कायद्यानें ती थोड्यांचें हातीं आली असली तरी तिचा पिंड लोकसंमतीचा आहे. जेवढें लोकमत, जेवढा लोकांचा अनुभव तिच्या निर्णयांत ग्रथित होईल तेवढ्या प्रमाणांत ती यथार्थ आहे. लोकांच्या अनुभवाला जुळवून जेवढा अधिकार वापरला जाईल तेवढाच योग्य मानला पाहिजे; किंबहुना ही त्याची

मर्यादा मानली पाहिजे. अधिकाराचें वस्त्र, लोकांचा अनुभव व अभिप्राय या तंतूतून निर्माण झालें पाहिजे. या क्रियेनें त्याची प्रत व प्रमाण मान्यता पावतें. असें घडून यावयाचें म्हणजे लोकसंमतीचा अर्थ अधिक व्यापक करावा लागेल, प्रातिनिधिक संस्थाविषयक संकेत अधिक विस्तृत करावे लागतील. आज राज्य लोकसंमतीनें चाललें आहे याचा अर्थ केवळ तत्त्वदृष्ट्या तसें चाललें आहे येवढाच होतो. अमुक मनुष्यांनीं कारभार चालवावा असें निश्चितपणें लोक क्वचित्‌च सांगतात. तसेंच त्यांनीं केलेले कायदे अनेक वेळां लोकमताशीं व लोकांचे अनुभवांशीं जुळत नाहींत. किंबहुना त्यांच्या गरजा व अडचणी दूर करण्याचे दृष्टीनें ते अपुरे पडतात. त्याबरोबर हेंही खरें कीं, लोकांचे अनुभव पाहून, खरें लोकमत हेरून, त्यांचें संकलन करून, त्याचें स्पष्टीकरण करून त्याला मागण्याचें स्वरूप देऊन राज्यसत्तेपुढें पद्धतशीर रीतीनें नेहमींच ठेवलें जातें असेंही नाहीं. लोक स्वस्थ बसले, कांहींही मतप्रदर्शन न झालें तर लोकांची संमति आहे असा सरळ अर्थ आज काढण्यांत येतो. पुष्कळ वेळां लोकांना काय होत आहे हें जाणण्याची इच्छा असते पण त्यांना माहिती दिली जात नाहीं अगर अपुरी दिली जाते. सत्यापेक्षां प्रचार, माहितीपेक्षां मतेंच त्यांचेपुढें येतात. अनेक प्रसंगीं लोक अज्ञानामुळें, आळसामुळें, उदासीनतेमुळें काय पाहिजे आहे, आपलें म्हणणें काय आहे हें सांगत नाहींत. या स्थितींत त्यांची संमति आहे हें मानणें उघड उघड गैर आहे. कांहीं वेळां लोक संमति देतात म्हणजे इतकेंच कीं, ती राज्यसत्तेवर सक्तीच होते आणि याही परिस्थितींत तिला संमति मानणें चुकीचें आहे. वस्तुस्थिति लक्षांत घेऊन, सारासार विचार करून समन्वित झालेली ती लोकांची इच्छा नसून भावनेच्या वातावरणांत बेभान होऊन केलेली घोषणा असते. कांहीं वेळां एका गोष्टीची संमति घेऊन लोकांना अनपेक्षित व अकल्पित असें पण राज्यसत्ता जाणूनबुजून दुसरेंच घडवून आणते. या स्थितींत जें घडून आलें त्याला संमति होती असें म्हणणें गैर आहे. नागरिकस्वातंत्र्य मर्यादित करणारे अगर नष्ट करणारे कायदे हे या प्रकारचें मोठें उदाहरण आहे. संमतीच्या अर्थाचा अनर्थ करून अनेक गोष्टी आज होतात व लोकशाहीचे नांवावर त्या खपविण्यांत येतात.

वरील परिस्थिति सर्वत्र अनुभवास येत असल्यामुळें संमति व लोकसंमति म्हणजे यथार्थपणें काय हें इष्ट आहे. लोक मूठभर राज्यकारभार करणारे यांचें ऐकतात म्हणून जें होत आहे त्याला लोक राजी आहेत हें मानणें चूक आहे, घातुक आहे. समाजधारणेसाठीं आज्ञा देणारे व आज्ञा पाळणारे पाहिजेत व आज्ञाधारकत्वही अवश्य आहे. पण याचा अर्थ असा नव्हे कीं, प्रत्येक आज्ञा पाळली पाहिजे अगर पाळलेली

आज्ञा योग्य आहे अगर आज्ञाधारकत्व म्हणजे यथार्थसंमति. चार लोक मानतात म्हणून आपण मानावें ही गतानुगतिकत्वाची बुद्धि कांहींच्यांत असते. कोणी मोठा मनुष्य सांगतो आहेना, तो शहाणा आहे म्हणून त्याचें मानावें असे मानणारे कांहीं असतात. हजारों वर्षें राज्यसत्तेचें मानावें ही संवयच झालेली असतें म्हणूनही आज्ञाधारकत्व येतें. आळस, उदासीनता यामुळें कांहीं व शिक्षेचे भीतीनें कांहीं आज्ञाधारक बनतात. संमति ही अखेरीस राज्याचा आधार आहे ही गोष्ट मागें विवरण करतांना स्पष्ट केली आहे. शिक्षेचे भीतीनें श्रद्धा कधींही हतबल होत नाहीं. लोकांना मर्यादेबाहेर असह्य झालेली राज्यसत्ता टिकत नाहीं. जोंवर टिकत आहे, तोंपर्यंत तिला कांहींना कांहीं प्रमाणांत संमतीचा आधार आहे असें म्हणणें प्राप्त आहे. अपेक्षिलेल्या गोष्टींपैकीं कांहीं तरी कांहीं प्रमाणांत होत आहे म्हणून लोक विरोध करीत नाहींत. लोकांचे प्रभुत्व अबाधित ठेवण्याचे दृष्टीनें अज्ञानमूलक अगर उदासीनताप्रधान आज्ञाधारकत्व नष्ट झालें पाहिजे. सत्तेचे संमतीवर कारभार न चालतां संमतीचे शक्तीवर तो चालला पाहिजे. आजचा कारभार व कायदे लोकांचे विचारांशीं, लोकांच्या अनुभवांशीं, त्यांच्या परिस्थितीशीं सुसंवदी असत नाहींत. कारभार हांकणारे, कायदा करणारे तज्ज्ञ असतात, काय हवें आहे, काय परिस्थिति आहे हें ते ठरवितात व तें ठरवितांना त्यांचा अनुभव, त्यांचा दृष्टिकोन प्रभावी ठरतो, त्यांच्या निर्णयांत त्यांचाच रंग भरला जातो. हरिजनवस्तींतील दुःखें तेथें क्षणभर राहून समजणार नाहींत. दिवसभर गिरणींत काम करतांना शरिराला किती थकवा येतो, मन किती उदास होतें, हें केवळ गिरणींत चार तास घालवून कळणार नाही. मनुष्याला त्याचे परिस्थितीचा काय अनुभव येतो, कसा येतो हें त्याचा तोंच खरोखर सांगूं शकतो, पाण्यांत मासा कसा राहातो हें मनुष्याच्या कसें अनुभवास येणार? दुःख अनुभवल्यानें दुःख कळत असतें, वर्णनें वाचून अगर केवळ साक्षीभूत होऊन कळत नाहीं. जें विशिष्ट परिस्थितींत मनाला वाटतें, अनुभवाला येतें तें कांहीं तिन्हाइताला मोजतां येत नाहीं. पगारकाट झाली अगर ताळेबंदीची नोटीस लागली याचा धक्का कामगारांचे मनावर किती बसतो याचें मोजमाप करण्याचें थर्मामीटर नाहीं. कचेरींत पंख्याखालीं निर्जीव आंकड्यापासून सचेतन असें कांहीं निर्माण होऊन आत्मकथा सांगत नसतें. संप करणें बेकायदेशीर ठरविण्यांत मजुरांचा अनुभव ग्रथित झालेला नसतो. अधिकारी व तज्ज्ञ यांना त्यांच्या गैरसोयीचा, समाजांत होणाऱ्या अस्वस्थतेचा आलेला अनुभवच तेथें ग्रथित झालेला असतो. ते आपल्या अनुभवाच्या अनुरोधानें परिस्थितीचा अर्थ लावतात म्हणजेच तिचा विपर्यास होतो, यथार्थपणें तिचा

अर्थ लावला जात नाहीं आणि म्हणून जेवढ्या प्रमाणांत कायदा अगर कारभारांतील कार्य अशा विपर्यस्त अर्थावर आधारलेलें असेल तर तेवढ्या प्रमाणांत त्याला खरी-खुरी मान्यता मिळाली, खरीखुरी संमति मिळाली असें म्हणतां येणार नाहीं. सत्तेचे जोरावर त्याचा प्रसार जरी झाला तरी मान्यता त्याला मिळाली असें कधींही म्हणतां येणार नाहीं. मजूर जिवंत राहाण्याइतकें तरी मिळावें म्हणून मागणार व मालक कमाल नफा मिळावा म्हणून प्रयत्न करणार. या परिस्थितींत एकमेकांना एकमेकांचे परिस्थितीचा विचार करण्यास सांगणें हास्यस्पद आहे. तिऱ्हाईत इसम दोघांच्याही परिस्थितीचा अनुभव यथार्थपणें मनापुढें उभा करूं शकत नाहीं. दोघेही कांहीं मार्ग काढण्याचें इच्छेनें एकत्र आले तर निदान एकमेकांना एकमेक आपआपल्या परि-स्थितीचा अधिकृत व अनुभवी अर्थ सांगूं शकतील. ज्याच्या त्याच्या अनुभवाचा अर्थ सांगण्याचा हक्क ज्याला त्याला असला पाहिजे. दुसऱ्यानें तो सांगणें चूक आहे. त्याचप्रमाणें हा हक्क सर्वांना सारखा असला पाहिजे. याप्रमाणें ज्यानें त्यानें हा आपला हक्क बजावून एखादी गोष्ट मान्य केली तर ती मान्यता खरी, ती संमती यथार्थ समजली पाहिजे. आज राज्यांत जेव्हां न्याय एकमेकांविरुद्ध मागण्यांत येतो तेव्हां तो बहुशः मागणाऱ्यानांच एकतर्फी हवा असतो. संरक्षक जकाती पाहिजेत. त्याशिवाय राष्ट्रांतील उद्योगधंदे निकाल लागतील ही ओरड करतांना गिऱ्हाइकाला वस्तु महाग मिळतील याचा विचार ओरड करणारे करीत नाहींत. आंतरराष्ट्रीय व्यवहारांत आक्र-मकांना हाणून पाडण्याची मागणी करतांना, मागणी करणारांचें पूर्वींचे आक्रमण विसरलेलें असतें. न्याय मागतांना स्वतः दुसऱ्यांना न्याय देण्याची इच्छा नसते. ज्यांचा ज्यांचा संबंध येतो त्या सर्वांना आपलें म्हणणें आपलें अनुभव मांडण्याचा व निर्णयांत भाग घेण्याचा सारखा हक्क असला म्हणजेच खराखुरा न्याय शक्य आहे, मग होणाऱ्या निर्णयाला खरी मान्यता व प्रामाण्यता आहे, तेथेंच खरी संमति आहे. ज्या निर्णयांत आपला अभिप्राय व अनुभव ग्रथित झाला नाहीं किंबहुना विचारांतही घेतला जात नाहीं ते निर्णय संमतिविरहीत आहेत म्हणून ते बंधनकारक असूं शकत नाहींत. कायदे-शीर निर्णय आहे म्हणून कांहीं तो सयुक्तिक अगर नैतिकदृष्टया योग्य ठरत नाहीं. विधियुक्त म्हणजे नीतियुक्त असें निरपवाद गणित नाहीं.

ज्यांच्यावर राज्यकारभाराचा परिणाम होणार आहे, ज्यांचे हितसंबंध राज्य-सत्तेचे निर्णयानें कमीजास्त होणार आहेत त्या सर्वांच्या संमतीनें राज्यकारभार चालणें अगर निर्णय घेतले जाणें याचाच अर्थ स्वराज्यसंमति घ्यावी असें म्हटल्यानें दोन पक्ष कल्पिले जातात हें खरें आहे. लोकसत्तात्मक राज्य अगर लोकशाही राज्य

याचा अर्थ सर्वांचें राज्य पण थोड्यांनीं चालवावयाचें मालक व मुकत्यार यांत जेवढें द्वंद्व आहे तेवढेंच लोक व राज्यकारभार चालविणारे यांच्यांत आहे. या द्वंद्वाचा परिहार संमतीच्या तंत्रानें होत असतो. राज्य व नागरिक यांची मौलिक एकी व्यवहारांत टिकविण्यासाठीं संमति अगर मान्यता हा एकमेव मार्ग आहे. आपण केलेले कायदे आपण एकावयाचे हा लोकशाहीचा सिद्धांत संमतीचे मंत्रानें सिद्ध होत असतो. लोकांच्या संमतीनें जें विधियुक्त असेल तें नीतियुक्त होतें. मुकत्याराचा मालकाशीं जो संबंध तोच त्याचें अधिकाराचा आधार त्या संबंधाला अनुसरून अधिकाराचा उपयोग तो करतो. संबंध या सूक्ष्म कल्पनेचें अधिकार हें कार्य आहे. आई व मूल यांच्यांतील संबंधाचें वात्सल्य हें स्वरूप आहे. राज्यांतील सत्ता चालविणारा अधिकार म्हणजे राज्य व नागरिक यांच्यांतील संबंधाचें स्पष्ट स्वरूप अगर त्याचें कार्य म्हणून अधिकाराचें प्रामाण्य हें वरील संबंध कसे आहेत, कसे संघटित झाले आहेत यांवर अवलंबून आहे. मुकत्याराचा अधिकार योग्य अगर अयोग्य हें त्याचें मालकाशीं जसे संबंध असतील त्याप्रमाणें असणार. व्यवहारांत मुकत्याराला कुलअधिकार आधीं दिलेले असतात व प्रत्येक व्यवहाराबाबत त्याला मालकाला विचारावें लागत नाहीं. त्यांचे संबंध एकदम एकाच वेळीं निर्माण झालेले असतात व त्यांच्यांत बदल क्वचितच होतो. मुकत्यारपत्र रद्द केल्यानें संबंधच संपतात. राजकारणांत ज्या संबंधांवर अधिकार आधारलेला आहे, ते सारखे बदलत असतात, राज्यकारभारानें ते बदलत असतात व केलेल्या कार्यानेंही ते बदलतात. कामाचे तास मर्यादित केल्यानें, किमान वेतन ठरविल्यानें, बेकारी—विमा अंमलांत आणल्यानें संबंधाचें स्वरूप बदलतें हें उघड आहे. हें सर्व होण्यापूर्वी कामगार, नागरिक व राज्यसत्ता यांच्यांत जे संबंध होते त्यांत या सर्व सोयी राज्यसत्तेनें अंमलांत आणल्यानें बदल झाला. किंबहुना राज्यकारभारांत जें होतें त्यानें हे संबंध सारखे बदलत असतात. त्याचप्रमाणें असलेल्या संबंधामुळें जें कार्य होतें त्याचाही परिणाम संबंधाचें स्वरूप बदलण्यांत होतो. किमान वेतन मिळण्याचा हक्क कार्य करूं लागला म्हणजे नागरिकांचे संबंधांत फरक पडत जातो. त्याचा पूर्वीचा अनुभव व नंतरचा अनुभव यांत फरक असतो व त्या फरकानुसार तो या संबंधांकडे पाहातो, म्हणजेच संबंधाचें स्वरूप बदलतें. कुठल्याही राज्यसत्तेच्या कृत्यानें हितसंबंधांवर परिणाम झाला कीं त्या हितसंबंधांचें स्वरूप बदलतें. आयातकरानें साखर महाग झाली, प्राप्तिकर वाढविल्यानें नफा कमी झाला, मुलांना कारखान्यांत काम करण्याची बंदी केल्यानें मालकाला स्वस्तांत श्रम मिळेनासे झाले. सरकारी कृत्यानें येवढेंच होतें असें नव्हे. ज्यांचेवर ज्यांचेवर परिणाम झाला त्यांचे त्यांचे

हितसंबंधांत बदल झाला, प्रत्येकाचे अनुभवावर परिणाम झाला. गिऱ्हाइकाला साखर महाग मिळाली म्हणून तो नाराज. त्याचे जीवनावर त्याचा परिणाम कांहीं तरी होणारच व त्या परिणामामुळें आणखी कांहीं बदलही होणार. आयात--कर बदलल्यानें देशांतील साखरेच्या कारखानदारांचे हितसंबंधांवर चांगला परिणाम झाला. त्यांचा धंदा फायदेशीर झाला व तो फायदेशीर झाला म्हणून आणखी कांहीं परिणाम त्यांचे हितसंबंधांवर होणार हेंही तितकेंच खरें. हितसंबंधांचें स्वरूप बदललें म्हणजे नागरिक व राज्यकारभार करणारे यांच्यांतील संबंध बदलतात. होणारे बदल अनेक प्रश्न उपस्थित करतात.

राज्यकारभार म्हणजे अडचणीवर उपाययोजना त्यांतून पुन्हां अडचण, पुन्हां उपाययोजना असा कधींही न संपणारा डाव आहे. ज्या उपाययोजनेंत जास्तीत जास्त अनुभव ग्रथित केले असतील तोच कामचलाऊ ठरतो. म्हणजे त्यांच्यासाठीं उपाय आहे त्यांच्या अनुभवांवर त्याची उभारणी असेल तरच तो टिकाऊ ठरणें संभवनीय असतें. बाहेरील व्यक्तीनें योजिलेले उपाय तिच्या मर्यादित व उपऱ्या अनुभवावर आधारलेले असतात. ज्यांचेवर निर्णय परिणाम करणार त्यांच्या अनुभवाला ते विसंगत असतात म्हणून निर्णय लादले गेले तरी कार्यक्षम होत नाहींत. मान्यतेचे अभावी विसंवादी वातावरण निर्माण होतें, मनुष्यांच्या विधायक प्रवृत्तींना आवाहन देईल अशी शक्ति तेथें उपलब्ध होत नाहीं. होणारे निर्णय निरनिराळ्या ठिकाणीं निर-निराळ्या रीतीनें अंमलांत येतात. कारण स्थानिक अनुभवांचा विचार त्यांत क्वचितच केलेला असतो. अपेक्षेपेक्षां निराळें घडतें. कारण अपेक्षाच मुळीं चुकीच्या व एकांगी माहितीवर व अनुभवावर उभारलेली असते. अंमलांत येतांना निर्णयाचें स्वरूप परि-स्थित्यनुरूप बदलतें येवढेंच नव्हे तर निर्णयाचें हें अनपेक्षित स्वरूप परिस्थितीला अनपेक्षित रीतीनें बदलत असतें. शेतकरी कर्जविमोचनाचे कायद्यानें हातांतरील कर्जा-साठीं जमिनी विकल्या जाऊं नयेत म्हणून केलेली योजना परिणामीं विपरीत ठरली. प्रत्येकाच्या कर्जासाठीं जमिनी गहाण पडूं लागल्या व कर्जविमोचनाऐवजीं कर्ज सुर-क्षित झालें. गहाणाचा हिशेब मुळापासून घ्यावा म्हणून योजना केली, तर सर्व व्यव-हार खरेदीचा होऊं लागला. अपेक्षेप्रमाणें कर्जविमोचन झालें नाहीं तर अनपेक्षित परिणाम म्हणजे शेतकऱ्यांच्या जमिनी सावकारांचे घरांत गेल्या. मर्यादित व उपऱ्या अनुभवावर लिव्हाईत व्यक्तीनें घेतलेल्या निर्णयाचा परिणाम काय होतो याचें हें एक चांगलें उदाहरण आहे. प्रत्यक्ष शेतकरी व सावकार यांना एकत्र आणून, त्यांच्या उभयतांच्या अनुभवांना व अडचणींना जुळणारा मार्ग त्यांनाच काढण्यास सांगितला

असता तर, खात्रीनें शेतकऱ्यांचें कांहीं तरी कल्याण झालें असतें. अडचणींचा अनुभव असणारा मनुष्य अडचणी जाणतो. अन्यायाचा अनुभव असणारा मनुष्य अन्याय जाणतो. म्हणून उपाययोजना होतांना लोकांच्या अनुभवाला अनुसरून ती असणें योग्य आहे. म्हणून उपाययोजना करणारा, कार्य करणारा अधिकार या व्यापक अनुभवांवर आधारलेला असला पाहिजे. केवळ व्यक्ति एखादी गोष्ट स्वीकारते म्हणून तिची संमति आहे, ही अधिकाराची पार्श्वभूमि न राहातां व्यक्तीची अनुभवनिष्ठ बुद्धि ही अधिकाराचा आत्मा असला पाहिजे, तीच खरी संमति होय.

विविध अनुभव व अभिप्राय एके ठिकाणीं आणून त्यांतून दिग्दर्शित झालेल्या अडचणींवर समन्वय करून मार्ग काढणें, उपाय शोधणें ही अधिकाराची खरी भूमिका व खरें कार्य आहे. विविधतेंत, एकता नव्हे पण एकी उत्पन्न करून समुदायाची समन्वित बुद्धि ( Common will ) घडवून आणणें म्हणजेच लोकशाही यशस्वी करणें आहे. प्रगति प्रत्येकानें पृथक् राहण्यानें अगर समाजाकडून वाटेल तसें घेण्यानें होत नाहीं, तर समुदायांत राहण्यानें व आपला भाग, आपलें उत्कृष्ट जें असेल तें समाइकींत देण्यानेंच होते. सर्वांचा अनुभव संकलित करून प्रगति शक्य करावयाची असते. राज्यकारभारांत हें संकलन जेथें चांगलें होतें तेथें तो यशस्वी होतो, तेथें अधि-काराला खरी संमति प्राप्त होते. अधिकाराला आधारभूत असलेले नानाविध अनुभव व तद्विषयक संबंध हे मागें सांगितल्याप्रमाणें सारखे बदलत असतात, म्हणून संकलन करण्याची क्रिया सारखी चालू असणें जरूर आहे. तशी ती चालू असली म्हणजे राज्यकार्याला नैतिक अधिष्ठान मिळत राहातें, विधियुक्त तें बहुतेक नीतियुक्त राहातें. कायदा हा थोडा तरी अनुभवामागें, लोकमतामागें रेंगाळणारच. परंतु शक्य तितका तो लोकमताप्रमाणें करण्यांत राज्याची नैतिक प्रतिष्ठा वाढत असते. कायद्याबद्दल आदर दाखविला जाईल याची ग्वाही कोणी घेऊं शकत नाहीं. व्यक्तीचे अनुभवाविरुद्ध तो गेल्यास त्याचे सदसद्विवेकबुद्धीचें विरुद्ध तो असल्यास त्याचे श्रद्धेवर तो आघात करीत असल्यास, व्यक्तीला तो अमान्य करण्याचा पूर्ण नैतिक हक्क आहे. नापसंतीचें क्षेत्र शक्य तितकें कमी होण्याचे दृष्टीनें जास्तींत जास्त लोकांच्या अनुभवांवर राज्यकार-भाराचें कार्य व कायदे आधारले पाहिजेत. भीतीनें नव्हे तर आपल्या संमतीवर कार्य चाललें आहे, कायदे होत आहेत म्हणून ते मानले पाहिजेत असें जास्तींत-जास्त लोकांना वाटलें पाहिजे. सर्वांची एक जिनसी मान्यता मिळेल हें शक्य नाहीं. कारण भिन्न प्रवृत्तींचीं माणसें असतात. कोणाच्या मनांत काय कळ उठेल हें कोणीं सांगावें ! आपल्या अनुभवाविरुद्ध आपल्या श्रद्धेविरुद्ध होत आहे अशी खात्री अस-

त्यामुळें लोक प्रतिकाराला तयार होतात. राज्यसत्तेच्या विरोधाला शासन हें अटळ आहे म्हणून तें दिव्य स्वीकारणारांची भूमिका येरागबाळांची नसते. त्यांची श्रद्धा, त्यांचे आदर्श, त्यांचा विरोध हें नैतिक कर्तव्य आहे म्हणून जागृत करीत असतात, स्फूर्ति देत असतात, त्यागांत आत्मसन्मान व मृत्यूंत अमरत्व आहे हा दिव्य संदेश ते देत असतात.

नागरिक व राज्यसत्ता यांत विरोध उत्पन्न होऊं नये म्हणून राज्यकारभार व कायदे हे जास्तींत जास्त लोकांच्या अनुभवांवर, अभिप्रायांवर आधारणें अवश्य आहे हें वर सांगितलें. संमति म्हणजे अभावात्मक स्वरूपाची गोष्ट नव्हे तर अनुभवाचे वाचेनें ती दिली जाऊन, तिचा विचार होऊन होणाऱ्या निर्णयांत ती समाविष्ट झाल्याचा विश्वास म्हणजे संमति. तिचें स्वरूप क्रियात्मक ( Active ) असलें पाहिजे. आज्ञाधारकत्व हें अधिकाराचा आदेश न राहातां संमतीचें लक्षण झालें पाहिजे आणि जर ही संमति प्रभावीं करावयाची असेल तर राज्यकारभरांतील प्रत्येक कृत्य नागरिकानें दक्षतेनें पाहून, तपासून स्वीकारलें पाहिजे. संमतीच्या हक्काबरोबर दक्षतेचें कर्तव्य येतें. हें कर्तव्य योग्य प्रकारें होण्यासाठीं, नागरिक सुबुद्ध व सुशिक्षित असला पाहिजे, येवढेंच नव्हे तर उपस्थित प्रश्नाबद्दलची सर्व माहिती त्याला मिळाली पाहिजे. पुष्कळ वेळां खरोखर पुरेशी माहिती दोन्ही पक्षांना नसते, येवढेंच नव्हे तर खरोखर वादाचा प्रश्न नक्की काय आहे त्याचें स्वरूपपण पूर्णपणें त्यांना आकलन झालेलें नसतें. वस्तुस्थिती काय आहे याबद्दलसुद्धां वाद असतो. एकाची माहिती दुसरा मान्य करीत नाहीं मग अनुमानें तरी कशी मान्य होणार ? या परिस्थितींत उपस्थित प्रश्नाला प्रस्तुत असलेली सर्व माहिती, सर्व वस्तुस्थिती ही दोघांचे पुढें सत्य स्वरूपांत येणें जरूर असतें. या दृष्टीनें माहिती गोळा करणारें, वस्तुस्थितीचें इतिवृत्त देणारे, हें तिऱ्हाईत असणें व तज्ज्ञ असणें इष्ट असतें. मालक व मजूर यांच्या वादांत प्रत्येकानें पुरविलेल्या माहितींत सत्याबरोबर मतांची, अनुमानांची गल्लत असते. म्हणून मत व माहिती पृथक् करून, अनुमानें वस्तुस्थितींतून बाजूला काढून निर्भेळ व निरपवाद अशी वस्तुस्थिति ( Facts ) पुढें मांडणारा तज्ज्ञ हवा असतो. त्यानें निर्णयाला अवश्य अशी सर्व माहिती पुरविली पाहिजे. पण निर्णय त्यानें द्यावयाचा नाहीं. निर्णय हा पक्षकारांच्या अनुभवांतून व अभिप्रायांतून निर्माण झाला पाहिजे कारण तेथें संमतीचा विश्वास उत्पन्न करावयाचा असतो. तिऱ्हाइतानें अगर तज्ज्ञानें निर्णय कांहींही दिला तरी त्याचे मुळाशीं त्याचा अनुभव अधिक प्रभावी झाले असणार व तो अनुभव उपरा व उसना असल्यामुळें निर्णय कुटल्या तरी एका बाजूस झुकणें जास्त

संभवनीय असतें. निर्णयाची जबाबदारी पक्षकारावर टाकण्यानें होणारा निर्णय अधिक टिकाऊ व अधिक स्वीकार्य होतो. म्हणून माहिती गोळा करण्याचें, वस्तुस्थितीचें कथन तयार करण्याचें काम एकाचें व निर्णय करण्याचें काम प्रश्नाशीं संबंध येणाऱ्या व्यक्तींचें असलें पाहिजे. माहिती गोळा करतांना, आंकडे तयार करतांना, वस्तुस्थिति निश्चित करतांनासुद्धां दक्षता घेणें जरूर आहे. राज्यकारभारांत अधिकारी माहिती गोळा करतात पण ती गोळा करतांनासुद्धां कारवाई करतां येते. गुत्ता एखादे ठिकाणीं घडावा कीं नाहीं याबाबत लोकमत काय आहे हें पाहतांना अधिकारी कुणाचें मत घेतात हें पाहिलें पाहिजे. कर बसवितांना तो किती सह्य होईल हें ठरवितांना फडणीस कुणाचें मत प्रमाण मानतो हें पाहिलें पाहिजे. लोकमताचें निदर्शक म्हणून काना-कोपऱ्यांत निघणाऱ्या वर्तमानपत्राचे दाखले दिले जातात. लोकमत आपले बाजूस आहे हें दाखविण्यासाठीं कित्येकांना राज्यसत्ता शिराळशेटी पुढारीपण व महत्त्व देत असते. तसेंच भांडवलवाले यांच्या पकडींत जर देशांतील वृत्तपत्रें असतील तर तीं मोठ्या प्रमाणानें खपून, पण खरें लोकमत दर्शविणार नाहींत. सरकारी खात्यांतून तयार केलेलीं वस्तुस्थितीचीं कथनें अगर गोळा केलेले आंकडे, संकलित केलेली माहिती, ही नेहमीं व सर्वस्वीं संशयातीत असत असें मानणें चुकीचें आहे. उलट त्यांत प्रचाराचा, विशिष्ट मतप्रणालीचा रंग अनेक वेळां नजरेस पडतो. कार्याच्या सतत अनुभवानें आपल्याला तज्ज्ञांचा अधिकार प्राप्त झाला आहे असा अहंकार नोकरशाहीचा सर्वत्र दिसून येतो. वस्तुतः लोकांना काय हवें आहे, लोकांच्या अनुभवांशीं काय जुळतें हें त्यांच्यापेक्षां लोकांतून येणारे त्यांचे प्रतिनिधि हे जास्त जाणतात. लोक काय सहन करणार नाहींत हें लोकनियुक्त प्रधान जितकें अधिकारानें व यथार्थ रीतीनें सांगूं शकेल तितकें अनेक वर्षें इतिवृत्तांच्या व फाईलींच्या वातावरणांत काम करणारा अधिकारी सांगूं शकणार नाहीं. म्हणून राज्यकाभारांत कायम अधिकाऱ्यांची माहिती व कथनें हीं लोकमताचीं निदर्शक अगर अनुभवाचें सार मानणें व त्यावर निर्णय घेणें हें धोक्याचें आहे. खरें लोकमत काय आहे हें समजून घेण्यासाठीं योग्य साधनें समाजांत उपलब्ध करणें जरूर आहे. लोकांचा अनुभव ग्रथित करून त्यांतून निर्णय घेतला जावा या दृष्टीनें त्यांचें योग्य संघटन असणें जरूर आहे. कारभार चालविणारा मंत्री याला यथार्थपणें लोकमत कळणें जरूर आहे. त्याचा अधिकार, लोकांचें मत जमेस धरून त्यांच्या अनुभवाला जुळून घेणाऱ्या निर्णयांतच आहे. म्हणून त्याचेपर्यंत लोकमत पोंहोंचलें पाहिजे, लोकांचा अनुभव भिडविला पाहिजे, लोकांच्या बुद्धीला काय वाटलें याची जाणीव पाहिजे. या सर्वांची दखल घेतांना सर्व हितसंबंधांना

न्यायाचे दृष्टीनें जें योग्य तें महत्त्व देऊन, योग्य ती जुळणी करून समन्वय घडवून होणारा निर्णय जास्तींत जास्त लोकांच्या अनुभवाला व अभिप्रायाला जुळेल असें मग त्याला करतां येईल.

अधिकाराचे स्वरूपाबाबत वरील विचारसरणी स्वीकारल्यानें, अधिकारान्वयें केलेली म्हणून प्रत्येक गोष्ट योग्य अगर न्याय्य मानली जाणार नाहीं. त्या बाबतींत वरील विचारसरणींत अनेक मर्यादा उत्पन्न होतात. राज्यांतील प्रत्येक नागरिकांचा व्यक्तिशः व संघशः अनुभव राज्यसत्तेला कळला पाहिजे म्हणजे तो अनुभव त्यांना सांगतां आला पाहिजे, स्पष्ट करतां आला पाहिजे. काय अनुभव आहे येवढी जाणीव असून भागत नाहीं. जोडा कोठें लागतो हें कळतें, पण तें सांगतां आलें पाहिजे, सांगण्याचा मार्ग उपलब्ध असला पाहिजे. काव्यकल्पना, सौंदर्यानुभूति, अनेक मनांत उत्पन्न होते पण तिचा आविष्कार करण्याची शक्ति व शब्दसंपत्ति अगर अन्य माध्यम नसेल तर तीं सर्व मनांतलें मनांत राहतील. व्यक्तींचीं दुःखें त्यांच्या केवळ जाणिवेनें दूर होत नाहींत. गरजा केवळ कळल्यानें त्यांचा परिहार होत नाहीं. त्या मांडतां आल्या पाहिजेत व मांडण्याला साधनें असलीं पाहिजेत. या दृष्टीनें प्रत्येक राज्यव्यवस्थेंत नागरिकहक्कव्यवस्था असली पाहिजे. राजकीय सत्तेंत नागरिकांना शिरण्याचें हें एक प्रवेशद्वार आहे. हक्कव्यवस्थेला मान्यता मिळाली तर हा प्रवेश सोपा होतो, नाहीं तर तेथेंच लढा द्यावा लागतो. राज्याचा हेतु कितीही जरी श्रेष्ठ असला तरी राज्यसत्ता प्रत्यक्ष व्यवहारांत त्याचा विपर्यास करीत असते. केवळ लोकहित डोळ्यांपुढें ठेवून सतत व निरपेक्षपणें अद्याप कोठेंही राज्यसत्ता वागल्याचें उदाहरण नाहीं. जे राज्यसत्ता चालवितात त्यांच्या मतांप्रमाणें राज्यकार्य होतें. त्यांच्या बुद्धीचा प्रभाव व प्रतिबिंब त्यावर पडतें. प्रभुत्व कायदेशीर कोणाचें हें महत्त्वाचें नसून प्रत्यक्ष राजकारणांत कोण प्रभु, कोणता गट प्रभावी, हें महत्त्वाचें आहे आणि म्हणून नैतिक व कायदेशीर नागरिकहक्कांची आवश्यकता उत्पन्न होते नैतिक कल्पना व मूल्यें बदलत असतात म्हणून कांहीं गोष्टी मौलिक, कांहीं हक्क मौलिक मनुष्य मानतो. योग्यायोग्यतेची त्यांची स्वतःची अशी कल्पना असते, राज्यसत्तेची आज्ञा व त्याचे सद्सद्विवेक बुद्धीचा आदेश, यांत विरोध आल्यास तो राज्यसत्तेला जुमानणार नाहीं. तसें वागण्याचा त्याला पूर्ण हक्क आहे. मनुष्याला कांहीं अपेक्षा, कांहीं आशा असतात आणि राज्याचा हेतु यथार्थ होण्याचे दृष्टीनें अपेक्षापूर्ति, आशांची सफलता अवश्य असली म्हणजे नागरिकाला राजकीय हक्क तेथें प्राप्त होतो. राज्याचे हेतूचे सफलतेसाठीं नागरिकांच्या विशिष्ट अपेक्षा सफल झाल्या पाहिजेत,

याचा अर्थ समाजाच्या विद्यमान स्थितींत तसें होणें अत्यंत अवश्य आहे व अवश्य म्हणून प्रस्तुत हक्क नैसर्गिकही होतो; म्हणजेच त्याला मान्यता मिळाली पाहिजे व तो कायदेशीर झाला पाहिजे असें क्रमप्राप्त होतें. हक्क या दृष्टीनें तात्त्विक नसून त्यामागें समाजाचा अनुभव उभा असतो. हक्कव्यवस्था ( System of rights ) प्रभुत्वाला मर्यादित करते हें खरें, पण त्यामुळें राज्यसत्ता योग्य मार्गावर राहणें संभवनीय असतें. म्हणून हक्कव्यवस्थेला मान्यता न देणारी कोणतीही सत्ता नैतिक नाही, एवढेंच नव्हे तर तर ती विधियुक्त ( Legitimate ) पण नाहीं. सत्ता ही बिनशर्त वापरण्यासाठीं दिलेली नाहीं. ती कशी आहे व काय करते यावर तिची प्रतिष्ठा व मान्यता अवलंबून आहे. हक्क—व्यवस्था अमान्य करण्यानें अगर कमी करण्यानें लोकमत समजून घेण्याचे मार्गच बंद होत असतात. लोकांच्या गरजा मग राज्यकारभारांत पुऱ्या होत नाहींत, कारण लोकांच्या अपेक्षांचें ज्ञान नसतें. लोकांच्या अनुभवाला सत्ता पारखी झालेली असते. या परिस्थितींत भाषणस्वातंत्र्य नाहीं, संघ स्वातंत्र्य नाहीं, अन्य नागरिकस्वातंत्र्यें नाहींत म्हणून लोक जर स्वस्थ बसतील तर, त्यांच्या मौनाचा अर्थ संमति म्हणून करण्यास राज्यसत्ता कमी करणार नाहीं व नागरिकस्वातंत्र्यावरील आक्रमणाविरुद्ध जर प्रतिकार न केला तर त्यावर सत्ता सारखें आक्रमणच करीत राहील व त्याचा नायनाट करील. म्हणून प्रकरण ३ मध्यें सांगितलेली हक्कव्यवस्था असली पाहिजे व ती कायम ठेवण्याची नव्हे परिस्थितीप्रमाणें तींत भर घालण्याची दक्षता नागरिकांनीं घेतली पाहिजे. स्वातंत्र्य हें मोठें जागृत दैवत आहे. एखादी जरी पूजा चुकली अगर अपुरी झाली तर भक्ताकडे ते पाठ फिरविते.

प्रत्येक नागरिकाला आपला अनुभव, आपल्या गरजा सांगण्याचा हक्क असला पाहिजे, याचा अर्थ नागरिकानें सांगावें व अधिकाऱ्यांनीं ऐकावें हा नाहीं. सहानुभूतिपूर्वक व सभ्यतापूर्वक ऐकून घेतलें येवढ्यानें नागरिकाला त्याच्या हक्काचा उपभोग प्राप्त झाला असें होत नाहीं. नागरिकांचें म्हणणें ऐकलें पाहिजे याचा अर्थ होणाऱ्या निर्णयांत त्याची सल्लामसलत विचारांत घेतली पाहिजे व होणाऱ्या निर्णयानें त्याचे अनुभवाला समाधान मिळालें पाहिजे. म्हणजे निर्णय करण्याचे क्रियेंत त्याला हक्क असला पाहिजे. निर्णय मी केला आहें हा अभिमान त्याला आला म्हणजे मान्य करण्याची जबाबदारी हौसेनें तो स्वीकारतो. अन्यथा केलेले निर्णय यांत त्याला आपुलकी वाटणार नाहीं व त्यांत त्याचे अनुभवाला जुळेल असेंही सांपडणार नाहीं. केवळ राज्यसत्तेची आज्ञा म्हणून तो तिजपुढें वांकेल पण त्याची संमति मिळाली असें कदापि म्हणतां येणार नाहीं. केवळ तें राज्यसत्तेचें सत्तेच्या जोरावरील कृत्य राहील. राज्य हें

लोकांचें खरें पण राज्यसत्ता ही थोड्यांची, म्हणून या थोड्यांचें कृत्य लोकांच्या संमतीनेंच विधियुक्त होत असतें. राज्यसत्तेचें कार्य लोकसंमतीनें राज्य–कार्य होतें. राज्यसत्ता ही वस्तुतः बलावर आधारलेली सत्ता आहे व तिचें प्रत्येक कृत्य लोकसंमतीनेंच कायदेशीर व विधियुक्त होत असतें प्रत्येक कार्याला व कायद्याला लोकमान्यता संपादून आपला कायदेशीर अधिकार राज्यसत्तेला क्षणाक्षणाला टिकवावा लागतो. जनतेशीं सतत सहविचार व सल्लामसलत हा तो अधिकार टिकविण्याचा मार्ग आहे. जनतेच्या संमतीशिवाय झालेलें कार्य व कायदा जनतेच्या विचारप्रवाहाला सोडून असतो. भांडवलशाही–प्रधान समाजांतील राजसत्ता भांडवलशाही विचारांना अनुकूल असेंच कायदे करणार. राज्यकर्ते ज्या विचारांचे त्या विचाराला धरूनच ते होणार. परकी राज्यकर्ते आपल्यावरील टीका राज्यद्रोह म्हणून मानणार व कायद्यानें त्याला शिक्षा सांगणार. कारण सदर कायद्यांत केवळ राज्यकर्ते यांचाच अनुभव व अभिप्राय ग्रथित असणार. म्हणूनच त्यांच्या हिताचें तो संरक्षण करणार. सत्ता वापरणारे इसम अगर वर्ग यांच्या अनुभवाच्या मर्यादा ओलांडून सत्ता धोका स्वीकारीत नाहीं. या अपुऱ्या व स्वार्थी अनुभवाची मर्यादा सत्तेला वेष्टन असते. या परिस्थितींत जे सत्तेपासून वंचित आहेत, ज्यांच्या अनुभवाला व संमतीला तेथें स्थान नाहीं त्यांच्या दृष्टीनें सदर सत्ता नैतिक नाहीं, विधियुक्त नाहीं. तिचें स्वरूप केवळ बलसंघटन, सक्तीनें काम करणारें संघटन येवढेंच राहील. प्रत्येक नागरिकाला राज्यकारभारांत भाग असला पाहिजे हा त्याचा हक्क आहे. यावरच राज्य या संस्थेची उभारणी आहे आणि राज्य जर यथार्थपणें लोकशाही स्वरूपाचें, लोकसत्तात्मक व्हावयाचें असेल तर नागरिकाला राज्यकारभारांत भाग घेतां आला पाहिजे. येवढेंच नव्हे तर त्यानें घेतलाच पाहिजे अशी परिस्थिति उत्पन्न केली पाहिजे. राज्याची इच्छा राज्यसत्तेनें अमलांत आणली पाहिजे व ती आणतांना तिचा विपर्यास होणार नाहीं हें नागरिकांनीं सारखा राज्यकारभारांत भाग घेऊन घडवून आणलें पाहिजे. राज्याची इच्छा अगर राज्याची बुद्धि म्हणजे राज्यांतील नागरिकांच्या नानाविध इच्छांचा, नानाविध बुद्धींचा समन्वय होऊन निर्माण झालेली समन्वित इच्छा अगर बुद्धि होय. एवंगुणविशिष्ट बुद्धि व्यक्तिगत बुद्धीपासून अलग खरी पण अलिप्त नाहीं. सर्वांच्या बुद्धींची बेरीज नव्हे, पण त्यांत सर्वांच्या बुद्धींचें प्रतिबिंब खास आहे. म्हणूनच तिचें श्रेष्ठत्व आहे. ती जेथें राज्यव्यवहारांत प्रभावी आहे तेथें लोकसत्ता आहे, नसेल तेथें हुकूमशाही अगर झुंडशाही आहे हें निश्चित समजावें.

राज्याची मर्यादा लहान होती म्हणजे एकादें नगर अगर त्याहून थोडा अधिक

प्रदेश, तेव्हां प्रत्येक नागरिकाला राज्यकारभारांत भाग घेणें शक्य होतें. ॲरिस्टॉटलनें म्हणून राज्यकारभारांत भाग घेणें हें नागरिकत्वाचें प्रमुख लक्षण सांगितलें. आधुनिक राज्य प्रदेशानें विस्तृत असतें एवढेंच नव्हे तर त्याचें कार्यक्षेत्रही विविध व व्यापक असतें. या स्थितींत नागरिकानें भाग घ्यावा याचा विचार करितांना किती, केव्हां व कसा भाग घ्यावा याचा विचार करणें जरूर आहे पण अवघडही आहे. नागरिक शिक्षणानें, अनुभवानें प्रत्येक राज्यकार्य अगर कायदा तपशीलवार पाहून, तपासून त्याचा विचार करण्यास अगर त्याबाबत सल्लामसलत देण्यास लायक असतो असें मानणें चुकीचें आहे. राज्यकार्यांत सहभाग घेणें म्हणजे अनेक प्रसंगीं केवळ मत देणें या पलीकडे त्यांना कांहीं करतां येणार नाहीं, हें उघड आहे. प्रत्यक्ष अंमलबजावणी हें क्षेत्र आमनागरिकांसाठीं नाहीं, पण कोणीं अंमलबजावणी करावी हें मात्र त्यांनीं ठरविणें योग्य आहे. एखाद्या धोरणाचे, एखाद्या कायद्याचे बारीकसारीक गुणदोष पाहून, त्यांची छाननी, त्यांची चिकित्सा करून विचार करणें अगर त्यांची जुळणी करणे हें काम आम–जनतेचें नाहीं; पण धोरणांतील मुख्य तत्त्व काय आहे याचा विचार व काय असावें याचा निर्णय देण्याचें कार्य जनतेनें केलें पाहिजे. प्रत्येक समाजांत कांहीं परंपरा, कांहीं संकेत, विचारांचे व वागणुकीचे मान्यता पावलेले असतात. त्यांचें संरक्षण करणें, त्यांच्यांत वाढ करणें हें जनता साहजिक आपलें कार्य समजते. म्हणून राज्यकारभारांत त्याविरुद्ध कांहीं होत नाहीं हें पाहाण्याचें कार्य जनतेचें आहे व या दृष्टीनें त्यांना मानणारे राज्यकर्ते निवडून देण्याचें कार्य ती करीत असते. प्रस्थापित संकेताविरुद्ध कोण वागतो, बेजबाबदार कोण वागतो, हें जनतेनें ठरविलें पाहिजे. एका दृष्टीनें प्रत्येक नागरिक भागही घेतो व प्रेक्षकही असतो. प्रेक्षक असल्यानें खेळांत कोण कुठें चुकतो, कोण चुकारपणा करतो, कोण अयोग्य वागतो हें त्याला चांगलें कळतें. त्याजबरोबर तो जेथें भाग घेईल, त्याला तेथल्या अडचणी अनुभवानें कळतात, म्हणून तो जास्त जबाबदारही होतो. प्रत्येकजण प्रत्येक गोष्ट करूं शकत नाहीं, पण जें चांगलें त्याला करतां येईल, त्याचें क्षेत्र त्यानें शिक्षणानें वाढविलें पाहिजे. अनुभवांत भर घालून, योग्यायोग्य पाहून निर्णय करण्याची शक्ति संपादन केली पाहिजे. राज्यकारभार करणारे हे ठराविक मुदतीपर्यंतच असले पाहिजेत व नंतर त्यांनीं पुन्हा लोकमतापुढें येऊन लायकी दाखवून, नवी कबुलायत करून दिली पाहिजे. जुनें कूळ ठेवावें कीं नाहीं, त्यानें वावराचे बांध, हद्दीच्या खाणाखुणा योग्य राखल्या कीं नाहीं, मालकी हक्कास बाध आणणारें कांहीं कृत्य केलें कीं काय, खंड वेळेवर व पुरा घातला कीं नाहीं हें सर्व लक्षांत घेऊन जसा दक्ष मालक

वागतो त्याप्रमाणें नागरिकांनीं वागून राज्यकारभारांत सहभागी व्हावयास पाहिजे. इतकेंच नव्हे, तर अयोग्य वर्तन केल्यास मुदतीची सबब न सांगतां राज्यकारभार करणाऱ्यांस दूर करून दुसरे नेमण्याचाही हक्क त्यांनीं गाजविला पाहिजे. केवळ निवडणुकीचे वेळीं वर लिहिल्याप्रमाणें भाग घेतल्यानें नागरिकाला त्याचे जीवताचे दृष्टीनें पूर्णत्व लाभणार नाहीं. राजकीय समता असून आर्थिक विषमतेमुळें लोकशाही ही एक करुण कहाणी ठरली आहे; म्हणून आर्थिक क्षेत्रांत व प्रत्यक्ष राज्यकारभाराचे क्षेत्रांत नागरिकांना भाग घेतां आला पाहिजे. तेथील निर्णयांत त्याचा हात असला पाहिजे. आर्थिक क्षेत्र या दृष्टीनें संघटित झालें पाहिजे. वरच्यानें सांगावें व खालच्यानें ऐकावें हें कोठल्याही क्षेत्रांत बंद होऊन प्रत्येक क्षेत्रांतील अधिकार हा सहविचार व सहकार्य यांतून निर्माण झाला पाहिजे. त्या त्या क्षेत्रांत काम करणारे एकत्र येऊन त्यांच्या विचारविनिमयानें निर्णय घेतले गेले म्हणजे कार्य चांगलें होतें, जबाबदारीनें होतें, प्रयत्न विधायक होतात. वातावरण प्रसन्न व प्रगमनशील राहातें. जेथें अधिकाराचें अधिष्ठान सहकार्य नाहीं व जेथें तो अलग व ज्यावर तो परिणाम करणार तें अलग अशी स्थिति असेल तेथें अधिकार चालविणाऱ्यांचे हितसंबंध पृथक् होतात. हितसंबंध पृथक् झाले म्हणजे सत्ताही या पृथक् हितसंबंधाच्या दृष्टीनेंच वापरली जाते. मग तिचा लौकिक हेतु कांहींही असो. किंबहुना ही पृथक् हितभावना लौकिक हेतूचेंही स्वरूप बदलून टाकते. असे पृथक् हितसंबंध उत्पन्न होणार नाहींत अशी व्यवस्था राजकीय कारभार विषयक, आर्थिक किंबहुना समाजाच्या सर्व कार्यक्षेत्रांत होणें जरूर आहे.

वरील दृष्टीनें विचार केला म्हणजे राज्याचें महत्त्व जास्त वाढतें, राज्य सर्वत्र प्रभावी होतें, सर्वत्र तें पसरतें असें मानण्याचें कारण नाहीं. समाजाचा हेतु अखेरीस व्यक्तिहित आहे, राज्याचा हेतुही अखेरीस त्याच स्वरूपाचा आहे. समाज व राज्य या कांहीं व्यक्तिविरहित निरपेक्ष कल्पना नाहींत. राज्य अगर समाज ही अलग अशी नैतिक वस्तु मानली तरी व्यक्तींच्या जीवनापासून ती अलिप्त नाहीं. सत्तेनें समाज अगर राज्य हे अधिक आहे व असलें पाहिजे. तथापि तें अप्रतिकार्य आहे अगर त्याचा आदेश शिरोधार्थ समजला पाहिजे असें नाहीं. व्यक्तीच्या जीवनांतील सर्व पैलूंवर त्याचा अधिकार आहे असेंही नाहीं. व्यक्तींच्या जीवनांत अगदीं खास असें तिचें क्षेत्र असतें तेथें कोणालाही प्रवेश नसतो. तद्विषयक संबंधांत राज्यानें ढवळाढवळ केली तर व्यक्ति नष्ट होईल पण नमणार नाहीं. या खास महालाचे प्रवेशदारापर्यंत समाज, राज्य अगर अन्य बाह्य उपाधी येऊं शकतात. धर्म ही एक अशीच

बाब आहे. तद्विषयक श्रद्धेवर जर राज्य असह्य नियंत्रण करूं लागलें तर व्यक्तीच्या श्रद्धेपुढें राज्याचें प्रभुत्व निर्बल ठरतें. सत्ता व सदसद्विवेकबुद्धि यांचे संघर्षांत सत्ता हटते, नाहींतर सदसद्बुद्धि तरी खलास होते. मनुष्य स्वभावतःच संघप्रिय आहे. जमावानें रहावें असें त्यास वाटते. समाजांत राहूनसुद्धां आपआपल्या प्रवृत्तिनुसार, मतानुसार तो गट करीत असतो, संघ करीत असतो. भजनी मेळ्यापासून भारतीय स्वरूपाच्या संघाचाही तो सभासद असतो. कुठें भजन करावें, कोणाशीं मिसळावें, कोणत्या 'क्लबां'त जावें, कोणत्या मजूरसंघांत सभासद व्हावें, हें त्याचें पाहणें आहे. त्यांत कुणालाही कांहीं अधिकारानें सांगण्याचा हक्क नाहीं. व्यक्ति आपल्या प्रवृत्तींचें प्रतिबिंब या संघांतून, या संस्थांतून पाहात असते. त्याचें व्यक्तिगत जीवन त्याच्यांतील नानाविध प्रवृत्तींना नांव देण्याला, आविष्कार करण्याला त्याला अपुरें वाटतें म्हणून या व्यापक पण तितक्याच आपुलकीच्या जीवनांत तो रस घेतो, रंगतो. संघ ही त्याचे जीवनाची संपूर्ण आवृत्ति कीं, जिचा संक्षेपतः सारांश त्याचे व्यक्तिगत जीवनग्रंथांत तो पाहात असतो. संघांनाही व संस्थांनाही एक प्रकारें व्यापक व्यक्तित्व असतें, एक वैशिष्ट्य असतें व त्याच्या आविष्कारांत, त्याच्या विकासांत व्यक्ति आपला अनुभव व आनंद वेंचीत असते. आत्मगौरवाप्रमाणें या संस्थांच्या व संघांच्या गौरवांत त्याला गोडी वाटते, अभिमान वाटतो. हें त्याचे संघटित व्यापक जीवन व राज्य यांत विरोध उत्पन्न झाल्यास प्रसंगीं तो राज्यास विरोध करण्यास प्रवृत्त होतो. व्यक्ति ही व्यक्तिशः व संघशः अशा प्रवृत्तीची असलेमुळें राज्य हें तिला सर्व ठिकाणीं सर्वतोंपरी ग्रासून जाईल ही भीति अस्थानीं आहे. राज्य हें व्यक्ति व राज्य, व्यक्तीचें संघ व राज्य, यांच्यांतील संबंधांच्या मर्यादा ओळखून निरनिराळ्या क्षेत्रांत समन्वय घडवून आणून, एकतेचा भाव निर्माण करीत असतें. राज्य, एकच वाद्य सर्वांनीं वाजवावें असें न करतां निरनिराळ्या वाद्यांनीं स्वरसंमतेंत घडवून आणतें. लहान लहान वर्तुळें जुळवून सर्व वर्तुळें एका मोठ्या वर्तुळांत जुळविण्याचें कार्य राज्य करतें.

जेथें राज्य एकजिनसी, एकराशी एकी करतें, तेथें व्यक्तित्व संपतें व राज्य हें अखेरीस व्यक्तीची उपेक्षा करून वागतें. राज्य हें व्यक्तीपेक्षां अधिक, त्यापेक्षां कोणी श्रेष्ठ नाहीं, तें कोणासही कनिष्ठ नाहीं असें व्यक्तिभक्षक स्वरूप तत्त्वतः नव्हे तर व्यवहारांत तेथें येते. तेथें व्यक्तीची निष्ठा आदेशिली जाते. तिच्या गौरवाला, स्वानुभवाला आवाहन करून निष्ठेची प्राप्ति करण्याची गरज राज्यसत्तेला वाटत नाहीं. उघड उघड हें राज्य लोकसत्तात्मक नाहीं लोकसत्तात्मक राज्यांत राज्य हे व्यक्तींच्या अभिप्रायांचे, अनुभवांचे संकलन करून आपला अधिकार, आपली सत्ता निर्माण

करित असते, म्हणून लोकांची मनापासूनची निष्ठा तेथील राज्यव्यवस्थेला हवी असते; व त्या दृष्टीनें ती जास्तींत जास्त कशी मिळेल हा तिजपुढें महत्त्वाचा प्रश्न असतो. केवळ व्यक्तींचे हितसंबंध जुळविण्यानें, एकता निर्माण करण्यानें, सर्वाधिकार, अमर्याद व अनियंत्रित अधिकार, वस्तुतः राज्याला प्राप्त व्हावेत, हें म्हणणें चूक आहे. समाजांत राज्याशिवाय दुसरें कुठें तरी निष्ठास्थान असूं देणें म्हणजे धोक्याचे आहे, अगर राज्याचे प्रभुत्त्वाला कमीपणा आणणारे आहे, ही विचारसरणी बरोबर नाहीं. या विचारसरणीचा स्वीकार केला तर राज्यांत एकही संस्था अगर संघ राहूं शकत नाहीं, भिन्न धर्मांचे लोक राहूं शकत नाहींत, विविधताही राहाणार नाहीं, स्वातंत्र्यही कमी होईल. जे स्वतःचें बुद्धीला कर्तव्य म्हणून वाटतें, ते बजावितांना परंपरा, लोकमत, अगर सत्ता ढवळाढवळ करणार नाहीं, ही ग्वाही, हे संरक्षण प्रत्येक नागरिकांस असले पाहिजे; हे स्वातंत्र्य जर नसेल तर तेथें लोकशाही राहणार नाहीं. व्यक्तिची सदसद्विवेकबुद्धि ही विचारांनीं घेतलेल्या निर्णयाला अखेरची मान्यता देणारी शक्ति आहे व हीच लोकशाहीची खरी संरक्षक देवता आहे, तिचे प्रभावी कवच आहे. म्हणून राज्य हे सर्वस्व, सार नाहीं. व्यक्ति ही राज्यांत असूनही तिचें श्रेष्ठत्व कमी होत नाहीं. व तिचें श्रेष्ठत्व राखिल्यानें राज्याला गौणत्व येतें असेंही नाहीं. व्यक्तीचे व्यापक व्यक्तिमत्वाला वाव देणाऱ्या संस्था राज्यांत राहिल्यानेंही राज्याचें श्रेष्ठत्व कमी होत नाहीं अगर त्यामुळें राज्यांत अनर्थ अगर अव्यवस्था निर्माण होईल असें मानणेंही चुकीचें आहे. सुव्यवस्था म्हणजे समाजांतील हितसंबंधांची जुळणी, त्यांत साधला जाणारा तोल व त्या दृष्टीनें सत्तेचें संघटन होत असतें. सुव्यवस्था म्हणजे न्याय्य व्यवस्था मानणें चुकीचें आहे. विद्यमान अन्यायाविरुद्ध व्यक्तीला व्यक्तिशः, संघशः दाद मागण्याचा हक्क असला पाहिजे. सुव्यस्थेचें नांवाखालीं तो नाकारणें म्हणजे राज्य जें करील तें नुसतें कायदेशीर नव्हे तर न्याय्य व योग्यपण आहे, असें प्रतिपादन करण्यासारखें आहे. समाजांत शांतता हवी असेल तर सुव्यवस्था पाहिजे. सुव्यवस्थेसाठीं कायदे पाहिजेत. राज्य हितसंबंधांची जुळणी करून सुव्यवस्था निर्माण करतें म्हणून त्याचे सर्व कायदे, सर्व हुकूम, व्यक्तीनें बिनशर्त मानले पाहिजेत; त्याविरुद्ध आपली सदसद्विवेकबुद्धि अगर अन्य कांहीं उभें करतां कामा नये असें म्हणणें म्हणजे राज्याचा अधिकार कायदेशीर आहे येवढेंच नव्हे तर तो निरपवाद व निरपेक्ष रीतीनें नैतिक व न्याय्य आहे असें गृहीत धरणें आहे.

वरील विचारसरणी चुकीची व घातुकही आहे. राज्याचें संघटन हे निर्हेतुक

नाहीं. तथापि हेतु कांहींही असला तरी तें प्रत्यक्ष काय कार्य करतें त्याचा अनुभव नागरिकांना प्रत्यक्ष कसा येतो हा महत्त्वाचा प्रश्न आहे आणि व्यवहारांत राज्य कसें अनुभविलें जातें याचा विचार करावयाचा म्हणजे वस्तुतः राज्यसत्तेच्या, सरकारच्या कार्याचाच विचार करावा लागतो. राज्याचा हेतु राज्यसत्तेमार्फत कारभारानें व कायद्यानें नागरिकांना अनुभवावा लागतो. जें प्रत्यक्ष अंमलांत येतें, अनुभवास येतें तें राज्यसत्तेचे हुकूम, तिच्या अधिकाऱ्यांचे निर्णय, म्हणून राज्यसत्तेचा अधिकार व त्याचें स्वरूप काय आहे व असावें हा प्रश्न महत्त्वाचा ठरतो. या अधिकारांवर कुणाचा प्रभाव पडतो हें समाजांतील संपत्तिविषयक व्यवस्थेवर कसें अवलंबून असतें, याचे विस्तारशः विवेचन मागें येऊन गेलें आहे. अधिकार कसा निर्माण व्हावा म्हणजे त्याचा दुरुपयोग होणार नाहीं व समाजांत विषमता राहणार नाहीं याचेही विवेचन येऊन गेलें आहे. तें लक्षांत घेतां ज्या प्रमाणांत सत्तेचा अगर अधिकाराचा उपयोग वस्तुतः नैतिकदृष्ट्या योग्य आहे तेवढयाच प्रमाणांत तो उपयोग विधियुक्त आहे, म्हणजे तेवढया प्रमाणांत कायदा व नीति यांचा मेळ त्या विशिष्ट कार्यांत आहे असें म्हणतां येईल. आणि एवंगुणविशिष्ट कृत्याला अगर कार्याला व्यक्तीची जास्तींत जास्त निष्ठा प्राप्त करून घ्यावयाची असेल तर तें व्यक्तींच्या अनुभवांस व अभिप्रायांस शक्य तितकें जास्त जुळेल असें असलें पाहिजे. डोळस निष्ठा हीच खरी निष्ठा आहे. समाजांत सुव्यवस्था हवी, सामाजिक शांततेसाठीं कायदा हवा, कायद्याशिवाय हें शक्य नाहीं हें सर्व खरें. तथापि, व्यक्तीच्या अनुभवाला या सुव्यवस्थेचा व शांततेचा काय अर्थ येतो हें पाहूनच त्याची थोरवी, त्याचें श्रेष्ठत्व मानण्यास व्यक्ति तयार होईल. सुव्यवस्था म्हणजे अहोरात्र कष्ट व पुरेसें न मिळणें व शांतता म्हणजे दुःखेंसुद्धां बोलून दाखवून अधिकाऱ्यांचे कानांपर्यंत नेण्याची बंदी असा जर अनुभव येत असेल तर केवळ राज्यामार्फत हें होत आहे म्हणून योग्य अगर त्यांतले त्यांत योग्य असें व्यक्तीस मानण्यास सांगणें, हें त्याच्या बुद्धीची विटंबना करणें होय. राज्याची योग्यता पटली पाहिजे, ती गृहीत धरून भागणार नाहीं. सत्याचा पुरावा अनुभव आहे अधिकार नव्हे. म्हणून कायदा ज्या प्रमाणांत समाजाच्या परिस्थितीचा निदर्शक असेल, ज्या प्रमाणांत तो योग्य असेल असें अनुभवास आढळून येईल, त्या प्रमाणांत लोकांना तो खरोखर कायदेशीर वाटेल. कायदा म्हणजे कांहीं तरी निरपेक्ष तत्त्वांवर आधारलेला व राज्याचे प्रभुत्वानें प्रभावी झालेला सिद्धांत नव्हे. राज्याचा तो हुकूम आहे हें खरें, पण हें त्याचें रूप आहे, त्याचें कार्य व्यक्तींना त्यांचें आयुष्यांत राज्याचे हेतूला अनुसरून विकासासाठीं अवश्य ती परिस्थिति निर्माण करून देणें

हें आहे. कायदा हें व्यक्तीला समाजाविरुद्ध तक्रार करण्याचें एक साधन न राहातां, त्याच्या उन्नतीच्या मार्गांतील एक संरक्षक व संचालक वाटला पाहिजे. म्हणून समाजाच्या परिस्थितीचा, अनुभवाचा, जास्तींत जास्त समावेश कायद्यांत होणें इष्ट आणि अवश्य आहे. मनुष्यांना जे हक्क असणें अवश्य आहेत व जे त्यानीं योग्य म्हणून मानले आहेत त्यांचा समावेश जर विद्यमान सुव्यवस्थेंत झालेला नसेल तर ती सुव्यवस्था त्यांचेसाठीं अनर्थकारक, अन्यायकारकच ते मानतील. आणि त्या परिस्थितींत विद्यमान व्यवस्था कायम करणाऱ्या, तिला संरक्षणाऱ्या, कायद्याविरुद्ध वागणें, त्यांचा प्रतिकार करणें हें त्यांचे कर्तव्य आहे असें ते मानणें साहजिक आहे व तसा त्यांना अधिकार आहे. कायदा सत्तेनें जरी केला असला तरी वस्तुतः तो नागरिकांचे जीवनांतून, अनुभवांतूनच निर्माण होत असतो व ज्या प्रमाणांत नागरिकांना तो अनुभवाला पटेल, जुळेल त्या प्रमाणांत त्याचा वास्तविक अधिकार आहे. त्यांच्या अनुभवांशीं विसंगत, त्यांच्या अभिप्रायांस न जुळणारा कायदा हा ते भीतीनें, सक्तीमुळें अगर नाइलाजानें मानतील. तावडतोब विरोधही करणार नाहींत. तथापि राज्यसत्तेनें तो कायदा केला म्हणून त्याला ते कायदेशीर समजणार नाहींत व त्यांची निष्ठा मनापासूनची नसल्यानें प्रभावी असणार नाहीं. प्रेमाशिवाय संसार व निष्ठेशिवाय राज्यकारभार हे दोन्ही सारखेंच व्यर्थ आहे आणि आधुनिक विचारप्रवाहाप्रमाणें ही स्थिति बदलून टाकण्याचा प्रत्येकास हक्क आहे.

अनुभवांवर आधारलेला अधिकार तेवढाच कायदेशीर व योग्य, असें मानलें म्हणजे एक प्रकारें अराजक वातावरणाला उत्तेजन देण्यासारखें आहे असा आक्षेप येईल. जें पटत नसेल तें बोलून दाखविण्यास बंदी करणें, संघस्वातंत्र्य नाहींसें करणें, अन्य नागरिकस्वातंत्र्यें नाहींशीं करणें, तात्पर्य राज्यसत्तेला होणारा प्रत्येक विरोध दाबून टाकण्यानें अराजकत्व टळतें असा अनुभव नाहीं. थोडे लांबते, पण जेव्हां बरसतें तेव्हां झडीवर झडी येत जातात असा अनुभव आहे. मनुष्य हा कांहीं जनावर नाहीं कीं कुणीही कसाही हांकून न्यावा. त्याला मन आहे, विचार आहेत. तो एक नैतिक शक्ति आहे. आपल्या नैतिक कृत्यांनीं व प्रयत्नांनीं तो राज्याला स्थैर्य व प्रतिष्ठा देत असतो. त्याची ज्ञानसंपदा वाढवून, त्याची सदसद्विवेकबुद्धि ज्ञानयुक्त करून त्याची निष्ठा राज्यकार्यांत मिळविणें लोकशाहींत अत्यंत अवश्य आहे. हुकुमशाहींत हुकुमशहाची इच्छा म्हणजे कायदा. तेथें ज्ञान व अनुभव यांना महत्त्व नाहीं. जेथें कांहीं विशिष्ट वर्गाचें प्राबल्य राज्यसत्तेंत आहे, तेथेंही परिणामाकडे दुर्लक्ष करून कांहीं काळ कारभार चालेल. पण लोकशाहींत प्रत्येक नागरिकाचें अभिप्रायाला व

अनुभवाला योग्य मान मिळूनच निर्णय घेतले गेलें पाहिजेत. नागरिकांचें सहकार्य व श्रद्धा मिळविणें हें तेथें आद्य कर्तव्य ठरतें. कायदा म्हणजे राज्ययंत्रांतील, राज्यसंघटनेंतील 'बनेला माल' नव्हे कीं, ज्याची प्रत व किंमत लिहिली असेल ती नागरिकांनीं बिनतक्रार कायम भावानें घ्यावी. नागरिक आपल्या मान्यतेनें त्यांची किंमत ठरवीत असतात. मानला तर अधिकार, नाहींतर निराधार आहे, हें मौलिक सत्य आहे. घरांत येणारा मानला तर अतिथि ठरतो नाहीं तर आक्रमकच. नागरिकांची मान्यता हीच एक अखेरची कसोटी युक्तायुक्ततेची व खऱ्या अर्थानें कायदेशीरपणाची आहे. ही कसोटी वापरण्याचा नागरिकांचा हक्क हा निर्विवाद आहे. अन्याय का अव्यवस्था असा प्रश्न उपस्थित झाला असतां अनेक प्रसंगीं अव्यवस्थेला मनुष्यांनीं स्वीकारलें आहे. कारण तोच मार्ग त्यांना श्रेयस्कर वाटला. स्वातंत्र्य नष्ट करणारे कायदे याच भूमिकेवरून जगभर विरोधिलें जातात. जिवंत राहावें हाच हेतु धरून त्यासाठीं वाटेल ती किंमत स्वातंत्र्याची सुद्धां देणारे कांहीं निघतील. पण कांहीं या परिस्थितींत आत्मयज्ञ हाच एक श्रेष्ठ मार्ग मानतील. जिवंत राहाणें म्हणजे ध्येयानुसार जिवंत राहाणें हाच खरा अर्थ आहे. म्हणून राज्याचें कार्य व पद्धत तें ध्येय साधण्याला अनुकूल नसेल तर त्याला विरोध करणे हा जीवनाचा सन्मान करणें आहे. असह्य परिस्थिति झाली म्हणजेच अराजक जन्मतें. कोणाला धर्माचे दृष्टीनें असह्य वाटेल, कोणाला आर्थिक विषमतेमुळें असह्य वाटेल, कोणाला दुसऱ्या कोठल्या कारणासाठीं राज्यकारभार असह्य वाटेल. त्यांच्या त्यांच्या दृष्टीनें आहे यापेक्षां अराजक श्रेयस्कर वाटेल हेंही तितकेंच खरें. नाराज पण निस्तब्ध राहाण्यानें सत्ता प्रबल होत जाते अधिकाराची धार अधिक तीव्र होते. उलट प्रतिकार करण्यानें सत्तेला आपल्या मर्यादा कळतात. मान्यतेनें अधिकार अधिकृत होतो, कायद्याला कायदेशीरपणा येतो म्हणून जें अमान्य तें अनधिकृत, असनदशीर असें म्हणणें चूक नाहीं. अमान्य असलेल्या अधिकाराविरुद्ध, सत्तेविरुद्ध प्रतिकार करण्याचा हक्क कुठलीही घटना काढून घेऊं शकत नाहीं. प्रत्येक नागरिकाला जन्मानें तो प्राप्त झाला आहे. अराजकाचे भीतीनें तो नष्ट करितां येत नाहीं व होतही नाहीं. हा राखीव हक्क त्याचें स्वातंत्र्य रक्षितो एवढेंच नव्हे तर त्याचा मान व प्रतिष्ठाही राखतो.

कायदा वरील दृष्टीनें विचार करतां मान्यतेनें यथार्थ होतो हें ठरल्यानंतर त्याला जास्तींत जास्त मान्यता मिळवावी हें राज्यसत्तेचें ध्येय असलें पाहिजे. व्यक्तीचे अनुभव नानाविध व निरनिराळे म्हणून मान्यतेचें दृष्टीकोनही निरनिराळे असणें साहजिक आहे. मनुष्यांच्या गरजाही अक्षरशः सारख्या नसतात. म्हणून, एकानें मान्य

केलें म्हणजे सर्वमान्य झालें असें होणार नाहीं. प्रत्येक व्यक्ति आपल्या खास अनुभवांस अनुसरून राज्यकारभाराकडे, त्याच्या निर्णयाकडे पाहाणार. ज्ञास्तींत जास्त लोकांच्या मतानें व अनुभवानें ग्रथित झालेले निर्णय जरी जारी झाले तरी ते सर्वमान्य आहेत असा दावा करतां येणार नाहीं. निर्णयाबद्दलची मान्यता व्यक्तिगत आहे, ती व्यक्तीची मानसिक स्थिति आहे. बहुमताचा तेथें प्रश्न नाहीं. कायद्याबद्दल, कारभाराबद्दल आदर हाही त्याच स्वरूपाचा आहे. आज्ञेनें कुणी प्रेम करीत नाहीं, तिनें आदरही उत्पन्न होत नाहीं. लोकशाहींत जास्तींत जास्त प्रमाणावर निर्णय लोकमतावर आधारल्यानें ते सर्वमान्य होण्याला अत्यंत अनुकूल वातावरण उत्पन्न होतें. तथापि सदरहू निर्णय प्रत्यक्ष अनुभवांत ज्या व्यक्तीला जसे वाटतील, तेंच स्वरूप त्या व्यक्तीचे दृष्टीनें महत्त्वाचे आहे. तिच्या अनुभवाला जुळेल तर त्यांना प्रामाण्य आहे, नाहीं तर त्या व्यक्तीपुरते त्यांना प्रामाण्य नाहीं हें उघड आहे. राज्याचें निर्णय मानावेत, आज्ञाधारकत्व असावें हें महत्त्वाचें खरें, पण एकानें मनाप्रमाणें सांगावें व दुसऱ्यानें मुकाट्यानें तें मानावें यांत आज्ञाधारकत्व नाहीं, मनुष्यत्वाचा अपमान आहे. नागरिकांची निष्ठा प्रभावी असावी, विधायक असावी या दृष्टीनें राज्यकारभारांतील निर्णयांत तो सहभागी असला पाहिजे. जी परिस्थिति, ज्या घटना निर्णयानें होणार असतील, त्यांत त्याला जबाबदारीचें स्थान आहे असें वाटलें पाहिजे, तें घडवून आणण्यांत आपला हात आहे असें समजलें पाहिजे. राज्याच्या कार्यांत आपलाही गौरव आहे, आपलें व्यक्तिमत्व तेथें उमटलें आहे असा विश्वास असला म्हणजेच तेथें खरी निष्ठा निर्माण होते, आपण घेतलेले निर्णयच आपण मानीत आहोंत असा भाव उत्पन्न होतो. आज्ञा करणारे व आज्ञा मानणारे हें द्वंद्व तेथें नाहींसें होऊन, व्यक्ति व राज्य यांतील मौलिक एकता प्रस्थापित होतें. सर्वांच्या अभिप्रायांतून निर्माण झालेला कायदा खऱ्या अर्थानें कायदेशीर; कारण कुणाच्या अनुभवाशीं तो विसंगत अगर विग्रही नसतो. हें घडवून येण्यासाठीं निर्णय घेतांना, कायदे तयार करतांना लोकांना सहभागी केलें पाहिजे, त्यांना निश्चित स्थान या कार्यांत दिले पाहिजे. राज्यकारभार प्रत्यक्ष जे चालवितात, ते आपल्या हिताच्या दृष्टीनें, आपल्या अनुभवाला जुळेल असेच वागणार. त्यांचे दृष्टीनें होणारे कायदे व होणारा कारभार हें योग्य असलें, कायदेशीर असलें तरी इतरांचे दृष्टीनें तसें असणार नाहींत. इतरांचा अनुभव तेथें नसल्यानें, इतरांना मान्यता देणें अगर त्यांच्याकडून ती अपेक्षिणें चूक आहे. एकदां अधिकार मान्यतेनें मिळाला म्हणून तो कायम आहे अगर त्याचे आधारावर कायम मान्यतेचा दावा सांगणेंही चूक आहे. प्रत्येक कृत्याला

सर्वसामान्यपणें मान्यता मिळाली पाहिजे. कारण तसें न झालें तर अनुभव व होणारे निर्णय, यांत सुसंगति राहाणार नाहीं. अधिकार हा जनतेच्या समन्वित अनुभवांतून निर्माण होतो हा सिद्धांत लक्षांत घेतां, जनमत सारखें अंदाजिलें पाहिजे, लक्षांत घेतलें पाहिजे हें क्रमप्राप्त प्राप्त होतें. अधिकाराचें अधिष्ठान याच मार्गानें गेल्यानें जनमनांत कायम राहातें. कायद्याचें फळ विधिमंडळाचें फांदीला लागलें तरी त्याचा जीवनरस जनमनाच्या हजारों मुळ्यांतूनच वर गेला पाहिजे.

जनता व राज्यकार्य यांच्या विरोधाचें परिणाम प्रसिद्ध आहेत. जे निर्णय जनतेच्यावर लादले जातात त्यांपासून जनतेला सुख तर होत नाहीं पण राज्याचें स्थैर्यही संशयास्पद होऊ असते. दारूचें कोठार कोणते वेळीं भडकेल याचा नेम नसतो, आंतरराष्ट्रीय व्यवहारांतही हाच अनुभव येतो. व्हर्सायिचा तह लादल्याचा परिणाम म्हणजे दुसरें चालू महायुद्ध होय. पराभूत जर्मनी व विजयी दोस्त राष्ट्रें दोघांनाही शांतता हवी होती. दोघांच्याही विचारानें योग्य निर्णय होऊन, योग्य तह होऊन शांतता प्रस्थापित झाली असती. पण प्रत्यक्ष जो तह झाला त्यांत उलटें झालें. जर्मन जनतेला त्यासंबधीं काय वाटतें हें सांगण्याचीसुद्धां बंदी करण्यांत आली होती. तह अमान्य केल्यानें उत्पन्न होणाऱ्या संकटाला भिऊन जर्मन राष्ट्रानें तो स्वीकारला आणि या परिस्थितींत त्यांतील शर्तीप्रमाणें वागावें, हे नैतिक कर्तव्य आहे असें कोणाही जर्मनाला वाटेनासें झालें. त्याचा जो अनुभव आला त्यानें प्रत्येक जर्मन तो मोडण्याची संधि शोधण्यास व प्रयत्न करण्यास प्रवृत्त झाला. ज्यांनीं तह लादला त्यांना सत्ता हवी होती, शांतता नको होती. कारण त्यांतून शांतता निघणार नाहीं हें त्यांना पूर्ण माहीत होतें. म्हणूनच वारंवार तहाचे पावित्र्याबद्दल आव आणून बोललें जात होतें. झालेल्या व्यवस्थेंत एकतर्फी विचार केला होता. ज्यांचे त्यांत ऐकलें गेलें नाहीं, ज्यांचा त्या निर्णयांत कांहींही भाग नव्हता, त्यांवर तो बंधनकारक राहाणार नाहीं हें स्पष्ट होतें. मनुष्यस्वभावाविरुद्ध रचना करून तिजविरुद्ध वर्तन करणारांस दोष देणें हें चूक आहे. सक्तानें सैन्यांत भरती करून सैनिक हत्यार टाकून देतो म्हणून त्यास दोष देणें इष्ट नाहीं. सैन्यांत जाण्यांत त्याचें हित आहे, त्याचें कर्तव्य आहे हें त्याला पटले पाहिजे, म्हणजे तो हत्यार चालवील. सक्तीनें लादलेले निर्णय तात्पुरते यशस्वी ठरले तरी अखेरीस घातक ठरतात. सहकार्यानें, सहविचारानें केलेलें कार्य अल्प असलें तरी सर्व मान्य असतें व म्हणून त्यांत स्थैर्यही असतें.

राजकारण व आंतरराष्ट्रीय राजकारण यांत होणारे निर्णय सहकार्यानें व सहविचारानें न झाले तर काय होतें याचें दृश्य प्रत्येक राष्ट्रांत व आंतरराष्ट्रीय कारभारांत

सर्वत्र दिसून येत आहे. जेथें जेथें व्यवस्था हवी आहे तेथें तेथें ती सहकार्यानें व संमतीनें प्रस्थापित न झाल्यास ती टिकणार नाहीं, मग त्या व्यवस्थेचें स्वरूप राजकीय असो, सामाजिक असो अगर आर्थिक असो. निव्वळ मताचा हक्क देऊन राजकारणांत पुरेशी संमति मिळत नाहीं तर राज्यकारभाराच्या अखंड कार्याशीं सतत लोकमत संलग्न राहील अशी व्यवस्था करणें जसें जरूर आहे, तसेंच औद्योगिक आर्थिक क्षेत्रांत निव्वळ योग्य वेतन देऊन सर्व कांहीं ठीक होईल असें नाहीं म्हणून तेथेंही कामगार यांच्या संमतीला सतत सहविचाराला स्थान असलें पाहिजे. आजच्या स्थितींत मालक व मजूर यांचे संबंध एक नाहींत. उलट त्यांत कायम संघर्ष आहे. प्रत्येक पक्ष डावपेंचाचे दृष्टीनें प्रत्येक घटनेकडे बघत असतो. होणारे निर्णय एकतर्फी होत असतात. माणशीं वेतन जास्त दिलें, मग माणशीं उत्पादन वाढविण्यास हरकत नाहीं असें मानून मालक वागतो. पण थोड्या माणसांत अधिक उत्पादन होऊं लागलें तर बेकारी होते याची दखल तो घेत नाहीं. माणशीं अधिक उत्पादन वाढवावयाचे म्हणजे अनेक प्रश्न वास्तविक उत्पन्न होतात. वाढत्या उत्पादनामुळें मजुरांचेच शरीरांवर व मनांवर थकवा, ताण या दृष्टीने काय परिणाम होईल? सारखा रोजगार त्याला राहील कीं, खूप काम थोडक्या कालांत झाल्यानें कांहीं काळ घरीं बसावें लागेल? वेतनाचे दर काय राहतील? एकंदर उत्पादन व एकंदर मजूर किती राहतील? हे सर्व प्रश्न उपस्थित होतात व हे सर्व एकट्या मालकानें सोडवावयाचें तर होणारें निर्णयास मजुरांची मान्यता मिळणार नाहीं हें उघड आहे. उत्पादनाचे व्यवस्थेंत मजुरांना स्थान देऊन त्यांच्या सल्ल्यानें व सहविचारानें निर्णय घेतले गेले म्हणजे त्यानें सहसा अन्याय होणार नाहीं, व त्यामुळें अस्वस्थताही टळेल. केवळ वेतनवारीनें अगर थातुर–मातुर सुखसोयींचें ढोंग केल्यानें जी आपुलकीची भावना, जी जबाबदारी काम करतांना उत्पन्न व्हावयास पाहिजे ती कधींही होणार नाहीं. उत्पादन हें मालकाइतकेंच मजुराचें आहे असें जेव्हां त्याला वाटेल तेव्हांच त्याच्या प्रवृत्ति विधायक होतील, त्याच्या कामांत तो रमेल. मालक चांगला असूनसुद्धां चालणार नाहीं तर मजूर व मालक हे दोघेंही भागीदार आहेत असा भाव जेव्हां मजुरांच्या मनांत उत्पन्न होईल व प्रत्यक्ष व्यवस्थेंत मजुराला त्याचा अनुभव येईल तेव्हांच मजुरांस कामांत आपुलकी वाटेल. कारण होणारे निर्णयांत त्याचा अनुभव, त्याचा अभिप्राय जमेला धरलेला असेल. मालक व मजूर हें द्वंद्व मुळांत व प्रत्यक्ष व्यवस्थेंत दिसत असतां संघर्ष हा सारखा चालू राहाणें अटळ आहे.

आजच्या जगांत या संघर्षाकडे ज्या दृष्टीनें पाहावयास पाहिजे त्या दृष्टीनें पाहिलें

जात नाहीं. हा प्रश्न केवळ विशिष्ट मालक व विशिष्ट मजूर यांच्यांतील नाहीं. समाज रचनेचें दृष्टीनें तो मौलिक प्रश्न आहे. ज्या उत्पादनाचा संबंध दररोजच्या सुखसोयींशीं येत नाहीं, त्यांत संप झाले अगर संघर्ष वाढला तर जनता उदासीन असतें. कापड-गिरण्यांत संप झाला, भांडे–कामगारांच्यात संप झाला, अरकसांचा संप झाला तर फारसें कोणी लक्ष देत नाहीं. पण रेल्वे–कामगारांचा संप झाला, टांगेवाले, बसवाले यांचा संप झाला, भंगी व झाडूवाले यांचा संप झाला तर ताबडतोब समाज गडबड करूं लागतो. कारण समाजाचीं नित्याचीं कामें त्यामुळें अडून पडतात. सरकाराकडे संप मिटविण्याबाबत विनंत्या करण्यांत येतात व सरकार मध्यें पडतें, हस्तक्षेप करतें. कांहीं ठिकाणीं सार्वजनिक उपयोगाच्या उद्योगधंद्यांत ( Public Utility Services ) संप करणें बेकायदेशीर आहे, कांहीं ठिकाणीं योग्य सूचना दिल्याशिवाय संप करणें बेकायदे-शीर आहे हेंही याच प्रवृत्तीचें द्योतक आहे. समाजाच्या सोयीचे दृष्टीनें हस्तक्षेप करणें जर योग्य व न्याय्य, तर ज्या धंद्यांत समाजाची सोय संप केल्यानें लागलीच नाहींशी होत नाहीं त्या धंद्यांतही सरकारनें संप झाल्यास कां हस्तक्षेप करूं नये? तेथेंही संपामुळें लाखों कामगारांची गैरसोयच होतें. कोणी विनाकारण संप करून उपासमार ओढवून घेत नाहीं. लाखों कामगारांची सोय न पाहातां सरकार संप चालू देतें व मधें पडलेंच तर शांततेचे संरक्षण करण्याचे बहाण्यानें मालकांचीच बाजू घेतें. म्हणजे जेथें सरकार मालक आहे तेथें म्हणजे पोलीस, सैन्य, पोस्ट वगैरे खात्यांत संप बेकायदेशीर मुळांतच ठरतात व जेथें सरकार मालक नाहीं तेथें सरकार संप-फोडें अगर संपमोडें होतें. सरकारी खात्यांत काम करतात म्हणून त्यांच्यावर निर्णय लादण्यांत यावें, अगर सार्वजनिक उपयोगाचे उद्योग-धंद्यांत काम करणारा म्हणून त्यांच्यावर निर्णय लादण्यांत यावे, त्यांच्या सल्ल्याला अगर सहकार्याला स्थान नसावें हें चूक आहे. रेल्वे-कामगार यांना कांहीं मत नाहीं, कांहीं विचार नाहींत असें थोडेंच आहे? कोण मालक आहे यावर अधिकाराचा प्रश्न अवलंबून नाहीं, तर त्या अधिकारांचा परिणाम ज्या क्षेत्रांत होणार आहे त्यांत काम करणाऱ्यांच्या अनुभवांवर तो अवलंबून आहे. उत्पादनाचे स्वरूपावरही तो अवलंबून नाहीं तर त्या उत्पादनाचे कामीं खपणाऱ्या हजारों मजुरांच्या अनुभवांवर तो अवलंबून आहे. संप बेकायदेशीर ठरविल्यानें ते होत नाहींत असें नाहीं. ते घडून न यावे, संघर्ष टळावा यासाठीं इलाज, त्यांना कायद्यानें बंदी करणें, अगर लाठी चालवून मोडून काढणें हा नाहीं. प्रत्येक ठिकाणीं होणारे निर्णयांत तेथील सर्व काम करणारांना स्थान देऊन त्यांच्या सहविचारांवर व्यवस्था आधारणें हाच खरा उपाय आहे. कारण यायोगें निर्माण

होणारा अधिकार मान्यता पावतो, त्याचे आदेश निष्ठेनें पाहिले जातात. प्रत्येक संपाचे वेळीं अगर तंटा उपस्थित झाला म्हणजे, मग तडजोड करणें, लवाद मंडळें नेमणें समजूतसमित्या नेमणें हें धोरण चुकीचें आहे. मुळांतच व्यवस्था अशी असली पाहिजे कीं, उद्योगधंद्यांतील प्रत्येक निर्णय सहकार्यानें व सहविचारानें घेतला जाईल. यासाठीं जरूर त्या कायदेशीर संस्था अगर व्यवस्था निर्माण झाल्या पाहिजेत. अशी व्यवस्था मुळांतच असली म्हणजे संप होण्यापर्यंत वेळच येणार नाहीं. कामगारांची विनंति मागणी होण्यापूर्वी विचारांत घेतली जाईल व मागणी अंतिमेत्तर अगर संपाची धमकी होण्यापूर्वी सहकार्यानें व सहविचारानें कमीजास्त होऊन तडजोडींत गुंफली जाईल. आज द्वंद्वाची भावना आहे म्हणून संघर्ष स्वाभाविक आहे. हितैक्य झालें नाहीं तरी एकत्र येण्यानें सहकार्य वाढेल, सहविचारानें जुळवून घेण्याची प्रवृत्ति उत्पन्न होईल. मतभेदापेक्षां मतैक्याकडे प्रयत्न झुकतील व संप व संघर्ष कमी होईल, कालाचा व शक्तीचा नाश टळेल.

वरील व्यवस्था आदर्श आहे अगर त्यामुळें संप व संघर्ष कायम नाहींसे होतील असें मानण्याचें कारण नाहीं. जास्तींत जास्त या व्यवस्थेनें सामाजिक शांतता राहाण्यास मदत होईल. व्यक्ति व राज्य यांचा विचार करून भागणार नाहीं. कारण विद्यमान युगांत सर्वत्र व्यक्तींबरोबर व्यक्तींचे संघ अगर संस्था यांनाही महत्त्व आलें आहे. आणि विशेषतः औद्योगिक क्षेत्रांत तर त्यांचें महत्त्व विशेष आहे. संघ अगर संस्था हा त्यांतील व्यक्तींच्या हितसंबंधाचें संकलित स्वरूप आहे असें म्हटलें तरी चालेल; त्याचप्रमाणें व्यक्तींच्या प्रवृत्तींना वाव देणारें, पूर्णत्व देणारें एक क्षेत्र म्हणजे संघ अगर संस्था मानली तरी हरकत नाहीं. वास्तविक व्यक्ति आपल्या जीवनाला पूर्णत्त्व यावें म्हणूनच समूहाकडे वळत असते. एकटें राहून त्याला अपुरेंपणा वाटतो, आयुष्यांत उणेपणा वाटतो म्हणून तो 'क्लबांत' जाईल, 'मंडळांत' नांव घालील, एखाद्या 'पक्षा'चा सभासद होईल, एखाद्या 'संघां'त दाखल होईल. तेथें तो आपल्या प्रवृत्तींना, हितसंबंधांना आधिक व्यापक व आधिक संघटित करीत असतो. अभिनय प्रवृत्तीचें दृष्टीनें एखाद्या 'नाट्यनिकेतनांत' जाईल, बौद्धिक भूक भागविण्यासाठीं 'चर्चा' मंडळांत जाईल. बालचर मंडळापासून विश्राममंडळापर्यंत आयुष्याच्या प्रत्येक पायरीवर ही प्रवृत्ति आढळून येते. अन्नपूर्णामंडळापासून आंतरराष्ट्रीय मंजूरसंघापर्यंत या प्रवृत्तीची धांव दिसून येते. किंबहुना आधुनिक जगांत मनुष्य घरापेक्षां घराबाहेर अधिक असतो असें म्हटलें तरी अतिशयोक्ति खास नाहीं. धंद्यानिमित्तानें, हौसेसाठीं, हितसंबंधाचें संरक्षणार्थ हल्लींच्या नागरिकांचे आयुष्याचा

मोठा भाग घराबाहेर खर्च होतो व त्या ठिकाणीं त्याची सामाजिक प्रवृत्ति समूहा-बद्दलची ओढ, संगतिप्रियताच दिसून येते. हीं सर्व मंडळें, सर्व संघ, व संस्था त्याचें-साठीं निव्वळ कल्पनास्वरूपाच्या नसतात. जितका समाज अगर राज्य सत्य, तित-केच या संस्था हे समूह सत्य वस्तु असतात. त्यांचे म्हणून कांहीं हितसंबंध अस-तात, त्यांचें असें कांहीं कार्य असतें. त्यांची निर्मिती राज्यापासून नाहीं हें खरें पण राज्याचें कायद्याबाहेर ते आहेत असें मात्र नाहीं. सामाजिक, राजकीय व आर्थिक परिस्थितीमुळें त्यांची वाढ होते व त्या परिस्थितीला अनुसरून त्यांचें कार्य होत असते. कांहीं हेतु धरून कांहीं हितसंबंधाचें ऐक्य आहे म्हणून माणसें संघांत येतात, संस्थांत येतात. हेतूनें अगर हितैक्यानें एकत्र येणाऱ्यांत एक विशिष्ट संबंध उत्पन्न होतो. संघांत येण्यानें तद्विषयक वर्तणुकींत अगर वर्तनांत जुळणी होते, एकजिनसीपणा येतो. मजूरसंघाचे सभासद संघाच्या आदेशाप्रमाणें एकजूट करून मागणी करतात. पृथक् पृथक् पगारवाढ कोणी मागत नाहीं. व्यक्ति अशी एक तसा संघ हा एक व त्यामुळें त्यांतही व्यक्तिमत्व उत्पन्न होतें. लोक एकत्र येतात, एका संघामार्फत बोल-तात. त्यांच्या हितसंबंधांचें संघटन होतें. ह्या सगळ्या क्रिया, हे सर्व संबंध केवळ कल्पना आहेत असें मानून चालणार नाहीं. हें सर्व सत्य आहेत म्हणून संघ अगर संस्था सत्य वस्तू आहेत. आपापल्या सभासदांना जे वैयक्तिक आयुष्यांत भेटलें नसतें तें समाधान या संस्थामुळें अनेक तऱ्हांनीं त्यांना प्राप्त होत असतें. संस्था सभासदांच्या आयुष्यांतूनच, त्यांच्या वर्तनांतूनच जिवंत राहत असतात हें खरें, सभासदाव्यतिरिक्त त्यांचें जीवन नाहीं हें खरें, पण त्यामुळें त्यांना सत्य स्वरूप नाहीं असें नाहीं. सभास-दांच्या ध्येयावर, त्यांच्या प्रयत्नांवर, त्यांच्या विचारांवर, त्यांच्या आभारांवर त्यांच्या अनु-भवानुसार संस्था परिणाम करीत असतात. संस्थेचें स्वरूप सभासद आपापल्या अनु-भवांनीं रंगवीत असतात व संस्थेचें स्वरूप त्यांच्या आयुष्यास रंगवीत असतें. सभासदांचे विचार व अनुभव नाना तऱ्हांचे असतात, त्यांतून जुळवाजुळव व समन्वय करून एक प्रणाम एक परंपरा तद्विषयक क्षेत्रांत संस्था निर्माण करीत असते. व्यक्तींच्या जीवनांत संस्थांचे स्थान किती असतें हें जर त्या एकदम नष्ट झाल्या अगर बेकायदेशीर ठरून बंद झाल्या तर, ताबडतोब त्या व्यक्तींचे अनुभवाला येतें. त्यांना चुकल्याचुकल्यासारखें वाटतें. आपण व जग, आपण व व्यापक आयुष्य यांतील जोडणारा दुवाच तुटला असें वाटतें. मजूरसंघ बंद झाला आतां कशी पगार वाढ मागावी, राजकीय संस्था बंद झाली, आतां दाद कोणामार्फत मागावी, भांडणामुळें 'चर्चा मंडळ' बंद झालें आतां संध्या-काळ कोठें घालवावी असे उणेपणाचे भाव त्यांचे मनांत येतात. संस्था म्हणजे त्याचें

वाढलेलें व्यक्तित्व असतें. त्याचें व्यापक विचार करणारें मन म्हणजे संस्था, कार्यासाठीं अधिक हात म्हणजे संस्था, गतीसाठीं अधिक चैतन्य म्हणजे संस्था. तिच्याशिवाय त्याला भकास व निराश वाटणें अगदीं साहजिक आहे.

व्यक्ति ही सर्व सामाजिक व्यवस्थेचा मध्य आहे. तो राजकीय पक्षाचा सभासद असतो, तोच मजूरसंघांत अगर मालकसंघांत असतो, सहकारी मंडळांत असतो, नाट्यसंस्थेंत असतो, इतिहास मंडळांत असतो. तात्पर्य, अनेक संस्थांत अनेक संघांत राहूनही त्याची निष्ठा संपते असें मात्र नाहीं. व्यक्तीचे आयुष्याचा अंतरंग, त्याच्या मनांतील गूढ प्रवृत्ति या अमाप आहेत. स्फूर्त प्रेरणेप्रमाणें आलेल्या अनुभवांचे हांकेनें तो बाहेरच्या क्षेत्रांत साद मिळेल म्हणून नवीं नवीं क्षेत्रें शोधीत असतो व नवेनवे संबंध उत्पन्न करीत असतो. त्याचे मित्र, त्याचे विचार, त्याची संस्कृति, आयुष्यांतील संधि व प्रगतीही त्यानें निर्माण केलेल्या संबंधाच्या धोरणानें निश्चित होत जातात. हरिजनांत काम सुरू केल्यानें जन्मजात वातावरणास मुकावें लागतें, 'भ्रष्ट' म्हणून म्हणवून घ्यावें लागतें. कामगारांत न्यायाची हांक ऐकून काम सुरू केलें म्हणजे शिष्टांचें वैर पत्करावें लागतें. स्वातंत्र्याचे प्रेरणेला प्रामाणिक राहून काम सुरू केलें म्हणजे हारांबरोबर तुरुंगवास, प्रसंगीं प्राणत्याग पत्करावा लागतो. तथापि जे संबंध व्यक्ति निर्माण करीत असते त्यांच्या साहाय्यानें तो ध्येयाकडे पाऊल टाकीत असतो हेही निश्चित आहे. हे संबंध व या संस्था त्याचें कार्य सुकर करीत असतात. त्याला कर्तव्यक्षेत्र उत्पन्न करीत असतात. त्याच्या भावनांना, त्याच्या कर्तृत्वाला तेथें संधि मिळत असते. एकट्यानें जें करणें अवघड व अशक्य तें संस्थांमुळें व संघांमुळें सोपें व हलकें होतें. ज्या प्रमाणांत समाजोपयोगी कार्याला अवश्य लागणारा उद्योग या संस्थांतून निर्माण होईल, त्या प्रमाणांत त्याला एक प्रकारें समाधान वाटतें व त्याबरोबर एक प्रकारची त्याचे ठिकाणीं विजिगीषा उत्पन्न होते. संस्थांचे सहाय्यानें व सहकार्याचे बलावर प्रतिष्ठा हस्तगत करून तो परिस्थितीवर आपली मांड बसवितो व सिद्धीचा टप्पा गांठतो. या परिस्थितींत या संस्था त्याला विशेष महत्त्वाच्या वाटतात. त्यांच्यायोगें त्याचें व्यक्तित्व प्रकट झालेलें असतें. त्यांच्या परंपरांबद्दल त्यांच्या प्रतिष्ठेबद्दल त्याला आपुलकी व अभिमान वाटतो त्यांच्या वातावरणांत त्याचे वागणुकींत मोकळेपणा असतो. त्याच्या आयुष्याशीं त्या निगडीत झालेल्या असतात. त्याच्या भावनामय आयुष्यांत त्यांचा ठसा उमटलेला असतो. त्या म्हणजे त्याच्या आयुष्याच्या प्रतिष्ठा त्याला वाटतात आणि म्हणून त्यांच्यांवरील त्याची निष्ठा अलौकिक, अपार व असामान्य असते. त्याच्या आयुष्यां-

तून त्यांना तेवढें वजा करा म्हणजे त्याला तें निर्जीव, निःसत्व व निरर्थक वाटतें. त्यांच्यामुळें जगांतील घटनांचा अर्थ तो लावूं शकतो, त्यांच्याशिवाय जग म्हणजे असंबद्ध गोष्ट, अव्यवस्थित कारभार त्याला वाटतो. त्यांच्यामुळें त्याला आपल्या मतांच्या लोकांबरोबर सहकार्य करण्याची संधि मिळते, त्याचे कर्तृत्वाला यशोशिखर गांठतां येतो. त्यांचेशिवाय तो शून्य असतो. पण त्यांच्या संघटना त्याचे मागें आल्याबरोबर दोन शक्तींची बेरीज न होतां गुणाकार होऊन ती दसपट होते. संस्थांचें महत्त्व व स्थान व्यक्तीचें आयुष्यांत असें आहे.

संघ हे मनुष्याला अवश्य व त्यांचें महत्त्व त्याचें जीवनाचे दृष्टीनें अत्यंत आहे असें मानण्यानें ते निर्दोष आहेत अगर सर्व ठिकाणीं व सर्व काळीं हितप्रद ठरतात असें नाहीं. राष्ट्र-राज्याची प्रवृत्तींचे दृष्टीनें ही छोटी आवृत्ति आहे. तीच असहिष्णुता, तोच आग्रहीपणा येथेंही दिसतो. स्वतःशिवाय अन्य हें अपुरें स्वसंरक्षणाचे, स्वोन्नतीचे दृष्टीनें जें आपले तेंच एकमेव साधन मानणें, ही प्रवृत्ति संघटनेंतही दिसून येतें. सभासदाकडून तशीच अविवेकी निष्ठा अपेक्षिली जाते. गुणाच्या परमाणूंना पर्वत करण्याचा उद्योग प्रत्येक सभासदाकडून अपेक्षिला जातो. दोषाबद्दल मौन, जर जमलें तर त्यांनाही गुणाची कल्हई देण्याची कारागिरी सभासदांचें विशेष कर्तृत्व मानलें जातें. दोषदिग्दर्शन, आत्मनिरीक्षण, मोकळ्या मनानें केलेली टीका ही अश्रद्धेचीं लक्षणें समजलीं जातात. टीकेच्या अभावीं अद्वितीयत्व व अप्रमादत्व यांचा अभिमान उत्पन्न होतो. मग तेथें विरोध मोह मानला जातो. सभासद व्यक्तीपुढें सत्य का शिस्त असा प्रश्न उपस्थित झाला म्हणजे त्याला सत्य सोडावें लागतें, नाहीं तर शिस्तभंगाखालीं अपमान, अपमृत्यू, अवहेलना, यांना बळी पडावें लागतें. शिस्तीचें 'रेचक' घेऊन प्रकृति निर्दोष करण्यांत येते. नको असलेले जीवजंतू बाहेर काढले जातात. एकजात श्रद्धान्वित 'महान्' नेत्यांचे मागें जाणारे अगर 'मध्यवर्ति प्रमेय' ( Central Thesis ) उचलून धरणारे, 'निष्ठावंत कार्यकर्ते' ऊर्फ 'होयबा' यांनाच फक्त मग त्या संघांत स्थान राहातें. स्वपक्ष तोच सत्पक्ष मानला जातो. पक्षाला आकलन झालेलीं सत्यें अर्धवट असलीं तरी तीच पूर्ण व एकमेव समजलीं जातात. समाजहिताची त्याची दृष्टि तीच एक खरी मानली जाते. नव विचार तेथें मूळच धरत नाहींत. नाविन्यता ही परंपरेचा भंग करणारी म्हणून तेथें पायसुद्धां ठेऊं शकत नाही. अन्य संघांशीं, अन्य पक्षांशीं प्रत्यक्ष संघर्ष सुरू झाला म्हणजे असहिष्णुता तीव्रतम होते. आपल्या संघाच्या योग्ययोग्यतेबद्दल नुसता संशयसुद्धां प्रदर्शित करणें कठीण होतें. संघाची संघटना जितकी अधिक प्रभावी होईल तितक्या

प्रमाणांत त्यांतील नेते व अनुयायी यांच्यांतील संबंध अंधानुकरणाचा होतो. राज्यकर्त्यांचे जसे खास संबंध उत्पन्न होतात तसे नेत्यांचेही उत्पन्न होतात. अनुयायी व नेते यांच्यांतील संबंधांत अनेक वेळां भिन्नता व विरोधही उत्पन्न होतो. या परिस्थितींत एकीची आवश्यकता विशेष प्रतिपादली जाते. नेते यांचें ऐकलें पाहिजे अशी एकच उठावणी होते. केलेली निवड अगर निर्णय त्यांचें हितसंबंधाचे दृष्टीनें, मग ते हितसंबंध भौतिक असोत अगर अध्यात्मिक असोत, अयोग्य वाटतात व तो हवा म्हणून विवेकानें केलेलें अंधभक्तीनं बदलण्यांत येतें. संघाशीं, पक्षाशीं समरस झालें म्हणजे विवेक आकसतो, बुद्धीपेक्षां भावनेला जास्त वाव मिळतो. दृष्टि विशाल होण्याऐवजीं संकुचित होते. तडजोडीऐवजीं ताठरपणा प्रभावी होऊन विचारविनिमय करून निर्णय घेण्यापेक्षां, बिनशर्त मान्यतेची प्रवृत्ति जोपासिली जाते. थोडक्यांत राज्य जसें वागतें तसेंच हे संघ अगर पक्ष वागतात. दोन्हीकडे माणसेंच असतात व दोन्हीकडेही तेच गुणदोष दिसून येतात. तथापि राज्य व अन्य संघ यांत एक मोटा फरक आहे. राज्याचें सभासदत्व सोडतां येत नाहीं व तें सक्तीचें आहे. जो एखादादुसरा जाहीरपणें आपलें नागरिकत्व नाकारीत असतो तो वस्तुतः राज्यावर नाराज होऊन तसें करीत नसतो तर विद्यमान राज्यसत्तेवर ( Government ) तो नाराज असतो. राज्य या संघाची आज्ञा लादण्याची बलव्यवस्था राज्याजवळ असते व ती वापरण्याचा त्याचा अधिकार आहे. इतर संघांत हें कांहीं नाहीं. स्वेच्छेनें लोक त्यांत येतात, पटत नसेल तर ते जातात. चालू आहे ते बदलावें असें सामान्यतः कोणास वाटत नाहीं. चाललें आहे तें ठीक आहे असें मानणारेच बहुसंख्यांक असतात. विरोध करण्यापेक्षां मुकाट्यानें ऐकण्याकडेच जनतेची सामान्यतः प्रवृत्ति असते. म्हणून राज्याव्यतिरिक्त संघांतूनसुद्धां याच प्रवृत्तीचे लोक पुष्कळ असतात. तथापि या संघांतून नापसंत असेल तेव्हां सोडून जातां येतें म्हणून, सभासदांच्या विचारविनिमयाला अधिक स्थान असतें; त्यांचे मताला अधिक मान दिला जातो. उदासीनता अगर यांत्रिक आज्ञाधारकत्वावर केवळ विश्वास ठेवून संघांची कार्यें होत नसतात, सभासदांची विचारपूर्वक व खुषीची संमति असेल तर संघाचें कार्य होऊं शकतें. लाटीमार खाण्याची, तुरुंगांत हालअपेष्टा सहन करण्याची सक्ति कोणी केलेली नसते. झालेले निर्णय ज्यांना खुषीनें, बुद्धीनें अगर भावनेनें पसंत पडतात ते आपण होऊन कार्य करतात. कोणीं न केलें तर शासन नाहीं. म्हणून कार्याचे यशाचे दृष्टीनें संघ सभासदाच्या मताला, विचाराला मान देत असतो. राज्य सक्तीनें आपले निर्णय अखेरीस अंमलांत आणूं शकतें. म्हणून त्याला विचारविनिमयाची, संमतीची मातब्बरी

तितकी वाटत नाही. राज्यानें नागरिकाची खरी निष्ठा मिळविण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे. कारण त्यावरच त्याचा आधार आहे. तथापि ही आवश्यकता संघांना, पक्षांना अधिक असते. सभासदांना पटेल असें धोरण न ठेवलें तर ते सोडून जातील ही भीति प्रभावी असते. यामुळें प्रतिगामी पक्ष हळू हळू पुरोगामी होतात. सनदशीरपक्ष याच कारणामुळें क्रांतिकारक योजना मांडीत असतात. क्रमाक्रमानें घ्यावें म्हणणारा पक्ष क्रांतिकारक मार्गाकडे यामुळेच वळत असतो. अधीर सभासद, अस्थिर सभासद पक्षाविरुद्ध बंड उभारण्याची भाषा बोलूं लागले कीं, पक्ष त्या दृष्टीनें थोडा तरी पुढें सरकतोच. कुठलाही पक्ष अगर संघ जुन्या कर्तृत्वावर जगूं शकत नाहीं. इतिहास अभिमान उत्पन्न करतो पण विद्यमान निष्ठेवर मालकी प्रस्थापित करूं शकत नाहीं, ती विद्यमान कर्तृत्वानेंच येते. म्हणून संघ शेवटीं जे त्याचे सभासद रूप देतील तें रूप धारण करतो. सभासदांची निष्ठा जर त्यांना संघाची उपयुक्तता वाटणार नाहीं तर राहणार नाहीं. त्याचे कार्य त्यांच्या अनुभवाला जुळलें नाहीं तर त्याचे आदेश सभासद जुमानणार नाहींत. म्हणून सभासदांच्या अनुभवांशीं मनांशीं जुळवून संघाचे निर्णय असण्यांत त्याला निष्ठा मिळत असते, त्याचे आदेश स्वीकारले जातात.

संघ हे सर्वस्वीं मान्यतेवर कसे अवलंबून असतात हें आधुनिक जगांत धर्माकडे पाहिलें म्हणजे सहज दिसून येईल. शासनशक्तीचे अभावीं हें सर्व निष्प्रभ आहे. ज्या शंकराचार्यांचीं आज्ञापत्रें शिरसावंद्य वाटत होतीं त्यांना आतां कोणी विचारीत नाहीं. धर्मपिठाचा अधिकार लोकांनीं मानला तर आहे. लोकांनीं मानावें असे कार्य त्याकडून होत नाहीं म्हणून मान्यता विराम पावली आहे. लोकांना व्यवहारांत येणारे अनुभव व अडचणी यांना पारखा झालेला धर्म कोणीं व कोठूनही सांगितला तरी तो मानला जाणार नाही. अपरिवर्तनवादी धर्म व परिवर्तनवादी व्यवहार यांचें कधींच जुळणार नाही. या परिस्थितींत वाईट दिवस पहिल्याचे वांट्याला येणें क्रमप्राप्त आहे. तीच गोष्ट अन्य ही ठिकाणीं दिसून येते. संघाचा अधिकार जोंपर्यंत त्याचे सभासदांचा विश्वास त्याचे कार्यावर आहे व त्याचा आदेश ऐकण्यास ते तयार आहेत तोंपर्यंतच आहे. त्यांची निष्ठा हाच अधिकाराचा आधार आहे, आत्मा आहे. सभासदांची निष्ठा ओसरली कीं, तोही निःसत्त्व होतो. त्यांची निष्ठा वाढली कीं तोही फोंफावतो. संघ सामाजिक व्यवहारांत व क्षेत्रांत काय करूं शकेल हें सर्व व्यक्तिगत सभासदाचें निष्ठेवर या दृष्टीनें अवलंबून आहे. व्यक्तीला येणाऱ्या अनुभवानें निष्ठा आकार घेत असते. पात्राप्रमाणें नदीचा प्रवाह गति देत असतो. एकच घटना व्यक्तिपरत्वें अनु-

भव क्षेत्रांत निरनिराळे परिणाम करीत असते. त्याला अनुसरून निष्ठा उथळ अगर गंभीर बनत असते. आलेला अनुभव व्यक्तीला अभिप्राय ठरविण्यास भाग पाडीत असतो. अनुभवाचे आधारें व्यक्तीला निवड करावी लागते. हें करावें कां तें आणि ती निवड म्हणजे तिचा अभिप्राय होतो. कायदा अन्यायी आहे व तसा अनुभवही आला आहे. तो मानावा का विरोधावा यांत निवड करून व्यक्तीला वागावें लागतें. अभिप्रायानें व्यक्ति कशाला महत्त्व देते, कोणतें मूल्य ती मानते हें स्पष्ट होतें. तो मानावा असा तिनें निर्णय घेतल्यास तिच्या अभिप्रायाचा अर्थ न्यायापेक्षां, सत्यापेक्षां, सुव्यवस्था तिच्या दृष्टींत अधिक ठरली. विरोध करावा असा निर्णय घेतला तर तिच्या अभिप्रायाचा अर्थ अधिकारापेक्षां, सत्तेपेक्षां, सत्य, श्रेष्ठ तिनें मानलें, न्याय अधिक मानला. व्यक्तीनें ठरविलेल्या अभिप्रायानें तिला शासन अटळ होईल असेंही होईल. सत्तीनें भरती केलेला सैनिक पाशवी बल हे अनैतिक आहे असें मानून शस्त्र खालीं ठेवील तर त्याला देहान्त शासनही स्वीकारावें लागेल. कांहीं प्रसंगीं अभिप्रायामुळें, केलेल्या निवडीमुळें, तिरस्कार, सामाजिक बहिष्कार, टिंगल, टीका, असेंही प्रायश्चित मिळेल. निवड याचा अर्थ कमीजास्त प्रमाणांत प्रायश्चित्ताला, शासनाला तयार असणें हाच आहे. पटलेल्या मार्गानें एकटें जावें लागलें, स्वीकारलेल्या निर्णयानें सर्व जगाचा राग जरी ओढविला जात असला, निश्चित केलेल्या कार्याचें सख्यत्वासाठीं, जिवलगांच्या गांठी जरी तोडाव्या लागत असल्या, तरी ते करणारे महान् पुरुष निघतात. कारण अनुभवानें जो सत्याचा साक्षात्कार त्यांना झालेला असतो. त्यावर त्यांची श्रद्धा संपूर्ण असते व या अचल श्रद्धेपुढें सर्व शक्ति, सर्व संकटें व्यर्थ ठरतात. अशी श्रद्धा ही सर्व अधिकाराला, सर्व सत्तेला, मग ती स्वेच्छेनें दिलेली असो अगर अन्य स्वरूपाची असो, मर्यादा घालते. निष्ठा कधींही लादली जात नाहीं, ती मनांत उत्पन्न व्हावी लागते. व्यक्तीचे अनुभवांतून ती निर्माण होऊन तेथेंच वाढावी लागते व ती राखावयाची असेल तर त्या संघाचें, त्या संघटनेचें कार्य व्यक्तीचे गतिमान अनुभवाशीं सारखें जुळतें राहील असेंच असलें पाहिजे. राज्याला अगर अन्य संघाला सर्वत्र व सर्वांची निष्ठा कायम मिळत राहील हें अशक्य आहे. मनुष्यांची मति पिंडापिंडांत भिन्न आहे म्हणून त्यांचे अनुभवही भिन्न असणार. त्या सर्वांचा सर्वमान्य समन्वय होणें दुरापास्त आहे. सर्व माणसें अगदीं एकजिनसी होतील हें अशक्य आहे. कांहीं सांधमोड होऊन जुळणी होईल. त्या जुळणीमुळें रुचीही उत्पन्न होईल. तांदूळ आधणांत टाकून शिजतात, मऊ होतात, एकमेकाला चिकटतात पण प्रत्येक दाणा अगर शित पृथक् दिसतच असतें. संकटांत अगर सोईसाठीं माणसें जुळवून

घेतील, पण ज्याचें त्याचें व्यक्तित्व कमीजास्त प्रमाणांत राहीलच. जाणीव व अनुभव ही जमावानें येत नसतात तीं व्यक्तिगतच असतात. ज्याचें शहाणपण, ज्याची बुद्धी ही ज्याची त्याला, ज्याचा त्याचा अनुभव हा एक प्रकारें त्याच्या त्याच्यापुरता खास असतो. यामुळें माणसें एकत्र येतात व याचमुळें पृथक्पणही त्यांच्यांत येतें. त्यांचा एकरंगी एकजीव रांधा होणें शक्य नाहीं. जास्तींत जास्त सारखेपणा काढून, जास्तींत जास्त एकी व एकता उत्पन्न करून शेवटीं प्रत्येक व्यक्तींत असें कांहीं क्षेत्र त्याच्या जीवनाचें राहतें कीं, दुसऱ्या कोणत्याही तत्सम क्षेत्राशीं तें जुळत नाहीं. ही अवस्था कांहींना व कांहीं प्रसंगीं असुखदायक वाटत असली तरी ती अटळ आहे. प्रत्येक मनुष्य या दृष्टीनें पृथक् असल्यानें पटणाऱ्या घटनाचांच अर्थ तो समजत असतो. न पटणारें त्याला कांहीं बोध करूं शकत नाहीं; कारण अनुभवाचे अभावीं ते सर्व त्याला अर्थशून्य असतें. अनुभवाचे अक्षरांत लिहिलेलें व अनुभवाचे व्याकरणानें जें त्याला शुद्ध वाटलें तेवढेंच तो समजतो. नाना छंद, नाना वृत्तें, नाना चालींत ज्यांची रचना झाली आहे असें महाकाव्य म्हणजे मानवसमाज. विविधता हें त्याचें लक्षण, त्याचें वैभव व शक्ति आहे, प्रसंगीं नाश करणारा शापही आहे!!

वरील विचारसरणींत एक गोष्ट स्पष्ट होते व ती ही कीं, समाजांत एकजिनसी एकी नसते. निरनिराळ्या क्षेत्रांत निरनिराळ्या प्रसंगीं एकीचीं केंद्रें निर्माण होतात व त्यांच्या साहाय्यानें मनुष्यें आपलीं ध्येयें साध्य करण्याचा प्रयत्न करीत असतात. एकी हें ध्येय नसून एक साधन हेतूचे सिध्यर्थ असते. संघासाठीं मजूरसंघ काढला जात नाहीं तर कामगारांचे हित साधण्याचे दृष्टीनें तो काढला जातो. त्या दृष्टीनें व तेवढ्यापुरते सभासद एकत्र येतात, एकीचें वर्तुळ उभें करितात. मजूर संघांत आल्यानें सर्व सभासदांचे जीवनांत सर्व दृष्टीनें एकी उत्पन्न होते अगर झाली असें मानणें गैर आहे. मनुष्याचें जीवन इतकें व्यापक, इतकें अथांग आहे कीं, कोणा एका संघांत, राज्यांतसुद्धां सामावलें जात नाहीं. थोड्या थोड्या प्रमाणांत मनुष्यें एकत्र येत असतात. तेवढ्यापुरती एकी त्यांच्यांत निर्माण होते. मजूरसंघांत आला म्हणून सभासदांचें जीवनसर्वस्व त्यांत ओतलें जात नाहीं. राजकीय पक्षांत येऊन धार्मिक व आर्थिक बाबतींत स्वतंत्र व भिन्न भिन्न जीवन सभासदांत असूं शकतें. सनातनवृत्तीचा असून कॉंग्रेसपक्षांत कोणी नांदूं शकतो. सामाजिक समता हवी म्हणून निघालेल्या संघांत राजकीय दृष्टीनें प्रतिगामी व क्रांतिकारक एकत्र येऊं शकतात. साहित्यिकांचे संघांत, मालक-मजूर, सनातनी-सुधारक, सनदशीर राजकारणी व व क्रांतिकारक एकाच भाषेचे पात्रांत सहभोजन करतांना दिसतात. तात्पर्य, अनुभव-

परत्वें, आकांक्षापरत्वें, हितपरत्वें एकीचीं केंद्रें उत्पन्न होतात व त्यांचा आशय व अधिकारही तेवढ्यापुरताच मर्यादित असतो. मानवी मनाचा अंत लागत नसला तरी मानवाला अंत आहे, अनुभव हा मात्र स्पर्शानें, इंद्रियद्वारें येत असल्यानें, व्यक्तिपुरती त्याला मर्यादा आहे, म्हणून व्यापक अनुभवासाठीं संघाची आवश्यकता वाटते. प्रत्येकाला प्रत्येक गोष्ट प्रत्येक दृष्टीनें अनुभवाला येणार नाहीं हें उघड आहे. जें मला चांगलें वाटतें ते दुसऱ्यांना चांगलें वाटणार नाहीं. उलट दुसऱ्यांना जें हितकर वाटतें ते मला अहितकारक वाटेल. तथापि जें कांहीं वाटत असेल तें सत्य धरून, त्यांतून जुळणी करून, एकीचीं केंद्रें निर्माण होत असतात. त्यांतून समान हेतूही दिसून येत असतात. हेतुमध्यें बरीच साम्यता असल्यामुळें समाजांत सुव्यवस्था व शांतता प्रभावी होतात. सारख्या हेतूसाठीं, समान ध्येयासाठीं एकत्र आलें म्हणून त्यांत सर्वशः एकी निर्माण झाली असें नाहीं, अंशात्मक एकी उत्पन्न होते. प्रत्यक्ष व्यवहारांत एकी दिसते पण तीही पूर्ण नसते. कारण व्यवहारांतील घटनांचे परिणाम व्यक्तिपरत्वें भिन्न भिन्न होत असतात. समाजांत सर्व कांहीं सूत्रवत् चाललेलें दिसत नाहीं. नाना प्रवाह, नाना प्रकार असें विविध स्वरूप त्याचें दिसतें.

समाजांत विविधता मुळांतच आहे, त्यांतून मनुष्यें एकीचीं केंद्रें निर्माण करीत असतात. कांही सारखेपणामुळें एकत्र येतात. कांहींच्यांत सारखा फरक असतो यामुळें एकत्र येतात, सारख्या भावनेंतून निर्माण होणाऱ्या प्रवृत्तीमुळें कांहीं एकत्र येतात. कांहीं तरी जोडणारे संबंध मनुष्य शोधीत असतो व एकीची केंद्रें घडून येत असतात. पण ही एकी अंशात्मक असते, व मनुष्यें आपण होऊन तीं घडवीत असतात. जेवढ्यापुरती सहानुभूती, जेवढ्यापुरता सहविचार असेल तेवढ्यापुरतेंच या एकीचें क्षेत्र मर्यादित असतें. मालकसंघाचे सभासद राजकारणांत भिन्न पक्षीय असूं शकतात. शिक्षकसंघाचे सभासद राजकारणांत अगर धर्मानें भिन्न असूं शकतात. चालू युद्धाबद्दल त्यांचीं मतें भिन्न असतील, समाज सुधारणेबाबत त्यांचें एकमत असणार नाहीं. तात्पर्य प्रत्यक्ष आपण होऊन निर्माण केलेल्या एकीचे क्षेत्राबाहेर प्रत्येकजण भिन्न असतो. एकीच्या केंद्रांतील विषयापुरती त्यांची सहानुभूति, त्याचे विचार सारखे असतात. जीवनसर्वस्व कुठल्याही मनुष्याचें त्यांत येत नाहीं. हीं निरनिराळीं केंद्रें कांहीं योजनेनें निर्माण होतात असें नाहीं. त्यांत कांहीं सूत्रबद्धताही नसतें. एका चित्रपटकथेचे सोयीप्रमाणें अलग अलग चित्रित केलेले हे भाग आहेत व त्यांत कथानकाचा समावेश आहे व ते जोडल्याबरोबर एक चित्रपट निर्माण होणार आहे असें येथें कांहींही नसतें. निघणाऱ्या विविध स्वरांतून स्वरसंमेलनाची श्रोत्यांना

आनंद देणारी व्यवस्था यांत असतें असेंही नाहीं. प्रत्येकाला आपला अनुभव तेवढाच दिसत असतो. व तो तेवढाच त्याला निश्चितपणें खरा वाटत असतो. त्याच्या अनुरोधानें तो काय मानावें काय मानूं नये याची स्मृति स्वतःपुरती तयार करीत असतो, व ती स्वतःच त्यानें केली असल्यामुळें तिचा अधिकार त्याचे जीवनावर प्रभावी असतो. 'माझी पद्धत अशी आहे' असें जेव्हां मनुष्य म्हणतो तेव्हां त्याचा अर्थ हाच असतो. त्याचें मत व त्याची सदसद्विवेकबुद्धि यांची मान्यता त्यांत समाविष्ट असते; किंबहुना ही 'पद्धत' अगर 'स्मृति' त्याचाच एक भाग असतो असें म्हटलें तरी चालेल. म्हणून स्वतःचे पद्धतीशीं न जुळणाऱ्या पद्धतीचा स्वीकार करण्यास मनुष्य तयार नसतो. आपला अनुभव, आपला अभिप्राय बाजूला सारून दुसऱ्याचा जो पटत नाहीं व आपल्या अनुभवांशीं जुळत नाहीं, त्यांचें मानण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति नसते. सर्वांच्या इच्छा, सर्वांचे अनुभव यांत संपूर्णपणें एकता अगर एकसारखेपणा कधींच असणार नाहीं. व्यक्तिपरत्वें थोडें तरी पृथकत्व, थोडी तरी भिन्नता राहणारच. म्हणून दोन माणसें एकत्र येतात ती ही जाणीव ठेऊन, स्वत्व सोडून नव्हे तर स्वत्व राखून पण जेवढें समान असेल त्यांत सहकार्य करण्यासाठींच. एकीचीं केंद्रें शोधावयाचीं ती स्वत्व घालविण्यासाठीं नव्हे, दुसऱ्या कोणाचें बुद्धीप्रमाणें चालण्यासाठीं नव्हे, तर जेथें स्वतःचें असें कांहीं देऊन, दाखवून, निर्णयास मदत करून जें समान आहे त्यांत उन्नति करण्यासाठीं, सिद्धी मिळविण्यासाठीं. स्वातंत्र्य नष्ट होणारें सहकार्य करण्यास व्यक्ति तयार होत नाहीं, तें राहून होणाऱ्या सहकार्यांत तो मनापासून भाग घेण्यास तयार असतो, किंबहुना असल्याच सन्माननीय व स्वायत्त सहकार्याची त्याला गरज भासते.

एकीचे मागें ही विचारसरणी प्रभावी असलेमुळें, एकीचें महत्त्व हें विशेष नसून ती कशासाठीं आहे हें महत्त्वाचें ठरतें. मी संघांत आलों हें मला महत्त्वाचें वाटत नसून मी आल्यानें त्यांत काय झालें, त्याचें काय कार्य झालें, त्यांत मीं काय केलें हें मला महत्त्वाचें वाटतें. माझ्या अभिप्रायाचा, माझ्या गरजेचा तेथें जसा विचार झाला असेल, माझा भाग त्याचे कार्यांत आहे हा विश्वास जसा असेल, तशी माझी निष्ठा संघाबाबत दृढ होत जाते. हें व्हावयाचें म्हणजे मी माझें म्हणणें मांडलें पाहिजे, माझ्या अपेक्षा बोलून दाखविल्या पाहिजेत. होणाऱ्या निर्णयांना मी मान्यता द्यावी यासाठीं मी त्यांत भाग घेतला पाहिजे. जें होईल त्यांत मी कांहींच भाग घेतला नाहीं व झालें म्हणजे त्याप्रमाणें मी वागूं लागलों तर त्यांत मी जुळवून घेतलें मान्यता दिली असें होईल, पण जी आपुलकी वाटावयास पाहिजे ती वाटणार नाहीं. कारण

जें झालें त्यांत माझें असें कर्तृत्व कांहींच नाहीं. आपण कांहींच त्यांत केलें नसल्या-मुळें त्यांतून कांहीं नवें निर्मावें अशी विधायक प्रवृत्ति मग तेथें उत्पन्न होत नाहीं. जें झालें असेल, जे निर्णय घेतले असतील, ते कदाचित् माझ्या अभिप्रायासही जुळ-तील. पण तेवढयानें मी भाग न घेण्याचें क्षम्य अगर योग्य ठरत नाहीं, नव्हे हिता-वहही ठरत नाहीं. एखादा संघ, एखादें संघटन, जर माझ्या कार्यक्षेत्रासाठीं म्हणून निर्माण व्हावयाचें असें असेल तर त्याचे निर्मितींत मी भाग घेणें केव्हांही इष्ट आहे. एखादी योजना माझे जीवनावर परिणाम करणारी असेल तर ती उभी करण्यांत माझाही हात असला पाहिजे. मी भाग घेतल्यानें मला मनपसंत असें सर्वस्वीं होईल असें नाहीं. तथापि जाणूनबुजून मला धोका देण्यासाठीं अगर मी वंचित व्हावें म्हणून तें घडवून आणण्यांत आलें असें म्हणतां येणार नाहीं. कारण तें घडवून आणण्यांत मीही जबाबदार आहें. यामुळें ते मानण्याची, त्याबद्दल निष्ठा दाखविण्या-ची नैतिक जबाबदारी मजवर येते. जे निर्णय मी घेतले नाहींत, जे घेण्यांत माझा भाग नाहीं, त्यांत मी भर घालूं शकत नाहीं. मला ते जसेच्या तसे स्वीकारले पाहिजेत अगर विरोध केला पाहिजे. असले निर्णय म्हणजे मी या घटकेला ज्या तुरुंगाचे खोलींत बसून लिहीत आहें तिच्या स्वरूपासारखे आहेत. माझ्या घरांतील व्यवस्थेंत मी कमीजास्त करून, व्यक्तित्व दाखवून समाधान निर्माण करूं शकतो. या खोलीचे व्यवस्थेंत मी कांहीं एक फरक करूं शकत नाहीं. फार काय त्रास देणाऱ्या चिमण्यांना सुद्धां प्रतिबंध करण्याचा वाव येथें नाहीं. व्यवस्थेचा व वागणुकीचा एकसारखेपणा यांत बदल करणें येथें अशक्य आहे. माझें व्यक्तित्वाचा रंग मी भरूं शकत नाहीं. मी व ही परिस्थिति यांत कांहीं संबंध नाहीं. माझ्या विकासानें यांत बदल होणार नाहीं. ती व मी अलग. माझ्या मनांतील संवेदना या व्यवस्थेवर उमटण्यासाठीं अवश्य तें माध्यम येथें नाहीं. अगदीं हेंच जे समाजव्यवस्थेंतील निर्णयांत भाग घेत नाहींत त्यांचें होतें. त्यांचें मन, त्यांचा अनुभव व समाजांत घडणारे व्यवहार यांच्यां-तील संबंध तुटतो. समाजव्यवस्थेंतील होणाऱ्या कार्यांत, होणाऱ्या निर्णयांत, मनुष्य सहभागी झाला, आपले अनुभव, आपले मत, तेथें व्यक्त करून निर्णयाची जबाबदारी स्वीकारूं लागला म्हणजे त्याला विचारांना, आदर्शांना आविष्कार करण्याचें माध्यम प्राप्त होतें. कांहीं तरी प्रमाणांत तो आपल्याला सफल झालेला पाहत असतो. नाहीं तर जें ठरलें असेल तें, जें होत असेल तें, व्यक्तित्व मारणारें असलें तरी मानलें पाहिजे. तें बदलण्याची शक्ति त्याच्यांत कचितच असते. निर्णयाच्या कोठडींत निर्बंद्ध होऊन राहावें लागलें, अपूर्णता हेंच त्याचें भाग्य ठरतें.

मनुष्याला पूर्णत्व यावें, त्याचें विकासास पूर्ण वाव मिळावा म्हणून मनुष्य-मात्राला त्याच्यावर परिणाम करणाऱ्या सर्व निर्णयांत भाग घेण्याची संधि मिळाली पाहिजे व हें शक्य करणारें असें अधिकार-व्यवस्थेचें स्वरूप पाहिजे, म्हणजे केवळ एकानें सांगावें व दुसऱ्यानें ऐकावें असें राहाणार नाहीं. स्वायत्त पण सन्माननीय सहकार्य तेथें व्यक्तीला उपलब्ध होईल असें त्या व्यवस्थेचें स्वरूप राहिलें म्हणजे संयुक्त स्वरूपाचें तें असेल. समाजाचें स्वरूपही त्याच प्रकारचें आहे. संयुक्त स्वरूपाचे या व्यवस्थेंत व्यक्ति, संघ व राज्य या सर्वांचा व त्यांच्यांतील परस्परांत उत्पन्न होणाऱ्या संबंधांचाही विचार करावा लागेल. प्रत्येकाचे कृत्यानें, प्रत्येकाचें परस्परांतील संबंधां-वर परिणाम होत असतो. व्यक्ति जेव्हां राज्याची आज्ञा मानते, तेव्हां सर्व परि-स्थितीचा विचार करून ती मानते. या आज्ञा देण्याचे व आज्ञा मानण्याचे क्रियेंत व्यक्तीच्या अनेक हितसंबंधांचा प्रश्न निगडित झालेला असतो. संप जाहीर झाला आहे व चालू आहे, तो यशस्वी व्हावा म्हणून निरोधन चालू आहे, सरकारनें तें बेकायदेशीर ठरविलें, या परिस्थितींत सरकारचें ऐकण्यानें विविध परिणाम होतील, न ऐकण्यानेंही तितकेच होतील. व्यक्ति व राज्य येवढाच भाग यांत येत नसून, ज्या संघानें संप जाहीर केला आहे, व ज्याचा सभासद ती व्यक्ति आहे त्याचे हक्कही, त्याचें हितसंबंधही, यांत गोवले गेले आहेत. व्यक्तीनें राजाज्ञा पाळावी कीं, संघाच्या हक्कासाठीं झगडावें हा प्रश्न व्यक्तीपुढें उभा राहातो. वर्षानुवर्षे गेलेल्या मार्गानें पालखी नेण्यास सरकारनें बंदी केली; व्यक्तीनें काय करावें, राजाज्ञा पाळावी का धार्मिक परंपरेसाठीं झगडावें ? हा प्रश्न तिजपुढें येतो. विविध क्षेत्रांतील व्यक्तींच्या श्रद्धांवर राज्याज्ञेमुळें परिणाम होत जातो. व्यक्तीनें राज्याज्ञेला जुळवून घेण्यांत व्यक्तीचें हित व समाधान आहे हें व्यक्तीला पटवून दिलें पाहिजे. पटवून देण्याचा मार्ग म्हणजे वटहुकूम नव्हे, बिना चौकशी काढलेला फतवा नव्हे, विचारविनिमय करून, मतें समजावून घेऊन, सर्वांच्या अनुभवाला आळवून, निर्माण झालेल्या निर्णयाची इष्टता पटत असते. झालेला निर्णय हा सर्वांचा व प्रत्येकाला आपला असा वाटला पाहिजे, सहकार्याचें तो फळ असला पाहिजे. मानावयाचा म्हणून मानावयाचा असा निष्क्रिय भाव उत्पन्न न होतां कांहीं तरी विशेष केलें आहे असा गौरवाचा, आत्मविश्वासाचा भाव उत्पन्न होऊन, कांहीं तरी अधिक करावें अशी ओढ त्यामुळें लागली पाहिजे. आपल्या कर्तृत्वाची साक्ष त्यांत व्यक्तीला दिसू लागली म्हणजे त्याला आपल्या शक्तीचा साक्षात्कार होतो, पूर्णत्व येण्याचे दृष्टीनें मग त्याचे प्रयत्न होतात, त्याचें वैभव त्याला प्राप्त होतें. समाजव्यवस्थेंत या रीतीनें व्यक्ति स्थाचा राव झाली पाहिजे. वरील विचार-

सरणींत समाजांत स्वयंसिद्ध एकी आहे व ती कायम ठेवण्यासाठीं राज्याला अमर्याद प्रभुत्व दिलें पाहिजे; कारण राज्य हें त्या एकीचें एकमेव प्रतीक आहे ही विचारसरणी अग्राह्य मानली आहे. मनुष्यें ही ऐका बाराखडींत बसतील इतकेसुद्धां कांहींच्या मतें साम्य त्यांच्यांत नाहीं. त्यांचे जीवनांत विविधता आहे, तथापि जें कांहीं साम्य आहे तें वाढवून, नवीन नवीन साम्यसंबंध शोधून, एकीचीं केंद्रें वाढवून वागण्याची त्यांची प्रवृत्ति असते. समाजाला एकीची जरुरी असते म्हणून ती घडवून आणावी लागते. तीच कशी घडून येते हाच मुख्य प्रश्न आहे. समाजांत एकी व्हावी याचा अर्थ जे विद्यमान सत्ताधीश आहेत त्यांच्या विचारांबरहुकूम वागण्यानें ती व्हावी अगर होणार आहे, असें असेल तर व्यक्तिभक्षक ती एकी होईल. चालू शिक्क्याप्रमाणें जशीं सर्व नाणीं असतात तशी एकी, तसा एकसारखेपणा होईल. सहकार्य असें तेथें असणार नाहीं. एकानें सांगावें व दुसऱ्यानें ऐकावें; यांत जें सहकार्य असेल तेवढेंच तेथें असेल. वाघ आणि शेळी यांचें जें सहकार्य तेंच ही अनियंत्रित सत्ता व गरीब जनता यांच्यांत राहील. सहकार्यानें एकी व्हावयास पाहिजे व तें सहकार्य असें असलें पाहिजे कीं, प्रत्येकाचे हितसंबंध तेथें येतील व जे निर्णय घेतले जातील, जी घटना निर्माण होईल, त्यांत प्रत्येक हितसंबंधाला, कांहीं तरी मिळालें असें वाटेल व ज्यामुळें झालेल्या निर्णयांतून, झालेल्या घटनेंतूनच अधिक मिळण्याचा विश्वास उत्पन्न होईल. म्हणजे होणारी एकी व व्यक्तिगत हितसंबंध, यांत समन्वय होईल व झालेले संघर्षाला जन्म देणारे ठरणार नाहींत. किंबहुना झालेल्या एकींत, झालेल्या घटनेंत प्रत्येकाला आपला हितसंबंध निगडित आहे असें वाटेल. जसा अनुभव येईल त्याप्रमाणें नवी नवी जुळणी होत जाईल, पण याच पद्धतीनें. यामुळें व्यक्तीचे हक्क निर्जीव अगर निरपेक्ष न राहातां, प्रभावी व परिस्थितीप्रमाणें त्यांचें स्वरूप राहील व त्यांचा उपभोग घेण्यास त्यांना वाव मिळेल. समाजांतील एकीकरण या व्यवस्थेनें होत गेलें म्हणजे अधिकाराची यथार्थता, त्याचे निर्णय ज्या प्रमाणांत लोकांना अनुभावानें योग्य वाटतील, तेवढीच राहील. या व्यवस्थेनें संघर्षापेक्षां सुव्यवस्था ही सामान्यतः श्रेष्ठ अशी वाटेल व त्यामुळें आज्ञाधारकत्वही वाढेल. पण आज्ञा ऐकावी याचें कारण अधिकारी ती करतात म्हणून नव्हे तर ती अनुभावानें ऐकणें इष्ट आहे, श्रेयस्कर आहे, हा विश्वास उत्पन्न झालेला असतो म्हणून. या दृष्टीनें सत्तेचे हुकूम चांगले अगर वाईट, इष्ट अगर अनिष्ट प्रत्यक्ष अनुभवानें ठरले जातील. म्हणून ते तयार होतांना व अमलांत येतांना ज्यांच्यावर त्यांचा अम्मल होणार आहे, त्यांचें सहकार्य असणें इष्ट आहे. जोडा कुठें लागतो हे घालणाराला कळतें म्हणून

त्याच्या अभिप्रायाला महत्त्व आहे. तयार कपडे गिऱ्हाइकावर लादण्यापेक्षां त्यांची इच्छा लक्षांत घेऊन त्यांचें मोजमाप घेऊन ते बनविले म्हणजे तो खुष असतो व खूष झाला म्हणजे घासाघीसही करीत नाहीं ! तयार कायदे, तयार निर्णय, जनतेवर लादण्यानें जनतेला ते पटणार नाहींत व घासाघीस होतच राहील. म्हणून निर्णय होण्यापूर्वी, ते होत असतांना, जनतेचें सहकार्य पाहिजे व त्याचप्रमाणें तें झाल्यानंतर त्यांची बजावणी होतांनाही पाहिजे म्हणजे ते मान्यताही पावतील व कार्यक्षमही होतील. व्यक्तीचा अनुभव मर्यादित असला तरी या रीतीनें सहकार्य केल्यानें तो व्यापक होतो, तो अलग न राहातां एका मोठ्या विशाल अनुभवाचा भाग बनतो; एका योजनेंत तो जोडला जातो. या व्यवस्थेनें व्यक्तींचा संकुचितपणा जाऊन त्यांच्यातील श्रेष्ठ हें समाजाला मिळतें व खुद्द त्यांचे विकासालाही अधिक क्षेत्र व अधिक संधि मिळते.

सर्वांच्या अनुभवांचा समन्वय करून निर्णय घेणें योग्य आहे व जरूर आहे असें मानलें म्हणजे प्रतिनिधिव्यवस्थेची गरज उत्पन्न होते. सर्व ठिकाणीं विचारविनिमयासाठीं, सहकार्यासाठीं सर्वजण येऊं शकणार नाहींत हें उघड आहे. कुणीतरी कुणातर्फें म्हणून घेतले पाहिजेत. निरनिराळ्या अनुभवांचे विषयवार अगर प्रदेशवार संकलन झालें पाहिजे. जास्तींत जास्त लोकांचा अनुभव, जास्तींत जास्त प्रमाणांत राज्यकारभारांत कसा आणला जाईल, कसा ग्रथित होईल, हा मुख्य व महत्त्वाचा प्रश्न आहे. समाजांतील अनुभव व शहाणपण कसें संकलित करून निर्णयाचें कामीं त्यांचा उपयोग करतां येईल हें पाहावयाचें आहे. निवडलेला प्रतिनिधि प्रत्येक मतदारसंघांतील अत्यंत लायक अगर श्रेष्ठ मनुष्य असतो असें नाहीं. सर्व प्रतिनिधि देशांतील उत्कृष्ट अनुभव, श्रेष्ठ ज्ञान व व्यापक विवेक यांचे निदर्शक असतील तर मग प्रश्नच नाहीं. परंतु असें नसतें. देशांतील ज्ञानी व विवेकी माणसें निवडून येतातच असें नाहीं त्यांच्या ज्ञानाचा व शहाणपणाचा फायदा त्यांच्या प्रतिनिधींना मिळतोच असें नाहीं. खुद्द प्रतिनिधि यांना काय योग्य आहे कोणता मार्ग शहाणपणाचा आहे, हेंही पुष्कळ वेळां आकलन करण्याची पात्रता नसते. योग्य तें कळून निःस्वार्थी बुद्धीनें ते न सांगतां स्वार्थाच्या अनुरोधानें वागणारेही अनेक असतात. देशांतील शहाणपण, अनुभव, विवेक हे मध्यवर्ती विधिमंडळांत निश्चित प्रतिबिंबित होतील याची ग्वाही नसते. प्रतिनिधि हा निवडणारांचे अनुभवांचा, विचारांचा व विवेकाचाही प्रतिनिधि असावा हें स्पष्ट आहे, पण तसें घडून येत नाहीं. किंबहुना व्यक्तीचा अनुभव हा केवळ त्याचा खास असलेमुळें इतर कुणास त्याचें

यथार्थ प्रतिनिधित्व करतां येणार नाहीं असें म्हटलें तरी चालेल. व्यक्तीची बुद्धि व्यक्तीच सांगू शकेल, इतरांना तें अशक्य हें रूसोचें म्हणणें अर्थपूर्ण आहे. तथापि ही मर्यादा ओळखून प्रतिनिधिव्यवस्था निर्माण करणें अवश्य आहे. जें कार्य विधिमंडळ करीत असेल त्यांत व व्यक्तींचे अपेक्षेंत व आकांक्षेंत त्या कार्याला साधारण पाठिंबा द्यावा असें वाटण्याइतपत तरी एक सूर व एकवाक्यता असली पाहिजे. विधिमंडळाचे कार्यांतून स्पष्ट होणारे हितसंबंध यांच्याशीं व्यक्तीचें कांहीं तरी इष्ट असें नातें लागलें पाहिजे, त्याच्या अनुभवाला जुळेल असें कांहीं तरी तेथें दिसलें पाहिजे. म्हणजे प्रतिनिधिद्वारां व्यक्तींचे जास्तींत जास्त अनुभव, जास्तींत जास्त विचार तेथें प्रकट झाले पाहिजेत. हें निवडणुकीच्या क्षणापुरताच मतदार व प्रतिनिधि यांचा संबंध राहून होणार नाहीं. सतत, सारखें व प्रत्यक्ष संबंध आजकालचे राजकारणांत मतदार व प्रतिनिधि यांच्यांत राहाणें शक्य नाहीं. आधुनिक राज्यांत असंख्य मतदार व अनंत कार्यें या सर्वांचा परामर्ष यथार्थतेनें घेणें व्यक्तिगत प्रतिनिधींना अगर मध्यवर्ती विधिमंडळालाही अशक्य आहे. आज जे गट बलवान् आहेत, संपत्तिमान आहेत त्यांचा प्रभाव तेथें पडतो. जे गडबड करणारे, जे चळवळ करणारे, ते तेथील लक्ष वेधून घेतात. समाजांतील सर्व हितसंबंधांचा विचार तेथें प्रतिबिंबित होईल हें केव्हांही अशक्य आहे. आधुनिक राज्याचा विस्तारही मोठा व कार्यक्षेत्रही व्यापक असतें. यामुळें राज्यकारभारावर प्रत्यक्ष ताबा जनतेचा असणें अशक्य आहे. प्रत्येक बाब विचारासाठीं प्रत्यक्ष सर्व जनतेपुढें आणणेंही अशक्य आहे. म्हणून मागें सांगितल्याप्रमाणें मोठ्या व महत्त्वाच्या प्रश्नांचा विचार जनतेनें करणें योग्य ठरतें व तोही विचार तपशीलवार रीतीनें नव्हे तर जवळजवळ होय कीं नाहीं एवढ्यापुरतीच निवड करून आणि तीही निवड म्हणजे आपलेतर्फे जवळजवळ होय अगर नाहीं म्हणणारी, आपल्या मतप्रणालीला जुळणारीं माणसें निवडून देऊनच करावयाची असते. हे निवडलेले सद्गृहस्थ पुन्हां विधिमंडळांत वाटेल तें मत देण्यास मोकळेच असणार. निवडून आलेले प्रतिनिधि आहेत मुकत्यार नव्हेत. मुकत्याराला सर्वस्वीं मालकाचे आज्ञेप्रमाणें वागावें लागतें. अधिकाराबाहेर तो वागल्यास मालकावर तें बंधनकारक नसतें. प्रतिनिधींची भूमिका निराळी आहे. त्याला मतस्वातंत्र्य आहे. त्याचीं सर्व मतें त्यानें मतदारसंघाला आगाऊ सांगून दिलीं जात नाहींत. तसेंच मत दिल्यानंतरही जनतेच्या अगर मतदारसंघाचे पसंतीसाठीं तो निर्णय त्यांचेपुढें मांडण्यांत येत नाहीं. प्रत्येक योजना प्रथम तपशीलवार मतदार संघापुढें मांडून त्यांची पसंती घेऊन नंतर ती पास करून पुनः मतदारसंघापुढें मांडून कायदा

करून घ्यावयाची, हा खटाटोप आधुनिक राज्यांत त्याच्या विस्ताराकडे व कार्या-च्या क्षेत्राकडे पाहातां अशक्य व हानिकारकही ठरेल. राज्यकारभारावर प्रत्यक्ष ताबा असणें अगर त्यावर नियंत्रण ठेवणें याचा अर्थ ठराविक कालानंतर राज्यकारभार करणारे पसंत नसतील तर दुसरे नेमणें व मध्यंतरींच्या कालांत निरनिराळ्या संघां-च्या संघटनेमार्फत विद्यमान राज्यसत्तेवर आपल्या अनुभवाचा, आपल्या अभिप्रायाचा नेट लावणें इतकाच होईल.

प्रतिनिधित्व कार्यनिष्ठ ठेवल्यानें अधिक नियंत्रण अगर प्रभावी नियंत्रण, राज्य-कारभारावर राहील असें मानण्याचें कारण नाहीं. निरनिराळे अनुभव संकलित करून, निरनिराळे अभिप्राय एकत्रित करून, त्यांतून निर्णय घेण्याचें कार्य प्रादेशिक पद्धतीनें निवडून आलेल्या प्रतिनिधिसंस्थांमार्फत अधिक चांगलें होईल याचें विवेचन मागें येऊन गेलें आहे. व्यक्ति म्हणजे निरनिराळीं कार्यें करणारा एक कार्यक्रम नव्हे, कारण व्यक्तीचें वर्णन तो करीत असलेल्या कार्यांनीं पुरेसें होत नाहीं. त्याचीं कार्यें, तो करीत असलेले व्यवसाय हे त्याच्या जीवनाचें सर्व क्षेत्र व्यापूं शकत नाहींत. वकील, वक्ता, लेखक व राजकारणी, हे माझे सर्व व्याप अगर उपद्व्याप माझ्या जीवनाचें संपूर्ण चित्र देऊं शकत नाहींत. या सर्वांची बेरीज करूनसुद्धां मी उरतोंच. व्यक्तीच्या सर्व प्रवृत्तींना, जीवनाच्या सर्व कलांना प्रतिनिधित्व मिळावावयाचें असेल तर तें व्यवसायांवर, कार्यांवर, जातीवर, धर्मावर न अवलंबून राहातां तें मिळण्याचा हक्क व्यक्तीला व्यक्ति म्हणून मिळाला पाहिजे. केवळ सोयीचे दृष्टीनें ती राहाते त्या ठिकाणीं तिनें मत द्यावें म्हणून प्रादेशिक मतदारसंघ इष्ट व प्रादेशिक मतदार संघाचा अर्थही येवढाच आहे. प्रतिनिधित्व वस्तुतः व्यक्तिनांच दिलेलें असतें; प्रादेशिक मतदारसंघ, हें ते मोजून देण्याचें एक माप आहे. वास्तविक व्यक्तीचे खरें प्रति-निधित्व अन्य कोणाला करतांच येणार नाहीं. तथापि, सोनार—मतदारसंघ, लोहार-मतदारसंघ, वकील—मतदारसंघ, व्यापारी—मतदारसंघ, आणि घरांत कार्य करणाऱ्या गृहिणी यांचा मतदारसंघ याप्रमाणें प्रतिनिधि निवडले गेले तर व्यक्तींचें खरें प्रति-निधित्व आणखी कमी होईल. सोईची, सुटसुटीत व सहज समजून येणारी व्यवस्था या दृष्टीनें प्रादेशिक मतदारसंघाची व्यवस्था अधिक चांगली आहे. निवडून येणारे प्रतिनिधि या व्यवस्थेंत लोकमताला अधिक जवळ असतात. त्या त्या मतदारसंघांतील नानाविध हितसंबंधांसंबधीं त्यांची माहिती, त्यांचा अनुभव अधिक असतो. मोठ-मोठे पक्ष उत्पन्न होऊन ते संघटित झाले म्हणजे पुष्कळ वेळां उमेदवार केवळ तो मतदार संघांतील स्थानिक मनुष्य आहे म्हणून उभा केला जात नाहीं. तथापि

मतदारसंघांत राहाणारा, त्याच्याशीं स्थानिक प्रश्नाचे दृष्टीनें निकट संबंध असणारा उमेदवार संघटित पक्ष सामान्यतः उभा करीत असतो. मतदारसंघ प्रादेशिक असला म्हणजे उमेदवाराचें पक्षाबरोबर त्याचें चारित्र्यही लक्षांत घेतलें जातें, त्याचे लायकी-कडेही थोडें लक्ष पुरविलें जाते. कार्यनिष्ठ अगर व्यवसायनिष्ठ मतदारसंघ असेल तर त्या व्यवसायाचेच दृष्टीनें उमेदवाराची लायकी प्रामुख्यानें पाहिली जाते. त्या त्या व्यवसायांतील श्रेष्ठ निवडून जावा ही भावना असणें साहजिक असतें. उमेदवाराच्या अन्य गोष्टींकडे लक्ष वेधलें जात नाहीं. निवडून देणारे विशिष्ट व्यवसायाचे म्हणूनच त्यांना अधिकार, या स्थितींत निवड करतांना उमेदवाराची त्या व्यवसायांतील योग्यता त्यांनीं पाहाणें अगदीं स्वाभाविक आहे. व्यक्ति म्हणून अधिकार आहे व व्यक्ति म्हणून उमेदवार निवडून यावयाचा आहे, तो अमुक धंदा करतो म्हणून नव्हे, या परि-स्थितींत निवड करणारे उमेदवाराच्या सर्वांगीण जीवनाचा, चारित्र्याचा व लायकीचा विचार करणें स्वाभाविक आहे. लायक व शीलसंपन्न उमेदवार निवडून येण्याचे दृष्टीनें राज्यांतील राजकीय पक्ष–संघटना, ही महत्त्वाची गोष्ट ठरते. विद्यमान जगांत पक्ष कसे संघटित होतात, तेथें कोणाची वर्णी लागते, याकडे पाहिलें म्हणजे पुष्कळ वेळां निराशा वाटणें साहाजिक आहे. तथापि ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, आजचा समाज हा परिग्रही स्वरूपाचा आहे. संपत्तीचें केंद्रीकरण तेथें होऊं शकतें व संपत्ति हें सत्ताप्राप्तीचें साधन ठरतें. सत्ता मग संपत्तीची दासी होते. हें समा-जाचें स्वरूप बदललें म्हणजे पक्षसंघटनेवर त्याचा योग्य तो परिणाम होईल, व आज दिसणारे अनेक दोष खात्रीनें कमी होतील. या दृष्टीनें जी हक्कव्यवस्था राज्यांत असली पाहिजे म्हणून प्रतिपादिलें आहे तिचें महत्त्व विशेष आहे. हक्क-व्यवस्थेनें सत्ता मर्यादित होते, तिचें क्षेत्र निश्चित केलें जातें. शिक्षित व दक्ष नागरिक राज्यकारभाराकडे जागरूक राहून पाहात असतात. संपत्तीची तरतूद मग मर्यादेंत राहाते. मतस्वातंत्र्य व संघस्वातंत्र्य असल्यामुळें हितसंबंध संघटित होतात व राज्याचा उपयोग केवळ विशिष्ट वर्गासाठीं होणें कठीण होतें व राज्याचे जे मुख्य मुख्य उद्देश असतील त्यांना अनुसरून राज्यकारभार होणें. अधिक संभवनीय होतें.

प्रादेशिक पद्धतीनें जरी प्रतिनिधि निवडले गेले तरी देशांतील अनुभव उत्कृष्ट प्रकारें अगर पूर्णपणें ते विधिमंडळांत मांडूं शकतील असें नाहीं. या पद्धतीनें व्यापक दृष्टीनें विचार करणारे, लोकमताला अधिक जवळ असणारे प्रतिनिधी निवडून येतील हें खरें. तथापि राज्यकारभार जास्तींत जास्त लोकांच्या जास्तींत जास्त अभि-प्रायांचा व अनुभवांचा विचार करून व्हावा ह्या दृष्टीनें प्रत्येक प्रश्नाबाबतची संपूर्ण

संकलन केलेली माहिती, निर्णय घेण्याचे वेळीं उपलब्ध असली पाहिजे. आधुनिक राज्यकारभार व कायदे हे कांहीं स्वयंभू व निरपेक्ष अशा तत्त्वज्ञानावर आधारून भागत नाहीं. कांहीं स्थिर सिद्धांत आहेत असें समजून त्यांच्यांवर आधारूनही भागत नाहीं. आलेल्या अनुभवांचें मंथन करून, त्यांतून निघणाऱ्या अनुमानांना धरून बेताबेतानें राज्यकारभार चालवावा लागतो, कायदा उभारावा लागतो. एखादी गोष्ट उपयुक्त आहे अगर त्यांत पुष्कळांचें पुष्कळ हित आहे एवढें सांगून भागत नाहीं. पुष्कळ म्हणजे किती, हित म्हणजे काय, यांचा तपशील आंकड्यांत देऊन सांगावा लागतो. नवीन कर बसला तर अमुक परिणाम होईल हें आंकडे मांडून सांगावें लागते. तात्पर्य, अनुभव हा आंकड्यांनीं व माहितीनें गोळा करून स्पष्ट करावा लागतो. कार्यकारण भाव, भौतिकशास्त्रांइतके निश्चितपणें सामाजिक शास्त्रांत सिद्ध करतां येत नाहींत हें खरें. पण जितक्या व्यापक पुराव्यावर, व्यापक माहितीवर ते आधारलेले असतील तितकी निश्चिति त्यांत अधिक येणें शक्य आहे. म्हणून जास्तींत जास्त माहिती व अवलोकन यांची आवश्यकता व महत्त्व आहे. या दृष्टीनें विचार करतां, माहितीचें महत्त्व व ती मिळविण्याची, गोळा करण्याची, योग्य मांडणी करण्याची अवश्यकता आतां सर्वत्र पटूं लागली आहे. गणितागत पद्धतीनें ( Statestical Method ) विचार करून प्रमेयें मांडणें हें आतां सर्वमान्य झालें आहे. तथापि या दृष्टीनें अवश्य त्या संघटना अगर संस्था सर्वत्र आहेत अगर पुरेशा व कार्यक्षम आहेत असें मात्र नाहीं. कित्येक राज्यांतून हें काम अद्यापि सर्वस्वीं व संपूर्णपणे राज्याचे कार्यक्षेत्रांतील आहे हें मानलें जात नाहीं. समाजांत काय घडत आहे, कोणत्या प्रवृत्ति वाढत आहेत अगर कमी होत आहेत, पदार्थविषयक अभिरुचि कशी बदलत आहे याची दखलही कित्येक राज्यव्यवस्थेंत सरकाराला नसते. कांहींची दखल यदृच्छया अगर अप्रत्यक्ष रीतीनें घेतली जाते. चहा ही समाजांतील बहुसंख्याकांची अवश्य अशी गरज झाली आहे. पण कैद्यांची अन्नव्यवस्था ८० वर्षांपूर्वीं ठरविली आहे ती कायम आहे! त्यांत कांजी जी बाहेर समाजांत आजारीपणाशिवाय सहसा कोणी घेत नाहींत ती येथें दररोजची सकाळची पहिली सलामी आहे. अज्ञानपणीं लग्नें करणें हें अयोग्य आहे हें जाणून प्रवृत्ति बदलून उशीरां विवाह होत आहेत. जर प्रत्येक विवाह नोंदला जाईल तर लोकमत आचरणांत कसें बदललें आहे हें आंकडे देऊन सांगतां येईल. आज लोकमताचे नांवावर वाटेल तें या बाबतींत सांगता येतें, पडताळून पाहाण्यास साधन नाहीं. विशिष्ट श्रमापासून जीवमानावर काय परिणाम होतात, जननक्षमतेवर काय परिणाम होतात हें कळणें समाजहिताचे

दृष्टीनें अवश्य आहे. त्यासाठीं सर्वत्र जरूर ती नोंद झाली पाहिजे. लोकसंख्या व जीवनाची साधनसामुग्री यांचा मेळ निसर्ग घालील असें म्हणणें हल्लीचें काळीं चालणार नाहीं. समाजानें तो घातला पाहिजे व त्यासाठीं सर्व प्रकारें माहिती असणें जरूर आहे. युद्धांत जय होण्याचे दृष्टीनें ज्याप्रमाणें सर्व तऱ्हेचे नकाशे, हवापाण्यासंबंधींचें तक्ते, लोकवस्तीची मांडणी, कोणत्या वस्तु कोठें मिळतील, कशा उत्पादन करतां येतील यांची टाचणें, हीं सर्व जशीं आधुनिक युद्धशास्त्राप्रमाणें अवश्य मानलीं जातात, तशींच सर्व प्रकारची माहिती राज्यकारभाराला आजच्या जगांत कार्यक्षमतेच्या दृष्टीनेंही अवश्य आहे. अज्ञानाविरुद्ध, दारिद्र्याविरुद्ध, अन्यायाविरुद्ध जय मिळवावयाचा असेल, तर ही सर्व सामुग्री अत्यंत आवश्य आहे. हें सर्व काम केवळ खासगी प्रयत्नांनीं होण्यासारखें नाहीं. राज्याचें हें एक कार्य आहे व राज्यानें अवश्य ती संघटना उत्पन्न करून हें केलें पाहिजे. या योगानें लोकमत, लोकांचा अनुभव काय आहे हें कळून योग्य निर्णय घेणें शक्य होईल. त्याचप्रमाणें लोकमतालाही माहिती मिळत गेल्यानें वस्तुस्थिति कळत गेल्यानें इष्ट तें वळण लागेल.

माहिती म्हणजे अनुमान नव्हे व वस्तुस्थिति म्हणजे पाहणारांचा कयास नव्हे. म्हणून माहिती गोळा करतांना, आकडे जमा करतांना, जेवढें वास्तविक असेल तेवढेंच गोळा केलें गेलें पाहिजे. सत्यवस्तु काय आहेत, त्या निवडून पांखडून, मांडल्या पाहिजेत. सत्य वस्तु याप्रमाणें निवडून काढणें, त्यांची मांडणी करणें, ही एक क्रिया आहे. त्यांतून अनुमान काढणें, कार्यकारणभाव ठेवणें, लोकप्रवृत्ति अजमावणें, ही दुसरी क्रिया आहे. दोन्हीं क्रिया एकाच व्यक्तीनें केल्यास सत्य वस्तूंची निवड निस्पृहपणें, निःपक्षपातीपणें होणार नाहीं. पाहणाऱ्याची एक स्वतःची दृष्टि असते आणि त्याला अनुमान काढण्याची, अभिप्राय देण्याची, आंकड्यांतून, माहितींतून, उत्पन्न होणाऱ्या अनुभवाचा अर्थ लावण्याची संधि मिळाली तर त्याच्या दृष्टीप्रमाणें तो अर्थ लावील एवढेंच नव्हे तर सत्य वस्तुसुद्धां त्याच दृष्टीनें निवडून काढील. सरकारी अधिकाऱ्यामार्फत लोकमत काय आहे याची मागणी झाली कीं, विशिष्ट सरकारी अधिकारी आपल्या प्रवृत्तीच्या दृष्टीनें लोकमत अंदाजील व त्याप्रमाणें वर धाडील. अजाणतां का होईना त्याचा अभिप्राय या लोकमतांत समाविष्ट केला जातो. जातीय मतदारसंघ त्याला नकोसे असतील तर ते मागणारे यःकश्चित् आहेत हें युक्तीनें तो दाखवील. त्याला हवे असतील तर क्षणांपूर्वीं जन्मलेल्या संस्थांना महत्त्व देऊन त्यांची मागणी म्हणजे एकमताची मागणी असें खुबीनें दाखवील. दडपशाहीला मान्यता देणारीं वर्तमानपत्रें एकदम जबाबदार, लोकमत निदर्शक होतात पण तींच कांहीं

न्याय करा म्हणूं लागतांच त्यांचे मागें लोकमत नाहीं हें त्यांना समजेल अशा रीतीनें सरकार सांगत असतें. तात्पर्य माहिती कोण गोळा करतो, कशी गोळा होते हेही प्रश्न महत्त्वाचे आहेत. कार्यकारी सत्तेकडे हें काम देणें योग्य होणार नाहीं. हें काम करणारें संघटन स्वातंत्र्य व तेवढेंच काम करणारें असलें पाहिजे. त्यांचें अस्तित्व कार्यकारी सत्तेवर अवलंबून ठेवणें अयोग्य आहे. किंबहुना ही सर्वप्रकारची माहिती मिळण्याचा नागरिकांचा हक्क आहे व तो त्याला मिळाला पाहिजे म्हणून हें संघटन स्वतंत्र असणें अवश्य आहे. अनुभव संकलन करून, त्यांतून समन्वय करून निर्णय घेण्यासाठीं जशी या संघटनेची आवश्यकता आहे, तशीच घेतलेले निर्णय समाजावर काय परिणाम करतात हेंही वस्तुस्थितीने दाखविण्यासाठीं त्याची जरुरी आहे. कायद्याचे परिणाम, कारभारांतील स्वीकारलेल्या धोरणाचा परिणाम, खरा खरा समजण्यासाठीं ही उत्कृष्ट व्यवस्था आहे. राज्यकारभार करणारांकडे अगर त्यांच्या अधिकाऱ्यांकडे हें काम सोंपविलें कीं, सत्ताधिशांना जसे पाहिजेत तसेच रिपोर्ट येतील. त्यांत निःस्पृहता राहाणार नाहीं, वस्तुस्थितीचें यथार्थ स्वरूप दिसणार नाहीं. काय आहे हें एकानें सांगावें व त्यांतून काय करावें हें दुसऱ्यानें ठरवावें ही व्यवस्था लोकशाहीचे दृष्टीनें इष्ट आहे.

लोकांच्यासाठीं राज्यकारभार व्हावा हें साधण्यासाठीं लोकांनीं तो करावा हें एकच साधन आहे. जबाबदारी ही प्रत्यक्ष भाग घेतल्यानेंच उत्पन्न होते. लोकमत ध्यानांत घेऊन युद्ध जाहीर करणें व तें न जुमानतां जाहीर करणें यांतील फरक ही गोष्ट स्पष्ट करते. प्रेक्षक आहेत अगर ठेवले गेले म्हणून जे कार्यक्षेत्राबाहेर आहेत त्यांच्यावर जबाबदारी कधींच बसणार नाहीं, त्यांना जबाबदारीची भावनाही त्याचमुळें वाटणार नाहीं. लोकांना जबाबदारी वाटावी म्हणून जे राज्यकारभारांत आहेत त्यांनीं आपल्याला जें वाटतें, त्याचप्रमाणें जे प्रत्यक्ष राज्यकारभाराबाहेर आहेत त्यांना वाटलें पाहिजे असें घडवून आणलें पाहिजे. म्हणजेच आपल्या निर्णयांत त्यांना सहविचारी करून, सहकारी करून वागलें पाहिजे. अर्थात् आमजनतेचा विचार घेणें शक्य नाहीं म्हणून विषयाला प्रस्तुत असलेले हितसंबंधाचें खरे खरे प्रतिनिधि विचारविनिमयांत घेऊन त्यांच्या सहकार्यानें, त्यांच्या विचारानें निर्णय घेऊन काम केलें पाहिजे म्हणजे कार्याचे जबाबदारीची भावना लोकांमध्यें येईल. कारण मग होणारा कारभार वस्तुतः लोकांकडून होतो. त्यांच्या अभिप्रायाला जुळून तो होत असतो, होणाऱ्या निर्णयांत त्यांचा हात असतो. आपला निर्णय यशस्वी करण्याची जबाबदारी तेथें उत्पन्न होते. मात्र विचारविनिमयासाठीं घेतलेले प्रतिनिधि खरे खरे प्रति-

निधि असले पाहिजेत. शेतकीकमिशनवर ज्याची कांहीं शेती नाहीं असा इसम घेतला म्हणजे अगर मजुरांचा प्रतिनिधि म्हणून नित्य भांडवलवाल्या धंद्यांत दलाली करणारा घेतला म्हणजे योग्य प्रतिनिधि घेतले असें होत नाहीं. हितसंबंधाचा प्रतिनिधि म्हणजे प्रत्यक्ष त्यांत असलेला अगर त्याच्याशीं सर्वथैव समरस झालेला असाच इसम असला पाहिजे. उत्कृष्ट व्यवस्था म्हणजे प्रत्येक हितसंबंध संघटित होऊन त्या त्या संघटनेला आपला प्रतिनिधि निवडण्यास सांगणें ही होय. मजुरांबाबत कायदा करावयाचा असेल तर मजूरसंघाला प्रतिनिधि निवडण्यास सांगून त्यांच्या विचारविनिमयानें, सल्लामसलतीनेंच तो व्हावा. शिक्षकांसंबंधीं कायदा करावयाचा असेल तर शिक्षकसंघाला प्रतिनिधि निवडण्यास सांगून त्यांचे विचारविनिमयानें तो व्हावा. प्रत्येक प्रश्नांत केवळ एकच हितसंबंध गुंतलेला असतो असें नाहीं, म्हणून प्रस्तुत असलेल्या सर्व हितसंबंधाचें प्रतिनिधि घेऊन त्यांचे अभिप्रायांचें संकलन करून राज्यसत्तेनें सर्व समाजाचें असें प्रतिनिधित्व पत्करून निर्णय घेतले पाहिजेत. असें झालें म्हणजे होणारा निर्णय समन्वित बुद्धीचा निर्णय होऊन प्रत्येक हितसंबंधाचा अनुभव त्यांत समाविष्ट झालेला असेल. होणारें कार्य हें मग सर्वांचें आहे असें वाटेल व तें योग्य आहे असा विश्वासही उत्पन्न होईल. अशी ही एकीची भावना जितक्या व्यापक व विविध अनुभवांवर आधारलेली असेल तितकी ती लोकप्रिय होईल व कार्यक्षम होईल. या पद्धतीनें सर्व मतभेद मिटतील असें नाहीं; विचारविनिमयानें, एकत्र आल्यानें सर्वदा व सर्वशः जुळून येतें असें नाहीं. पण एकत्र आल्यानें, मतभेदाचें व मतैक्याचें क्षेत्र तरी निश्चितपणें कळतें; मतभेदामागें असलेला अनुभव योग्य, कीं अस्थानी हें समजून त्यावर तोड काढतां येते. पूर्वग्रह जवळ येण्यानें दूर होतात. क्रांतिकारक म्हणजे हातांत पिस्तूल घेऊन डोळे लाल करून शिवराळ बोलतो, हें मत प्रत्यक्ष विचारविनिमयाचें बैठकींत बदलून जातें. सारासार विचार, शक्याशक्यतेचा विचार क्रांतिकारकाचे डोक्यांत असल्याची जाणीव मालकाला होते. मालक म्हणजे भावनाशून्य नफा उत्पन्न करणारें यंत्र नसून कांहीं मानवी ओलावा त्यांत आहे याचाही प्रत्यय मजूरप्रतिनिधीला येतो. शेवटीं जुळले नाहीं तरी एकमेकांचे दृष्टिकोन एकमेकांना स्पष्ट होतात. विचारविनिमयांचे व्यवस्थेनें निदान संघर्ष अपरिहार्य झाला तरी त्यांतील कडवटपणा कमी होतो.

निर्णय होण्यापूर्वी व तो होत असतांना विचारविनिमयाची व्यवस्था कां इष्ट आहे हें वर सांगितलें. अशा रीतीनें झालेले निर्णय आतां अमलांत येतांना तो त्यांतील जबाबदारी सर्वांची आहे याची जाणीव होण्याचे दृष्टीनेंही कांहीं तरी व्यवस्था

असणें इष्ट आहे. आधुनिक राज्य हें मोठें व त्याचें कार्यही प्रचंड व विविध स्वरूपी आहे हें लक्षांत घेतां मध्यवर्ती सत्तेनें निर्णय घेतांना मुख्य मुख्य धोरणविषयक निर्णय घ्यावेत व तपशिलाचें निर्णय घेण्याचें काम राज्यांत विकेंद्रीकरणानें अगर अन्य तत्त्वानें विभागलें जावें हें योग्य आहे. प्रादेशिक दृष्टीनें हें काम विभागून देतां येण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें व्यवसायाचे दृष्टीनें, कार्यांचे दृष्टीनेंही विभागून देतां येईल. तपशीलवार निर्णय घेणारीं अनेक केंद्रें निर्माण झालीं व तेथेंही निर्णय घेण्यापूर्वी विचारविनिमयव्यवस्था ठेवली म्हणजे राज्यकारभार हा अधिक अधिक प्रत्यक्षपणें लोकांनीं केला असें होईल. लोकांनीं निर्णयांत भाग घेतला म्हणजे त्याला मान्यताही अधिक अधिक मिळेल. त्याचप्रमाणें हीं केंद्रें आपला अनुभव मध्यवर्ती सत्तेचे उपयोगासाठीं म्हणून अधिकृत रीतीनें व यथार्थपणें सांगूं शकतील. वरपासून खालपर्यंत कारभार व जनता यांची जुळणी होऊन, जितका कारभार जवळचा तितका जनतेचा लाभ त्यांत अधिक व अधिक संख्येनें होत जाईल. राज्य म्हणजे आपण घडविलेलें मंदिर, ज्याचें शिखर, ज्याचा कळस म्हणजे सर्वांच्या आदर्शाचें प्रतीक अशी भावना मग सर्वत्र निर्माण होईल.

समाजाचें स्वरूप संयुक्त आहे व त्याला सर्वस्वीं जुळणारी अशी ही वर वर्णन केलेली व्यवस्था आहे. विविध दृष्टींनीं निर्माण होणारीं एकीचीं केंद्रें नियंत्रण करणाऱ्या या व्यवस्थेंत खुद्द विविधता मारली नसून तिला योग्य स्थान दिलेलें आहे. कोणीताही संघ व्यक्तीला पूर्णपणें समाविष्ट करूं शकत नाहीं. या दृष्टीनें कोणत्याही एका संघानें सर्व प्रकारें व्यक्तीच्या जीवनाबाबत निर्णय घेणें, कायदे करणें यथार्थ होणार नाहीं. म्हणून कायदे करणारें संघटन असें असलें पाहिजे कीं, तेथें व्यक्तीच्या विविध हितसंबंधांचा विचार संकीर्णपणें न होतां संघटितपणें झाला पाहिजे. याचा अर्थ असा नव्हे कीं, सर्व संघटित हितसंबंधाच्या प्रतिनिधींनीं बनलेल्या मंडळानें तो करावा अगर त्यास तो अधिकार असावा. असें मंडळ एकतर केवळ संघटित हितसंबंधांच्या प्रतिनिधींचें असल्यामुळें व्यक्तीच्या संपूर्ण प्रतिनिधित्वाचे दृष्टीनें त्यास उणेपणा आहे. कित्येक राज्यकारभाराचे प्रश्न की, ज्यांचा निवडणाऱ्यांच्या हितसंबंधाशी कांहींही संबंध नाहीं त्यांचा निर्णय या मंडळानें करणें योग्य होणार नाहीं. शिवाय हें मंडळ सहाजिकच फार मोठें होईल व त्यामुळें कार्यक्षम होणार नाहीं. व्यक्तीचें जास्तींत जास्त प्रतिनिधित्व प्रादेशिक व्यवस्थेवर आधारलेल्या प्रतिनिधिमंडळाला येतें हें लक्षांत घेतां, कायदे करण्याची सत्ता, नियंत्रणाची सत्ता, अशाच मंडळाला असणें योग्य आहे. मात्र तेथें होणारा व्यक्तीचे विविध हितसंबंधाचा विचार संघटितपणें व्हावा, म्हणजे

त्या त्या हितसंबंधाचें जे संघटन असेल, जें संघ अगर संस्था असतील त्यांना विचार-विनिमयांत निश्चित स्थान असेल अशी व्यवस्था असावी. असें असलें म्हणजे व्यक्तीचे विविध क्षेत्रांतील हितसंबंध व तद्विषयक अनुभव या सर्वांचा योग्य व पद्धतशीर विचार होऊन त्यांतून मग निर्णय घेतले जातील. प्रत्यक्ष निर्णय जरी मध्यवर्ती विधिमंडळानें घेतले असें दिसत असलें तरी ज्या पद्धतीनें निर्णय घेतले गेले, त्यांत अनेक संघांमार्फत व्यक्तींचे अभिप्राय संघटित रीतीनें समाविष्ट झालेले असतात. दहापांच व्यक्तींचें कांहीं तरी ऐकून हे निर्णय होत नाहींत. वस्तुतः हे निर्णय संयुक्त स्वरूपाचे असतात. कारण ते घडविण्यांत वर सांगितल्याप्रमाणें अनेक संघ भाग घेत असतात. समाजाच्या संयुक्त स्वरूपाशीं जुळणारी ही व्यवस्था आहे. व्यक्तीचे हे विविध हितसंबंध जुळवून घेऊन मोठ्या योजनेंत त्यांना स्थान देणारी ही व्यवस्था आहे. ही सर्वस्वीं निर्दोष आहे अगर सर्वशः परीपूर्ण आहे असें नाहीं, पण इतर कोणत्याही व्यवस्थेपेक्षां अधिक चांगली आहे. मान्यतेनें निर्णयाला खरें खरें प्रामाण्य येतें, या दृष्टीनें ती जास्तींत जास्त मिळविण्याची शक्यता येथें आहे. कार्याचें महत्त्व व व्यक्तीचे प्रतिनिधित्व यांची सांधमोड या व्यवस्थेंत झाल्यानें, समता व संपूर्णता जास्तींत जास्त येथेंच उपलब्ध होतील.

वरील व्यवस्थेंत निर्णय हे वस्तुतः संयुक्त स्वरूपाचे आहेत असें सांगितले आहे. त्यांचें हें स्वरूप लक्षांत घेतां अधिकाराचें स्वरूपही तसेंच राहील हें उघड आहे. निर्णय घेतांना व ते अमलांत येतांना जे प्रस्तुत हितसंबंध असतील त्यांचें सहकार्य त्यांत समाविष्ट राहील. कारभाराची विभागणी कार्याचे दृष्टीनें व प्रदेशाचे दृष्टीनें मागें सांगितल्याप्रमाणें होईल. प्रांत अगर जिल्हा म्हणजे प्रदेशाचा भाग, जसा कारभाराचे सोयीकरतां प्रमाण म्हणून केला जाईल, तसाच सोयीचे दृष्टीनें कारभाराकरतां धंदाही प्रमाण म्हणून धरला जाईल. त्या त्या धंद्याला, त्या त्या व्यवसायाला कारभारांत एक अधिष्ठान मिळेल. त्यासंबंधींचे निर्णय अगर कायदे त्यांतील संघटनाशीं संस्थाशीं, विचारविनिमय होऊन होतील. सदरहू संघटनेला, संस्थांना आपलें म्हणणें मांडण्याचा हक्क राहील. याचा अर्थ राज्याचा वाटेल तसे हुकूम सोडण्याचा, अमर्याद प्रभुत्व गाजविण्याचा हक्क वस्तुतः मर्यादित होईल. कारण जे निर्णय होतील ते विचार-विनिमयानें होणार असल्यानें, सहाजिक सत्तेला वाटेल तसे ते करतां येणार नाहीं. वाटेल तसें केलें तर मान्यता मिळणार नाहीं ही भीति असल्यामुळें ते तसे होणार नाहींत. राज्य हें जर वस्तुतः अमर्यादपणें सत्ताधीश झालें, वस्तुतः त्याचे प्रभुत्वाला मर्यादा नसली तर समाजाच्या सर्व कार्यांवर, सर्व जीवितांवर, सर्व क्षेत्रांवर ते आपला

कब्जा करील व त्याचा परिणाम तुरुंगांतील सारखेपणा, सैन्यांतील एकी व स्मशानांतील शांतता निर्माण करण्यांत होईल. व्यक्ति क्षुद्र होऊन, विविधता कानसून काढली जाईल म्हणून तात्त्विक दृष्टीनें राज्य हे सर्व सत्ताधीश, प्रभुत्वपूर्ण असलें तरी वस्तुतः योग्य व दक्ष व्यवस्थेनें त्याचें प्रभुत्व मर्यादित केलें गेलें पाहिजे. म्हणजे प्रत्येक निर्णयांत व त्याचे अंमलबजावणींत ज्यांचा ज्यांचा संबंध येत असेल, त्यांचे त्यांचे सहकार्य व सहविचार घेतला गेला पाहिजे. असें झालें म्हणजे अधिकाराचे स्वरूप व त्याची संघटना एकसंधि राहाणार नाहीं. मध्यवर्ती सत्तेनें सांगावें व जसेचे तसें अधिकाऱ्यांच्या उतरंडींतून जाऊन अखेरच्या अमलदारानें तें बजावावें असें होणार नाहीं. मध्यवर्ती सत्तेनें विचारविनिमय करून धोरणाचा निर्णय घेतल्यानंतर मग तपशीलाचे निर्णयाकरतां प्रादेशिक भागांकडे अगर कार्यनिष्ठ भागांकडे जाईल; तेथेही विचारविनिमय होऊन झालेले निर्णय आणखी खालच्या कारभार केंद्रांकडे जातील, तेथेही तसेच होईल. शेवटचा बजावणी करणारा अधिकारीही सहकार्यानें बजावणी करील. या व्यवस्थेचें, अधिकाराचें स्वरूप व संघटन संयुक्त स्वरूपाचें आहे हें उघड आहे. हलव्याचे दाण्यांत तीळ असतो त्याप्रमाणें बजावणींत येणाऱ्या प्रत्येक निर्णयांत राज्याचे प्रभुत्वाचा अंश असून, मुख्य धोरणाचा अंश असून त्यावरील पुटेंही गोड सहकार्याचीं, सहविचाराचीं असतील आणि त्यांत जरी अधिकाराचा कांटा असला तरी तो गोड व न बोचणाराच असेल !! व्यक्तीची मिळणारी मान्यता कुठल्या तरी प्रचंड राज्याचे आज्ञेला आहे असें न वाटतां, आपण सहकार्यानें केलेल्या निर्णयाला आहे असें व्यक्तीला वाटेल. आपल्या अनुभवाला जुळणाऱ्या, सदसद्विवेकबुद्धीला अनसरून असणाऱ्या कृत्यालाच ही मान्यता असल्यानें तेथें आपुलकीचा भाव उत्पन्न होईल. होणारे निर्णय ज्यांच्यावर त्यांचा परिणाम होणार आहे त्यानांच करावें लागतील, त्यांच्याच अभिप्रायाप्रमाणें, निवडीप्रमाणें ते होतील आणि असें झालें म्हणजे व्यक्तीची प्रतिष्ठा, व्यक्तीचा गौरव होऊन तिच्या कर्तृत्वाला आव्हान मिळून ती आपल्या सुखांत व समाधानांत भर टाकूं शकेल. जर व्यक्तीचें जीवनांत याप्रमाणें भर पडणार नसेल तर सर्व खटाटोप व्यर्थ आहे. राज्याचे कर्तृत्व, राज्यकारभाराचें यश शेवटीं व्यक्तींच्या जीवनांतील सुखदुःखांचे मापानेंच ठरलें जातें. समाजाचें संपत्तींत पडणारी भर व्यक्तींचे जीवनांत कांहींही भर टाकत नसेल तर ती व्यर्थ आहे. होणाऱ्या वाढींत समाजांतील प्रत्येक व्यक्तीला हिस्सा मिळाला तर ती वाढ खरी. व्यक्तींचे जीवनांत सुखाची भर पडावयाची तर व्यक्तीला कर्तृत्वासाठीं क्षेत्र मिळाले पाहिजे, संधि मिळाली पाहिजे व हें वरील व्यवस्थेंत शक्य आहे.

वर वर्णन केल्याप्रमाणें राज्यव्यवस्थेचें संघटन करणें सोपें काम नाहीं. तथापि आजच्या जगांतील कोणती गोष्ट सोपी आहे? राज्यविषयक कल्पना कशा बदलत गेल्या, राजकीय संस्था कशा वाढत गेल्या हें लक्षांत घेतलें गेलें म्हणजे राजकीय क्षेत्रांतील कित्येक गोष्टी कां अवघड होऊन बसल्या आहेत हें कळून येते. राज्य मोठें असलें तरी प्रत्यक्ष सत्ता थोड्या लोकांचेच हातांत असली पाहिजे हा मौलिक सिद्धांत मानला गेला आहे. थोड्या लोकांचे हातांत असली पाहिजे म्हणून ती त्याच थोडया लोकांचे हातांत राहावी या दृष्टीनें राजकीय संस्था व संकेत निर्माण झाले. लौकिक-दृष्ट्या लोकसत्तात्मक राज्य अगर लोकशाही राज्य असून वस्तुतः लोकांचे अनुभ-वाला व अभिप्रायाला तेथें स्थान नसते. खरेखरे महत्त्व तेथें व्यक्तीला मिळत नाहीं. स्वातंत्र्य याचा अर्थ बंधनांचा अभाव असाच व एवढा केला जातो. सामान्य मनु-ष्याला तेथें विचारावें अगर त्यानें कांही करावें अशी कोणाची अपेक्षा नसते. स्वातं-त्र्याचें लक्षण म्हणजे केवळ बंधनाचा अभाव न मानतां स्वातंत्र्य म्हणजे प्रत्येकाला कर्तृत्व करण्याची संधि, त्याचे चालना बुद्धीला, त्याचे विधायक प्रवृत्तीला क्षेत्र मिळणें हा आहे. प्रत्येकाचे व्यक्तित्वाचें आविष्काराला वाव मिळून इतर कुणाच्याही व्यक्तित्वाचें छायेखालीं तें कोमजून जातां कामा नये, हा हक्क स्वातंत्र्यांत समाविष्ट आहे. स्वातं-त्र्याची ही व्यापक कल्पना विद्यमान राजकीय संस्था अगर विद्यमान राज्य यांच्या आशयांत बसू शकत नाहीं. राज्याचें स्वरूप एके काळीं केवळ संरक्षक, केवळ पाहारे-करी असें होतें. हळूहळू राज्याचे कार्यक्षेत्र वाढत जाऊन राज्य हे एक समाजसेवेचें संघटन ( Social Service State ) असें स्वरूप त्याला आलें. कायदा हा केवळ प्रतिबंधक स्वरूपाचा होता तो हळूहळू विधायक स्वरूपाचा झाला. नियमनाबरोबर दिग्दर्शन करून काय करावें हे सांगणारा झाला. व्यक्तीच्या प्रगतींतील अडथळे दूर करण्याचे काम त्याचे आहे असे जरी ग्रीन यांनी सांगितलें, तरी प्रत्यक्ष या कार्याचें स्वरूप निराकरणी न राहातां कारक व कार्यकारणी ( Positive ) झालें. राज्यानें अमुक होऊं देऊं नये, अन्याय होऊं देऊं नये, येवढें करून न थांबता त्यानें न्याय मिळेल अशी परिस्थिति निर्माण करावी, अमुक एक प्रत्यक्ष करावें असें अपेक्षिलें जाऊं लागलें. तथापि विचारसरणींत मूलतः फरक झाला नाहीं. फ्रेंच क्रांतींतील विचारसरणीनें लोकप्रभुत्वाला महत्त्व आलें, राष्ट्रीयत्व उफळलें. पण त्याजबरोबर सामान्य व्यक्तीला जितकें महत्त्व यावयास पाहिजे तितकें आलें नाहीं. १९ वे शतकां-तील व्यक्तिप्रधान विचारसरणीनें व्यक्तींना स्वातंत्र्य पाहिजे म्हणजे राज्यसत्तेचा हस्तक्षेप नको एवढाच मर्यादित अर्थ करून भांडवलशाहीचें वर्चस्व सर्वत्र प्रस्थापित केलें.

याप्रमाणें जेथें लोकशाही निर्माण झाली तेथ तिचें आर्थिक स्वरूप भांडवलशाहीचें झाले. राजकीय समतेनें आर्थिक विषमता दूर होण्याऐवजीं कायम व दृढ झालेली अनुभवास आली. जोंपर्यंत भांडवलशाही उत्पादनव्यवस्था वर्धिष्णु होती, वाढत होती, तोंपर्यंत समाजांत कांही तरी लोकांना समाधान होतें. वाढीला क्षेत्र सपलें, सर्वत्र तशीच परिस्थिति झाली, स्पर्धा, वाढली, साम्राज्यशाही युद्धें झालीं. बेकारी हा कायमचा रोग समाजाला जडला. अन्न असून उपाशीं, वस्त्र, असून अर्धनग्न, श्रम करण्यास तयार पण रोजगार नाहीं, समाजांत साधनसामुग्री असून तिचा उपयोग नाहीं अशा स्वरूपाची परिस्थिति सर्वत्र वारंवार होऊं लागली. भांडवलशाहीला परवडेल तोंपर्यंतच जनतेच्या सुखसोयीसाठीं खर्च करण्यास राज्य तयार. तोंपर्यंतच त्याचें समाजसेवा करण्याचें कार्य चालणार. परवडलें नाहीं म्हणजे बेकारीभत्ते बंद होणार, अन्य सुखसोयी कमी केल्या जाणार. राजकीय समतेच्या जोरांवर जरी लोकपक्ष निवडून आला तरी लोकशाही राज्ययंत्राचा उपयोग आर्थिक विषमतेचीं पाळंमुळें खणण्याचे कामी तो यशस्वी रीतीनें कोठेंही करूं शकला नाहीं. खाजगी मालकीवर आधारलेल्या समाजरचनेत मौलिक फेरफार करण्याचा प्रयत्न करतांच सर्वत्र लोकपक्ष अधिकारारूढ असूनसुद्धां अयशस्वी ठरला. लोकशाही राज्ययंत्राची कळ खाजगी भांडवल ही असल्यामुळे, भांडवलवाले यांच्या इच्छेप्रमाणे, इषाऱ्याप्रमाणे तें चालणार हें उघड आहे. लोकशाही व खाजगी भांडवल यांचे लागलेलें लग्न बहुजन समाजाचे मुळावर आलेले आहे.

भांडवलात्मक लोकशाहीच्या संस्था आर्थिक व सामाजिक व्याप देण्यास असमर्थ आहेत. आर्थिक विषमता त्या दूर करूं शकत नाहींत. सनदशीर रीतीनें तसा प्रयत्न झाला तरी अल्प प्रमाणांत असलेला भांडवलवाला वर्ग लोकशाहीचे संकेतानुसार वागणें शक्य नाहीं व कुठेंही वागला नाहीं. विरोध करावयाचा, बुद्धिवाद करावयाचा, लोकमत वळवावयाचें, बहुमत मिळवावयाचें व पुनः राज्यकारभारात अधिकारूढ व्हावयाचें; पण तोपर्यंत असनदशीर अगर बेकायदेशीर न वागतां, शांततेनें व सहिष्णुतेनें काम करावयाचें हा लोकशाहीचा संकेत भांडवलवाले मानणें शक्य नाहीं व त्यांनीं प्रसंग येतांच मानलाही नाहीं. लोकशाही राजकारणाचे डावांतील नियम एका पक्षानें पाळल्यास त्याचा कांहीं उपयोग नाहीं. भांडवलवाल्यांनीं या प्रकारांवर अखेरचा विश्वास असल्याचें कधींच जाहीर केलें नाहीं. आपली बलिष्ठ संघटना करून विरोधी प्रयत्न हाणून पाडून, कांहीं ठिकाणीं नाममात्र असलेली लोकशाहीपण त्यांनीं निकालांत लावली आहे. आर्थिक विषमतेची किंमत देऊनच समाजानें

बहुतेक ठिकाणीं लोकशाहीचीं खेळणीं विकत घेतलीं आहेत. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे हल्लींच्या लोकशाही घटना व संस्था या समाजांतील आर्थिक विषमता दूर करण्यास असमर्थ ठरल्या आहेत. या स्थितींत स्वातंत्र्याचा व्यापक व विधायक अर्थ लाभून व्यक्तीचें महत्त्व नव्हे न्याय्य स्थान व्यक्तीला त्यांमार्फत मिळेल असें वाटत नाहीं. १९ व्या शतकांत व्यक्तिस्वातंत्र्यवादाचा जो परिणाम होत होता, त्याची जाणीव विचारवंताना नव्हती असें नाहीं. फ्रेंच क्रांतींतील स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या सर्व भावना कांहीं तात्कालिक परिणामाच्या ठरल्या नाहींत. त्यांतून जसें राष्ट्रीयत्व निर्माण झालें तसेंच आंतरराष्ट्रीयत्वही निर्माण झालें. समतेच्या कल्पनांचा पुढील प्रवास समाजसत्तावाद व साम्यवाद यांच्या चालीनें झाला. फ्रेंच क्रांतीनें राजकीय स्वातंत्र्य देण्यास मदत केली तर रशियन क्रांतीनें व्यक्तीला आर्थिक समता मिळवून देण्याचे कामीं निःसंशय मदत केली आहे. रशियांत जें झालें त्याचे उदाहरणानें व भीतीनें अनेक देशांतील आर्थिक धोरणावर परिणाम झाला आहे. तें टळावें म्हणून कांहींनीं आपलें धोरण बदललें तर तसें व्हावें म्हणून कांहींनीं आपलें धोरण बदललें. रशियांतील विचारसरणीचा व होणाऱ्या घटनांचा परिणाम गेले पंचवीस वर्षें जगांतील राजकारणावर घडत आहे. समाजांतील साधनसामुग्री समाजाचे मालकीची तिजवर समाजाचा ताबा राहून समाजांतील सर्व लोकांना न्याय्य रीतीनें तिचा फायदा होईल असा तिचा उपयोग झाला पाहिजे या विचारसरणीची पकड आमजनतेवर सर्वत्र बसली आहे. प्रत्येकाला जिवंत राहण्याचा, जीवन सुखी करण्याचा सारखा हक्क आहे. राज्य हें कोणा एका वर्गाचे हातीं जाणें अनिष्ट आहे, व ते टाळावयाचें म्हणजे वर्गहीन समाज झाला पाहिजे. संपत्तीचे विषमतेनें वर्ग पडतात तर ती मुळांतच खाजगी मालकीची न ठेवली म्हणजे झालें. श्रमानें जगण्याचा हक्क प्राप्त होतो व श्रमजीवी कामगार हे सर्व देशांत पसरले तरी ते एक आहेत ही भ्रातृभावाची भावना रशियन विचारसरणीनें गेल्या २५ वर्षांत सर्वत्र पसरून देऊन, राष्ट्रीयत्वावर आघात करण्याचा प्रयत्न केला. चालू महायुद्धांत रशियाचे साम्यवादी विचारसरणीनें कशी पलट घेतली हें येथें सांगण्याचें कारण नाहीं. महत्त्वाचा मुद्दा हा आहे कीं, आर्थिक समता स्थापन करण्याचा प्रयत्न बऱ्याच मोठ्या प्रमाणांत रशियानें यशस्वी केला आहे.

रशियन विचारसरणींतील आर्थिक आशय भांडवलात्मक लोकशाहीच्या संस्थांत तो समाविष्ट करून प्रभावी करणें अवश्य आहे. तथापि, राजकारण प्रभावी करणारें जुनें चैतन्य नष्ट झालें असून हें नवें चैतन्य निर्माण झालें आहे. ही जी नवी

प्रेरणा राजकीय विचारांत उत्पन्न झाली आहे, तिला योग्य अधिष्ठान मिळून योग्य संस्थांमार्फत तिनें अंग धरिलें पाहिजे, शक्तिमान झालें पाहिजे. हा व्यापक आशय, ही नवी आकांक्षा राज्यामार्फत परिपूर्ण होण्यासाठीं राज्यरचना जरूर त्या ठिकाणीं बदलणें अवश्य आहे. साध्य व साधना, हेतु व संघटना यांच्यांत मिलाफ होणें जरूर आहे. तसें न होईल तर संघर्ष व असफलता हीं समाजाचे व व्यक्तीचे नशिबांत निश्चित आहेत हें उघड आहे. ही व्यवस्था घडवून आणणें हें अवघड आहे, पण ज्या तत्त्वावर ती घडवून आणली पाहिजे त्यांना कोणी अमान्य करण्याचें कारण नाहीं. प्रत्येकास स्वतःला काय योग्य वाटतें, काय नैतिकदृष्ट्या इष्ट वाटतें हें त्यानेंच ठरविलें पाहिजे व तें लक्षांत घेऊन विचारांतीं जें त्याचें सदसद्विवेकबुद्धीला पटेल त्याप्रमाणें वागण्याचा त्याला हक्क आहे. याप्रमाणें सारखे विचार असणाऱ्या व्यक्तींनीं एकत्र येऊन त्यांचा जो समान हेतु अगर ध्येय असेल त्याप्रमाणें वागण्याचाही हक्क आहे. अशा तऱ्हेच्या हेतूंची अगर ध्येयांची आवश्यकता व्यक्तींना त्यांच्या अनुभवांतून निर्माण होते म्हणून त्यांचे पूर्तीसाठीं त्यांना एकत्र यावेंसें वाटतें. त्यांची पूर्ती होण्यांत त्यांना सौख्यलाभ असतो, सफलता वाटत असते. स्वानुभवांतून निर्माण झालेलें व संघामार्फत स्पष्ट झालेलें हे एक एकत्रित झालेल्या व्यक्तींचे कार्य होतें. अशा तऱ्हेनें समाजांत निर्माण झालेलीं केंद्रें व त्यांचीं कार्यें यांचा समन्वय करून राज्यव्यवस्थेनें काम केलें पाहिजे. हें करतांना होणारा समन्वय बाहेरील शक्तीनें न लादला जातां, विचारविनिमयांत भाग घेणाऱ्या हितसंबंधांतूनच तो निर्माण झाला पाहिजे. बाहेरील शक्ति, बाहेरील गट अगर व्यक्ति कितीही चांगली असली तरी तिचा अनुभव अपुराच असणार व कांहीं तरी तिची म्हणून दृष्टी असणारच; म्हणून तिला अखेरच्या निर्णयाची सत्ता देणें चूक ठरेल. अखेरचा निर्णय अमलांत आणणाऱ्या सत्तेला सक्तीचा अधिकार असलाच पाहिजे, तो अपरिहार्य आहे, पण तो अमर्याद असण्याचें कारण नाहीं. त्याचे उपयोगाकडे दक्षतेनें पाहात राहिलें पाहिजे. कारण जें ह्या सक्तीचा अधिकार चालवितात ते दुसऱ्यांचे हिताबद्दल बेफिकीर सहज होतात. हा अधिकाराचा स्वभाव आहे व अनुभवही तसाच आहे. जे थोडे हा अधिकार गाजवितात ते आपल्या स्वहिताचे दृष्टीनें गाजवितात. आपला अनुभव म्हणजे समाजाचा अनुभव, आपलें हित म्हणजे समाजाचें हित हें समीकरण त्यांना अगदीं स्वाभाविक वाटतें. म्हणून या अखेरचे निर्णय अमलांत आणणाऱ्या सत्तेवर मर्यादा घालणें जरूर आहे. ही मर्यादा म्हणजे मागें वर्णन केलेली हक्क व्यवस्था होय. आपला अनुभव व अभिप्राय जाहीर करण्यासाठीं भाषणस्वातंत्र्य; जें योग्य वाटेल तें संघशः

प्रयत्न करून साध्य करण्यासाठीं संघस्वातंत्र्य, राज्यकारभाराचा परिणाम स्वतःवर होणार म्हणून त्यांत भाग घेण्याचा हक्क, तो चांगल्यारीतीनें घेतां यावा म्हणून योग्य शिक्षण मिळण्याचा हक्क, कोणी राज्यकारभार करावा हें ठरविण्यासाठीं मतदानाचा हक्क व त्याचप्रमाणे लोकांनीं निवडून दिल्यास राज्यकारभार करण्याचा हक्क, मत देऊन नुसतें राजसत्तेचें स्वरूप ठरवून पोट भरत नाहीं म्हणून समाजांतील उत्पादनाचें नियंत्रण करण्याचा हक्क, या शिवाय होणारें निर्णयांत व त्यांचे अम्मलबजावणींत सहविचाराचा व सहकार्याचा हक्क, एवंगुणविशिष्ट हक्कव्यवस्था व त्या मागील तत्त्वप्रणाली अमान्य होण्याचें कारण नाहीं. या तत्त्वावर आधारलेल्या व्यवस्थेचें स्वरूप व संघटन कसें राहील याचें विवेचन मागेंच केलें आहे.

वरील हक्क व्यवस्था अगर कोणतेही हक्क संरक्षिले पाहीजेत, इतकेंच नव्हे तर अवश्य तें वातावरण समाजांत निर्माण झालेलें नसल तर त्यांचें संरक्षणही होणार नाहीं. केवळ धनप्राप्तीसाठीं ज्या समाजांत सर्व व्यवहार होत आहेत तेथें हे हक्क टिकणार नाहींत व केवळ कागदोपत्री राहतील. जेथें संपत्तीची विभागणी विषमतेनें होऊन समाजांत विषमता तीव्र झाली आहे, तेथें हे हक्क नामामात्र राहातील. संपत्तिमान् वर्ग वस्तुतः सत्ताधीश होऊन आपले विरुद्ध काम करणारी हक्क व्यवस्था प्रभावी राहूं देणार नाहीं. शांतता व सुव्यवस्थेचे नांवाखालीं ती चिरडली जाईल. ही हक्क व्यवस्था प्रभावी राहाण्यासाठीं समाजाचे परिग्रही स्वरूप राहातां कामा नये. श्रमानेंच मिळालें पाहिजे व संपत्ति नव्हे तर सेवा हा समाजांत प्रभावी हेतु ठरला पाहिजे. जें जें मिळेल तें श्रमानेंच व स्वतःचे श्रमानेंच. दुसऱ्याचे श्रमावर जगण्याचा हक्क कोणालाही नसून दुसऱ्याचे श्रमानें मिळविलेल्या संपत्तीवरपण कुणाला हक्क नाहीं. शंभर टक्के साम्यवाद जरी नसला तरी खाजगी मालकीचें स्वामित्व बव्हंशानें नष्ट होईल. समाजाला अवश्य त्या उत्पादनाचें स्वामित्व, नियमन व विभागणी ही समाज करील. या व्यतिरिक्त जे उत्पादन होईल त्यांत ही व्यवस्था कशी असावी याबद्दल किमान संकेत, किमान प्रमाणें ठरविली जातील. जेथें कोठें खाजगी मालकीला उत्पादनाला संधि मिळेल तेथेंही तिची सत्ता अमर्याद राहाणार नाहीं. राज्यसत्तेनें केलेल्या नियमान्वयें तिला वागावें लागेल. खाजगी भांडवल जें कांहीं ठेविलें जाईल त्याला ठराविक व्याज घेण्यापलीकडे कांहींही हक्क राहाणार नाहींत. स्वकष्टार्जित तेवढेंच ठेवतां येत असल्यानें वारस्यानें नांव मात्र मिळेल. समाजाला जो देणार नाहीं, त्याला कांहीं मिळणार नाहीं. श्रमानेंच नागरिकत्व मिळेल याप्रमाणें झालें म्हणजे विद्यमान सामाजिक मूल्यें पार बदलतील. सन्मान जन्मावर न राहातां कर्तृत्वाचें तें फळ होईल. प्रतिष्ठा

संपत्तीचें कार्य न ठरतां सद्गुणाचें पारितोषिक होईल. असें झालें म्हणजे व्यक्तिगत कर्तृत्व नाहींसें न होतां उलट वाढेल. कारण ज्या बहुसंख्यांकांना संधि कधींच मिळत नसे ती त्यांना मिळेल. व्यक्तीचें व्यक्तित्व दाबलें न जातां त्याला संपूर्ण स्वातंत्र्य मिळून आविष्काराला वाव मिळेल. क्षुद्र म्हणून अवमानलेली व्यक्ति अभिमानाला पारखी झालेली व्यक्ति, सुखापासून वंचित केलेली व्यक्ति निराशेच्या वातावरणांतून वर काढली जाऊन समाजांत जें तिचें निःसंशय प्रतिष्ठेचें स्थान आहे त्यावर बसेल. या वातावरणांत स्वातंत्र्य म्हणजे सर्वांना सारखी संधि उपलब्ध होणें हा अर्थ होईल. थोड्यांनीं स्वार्थानें सांगावें हें न होतां सर्वांच्या हितार्थ जेवढें नियंत्रण अवश्य वाटेल तेंच अमलांत येईल. स्वातंत्र्य म्हणजे प्रत्येक व्यक्तीला जें त्याच्यांत उत्कृष्ट आहे, जें श्रेष्ठ आहे त्याचे आविष्कारास वाव मिळून सफलता प्राप्त करण्याचा हक्क हा अर्थ होईल. सामाजिक विषमतेचे वातावरणांत स्वातंत्र्य हें व्यर्थ ठरतें म्हणून स्वातंत्र्यासाठीं समता हवी हें जाणून त्याप्रमाणें सर्वांना सफलता मिळावी म्हणून सारखी संधि मिळेल. धर्म, जन्म, यांनीं सिद्धीचे मार्ग अडविले जाणार नाहींत. गुणांना जें योग्य तें मिळालें पाहिजे. हा न्यायाचा अर्थ होऊन प्रयत्न व प्राप्ति यांचा अन्वय लागेल. समाजांत जें उपलब्ध होईल तें लक्षांत घेऊन सर्वांची गरज योग्य रीतीनें विचारांत घेतली जाईल. सर्व कांहीं आदर्श होईल असें नाहीं, पण विद्यमान अन्यायांतून, विषमतेंतून, वर्गवाऱ्यांतून, तटबंदींतून समाज मुक्त होऊन जुनी व जीर्ण झालेली पंढरी सोडून नव्या वातावरणांत येईल. तेथें त्याला मोकळी व स्वच्छ हवा, विस्तीर्ण क्षेत्र भेटेल. जवढें तो अधिक करील तेवढें अधिक अधिक क्षेत्र क्षितिजाप्रमाणें वाढत जाईल.

हक्कव्यवस्था जेथें प्रभावी आहे तेथें व ती तशी होण्यासाठीं समाजव्यवस्था व राज्यव्यवस्था कशी राहील याचें दिग्दर्शन वर केलें आहे. याप्रमाणें राज्याचे रचनेत नव्या आशयांना अनुकूल असे बदल झाले म्हणजे स्वातंत्र्य व समता यांचा आशय जसा वाढला, त्यांच्या कल्पनांचा जसा विधायक अर्थ झाला तसाच परिणाम कायद्याचे कल्पनेबाबत होणें अपरिहार्य आहे. भाषेला जसें व्याकरण तसें समाजाला कायदा हा आहे. समाजव्यवहाराचें नियमन तो करतो त्याजबरोबर समाजाचे व्यवहार लक्षांत घेऊन तो बदलत असतो. भाषेच्या उपयोगाप्रमाणें व्याकरणाचे नियम होत जातात व त्या नियमांप्रमाणें भाषेचा उपयोग होत जातो. वाढता व्यवहार, अधिक अधिक विविध होणारा व्यवहार याचें नियमन कांहीं सनातनी व स्वयंभू कल्पनांचेवर आधारलेल्या कायद्यानें होणार नाहीं. ज्या व्यवहारांचे नियमन करा-

वयाचें आहे त्यांच्यावर तो आधारला पाहिजे. राज्यांतील नागरिकांचे व्यवहार व वर्तन यांचे नियमनासाठीं कायदा, हें स्पष्ट असलेमुळें त्या नियमनाचें स्वरूप व त्याचा परिणाम या महत्त्वाच्या बाबी ठरतात. समाजांत न्याय असला पाहिजे याचा अर्थ कायद्यानें तो नागरिकांना मिळाला पाहिजे. न्यायाची भावना नुसती असून भागत नाहीं, तिला कायद्यांत समाविष्ट केल्याशिवाय ती प्रभावी होत नाहीं. न्याय या साध्याचें कायदा हें प्रस्थापित समाजांत एकमेव साधन आहे. या स्थितींत साधन चांगलें कीं वाईट हें, त्यानें काय व किती साध्य झालें यानें निश्चित होणार. कायदा चांगला कीं वाईट, योग्य कीं अयोग्य हें त्याच्या परिणामाचा जो अनुभव येईल त्यावरून निश्चित होणार. अमुक अधिकाऱ्यानें हुकूम दिला अगर अमुक सत्तेनें कायदा केला म्हणून तो योग्य अगर न्याय्य ही विचारसरणी त्याज्य आहे. न्यायाचा संबंध अनुभवाशीं आहे अधिकाराशीं नाहीं. कायदा योग्य कीं अयोग्य, न्याय्य कीं अन्याय्य हें त्याचे कर्त्यावरून ठरत नसून त्याचे कार्यानें ठरतें; म्हणून तो एक तटस्थ शक्ति आहे. सत्ता ही जशी तिच्या उपयोगावरून नैतिक अगर अनैतिक ठरते, स्वभावतः ती एक तटस्थ शक्तीच असते, तसाच प्रकार कायद्याबाबत आहे; किंबहुना सर्व साधनांचें सामान्यतः असें स्वरूप असतें. अग्नि अन्न शिजवील, आग लावील; सुरी भाजी चिरील, गळाही कापील; वाणी वेदांत सांगेल वाह्यातही बोलेल, जसा उपयोग केला जाईल त्यावरून हीं सर्व चांगलीं कीं वाईट ठरणार. स्वभावतः ती तटस्थच आहेत हें उघड आहे. तसेंच वापरणाऱ्याचे उद्देशानेंही चांगली अगर वाईट ठरणार नाहीं, तर प्रत्यक्ष उपयोगानें व अनुभवानेंच ठरणार आहे. चांगले उद्देश म्हणजे चांगला उपयोग अगर योग्य उपयोग हें मानणें चुकीचें आहे. चांगला उद्देश चुकीचा असू शकतो मूर्खपणाचा असू शकतो व म्हणून अनर्थही करूं शकतो. नरकाचा मार्ग सद्‌हेतूनेंच बांधून काढला आहे या म्हणण्यांत अर्थ व अनुभव दोन्ही आहेत. स्वातंत्र्य संरक्षणासाठीं केलेल्या कायद्यांनीं स्वातंत्र्य नष्ट झालेलें अनुभवास येतें. अनुभवास काय येतें हें महत्त्वाचें आहे. कांहीं हेतु समाजाचे साध्य व्हावेंत म्हणून केलेला कायदा जर तें साध्य करूं शकत नसेल तर तो विफल आहे, व्यर्थ आहे. कायदा हा सर्व समाजाचे गरजेसाठीं आहे, कांहीं थोड्या लोकांचे गरजेसाठीं, हितासाठीं नाहीं, म्हणून थोड्या लोकांनीं तो चांगला आहे असें म्हटल्यानें तो चांगला ठरत नाहीं, तो पूर्णपणें चांगला असला पाहिजे, म्हणजे सर्वांच्या अनुभवाला तो तसा आला पाहिजे. अखिल समाजाच्या गरजांचा विचार होऊन कायदा झाला पाहिजे व सर्व समाजाच्या अनुभवाला तो योग्य वाटला पाहिजे म्हणजेच तो न्याय्य ठरेल, एरवीं नाहीं.

कायदा योग्य आहे कीं नाहीं, पूर्ण आहे कीं नाहीं हें अर्थात् समाजानें ठरविलें पाहिजे. प्रथम कायदा हा जनतेंतील जास्तींत जास्त लोकांचा अनुभव लक्षांत घेऊन रचला गेला पाहिजे म्हणजे समजाचें गरजेचे दृष्टीनें तो अधिक पूर्ण होणें शक्य होतें. समाजांत अनंत गरजा व अनंत व्यवहार व त्यामुळें अनेक नातीं मनुष्या मनुष्यांत निर्माण होत असतात. या सर्वांत जुळणी करण्याचें, उत्पन्न होणाऱ्या संबंधांत समन्वय करण्याचें काम कायद्यानें करावयाचें असतें. आधुनिक समाज स्थिर नाहीं, गतिमान् आहे, त्यामुळें नवे नवे संबंध सारखे उत्पन्न होत असतात. त्यांचे नियमन परंपरेनें होऊं शकत नाहीं. कारण जुन्या अनुभवांशीं तें जुळत नाहींत. त्यांचे नियमन संबंधांत प्रत्यक्ष गुंतलेल्या व्यक्तींवर सोंपवून समाजाचें हित साधत नाहीं हा अनुभव आला आहे. मजूर व मालक यांच्यांतील संबंध त्यांनींच केवळ करार करून ठरवावे, त्यांत राज्यानें हस्तक्षेप करूं नये या नीतीचा परिणाम समाजाचे अहितास कारणीभूत झाला. राज्यानें हस्तक्षेप करून त्यांचें नियमन केल्यानें समाजहित साधतें. समाजांतील शांततेला हें करणें अवश्य ठरलें असें आतांही अवश्य ठरलें आहे. संबंध उत्पन्न झाले म्हणजे त्यांतून कांहीं हक्क, कांहीं कर्तव्यें, कांहीं कार्यें निर्माण होत असतात व त्यांची दखल कायद्याने घेतली पाहिजे. कारण त्या सर्वांचा परिणाम कमीजास्त प्रमाणांत सामाजिक असतो. समाजाची प्रगति परंपरेपासून कराराकडे चालली आहे ( Status to Contract ) असें मेन यांचें म्हणणें आहे. राज्य नानाविध संबंधांत हस्तक्षेप करूं लागल्यापासून ही प्रगति सामाजिक संबंधाकडे चालली आहे ( Contract to relation ) असें लास्कीचें म्हणणें आहे. वास्तविक ही प्रगति संबंधांतर्गत कर्तव्याचे दिशेनें होत आहे. निर्माण होणाऱ्या संबंधांतील सामाजिक कर्तव्य जसजसें राज्य कायदे स्पष्ट करून करीत जाईल, तसतसें हें प्रगतीचें स्वरूप अधिक अधिक दिसून येईल. उत्पन्न होणारे संबंध कायद्यानें सामाजिक दृष्टीनें नियमित केले पाहिजेत, मालकाची जबाबदारी सामाजिक दृष्टीनें नियमित केली पाहिजे. वाटेल तेव्हां मजुराला काढण्याचा हक्क त्याला न देण्यांत विशिष्ट मजुराचा प्रश्न महत्त्वाचा नाहीं तर हा हक्क दिल्यानें समाजांतील सुव्यवस्थेला, शांततेला धोका आहे ही दृष्टि असली पाहिजे. कोणीं काय करावें हें केवळ करणाराचे इच्छेवर न राहातां, जर त्या कृत्याचे परिणाम सामाजिक होणार असतील तर समाजाचे अनुभवानें करणारानें कार्य करावें, कसें करावें हें ठरविलें पाहिजे. नाटकांतील संवाद नटांनीं करावयाचे असले तरी वाटेल तसे अगर वाटेल त्या आवाजांत त्यांना करतां येत नाहींत. नाटकाच्या संविधानकाला व अन्य तंत्राला ते सुसंगत असले पाहिजेत. सामाजिक भाव

असलेले व्यवहार सामाजिक अनुभवाला जुळून असले पाहिजेत. तसें नसेल तर समाजांत संघर्ष निर्माण होईल, मेळा–मिलाफ राहाणार नाहीं. सामाजिक अनुभवाला जुळून निर्माण झालेले संबंध राहातील व त्यांचें कार्यही त्याचप्रमाणें राहील. हें कायद्यानें करावयाचें काम आहे. हितसंबंधांत समन्वय करतांना तो कसा घडून येतो हेंही महत्त्वाचें आहे. ज्यांच्यांत समन्वय घडून आणावयाचा आहे, त्यांच्यांत कांहीं तरी बरोबरी, कांहीं तरी सारखेपणा असला पाहिजे. संपावर गेलेले मजूर, अन्नासाठीं महाग झालेले एका बाजूला व संपन्न मालक दुसऱ्या बाजूला, यांच्यांत विचार-विनिमय होण्यासाठीं अगर करार करण्यासाठीं दोन्ही बाजूंना सारखी मोकळीक अगर सारखी शक्ति आहे असें म्हणतां येणार नाहीं. करारस्वातंत्र्य येथें आहे हें म्हणणें अयथार्थ आहे. सरकारनें दिलेला निर्णय मजुरांनीं अमान्य केल्यास उपासमार अगर संपाच्या बेसनदशीरपणाची पुकार, नंतर गोळीबार. पण जर मालकांनीं अमान्य केल्यास त्यांचेवर कारखाने उघडण्याची सक्ति करण्यास सरकार तयार नसेल तर सरकारचा निर्णय मजुरांनीं मानला म्हणून तो योग्य अगर झालेला समन्वय योग्य ठरत नाहीं. उलट तो निर्णय एकपक्षीय झाला हें स्पष्ट आहे. जुळण्यासाठीं एकत्र आणलेल्या हितसंबंधांत जर बरोबरी नसेल तर जे प्रभावी असतें त्याचें शिजतें. म्हणून कायद्यानें जो समन्वय करावयाचा, जी जुळणी करावयाची ती एकतर्फी होतां कामा नये. एका वर्गाचे हातांत कायदा करण्याची सत्ता, सर्व कारभार चालविण्याची सत्ता व दुसऱ्या कोणाला तेथें प्रवेश नाहीं ही कांहीं योग्य समन्वयाची साक्ष नव्हे. समन्वय म्हणजे दोन्ही पक्षांच्या गरजा एकमेकांनीं जुळवून घडवून आणलेली व्यवस्था व ही जर दोन्हीं पक्ष तुल्यबल असतील, कांहीं तरी बरोबरी त्यांच्यांत असेल तरच शक्य आहे. म्हणून कायद्यानें प्रथम हितसंबंध या दृष्टीनें समान होतील अशी परिस्थिति उत्पन्न करून अगर त्या दृष्टीनें समन्वय केला पाहिजे.

कायद्यानें समाजांतील व्यवहार व वर्तन यांतून निर्माण होणाऱ्या संबंधांचे केवळ नियमन असा अर्थ नाहीं तर योग्य नियमन असा अर्थ वरील विचारसरणींत स्पष्ट आहे. हें नियमन व्यापक अनुभवांतून काढलेल्या योग्य अभिप्रायांवर आधारलेलें असेल तर तें योग्य होईल हें स्पष्ट आहे. व्यापक अनुभव पद्धतशीर रीतीनें नोंदला गेला, निरीक्षिला गेला, म्हणजे त्यांतून योग्य अभिप्राय, योग्य अनुमानें काढणें शक्य आहे. समाजांत विविध हितसंबंध असतात, विरोधी हितसंबंध असतात. त्या सर्वांची जुळणी करून त्यांत कांहीं एकता उत्पन्न करून कांहीं व्यवस्था निर्माण करणें हें अत्यंत अवघड काम आहे. आधुनिक कालांत समाजांतील हितसंबंध तर आणखी

विविध झालेले आहेत व सारखे होत आहेत. नुसते मजूर म्हटले तरी त्यांचे हितसंबंध एकसारखे नाहींत. साधे, कसबी हा भेद तेथें आहेच. उत्पादनतंत्रांत नवीन नवीन बदल होऊन हे भेद आणखी बारीक बारीक होत आहेत. एका माणसाचे बुद्धीला सर्व हितसंबंध आकलन होऊन त्यांचे बाबतींत तो योग्य अभिप्राय देऊं शकेल हें शक्य नाहीं. फार काय एखादा वर्ग किती हुषार असला तरी आजच्या समाजाचे परिस्थितींत हें कार्य करण्यास तो पुरा पडणार नाहीं, पात्र ठरणार नाहीं. उलट कांहीं कांहीं वर्ग अगदीं संकुचित वृत्तीचे, संकुचित दृष्टीचे झालेले आहेत. व्यवसायापलीकडे त्यांचें मानसिक क्षितिज सरकत नाहीं. धनोपार्जनांत कित्येक इतके मग्न असतात कीं, एकलव्याप्रमाणें इतर कांहीएक त्यांना दिसत नाही. जो व्यवसाय असेल त्याचा समाजाशीं संबंध असतो याची दखलसुद्धां कांहीं घेत नाहीत. दारुगोळा सारखा उत्पन्न करीत राहिल्यानें युद्धाचें वातावरण निर्माण होऊन युद्ध अपरिहार्य होतें, हा विचार सदरहू कारखानदारांना अप्रस्तुत वाटतो. मद्याचें उत्पादन करून नफा मिळविणारांना आपण समाजाचा नैतिक अधःपात करण्यास मदत करतों हें असत्य वाटतें. माणसें आपण होऊन मद्य पितात, कारखानदार कुठें त्यांच्यावर सक्ति करतो हा युक्तिवाद पुढें येतो. तात्पर्य, उद्योगधंद्यांत गुंतलेले वर्ग तर सामाजिक दृष्टीनें क्वचित् विचार करतात. त्यांच्या उद्योगधंद्यांत राज्यानें हस्तक्षेप केल्यास त्यांना राग येतो व राज्यसत्तेचा हस्तक्षेप निरर्थक करण्यासाठीं ते वाटेल तें करतात असा अनुभव आहे. आपल्या हितसंबंधाचा विचार करतांना समाजाचे हितसंबंधाचा विचार केला पाहिजे हे त्यांना मान्य नसतें. कारण ही मान्यता दिल्यास त्यांच्या हितसंबंधाला मर्यादा येते. हें ते जाणतात. हे लोक सर्व समाजाचे हितसंबंध लक्षांत घेऊन वागतील अशी आशा बाळगणें व्यर्थ आहे. अशा वर्गाच्या म्हणजे खाजगी मालकीनें संपन्न झालेल्या वर्गाचे हातांत राज्यकारभार आला म्हणजे समाजांतील हितसंबंधाचा योग्य समन्वय होणार नाहीं, त्यांचें योग्य नियमन होणार नाहीं ही गोष्ट अनुभवसिद्ध आहे. आपलें हित तें समाजाचें हित, आपलें मत तें लोकमत असें त्यांना निश्चित वाटतें व आपला संकुचित अनुभव लक्षांत घेऊन ते वागतात, कायदे करतात. लोकांच्या अनुभवाला ते जुळत नाहींत व समाजांत शांतता व सुव्यवस्थेऐवजीं संघर्ष व अस्थिरता उत्पन्न होते, नव्हे तीं अपरिहार्य होतात.

समाजांत आर्थिक विषमता जेवढी अधिक तेवढी संपन्नवर्गाचे हातांत सत्ता अधिक येते, ते राज्यकारभारावर अधिक प्रभाव टाकतात. त्याच वर्गाला कौल लावून कायदे केले जातात, त्यांचाच अनुभव मनाला जातो. म्हणून समाजांत आर्थिक

समता जितकी अधिक असेल तितका जनतेचा अधिक प्रभाव सर्वसाधारण कारभारावर पडेल. सर्वसाधारण व्यक्तींचा अनुभव, त्यांचे मत लक्षांत घेतलें जाईल. व्यक्तीनें आपले अनुभवाला संघटनेची जोड दिल्यास तो अधिक प्रभावी होतो, किंबहुना व्यक्ति ही संघप्रवृत्ति असलेमुळें कांहीं साधर्म्यानें त्या एकत्र येतात, संघ बनवितात, संस्था काढतात. संघटनात्मक रीतीनें या संघांमार्फत व्यक्तींना आपला अनुभव, आपलीं मतें राज्यव्यवस्थेंत मांडतां आलीं पाहिजेत, अशी व्यवस्था असली म्हणजे होणारे कायदे न्यायाला धरून असतील. कायदा म्हणजे देववाणी नव्हे, दैवी साक्षात्कारही नव्हे, जनवाणींतून तो निघत असतो जनतासहकार हाच त्याचा आधार आहे. तो स्वयंभू नाहीं, त्याला लामाप्रमाणें शोधून काढावा लागत नाहीं; त्याला तयार करावा लागतो. ज्यांच्या हातीं तयार करण्याचा अखेरचा अधिकार असतो त्याच्या हाताचा गुण त्याला अधिक साहजिक लागतो. हें रसायन त्यांच्या निदानानें बनविलें जातें. त्यांच्या स्वभावधर्माप्रमाणें, त्याच्या अनुभवाप्रमाणें तें रुचि व रंग घेत जातें. कांहीं तरी निरपेक्ष अगर अपौरुष शक्तींचा तो परिणाम नव्हे. केवळ कायदेमंडळानें केला तरी त्यांतील सभासदांचे अभिप्रायांची छाप त्याचेवर असते. न्यायाधिशानें निकाल देऊन त्यांत कांहीं फरक केला तरी त्यावर अभिप्रायाची छाप पडतेच. कायदा होतांना त्याचें अखेरचें स्वरूप कुणाच्या तरी हितसंबंधांचा, अभिप्रायाचा नेट लागून निश्चित होतें. एक सूचना नापास होऊन दुसरी पास झाली म्हणजेच एक अभिप्राय, एक दृष्टिकोन अधिक महत्त्वाचा ठरून स्वीकारला गेला असाच त्याचा अर्थ होतो. या रीतीनें कायद्यांत महत्त्वाचे हितसंबंध, त्यांचे दृष्टिकोन, त्याचें तत्त्वज्ञान त्यांचीं गृहित कृत्यें समाविष्ट होतात. कायद्याची प्रकृति व प्राण या अन्नाला अनुसरून असतात. कायदा अनुभवानें जगतो तर्कानें नव्हे. म्हणून ज्यांचा अनुभव कायदा होतांना प्रभावी ठरला असेल त्यांच्यासाठींच तो जगतो व त्यांच्यासाठींच तो कार्य करीत असतो. समाजांत ज्या वर्गाचे हितसंबंध प्रभावी असतात, तेच कायद्याचा फायदा उठवितात. त्यांच्या गृहीत कृत्यांवर, त्यांच्या आशयावर त्याची उभारणी झालेली असते व त्याचा अंमल होतांना, या गृहीत कृत्यांना या आशयांना धरून तो केला जातो. त्याचा अर्थ करतांना याच गोष्टी न कळत का होईना न्यायाधिशाचे मनांत वावरत असतात. न्यायाधीशही सामाजिक वातावरणानें परिवेष्टित असतो. त्याची मानसिक सृष्टि ही समाजाविरहित अगर समाज निरपेक्ष नसते. आपला आशय, आपली दृष्टि न कळत का होईना तो निकालांत समाविष्ट करीत असतो. आणि न्यायाधिशांची निवड व नेमणूक करणारे सरकार आपल्या रीतीला, आपल्या

आशयांना, म्हणजे प्रभावी वर्गांच्या आशयाला न जुळवून घेणाऱ्या इसमांची निवड क्वचितच करतें. बहुशः हे न्यायाधीश या प्रभावी वर्गांतील अगर त्याचे आश्रितांपैकीं असतात. सरंजामशाहींत कायदा जमीनदारवर्गांचे हितासाठीं दक्ष होता. आजच्या भांडवलशाही समाजांत त्याची मांडणी भांडवलवाल्यांचे हिताला अनुसरून होते. कायदा करणारें सरकार त्यांचे इषाऱ्यावर चालतें. होणारे कायदे त्यांचें हित साधतात व समाजांतील बहुसंख्यांक लोकांच्या गरजांना अवमानलें जातें, त्यांचीं दुःखें तशींच तळपत राहातात. त्यांच्या इच्छा, त्यांचे अनुभव यांचा तेथें मागमूसही नसतो, आणि म्हणून, त्यांची निष्ठाही नष्ट होत जाते. ते राज्याबद्दल उदासीन होतात. कायदा हा जास्तींत जास्त लोकांच्या अनुभवांवर व अभिप्रायांवर आधारलेला असला, त्यानें समाजांतील विविध हितसंबंधाचा योग्य समन्वय केला असला, म्हणजे त्यानें साहजिक समाधान उत्पन्न होतें व सार्वत्रिक समाधान झालें म्हणजे कायद्याला खरेंखरें प्रामाण्य प्राप्त होतें.

असें हें यथार्थ प्रामाण्य कायद्याला प्राप्त करून देण्यासाठीं, समाजांतील प्रत्येक व्यक्तीला कायदा करण्याचे कामांत भाग घेण्याचा हक्क असला पाहिजे व तो त्याला घेतां येईल अशी समाजांत व्यवस्था असली पाहिजे. याप्रमाणें प्रत्येक नागरिकाला भाग घेण्याचा हक्क व व्यवस्था नसेल तर होणारे कायदे खरोखर राज्याचे नसून, कांहीं थोड्या लोकांच्या अगर ज्या वर्गांच्या गरजांचा विचार करून ते झाले असतील त्यांचेच ते होत. त्यांच्यापुरतें त्यांना प्रामाण्य आहे. कायद्यामागें राज्याची सर्व शक्ति उभी आहे म्हणून तो आज्ञापक स्वरूपाचा असतो व तो न मानल्यास शिक्षा अटळ असते. कायद्याला या राज्यशक्तीचा आधार योग्य ठरण्यासाठीं लोकांना तो करण्याचे क्रियेंत भाग घेऊं देणें जरूर आहे, महत्त्वाचें आहे. लोक भाग घेऊं लागले म्हणजे त्यांच्या इच्छा लक्षांत घेऊन, जुळणी करून एकंदर समाजाच्या गरजा लक्षांत घेऊन जास्तींत जास्त लोकांना पसंत पडेल असा मार्ग काढतां येतो. अशा रीतीनें कायदा निर्माण झाला म्हणजे तो एका विशिष्ट अगर संकुचित हितसंबंधाचे दृष्टीनें तो कायदे-शीर न होतां, सार्वत्रिक समाधान त्यानें उत्पन्न होईल अशा रीतीनें होत गेला म्हणून तो समाजाचे अनुभवांशीं जुळेल. कायदा करणें म्हणजे कांहीं तरी स्वयं-सिद्ध तत्त्वें आहेत असें मानून तर्कानें त्याची उभारणी करणें ही कल्पना आधुनिक जगांत चुकीची आहे, नव्हे घातुक आहे. जीवनाशीं कायद्याचा निकट संबध आहे म्हणून त्यांतूनच तो निर्माण झाला पाहिजे; बदलणाऱ्या जीवनप्रवाहाप्रमाणें त्याच्या आधारभूत कल्पनाही बदलल्या पाहिजेत. कायदा म्हणजे राज्याचा हुकूम ही केवळ

एकांगी कल्पना आहे. कायदा म्हणजे समाजाच्या व्यवहाराचें व वर्तनाचें समाजाच्या अनुभवानुसार समान हिताकरतां नियमन हा त्याचा खरा अर्थ आहे व असला पाहिजे. केवळ राजाज्ञा आहे व ती अमान्य केल्यास शिक्षा आहे असा अर्थ केल्यास तेथें निष्ठा राहाणार नाहीं व कायद्याला प्रामाण्यही मिळणार नाहीं. केवळ सत्तीवर आधारलेला असा तो कायदा होईल व केवळ सत्तीवर आधारलेलें असें फार काळ कधींच टिकत नाहीं. जनतेच्या मान्यतेला तो मुकेल, त्याला नैतिक प्रतिष्ठा मिळणार नाहीं. नागरिकांच्या मान्यतेनेंच समाजांत व्यवस्था राहूं शकते. ज्या समाजव्यवस्थेंत एकाच वर्गाचा, एकाच हितसंबंधाचा विचार होतो व बाकी सर्वांना डावललें जातें, तिला नागरिकांची मान्यता मिळणार नाहीं, ती व्यवस्था कायम करणाऱ्या कायद्याला नागरिक मान्यता देणार नाहींत. संमतीशिवाय होणारें नियमन अगर राज्य हें 'कायद्यानें प्रस्थापित' केलेलें असलें तरी संमतीशिवाय असल्यामुळें वस्तुतः तें कायदेशीर नाहीं. लोकसंमतीनें राज्य व कायदा कायदेशीर होतात. संमति म्हणजे विरोधाचा अभाव नव्हे तर कार्यांत सहभाग, सहविचार व सहकार्य म्हणजे संमति. संमति म्हणजे वृत्ति नव्हे प्रत्यक्ष वर्तन. एवंगुणविशिष्ट संमतीनें जें राज्य मुखानें कायदेशीर म्हणून सांगितलें जातें तें प्रजेच्या वर्तनानें कायदेशीर ठरतें, त्याला नैतिक प्रतिष्ठा मिळते.

विद्यमान अनुभव लक्षांत घेऊन कायदा जरी तयार केला तरी अनुभव सारखा बदलत असतो, समाजाचे व्यवहार सारखे वाढत असतात, नवे नवे संबंध उत्पन्न होत असतात, यामुळें कोणत्याही क्षणाला कायदा हा संपूर्णपणें अद्यावत् असूं शकत नाहीं. परिस्थितीची मागणी ही कायदा कधींही शंभर टक्के पुरी करूं शकत नाहीं. मागें सांगितल्याप्रमाणें कायदा हा नीतीचे मागें, लोकमताचे मागें २।४ पावलें तरी राहतोच. आजच्या आदर्शाप्रमाणें केलेला कायदा उद्यांचे आदर्शाला पुरा पडणार नाहीं. नीतीच्या बरोबर, लोकमताबरोबर, नव्या अनुभवाबरोबर कायदा ठेवण्यासाठीं पुनः पुनः कायदे करावे लागतात. कायदा व न्याय यांतील अंतर शक्य तेवढें कमी असावें म्हणून नव्या दृष्टीनें विद्यमान कायद्याचा अर्थ करून न्यायाधीश हें पुष्कळ वेळां तसें घडवून आणतात. जुना कायदा पण त्यांतून नवा अर्थ काढून समाजांतील विद्यमान न्याय कल्पनांना कायद्याची प्रतिष्ठा अनेक व्यापक व उदारबुद्धीचे न्यायाधीश देत असतात. वारसा, लग्न, दत्तकाचा हक्क वगैरे अनेक बाबतींत नवा अर्थ करून आधुनिक न्यायबुद्धीचें समाधान केलेलें आढळून येईल. श्रुति, स्मृति, सदाचार हें लक्षांत घेऊन न्याय करणाऱ्या न्यायाधिशांना कायद्यांत इष्ट तें बदल करण्याला केवढा

वाव आहे हें सहज दिसून येतें. नीति व सार्वजनिक धोरण याला अनुसरून कायद्याचा अर्थ लावण्याचा अधिकार असलेला न्यायाधीश दस्तऐवजांत वाटेल तो व्याजाचा दर असला तरी तो कमी करूं शकतो. मालक व मजूर यांच्या करारांतील कलमें त्याच दृष्टीनें तो कमीजास्त करूं शकतो. तथापि न्यायाधिशांनीं कायदा व नीति यांतील अंतर कमी करणें हें केवळ प्रसंगवशात् होईल, ही पद्धत म्हणून अगर तेवढें पुरेसें आहे असे ते मानतां येणार नाहींत. नव्या कल्पना नवे आदर्श नवा अनुभव हा न्यायाधिशांपुढें कुठल्या तरी कज्जाचे निमित्तानें आला तर न्यायाधीश त्याची दखल घेणार, म्हणून हवामान मोजण्याचें जसें यंत्र असतें व त्याचे सहाय्यानें जसें हवामानांतील फेरफार नोंदले जातात तसें कांहीं तरी समाजांत असलें पाहिजे. हवामानयंत्रानें पाऊस, वादळ यांची शक्यता, धरणीकंपाची नोंद व संभाव्यता कळते व समाजाला या माहितीचा उपयोग होतो. समाजांतील हवामान जर नोंदलें गेलें नव्या प्रवृत्तींची मोजदाद केली गेली, लोकव्यवहार कसें वळण घेत आहे याचें निरीक्षण केलें गेलें तर हें सर्व काम समाजाला उपयुक्त असेंच ठरणारें आहे.

समाजांतील लोकांच्या मनांत काय आहे, त्यांच्या प्रवृत्ति कशा स्वरूपाच्या आहेत, त्यांच्यांत कोणकोणते विचार प्रवाही होत आहेत, लोकांचा काय अनुभव आहे या सर्वांची पद्धतशीर नोंद होणें जरूर आहे. जर कायदा बदलावयाचा व चालू अनुभवाला जुळवून घ्यावयाचा तर चालू अनुभव हा निश्चित काय आहे हें कळलें पाहिजे. लोकमत हें लोकांचें केव्हां व मत केव्हां हें निश्चित करतां आलें पाहिजे. यासाठीं वरील गोष्टींची निस्पृह व निःपक्षपातपणें नोंद होण्यासाठीं अवश्य तें संघटन समाजांत असलें पाहिजे. लोकांनींही संकीर्णपणें अनुभव अगर लोकमत प्रदर्शित करण्यापेक्षां संघटित रीतीनें हें काम केलें पाहिजे. जर कायदे करणारें मध्यवर्ती विधिमंडळ असेल तर त्यानें कायदा करण्यापूर्वीं प्रस्तुत हितसंबंधांच्या संघटित संस्थांना विचारविनिमयांत घेऊन, त्यांचे दृष्टिकोन समजावून घेऊन मगच कायदा केला पाहिजे. मागें सांगितलेली पूर्वविचारविनिमयाची योजना याचसाठीं आहे. पूर्वविचारविनिमयानें जास्तींत जास्त अनुभव पुढें येतो, सर्व दृष्टींनीं केलेली टीका निरीक्षितां येते, विविध गरजांचे महत्त्व समजलें जातें, निर्णयांत आपल्याला स्थान आहे म्हणून त्यांत आपुलकी वाटते. तसेंच मुख्य धोरणविषयक निर्णय घेऊन तपशीलवार निर्णय घेण्याचें काम मागें सांगितल्याप्रमाणें विभागलेलें असलें म्हणजे होणाऱ्या निर्णयांत व त्याचे अम्मलबजावणींत जास्तींत जास्त लोकांचें सहकार्य मिळून सर्वत्र जबाबदारीची भावना उत्पन्न होईल. सत्ता स्वतःवरच, स्वतःचे जीवनाला संलग्न असणाऱ्या कारभारांत

चालवावयाची असल्यामुळें ती जबाबदारीनेंच चालविली जाईल. स्थानिक परिस्थिति-स्थानिक गरजा यांना अनुसरून योग्य ते तपशिलांचे निर्णय मुख्य धोरणाला धरून घेण्याची मोकळीक असल्यानें होणारे निर्णय कुणींतरी लादले असें वाटणार नाहीं. लोकांसाठीं होणारा कारभार लोकांनीं तो जास्तींत जास्त प्रमाणांत, जास्तींत जास्त ठिकाणीं केल्यानेंच तसा होतो. ही गोष्ट सत्तेचें संघटन संयुक्त पद्धतीनें करून, कारभारांत विकेंद्रीकरण करूनच शक्य आहे. या व्यवस्थेंत लोकमत व कारभार यांत अंतर पडत नाहीं, कायदा शक्य तितका चालू गरजांचा विचार करणारा व शक्य तितका चालू अनुभवाशीं जुळणारा होतो. राज्य एकसंधि नसल्यानें त्याच्या अम्मलबजावणींत जेथें तेथें सोयीगैरसोयींचा व्यवस्थितपणें विचार होईल व त्यायोगें कारभाराबद्दल अधिक निष्ठा वाटून राज्य हें आपल्या व्यतिरिक्त नसून आपलेंच आहे अशी भावना निर्माण होईल. राज्य म्हणजे केवळ सुव्यवस्था ठेवण्याचें संघटन असें त्याचें स्वरूप राहाणार नाहीं. वाटेल तें करून सुव्यवस्था व शांतता संरक्षण हें त्याचें ध्येय असणार नाहीं. असें ध्येय असलें म्हणजे सुव्यवस्था व शांतता यांचे नांवाखालीं समाजाचीं सर्व ध्येयें, सर्व आदर्श दडपले जातात, नागरिकांचें जीवन कोंडलें जातें, त्यांचें व्यक्तित्व मारलें जातें, समाजाची नैतिक वाढ खुरडते. शांतता व सुव्यवस्था ठेवणें हें एकच काम महत्त्वाचें झालें म्हणजे तें ठेवणारी सत्ता अनियंत्रित होते; सत्तारूढ लोक तिचा दुरुपयोग करतात. अधिकार लोकमताचे प्रकाशांत काम करीत असला म्हणजे जबाबदारीनें वागतो. त्याचे कृत्यावर टीका होत असली म्हणजे तो मर्यादा ओळखतो आणि प्रतिकाराची जाणीव असली म्हणजे उन्मत्त होत नाहीं. आधुनिक राज्यांत सत्तेच्या हातीं एवढीं शस्त्रें व एवढी साधनसामुग्री असते कीं, ती वाटेल ते फरक व्यक्तींचे जीवनांत करूं शकते. म्हणून स्वातंत्र्याचे संरक्षणासाठीं, विद्यमान जगांत नागरिकांनीं कमाल दक्षता घेणें जरूर आहे. कृत्याचा निषेध न केला तर लागलीच संमति आहे असें धरून चालण्यांत येतें. निषेध केला, चळवळ केली, लोकमताची प्रचंड लाट उसळली कीं, विरोध कां होतो याची चौकशी न करतां, त्यानें क्वचित् शांतताभंग केल्याचें निमित्त करून सत्ताधीश जुनीं, नवीं सर्व आयुधें परजतात व विरोध हाणून पाडण्यांत येतो. असें वातावरण उत्पन्न केलें जातें कीं, माणसें स्फूर्तिहीन व उदास होतात. विविधता मारली जाते. सत्य व ज्ञान यांना नागरिकांपासून दूर ठेवण्यांत येतें. असें वागण्यानें सत्ता शांतताभंग टाळूं शकत नाहीं. थोडा तो लांबणीवर पडतो, पण मग त्याचें स्वरूप क्रांतीच्या वळणावर जातें. सर्व नागरिकहक्क चिरडून टाकून केलेली शांतता म्हणजे

स्मशानशांतता, ठेवलेली व्यवस्था म्हणजे तुरुंगव्यवस्था होते. कारण नागरिक व कैदी यांच्यांत फारसा फरक राहात नाहीं. शांतता व सुव्यवस्थेशिवाय दुसरा उद्योग राज्यकर्त्यांना नसला, सत्ताधिशांना नसला म्हणजे हातांत असलेली सत्ता अधिक प्रबल होते, तिचा अभिलाष उत्पन्न होतो. सत्ताधीशवर्गांतच मग कलह उत्पन्न होतो. प्रत्येक गट मग आतांपर्यंत वंचित झालेल्या जनतेला आतांपर्यंत ठोकरलेल्या आदर्शांच्या घोषणांनीं आळविण्याचा प्रयत्न करून आपले बाजूला ओढण्याचा प्रयत्न करतो. शांतता व सुव्यवस्था ठेवणाऱ्यांत सुंदोपसुंदी न झाली तरीही त्यांनीं निर्माण केलेल्या स्मशानशांतींतूनच क्रांतीच्या गर्जना उठतात. स्वातंत्र्यासाठीं झालेल्या प्राणार्पणांतून स्वातंत्र्याचा प्राण निर्माण होत असतो. वधस्तंभ देशभक्तांनीं कवटाळल्यानें जयस्तंभ बनतो. प्राप्त घडी येतांच सत्ता हादरते, रावांचे रंक होऊन इतिहासजमा होतात हें सर्व लोकांना राज्यकारभारांत सन्मानीय, सारखें व सतत स्थान दिल्यानें टळतें.

जी राज्यव्यवस्था असावी म्हणून येथपर्यंत विवेचन केले, जें राज्याचें स्वरूप असावें म्हणून येथपर्यंत प्रतिपादलें आहे, त्याप्रमाणें झाल्यास राज्य व प्रजा यांच्यांतील मौलिक ऐक्य राज्यसत्तेचे द्वारें साधलें जाईल. राज्यसत्तेचे माध्यमानें राज्याचा अर्थ जो प्रजेला प्रिय आहे, तिनें अपेक्षिला आहे तो स्पष्ट केला जाईल. राज्य कांहीं तरी तिऱ्हाईत, बाह्य अशी वस्तु नाहीं. समाजाचें एक नैसर्गिक म्हणजे अवश्य असें कार्य करणारी शक्ति आहे. प्रत्येक मनुष्याला विकासाला अवश्य अशी परिस्थिति उपलब्ध होईल, किमान हक्कव्यवस्था राहील याची ती ग्वाही आहे. सनातन व स्वयंभू असें कांहीं तींत नसल्यामुळें व्यक्तिमात्राला आपले बुद्धीनें, आपल्या अनुभवानें सजवितां येईल अशी ती पार्श्वभूमि आहे. मानवी जीवन म्हणजे गणिताचे कायम सिद्धांत नव्हेत, हें जाणून कांहीं तरी गृहित कृत्यें धरून त्यांत व्यक्तींना कानसून, टापूनटिपून बसविलें जाणार नाहीं अशी खात्री देणारी ही व्यवस्था आहे. विविधतेला वाव आहे, अनुभवाला कार्यक्षेत्र आहे म्हणून त्यांत अव्यवस्था उत्पन्न होईल असें मानण्याचें कारण नाहीं. कोणीही व्यक्ति दुर्लक्षिली न गेल्यामुळें समाजांतील पूर्णत्वाकडे जास्तींत जास्त लक्ष साहजिक दिलें जातें. व्यक्ति, त्यांचे हितपरत्वें झालेले संघ व राज्य यांचे संबंध संघटनात्मक रीतीनें जुळवून घेतल्यानें होणारें कार्य कोणा एका व्यक्तिसाठीं अगर वर्गासाठीं न होतां, सर्व समाजासाठीं तें असेल आणि हें कार्य कोणाचे हुकमानें होत नसून सर्वांचे सहकार्याचें तें फळ आहे व तसेंच त्याचें स्वरूप राहील. एवंगुणविशिष्ट राज्य एकमुखी दिसेल पण एकासाठीं अगर थोड्यांसाठीं तें बोलणार नाहीं तर सर्वांचें मानस तें स्पष्ट करील. सर्वांसंत्र नांव असून

सेवकच आपलें हित पाहातात असें न होतां तें खरोखर सार्वजनिक सेवासंघाचें स्वरूप घेईल. कोणालाही तें वगळणार नाहीं, वंचित करणार नाहीं, क्षुद्र म्हणून बाजूला टाकणार नाहीं. धर्म कुणाला तरी बहिष्कृत करील पण राज्य हें सर्वांच्या मोक्षासाठीं, सर्वांच्या कल्याणासाठीं आणि तेंही या लोकांच्या ऐहिक अशा अभ्युदयासाठीं झटणारें राहील. अनुभवसिद्ध ऐहिक सुख सोडून अदृश्य व अनुभवापलीकडील कांहीं-तरीच्या आशेनें जगण्यांत आनंद आहे, गौरव आहे, आत्मोद्धार आहे हें तें न सांगतां, 'संसार करावा नेटका' असें सांगून त्याची व्यवस्था करील. तो केल्यानंतरच्च परमार्थाचा विवेक चांगला होईल असें व्यक्तींच्या अनुभवाला तें आणून देईल. त्याचें क्षेत्रांत हा हिन्दु, हा मुसलमान, हा खिश्चन, हा यहुदी, हा पुढारलेला, हा मागासलेला, हा नगरनिवासी, हा आदिवासी हा फरक निरर्थक ठरून त्याचें दृष्टीनें सर्व समान सर्व सारखे व म्हणून सर्वांच्या दृष्टींनीं जें योग्य तेंच केलें जाईल. थोडया लोकांच्यासाठीं तें न राहातां सर्वांच्या बुद्धीचा व इच्छेचा समन्वय त्यांत दिसून येईल. सर्वांना काय पाहिजे आहे हें सांगण्याचा हक्क व व्यवस्था असल्यानें व कोणी संपत्तिमुळें अधिक अधिकार प्राप्त करूं शकत नसल्यामुळें त्याचे कार्यांत सार्वजनिक हितच साधलें जाईल. मनुष्याचें महत्त्व त्याचेजवळ काय आहे यावर न ठरतां तो काय करतो याचेवर ठरत असल्यामुळें प्रत्येकाचे शद्वाला योग्य तो मान मिळून प्रत्येकाला आपला अभिप्राय स्वाभिमानानें सहकार्यांत आणतां येईल. मग राज्य हें समाजांतील नानाविध व्यक्तींचें व हितसंबंधाचें एकत्र येण्याचें स्थान बनून तेथें सर्व हितसंबंधांचा योग्य तो समन्वय होऊन, समाजाचे प्रगतिसाठीं, सौख्यासाठीं अवश्य ती एकी उत्पन्न करणारें स्फूर्तिस्थान तें होईल. सामाजिक दिलोदिल एकी उत्पन्न करणारा, कायम ठेवणारा तो एक प्रयत्न होईल. समाजांतील विविधता लक्षांत घेऊन विधायकता मारणारी एकता अगर एकसारखेपणा तेथें आणण्याचा प्रयत्न होणार नाहीं. सहकार्याच्या रक्तावर तें जिवंत रहात असल्यामुळें सर्वांना तें आपलेसें वाटेल. त्याचीं कृत्यें सद्-भावनेनें केलेलीं असतील असें सामान्यतः वाटेल. नदी, स्त्री व राज्यसत्ता यांवर विश्वास ठेवूं नये हा दंडक खरा, तथापि या व्यवस्थेंत निदान राज्य यावरील अविश्वास कमी होईल. हल्लींच्या परिस्थितींत कायदा व कारभार हे बहुशः निमूटपणें स्वीकारले जातात, तसें राहाणार नाहीं; जें होत आहे तें योग्य आहे याची खात्री प्रत्येक वेळीं व प्रत्येक क्रियेंत या पद्धतींत राज्याला द्यावी लागेल, पटवावी लागेल. पण त्याचमुळें कारभार व कायदा हें लोकांचें धन व लोकांचें वैभव आहे असें त्यांना वाटेल. सु-व्यवस्था व्यक्तींना विद्यमानाचे खोड्यांत बंद करणारी न ठरतां प्रगतीला, व्यक्तिविका-

साला, अवश्य तें स्थैर्य व अनुकूल असें वातावरण निर्माण करणारी घटना ठरेल. शांतता म्हणजे निःस्तब्धता राखणारी, नवविचारप्रतिबंधक अशी योजना न ठरतां नव विचारांना, नव्या प्रेरणांना अवश्य तें स्वास्थ देणारी परिस्थिति ठरेल. संघर्षस्थानें कमी होऊन समाजांत एकी व प्रगति जोडीनें वाढतील.

अशा तऱ्हेची व्यवस्था उभी करणें, राज्याचें असें स्वरूप घडवून आणणें ही केवढी महत्त्वाकांक्षा आहे!! कदाचित् स्वप्नसृष्टींत वावरणाराचें नुसतें हें स्वप्नच नव्हे तर काव्यमय स्वप्न आहे असाही आक्षेप येणें साहजिक आहे. ढकलत, ढकलत कुठें तरी, कसें तरी कालपथावर धडपडत जावयाचें नसेल तर कुठें जावयाचें, कसें जावयाचें, किती वेगानें जावयाचें हें निश्चित केलें पाहिजे. कांहीं तरी चित्र, कांहीं तरी योजना, कांहीं तरी विचारसरणी डोळयांपुढें ठेवली पाहिजे. काढलेल्या नकाशाप्रमाणें संपूर्णपणें मंदिर उभारलें जाणार नाहीं, तथापि लाटेप्रमाणें पुढेंमागें जिकडे नेलें जाईल तिकडे जाऊन, कर्तृत्वशून्य बनून दैवाच्या हातचें खेळणें तरी होण्याचें टळेल. होणार हें इतिहासानें ठरविलें जातें असें मानलें तरी स्वस्थ बसणें कर्तव्य ठरत नाहीं. मनुष्याचे पोटीं मनुष्य जन्माला येईल येवढीच नियति, इतकीच नियति फार तर इतिहास, मग त्याचा अर्थ दैवी, राजकीय अगर आर्थिक कसाही लावला तरी निश्चित करूं शकतो. अनिवार्य असलें तरी तें आकलन करण्यांत मनुष्याचें क्रियास्वातंत्र्य आहे व त्याला जास्तींत जास्त इष्ट तें स्वरूप योजनेनें देण्यांत त्याचें कर्तृत्व आहे, येवढें कार्यक्षेत्र ऐतिहासिक अनिवार्यतेच्या तत्त्वज्ञानानेंही मानवी प्रयत्नांना ठेवलें आहे. जन्मलेल्या मनुष्यानें काय करावें हें जन्माला घालणारा ठरवित नाहीं. मुलाचें रूप, रंग, गुण सर्वच कांहीं आनुवंशिक नसतात. मेहनत करून तो सुदृढ होऊं शकतो, अभ्यासानें ज्ञानी होऊं शकतो, प्रयत्नानें सिद्धि तो मिळवूं शकतो. मनुष्याचे ठिकाणीं अकर्तृत्व मानणें हा त्याचा व त्याला निर्माण करणाऱ्या परमेश्वराचाही अपमान आहे. मनुष्य जशी श्रद्धा धरतो तसा तो होतो. राष्ट्र जें आदर्श जोपासतें, ज्यांच्यासाठीं झटतें त्याप्रमाणें तें होतें. म्हणून जर एखादी व्यवस्था, एखादा आदर्श योग्य वाटत असेल तर प्रयत्नानें साध्य करून घेतला पाहिजे. वर वर्णन केलेलें राज्य वस्तुस्थितींत आणण्यासाठीं, होणाऱ्या प्रयत्नांत कांहीं गोष्टींची दक्षता घेतली पाहिजे. पहिली गोष्ट म्हणजे राज्य हें अनुभवांवर आधारलेलें असल्यामुळें तें चुकीस पात्र आहे हें मानलें पाहिजे. अनियंत्रित सत्ता स्वतःला नेहमीं अचूक व अप्रमादी समजते. असें समजणें तिला व प्रजेला घातुक आहे, म्हणून मनुष्यमात्र जसा चुकीस पात्र आहे तशीच राज्यव्यवस्थाही आहे. राज्यानें केलें म्हणून योग्य न समजतां, अनुभवाला तें योग्य

आहे म्हणून तें योग्य समजलें पाहिजे व या दृष्टीनें लोकांनीं तिच्यावर आपले अभिप्राय द्यावेत, टीका करावी, अनुभव सांगावे, याला योग्य वाव असावा. एवढेंच नव्हे तर तसे संघटित प्रयत्न होणें इष्ट आहे. राज्याच्या आज्ञा या न्याय्य का अन्याय्य हें ज्यांच्यावर त्या परिणाम करणार त्यांच्या अनुभवानें तें ठरणार असल्यामुळें, त्यांना आपला अनुभव सांगतां येईल, स्पष्ट करतां येईल इतकें ज्ञान त्यांना असलें पाहिजे. कारभारांतील राज्यसत्तेच्या चुका दाखविण्याकरितां नागरिकवर्ग दक्ष असला पाहिजे. नागरिकांनीं हक्कानें व मोकळ्या मनानें टीका केली पाहिजे व मग झालेले निर्णयही आपुलकीनें मानण्याची शिस्तप्रियता दाखविली पाहिजे. मी खुषीनें ऐकावें यासाठीं मला मोकळेपणानें टीका करतां यावी ही अवश्य शर्त असली पाहिजे. निर्णयांत भाग घेण्याचा हक्क असल्यानें झालेलें मानण्याची जबाबदारीही उत्पन्न होते. राजकारण म्हणजे समाजांत केव्हां, काय, किती व कसें शक्य आहे हें सर्वसाधारपणें जाणण्याची कला असा अर्थ केला म्हणजे हें जाणणारे थोडेच असणार व त्यांच्या हातीं कारभार दिला म्हणजे स्वतःचा अनुभव तोच समाजाचा, स्वतःची गरज तीच सर्वांची गरज असें मानण्यास ते कमी करीत नाहींत. इतरांचे अनुभवांबद्दल त्यांना जाणीव नसते व त्यांचें हें अज्ञान अनर्थाला कारणीभूत होतें. राजकारण म्हणजे समाजाच्या नानाविध क्षेत्रांत विस्तृतपणें काय, केव्हां व किती शक्य आहे हें जाणण्याची कला असा व्यापक अर्थ केला, म्हणजे त्या त्या क्षेत्रांतील व्यक्तींचा अनुभव हा राजकारणाचा महत्त्वाचा भाग ठरेल व तो जाणून घेण्यासाठीं भाषणस्वातंत्र्य ही अवश्य गोष्ट ठरेल. मनुष्याला श्वासोच्छ्वास जितका अवश्य तितकें भाषणस्वातंत्र्य राज्याला आवश्यक आहे. मनाला बोलूं न देणें, त्याला मर्यादा घालणें म्हणजे राज्यानें त्याला मारणेंच आहे. अप्रिय विचारांना बदनामीकारक अगर राजद्रोहात्मक मानणें याचा परिणाम शेवटीं प्रत्येक विचाराला मारण्यांतच होतो. अप्रिय विचार म्हणजे विद्यमान परंपरेचे विरुद्ध असतो म्हणून तो अप्रिय असतो. पण असल्या अप्रिय विचारांतच प्रगतीचीं, पुरोगामित्वाचीं बीजें असतात. त्यांना मारणें म्हणजे प्रगतीचा मार्ग बंद करणें ठरतें.

राज्यकारभार निर्दोष राहाण्यासाठीं त्यावर लोकमताला टीका करण्यास पूर्ण वाव देणें जसें जरूर आहे, त्याचप्रमाणें निःपक्षपातीपणानें जमा केलेली माहिती त्याचे योग्य मार्गदर्शनासाठीं अवश्य आहे. राज्यकारभारांतील निर्णय म्हणजे मनांतील मांडे नव्हेत. त्यांचा संबंध सत्यसृष्टीशीं आहे. कांहीं तरी स्वयंभू कल्पना करून, चित्र काढून येथें चालत नाहीं. लक्षावधि माणसांचे जीवनाचा प्रश्न तेथें उपस्थित होत

असतो. राज्यकारभाराचे कार्यांत क्षुल्लक चूकसुद्धां अनंत अनर्थ करूं शकते. चूक टाळ-ण्यासाठीं जास्तींत जास्त विचार करून वागलें पाहिजे. विचाराची सामुग्री, कच्चा माल म्हणजे तद्‌विषयक माहिती म्हणून ती अगदीं खरीखुरी व पूर्ण असणें जरूर आहे. वस्तुस्थितीची यथार्थ माहिती व तिचें सर्वांगीण आकलन करण्याची पात्रता जर राज्यकर्ते यांच्यांत नसेल तर राज्यकार्य सामाजिक हिताचे दृष्टीनें होणार नाहीं. परि-स्थितीचें आकलन म्हणजे ती कशी घडून आली, तिची चालू प्रवृत्ति कोणीकडे वाहात आहे येवढेंच नव्हे तर ती समाजावर काय परिणाम करीत आहे व पुढें काय करील याची संपूर्ण कल्पना डोळ्यांपुढें असणें हे होय, व हें आकलन करतांना, आकलन करणाऱ्या व्यक्तीनें आपला स्वतःचा अनुभव, स्वतःची अनुमानें व स्वतःचे पूर्वग्रह बाजूला टाकून, सत्यसृष्टि डोळ्यांपुढें उभी केली पाहिजे, मिळालेल्या माहितीवरून पुढें काय होईल याचे चित्र डोळ्यांपुढें उभें केलें पाहिजे. किती व कशी संकटें येतील याचें चित्र मग कांहीं तरी यथार्थ प्रमाणांत त्याला दिसेल. त्याचा निर्णय मग अधिक विचारपूर्वक होईल. अंतर्गत व्यवहारांत चुकीचें प्रायश्चित सामान्यतः मर्यादित असतें, पण आंतरराष्ट्रीय व्यवहारांत निर्णय घेणाऱ्या व्यक्तीच्या अपुऱ्या ज्ञानानें, अडेल स्वभावामुळें अगर अर्धवट वागणुकीमुळें अनर्थ कोसळतात. चेंबरलेनला हिटलरच्या हेतूंची माहिती संपूर्णपणें मिळाली असती व त्यानें तिचा अर्थ स्वतःचे संकुचित अनुभवाचे दृष्टीनें, स्वतःचे मताप्रमाणें न मानतां तो वागला असता तर युरोपचें राजकारण कांहीं निराळें झालें असतें. मनुष्याचे पूर्वग्रह प्रत्यक्ष सत्य त्याचेपुढें उभें राहिल्याशिवाय जात नाहींत. हिटलरला शांतता हवी होती हा इंग्लिश मुत्सद्यांचा समज त्यानें प्रत्यक्ष युद्ध सुरू केल्यानंतरच नाहींसा झाला. मनुष्याला आपण करतों त्यांत केवळ स्वार्थ आहे हें प्रत्यक्ष आंकड्यांनीं दाखविल्याशिवाय पटत नाहीं. मिठा-वरील करामुळें लोक तें कमी खातात व त्यामुळें जीवनाला आवश्यक अशी ही वस्तु पुरेशी त्यांना घेतां येत नाहीं, हें जेव्हां कर कमी झाला व खप वाढला हें आंकड्यानें सिद्ध झालें तेव्हां पटलें. प्राप्तिकर वाढविला कीं उद्योगधंदे बसतात हा स्वार्थी आक्षेप प्राप्ति-कर वाढविल्यानंतर उद्योगधंदे वाढले, प्राप्ति जास्त होऊं लागली हें आंक-ड्यांनीं सिद्ध केलें तेव्हां थोडें पटलें. माहितीची नोंद होणें, वस्तुस्थितीची व अनु-भवाची नोंद होणें हें यासाठीं जरूर आहे. योग्य निर्णयासाठीं, योग्य मार्गदर्शनासाठीं समाजांत जें कांहीं घडत आहे त्याची व त्याच्या परिणामाची नोंद झाली म्हणजेच त्याचा खरा खरा अर्थ समाजाला कळतो. समाजाचें तारूं कुठें चाललें आहे हें मग चांगलें कळतें. समाजांतील संघर्ष, अनवस्था, दुःख व दारिद्य कमी करावयाचें

असेल, त्यासाठीं योग्य निर्णय व यशस्वी प्रयत्न करावयाचे असतील तर परिस्थितीची यथासांग व यथार्थ माहिती राज्यकर्त्यांना असली पाहिजे. येवढेंच नव्हे तर वस्तुस्थिति काय आहे याची कल्पनापण सर्व समाजाला मिळाली पाहिजे. आज वर्तमानपत्रें व पक्षप्रचार ही कामगिरी योग्य तऱ्हेनें व योग्य प्रमाणांत करीत नाहींत. वाचकांना, श्रोत्यांना विशिष्ट तऱ्हेनें मत बनविण्यास अनुकूल अशी मांडणी वस्तुस्थितीची केली जाते. सत्यापेक्षां प्रचाराचा भाग त्यांत विशेष असतो. लोकमतानें टीका करावी हें जसें अवश्य, तसें ती योग्य असण्यासाठीं खरी व पूर्ण माहिती लोकमताला राज्यव्यवस्थेनें पुरविणें हेंही जरूर आहे.

दक्ष व विवेकी लोकमत असलें म्हणजे राज्यकारभार निर्दोष होण्याची जास्तींत जास्त शक्यता असते. कुठलाही राज्यकारभार १०० टक्के निर्दोष होणें शक्य नाहीं. कारण कुणी तरी, थोडें तरी केव्हां तरी नाखूष होणार. सर्वांना भाग घेण्याचा, टीका करण्याचा हक्क व व्यवस्था केली तरी असें थोडेंसें होणारच. माणसें विविध प्रवृत्तींचीं असतात. सर्वांच्या सर्व इच्छा सर्व तऱ्हांनीं पुऱ्या करणें कुठल्याही राजकीय संघटनाला अशक्य आहे. एक इच्छा पुरी करावी कीं त्यांतून दुसरी उत्पन्न होते. मानवी समाजांतील व्यवहार स्थिर नाहीं, सारखा गतिमान आहे. माणसांच्या गरजा स्थिर नसतात. त्यांचीं मनें कधींच एक आकार धरून बसत नाहीत. आज घडवावें, पुन्हां तें नापसंत, पुन्हां त्यांत बदल करावा, क्षणभर पाहावें, पुन्हां बदल करावा असें चालू असतें लहान मुलगा चित्राचे ठोकळे घेतो व एकरचना अशी कधींच ठेवत नाहीं, तसेंच मानवी समाजाचें आहे. एक जुळणी करावी तर त्यांतून आणखी कांहीं निघतें, पुनः प्रश्न उपस्थित होतो. राजकारण म्हणजे प्रश्न व उत्तरें अशी न संपणारी परीक्षा आहे. रोज निकाल आहे व रोज परीक्षा आहे असें राजकारण आहे. तथापि ज्या राज्यव्यवस्थेचा पुरस्कार येथपर्यंत केला आहे त्यामुळें जे कांहीं निर्णय होत जातील त्यांना मान्यता मागण्याचा हक्क त्या व्यवस्थेंत राहील. कारण होणारे निर्णय लोकांच्या सहकार्यानें होतील. प्रत्येक परीक्षेंत पहिला वर्ग जरी मिळाला नाहीं तरी नापास होण्याचा प्रसंग बहुशः येणार नाहीं. या व्यवस्थेंत राज्याबद्दलची निष्ठा श्रेष्ठ प्रतीची असेल, कारण तींत आत्मीयतेचा विश्वास आहे. त्या निष्ठेत भावनांची तीव्रताही असेल. कारण व्यक्तींच्या मनांतील आशयांचा व आदर्शांचा आविर्भाव त्या व्यवस्थेंत झालेला असतो. तथापि अनुयायांच्या निष्ठेंतील तन्मयता असूनही या राज्याचे सर्व निर्णय मान्य केलें जातील असें नाहीं. कारण राज्य हें चुकीला पात्र आहे येवढा विवेक या निष्ठेंत असतो. मनुष्य हा थोडासा स्वभावानें बंडखोर आहे. ८४ लक्ष योनींतून प्रवास करून

मनुष्यपद प्राप्त झालेलें असतें असें धर्म सांगतो. आधुनिक प्राणिशास्त्राप्रमाणें उत्क्रांति होत होत आणि उत्क्रांति होतांना झगडत झगडत, संघर्ष करीत करीत मनुष्य हा प्राणि अस्तित्वांत आला आहे. परिस्थितीशीं झगडावें हा त्याचा स्वभावच आहे. म्हणून कोणी त्याचे इच्छेविरुद्ध त्याचेवर अम्मल गाजवूं लागला म्हणजे त्याचा वरील स्वभाव विशेष उसळून येतो. परिस्थितीप्रमाणें तो टीकेचें स्वरूप धारण करील. विरोधांत तो दिसून येईल, प्रसंगीं प्रत्यक्ष बंडाचें स्वरूपही त्याला प्राप्त होईल. राज्याच्या आज्ञा अवमानण्यास जेव्हां नागरिक तयार होतो तेव्हां त्यांतील धोका तो जाणून असतो. त्याचा विरोध चुकीचा मानणें अगर क्षुद्र समजणें हें अयोग्य आहे आणि जेव्हां मोठ्या संख्येनें नागरिक प्रतिकारास तयार होतात त्या वेळी कांहीं तरी विशेष अन्याय, कांहीं असह्य अशी परिस्थिति झाली असली पाहिजे असें गृहीत धरलें पाहिजे. कारण तसें कांहीं असल्याशिवाय लाखों लोक आपले प्रिय प्राण खर्ची टाकण्यास तयार होणार नाहींत. आपल्या मार्गानें जाणारा नाग, सहसा भानगडींत न पडणारी गरीब जनता, तसेंच कांहीं झाल्याशिवाय उलटणार नाहींत आणि जनतेवर झालेला अन्याय तिला दडपून टाकून दूर होत नाहीं. रोग्याचें ओरडणें बंद केल्यानें रोग कसा दूर होईल? ओरडावयास भाग पाडणारा रोग काय आहे हें पाहून त्यावर इलाज केला पाहिजे. काय होतें आहे हें रोग्याने सांगितल्याशिवाय कसें चालेल? राज्यकारभार कुठें बोंचतो, कुठें जांचतो हें जनताच सांगणार. म्हणजे राज्याचें कृत्य चांगलें कीं वाईट हें शेवटीं प्रत्येकजण आपल्या अनुभवाप्रमाणें ठरविणार. या स्थितींत प्रत्येक व्यक्तीची मान्यता ही राज्याला महत्त्वाची बाब असली पाहिजे. राज्यानें सांगितलें म्हणून तो मानणार नाहीं, त्याला अनुभवाला पटलें म्हणजे तो मानील, त्याच्या प्रवृत्तीला तें जुळवून घेतां आलें म्हणून तो मानील. जेथें सत्तेपुढें सत्याची प्रतिष्ठा नाहीं, अधिकारापुढें अनुभव क्षुद्र समजला जातो त्या राज्यव्यवस्थेंत व्यक्तीच्या मान्यतेला अगर तिच्या मताला किंमत नाहीं हें उघड आहे. तेथे सत्ता व अधिकार शेवटीं स्वार्थाचे आहारीं जाऊन क्रांतीचा, अव्यवस्थेचा मार्ग तयार करीत जातात. समाजांत अन्यायाचें प्रतिकाराला, रास्त विरोधाला मारण्यानें, दाबण्यानें अव्यवस्था उत्पन्न होते. विरोध अगर विचार दाबल्यानें अधिक प्रतिष्ठा पावतात व सत्य त्यांचे बाजूला आहे असें वाटणें मग साहजिक होतें. विरोध अगर विचार न मारतां, त्यांचे आशय समजून घेऊन राज्यकार्य झालें पाहिजे. कुणीही व्यक्ति क्षुद्र न मानतां प्रत्येक व्यक्तीची मान्यता मिळविण्याचा राज्यानें प्रयत्न केला पाहिजे.

राज्यानें ज्या तत्त्वावर अंतर्गत कारभारांत वागणें इष्ट आहे असें येथपर्यंत प्रति-

पादलें आहे त्याच तत्त्वांना अनुसरून त्याची आंतरराष्ट्रीय जगांत वागणूक झाली पाहिजे. लहान जमाती, नगरराज्यें, छोटीं राज्यें, राष्ट्रराज्यें याप्रमाणें राज्य या संघटनेच्या प्रगतीचा इतिहास आहे. आजच्या जगांत राष्ट्र–राज्य ही प्रभावी कल्पना आहे व तिचा काय परिणाम होत आहे याचें विवेचन मागेंच केलें आहे. राष्ट्र–राज्याला प्राप्त झालेलें प्रभुत्व, सर्वाधिकार हे चिरकालीन राहातील असें मानण्याचें कारण नाहीं. तसे ठेवण्यांतील धोकाही समजेल अशा रीतीनें प्रत्येकाला पटला आहे. तथापि प्रत्येकजण अभिमानाला बळी पडत आहे. आंतरराष्ट्रीय संघटनेंत, राष्ट्र–राज्य हा घटक कल्पून स्वायत्ततेच्या तत्त्वावर ती यशस्वी कशी करतां येईल याचेंही दिग्दर्शन मागें केलें आहे. आंतरराष्ट्रीय व्यवहार सहकार्यावर आधारल्यापासून होणारे फायदे अनुभवास आलेलें नाहींत असें नाहीं. जगाच्या आर्थिक व्यवहाराची घडण आंतरराष्ट्रीय होणें इष्ट व अपरिहार्य आहे. त्याविरुद्ध जें वर्तन कांहीं काळ राष्ट्रांनीं केलें त्याचें प्रायश्चित आज जग भोगीत आहे. जगांतील सर्व प्रकारची साधनसामुग्री अखिल मानवजातीच्या हिताच्या दृष्टीनें वापरली जावी, तशा रीतीनें तिचें नियंत्रण व्हावें, तशी कांहीं तरी व्यवस्था व्हावी असें सर्वांना वाटलें व अनेक घोषणाही त्याप्रमाणें झाल्या आहेत. तथापि ही व्यवस्था करणारें संघटन निर्माण करण्याचा प्रश्न आला कीं, पुनः स्वार्थ व अभिमान आडवे येतील अशी साधार भीती वाटते. राष्ट्रराज्यें जोंपर्यंत आपलें प्रभुत्व कमी करण्यास तयार नाहींत तोंपर्यंत असें संघटन घडून येणें कठीण आहे. राष्ट्र–राज्य प्रभुत्वपूर्ण राहाण्यापासून खुद्द त्यालाही धोका आहे. विवेकानें वागण्याऐवजी वक्रबुद्धीनेंच तें आंतरराष्ट्रीय कारभारांत बिकट प्रसंगीं वागतें. विवेकबुद्धीवर, विचारविनिमयावर विश्वास न ठेवतां वागणारीं राष्ट्रें, युद्धाचे पवित्र्यांतच उभीं असतात. ज्याच्यांत धमक असेल त्यानें घ्यावें व जोर असेल त्यानें ठेवावें हा जंगलचा कायदा जे मानतात त्यांना नष्ट केल्याशिवाय जगांत शांतता नाहीं. राज्य लहान असो अगर मोटें असो, त्याला आंतरराष्ट्रीय संघटनेंत योग्य तें स्थान असलें पाहिजे. त्यांच्या हक्काची मोजदाद त्यांचेजवळ किती तोफा, किती विमानें, किती सैन्य आहे यांवर अवलंबून नसली पाहिजे. आंतरराष्ट्रीय संघटन हें या दृष्टीनें संयुक्त स्वरूपाचेंच राहील. प्रत्येक घटक-राज्याला स्वायत्तता राहून संयुक्त कारभाराचे बाबींत भाग घेण्याचा हक्क व व्यवस्था असेल. सैन्य हें जर संरक्षणासाठीं असेल तर त्याचें नियमन आंतरराष्ट्रीय दृष्टीनें होईल. जर तें अंतर्गत सुव्यस्थेसाठीं असेल तर राज्य त्याचें नियमन करील, काय उत्पादन करणें योग्य आहे हें राज्य ठरवील, पण देशाबाहेर कोठें व कसें खपवावें हें आंतरराष्ट्रीय संघटन ठरवील. व्यक्तिव्यक्तींतील

न्याय राज्य करील, राष्ट्राराष्ट्रांतील न्याय, ही संघटना करील. एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राचें अंकित ठेवणें म्हणजे जगाच्या शांततेला धोका आहे म्हणून ही परिस्थिति नष्ट करण्याचें काम या संघटनेचें आहे. साम्राज्य व जागतिक शांतता हीं कधींहीं एकत्र राहाणार नाहींत. हा विरोध सर्व जगाचे नाशाचें, अशांततेचें महाकारण आहे. तें जर दूर झालें नाहीं तर मूळ प्रश्न सुटणार नाही. जगांत न्याय न मिळाल्यानें विरोध गप्प राहाणार नाहीं, शांतता टिकणार नाहीं. न्याय हा राज्यांत व आंतरराष्ट्रीय जगांत शांततेचा एकमेव आधार आहे. अभिमान व अभिलाषा यांचे परिणाम अशांति व अव्यवस्था हे सर्व काळीं, सर्व ठिकाणीं दिसून आले आहेत. त्यांच्या त्यागांतच सर्वांचें हित आहे. न्याय व शांतता या मार्गानेंच उपलब्ध होईल.

वरील राज्यविषयक विचारसरणी कांहींना आंतरराष्ट्रीय दृष्टीनें पसंत पडणार नाहीं, कांहींना अंतर्गत दृष्टीनें पसंत पडणार नाहीं, कांहींना दोन्ही दृष्टींनीं पसंत पडणार नाहीं. ज्यांना राज्याची आज्ञा शिरसावंद्य वाटते, जे तिजविरुद्ध जाणें हें सर्व परिस्थितींत गैर समजतात व राज्याला साष्टांग नमस्कार घालणें हें कर्तव्य मानतात, त्यांना वरील विचारसरणी बिलकुल पसंत पडणार नाहीं. त्याचप्रमाणें ज्यांची दृष्टी कायद्याकडे पाहाण्याची केवळ कायदेशीर आहे त्यांनाही पसंत पडणार नाहीं. प्रस्थापित राज्यसत्तेनें केलेला कायदा मनाला आला तर मानावा असें झालें तर राज्यसत्ता निरंतर धोक्यांत आहे, कायद्याला निश्चिति नाही, व्यवहाराला स्थैर्य नाहीं असें या कायदेपंडितांचें मत आहे. ज्याला अधिकार आहे, मग तो अधिकार कसाही मिळालेला असो, त्यानें हुकूम दिला असेल, मग तो हुकूम कितीही अन्यायी असो, तर तो कायदेशीर आहे, त्याचे युक्तायुक्ततेबद्दल विचार करण्याचें कारण नाहीं अशी त्यांची विचारसरणी आहे. कायद्याबाबतची ही विचारसरणी येथपर्यंत प्रतिपादलेल्या राज्यविषयक कल्पनांना विसंगत आहे. कायदा हा राज्याचे मुखांतून निघाला असला तरी तो राज्याचा हुकूम नसून जनतेचें, समाजाचें हृद्गत आहे असा त्याचा अर्थ प्रतिपादलेल्या राज्यव्यवस्थेंत आहे. ज्या शक्तीमुळें राज्याला नैतिक प्रतिष्ठा मिळते त्या शक्तीवर त्याचा आधार आहे. केवळ राज्याची आज्ञा म्हणून, केवळ राज्याची इच्छा म्हणून, कायद्याला प्रामाण्य येत नाहीं, मान्यता केवळ राज्याला म्हणून मिळणार नाहीं. समाजांतील सर्व हितसंबंधांचा विचार घेतला गेला आहे, केवळ एकांगी तो नाहीं या विश्वासाच्या भावनेवर मान्यता आधारलेली आहे. अर्थात् या विचारसरणीमुळें राज्याचें अमर्याद प्रभुत्व अमान्य केलें जातें. राज्य हें स्वतःला जेवढी मर्यादा कायद्यानें, खुषीनें घालून घेईल तेवढीच मर्यादा त्याला आहे, अन्यथा तें

अमर्याद आहे. कायदा त्यापुढें प्रभावी नाहीं, कायद्याचा निर्माता तें आहे, कायदा त्याचे हक्क अगर सत्ता मर्यादित करूं शकत नाहीं हेही सिद्धान्त वरील विचारसरणीनें अमान्य होतात. कायदा या कल्पनेंत दोन गोष्टींचा समावेश आहे. एक करावयाचें कार्य व तें करण्याची आज्ञा. कायदेपंडितांचे दृष्टीनें कायद्यांतील आज्ञा हा भाग महत्त्वाचा आहे, त्याचें आज्ञापक हें स्वरूप महत्त्वाचें आहे. वरील विचारसरणींत कार्य हें महत्त्वाचें मानलें आहे; कायद्याचें कार्यात्मक स्वरूप हें महत्त्वाचें मानलें आहे. त्याचप्रमाणें कार्य ज्या हेतूसाठीं करावयाचें, कायद्याचा जो हेतु आहे, तो कोणत्या रीतीनें सिद्ध केला जातो हेंही या विचारसरणींत महत्त्वाचें आहे. दस्तऐवजावर सही केली म्हणून तो बंधनकारक होत नाहीं, भरणा मिळाला असेल तर तो बंधनकारक ठरतो. भरण्याचे अभावीं दस्तऐवज नाकारण्याचा पूर्ण अधिकार जसा आहे तसाच कायद्यानें मानणाराचें हित साधत नाहीं म्हणून तो अमान्य करण्याचा त्याला पूर्ण अधिकार आहे. नागरिक आहे येवढ्यानें मान्यता दिलीच पाहिजे असें नाहीं. हा कायदा आहे, तो तूं मानलाच पाहिजेस अशी धमकी दिल्यानें नागरिकाला तो प्रमाण वाटणार नाहीं, तो योग्य वाटणार नाहीं. शासनाचे भीतीनें तो मानील पण ती मान्यता नव्हे. त्याचे अनुभवाला कायदा पटला म्हणजे त्याला खरें प्रामाण्य, खरी मान्यता आली. म्हणून नागरिकांच्या अनुभवांचा समन्वय करून, त्यांच्या अभिप्रायांचें संकलन करून त्यांतून कायद्याचा पिंड निर्माण व्हावा हें तत्त्व वरील राज्यव्यवस्थेंत प्रतिपादलें आहे. प्रत्येक व्यक्तीचा अनुभव प्रमाणानें निराळा असला तरी सर्वसाधारणपणें त्यांत प्रकार सारखाच असतो म्हणून तर समन्वय शक्य असतो, कांहीं साधर्म्य असतें म्हणून जुळणी करणें शक्य होतें. मनांतल्या आकांक्षा, हितसंबंधक कल्पना सिद्ध व्हाव्यात यासाठीं प्रत्येकाची धडपड असते; त्या दृष्टीनें कायदा असावा, कारभार असावा असें प्रत्येकाला वाटतें व त्याच दृष्टीनें झालेला कायदा व चालत असलेला कारभार व्यक्ति पाहात असते. तसें कांहीं त्यांत मिळालें म्हणजे तिला समाधान वाटतें. असें समाधान लाभावें म्हणून त्याला अवश्य ती व्यवस्था समाजांत असावी या दृष्टीनें हक्क व्यवस्था ही महत्त्वाची बाब मानून तिला वरील राज्यव्यवस्थेंत स्थान दिलें आहे. जें व्यक्तींना हवें आहे व जें योग्य आहे त्याचे प्राप्तीसाठीं प्रयत्न करण्याची मोकळीक जर समाजांत नसेल तर ती व्यवस्था व तिचे संरक्षण करणारी राज्यव्यवस्था व्यक्तीचे दृष्टीनें निरर्थक आहेत. हक्कव्यवस्था असली म्हणजे व्यक्तींना अवश्य तें वातावरण प्रयत्नासाठीं उपलब्ध होतें. मग कायद्याचे मार्गानें गेल्यानें सिद्धि मिळेल असा विश्वास उत्पन्न होतो. कारण कायदा करण्यांत व्यक्तीला

भाग घेण्याचा हक्क असतो व कायदा हा तिऱ्हाईताचा हुकूम न ठरता, आपल्या सहविचारानें, सहकार्यानें झालेलें नियमन असा भाव तेथें निर्माण होतो. तेथें मग सर्वांच्या गरजांचा विचार होतो, सर्वांच्या गरजेचें योग्य तें महत्त्व लक्षांत घेऊन त्या दृष्टीनें कायदा घडविला जातो, तसा तो आकार घेतो. कायदा हें कोणा एका हितसंबंधाचें अगर समाजांतील कोणा एका भागाचें कार्य न ठरतां, सर्व समाजाचें तें कार्य ठरतें. मग सर्व समाजाचे दृष्टीनें जें हवें आहे, तें साध्य करणारा असें कायद्याचें स्वरूप होतें व ज्या प्रमाणांत हें तो साध्य करतो त्या प्रमाणांत त्याची प्रतिष्ठा, त्याचें प्रामाण्य व त्याची शक्तिही निर्माण होते.

समाजांतील सर्व हितसंबंध एकत्र आले, त्यांचे समन्वयांतून कायदा निर्माण झाला म्हणजे अयोग्य महत्त्व कुणा एकाही हितसंबंधाला मिळणार नाहीं. प्रत्येक हितसंबंधाची छाननी होऊन योग्य तो क्रम व योग्य ती किंमत त्याला मिळेल. व्यक्ति अवमानिली जाणार नाहीं. कारण तेथे व्यक्तीच्या अनुभवाला स्थान असून त्याचे आधारें विचारविनिमय होऊनच जुळणी होत असते. जुळणी करून, समन्वय करून, निर्णय घेतांना कमीजास्त त्याग प्रत्येकाला करावा लागतो आणि हा त्याग करून झालेला निर्णय दिलेल्या किंमतीचे मानानें योग्य कीं अयोग्य हें शेवटीं व्यक्तींनींच आपापल्या अनुभवांनीं ठरवावयाचें असतें. प्रत्येकाचा अभिप्राय सारखा पडेल असें होणार नाहीं. निरनिराळ्या संबंधांत व्यक्ति वागत असतात म्हणून प्रत्येकाचे मनावर सारखा परिणाम होईल ही अपेक्षा करणे चुकीचें आहे. प्रत्येकजण आपाआपल्या दृष्टिकोनांतून पाहात असतो. सर्व दृष्टिकोन विचारांत घेऊन प्रत्येकजण विचार करील हेंही शक्य नाहीं. म्हणून प्रत्येकाचा अभिप्राय निर्दोष अगर पूर्ण विचारांतीं दिलेला आहे असे मानणेही चुकीचें होईल. शिवाय ज्या निर्णयावर अभिप्राय द्यावयाचा आहे, ज्याचा अनुभव स्पष्ट करावयाचा आहे तेही स्वयंपूर्ण अगर निरपेक्ष नसतात. अलग अशी घटना त्यांना मानतां येणार नाहीं. सदरहू निर्णयांचीं मुळें खोलवर गतकालांत रुजलेलीं असतात, तसेंच त्यांचा परिणामही भविष्य काळांत दूरवर होणार असतो. म्हणून अनुभव व अभिप्राय सापेक्ष व समर्यादच असणार. तथापि जेवढा कांहीं अनुभव व्यक्तींना येत जातो, जेवढे कांहीं त्या जुळवून घेतात, त्यांतूनच त्यांचे स्वतःचे सिद्धान्त, स्वतःच्या संवयी निर्माण होतात, त्यांतूनच त्यांच्या आकांक्षा रूप घेत जातात. या सर्वांचा आविष्कार समाजांतील व्यक्ति करूं लागल्या म्हणजे त्यांतील विरोधामुळें संघर्ष निर्माण होणें, समाजव्यवहारावर ताण बसणें अपरिहार्य होतें. हा ताण, हा संघर्ष कमी करणें अत्यंत अवश्य आहे. म्हणून जरी निर्णयांनीं हा

टाळतां आला नाही तरी तो कमींत कमी होईल असे निर्णय घ्यावयाचे झाल्यास, ते निर्णय जास्तींत जास्त लोकांचे अनुभवाला योग्य व पुरेसे वाटतील असे असले पाहिजेत. समन्वय करतांना निर्णय घेतांना, कायदा करतांना हीच दृष्टि ठेवली पाहिजे. योग्य व पुरेशी याचा अर्थ व्यक्तीचे स्वार्थी दृष्टीनें नव्हे तर व्यक्तीला समाजांतील चालू व्यवहारांत जें महत्त्वाचें वाटतें त्या दृष्टीनें झालेले निर्णय योग्य व पुरेसे असले पाहिजेत. झालेले निर्णय त्याला सर्वस्वीं टाकाऊ न वाटतां, चालवून तर पाहूं, इतकी तरी भावना त्याचे मनांत निर्माण झाली पाहिजे. अशी कांहीं तरी भावना मनांत असेल तरच त्यानें निर्णय मानावा अशी अपेक्षा करणें योग्य होईल. राज्याची आज्ञा मानावी हें नागरिकाचें नैतिक कर्तव्य आहे हा सिद्धांत, आज्ञेंत समाविष्ट झालेलें कृत्य आज्ञा पाळणाऱ्या नागरिकाला योग्य आहे असें वाटत असेल तरच लागू आहे. नागरिकानें योग्य आहे असें मत दिलें म्हणजेच तें कृत्य नैतिक ठरतें व तद्विषयक आज्ञा पाळणें हें मग त्याचें नैतिक कर्तव्य ठरतें. जें योग्य आहे असें नागरिकाला वाटत नाहीं, त्या बाब-तचा कायदा राज्याने केला म्हणून तो नागरिक योग्य अगर न्याय्य मानणार नाहीं. कायदा आहे म्हणून त्यांत न्याय आहे अगर तो योग्य आहे असें मानणें चुकीचें आहे. नुसतें यमक साधलें म्हणजे जसें काव्य निर्माण होत नाहीं, तसें नुसतें नियमन झाल्यानें न्याय निर्माण होत नाहीं. रचना म्हणजे काव्य नव्हे, कायदा म्हणजे न्याय नव्हे. मनाला प्रसन्न करणारे भाव दोन्हींत पाहिजेत, म्हणजेच ते यथार्थ होतात. म्हणून कायदा करतांना जास्तींत जास्त मनें प्रसन्न होतील ही दक्षता घेणें जरूर आहे. सर्व दृष्टींनीं विचार करून, जास्तींत जास्त मान्यता मिळविण्याचा प्रयत्न करणें येवढें जरूर झालें पाहिजे.

नागरिकांच्या मान्यतेनेंच कायद्याला नैतिक प्रतिष्ठा मिळते, त्याचे अभावीं कायदा म्हणजे राज्याचे बलनिष्ठ शक्तीचा केवळ आविष्कार आहे, त्या शक्तीचा तो प्रयोग व प्रदर्शन आहे. राज्याला अखेरचा निर्णय अंमलांत आणण्यासाठीं अवश्य ती सक्ति करण्याचा अधिकार व सत्ता असली पाहिजे हें खरें, तथापि मान्यताशून्य कायदा अंमलांत आणतांना ती वापरणें हा तिचा दुरुपयोग आहे. अशा रीतीनें उपयोग करून राज्यसत्ता कायदा अंमलांत आणण्याचें यश मिळवील पण त्याचबरोबर निष्ठा मागण्याचा तिचा अधिकारही नष्ट होईल. निष्ठा विनशर्त अगर निरपेक्ष वस्तु नाहीं. राज्यकार्यांत व राज्यकारभारांत नागरिकांना मान्य होईल असें घडत असेल व तसा अनुभव त्यांना येईल तरच ते निष्ठा दाखवतील. त्यांना मान्य आहे कीं नाहीं, त्यांचे अनुभवाला काय आलें आहे हें त्यांनीं सांगितलें पाहिजे, हें सांगण्याचा हक्क त्यांना

असला पाहिजे. नुसता हक्क असून भागणार नाहीं, त्यांचें म्हणणे ऐकून घेण्याची व्यवस्था असली पाहिजे, म्हणजेच निर्णय होण्यापूर्वी विचारविनिमय आवश्यक असून त्यांत नागरिकांना निश्चित स्थान असलें पाहिजे. तेथील विचारविनिमयांत प्रत्येक हितसंबंधाला योग्य तेच महत्त्व दिलें गेलें पाहिजे. संपत्तीमुळें अधिक अधिकार तेथें कुणालाही मिळतां कामा नये. सर्वांचे हित हीच दृष्टि तेथें प्रभावी ठरली पाहिजे. प्रत्येकजण आपले स्वहित काय आहे हें उत्कृष्टपणें जाणत नसला तरी त्याचे हिताबद्दल इतर कोणी सांगून चालेल असें मात्र नाही. प्रत्येकाला स्वतःचे हिताबद्दल सांगण्याचा अधिकार असला पाहिजे; सर्व दृष्टींनी समाजाचे हिताचा विचार करून प्रत्येकाचें हित कशांत आहे हें सर्वांच्या विचारविनिमयानें ठरलें पाहिजे. प्रत्येकाला वरील दृष्टीनें विचार करता आपलें म्हणणें मांडण्याला, आपला अभिप्राय नोंदण्याला हक्क असला पाहिजे. होणाऱ्या निर्णयांत जास्तींत जास्त समन्वय झाला म्हणजे आपलाही अभिप्राय त्यात आहे असें प्रत्येकाला वाटेल. आपलें म्हणणें मांडण्याची, आपला अभिप्राय निर्भीडपणें सांगण्याची संवय लागल्यानें मनुष्याचें मन उन्नत होतें व त्याला एक प्रकार शिस्तही लागते. झालेल्या निर्णयांत कांहीं थोडें आपल्याला पसंत नसलें तरी आपला हात त्यांत आहे म्हणून तें मानलें पाहिजे. यांतील त्याग, यांतील मर्यादा-बुद्धि ही त्याची प्रतिष्ठा वाढवतात. निव्वळ स्वार्थापेक्षां कांही अधिक उच्च दृष्टीनें विचार करण्याची व वागण्याची प्रवृत्ति त्याच्यांत उत्पन्न होते. जितका नागरिक आपलें म्हणणें अधिक मांडील, विचारविनिमयांत अधिक भाग घेईल तितक्या प्रमाणांत त्याची उन्नतिही होईल व सफलताही त्याला मिळेल आणि हाच राज्यसंस्थेचा मुख्य हेतु आहे व असें होण्यांतच ती यथार्थ ठरते.

कायदा हा व्यक्तीला योग्य वाटला, त्याचे विकासाला, त्याचे सफलतेला तो मदत करणारा आहे असें त्यास पटलें म्हणजे तो मानणें हें त्याचें नैतिक कर्तव्य ठरतें, असें मानल्यानतर तो तसा नसेल तर त्यास प्रतिकार करणें, त्याविरुद्ध बंड करणें, हेंपण नागरिकाचे कर्तव्य ठरतें. जें सदसद्विवेकबुद्धीला पटत नसेल त्याला विरोध करणें हा नागरिकाचा मौलिक हक्क आहे. कुठलीही घटना अगर कायदा हा हक्क काढून घेऊं शकत नाहीं. सत्तेला एक मर्यादा आहे, त्यापलीकडे सत्तेने अधिकारा-तिक्रमण करून प्रवेश केल्यास तिला विरोध करणें हें व्यक्तीचें परमोच्च कर्तव्य ठरतें व मान लववीणें हा राज्यद्रोह ठरतो. "सत्तेचें तारूं न कळत का होईना खडकाकडे धांव घेत आहे असें मला प्रामाणिकपणे वाटतें. मी चुकत असेन, कदाचित बरोबरही असेल, पण मला जें नैतिकदृष्ट्या बरोबर वाटतें तें मी बोलून दाखवून तसें

वागलें पाहिजे. मी त्याचें ऐकणार नाहीं. माझी सदसद्विवेकबुद्धि मला जें सांगेल तेंच मी ऐकेन, मग मृत्यु आला तरी पर्वा नाहीं." हा उदात्त विचार जगांतील स्वातंत्र्याचा महामंत्र आहे. कांहींना ही विचारसरणी अराजक तत्त्वाची वाटेल. सत्तेला विरोध करण्याचा व्यक्तींना अधिकारच नाहीं असेंही म्हणणारे आहेत. जर राज्य नसेल तर व्यक्ति अर्थशून्य ठरेल. तिला आत्मविकासाला, आत्मोन्नतीला मार्गच राहाणार नाहीं. म्हणून कुठल्याही परिस्थितींत तिनें राज्याविरुद्ध जातां कामा नये असा त्यांचा युक्तिवाद आहे. राज्यासाठीं सर्व, राज्य हें सारसर्वस्व, त्यापुढें व्यक्ति तुच्छ ही विचारसरणी शेवटीं व्यक्तित्वभक्षक ठरून स्वातंत्र्य मारणारी ठरते, याचें विवेचन मागें केलें आहे. व्यक्तीनें राज्याबद्दल कृतज्ञ असलें पाहिजे हें खरें, तथापि कोणतीही स्त्री पातिव्रत्याची किंमत देऊन कृतज्ञ होणार नाहीं. कोणतेंही राष्ट्र स्वातंत्र्याची किंमत देऊन कृतज्ञ होणार नाहीं. तसेंच कोणतीही व्यक्ति सदसद्विवेकबुद्धीची किंमत देऊन कृतज्ञ होणार नाहीं. ज्यासाठीं जगावयाचें व ज्यासाठीं मरावयाचें तें अमोलिक तत्त्व, ती श्रेष्ठ श्रद्धा तडजोडीची बाब नसते. व्यक्तीला विरोधाचा हक्क ठेवण्यानें अराजकाची भीति कायम ठेवल्यासारखें होईल हें खरें पण अशी भीति असेल तर सुराज्य करण्याचा प्रयत्न होईल, तर स्वराज्य करण्याचा प्रयत्न होईल हेंही तितकेंच खरें. हा विरोधाचा प्रसंग न यावा म्हणून सर्वांना पटेल, सर्वांच्या सहकार्यानें होईल असेंच वागावेसें वाटेल, नव्हे भाग पडेल हेंही तितकेंच खरें आहे. व्यक्तीला निष्ठा दाखविण्याला योग्य असे राज्य म्हणजे प्रत्यक्ष तसी व्यवस्था असल्याशिवाय व्यक्ति निष्ठा दाखविणार नाहीं. तिला नैतिक दृष्टया राज्यकारभार योग्य चालला आहे असें जर वाटलें नाहीं तर तिला योग्य वाटेल तें करण्यास मोकळीक आहे. आदर्श असें राज्य असेल तर प्रत्येक व्यक्तीला तेथें आत्मविकासाला, आत्मोन्नतीला वाव मिळेल, पण प्रत्येक राज्य याप्रमाणें आदर्श आहे असें मानणें अगर गृहीत धरणें चुकीचें आहे; व्यक्तीला तें तसें अनुभवास आलें पाहिजे. व्यक्तीच्या आत्मविकासाला राज्याची जरुरी आहे, पण त्याचा अर्थ वाटेल तें राज्य उपयोगीं पडेल असें नाहीं. त्याच्या अनुभवाला तें राज्य योग्य आहे, तेथें पुरेसा वाव आहे असें आलें म्हणजे त्याच्या दृष्टीनें तें राज्य आदर्श आहे व तसें राज्य त्याचे उन्नतीला आवश्यक आहे. तसें नसेल तर तें तसें करून घेण्याचा त्याचा हक्क आहे. राज्याची जरुरी आहे, पण योग्य त्या राज्याची. संसारांत व समाजांत निव्वळ सहचरी व निव्वळ राज्यसत्ता असून प्रेम व निष्ठा उत्पन्न होणार नाहीं. दोन्हीकडे मनाजोगें झालें असेल तर सुख लाभतें. म्हणून दोन्हीकडेही विच्छेद करण्याचा हक्क व्यक्तीला असला पाहिजे. तसें नसेल तर दोन्हीकडे वस्तुतः जन्मठेपेचीच शिक्षा व्यक्तीचे वांट्यास येते.

योग्य तें राज्य व्यक्तीला आवश्यक आहे व तें तसें नसेल तर त्याविरुद्ध बंड करण्याचा व्यक्तीला अधिकार आहे. बहुसंख्यांक लोकांना राज्य अयोग्य वाटेपर्यंत व तें प्रत्यक्ष विरोधाला तयार होईपर्यंत कोणी एका व्यक्तीनें हा हक्क गाजवूं नये असें ग्रीन याचें म्हणणें आहे. याचा अर्थ त्याला तत्त्व मान्य आहे, हक्क केव्हां गाजवावा एवढ्यापुरता त्याचा दृष्टिकोन निराळा आहे. प्रत्यक्ष विरोध करणारे हे नेहमींच अल्पसंख्यांक पण संघटित असतात. क्रांतीच्या ऐन रंगांतसुद्धां बहुसंख्यांक समाज प्रत्यक्ष कांहीं करत नाहीं. अस्वस्थ असतो हें खरें. बहुसंख्यांकांची प्रत्यक्ष तयारी होईपर्यंत सदसद्‌विवेकबुद्धीनें विरोध स्थगित केला पाहिजे असें म्हणणें म्हणजे त्याला कायमचाच स्थगित करणें आहे. बहुसंख्यांक समाज पटून विरोधाचे क्षेत्रांत प्रत्यक्ष आला तर चांगलेंच, तो निदान स्तब्ध पण सहानभूतिपूर्ण राहिला तरीही बरें. पटून बरोबर आलेले या नाहीं त्या कारणासाठीं कचकले तरी ज्याला जें पटलें आहे, ज्याची श्रद्धा अचल आहे त्याचें कर्तव्य या सर्व परिस्थितींत एकच आहे आणि ते म्हणजे जो सत्यमार्ग त्यानें स्वीकारला आहे त्यानेंच जाणें. तो एकाकी राहील म्हणून असमर्थ नाहीं. सत्याची सांथ, श्रद्धेचें चैतन्य व सदसद्‌विवेकबुद्धीचें धैर्य, जोंपर्यंत त्याला मिळत आहे तोंपर्यंत तो अजेय आहे. राज्य त्याचे त्यागानें, त्याच्या धैर्यानें नमलें जातें. तें सन्मार्गावर येतें. एक श्रद्धावन्त पुरुष पुढें आला म्हणजे अनेक मागें येतात. कल्पनेबाहेर घडून येतें. तात्पुरतें अपयशही येतें. प्रयत्न पराभूत व परास्त झालेले दिसतात. प्राणाचेंही मोल द्यावें लागतें. पटून मान लवविण्यांत, निमूटपणें सहन करण्यांत जो आत्मनाश आहे, त्यांत व्यक्तित्व, समाज दोहोंची अवनति व अपकीर्ति आहे. प्रसंगाला अनुरूप व अवश्य झालेलें कर्तव्य अपयशाचे अगर पराभवाचे भीतीनें न करणें म्हणजे व्यक्तीनें स्वतःमधील जेवढें श्रेष्ठ, जेवढें उत्कट आहे त्याचें विडंबन करणें आहे. सत्य हें बहुमतावर अवलंबून नाहीं; म्हणून ज्याला त्याचा साक्षात्कार झाला आहे त्यानें एकटा असला अगर राहिला तरी त्याचें आचरण केलें पाहिजे. विरोधांतील अपयशापेक्षां न पटून पण निमूटपणें दिलेली मान्यता समाजाचे श्रेयाला व स्थैर्याला अधिक भयावह आहे.

व्यक्तींना विरोध करण्याचा येवढा अधिकार द्यावा असें कोणतें पुण्यकर्म व्यक्ति करतात कीं ज्यासाठीं त्यांना तो मिळावा असा आक्षेप कोणी कोणी घेतील. राज्य आहे म्हणून व्यक्तीला महत्त्व आहे, कार्यक्षेत्र आहे. पण त्यांत व्यक्ति महत्त्वाचें असें कांहींच करीत नाहींत. रंगभूमीवर पात्रें यावींत, क्षणभर त्यांनीं हालचाल करावी व पडद्यांत निघून जावें असें व्यक्तींचें जीवन आहे. प्रत्येक नाचणाऱ्या व्यक्तीच्या सोयी-

साठीं रंगभूमींत बदल करावा लागला तर कठीण प्रसंग येईल. सामान्य माणसांच्या मनाप्रमाणें समाजांत घडलें पाहिजे असा दंडक झाला तर श्रेष्ठ गुण व बुद्धिमत्ता मारली जाईल. बहुसंख्यांक माणसें साधारण दर्जाचीं असतात. म्हणून ज्यांच्यांत असाधारण गुण आहेत, त्यांनाही सारखेंच लेखणें बरोबर नाहीं, एकाच समाजांत आहेत म्हणून सारखी किंमत देणें बरोबर नाहीं. जरी सर्व दुधापासून उत्पन्न झालीं आहेत तरी दहीं, ताक, लोणी कोणी एकाच भावानें देणार नाहीं. गुणाप्रमाणें कार्य मिळालें पाहिजे. केवळ उपयुक्ततेची दृष्टि ठेवली तर शास्त्र व कला यांच्यांतील प्रयत्नांचें व सिद्धीचें यथार्थ मूल्यमापन होणार नाहीं. केवळ संख्येवर सर्व ठरविलें गेलें तर श्रेष्ठ व्यक्तींचें जीवन निरर्थक करणें आहे. म्हणून जे थोडे लायक आहेत त्यांच्या हवालीं सत्ता असावी व त्यांनीं समाजाचे विश्वस्त या नात्यानें तिचा उपयोग करावा अशी आक्षेपकांची विचारसरणी आहे. लायक लोकांचे हातांत राज्यसत्ता आली म्हणजे राज्यकारभार योग्य होईल. मग व्यक्तींना विरोधाचें कारण पडणार नाहीं व म्हणून तसा हक्क देण्याचेंही कारण नाहीं. थोड्या व लायक लोकांच्या हातांत राज्यसत्ता असावी हा फार प्राचीन काळापासून चालत आलेला विचार आहे. आदर्श राजा असेल तरच राज्यकारभार चांगला चालेल. पण आज राजसत्ता असावी असें कोणी म्हणत नाहीं. राज्यकारभारांत अधिकार असणें ही एक नागरिकत्वाची खूण आहे. त्यांत भाग घेणें हा त्याचा हक्क आहे व जसा भाग घेईल तसा तो नागरिक आहे. कितीही सुराज्य असलें तरी त्याला स्वराज्याची चव येणार नाहीं. किंबहुना व्यक्तीला पूर्णत्व येण्यासाठीं, तिच्या गुणांना पूर्ण वाव मिळण्यासाठीं, राज्यकारभारांत भाग घेण्याचा हक्क तिला असला पाहिजे. सैनिक जेव्हां आज्ञा पाळतो तेव्हां तो अपूर्ण असतो. तो आज्ञा देण्यास जेव्हां लागतो तेव्हां त्याचे सैनिकजीवनास पूर्णत्व येतें. व्यक्तीचे जीवनाला जबाबदारीचें महावस्त्र मिळालें म्हणजेच प्रतिष्ठा येते. राज्यकारभारांत व्यक्ति भाग घेऊन चुकाही करतील. पण चुका करण्याचा अधिकार म्हणजेच स्वराज्य. त्या अधिकाराचा उपयोग करूनच मनुष्य अनुभव व शहाणपण वेंचत असतो, आपलें जीवन संपन्न व सुशोभित करीत असतो. म्हणून थोड्या लायक माणसांचे हातीं कारभार देण्यानें असंख्य माणसांना पूर्णत्व प्राप्त करून घेण्याचे संधीपासून वंचित करणें आहे. शिवाय इतिहासाचा अनुभव असा आहे कीं, हा लहान लायकवर्ग समाजाचें जीवन नियंत्रण करीत असतां फार वेळ नीतिदृष्टया निर्दोष राहात नाहीं. स्वतःचे स्वार्थासाठीं असंख्य लोकांचें जीवन तो कष्टमय करून टाकतो. शिवाय राज्यकारभाराला लायक कोण आहेत हें माणसांना संधि दिल्याशिवाय कळत नाहीं.

संधि द्यावयाची नाहीं व कोणी अन्य लायक नाहींत, म्हणून आहेत त्यांना मिरास द्यावयाची यांतील अन्याय चीड आणणारा आहे. व्यक्ति सर्व सारख्या दिसत असल्या तरी गुणांची जाणीव त्या त्या व्यक्तीला असते. कुणी तरी लायक माणसें सत्ताधीश आहेत येवढ्यानें जीं अन्य लायक माणसें समाजांत आहेत त्यांचें समाधान होत नाहीं. कुणी गवयी गात असला तरी दुसऱ्या गवयाला स्वतः गातांना जो आनंद व जें समाधान लाभतें तें दुसऱ्याचें नुसतें ऐकण्यानें लाभत नाहीं आणि अशी संधि जर गुणी जनाला मिळाली नाहीं तर त्याचे जीवनाचा कोंडमारा होतो. जें जें व्यक्तींत श्रेष्ठ व उत्कृष्ट आहे तें तें त्यानें आपल्या कृत्यानें वाढवून पूर्णतेस नेलें पाहिजे. स्वनिर्मितींत स्वगुणांचा परिपोष होतो. मनुष्यांतील गुण संधि मिळाली म्हणजे फुल-तात. म्हणून लायक कोण हें ठरविण्यासाठीं सर्वांना संधि मिळाली पाहिजे. जे लायकी शाबित करतील ते मान्यता पावतील. लायकी कोणा एका वर्गाची, एका जातीची अगर वंशाची खास मिरास नाहीं. असा अहंभाव ज्यांनीं बाळगला व मिर-विला त्यांना इतिहासानें चांगल्या रीतीनें धडा शिकविला आहे. म्हणून राज्यव्यवस्थेंत सर्वांना जास्तींत जास्त संधि गुणप्रकाशाला दिल्यानें, समाजाला उत्कृष्ट गुणांचा मुब-लक पुरवठा होतो. ज्या व्यक्तीला या संधीपासून वगळण्यांत येतें, वंचित करण्यांत येतें, तिला त्या राज्यव्यवस्थेला विरोध करण्याचा याचसाठीं अधिकार आहे. विरोधा-चा अधिकार मान्य केल्यानेंच ही संधि उपलब्ध होणें अधिक शक्य आहे. समाजाचें आत्यंतिक हिताचे दृष्टीनेंही असा अधिकार व्यक्तींना असणें इष्ट आहे.

---

## : अनुभव व आशा :

राज्यविषयक मुख्य व मौलिक कल्पनांचें विवेचन येथपर्यंत केलें व त्याजबरोबर अनेक दृष्टींनीं विचार करून इष्ट अशी राज्यविषयक विचारप्रणालीपण मांडली. ती मांडतांना कांहीं तरी अद्‌भुतरम्य असें कांहीं सांगितलें नाहीं, कांहीं तरी अलौकिक असेंही सांगितलें नाहीं. आतांपर्यंत कोणाला न सुचलेलें कांहीं तरी नवीन अगर प्रतिभासंपन्न असेंही कांहीं सांगितलें नाहीं. जें अनेकांनीं, निरनिराळ्या ग्रंथांतून प्रतिपादलें, विवेचिलें तेंच थोडें निराळ्या दृष्टीनें, निराळ्या रीतीनें मांडलें आहे. राज्यविषयक प्रमुख कल्पना आधुनिक नाहींत, प्राचीन काळापासून विचारवंतांनीं त्याबद्दल विचार केला आहे याचें दिग्दर्शन कालानुक्रमें या लिखाणांत मागें केलें आहे. अगदीं प्राचीन काळापासून राज्य हें केवळ सत्तेवर आधारलेलें न राहातां, त्याचा पाया नैतिक असणें इष्ट नव्हे अवश्य आहे असें प्रतिपादलेलें आढळून येतें. सत्ता आहे म्हणून न्याय असेल हें प्लेटोनें अमान्य केलें. राज्याचा हेतु समाजांत श्रेष्ठ जीवन निर्माण करणें हा आहे असें ॲरिस्टॉटलनें प्रतिपादलें. स्थैर्य नसेल, सुव्यवस्था नसेल तर समाजांत प्रगति होणार नाहीं, येवढेंच नव्हे तर समाज नष्ट होईल, ही कल्पना हॉब्जनें प्रामुख्यानें मांडून राज्यव्यवस्थेला अनियंत्रित प्रभुत्व बहाल केलें. समाजांत कांहीं तरी सुख व शांति लाभावी यासाठीं सर्वांचें नियमन संमतीनें व्हावें म्हणजे सर्वांना स्वातंत्र्य लाभेल, जीवित व वित्त सुखानें भोगतां येईल असें सांगून संमतीचा सन्मान लॉकेनें केला. प्रत्यक्ष कारभार जनतेनें केला म्हणजेच खरें स्वातंत्र्य जनतेला उपलब्ध होईल अशी रुसोनें घोषणा केली. राज्य म्हणजे दैवी अवतार म्हणून त्यांत व्यक्तीनें आपलें सर्वस्व समर्पण करणें योग्य आहे. कारण त्यांतूनच व्यक्तीला महत्त्व येतें, येवढें उच्चस्थान हेगेलनें राज्याला दिलें. राज्य हें आवश्यक आहे, तें नसेल तर अव्यवस्था व जंगलचा कायदा जारी राहील म्हणून तें हवें व तें म्हणजे वादविवाद-मंडळ नव्हे तर नियंत्रण करणारें व आपला हुकूम अमान्य झाल्यास शासन करणारें संघटन आहे. तरी शासन करण्याची, बलनिष्ठ सत्ता ( Coercive Power ) हें

राज्याचें प्रमुख लक्षण आहे. या सत्तेचे जोरावर राज्य समाजांत स्थैर्य, सुव्यवस्था व संरक्षण निर्माण करतें, व त्यामुळें मनुष्यांना आपलें जीवन सुखानें कंठतां येतें. राज्य याप्रमाणें सत्ताधीश असलें पाहिजे व लोकांनीं सामान्यतः त्याचें ऐकलें पाहिजे याचा अर्थ तें काय करतें याचा विचार न करतां ऐकलें पाहिजे असा नाहीं. सत्तेचें ऐकावें अशी मानवी समाजाला संवय झालेली आहे. तथापि विरोधाचेही प्रसंग येतात व त्यामुळेंच कांहींना आहे यापेक्षां निराळें हवें आहे, व केवळ सुव्यवस्था म्हणजे सुख अगर समाधान असें न मानणारे कांहीं आहेत हें स्पष्ट होतें. आहे यापेक्षां अधिक चांगली व्यवस्था शक्य आहे व झाली पाहिजे हें म्हणण्याचा अधिकार प्रत्येकाला आहे, म्हणजेच राज्याला आलेली सत्ता बिनशर्त नाहीं व त्याला मिळणारी निष्ठाही बिनशर्त नाहीं हें उघड होतें. जे हेतु, जीं ध्येयें नागरिकांना मौलिक वाटतात तीं राज्यानें सफल केलीं पाहिजेत. राज्यानें प्रत्यक्ष काय केलें हें महत्त्वाचें आहे. राज्य, राज्य म्हणून नागरिकाला महत्त्वाचें वाटत नसून त्याच्या कार्यावरून नागरिक त्याचें स्वरूप ठरवितो. राज्याचे तात्त्विक स्वरूपाचा तो विचार करीत नाहीं, त्याचे अनुभवाला काय येतें हें तो पाहात असतो. जो घडत आहे तोच राज्याचे तात्त्विक भूमिकेचा पुरावा मानला पाहिजे. प्रत्यक्ष राज्यकार्याचा काय अनुभव येतो त्यावरून राज्याचा काय हेतु आहे हें स्पष्ट होतें. निव्वळ राज्याचा हेतु चांगला आहे म्हणून नागरिकानें त्याला निष्ठा दाखविली पाहिजे हें चूक आहे. तें राज्य नागरिकाला अनुभवाला कसें येतें हें कळल्याशिवाय त्याची निष्ठा अपेक्षिणें म्हणजे पदार्थाची गोडी त्याचा स्वाद घेतल्याशिवाय सांगावी असा आग्रह धरणें आहे. या दृष्टीनें राज्यविषयक कल्पनांचा विचार प्रस्तुत लिखाणांत केलेला असून सुचविलेली राज्यव्यवस्था ही अनुभवाला प्रमाण मानूनच सांगितलेली आहे.

नागरिकांच्या गरजा, त्यांच्या अपेक्षा ज्या प्रमाणांत राज्य पुऱ्या करील त्या प्रमाणांत राज्य हें यथार्थ आहे, त्या प्रमाणांत त्याची सत्ता योग्य व त्याच प्रमाणांत तिला मान्यता मिळणें योग्य आहे. राज्याचे घोषित हेतूंवर राजकीय तत्त्वज्ञान आधारून भागणार नाहीं. जे हेतु व्यवहारांत सफल होत आहेत अगर होण्याची शक्यता आहे तेवढेंच लक्षांत घेऊन सिद्धान्त उभे करणें योग्य आहे. या दृष्टीनें विद्यमान राजकीय तत्त्वज्ञानाची चिकित्सा करून प्रत्यक्ष अनुभवांत कसें येतें याचें विवेचन केलें आहे. राज्याचा हेतु सामाजिक हित हें आहे पण प्रत्यक्ष व्यवहारांत तो साध्य न होतां, विविक्षित वर्गाचें हित राज्य साधतें हा अनुभव आहे. राज्य हें सर्व सत्ताधीश, प्रभुत्वपूर्ण हें खरें, पण त्याचा उपयोग असा केला जात आहे कीं, बहुसंख्यांकांना तें

तसें वाटतें व ज्यांच्या हातांत तें आहे त्यांना तें आज्ञापित नाहीं एवढेंच नव्हे तर त्याचें तें दास झालें आहे. तत्त्वतः कांहीं असलें तरी, कांहीं गटांच्या आहारीं जाऊन त्यांचे संमतीवर वस्तुतः चाललें आहे असें अनुभवास येतें. तत्त्वतः राज्य कोणासच जबाबदार नाहीं, पण वस्तुस्थितींत तसें नाहीं. खुद्द राज्यांत त्याचें प्रभुत्वाशीं स्पर्धा करणारें संघ व अन्य निष्ठास्थानें निर्माण झालेलीं आहेत व त्यामुळें त्याचें प्रभुत्व एकजिनसी व एकमेव राहिलेलें नाहीं. समाज व राज्य यांच्या मर्यादा एकच आहेत असें तत्त्वतः किती जरी मानलें तरी प्रत्यक्ष व्यवहारांत राज्य समाजाचें सर्व जीवन-क्षेत्र व्यापूं शकत नाहीं असें दिसून येतें. कांहीं तरी स्वयंभू व निरपेक्ष कल्पनांवर आधारलेली राज्यविषयक मीमांसा ही अनुभवांत अपुरी व अवास्तव ठरते. कांहीं तरी सनातन धरून राजकारणांत विचारप्रणाली मांडणें म्हणजे राजकारणाचे स्वरूपा-बद्दल अज्ञान दाखविणें आहे. अनुभव हे राज्यशास्त्राचे सारसर्वस्व होत. त्याचे सिद्धान्त अनुभवांत कसे ठरतात हें पाहूनच त्यांना प्रतिष्ठा प्राप्त होते. मनुष्याला विकासाला योग्य ती परिस्थिति राज्यांत उपलब्ध झाली पाहिजे, याचा अर्थ एकदां ती काय ही निश्चित केली म्हणजे सर्वकाळ व सर्वत्र तीच योग्य मानणें हा नाहीं. देशकालाप्रमाणें ती बदलेल हें जाणून त्यांचे अनुसार ती निश्चित करणें हेंच योग्य आहे. राज्यशास्त्राचे सिद्धान्त या दृष्टीनें कांहीं कसोट्या, कांहीं मापें निर्माण करतात. त्यांनीं निरनिराळ्या राज्याची किंमत ज्यानें त्यानें करावयाची असते. कारण राज्याला मान्यता देणाऱ्या नागरिकांचा अनुभव हाच त्या मान्यतेला कारणीभूत असतो. काय-द्याचें प्रामाण्य व्यक्तीचे मान्यतेवर आहे. तिच्या सदसद्विवेकबुद्धीनें कायदा मान्य केला म्हणजेच तो खरा कायदेशीर होतो. कोणत्या परिस्थितींत व्यक्ति कशाला मान्यता देईल हें व्यक्तीला आलेला अनुभव ठरवील. व्यक्ति जर केवळ सत्तेनें केलें म्हणून योग्य व न्याय्य असें मानूं लागली तर स्वातंत्र्य नष्ट होईल, राज्याचा नैतिक आधार नाहींसा होईल एवढें मात्र राज्यशास्त्र निश्चित सांगेल.

राज्यशास्त्र हें अनुभवावर आधारलेलें असलें पाहिजे. अनुभवानेंच त्याचे सिद्धांत प्रतिष्ठा पावले पाहिजेत. राज्य हें आधुनिक युगांत परंपरा, भावना, त्याची उपयुक्तता, त्याची सुव्यवस्था, त्याची न्यायपद्धति वगैरे गोष्टींमुळें लोकांच्या मनांत आदराला पात्र झालें आहे. गेल्या शंभर वर्षांत त्यांतील कार्यक्षेत्र वाढल्यामुळें, थोडेसें त्याला समाजसेवेचें स्वरूप आल्यामुळें, राज्याचें सहाय्यानें खरें खरें सार्वजनिक हित साधेल अशी आशा निर्माण होणें साहजिक आहे. १०० वर्षांपूर्वींच्या राज्यकार्यांच्या कल्पना आणि आजच्या, यांत विलक्षण फरक दिसून येतो. समाजांत थोडी सदसद्विवेकबुद्धि

जागृत झाली म्हणून हा परिणाम झाला हें खरें, तथापि केवळ तिजवर विश्वासून पुढील प्रगति होईल असा निष्कर्ष काढणें चुकीचें ठरेल. आजच्या परिग्रही समाजांतील एकी ही केवळ वरवरची आहे. तिचा आधार संमति नसून राज्याचे बलनिष्ठ सत्तेमुळें ती झालेली दिसत आहे. एकीला अवश्य लागणारी सार्वजनिक हिताची भावना तेथें नाहीं. किंबहुना सार्वजनिक हित हें मुख्य ध्येय ठेवून या समाजांत कार्यही होत नाहीं. जें कांहीं सार्वजनिक हिताचें होतें तें बुद्धीला पटून होण्याऐवजीं खाजगी मालकीविरुद्ध उठणारा विरोध कमी करण्याचे दृष्टीनें होतें. विद्यमान राज्यांत रशियाचा अपवाद सोडून, सर्वत्र ज्यांच्या हातांत उत्पादनाचीं, संपत्ति निर्माण करण्याचीं साधनें आहेत, त्यांच्याच हातांत खरी सत्ता आहे. आणि म्हणून जर खरें सार्वजनिक हित साधावयाचें असेल तर ही मालकी व्यवस्था नष्ट झाली पाहिजे. त्याशिवाय आशा करणें व्यर्थ आहे. सरंजामशाही समाजव्यवस्था सद्भावनेनें निकालांत निघाली नाहीं. संघर्ष होऊन, लढून लढून ती व्यवस्था नष्ट झाली व भांडवलशाही समाज निर्माण झाला. हा अनुभव लक्षांत घेतां, यांतून सुखासुखी, शांततेनें, सद्भावना व सद्सद्विवेक बुद्धींवर विश्वास ठेवून समतात्मक समाज निर्माण होईल ही आशा खोटी आहे. भांडवलाला वाढतें क्षेत्र मिळत होतें तोंपर्यंत जनतेच्या सुखसोयी, समाजाचें हित करण्यासाठीं, ते तयार होते. थोडा नफा कमी घेऊन तोंड बंद करण्यासाठीं भांडवलवाले सामाजिक सुखसोयींच्या योजनांना मान्यता देतात. कांहीं तरी मिळत आहे तोंपर्यंत जनता इतरांनीं कसें मिळविलें व मिळालेलें कसें वांटलें जातें याकडे लक्ष देत नाहीं. क्रांतीच्या पळत्याकडे हातांतील असलेलें सोडून जात नाहीं. जोंपर्यंत जनता याप्रमाणें वागत आहे तोंपर्यंत लोकशाही राज्यव्यवस्थेचा मुखवटा भांडवलशाहीला ठेवण्यास कांहींच अडचण भासत नाहीं. किंबहुना भांडवलशाही व लोकशाही यांत कांहीं मौलिक विरोध आहे असेंही भासत नाहीं. जोंपर्यंत आर्थिक व्यवस्था कायम आहे तोंपर्यंत भांडवलशाही फिकीर करीत नाहीं. तिला धक्का बसतांच, ती लोकशाही मोडून टाकण्यास तयार होते. १९१७ सालीं रशियन राज्यक्रांतींत आर्थिक व्यवस्था बदलण्याचा जर भाग नसता, तर सोव्हिएटविरुद्ध भांडवलशाही राष्ट्रें गेलीं नसतीं व रशियाचे राजकारणांत हस्तक्षेपही केला नसता. फ्रेंच राज्यक्रांतीचे वेळीं ज्या भीतीनें नव्या विचारांना मारून टाकण्यासाठीं अन्य राष्ट्रांनी तेथें हस्तक्षेप केला, तीच भीति रशियांत हस्तक्षेप करण्यामागें होती. आर्थिक समतेचें तत्त्व रशियांत प्रस्थापित झालें तर त्याचा परिणाम सर्वत्र होईल म्हणून तेथेंच ते चिरडून टाकण्याचा प्रयत्न भांडवलवाल्या राष्ट्रांनीं केला. स्वदेशी कायदा व सुव्यवस्था यांचे नांवा

खालीं सर्वत्र नवे विचार दाबून टाकण्याचा प्रयत्न झाला. आंतरराष्ट्रीय जगांत सोव्हि-एटभोंवतीं राजकीय बहिष्काराचा खंदक खणून तेथील कल्पना, तेथील आदर्श व अनुभव तेथेंच मर्यादित करण्याचा प्रयत्न करण्यांत आला व हें सर्वत्र राज्यामार्फत करण्यांत आलें कारण सर्वत्र राज्यावर भांडवलशाहीची सत्ता दृढ होती.

भांडवलशाही समाजांत, खरी सत्ता भांडवलवाल्यांचे हातीं असल्यानें लोकशाही हें त्यांच्या हातांतलें खेळणें होतें. नफा कमी होतांच सार्वजनिक हित सर्वत्र आकसतें, जनतेच्या सोयी कमी होतात. उत्पादनाचा हेतु जनतेची सोय हा नाहीं, कमाल नफा हा आहे. या परिस्थितींत भांडवलवाला वर्ग व अन्य जनता यांत विरोध कायमचा आहे आणि ही व्यवस्था जोंपर्यंत आहे तोंपर्यंत समाजांत शांतता नांदणें शक्य नाहीं. सर्वप्रकारें विपुलता असून लोक वंचित झालेलें दिसतात, विफल झालेले दिसतात. जास्त उत्पादन करून नुकसान करून घेण्यापेक्षां कमी उत्पादन करून कमाल नफा मिळविणें हा एक भांडवलशाहीचा नेहमीचा मार्ग आहे. यांत समाजांत सामुग्री असून ती मुद्दाम निरर्थक ठेवण्याची बुद्धिपुरःस्सर योजना असते. विपुलता व विफलता ह्या एकाच वेळीं समाजांत दिसतात. आणि याचें कारण राज्य जनतेच्या हातांत नसतें. जनतेनें लोकशाहीच्या उपलब्ध साधनांनीं ही परिस्थिति बदलण्याचा प्रयत्न केल्यास भांडवलवाले लोकशाहीला तोडून मोडून लोकशाही संस्था व संकेत झुगारून देतात. सनदशीर मार्गानें वागून जनता परिग्रही समाजाचें परि-वर्तन समतात्मक समाजव्यवस्थेंत करूं शकत नाहीं, याचा अनुभव इंग्लंडमध्यें आला आहे व तोच अनुभव अमेरिकेंतही आला आहे. भांडवलवाले वर्ग सोयीस्कर असेल तेव्हां सनदशीर वागतात. त्यांचेवर प्रसंग येतांच प्रथम उपलब्ध संस्थांचा उपयोग करून बघतात, तें न जमलें तर घातपात व गोंधळ करून जनतेंत दुही पेरतात व पुन्हां प्रभावी होतात. त्यांचे बाजूनें बहुमत असेल तर बहुमताला मान देणें ही लोकशाही व्यवस्थेचे यशाची गुरुकिल्ली ते मानतात. त्यांचें अल्पमत झालें तर सर्व लोकशाही संकेत झुगारून वागतात, गुंड हातीं धरून काम साधून घेतात. सत्तेचा मुख्य आधार म्हणजे सैन्य आणि त्यांतील अधिकारीवर्ग हा भांडवलवा-ल्यांच्या नात्यागोत्याचा असतो. म्हणून जनतेच्या हातांतील सत्ता गाजविण्याचे मुख्य साधन जें सैन्य त्यावर विश्वास ठेवतां येत नाहीं. तात्पर्य, नुसतें राज्ययंत्र जनतेच्या हातीं येऊन भागत नाहीं. सनदशीर मार्गानें राज्यसत्ता जरी जनतेच्या हातांत आली तरी जोंपर्यंत लष्कर या राज्यसत्तेचें इमानेंइतबारें ऐकेल अशी शाश्वति नसेल तोंपर्यंत परिग्रही समाज बदलण्याचा, सनदशीर मार्गाचा अवलंब यशस्वी होत

नाहीं. खाजगी मालकीचे स्वामित्वास कांहींही बाध येईल असें कृत्य भांडवलवाला-वर्ग आपले इच्छेविरुद्ध होऊं देत नाहीं. खाजगी मालकीव्यवस्था कायम ठेवण्याचे करारावरच जनतेला लोकशाही राज्यव्यवस्थेचे खेळ खेळण्यास परवानगी असते. क्रांतीच्या मार्गानें समाजव्यवस्थेंत परिवर्तन घडवून आणावें तर विद्यमान शस्त्रांचें स्वरूप लक्षांत घेतां जोंपर्यंत राज्यांतील लष्कर निमूटपणें राज्यसत्तेचें ऐकणारें आहे तोंपर्यंत तो मार्ग यशदायी होण्याचा फारसा संभव नाहीं. त्याची निष्ठा ढांसळली कीं राज्यसत्ताही ढांसळते हें निश्चित. रशियांतील फेब्रुवारीचे क्रांतींत व नोव्हेंबरचे क्रांतींत जें यश आलें त्याचें कारण पहिले वेळीं लष्कर, जी राज्यसत्ता अधिकाररूढ झाली तिच्याशीं निष्ठावन्त राहिलें व दुसऱ्या वेळीं तें प्रस्थापित राज्यसत्तेशी तसें राहिलें नाहीं हें होय.

वरील दृष्टीनें विचार करतां, भांडवलशाही समाजव्यवस्था कायम ठेऊन, सद्-भावनेवर विश्वास ठेऊन खऱ्याखुऱ्या सार्वजनिक हिताचे दृष्टीनें राज्याचें पाऊल प्रगतीपर पडेल ही आशा करणें व्यर्थ आहे. भांडवलशाही समाजांतील सर्व संस्था, त्यांतील आदर्श हें समाजांत संघर्ष उत्पन्न करणारे आहेत. त्या कायम ठेऊन समा-जांत सार्वजनिक हितासाठीं अवश्य असणारा मेलमिलाफ निर्माण होईल ही आशा खोटी आहे. भांडवलवाल्या वर्गांतील लोकांना समाजांत आहे ही व्यवस्था उत्तम आहे, त्यायोगें प्रगति झाली आहे असें प्रामाणिकपणेंही वाटत असेल. जोंपर्यंत अड-चण उभी राहात नाहीं तोंपर्यंत चालू आहे तें चूक का बरोबर याचा तात्त्विक विचार कोणी करीत नाहीं. काम अडलें, बिकट प्रसंग उत्पन्न झाला, अरिष्ट कोसळलें म्हणजे असें कां झालें याचा विचार सुचतो. पण विचार करण्याला पुरेसा मग अवकाशच नसतो. कारण ती कृतीची वेळ असते, संकटांतून निभावयाचें असतें. शिवाय अवश्य ती मानसिक शांतताही तेथें नसते. संकट संपलें म्हणजे विचार करण्याचें कारण नाहीं असें म्हणाणारे बहुसंख्यांक असतात, म्हणून विचार करणें टाळलें जातें. खाजगी मालकी व तिला अनुसरून असलेल्या संस्था या नाहींशा झाल्या पाहिजेत. त्या आहेत तोंपर्यंत देशांत संघर्ष, वर्गकलह हे कायम आहेत व जगांत युद्धेंही अटळ आहेत, या व्यतिरिक्त कांहीं होईल ही आशा व्यर्थ आहे. निरनिराळ्या कल्पना ज्या समाजावर प्रभाव गाजवीत होत्या त्या लढून लढून निकालीं लागल्या, निस्तेज ठरल्या आहेत. राजाचा दैवी हक्क, गुलामीची पद्धत, धर्माचें ऐहिक कार्यांतसुद्धां श्रेष्ठत्व वगैरे कल्पना सुखासुखीं निर्माल्यवत् झाल्या नाहींत. आज मालकी हक्काचे कल्पनेंत या सर्वांचें बळ एकवटलेलें दिसत आहे. जणूं कांहीं हा हक्क दैवी आहे, त्यांत मानवी

संस्थांनीं व प्रयत्नांनीं ढवळाढवळ करूं नये असें म्हणणारेही आहेत. केव्हां तरी ही मालकी हक्काची व्यवस्था नष्ट झाली पाहिजे हें मान्य केल्यानंतर तिजबद्दलचा विचार टाळणें हें युक्त नाहीं. ती आहे तोंपर्यंत तिजबद्दलचा विचार प्रस्तुत आहे. सार्वजनिक हित मालकी व्यवस्थेचे कक्षेंत बसत नाहीं हें स्पष्ट अनुभवास आल्यानंतर त्या हितासाठीं नव्या व्यवस्थेची बैठक कशी असावी हा विचार पूर्णतः प्रस्तुत व अवश्य ठरतो.

मालकवर्ग संख्येनें लहान व अन्य वंचित लोक असंख्य, येवढ्या परिस्थितीनें अपेक्षित परिवर्तन होणार नाहीं. संख्या म्हणजे शक्ति हें मर्यादित अर्थानें खरें आहे. राजकीय समतेच्या जोरावर समाजांतील बहुसंख्यांकांनीं राज्ययंत्र हस्तगत केलें तरी परिवर्तन केव्हां व कसें अवघड आहे याचें थोडें दिग्दर्शन वर केलेंच आहे. शिवाय बहुसंख्यांकांत एकवाक्यता होऊन ते संघटित होऊन भांडवलशाहीवर्गाचे विरुद्ध एकसंधीपणें, एकजुटीनें उभे राहातील असा अनुभव नाहीं. जनतेच्या हातीं राज्य-सत्ता आल्याबरोबर अल्पमतवाला भांडवलवाल्यांचा वर्ग, विरोध करून उद्योगधंद्यांत गोंधळ उत्पन्न करून सर्वत्र बेकारी व अस्वस्थता निर्माण करतो. असंख्य बेकार होतात, म्हणजे ज्यांच्या जिवावर राज्ययंत्र हस्तगत केलें तेच नाराज होतात. भांडवल-वालावर्ग व बहुसंख्यांक दरिद्री जनता यांच्यामध्यें एक पांढरपेशावर्ग, मध्यमवर्ग फार मोठ्या प्रमाणांत आधुनिक युगांत निर्माण झालेला आहे. वास्तविक त्याचें हित बहु-संख्यांक जनतेकडे जाण्यांत असूनसुद्धां अविश्वासानें तो तटस्थ राहातो, नाहीं तर भांड-वलवाल्यांकडे झुकतो. या मध्यमवर्गाचे निर्मितीनें वर्गावर्गांतील सरहद्दी व सीमा पुष्कळ ठिकाणीं कळेनाशा होतात. वर्गावर्गांतील अंतर स्पष्ट व ठळक असलें म्हणजे वर्गभावना व वर्गसंघटन तीव्रपणें वाढत जातात. भांडवलशाहीनें केलेल्या प्रगतीमुळें मध्यमवर्गाचे राहाणींत पुष्कळच सुधारणा झाली असल्यामुळें त्यांचा कल कांहींसा परिग्रही समाजव्यवस्थेकडे झुकलेला दिसून येतो. वगळले गेले आहेंत, वंचित आहेंत ही भावना तीव्र प्रमाणांत त्यांचे ठिकाणीं दिसून येत नाहीं. आणि यामुळें फॅसिस्ट तत्त्वज्ञानाचें हा वर्ग एक कार्यक्षेत्र झालें आहे. या वर्गांतूनच सदर्हू विचारप्रणा-लीला असंख्य रंगरूट मिळाले. या रंगरूटांचे जोरावर भांडवलशाहीनें पडत्या काळांत सावरून घेऊन स्वतःची सत्ता कायम केली. मध्यमवर्गाला आपले बाजूस घेऊन, बहुसंख्यांक जनतेंत दुफळी माजवून हा वर्ग कसा प्रभावी राहिला याचा इतिहास ताजा आहे, तो सांगण्याचें कारण नाहीं. इटली व जर्मनी या दोन्ही राष्ट्रांत भांडवल-वाल्यांवर्गानें आपलें वर्चस्व याच रीतीनें सावरलें. राज्य ताब्यांत असल्यामुळें सैन्याचें

साहाय्यानें निःशस्त्र कामगारवर्गाच्या चळवळी सर्वत्र दडपून टाकल्या गेल्या. मध्यमवर्गाची व भांडवलवाल्या वर्गाची झालेली युति ही कामगार व गरीब जनतेच्या मुळावर आली. तथापि असली ही युति फार काळ टिकणारी नसते. औद्योगिक व्याप वाढण्यांत मध्यमवर्गाचा रोजगार वाढत असतो. वाढतें उत्पादन असेल तर त्यांचे जीवनाला स्थैर्य आहे. परंतु उत्पादन वाढवून नफा होत नसेल तर भांडवलवाले उत्पादन कमी करून नफा वाढविण्याचें धोरण स्वीकारतात व त्यामुळें मध्यमवर्गाचाही रोजगार कमी होतो. यंत्रविशारद, हुशार कारागीर यांचासुद्धां रोजगार कमी होतो. मध्यमवर्गही भांडवलशाहीला मनांतून विरोध करीत असतो. सनदशीर मार्गानें राज्यसत्ता वंचित जनतेच्या हातीं आल्यानंतर जर मध्यमवर्गातील लोकांचें सहकार्य मदहू राज्यसत्तेला मिळालें नाहीं तर कांहीं एक क्रांतिकारक फरक समाजव्यवस्थेंत ती करूं शकत नाहीं. तसें कांहीं करण्याचा प्रयत्न केल्यास असलेली राजकीय लोकशाही हाणून पाडली जाते आणि जोंपर्यंत सैन्य प्रस्थापित राज्याशीं निष्ठावंत आहे तोंपर्यंत बंड करून अगर सर्वत्र सार्वत्रिक संप घडवूनही राज्ययंत्र हस्तगत करण्याचा प्रयत्न विफल होतो हा अनुभव आहे.

भांडवलशाहीनें लोकशाही राज्यव्यवस्थेचा त्याग करून हुकूमशाही स्वीकारल्यानें तिचे प्रश्न सुटले असें होत नाहीं. भांडवलाचें नफा मिळविण्याचें क्षेत्र वाढलें असें होत नाहीं. स्वदेशांत कामगारांच्या अधिक वेतनाच्या मागण्या ती दडपूं शकते, त्यांचे संप बेकायदेशीर करूं शकते, त्यांच्या सभा बंद करूं शकते. कामगारांत ती संघटना होऊं देणार नाहीं. हें सगळें खरें असले तरी वाढतें भांडवल गुंतविण्याला नवीन क्षेत्र त्यामुळें उपलब्ध होत नाहीं. उत्पादन वाढविलें तर त्याला परदेशी मागणी पाहिजे. अन्य राष्ट्रेंही स्वयंपूर्णतेच्या दृष्टीनें वागत असतात. मध्यमवर्गानें भांडवलशाहीला साथ देऊन लोकशाही नष्ट केली याचा परिणाम त्याचेवरही अपेक्षेप्रमाणें होत नाहीं. उत्पादन जसें वाढत जाईल असें वाटतें तसें होत नाहीं. भांडवलवाले मग जें देतील त्यावर या वर्गाला राहावें लागतें. या परिस्थितींत या वर्गानें आपलें स्थान कामगारवर्गांत आहे हें ओळखून त्यांच्याशीं एकजूट केली पाहिजे. तसें झालें म्हणजे समाजांत दोन वर्ग ‘ आहेरे ’ व नाहींरे ’ हे अगदीं स्पष्ट होतात. असंतोष मग संघटित करणें अधिक सोपें जातें. समाजांतील जे संख्येनें अधिक आहेत ते संघटित होतात व या संघटनेंतून निर्माण झालेली शक्ति अधिक अधिक अनुयायी मिळवीत जाते. ज्यांच्या हातांत राज्यसत्ता आहे त्यांच्या मनांत भीतीचें व अविश्वासाचें वातावरण निर्माण होतें. प्रत्येक वेळीं त्यांना सैन्यावर भरंवसा ठेवून वागणें धोक्याचें वाटतें.

आणि या परिस्थितींत संघटित जनतेनें योग्य तें पाऊल टाकताच ती सत्ता हस्तगत करूं शकते. जर उत्पादन वाढवून तें परदेशीं खपवितां आलें तर स्वदेशांत भांडवल-वाले सुरक्षित राहूं शकतात; त्यांच्या भांडवलाला जर परदेशीं गुंतविण्याला क्षेत्र मिळालें तर कांहीं सवलती कामगार व मध्यमवर्ग यांच्या तोंडावर टाकून ते प्रसंग निभावून नेतात. तथापि तसें कांहीं शक्य नसेल तर स्वदेशांत वेतनकाट करून कामगारांचे राहाणीचें मान कमी करण्यास ते मागेंपुढें पाहात नाहींत. त्याचबरोबर परदेशीं बाजारपेठा मिळाव्यात म्हणून युद्धाचें निमित्त शोधण्याचे त्यांचे प्रयत्न चालू असतातच. किंबहुना स्वदेशाबाहेर भांडवल क्षेत्र शोधूं लागलें म्हणजे त्याचें स्वरूप साम्राज्यशाहीचें होत जातें व साम्राज्यशाहीची प्रगति व प्राण युद्धावर अवलंबून असतात. मूठभर भांडवलवाल्याचें '५ टक्के' व्याजासाठीं होणारें युद्ध, वंशश्रेष्ठत्वा-साठीं झालेले अन्याय व अपमान दूर करण्यासाटीं, लोकशाहीसाटीं, स्वातंत्र्यासाठीं म्हणून पुकारलें जातें. युद्ध म्हणजे राष्ट्रावर आलेली आपत्ति म्हणून राष्ट्रभक्तीला आवाहन केलें जातें व वंचित जनता व मध्यमवर्ग यांच्यांत भांडवलवाल्यांविरुद्ध होणारी एकजूट स्थगित होऊन राष्ट्रासाटीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास जनता तयार होते. घरच्या शत्रूपेक्षां बाहेरचा शत्रु प्रथम निकालीं काढला पाहिजे असें तिला वाटतें. भावनेच्या वातावरणांत घरच्या शत्रूमुळें बाहेरचे शत्रु होतात हें ती विसरते.

भांडवलशाहीनें लोकशाही स्वरूप धारण केलें काय किंवा हुकुमशाहीचें स्वरूप धारण केलें काय, तिला साम्राज्यशाहीचें बाळसें आलें कीं युद्ध अपरिहार्य होतें. दोन्ही ठिकाणीं भांडवलशाहीचे पुढें उपस्थित झालेले प्रश्न सोडविण्यासाटीं युद्धाचा उपयोग केला जातो. युद्धाचा उपयोग मग वंचित जनतेनें स्वतःचें स्वातंत्र्य मिळ-विण्यासाटीं, समाजाचें परिग्रही स्वरूप नष्ट करण्यासाटीं कां करूं नये? शांततेच्या काळांत निःशस्त्र जनतेला आधुनिक युगांत क्रांति करून अगर अन्य रीतीनें आपलें ध्येय साध्य करण्यास किती अडचणी आहेत हें लक्षांत घेतां तिच्या दृष्टीनें युद्धकाल ही एक मोक्षाची पर्वणी ठरणें शक्य आहे आणि मागील युद्धाचाही थोडा अनुभव तसाच आहे. रशियन सैन्य पराभूत झालें, त्याची शिस्त ढळली, नव्या नव्या विचा-रांचे परिणाम मग त्यावर होऊं लागले. प्रस्थापित राज्यसत्तेला त्यावर देशांत सुव्यव-स्थेसाटीं विश्वास ठेवणें कठीण वाटूं लागलें व शेवटीं तर सैन्य क्रांतिकारकांना उघड उघड जाऊन मिळालें. सैन्य बेशिस्त झालें म्हणून क्रांतिकारी कामगारांना शस्त्रें मिळालीं व त्याची साथही मिळाली आणि म्हणून तेथील क्रांति यशस्वी झाली; राज्यसत्ता लष्करी सत्तेच्या अभावीं निराधार झाली आणि ज्यांच्या बाजूला शस्त्रास्त्रें

व लष्कर गेलें ते विजयी झाले, राज्य त्यांचें झालें. ज्यांनीं जनतेच्या गरजा ओळखून, आकांक्षा लक्षांत घेऊन आपला कार्यक्रम तयार केला व आपल्या डावपेंचाची योजना आंखली त्यांच्यामागें जनता गेली व सैन्यही गेलें. सिद्धी त्यांची दासी झाली. त्यांनीं जुनी व्यवस्था, जुन्या संस्था व संकेत जे सर्वस्वी भांडवलशाही समाज–रचनेला अनुकूल होते किंबहुना त्याच दृष्टीनें जे उभारले होते त्यांना नष्ट केलें. नव्या विचारांना, नव्या आदर्शांना अनुरूप अशी राज्यव्यवस्थेची घडण त्यांनीं केली. नव्याला विरोध करणारा अधिकारीवर्ग काढून टाकला. नव्याला विरोध करणाऱ्या सर्व संस्थांना नेस्तनाबूद केलें. क्रांतीनें राज्य हस्तगत केलें व राज्यानें क्रांतीतील तत्त्वज्ञान योग्य त्या संस्थांत, योग्य त्या कायद्यांत समाविष्ट करून अनुरूप राज्यव्यवस्था निर्माण केली. क्रांति हा जिवावरचा खेळ आहे. तिचें कांहीं तरी तंत्र आहे हें ओळखून रशियांतील क्रांतिकारक वागले म्हणून त्यांचे दृष्टीनें मागील महायुद्धाची ही मोक्षाची पर्वणी ठरली. जर्मनींतही लष्करी पराभव प्रथम झाला व नंतरच राज्यव्यवस्था गडगडली. पण जुनी राज्यसत्ता कोसळली व राज्ययंत्र ज्यांच्या हातांत आलें त्याना हा प्रसंग येईल याची कल्पना नव्हती. जनतेला मार्गदर्शन करण्याची त्यांची तयारी नव्हती कारण जनतेच्या आकांक्षा व त्यांची विचारसरणी यांत समन्वय नव्हता. सत्ता प्राप्त झालेला वर्ग क्रांतिकारी नव्हता. त्यांच्यांत निश्चय नव्हता, आत्मविश्वास नव्हता. जुनी विचारसरणी मान्य असणाऱ्या सर्व शक्ति कांही राजसत्तेबरोबर नाहींशा झाल्या नव्हत्या. त्यांच्याशीं हे नवीन सत्ताधीश तडजोड करण्यास राजी झाले. राजा गेला पण भांडवलवाले कायम होते. त्यांच्याशीं तडजोड करणे म्हणजे जे कांहीं घडून आलें होतें त्यावर पाणी फिरविणें होतें. भांडवलवाल्यांचें आर्थिक वर्चस्व या नव्या सत्ताधिशांनीं कायम ठेवलें, जुनें कायदे तसेंच राहू दिले, जुने न्यायाधीश तसेंच राहिले. सैन्यांतसुद्धां जुन्याच विचारसरणीचे लोक अधिकारी झाले. मुलकी कारभारांतसुद्धां सर्व जुना अधिकारीवर्ग कायम राहिला. राज्यसत्तेचे धोरणाप्रमाणे अंमलबजावणी करणें येवढेंच काम हे अधिकारीवर्ग करतील, आपली तटस्थपणाची भूमिका व परंपरा राखतील असें त्यांना वाटलें. विरोधकांना खूष करण्याच्या प्रयत्नांत, त्यांचेकडून भलें म्हणवून घेण्याचे प्रयत्नांत नव्या राजवटीनें, विमायर प्रजातंत्रानें ( **Weimer Republic** ) ज्यांच्यासाठीं सत्ता तिला मिळाली, ज्यांच्या पाठिंब्यावर ती राहाणार होती त्या बहुसंख्यांक जनतेला तिनें अव्हेरिलें. शेवटीं तीही गेली. युद्धाची पर्वणी जर्मन जनतेला मोक्षाची न ठरतां, पुनः भांडवलशाही अधिक तीव्र प्रमाणांत आणणारी घटना ठरली.

राष्ट्राचा युद्धांत पराभव झाल्यानंतर उत्पन्न झालेली परिस्थिति यशस्वी क्रांतीला अनुकूल असते हें खरें, तथापि क्रांतीचे नेत्यांत धैर्य, आत्मविश्वास व निश्चय हे असतील तर ती क्रांति यशस्वी व फलदायक होईल. नाहीं तर राष्ट्राचा पराभव होऊन, क्रांतीचाही पराभव होऊन भांडवलशाहीचाच फक्त जय होईल व असा अनुभव जसा जर्मनींत आला तसा स्पेनमध्येंही आला आहे. नुसती सत्ता हस्तगत करून भागत नाहीं, तर क्रांतिकारकांनीं लागलीच समाजांतील जुन्या संस्था व कायदे, तात्पर्य सर्व राज्यव्यवस्था बदलून टाकण्यांत व अनुकूल अशी रचण्यांत तिचा उपयोग ताबडतोब करून यशस्वी झालें पाहिजे, तरच क्रांति यशस्वी होते नाहीं तर पुनः भांडवलशाही अधिक संघटित होऊन प्रभावी होते. नुसती राजकीय समता, नुसती राजकीय लोकशाही झाली येवढयानें जर क्रांतिकारक संतुष्ट राहिले तर लोकशाहीच्या मुखवट्यामागें भांडवलशाही आपला अंमल कायम ठेवते. हा अनुभव अक्षम्य चूक करून जे बाजूला सारतात, ते या चुकीचें प्रायश्चित फार लवकर भोगतात. लोकशाही व भांडवलशाही यांच्यांत तडजोडीला वाव नाहीं. जेथें जेथें अशी तडजोड केली गेली तेथें तेथें लोकांना स्वातंत्र्याची करवंटी मिळाली व भांडववाल्यांनीं स्वातंत्र्याचें खोबरें खाल्लें हा अनुभव इतिहास ओरडून सांगत आहे. असल्या तडजोडींत लोकांच्या गळ्यांभोवतीं तात बांधली जाते. मात्र कांहीं काळानंतर ती स्वातंत्र्याची माळ नसून गळा दाबणारी तात आहे हें लोकांना उमगते. क्रांतीच्या यशस्वी तत्त्वज्ञानांत तडजोडीला स्थान नाहीं. राज्याची खरी खरी सत्ता बनवाबनवी करून निर्माण केलेल्या लोकशाहीच्या संस्थांत राहात नाहीं. तिला प्रभावी करून, जें इष्ट तें करून घ्यावयाचें असेल तर राज्यव्यवस्थेंत अर्धवटपणा न ठेवतां ध्येयाचे दृष्टीनें तिच्यांतील संस्थांना यथार्थ स्वरूप दिलें पाहिजे, व त्या व्यवस्थेंत काम करणारा अधिकारीवर्गही त्याच ध्येयाचा पाहिजे. ज्या राज्यपद्धतीवर विश्वास नाहीं अशांना तेथें स्थान देऊन काम करण्यास सांगणें म्हणजे अपयश निश्चित करणें आहे. त्याचप्रमाणें जुन्या संस्थांमार्फत नव्या पद्धतीनें काम होईल असें समजून त्या कायम ठेवणें म्हणजेही अपयश निश्चित करणें आहे. राजकारणांतही नवी दारू जुन्या बाटलींत घालणें योग्य ठरत नाहीं. जेथें जुन्या संस्था व जुन्या विचारांचीं माणसें यांच्याशीं तडजोड न करतां नवी व्यवस्था निर्माण केली जाते तेथेंच क्रांति यशस्वी होते, फलदायी होते. आर्थिक सत्ता जुन्या व्यवस्थेंत ठेऊन नवीन व्यवस्था फक्त राजकीय बाबतींत निर्माण करणें म्हणजे भावी अनर्थांना निर्माण करणारी तडजोड करणें आहे, नव्हे क्रांतीशीं विद्रोह करणें आहे. अशी तडजोड करून सत्ता विभागणें म्हणजे जनतेनें मिळविलेलें धुळीस मिळविणें आहे; प्राप्त झालेली

संधि घालविणे आहे, मिळत असलेल्या मोक्षाला विन्मुख होणें आहे! इतिहास योग्य संधि देत असतो, तिचा उपयोग करणारा योजक दुर्लभ असतो. प्राप्त व्हावें म्हणून सतत इच्छित असतां, प्राप्त झाल्याबरोबर ते हस्तगत करून, धैर्यानें व निश्चयानें त्याचा उपयोग करून संपूर्ण सिद्धि मिळविणारे नेते ज्या राष्ट्राला लाभतात तेथील जनता स्वातंत्र्य मिळविते. अवमानिलेलें प्रेम व अव्हेरलेली संधि यांचा फायदा दुसरा कोणी तरी घेत असतो!! मिळालेल्या संधीचा फायदा न घेणाऱ्यांना इतिहास कधींही क्षमा करीत नाहीं व केवळ पश्चात्ताप केल्यानें ती पुन्हा प्राप्तही होत नाहीं.

संधीचा 'तो क्षण' अत्यंत महत्त्वाचा असतो व त्यावेळीं कच खाल्ली अगर चुकीचा निर्णय घेतला, अगर स्तब्ध राहिलें कीं सत्यनाश हें भवितव्य निश्चित असतें! 'आज घाई होत आहे पण उद्यां वेळ गेली' अशा दुहेरी मर्यादा संधीच्या असतात. 'आज जो विजय क्रांतिकारकांना शक्य आहे व जो मिळेल, तो विलंब करून त्यांनीं घालविल्यास इतिहास त्यांना क्षमा करणार नाहीं; उद्यां करण्यांत जो थोडा धोका त्यांना वाटतो, त्यांतही सर्वनाशाचा धोका आहे' हा लेनिननें दिलेला इषारा अर्थपूर्ण आहे विद्यमान सामाजिक संबंध जनतेच्या आकांक्षांना कांचणारे आहेत व विशिष्ट परिस्थिती येतांच ते तोडून टाकण्यास जनता तयार होते हें जो जाणतो व योग्य क्षणाला जनतेला पाचारण देतो तोच खरा महान् नेता. समाजांतील सुव्यवस्था ही निरनिराळ्या हितसंबंधांच्या जुळणीवर, त्यांतील तोलावर अवलंबून असते. ही जुळणी कायम स्वरूपाची नसते, ती सारखी बदलत असते. समाजांतील निरनिराळे विरोध सुव्यवस्थेंत सांधमोड करून जुळवून घेण्याचा प्रयत्न असतो. जनता ही उदासीनतेनें, संवयीनें आहे हें मानत जाते पण अवश्य व आहे यांत महदंतर पडले म्हणजे विरोध अधिक तीव्र होतात. आहे हें असह्य वाटतें, विद्यमानाचा बांध फुटण्याचा क्षण प्राप्त होतो. जुनी रचना हादरते. पुनः त्याच पायावर कांहीं खालीवर, कांहीं पुढेंमागें करून जे रचना करतात ते अदूरदृष्टि ठरतात. इमारतीला जसा पाया तशी राज्याला सुव्यवस्था आहे व सुव्यवस्थेसाठीं अवश्य त्या बलनिष्ठ सत्तेची आवश्यकता आहे. म्हणून क्रांतीनें जुनी व्यवस्था मोडून पडल्याबरोबर, नव्या रचनेचा पाया ताबडतोब घातला पाहिजे. समाजांत सुव्यवस्था निर्माण केली पाहिजे, समाजांतील उत्पादन चक्रें पुनः काम करूं लागतील अशी व्यवस्था निर्माण केली पाहिजे. राज्यांतील अधिकारी सत्ता बिनवारसी अगर भांडणांत न पडूं देता निश्चितपणें ताब्यांत घेऊन तिचें संघटन करून अराजक, जें कांहीं काल क्रांतींत अपरिहार्य असतें तें शक्य तितक्या लवकर संपवून टाकलें पाहिजे. क्रांतींत सर्व सामाजिक बंध तुटतात. नवीन जुळणी झटपट न झाल्यास, विनायक होण्याऐवजीं झोटिंगशाहीचा वानर निर्माण होण्याचा

संभव असतो. वेळापत्रकाप्रमाणें क्रांति होत नाहीं हें खरें पण निश्चित कार्यक्रम नसेल अर्धवटपणा असेल तर ती होऊनही व्यर्थ ठरतें. मागील महायुद्धानंतर आलेला अनुभव चालू काळाला जरूर मार्गदर्शक होण्यासारखा आहे.

शांततेच्या काळांत समाजव्यवस्थेचें परिवर्तन करणें किती कठीण आहे याचा अनुभव गेल्या २५ वर्षांत सर्वत्र आला आहे. भांडवलात्मक लोकशाही राष्ट्रांतून जनतेनें केलेलें सर्व सनदशीर प्रयत्न अयशस्वी ठरले आहेत. मागील महायुद्धानंतर इंग्लंडमध्यें मजूरवर्ग दोनदां अधिकारारूढ होऊन अयशस्वी ठरला. तोच अनुभव अमेरिकेचा आहे. रुझवेल्टचे 'नव्या सवद्यांचे' (New Deal) सर्व प्रयत्न निरर्थक ठरले. अगदीं असहाय्य स्थिति होईपर्यंत प्रसंग न आल्यास, क्रांतीला अनुकूल असें वातावरण युद्ध नसतांना निर्माण होत नाहीं. शिवाय या भांडवलात्मक लोकशाहींत थोडें थोडें यश सदनशीर मार्गानें जनतेला मिळत गेल्यानें क्रमाक्रमानें घेण्याची परंपरा उत्पन्न होणें साहजिक आहे. भांडवलशाहीनें सवलती देऊन क्रांतीची आवश्यकता नाहीं असा विश्वास कांहीं ठिकाणीं निर्माण केला आहे. क्रमाक्रमाची अपरिहार्यता सर्व कांहीं हळूहळूच होणार, तसें होणें अपरिहार्य आहे, हा एक प्रभावी सिद्धान्त झाला आहे. लोकशाही संस्थांचा उपयोग करून, चळवळी करून, सनदशीर मार्गानें राज्यसत्तेवर वजन आणून थोडें तरी काम होतें या अनुभवानें परंपरेला क्रांति विसंगत वाटते. मागील महायुद्धानंतर इंग्लंड हें नंदनवन होईल, विजयी वीरांची भूमि होईल या थापा भांडवलशाहीनें मारल्या व युद्ध चालू असतां व तें संपल्यानंतर स्वतःचें आसन अधिक बळकट केलें, इंग्लंड त्यांचे नंदनवन झालें. आणि चालू युद्धांत मागील अनुभवानें इंग्लिश जनता शहाणी होऊन वागते आहे असें अद्यापि दिसत नाहीं. राष्ट्रप्रेमाचें आवाहन स्वीकारून जनता युद्धाशीं समरस झाली आहे. हें युद्ध साम्राज्यशाही युद्ध आहे हें त्याचें वास्तविक स्वरूप, राष्ट्रीय स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याच्या बहाण्याखालीं तेथील राज्यकर्ते, भांडवलवाले व कांहीं विचारवंतही लपवून ठेवण्याचा प्रयत्न करीत आहेत. युरोपमध्यें सोव्हिएट तत्त्वज्ञानाला व राज्यव्यवस्थेला मारण्यासाठीं, भांडवलशाहीनें हिटलरी जर्मनी निर्माण केला आहे. हें सत्य भावनामय वातावरणांत विसरलें गेलें आहे. आज हिटलर व जपान यांना लुटारू म्हणणाऱ्यांनीं त्यांना बलिष्ठ करण्यांत, त्यांच्या कृत्यांचें समर्थन करण्यांत आपल्याला कृतार्थ मानलें होतें. इंग्लंडनें स्वतःचें स्वातंत्र्य रक्षण करणें अगदीं योग्य आहे. तथापि युद्ध कां उत्पन्न झालें, त्याचें वास्तविक स्वरूप लक्षांत घेतां त्याला मदत करणारांनीं दक्षता घेतली पाहिजे; सारासार विचार केला पाहिजे. इंग्लिश जनतेनें ही युद्धाची संधि घालविली तर जें इंग्लंड विजयी होईल त्यांत तिचें स्थान पूर्वीचेंच

राहील हे आजही स्पष्ट दिसत आहे. युद्ध चालू असतांना भांडवलवाला वर्ग तेथें अधिक संघटित होत आहे. उलट एकजुटीचे अभावीं शांततेच्या काळांत जसा कामगार वर्ग अयशस्वी झाला, तीच स्थिति युद्धकालांतही आहे. 'आम्ही आमचें राखणार आहोंत, साम्राज्याचा निकाल करण्यासाठीं मी मुख्य प्रधान झालो नाहीं,' या चर्चिल घोषणेंत साम्राज्याबरोबर भांडवलशाही समाजव्यवस्था राखली जाणार आहे हें स्पष्ट आहे. साम्राज्य म्हणजे भांडवलशाही म्हणजे वंचित जनता, विषम समाजव्यवस्था हें इंग्लिश जनतेनें समजावयास पाहिजे. इंग्लिश जनतेनें पराभवांतून क्रांति (Revolutionary Defeatism) ही घोषणा मान्य करूं नये ही प्रो. लास्कीची विचारसरणी मान्य असली तरी तिनें बिनशर्त युद्धांत पडावें हें तिच्या हिताचें ठरत नाहीं. प्रो. लास्की यांनीं आपल्या ताज्या 'विजयाची योजना' (Stratagy for Victory) यांत म्हटल्याप्रमाणें बिनशर्त चर्चिलचें नेतृत्व मान्य करणें यांत तिचें खास हित नाहीं. जें युद्धकालांत निश्चित होत नाहीं, तें युद्धानंतर महत्त्वाचें राहात नाहीं. मागील युद्धानंतर युद्धांतील घोषित तत्त्वें हवेंतच राहिलीं. लोकशाहीसाठीं झालेल्या युद्धानंतर हुकुमशाही राजकारणाचे रंगभूमीवर उघड उघडपणें नाचूं लागली. युद्ध चालू असतांच जे युद्ध हेतु म्हणून सांगितले जात आहेत त्यांची अंमलबजावणी जर झाली तरच ती होईल. युद्धानंतर होणार नाहीं असा मागील अनुभव आहे. इंग्लिश जनतेनें युद्धानंतर समाजरचनेंत मौलिक परिवर्तन होईल ही आशा बाळगणें म्हणजे अनुभवाला धिःकारणें आहे.

दोन महायुद्धामधील कालांत सोव्हिएट रशिया सोडून दिल्यास परिग्रही समाजांत कुठेंही मौलिक बदल झाला नाहीं. सोव्हिएट रशियांतील क्रांतीनें सर्वत्र वंचित जनतेला आशा दिली, उत्साह निर्माण केला. युद्धानंतर जागतिक क्रांति होणार हा सिद्धांत वेदवाणीइतका महत्त्व पावला. तिसऱ्या आंतरराष्ट्रीय (The Third International) संस्थेचें जो अमान्य करील तो कामगारांचा शत्रु असा आग्रही प्रचार सुरू झाला. तिचीच विचारसरणी बरोबर, तिच्या दृष्टीनें "सामाजिक लोकशाहीचा पक्ष (Social Democracy) हा फॅसिझमचा सनदशीर पक्ष आहे" असें प्रतिपादलें जाऊं लागलें. वस्तुस्थिति किती निराळी होती याचा अनुभव हिटलरनें सत्ता काबीज केल्याबरोबर आला. त्यानें सदरहू पक्षाच्या सर्व संस्था नष्ट केल्या. सनदशीर पद्धतीनें सदरहू पक्ष काम करीत होता म्हणून तो क्रांतीला लांबवीत होता हा सिद्धांत खरा नसून त्याची छाप जनतेवर होती म्हणून साम्यवादी पक्ष (Communist) त्याविरुद्ध होता. त्याच्याशीं एकजूट करण्याच्या बहाणा करून कामगार संघटनेंत दुफळी करण्याचा प्रयत्नही जर्मनींत झाला. खरी एकजूट करून, कामगार संघटना प्रचंड

व शक्तिमान करून जर वर्तणूक झाली असती तर हिटलर सत्ताधिश झालाच नसता, सामाजिक लोकशाही म्हणजे सामाजिक गुंडशाही हा सिद्धांत व त्याला अनुसरून झालेलें वर्तन हिटलरच्या पथ्यावर पडलें! प्रस्थापित सत्तेला विरोध करतांना साम्यवादी पक्षानें हिटलरला मतें देऊन सत्ताधीश केलें. सत्तारूढ होतांच त्यानें साम्यवादी पक्ष व सामाजिक लोकशाही पक्ष दोन्हीही नेस्तनाबूद केले. हिटलर सत्ताधीश झाल्यानंतर तिसऱ्या आंतर-राष्ट्रीय संस्थेनें जर्मनींतील साम्यवादी पक्षाला सामाजिक लोकशाही पक्षाशीं सहकार्य कर-ण्यास फर्माविलें. पण आतां वेळ निघून गेली होती. एकजुटीचे अभावीं हिटलरनें साधलें, सर्वत्र कामगार संघटना नेस्तनाबूद केलीं. कामगारांत नाना पक्ष झालें म्हणजे त्यांची श्रद्धा कोणावरच बसत नाहीं. कामगार वर्गात दुफळी पाडून फॅसिझमची गुंडशाही निर्माण करण्यांत साम्यवादी पक्षाची जबाबदारी हल्लीं तिजविरुद्ध सुरू केलेल्या युद्धानें कमी होत नाहीं. भांडवलशाही समाज, साम्यवादी समाज होण्यापूर्वीं फॅसिझमच्या तोरणाखालून गेला पाहिजे असा कांहीं निरपेक्ष सिद्धांत नाहीं. परिस्थिति कित्येक वेळां झपाट्यानें जात असते व अपरिहार्य वाटत असलेले टप्पे गाळते. खुद्द रशियन क्रांतींत असें घडून आलें. समाजांतील शक्ति कुठल्या परिस्थितींत आहे हें ओळखून पुढील चाल चालावी लागते. क्रमिक पुस्तकांचें धड्याप्रमाणें एकामागून एक असें क्रमानें वाचत गेलें पाहिजे असें कांहीं नाहीं. जर्मनींत बरोबर कामगारांची एकजूट होऊन संघटना झाली असती तर हिटलर चित्रें रंगवीत बसला असता व जर्मनी भांडवलशाहींतून मुक्त होऊन खरें खरें समतावादी प्रजातंत्र तेथें अमलांत आलें असतें. भांडवलशाहीला जे जे विरोधी असतील, त्यांची संघटना करणें, एकजूट करणें, हें पक्षांधतेनें वागण्यापेक्षां क्रांतीच्या दृष्टीनें अधिक श्रेयस्कर आहे. हा दोन महायुद्धां-तील कालखंडांतील अनुभव अगदींच टाकाऊ नाहीं. प्रत्यक्ष क्रांतीचा क्षण येईपर्यंत याच दृष्टीनें वागलें पाहिजे हें लेनिननें ओळखलें होतें. सनदशीर विरोध असो, सत्याग्रही विरोध असो, जे जुलमी व झोटिंगशाही सत्तेला विरोध करतात ते क्रांतीची भूमिका अप्रत्यक्षपणें तयार करीत असतात. त्यांच्यावर जुलमी सत्तेनें हल्ला केल्यास त्यांचे सहाय्यास धांवून जाणें हें क्रांतिकारकांचें ध्येयाचे दृष्टीनें चुकीचें नाहीं, व तंत्राचे दृष्टीनें बरोबर आहे. लेनिननें केरेन्स्कीला प्रथम पाठिंबा देऊन हेंच सिद्ध केलें.

शांततेच्या काळांत कामगार वर्गाची संघटना बलिष्ठ करून, त्यांत एकजूट करून त्यांत बुद्धिभेद न निर्माण करतां वागण्यानें, कांहीं तरी होणें शक्य आहे. भांडवला-त्मक लोकशाहीवर अरिष्ट प्रसंग आला, बिकट परिस्थिति आर्थिक दृष्ट्या उत्पन्न झाली तर संघटित जनता कांहीं तरी प्रभावी कार्य करणें शक्य आहे. जनता विभाग-लेली, कामगार संघटना भांडणानें दुहीनें दुभंगलेली असेल तर आलेली संधि व्यर्थ

जाईल व या परिस्थितींत काहीं प्रयत्न झाल्यास ते राज्य सहज चिरडून टाकील. राज्याचा ताबा घेणें राज्ययंत्रावर कबजा जमविणें सोपें काम नाहीं. जे असा कबजा करूं इच्छितात त्यांच्यांत श्रेष्ठ अशी एकी असली पाहिजे. तात्त्विक मतभेद अगर वैयक्तिक बाबीनें त्यांत दुफळी पडली तर जय लांबच राहातो व पराभव मात्र जमीन-दोस्त करणारा होतो. राज्य हस्तगत करणें पक्षाच्या व व्यक्तींच्या जिवावरचा खेळ आहे. जय मिळून परिस्थिति सुरेपर्यंत जर एकी न राहिली तरीही तसेंच परिणाम होतात. नुसतें एक ध्येय असून भागत नाहीं तर तें साध्य करण्याचें मार्गांत जर एकी नसेल, एकवाक्यता नसेल तर हा उद्योग यशस्वी होणें कठीण होईल. भांडवल-शाही कांहीं अमर्याद कालपर्यंत सवलती देऊन स्वदेशांतील वंचित जनतेला संतुष्ट करूं शकत नाहीं. एक तर तिनें उत्पादन कमी करून, पुरवठा कमी करून भाव वाढवून नफा मिळविला पाहिजे नाहीं तर युद्धप्रसंग निर्माण करून स्वतःला तारलें पाहिजे. साधनसामुग्री निपरुयोगी करून, समाजांतील गरजा न भागवितां उत्पादनाचीं सूत्रें भांडवलवाले हालवूं लागले म्हणजे जनतेच्या दृष्टीनें पुढें पाऊल टाकण्याचा काल येत आहे असें तिनें मानण्यास हरकत नाहीं आणि पुढें पाऊल जर यशस्वी रीतीनें पडावयाचें असेल तर अवश्य ती एकी ध्येयांत व साधनांत निर्माण केली पाहिजे.

गेल्या १०० वर्षांत भांडवलशाही समाजरचनेंतील आलेल्या अनुभवानें तिची नैतिक प्रतिष्ठा, जी कांहीं सुरवातीस होती ती नष्ट झालेली आहे. भांडवलशाहीमुळें शास्त्राची प्रगति झाली, ज्ञानाची प्रगति झाली असा दावा सांगितला जात होता तो खोटा आहे तें आतां जग जाणून चुकलें आहे. भांडवलशाही वर्धिष्णु स्थितींत होती म्हणजे नवीं क्षेत्रें तिला मिळत होतीं तोंपर्यंत समाजांतील विषमतेकडे लोकांनीं फारसें लक्ष दिलें नाहीं. परंतु जेव्हां ही अवस्था संपली, नफ्यासाठीं उत्पादन आखडतें घेऊन समाजाच्या गरजा, साधनसामुग्री विपुल असून अतृप्त राहिल्या, तेव्हां ही विषमता नुसती चर्चेचाच विषय बनली येवढें नव्हे तर ती सर्व समाजाच्या आपत्तीचें कारण आहे हा सिद्धांत पटून ती दूर झाली पाहिजे हें कार्यक्रमाचें ध्येय बनलें. विचार-विनिमयानें, तडजोडीनें, विवेकानें सर्व कांहीं जुळून येईल या पद्धतीवरील विश्वास मग कमी झाला, असहिष्णुता वाढली. ज्ञानाच्या वाढत्या प्रसारानें व त्याचा दुरुप-योग सामाजिक विषमता कायम ठेवण्याकडे होत असलेला पाहून जनतेचीं मनें सदरहू व्यवस्था मान्य करणाऱ्या धर्माबद्दलही उदासीन झाली. विषम समाजाची धारणा करण्यास धर्म यापुढें असमर्थ ठरला. ऐक्यभाव निर्माण करण्याचें त्याचें सामर्थ्य संपलें. सवलतीचे धोरणानें भांडवलशाहीविरुद्ध अटळ असलेला लढा कांहीं काळ टाळला जातो, पण तेवढ्यानें संपत्तीचे विषम वांटणींत न्याय आहे हें जनता मान्य

करीत नाहीं. परिग्रही समाज कायम ठेवून संपत्तीची न्याय्य वांटणी होईल ही गोष्ट अशक्य आहे हा सिद्धांत अनुभवानें जनतेला सर्वत्र पटला आहे म्हणूनच त्याचें परिवर्तन झालें पाहिजे ही तिची मागणी आहे. सवलती देऊन कांहींशी संमति मिळवून ही समाजव्यवस्था टिकली पाहिजे नाहीं तर बलाचे, सत्तीचे जोरावर ती टिकविली पाहिजे याशिवाय परिग्रही समाज नांदूं शकत नाहीं. सवलतींना ही मर्यादा असते व तिच्या पलीकडे जाऊन भांडवलवाले तडजोडीनें घेण्यास तयार नसतात. बिननफ्यानें अगर नुकसानींत उद्योगधंदे चालविणें, उत्पादन करणें हा भांडवलशाहीचा धर्म नाहीं. सवलती बंद झाल्या अगर कमी झाल्या कीं परिग्रही समाजाच्या मौलिक सिद्धांताचा विचार सुरू होतो, त्याचें परिवर्तन मग जनतेच्या कार्यक्रमाची चालू बाब होतें. जनतेनें साधे साधे सुचविलेले बदल क्रांतिकारक समजले जातात. सनदशीर मार्गानें जाणारा सुधारकसुद्धां क्रांतिकारक वाटतो, व क्रांतिकारक तर समाजाचा शत्रूच समजला जातो. केवळ मालकी हक्कांवर जगणारा वर्ग भीतिग्रस्त होतो, व मनुष्य भीतिग्रस्त झाला म्हणजे अविवेकानें, अविचारानें वागूं लागतो. भांडवलवाला वर्ग, ' आहेरे ' वर्ग अधिक संघटित होऊन, आत्यंतिक भूमिका घेतो, त्याचा जाब म्हणून जनता तशीच आत्यंतिक भूमिका घेते. विचारविनिमयाचें क्षेत्र लुप्त होतें, विवेकी तडजोडीला वाव राहात नाहीं. जे कोणी मग जनतेला हाणून पाडून राज्यकारभार चालविण्याचें धैर्य दाखवतील, त्यांचेमागें मग भांडवलवाला वर्ग उभा राहातो. जर्मनी व इटलींत हेंच घडून आलें. परिग्रही समाजाला अनुकूल अशी विद्यमान राज्याची घडण झालेली आहे. समाजांतील विषमता मान्य करून वर्गसंबंध उभारलेलें आहेत हें टिकविण्यासाठीं धर्म, कायदे, अधिकारी वर्ग, राजकीय संस्था व संकेत हें सर्व त्यादृष्टीनें राज्यव्यवस्थेंत समाविष्ट केलेले आहेत. एवंगुणविशिष्ट राज्याला सवलतीचें धोरण अशक्य झाल्यानंतर एकतर कायापालट करून परिग्रही समाजाचा देह सोडून देऊन समतात्मक समाजाचा देह स्वीकारला पाहिजे. नाहींतर जनतेला चिरडून टाकून लोकशाहीनें तिला दिलेलें जें कांहीं हक्क आहेत, ते नष्ट केलें पाहिजेत.

या परिस्थितींत, या पेंचप्रसंगांत संपत्तिमान् वर्ग राज्याला आपल्या बाजूनें वागण्यास भाग पाडतात. राज्याचें सत्तेचा उपयोग आपल्या मालकी हक्काचें संरक्षणार्थ व्हावा यांत त्या वर्गाला अयोग्य अगर अन्यायाचें कांहीं वाटत नाहीं. सरंजामशाही समाजव्यवस्था नाहींशीं करून विद्यमान व्यवस्था आणतांना त्यांना लढावें लागलें, क्रांतींतून जावें लागलें, तेव्हां तर राज्य त्यांचे ताब्यांत आलें. या वर्गाला आपण जनतेला लोकशाही दिली, समाजांत प्रगति केली असें प्रामाणिकपणें वाटत

असतें. आपणांस असलेला अधिकार न्याय्य आहे व म्हणून तो राज्यानें संरक्षिला पाहिजे असें त्यांना वाटतें. जे आज त्यांचे विरुद्ध उठले आहेत त्यांचें म्हणणे मान्य करून समाजव्यवस्था बदलणें म्हणजे साधारण व असाधारण माणसें, लायक व नालायक, यशस्वी व अयशस्वी, आळशी व अभ्यासू या सर्वांना सारखें लेखून समाजांत अन्याय स्थापन करणें आहे असें वाटतें. परंपरा त्यांचें बाजूस असते, विद्यमान कायदा त्यांचेच संरक्षण करीत असतो. अधिकार पिढयांनुपिढया चालविल्यामुळें, अन्य कोणी तो चालविण्यास लायक आहेत असें त्यांना वाटत नाहीं. आहे यापेक्षां अधिक चांगलें असणारच नाहीं असा त्यांचा विश्वास असतो. जनतेची मागणी म्हणजे मूठभर मत्सरी लोकांची, चळवळ्यांची मागणी असें ते मानतात. म्हणून तेवढयांना हाणून पाडलें, तुरुंगांत घातलें म्हणजे कार्यभाग होईल अशी त्यांची अपेक्षा असते. हातचें सोडून अदृश्य अशा पळत्याचें मागें जाण्यांत अर्थ नाहीं, धोका आहे हें सांगून त्यांचें प्रचारकार्य चालू असतें. विद्यमान पद्धत एकंदरीनें उपयुक्त ठरलेली आहे, तींत दोष नाहीं. किरकोळ उणीवा असतील तर दूर करतां येतील अशी त्यांची समजूत असते. म्हणून विद्यमान समाजव्यवस्थेच्या मुळावर आघात करणारांना ते समाजाचे शत्रु समजतात. व समाजहितार्थ राज्यानें त्यांचा नायनाट करावा अशी राज्याकडून अपेक्षा करतात. क्रांतीपूर्वीच्या कालांत असलेल्या सर्व सत्ताधिशांना असेंच वाटतें. फ्रेंच क्रांतीपूर्वी लुईला असेंच वाटलें, झार निकोलसला असेंच वाटलें व आजही अनेक देशांत विद्यमान सत्ताधिशांना असेंच वाटते. विद्यमान व्यवस्थेंत परिवर्तन होणें अपरिहार्य आहे, त्याला खरी अडचण विद्यमान व्यवस्था ज्या तत्त्वांवर झाली आहे तींच तत्त्वें आहेत हें बहुतेक विसरतात. विरोधांत व्यक्तिविषयक कांहीं नसते. ज्या व्यवस्थेला व्यक्ति टिकवूं पाहाते ती व्यवस्था नव्या आकांक्षांना, नव्या आदर्शांना अपुरी वाटते, अडथळयाची वाटते. म्हणून तिचा नाश व्हावा हें इष्ट वाटतें. चळवळ्यांनीं उत्पन्न केलेली चळवळ फार काळ टिकत नाहीं, पण जेव्हां चळवळ आमजनतेची मागणी असते, तेव्हां ती दबली जात नाहीं. चळवळीला तीव्र स्वरूप, बंडाचें स्वरूप जनतेला परिस्थिति असह्य झाल्याशिवाय येत नाहीं. जनतेच्या मागण्या खऱ्या असल्याशिवाय जनता उठणार नाहीं. जनतेच्या मागण्या मान्य कराव्यांत तर आपला अधिकार संपतो असें वाटतें. भांडवलशाही समतावादी मागण्यांना मान्यता देणार नाहीं. साम्राज्यशाही अंकित राष्ट्राला संपूर्ण स्वातंत्र्याचा हक्क आहे हें मान्य करणार नाहीं. जास्तींतजास्त सवलती दोन्ही देतील, पण त्यापलीकडे मागणी गेल्यास अगर चालू राहिल्यास राज्याची सत्ता संपूर्णपणें चालवून चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न निश्चित होईल. आपण करतों तें योग्य आहे असें त्यांना वाटतें. इंग्लंड,

अमेरिका यांतील भांडवलवाल्यांना असेंच वाटतें. मुसोलिनी व हिटलर यांना असेंच वाटलें. त्यांनीं सत्तात्याग केल्यास समाजाचा घात होईल, समाज नष्ट होईल अशी भीति त्यांना वाटते. इंग्रज गेले तर या देशांत अनर्थ होईल अव्यवस्था माजेल असें इंग्रजांना वाटतें व कांहीं भोळसर लोकांनाही त्यांनीं वाटावयास लावलें आहे. लोकमत जुमानावें असें विद्यमान सत्ताधिशांना वाटत नाहीं. जमलें तर लोकमत अजामवण्याची अशी व्यवस्था केली जाते कीं पाहिजेल तेंच लोकमत मिळतें. जनतेच्या पुढाऱ्यांना तुरुंगांत घालून निवडणूकीचें यंत्र पाहिजेल तसें रचून, जनतेचें खरें मत मारलें जाण्याचीही व्यवस्था केली जाते. हिटलरनें ऑस्ट्रियांत लोकमतच मिळविलें जर्मनींतही त्यानें लोकमत कसें मिळवावें याचें जगाला प्रात्यक्षिक दिलें आहे. या देशांत अनेक अडचणींना तोंड देऊन लोकमत प्रचलित राज्यसत्तेचे विरुद्ध पडलें कीं, तें मूठभर लोकांचे मानलें जातें, व बाजूनें पडलें की, आमजनतेचें मानलें जातें! लोकमतानें कांहींही कौल दिला तरी ज्यांच्या हातांत सत्ता आहे ते ती सोडण्यास कधींही खुषीनें तयार होत नाहींत व संपत्तिमान वर्गाचे हातांत सत्ता असल्यानें त्याचा उपयोग परिग्रही समाज कायम ठेवण्याकडे व त्याचे संरक्षणासाठीं निर्दयपणें केला जातो.

वरील विवेचन केल्यानंतर समाजाचें परिवर्तन कधीं तरी शक्य आहे कां असा प्रश्न उपस्थित होतो. विद्यमान राज्याचें सेवेला सर्व आधुनिक साधनांनीं सज्ज असें लष्कर असतें, विषारी वायु, विमानें, मशिनगन्स, हीं सर्व संहारक साधनें विरोधकांवर सोडण्यास राज्यसत्ता कमी करीत नाहीं असा अनुभव आहे. जोंपर्यंत लष्कर प्रस्थापित सत्तेशीं निष्ठावंत आहे तोंपर्यंत क्रांतीला फारसा वाव नाहीं. ऑस्ट्रिया, स्पेन यांचा इतिहास हेंच सांगतो. युद्धांत पराभूत झालेल्या राष्ट्रांत साहजिक प्रचलित राज्यव्यवस्थेबद्दल सर्वत्र निराशा व अविश्वास उत्पन्न होत असतो व त्याचा परिणाम जनतेंतील सर्व वर्गावर होऊन विद्यमान व्यवस्था बदलून टाकावी याला अनुकूल वातावरण उत्पन्न होतें. त्यापासून लष्करही अलिप्त नसतें व या स्थितींत धैर्यानें, निश्चयानें जनतेला पटणारा कार्यक्रम घेऊन वागणारा संघटित पक्ष असेल तर समाजाचें परिवर्तन यशस्वी रीतीनें होऊं शकतें असा अनुभव आहे. युद्ध नसतांना विद्यमान राज्यसत्तेनें दीर्घकालपर्यंत समाजांतील मोठ्या भागाला जुलमाखालीं चिरडून टाकून, स्वतःविषयीं अविश्वासाचें वातावरण निर्माण केलें म्हणजे त्याचाही परिणाम सर्व समाजावर होतो, त्यापासून राज्यांतील कुठलीही संस्था, लष्करसुद्धां अलिप्त राहूं शकत नाहीं. या परिस्थितींत विरोधक संघटित व एकजूट असतील तर ते यशस्वी होतात. कारण राजसत्तेला कुणाचाच भरंवसा वाटत नाहीं. सैन्यसुद्धां कसें वागेल

याचा भरंवसा नसतो. त्याची निष्ठा गृहीत धरून भागत नाहीं. सैन्य बहुशः तटस्थ राहातें अगर विरोधकांना मिळतें असा अनुभव अनेक ठिकाणीं आला आहे.

वरील विवेचनावरून एक गोष्ट अगदीं स्पष्ट होते कीं, हातीं असलेली सत्ता भांडवलशाही राज्य कधींही खुषीनें सोडणार नाहीं. जमेल तोपर्यंत सवलती देऊन संमति मिळविण्याचा प्रयत्न करील, न जमलें तर लोकशाही चिरडून टाकून भांडवलशाही राज्य हुकूमशाही स्वरूप धारण करील हें युरोपच्या इतिहासानें स्पष्ट केलें आहे. हुकूमशाही कांहीं काळ तरी खास टिकते. कालांतरानें ती नष्ट होईल, पण तोंपर्यंत तर काल जाईलच. जनतेचें आर्थिकदृष्टया समाधान करण्याचाही प्रयत्न हुकूमशाही करते. तथापि ही हुकुमशाही म्हणजे भांडवलशाही असल्यामुळें ती साम्राज्यशाही होण्याकडे तिचा स्वभावधर्म तिला नेतो. तसें होणें अपरिहार्य असतें, मग युद्धही अपरिहार्य होते. युद्धांत पराभव झाला तर हुकुमशहा जाईल पण नंतर काय येईल हे त्या देशांतील परिस्थितीवर अवलंबून राहील. रशियाप्रमाणें कामगारांची हुकुमशाही येईलच असा सिद्धांत नाहीं, लोकशाहीही येईल असाही भरंवसा कोणी देऊं शकत नाहीं, आणि याचें कारणही स्पष्ट आहे. फार काळ हुकुमशाही राष्ट्रांत चालू असली म्हणजे तडजोडीनें घेण्याची वृत्ति, विचारविनिमय करून वागण्याची आवश्यकता, सहिष्णुतेतील सौजन्य ही सर्व लुप्त झालेलीं असतात. किंबहुना हुकूमशाही म्हणजे यांचा अभाव असें म्हटलें तरी चालेल. हुकुमशाही नष्ट होतांच येणाऱ्या व्यवस्थेनें विद्यमान आर्थिक व्यवस्थेंत फारसे बदल न करतां वागलें तर तिला फारसा विरोध होणार नाहीं. आणि जर या आर्थिक व्यवस्थेंत आमजनतेला कांहीं मिळावें म्हणून थोडें महत्त्वाचें बदल केलें कीं लागलीच मूठभर संपत्तिमान वर्गाचा विरोध सुरू होतो. आपल्या नाशावर ही नवी व्यवस्था, ही लोकशाही आली आहे असें वाटतें व हे थोडे संघटित होतात, बहुसंख्यांक उदासीन असतात, आणि मग या परिस्थितींतून प्रतिगामी पक्ष उदयाला येतो, प्रतिक्रांतीला व क्रांतिविरोधाला (Counter Revolution) सुरवात होते. बिकट परिस्थिति झाली म्हणून जरूर ते वटहुकूम काढून, खास कायदे करून त्यांची बजावणी करावी तर विरोध अधिक जहाल स्वरूप घेतो, न करावी तर नवीन व्यवस्थेचें पाणी जोखलें जाऊन विरोधक अधिकच चेकाळतात. जेथें प्रतिक्रांति निर्दयपणें चिरडली जाते तेथें व्यवस्था यशस्वी होते, जेथें नवीन सत्ताधीश अर्धवटपणें वागतात तेथें ती लवकरच लुप्त होते. हाच अनुभव मागील युद्धांतील पराभवानंतर जर्मनींत आला. आणि राष्ट्राचे पराभवानंतर रशियाप्रमाणें कामगारवर्गाची हुकुमशाही होईलच असेंही नाहीं. रशियाच्या विशिष्ट आर्थिक परिस्थितीमुळें तेथें जें घडलें तें घडून आलें.

कामगारवर्ग तेथें सशस्त्र होता, क्रांतिकारकांचें संघटन झालेलें होतें व अवश्य तें महान् नेतृत्व उपलब्ध होतें याही गोष्टी विचाराआड करून चालणार नाहीं. नव्या व्यवस्थेनें प्रतिक्रांतीला चिरडून टाकलें व लोकमत आपलेकडे खेचूंन घेतलें. त्यांत तिला मिळालेलें यश अपूर्व होतें. लेनिननें क्रांति केली व नवीन व्यवस्था कायम करून तिच्या तत्त्वांना प्रतिष्ठा दिली, प्रभावी केलें. क्रांतीच्या वातावरणांत कर्तृत्ववान् पुरुष पुढें येतात हें खरें, तथापि विध्वंसक व विधायक अशीं दोन्ही कार्यें अपूर्वपणें करणारा नेता क्वचित्‌च उपलब्ध होतो!! म्हणून हुकूमशाही कोलमडून पडल्यानंतर कोणती व्यवस्था तिचें स्थान घेईल हें त्या त्या देशाचे परिस्थितीवर अवलंबून राहील. इतिहासाचा अनुभव निःसंशय येथेंही मार्गदर्शन करणारा आहे.

आधुनिक राज्यांत सहजासहजीं सुखासुखीं समाजरचनेंत क्रांतिकारक बदल होणार नाहींत ही गोष्ट निश्चित आहे. विद्यमान व्यवस्थेनें जे वर्गसंबंध जुळवून घेतले आहेत ते बहुसंख्यांक जनतेला असह्य वाटले व कांहींतरी असामान्य परिस्थिती निर्माण झाली तरच बदलतील. राज्यसत्तेला लोकमताचा प्रचंड पाठिंबा असला तर ती कांहीं करूं शकेल मात्र तिला होणारा विरोध हाणून पाडण्यासाठीं, जरूर ती निर्दयता दाखविण्यास ती तयार असली पाहिजे. विरोधक संघटितपणें लोकशाहीचे संकेत झुगारून, गुंडगिरी करुन तिजविरुद्ध उठतील त्यावेळीं तिलाही जरूर ते जबर इलाज जे लोकशाही तंत्राला न जुळणारे असें करावें लागतील. जेथें लोकमताला प्रचंड पाठिंबा असून राज्यसत्ता हें करण्यास कचरेल अगर अयशस्वी होईल तेथें जुनी व्यवस्था कायम राहील व तिला विरोध करणारे चिरडले जातील, तें कांहीं काळ नेस्तनाबूतही होतील. तथापि ज्यांना विद्यमान व्यवस्थेंत बदल करून घ्यावयाचा आहे, त्यांनीं राज्य व त्याच्या संस्था या अस्पृश्य न मानतां त्यांत निश्चित उद्देशानें प्रवेश केला पाहिजे. आधुनिक युगांत लोकमत जागृत करण्यासाठीं, मोठया प्रमाणावर तें तयार करण्यासाठीं, उघडपणें प्रचार करणें हेंच यशस्वी होतें. विद्यमान व्यवस्थेला विरोध करणारे उघड विरोध करूं लागले, शक्य तर कायद्यांत राहून विरोध करूं लागलें तर, त्यांना अधिक अधिक पाठिंबा मिळतो; व कांहीं काळ प्रस्थापित व्यवस्थेला, त्यांना म्हणून पाडणें अवघड होतें. विरोधक उघडपणें पक्ष काढून विद्यमान राज्यव्यवस्थेंत जेथें लोकमताचे जोरावर जातां येईल तेथें जाऊन झगडा करीत राहातील तर तेवढें त्यांचे सामर्थ्य वाढत जातें. परिस्थितीवर त्यांचा हळू हळू कबजा बसत जातो, तिची सूत्रें थोडीशीं त्यांच्या हातांत येतात. विरोधक जर केवळ गुप्तपणें काम करीत राहिलें तर मोठया प्रमाणावर त्यांची संघटना होऊं शकत नाहीं, त्यांना योग्य परिस्थितीची वाट पाहावी लागते, ती घडवून आणण्याचीं सूत्रें त्यांच्या हातांत

नसतात. राज्यावर संकट येऊन बिकट परिस्थिती—उत्पन्न होऊन, आघात करण्यास योग्य क्षण येईल त्याची वाट पाहात बसावें लागतें. म्हणून विरोधकांनीं सनदशीर रीतीनें जेथपर्यंत जमेल तेथपर्यंत वागून पक्ष संघटित करून काम केलें पाहिजे. सनदशीर मार्गानें सत्ता प्राप्त करून घेतां आली तर उत्तम, ती मिळविण्याची शक्यता दिसूं लागतांच विरोधकांना ती मिळूं नये म्हणून ज्याच्या हातांत ती असते, तो संपत्तिमान् वर्ग मग लोकशाही संस्था व संकेत यांना झुगारून देण्यास राज्याला भाग पाडतो. यामुळें विरोधकांचा पक्ष अधिक बलवान् होतो, जनता अधिक अधिक प्रचलित व्यवस्थेविरुद्ध होत जाते. एक बाजूनें विद्यमान सत्ताधीश नागरिक स्वातंत्र्यें कमी करत जातात तर दुसरे बाजूनें लोकमत प्रचंड प्रमाणावर विरोधी होत असतें; जनतेला परिस्थिति असह्य होते व मग ती असामान्य स्वरूप धारण करते, जुन्या व्यवस्थेचें आसन डळमळीत होतें, प्रस्थापित राज्यसत्तेबाबत सर्वत्र संशयाचें वातावरण निर्माण होतें व क्रांतिकारक परिवर्तन समाजव्यवस्थेंत होण्यासाठीं जरूर तें वातावरण निर्माण होतें. परिस्थितीचीं सूत्रें संघटित विरोधकांचे हातांत राहातात. त्यांच्या कल्पना व कार्यक्रम निश्चित असेल, जरूर तें धैर्य त्यांचे नेत्यांत असेल तर सत्ता व राज्यतंत्र ते हस्तगत करतील, इष्ट ते वळण परिस्थितीला देऊं शकतील.

आधुनिक राज्यांत जनतेला उपलब्ध असणारें स्वातंत्र्य अति क्षणभंगुर आहे. समाजामध्यें सुव्यवस्था असेल तर नागरिकस्वातंत्र्य राहाणार. समाजामध्यें अस्वस्थता व अव्यवस्था माजली तर कोण कुणाचें स्वातंत्र्य मानणार व कोण कुणाचें हक्क संरक्षणार? सुव्यवस्था ही स्वातंत्र्यासाठीं जरूर आहे. स्वातंत्र्याचा उपभोग समाजांत शांतता व सुव्यवस्था असेल तरच शक्य आहे. याचा अर्थ जी विद्यमान व्यवस्था आहे तीच कायम ठेवणें असा नव्हे. तिच्यांतील अन्याय दूर व्हावा म्हणून तिला विरोध करणें म्हणजे समाजांत सुव्यवस्था अगर शांतता नको असा अर्थ करणें चूक आहे. ज्यांना विद्यमान व्यवस्थेंत फायदा आहे ते वर्ग विरोधकांना समाजाचे शत्रु मानतात, व कायदा, सुव्यवस्थेचे नांवाखालीं त्यांना चिरडून टाकतात. विरोधकांना नेस्तनाबूद करण्याचे कामीं, साम्राज्यशाही; हुकूमशाही, मग ती कामगारवर्गाची असो अगर भांडवलवाल्यांची फॅसिस्ट छापाची असो, दोन्हीं सारख्याच वागतात. विरोधकांच्या मागण्या जर किरकोळ असतील, तर सर्वसामान्यपणें मान्य केल्या जातात व समाजांत स्वातंत्र्य राहूं देण्यांत येतें. मौलिक बदलांची मागणी केली कीं, ती वाढूं नये म्हणून विद्यमान व्यवस्थेवर हल्ला होण्यापूर्वीच स्वातंत्र्यावर प्रस्थापित सत्ताधीश हल्ला करून ते संपवून टाकतात. जेथें विरोधक सनदशीर मार्गानें सत्ताधीश झाले असतील व ते जर मौलिक बदल करूं लागले तर भांडवलवाला वर्ग, त्यांना

वाटेल त्या मार्गानें विरोध करील. तो विरोध मागें सांगितल्याप्रमाणें केवळ लोकशाही तंत्र सांभाळून कमी करतां येणार नाहीं. तो दडपून टाकतांना समाजांतील स्वातंत्र्य कांहींसें व कांहीं काळ आकसेल. केवळ स्वातंत्र्य सर्वांना व संपूर्णपणें रहावें म्हणून संपत्तिमान वर्गाचे हिताला बाध होईल असें कांहीं करणार नाहीं, असें अधिकारारूढ झालेला विरोधी पक्ष सांगू शकत नाहीं. नवी व्यवस्था अमलांत आणण्यासाठींच तर जनतेनें त्याला पाठिंबा दिलेला असतो. नुकसानभरपाई देऊन उत्पादनसाधनसामुग्रींतील मालकीहक्क विकत घेण्याचे योजनेनें मालकीहक्क नष्ट होत नाहीं, संपत्तिमान वर्ग नष्ट होत नाहीं, निराळ्या स्वरूपांत तो राहतोच. संपत्तिमान वर्गाचा विरोध टाळण्यासाठीं ही किंमत समाजाला जास्त पडते. थोडीशी किंमत देऊन हा विरोध टाळून नव्या व्यवस्थेला मान्यता मिळत असेल, तर विशिष्ट परिस्थितींत ते योग्य ठरेल. तथापि सामान्यतः विचार करतां, समतासत्मक समाजव्यवस्था अमलांत आणतांना होणारा विरोध कमी करतांना समाजांतील स्वातंत्र्य आकसते. मग नवीन व्यवस्था अमलांत आणणारे सनदशीर मार्गानें सत्ताधिश झालेले असोत अगर क्रांतीच्या मार्गानें त्यांनीं सत्ता हस्तगत केलेली असो. व्यवस्था राखण्यासाठीं असो, अगर नवीन अमलांत आणण्यासाठीं असो, विरोधकांना निर्बल करण्यासाठीं समाजांतील स्वातंत्र्य कमी केलें जाते व ते सर्व सत्ताधीश करतात. मग त्यांचा रंग लाल असो अगर गुलाबी असो.

समाजांतील वर्गव्यवस्थेमुळें होत असलेल्या संपत्तीच्या विषम वांटणीची तीव्र जाणीव जोंपर्यंत बहुजनसमाजाला नव्हती तोंपर्यंत समाजांत सहिष्णुतेला मान होता. स्वातंत्र्य तेजींत होतें. जोंपर्यंत बहुजनसमाज हक्क म्हणून मागत नव्हता, तेव्हां दानाला नैतिक प्रतिष्ठा होती. सर्वत्र हक्काची भाषा सुरू झाल्याबरोबर प्रत्येकजण त्याच दृष्टीनें वागूं लागला. विचारविनिमयानें वागणें, सहिष्णुता दाखविणें म्हणजे आपली बाजू सत्यावर आधारलेली नाहीं असें मान्य करणें आहे असा भाव प्रस्थापित झाला. श्रद्धेचें लक्षण असहिष्णुता झालें आहे. जर्मनींत, सोव्हियट रशियांत, इटलींत, अमेरिकेंत, इंग्लंडांत, हिंदुस्थानांत सर्वत्र विरोधकांनां वाटेल त्या मार्गानें नाहींसें करणें हेंच राजकारणाचें प्रमुख अंग झाले आहे. जे जुलमी प्रकार आजपर्यंत निषेधार्ह म्हणून मानले गेले त्यांचा स्वीकार करण्यांत अनेक राज्यसत्तांनां कांहीं विधिनिषेध वाटेनासा झाला आहे. वाटेल त्या मार्गानें सत्ता घेऊन व वापरून जे आपले आहे ते राखावे हा दंडक सर्वमान्य झालेला दिसतो. तत्त्वांचा प्रसार, त्यांची मान्यता विवेकावर, बुद्धिवादावर अवलंबून ठेवणें हे विशेष फायदेशीर वाटेनासे झाले असून, शक्तिचे जोरावर, शस्त्रास्त्रांचे जोरावर आपलें म्हणणें विशेष रीतीनें पटेल असा

विश्वास वाढत आहे. आणि म्हणून संपत्तिमान् वर्ग राज्याचे सत्तेचा उपयोग करून शांतता व सुव्यवस्था यांचे नांवाखालीं वंचित जनतेला दडपून टाकण्याचा सर्रास प्रयत्न करीत आहे. जनतेचें स्वातंत्र्य व संपत्तीचें स्वामित्व हे यापुढें एकत्र राहणें अशक्य आहे. विषमता नांदत असलेल्या समाजांत राज्याच्या सत्तेचा उपयोग वंचित जनतेला वंचित ठेवण्यांत व ज्यांच्या जवळ संपत्ति आहे त्यांची कायम ठेवण्यांत तिचे संरक्षण करण्यांत, केला जातो. राज्याची ही शक्ति पाहूनच राज्याची सत्ता मिळविण्याचा वंचित जनतेचा प्रयत्न असतो. राज्य हस्तगत झाले, त्याची सत्ता मिळाली तर त्याचा उपयोग करून आपण कांहीं हित साधूं असें जनतेला वाटत असतें. तथापि कुठल्याही राज्यांत जनतेनें सनदशीर मार्गानें आपलें बहुमत प्रस्थापित केलें, येवढ्यावरून ती सत्ताधीश झाली असें अद्याप घडून आलें नाहीं. परिग्रही समाजांत, विषम समाजांत राज्यपद्धतीचें स्वरूप कसेही असले तरी खरी सत्ता संपत्तिमान् वर्गाचे हातांत असते. आणि म्हणून जेव्हां विद्यमान राज्यपद्धतीनें सत्ता जर जनतेच्या हातांत जाऊं लागली तर हा वर्ग ताबडतोब आपल्या हिताला जुळेल असा फरक राज्यपद्धतींत, राज्यसंस्थांत करण्यास कमी करत नाहीं व हें करतांना समाजाचे हित, सुव्यवस्था, शांतता याच घोषणा करीत असतो. बिसमिल्लाचें नांव घेऊनच खाटिक बकरें कापतो ! ! संघस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य मुद्रणस्वातंत्र्य, वगैरे सर्व चराचर कापलीं जातात व सुव्यवस्था व शांतता स्थापली जाते ! !

गेल्या शंभर वर्षांत समाजसेवेचें जें मोठें स्वरूप राज्यकार्याला आलें त्यावरून सामाजिक सद्बुद्धी, सद्भावना यांची केवळ वाढ झाली म्हणजे राज्यकार्यांत सार्वजनिक हिताचे दृष्टीनें इष्ट ते फरक घडून येतील हें वरील विवेचनावरून किती असंभवनीय आहे हें सहज दिसून येईल. आधुनिक राज्याचा स्पष्ट हेतु वरील विवेचनावरून जे समाजांतील विशिष्ट वर्गसंबंध असतील त्यांचें संरक्षण करणें हाच आहे हें दिसून येते. त्यांत बदल करण्याचा प्रयत्न केल्यास राज्याची सर्व सत्ता विरोध करते हा अनुभव आहे. मालकीहक्कामुळें समाजांत उत्पन्न झालेली आर्थिक वर्गव्यवस्था जर दूर करण्याचा प्रयत्न झाला तर त्याला पहिला विरोध राज्यापासून होतो. राज्य हे विद्यमान् व्यवस्थेला उचलून धरणारे संघटन आहे मग ती विद्यमान व्यवस्था कुठल्याही स्वरूपाची असो. जो स्वार असेल त्याचेसाठीं धावणारा हा अश्व आहे. तो जशी गति देईल, तो जशी दिशा दाखवील त्याप्रमाणें हा चाल घेतो. म्हणून भांडवलशाही समाजव्यवस्थेंत राज्यावर खरी सत्ता भांडवलवाल्यावर्गाची असल्यामुळें त्या वर्गाला विरोधी अहितकारक असा कोणताही बदल वर्गसंबंधांत व विद्यमान व्यवस्थेंत राज्य होऊं देणार नाहीं. होणारा विरोध हाणून पाडण्यासाठीं राज्याची

बलनिष्ठसत्ता उपयोगांत येते. जेवढें सार्वजनिक हित हा वर्ग होऊं देईल तेवढेंच राज्यामार्फत होईल. सदसद्विवेकबुद्धि व सद्भावना यांच्या आहारी जाऊन कोणी सत्ता त्याग केला असे अनुभवाला आले नाहीं. इतिहासाची साक्ष अशी आहे कीं सत्तेची लालसा कोणालाही सुटली नाहीं व ती टिकविण्यासाठीं कुठलाही मार्ग कोणी त्याज्य मानला नाहीं; जेथें जेथें विद्यमान व्यवस्थेत मूलग्राही फरक करण्याचें प्रयत्न झाले तेथें तेथें यशासाठीं क्रांतीच करावी लागली. हा अनुभव लक्षांत घेतां केवळ न्यायबुद्धीला आवाहन करून हृदयपरिवर्तनावर विश्वास ठेऊन, विद्यमान व्यवस्थेत सुप्रतिष्ठित झालेले हितसंबंध-आत्मसमर्पण करतील ही आशा व्यर्थ वाटते. ते हितसंबंध आहेत तसे राहावे हे पाहाण्याचें कार्य राज्य करीत असते. राजकीय दृष्ट्या लोकशाही व्यवस्था जरी असली तरी प्रत्यक्ष या देखाव्यामागें भांडवलवाल्या-वर्गांचीं सत्ताच प्रभावी असते. सरंजामशाही हाणून पाडतांना मध्यमवर्गानें भांडवल शाहीला जी मदत केली त्याचा मोबदला म्हणून राजकीय लोकशाही अस्तित्वांत आली असें इतिहास सांगतो. तथापि या लोकशाहीचे साहाय्यानें भांडवलशाहीचे आर्थिक हितसंबंधांत मौलिक बदल करण्याचे प्रयत्न जेथें झाले तेथें राज्याचें साहाय्यानेंच ते हाणून पाडण्यांत आले. राज्याचे लोकशाही स्वरूप ताबडतोब बदलण्यांत आले. लोकशाही हे दाखवावयाचे दांत आहेत. खाण्याचे दांत भांडवलशाहीचे मुखांत असतात.

वरील अनुभव लक्षांत घेता राज्य हे सार्वजनिक हितासाठीं निर्माण झालेले संघटन आहे येवढें मान्य करून भागत नाहीं. राज्यांतील समाजव्यवस्था जर विषम असेल तर ती कायम ठेवणारे राज्य हे एक साधन ठरते. ज्यांच्या हातांत समाजांतील उत्पादनांची साधनें आहेत, ज्यांच्या मालकीची ती आहेत, ते समाजांत प्रभावी असतात व म्हणून ते समाजावर आर्थिकदृष्ट्या हुकमत चालवितात. यामुळें उत्पन्न झालेले वर्गसंबंध, कायम ठेवण्याचे कार्य राज्य करते. या परिस्थितींत खरें सार्वजनिक हित राज्य करूं शकणार नाहीं हे स्पष्ट आहे. राज्य हें खरें सार्वजनिक हित साधणारे एक संघटन व्हावयाचे असेल तर समाजांतील विषम वर्गसंबंध नष्ट झाले पाहिजेत, म्हणजेच समाजांतील उत्पादनाची साधनसामुग्री ही सामाजिक मालकीची झाली पाहिजे. असें झालें म्हणजे कोणा एकाचे हित समाजांत प्रबळ ठरणार नाहीं. व सर्वांचे हित ज्यास्तींतज्यास्त साधले जाईल. सर्वांच्या गरजेचा विचार त्यांचेजवळ काय आहे यावरून न होता त्यांना खरोखर काय पाहिजे आहे या दृष्टीनें होईल. व जे त्यांना मिळेल ते त्यांनीं समाजासाठीं जे कार्य केलें असेल त्या मानानें मिळेल. जेथें समाजांत सर्व सारखे आहेत अशा समतात्मक समाजांत उत्पादनाचे साधनसामुग्रीचा

ज्यास्तींतज्यास्त उपयोग करून ज्यास्तींतज्यास्त सार्वजनिक हित साधणें राज्याला शक्य आहे. विषम समाजांत ज्या सामाजिक वर्गाचे हातांत राजकीय सत्ता येते तो तिचा उपयोग आपले खास हितसंबंध वाढविण्याकडे करतो, व या खास हितसंबंधांना अगदी प्रामाणिकपणें सार्वजनिक हितसंबंध समजत असतो असा अनुभव आहे ! जेथें राज्याचें स्वरूप लोकशाही नसेल तेथें हे एकदम ठळकपणें दिसतें, जेथें राज्याचे स्वरूप लोकशाही आहे तेथें खास हितसंबंध साधतांनां थोड्या सवलती मात्र जनतेला दिल्याचा देखावा करून सार्वजनिक आच्छादनाखालीं हा वर्गस्वार्थ झांकला जातो.

राज्य याचा तात्त्विक हेतु कांहींहीं असला तरी प्रत्यक्ष व्यवहारांत त्याची सत्ता ज्यांचे हातांत समाजांतील आर्थिक सत्ता आहे त्यांचे हितासाठी तिचा उपयोग केला जातो. ही आर्थिक सत्ता समाजांतील वर्गसंबंध निश्चित करीत असते व त्याच जोरावर समाजांत कायदेशीर रीतीनें कोणाला काय मिळावें हेही ती ठरविते. तिच्या इच्छे-विरुद्ध समाजांत निर्माण होणाऱ्या उत्पादनाची वाटणी करण्याची शक्ति राज्यांत नसते. उत्पादन सृष्टीवर तिची सत्ता असल्यामुळें तिच्यावर समाज—जीवन, समाजाचा व्यव-हार अवलंबून असतो. तात्पर्य समाजांतील आर्थिक व्यवस्थेच्या विसंगत अगर विरुद्ध असें कांहींही राज्य करूं शकत नाहीं. या आर्थिक व्यवस्थेमागील असलेली नीति, विचारप्रणाली जोपर्यंत बदलली नाहीं तोंपर्यंत राज्याचें स्वरुप कसेंही असले तरी ही आर्थिक व्यवस्था बदलणार नाहीं. परीग्रही समाजांत ही नीति म्हणजे खाजगी माल-कीचे श्रेष्ठत्व. व्यक्तिगत व सामाजिक जीवनांत स्वामित्वाचा भाव किती प्रखर व प्रबल आहे हे सांगण्याचें कारण नाहीं. स्वामित्वाची कल्पना जवळजवळ समाजाइतकी प्राचीन आहे. जीवनाचा भाग झालेल्या या कल्पनेचा त्याग करणें सोपें नाहीं. तिज-वर हल्ला होताच, विवेक सोडून माणसें वागूं लागतात. खाजगी मालकीची, खाजगी स्वामित्वाची कल्पना क्रमाक्रमानें नाहींशीं करण्यासाठी, अनेक ठिकाणीं प्रयत्न झाले आहेत. ते यशस्वी होण्यासाठीं, विवेकानें विचारविनिमयानें वागण्याची तयारी असली पाहिजे; आणि आजच्या जगांत तिचीच उणीव भासत आहे. तथापि आज अशी परिस्थिती निर्माण झाली आहे कीं विषमतेवर आधारलेली आर्थिक व्यवस्था या पुढें टिकणें कठीण झाले आहे. राज्याचा तात्विक हेतु जर व्यवहारांत सफल होत नसेल तर राज्य चालविण्याच्या कल्पनेंत जरूर तो फरक झाला पाहिजे, याची आवश्यकता स्पष्ट होत आहे. जागृत जनता राजकीय समतेनें समाधान पावेनाशी झाली आहे. विद्यमान राजकीय संस्था राज्याचा तात्विक हेतु सफल करण्याचे कामीं आड येत असतील तर त्यांच्यांत बदल झाला पाहिजे हे अपरिहार्य ठरते. राज्यशास्त्रानें या परि-स्थितींत राज्य तात्विक दृष्ट्या काय आहे याचा विचार न करतां ठिकठिकाणीं ते

प्रत्यक्ष अनुभवास कसे येते याचा विचार केला पाहिजे. कारण जे अनुभवास येते तेच राज्याचें खरे स्वरूप. पदार्थाची गोडी जिव्हेनें कळणारी असते, त्याला दिलेल्या नांवा- वरून नव्हे. राज्य प्रत्यक्ष जी समाजव्यवस्था आहे तिचे संरक्षण करणारें साधन झालें आहे. समाजांतील विषम व्यवस्थेमुळें राज्य भांडवलवाल्यांचें साधन झाले आहे. या परिस्थितींत युद्ध ही अपरिहार्य घटना आहे.

व्यक्तीचे सुखासाठीं निर्माण झालेलें राज्य खरोखर तसें असलें पाहिजे. तें तसें होण्यासाठीं, कोणत्याही एका व्यक्तीचें अगर वर्गाचें हित समाजांत प्रबळ असतां कामा नये. अशा समता समाजांत राज्य हे खरखरे सार्वजनिक हित साधणारें संघटन होईल. आंतरराष्ट्रीय जगांत अशी राज्यें झालीं म्हणजे युद्धाचे प्रसंग येणार नाहींत. कारण कोणी एका वर्गाचे हितासाठीं राज्याचा उपयोग होत नसल्यानें, सर्वांच्या हिताचे दृष्टीनें विवेकानें व विचारविनिमयानें घेणें सर्वांना हितावह वाटेल. प्रस्तुत महायुद्धांतून नूतन जग निर्माण होणारें आहे अशी घोषणा सर्वत्र ऐकूं येत आहे. खरोखर जगांत शांतता नांदावयाची असेल तर जग हे एक समजून त्याचें नियमन करणारें एकच आंतरराष्ट्रीय संघटन असले पाहिजे व त्यांतील घटकांना सारखे स्थान असले पाहिजे. कोणी कुणाचे अंकित असूं नये. त्याचप्रमाणें त्या संघ- टनेंत कुणाही गटांना मान्यता न मिळतां राष्ट्रपरत्वें मान्यता मिळाली पाहिजे. घटक राष्ट्रांना आपले प्रभुत्व जागतिक शांततेसाठीं, सुव्यवस्थेसाठीं कमी करावे लागेल, पण त्यांतच त्यांच्या स्वातंत्र्याचें संरक्षण आहे त्याला स्थैर्य आहे. भांडवलशाही राष्ट्रें याला तयार होणार नाहींत; म्हणून हे महायुद्ध जर खरोखर यशस्वी व्हावयाचे असेल तर कुठलेही राष्ट्र भांडवलशाही राहतां कामा नये. जित आणि जेते या दोन्ही राष्ट्रांत याप्रमाणें झालें तरच शांतता राहील. विषम आर्थिक व्यवस्था कुठेंही कायम ठेवली कीं ती भावी साम्राज्यशाही असून भावी अनर्थाला कारणीभूत निःसंशय होईल. राज्यांत समतात्मक समाजरचना असली पाहिजे. तशी असेल तर व्यक्तिमात्राला सुख भेटेल, जगांत शांति नांदेल. आणि या दृष्टीनें राज्यविषयक कल्पनांची व इष्ट त्या राज्यव्यवस्थेची चर्चा या ग्रंथांत केली आहे. इष्ट तें कसें घडवून आणावे हे सांगणारा हा ग्रंथ नाहीं. किंबहुना, क्रांतिची स्मृति अशी कोणीच रचूं शकत नाहीं परिस्थितीप्रमाणें कोणत्या मार्गानें जावे याचें यशस्वी तंत्र त्या त्या परिस्थितींतच असतें. दीर्घदृष्टीला ते दिसतें, शोधक विवेकाला तें सांपडतें, धैर्याचा हात ते उचलतो, व निश्चयी मन त्याच्या साहाय्यानें विजयी होते.

---

# सूचि

म



य



र



ल



व



श



स

# श्री. न. वि. गाडगीळ, यांचे ग्रंथ

| | |
|---|---|
| (१) हिंदी अंदाजपत्रकें (भाग १) | किं. २॥ रु. |
| (२) [illegible]नवाचें [illegible]र्थशास्त्र | किं. [illegible] रु. |
| (३) क[illegible]ांतील ६ वर्षे | किं. ३॥ रु. |
| ([illegible]) सभाशास्त्र | किं. [illegible] रु. |
| (५) राज्यशास्त्रविचार | किं. ८ रु. |
| (६) वक्तृत्वशास्त्र | (संकल्पित) |
| (७) राजव्यवहार विचार | ( ,, ) |
| (८) [illegible]धिविचार | ( ,, ) |
| (९) योजनापूर्ण व्यवहार | ( ,, ) |
| (१०) पन्नाशीची झुळूक | ( ,, ) |

(११) हिंदी अंदाजपत्रकें [illegible]—लवकरच प्रका[illegible]शित होईल.

मिळण्याचे ठिकाण—४१९ शनवार

व

सर्व प्रमुख ग्रंथविक्रेते